श्रीमद्भगवत्पतञ्जलिविरचित

# व्याकरणमहाभाष्य

## मूळ आणि
## मराठी भाषांतर

भाग पांचवा ( अध्याय ६ )

भाषांतरकार

महामहोपाध्याय वासुदेवशास्त्री अभ्यंकर

संपादक

प्राध्यापक काशीनाथ वासुदेव अभ्यंकर.

पुणें

वैशाख शुक्ल तृतीया, शके १८७५ १५ मे सन १९५३

# प्रास्ताविक निवेदन



सुमारें बारा वर्षांपूर्वी व्याकरणमहाभाष्याचे भाग १ व २ प्रसिद्ध झाल्यानंतर महायुद्ध-जन्य परिस्थितीमुळें व इतर अडचणींमुळें पुढील भाग प्रकाशित करण्याचें काम स्थगित झालें होतें. चार वर्षांपूर्वी पुन्हां कामास सुरुवात झाली व जानेवारी सन १९५१ मध्यें शेवटचा म्हणजे ६ वा भाग (पूर्वसंकल्पित ५ वा भाग) प्रसिद्ध झाला आणि आक्टोबर सन १९५१ मध्यें तिसरा भाग प्रसिद्ध झाला. गेल्या वर्षी ऑगस्ट सन १९५२ मध्यें चौथा भाग प्रसिद्ध झाला व आज पांचवा भाग प्रसिद्ध करीत आहों. प्रकाशनाचे सोयीसाठीं संकल्पित पांच भागां-ऐवजीं एकंदर सहा भाग करण्याचें ठरवून तिसऱ्या भागामध्यें संपूर्ण तिसरा अध्याय, चौथ्या भागांत ४ व ५ अध्याय, पांचव्या भागामध्यें सहावा अध्याय, सहाव्या भागांत ७ व ८ अध्याय व यांशिवाय प्रस्तावनेचा स्वतंत्र भागही देण्याचें योजिलें आहे.

दुर्दैवानें भाग १ व २ यांशियाय बाकींच्या भागांचें काम शास्त्रीबुवांचे द्रष्टृत्वाखालीं होऊं शकलें नाहीं तरी त्यांचे चिरंजीव सेवानिवृत्त प्राध्यापक काशीनाथ वासुदेव अभ्यंकर यांनीं तें आपले अंगावर घेऊन संस्थेस उपकृत केलें व भाषांतराचें काम या भागाचे प्रकाशनानें संपूर्ण झालें हें नमूद करण्यास मला आनंद वाटतो. प्रस्तावनाखंडही लवकरच प्रसिद्ध होईल अशी आशा आहे.

पुणें विद्यापीठानें या भागाचे प्रकाशनाला मदतीदाखल रु. १००० मदत दिली व पुढें प्रकाशित होणाऱ्या भागालाही त्याप्रमाणेंच मदत देण्याचें आश्वासन दिलें आहे. याबद्दल पुणें विद्यापीठाचेही अन्तःकरणपूर्वक आभार मानितों.

फर्ग्युसन कॉलेज, पुणें.<br>ता. १५ मे १९५३

गोपाळ लक्ष्मण चंद्रात्रेय,<br>सेक्रेटरी, डे. ए. सोसायटी.



श्रीमद्भगवत्पतञ्जलिविरचितम्

# व्याकरणमहाभाष्यम्

**एकाचो द्वे प्रथमस्य ॥६।१।१॥**[1]

एकाच इति किमयं बहुव्रीहिः । एकोऽज्यस्मिन्स एकाच् एकाच इति । आहोस्वित्तत्पुरुषोऽयं समानाधिकरणः । एकोऽच् एकाच् एकाच इति । किं चातः । यदि बहुव्रीहिः सिद्धं पपाच पपाठ इयाय आरेति न सिध्यति । अथ तत्पुरुषः समानाधिकरणः सिद्धमियाय आरेति पपाच पपाठेति न सिध्यति ॥ अत उत्तरं पठति ।

**एकाचो द्वे प्रथमस्येति बहुव्रीहिनिर्देशः ॥ १॥**

एकाचो द्वे प्रथमस्येति बहुव्रीहिनिर्देशोऽयम् ॥ एकवर्णेषु कथम् ।

**एकवर्णेषु व्यपदेशिवद्वचनात् ॥ २ ॥**

व्यपदेशिवदेकस्मिन्कार्यं भवतीति वक्तव्यम् । एवमेकवर्णेषु द्विर्वचनं भविष्यति ॥

एकाचो द्वे भवत इत्युच्यते तत्र न ज्ञायते कस्यैकाचो द्वे भवत इति । वक्ष्यति

---

(सू. १) एकाच् हा शब्द एक आहे अच् ज्यामध्यें असा अर्थ करून बहुव्रीहि समजावयाचा किंवा एक जो अच् तो एकाच् असा कर्मधारय समजावयाचा ?

या दोहोंमध्यें फरक काय ?

जर बहुव्रीहि समजला तर पपाच, पपाठ वगैरे रूपें साधतात; पण इयाय आर वगैरे रूपें साधत नाहींत. कर्मधारय समजला तर इयाय आर वगैरे रूपें साधतात, पण पपाच, पपाठ वगैरे साधत नाहींत. हें मनांत घेऊन वार्तिककार म्हणतातः—

(वा. १) एकाचः हा बहुव्रीहि समास आहे असें समजावें.

पण तसें समजलें तर इयाय आर इत्यादि ठिकाणीं एक वर्णाविषयीं या सूत्राची प्रवृत्ति कशी होईल ?

(वा. २) 'मुख्य व्यवहारावर अवलंबून असलेलें कार्य मुख्य व्यवहार होण्यासारखी स्थिति नसेल तेथेंही करावें' असें वचन आहे. (यालाच व्यपदेशिवद्भाव म्हणतात). त्यामुळें एक वर्णाविषयीं द्विर्वचनाची प्रवृत्ति होईल.

एकाच् शब्दस्वरूपाला द्वित्व होतें एवढेंच म्हटलें असल्यामुळें कसल्या एकाच् शब्दस्वरूपाला द्वित्व करावयाचें तें समजत नाहीं.

---

१. (सू. १) हें अधिकार सूत्र आहे. येथून पुढें प्रत्येक सूत्रामध्यें एकाचः, द्वे, आणि प्रथमस्य हीं

२. कारण इ आणि ऋ हे धातू एकाच्-रूपी आहेत, त्यांमध्यें एक अच् नाहीं.

लिटि धातोरनभ्यासस्य [ ६.१.८. ] इति तेन धातोरेकाच इति विज्ञायते । यदि धातोरेकाचः सिद्धं पपाच पपाठ जजागार पुपुत्रीयिषतीति न सिध्यति । धातोरिति नैषैकाच्समानाधिकरणा षष्ठी । धातोरेकाच इति । किं तर्हि । अवयवयोगैषा षष्ठी । धातोर्य एकाजवयव इति ॥ अवयवयोगैषा षष्ठी चेत्सिद्धं जजागार पुपुत्रीयिषतीति पपाच पपाठेति न सिध्यति । एषोऽपि व्यपदेशिवद्भावेन धातोरेकाजवयवो भवति ॥

एकाचो द्वे प्रथमस्येत्युच्यते तेन यत्रैव प्रथमश्चाप्रथमश्चास्ति तत्र द्विर्वचनं स्यात् । जजागार पुपुत्रीयिषतीति । पपाच पपाठेत्यत्र न स्यात् ।

**प्रथमत्वे च ॥ ३ ॥**

प्रथमत्वे च किम् । व्यपदेशिवद्वचनात्सिद्धमित्येव ॥ स तर्हि व्यपदेशिवद्भावो वक्तव्यः । न वक्तव्यः ।

**उक्तं वा ॥ ४ ॥**

किमुक्तम् । तत्र व्यपदेशिवद्वचनमेकाचो द्वे प्रथमार्थं षत्वे चादेशसंप्रत्ययार्थम् । नैष दोषः । अवचनाल्लोकविज्ञानात्सिद्धमित्येव ॥

**योगविभागो वा ॥ ५ ॥**

अथवा योगविभागः करिष्यते । एकाचो द्वे भवतः । किमर्थो योगविभागः ।

---

पुढें लिटि धातोरनभ्यासस्य ( ६।१।८ ) असें म्हटलें आहे; तेव्हां धातु जो एकाच् त्याला द्वित्व होतें असें समजलें जाईल.

जर एकाच् धातूला द्वित्व होतें असें समजलें तर पपाच पपाठ वगैरे रूपें साधतात; पण, जजागार पुपुत्रीयिषति हीं रूपें साधत नाहींत.[१]

धातुसंज्ञक जो एकाच् अशा अर्थाची धातोः ही समानाधिकरण षष्ठी समजूं नये; तर, धातूचा अवयव जो एकाच् भाग अशा अर्थाची म्हणजे अवयवार्थक षष्ठी समजावी.

जर धातोः येथें अवयवार्थक षष्ठी असेल तर जजागार पुपुत्रीयिषति हीं रूपें साधतात; पण पपाच पपाठ हीं रूपें साधत नाहींत.

येथेंही आपणच आपला अवयव आहे असें व्यपदेशिवद्भावानें समजतां येईल.

तरी पण येथें एकाचो द्वे प्रथमस्य असें म्हटलें असल्यामुळें जेथें धातूचे अवयव अनेक एकाच् असतील तेथेंच त्यांतील प्रथम एकाचाला द्वित्व होईल. उदा० जजागार, पुपुत्रीयिषति. पण पपाच पपाठ इत्यादि उदाहरणांमध्यें द्वित्व होणार नाहीं.

( वा. ३ ) प्रथमत्वाविषयींही तसेंच समजावें.

तसेंच म्हणजे काय ?

तसेंच म्हणजे व्यपदेशिवद्भावानें इष्ट साधलें जातें असें.

तर, मग व्यपदेशिवद्भावाबद्दल वचन करावयास पाहिजे.

वचन करावयास नको.

( वा ४ ) कारण पूर्वी ' तत्र व्यपदेशिवद्वचनम् । एकाचो द्वे प्रथमार्थम् । षत्वे चादेशसंप्रत्ययार्थम् ( सू. १।१।२१ वा. २, ३, ४ ) असें सांगितलेंच आहे. आणि त्याचे पुढेंही ' हा दोष येत नाहीं; कारण अवचनाल्लोकविज्ञानात्सिद्धम् ( सू. १।१।२१ वा. ५ ) ' असें सांगितलें आहे.

( वा. ५ ) अथवा योगविभाग केला जाईल. तो असा:– ' एकाचो द्वे ' एवढेंच एक सूत्र करावें.

हा योगविभाग कशाकरितां ?

---

१. कारण हे धातू एकाच् नाहींत, जागृ धातूमध्यें अच् आहेत.

**एकाज्मात्रस्य द्विर्वचनार्थः ॥ ६ ॥**

एकाज्मात्रस्य द्विर्वचनं यथा स्यात् । इयाय पपाच । ततः प्रथमस्य । प्रथमस्यैकाचो द्वे भवतः । इदमिदानीं किमर्थम् । नियमार्थम् । यत्र प्रथमश्चाप्रथमश्चास्ति तत्र प्रथमस्यैकाचो द्विर्वचनं यथा स्यादप्रथमस्य मा भूदिति । जजागार पुपुत्रीयिषतीति ॥

**एकाचोऽवयवैकाच्त्वादवयवानां द्विर्वचनप्रसङ्गः ॥ ७ ॥**

एकाचोऽवयवैकाच्त्वादवयवानां द्विर्वचनं प्राप्नोति । नेनिजतीत्यत्र निज्शब्दोऽप्येकाजिज्शब्दोऽप्येकाजिकारोऽप्येकाज्निशब्दोऽपि । तत्र निज्शब्दस्य द्विर्वचने रूपं सिद्धं दोषाश्च न सन्ति । इज्शब्दस्य द्विर्वचने रूपं न सिध्यति दोषाश्च न सन्ति । इकारस्य द्विर्वचने रूपं न सिध्यति दोषाश्च सन्ति । निशब्दस्य द्विर्वचने रूपं सिद्धं दोषास्तु सन्ति ॥ तत्र को दोषः ।

**तत्र जुस्भाववचनम् ॥ ८ ॥**

तत्र जुस्भावो वक्तव्यः । अनेनिजुः पर्यवेविषुः । अभ्यस्ताज्झेर्जुस्भावो भवतीति जुस्भावो न प्राप्नोति जकारेण व्यवधानात् ॥

**स्वरश्च ॥ ९ ॥**

स्वरश्च न सिध्यति । नेनिजति यत्परिवेविषतीति । अभ्यस्तानामादिरुदात्तो भवत्यजादौ लसार्वधातुक इत्येष स्वरो न प्राप्नोति ॥

---

( वा. ६ ) फक्त एकाच् असला कीं त्याला द्वित्व झालें पाहिजे याकरितां. उदा० इयाय, पपाच. नंतर ' प्रथमस्य ' असें दुसरें सूत्र करावें. प्रथम अशा एकाचाला द्वित्व होतें असा त्याचा अर्थ होय.

हें दुसरें सूत्र कशाकरितां ?

नियमाकरितां. तो नियम असा कीं जेथें प्रथम व अप्रथम असे अनेक एकाच् असतील तेथें प्रथम एकाचालाच द्वित्व होतें अप्रथम एकाचाला होत नाहीं. त्यामुळें जजागार, पुपुत्रीयिषति हीं रूपें साधतात.

( वा. ७ ) एकाच् भागाचे अवयवही एकाच् असे अनेक संभवत असल्यामुळें त्यांना द्वित्व प्राप्त होतें. उदा० नेनिजति. येथें निज् हाही एकाच् भाग आहे; इज् हाही एकाच् भाग आहे इ हाही एकाच् भाग आहे आणि नि शब्दही एकाच् आहे. त्यामध्यें निज् या समुदायाला द्विर्वचन केलें असतां जाणारे दोषही या वेळीं येत नाहींत. इज् शब्दाला द्वित्व केलें असतां रूप साधत नाहीं, पण पुढील दोषही येत नाहींत. इकाराला द्वित्व केलें असतां रूप साधत नाहींच पण पुढील दोष येतात. व नि शब्दाला द्वित्व केलें असतां रूप साधतें पण पुढें सांगितलेले दोष येतात.

आतां दोष तरी काय काय येतात ?

( वा. ८ ) नि किंवा इ याला द्वित्व केलें असतां अनेनिजुः पर्यवेविषुः वगैरे ठिकाणीं जुस् आदेश होण्याकरितां वचन करावें लागणार आहे. कारण, अभ्यस्ताहून पर जो झि प्रत्यय त्याला जुस् ( ३।४।१०८ ) सांगितला आहे पण तो जकारानें व्यवधान असल्यामुळें प्राप्त होत नाहीं.

( वा. ९ ) तसेंच, इष्ट असलेला स्वरही साधत नाहीं. कारण, केवळ इकार किंवा नि शब्द यांना द्विर्वचन केलें असतां नेनिजति यत्परिवेविषति इत्यादि ठिकाणीं अजादि ल-सार्वधातुक

अद्भावश्च ॥ १० ॥

अद्भावश्च न सिध्यति । नेनिजति परिवेविषतीति । अदभ्यस्तात् [ ७.१.४ ] इत्यद्भावो न प्राप्नोति ॥

नुम्प्रतिषेधश्च ॥ ११ ॥

नुम्प्रतिषेधश्च न सिध्यति । नेनिजत् परिवेविषत् । नाभ्यस्ताच्छतुः [ ७.१.७८ ] इति नुम्प्रतिषेधो न प्राप्नोति जकारेण व्यवधानात् ॥

शास्त्रहानिश्च ॥ १२ ॥

शास्त्रहानिश्च भवति । समुदायैकाचः शास्त्रं हीयते ॥

सिद्धं तु तत्समुदायैकाच्त्वाच्छास्त्राहानेः ॥ १३ ॥

सिद्धमेतत् । कथम् । तत्समुदायैकाच्त्वात् । किमिदं तत्समुदायैकाच्त्वादिति । तस्य समुदायस्तत्समुदायः । एकाज्भाव एकाच्त्वम् । तत्समुदायस्यैकाच्त्वं तत्समुदायैकाच्त्वम् तत्समुदायैकाच्त्वात् । तत्समुदायैकाचो द्विर्वचनं भविष्यति । कुत एतत् । शास्त्राहानेः । एवं हि शास्त्रमहीनं भवति ॥ ननु च समुदायैकाचोऽपि द्विर्वचने क्रियमाणेऽवयवैकाचः शास्त्रं हीयते । न हीयते । किं कारणम् । अवयवात्मकत्वात्समुदायस्य ।

---

यांनीं व्यवधान येत असल्यामुळें प्राप्त होत नाहीं.

( वा. १० ) नेनिजति इत्यादि ठिकाणीं जकारानें व्यवधान येत असल्यामुळें अदभ्यस्तात् ( ७।१।४ ) यानें झकाराला अत् आदेश प्राप्त होत नाहीं.

( वा. ११ ) नुमाचा निषेधही ( ७।१।७८ ) सिद्ध होत नाहीं. उदा. नेनिजत्, परिवेविषत्. या ठिकाणींही जकारानें व्यवधान येत असल्यामुळें नाभ्यस्ताच्छतुः ( ७।१।७८ ) यानें नुमागमाचा निषेध प्राप्त होत नाहीं.

( वा. १२ ) तसेंच एका प्रयोगामध्यें अवयवरूपी एका एकाचाला द्वित्व केलें असतां त्याच प्रयोगामध्यें समुदायरूपी एकाचाला द्वित्व केलें नसल्यामुळें तद्विषयक शास्त्राचा त्याग करावा लागतो.

( वा. १३ ) या सर्व ठिकाणी इष्ट सर्व सिद्ध होत आहे.

तें कसें ?

अवयवांच्या समुदायाच्या एकाच्त्वामुळें.

अवयवांच्या समुदायाचें एकाच्त्व म्हणजे काय ?

अवयवांचा समुदाय म्हणजे अवयवांचा समूह. तसेंच समुदायामध्यें एकच अच् म्हणजे स्वर असणें हें एकाच्त्व. अवयवांच्या समुदायामध्यें एकच अच् असणें हे अवयवांच्या समुदायाचें एकाच्त्व. तेव्हां अवयव अशा एकाच् भागांचा समुदाय जो एकाच् त्याला द्वित्व केलें असतां शास्त्रहानिरूपी दोष येत नाहीं.

पण समुदायरूपी एकाचाला द्वित्व केलें असतां अवयवरूप जो एकाच् त्याविषयीं शास्त्र झुगारून दिल्यासारखें होत आहे ना ?

तसें होत नाहीं.

तें काय म्हणून ?

समुदाय हा अनेक अवयवांचा मिळून बनलेला असतो म्हणून. समुदायाच्या पोटांत

अवयवात्मकः समुदायः । अभ्यन्तरो हि समुदायेऽवयवः । तद्यथा । वृक्षः प्रचलन्सहावयवैः प्रचलति ॥

**तत्र बहुव्रीहिनिर्देशेऽनच्कस्य द्विर्वचनमन्यपदार्थत्वात् ॥ १४ ॥**

तत्र बहुव्रीहिनिर्देशेऽनच्कस्य द्विर्वचनं प्राप्नोति । आटतुः आटुः । किं कारणम् । अन्यपदार्थत्वाद्बहुव्रीहेः । अन्यपदार्थे बहुव्रीहिर्वर्तते तेन यदन्यदच्स्तस्य द्विर्वचनं स्यात् । तद्यथा । चित्रगुरानीयतामित्युक्ते यस्य ता गावः सन्ति स आनीयते न गावः ॥

**सिद्धं तु तद्गुणसंविज्ञानात् पाणिनेर्यथा लोके ॥ १५ ॥**

सिद्धमेतत् । कथम् । तद्गुणसंविज्ञानाद्भगवतः पाणिनेराचार्यस्य यथा लोके । तद्यथा । लोके शुक्लवाससमानय लोहितोष्णीषाः प्रचरन्तीति तद्गुण आनीयते तद्गुणाश्च प्रचरन्ति । एवमिहापि ॥

अथ यस्य द्विर्वचनमारभ्यते किं तस्य

---

अवयव हे अंतर्भूत असतात[६]च. उदा. शाखा पानें फुलें वगैरे अवयवांचा मिळून झालेला जो वृक्ष तो हालविला असतां शाखा वगैरे सर्व अवयव हललेले प्रत्यक्ष दृष्टीस पडतात.

( वा. १४ ) एकाच् हा बहुव्रीहि समास उच्चारला असल्यामुळें अनच्क म्हणजे अचानें रहित केवळ व्यंजनरूपी जो भाग त्याला द्वित्व प्राप्त होऊं लागतें. उदा. आटतुः आटुः.

हे होण्याचें काय कारण ?

कारण असें कीं बहुव्रीहि ज्या पदांचा केला असेल त्या पदांच्या अर्थापेक्षां निराळा जो पदार्थ तो बहुव्रीहीचा अर्थ असतो. तेव्हां एक अचाहून निराळें म्हणजे अर्थात् हल् त्याला द्वित्व होईल. जसें चित्रगुः आनीयताम् असें म्हटलें म्हणजे ज्याच्या गायी आहेत असा फक्त मनुष्यच आणिला जातो. गायी आणिल्या जात नाहींत.

( वा. १५ ) एक अचासहित अशा अन्य पदार्थाला द्वित्व होणें हें सिद्ध होते.

तें कसें ?

तें असें कीं येथें भगवान् आचार्य पाणिनि तद्गुणसंविज्ञान बहुव्रीहि समजत[७] आहेत. जसें लोकामध्यें 'शुक्लवाससमानय' असें सांगितलें असतां तेथें त्या गुणाचा म्ह० शुक्लवस्त्रासहित असा पुरुष आणिला जातो. तसेंच यज्ञामध्यें 'लोहितोष्णीषाः प्रचरन्ति' असें ऋत्विजांचें प्रचरण सांगितलें आहे. तेथें त्या गुणाचे म्हणजे–तांबडें शिरोभूषण घातलेले असे ऋत्विज संचार करतांना दिसतात. त्याप्रमाणें येथेंही एकाच् म्हणजे एक अचासहित अशा भागाला द्वित्व होईल.

आतां ज्याला हें द्विर्वचन होतें त्याचे स्थानीं तें करावयाचें[८] किंवा एकाचेंच फक्त त्याच्या पुढें आणखी एकदां म्हणजे एकंदर दोनदां उच्चारण करावयाचें[९] ?

---

६. समुदाय जो एकाच् त्याला द्वित्व झालें म्हणजे आपोआपच अवयव एकाचांना द्वित्वाचा अनुभव येतो. त्यामुळें तेथें शास्त्रत्याग होत नाहीं.

७. ते जे गुण म्हणजे ज्या पदांचा बहुव्रीहि केला असेल त्या पदांचे अर्थ त्यांचें संविज्ञान म्हणजे अन्यपदार्थाचा जिकडे संबंध झाला असेल तिकडे त्या अन्यपदार्थाबरोबर संबंध होणें अशी स्थिति ज्या बहुव्रीहीमध्यें होते त्याला तद्गुणसंविज्ञान-बहुव्रीहि म्हणतात.

८. पपाच येथें पूर्वीचें पच् हें जाऊन त्याचे स्थानीं पच् पच् एवढा आदेश होतो. या पक्षाला स्थानेद्विर्वचनपक्ष असें म्हणतात.

९. पपाच येथें पूर्वीचें पच् हें कायम राहून त्याच्या पुढें त्याच्यासारखेंच पच् असें दुसऱ्यानदा पुन्हां उच्चार करणें या पक्षाला द्विःप्रयोगरूपद्विर्वचन असें

**स्थाने भवत्याहोस्विद् द्विःप्रयोग इति । कश्चात्र विशेषः ।**

**स्थाने द्विर्वचने णिलोपवचनं समुदायादेशत्वात् ॥ १६ ॥**

**स्थाने द्विर्वचने णिलोपो वक्तव्यः । आटिटत् आशिशत् । किं कारणम् । समुदायादेशत्वात् । समुदायस्य समुदाय आदेशस्तत्र संप्रमुग्धत्वात्प्रकृतिप्रत्ययसमुदायस्य नष्टो णिर्भवतीति णेरनिटि [६.४.५१] इति णिलोपो न प्राप्नोति ॥ इदमिह संप्रधार्यम् । द्विर्वचनं क्रियतां णिलोप इति किमत्र कर्तव्यम् । परत्वाण्णिलोपः । नित्यं द्विर्वचनम् । कृतेऽपि णिलोपे प्राप्नोत्यकृतेऽपि । द्विर्वचनमप्यनित्यम् । अन्यस्य कृते णिलोपे प्राप्नोत्यन्यस्याकृते शब्दान्तरस्य च प्राप्नुवन्विधिरनित्यो भवति । नित्यमेव द्विर्वचनम् । कथम् । रूपस्य स्थानिवत्त्वात् ॥**

---

या दोन्ही तऱ्हांत काय फरक आहे ?

( वा. १६ ) स्थाने-द्विर्वचन या पक्षीं आटिटत् आशिशत् इत्यादि स्थलीं णिलोप होण्याकरितां स्वतंत्र वचन करावें लागतें.

काय कारण ?

कारण असें कीं–आटिटत् आशिशत् येथें टि आणि शि या समुदायाचे स्थानीं टिटि आणि शिशि असा समुदाय आदेश झाला असल्यामुळें व तो आदेश स्थानीपेक्षां निराळाच असल्यामुळें त्यांत प्रकृति-प्रत्यय-विभागाची फोड होत[१०] नाहीं म्हणून तेथें णिप्रत्यय कोणता हें कळत नसल्यामुळें 'णेरनिटि' (६।४।५१) यानें णिलोप प्राप्त होत नाहीं.

आतां येथें अगोदर असा विचार उत्पन्न होतो कीं, आटि-अत् अशा अवस्थेंत प्रथमतः द्विर्वचन करावें किंवा णिलोप करावा.

मग यांत काय बरें पूर्वी करावें ?

पर असल्यामुळें प्रथमतः णिलोप करावा.

पण द्विर्वचन हें नित्य आहे. कारण णिलोप केला तरी अथवा न केला तरी द्विर्वचन प्राप्त होत आहे.

द्विर्वचन पण अनित्य आहे. कारण णिलोप केला असतां एका शब्दाला म्हणजे अट् याला द्वित्व प्राप्त होतें; आणि णिलोप केला नसतां दुसऱ्याच शब्दाला म्ह० टि या शब्दाला प्राप्त होतें व भिन्न भिन्न शब्दांना प्राप्त होणारा विधि अनित्य समजला जातो.

असें नाहीं. द्विर्वचन नित्यच आहे.

तें कसें ?

णिलोप केला असतांना सुद्धां 'द्विर्वचनेऽचि' ( १।१।५९ ) ह्या रूपस्थानिवद्भावामुळें टि या शब्दालाच द्वित्व येत[११] आहे.

---

म्हणतात.

१०. अट् धातूहून णिच् प्रत्यय करून पुढें लुङ्, च्लि, चङ् आणि ' चङि ' ( ६।१।११ ) यानें द्वित्व झालें आहे. तें धातूचा टकार आणि णिच् प्रत्ययाचा इकार मिळून टि या द्वितीय एकाचाला झालें आहे. जर हें द्वित्व धातूपैकींच कांहीं भागाला झालें असतें तर स्थानेद्विर्वचनपक्ष घेतला तरी तो द्वित्वानें झालेला आदेश धातूपैकींच आहे असें स्थानिवद्भावानें ( १।१।५६ ) म्हणतां आलें असतें. तसेंच प्रत्ययापैकींच कांहीं भागाला झालें असतें तर तें प्रत्ययापैकींच आहे असें म्हणता आलें असतें. पण येथें टि याला द्वित्व झालें आहे तो 'टि' हा भाग धड धातूही नाहीं व धड प्रत्ययही नाही. आणि तो टि हा भाग जाऊन त्याचे जागी दुसराच टिटि एवढा भाग नवीन आला आहे. तेव्हां अर्थातच धातूची हद्द कोठपर्यंत आहे आणि प्रत्ययाच्या हद्दीला कोठून प्रारंभ झाला हें समजण्याला कांहींच मार्ग नाहीं.

११. एकंदरीत द्वित्व नित्य असल्यामुळें पूर्वी होणार आणि मग णिलोप होणार नाहीं हा दोष स्थानेद्विर्वचन पक्षावर कायम राहतो.

**यच्च सन्यङन्तस्य द्विर्वचने ॥१७॥**

**यच्च सन्यङन्तस्य द्विर्वचने चोद्यं तदिहापि चोद्यम् । किं पुनस्तत् । सन्यङन्तस्येति चेदृशेः सन्यनिटो दीर्घकुत्वप्रसारणषत्वमधिकस्य द्विर्वचनादावृध्योश्चाभ्यस्तविधिप्रतिषेधः सङाश्रये च समुदायस्य समुदायादेशत्वाज्झलाश्रये चाव्यपदेश आमिश्रत्वादिति ॥**

---

( वा. १७ ) शिवाय 'सन्यङोः' (६।१।९) ही षष्ठी समजून सन्नन्ताला व यङन्ताला द्विर्वचन होतें असा अर्थ झाला असतां त्या पक्षावर जे आक्षेप घेतले जातात ते या स्थानेद्विर्वचन पक्षींही येतातच.

ते आक्षेप कोणते ?

ते आक्षेप म्हणजे— सन्यङन्तस्य[12] चेदृशेः सन्यनिटः । दीर्घकुत्व[13]प्रसारणषत्वमधिकस्य द्विर्वचनात् । आवृध्योश्चाभ्यस्तविधिप्रतिषेधः[14] । सङाश्रये[15] च समुदायस्य समुदायादेशत्वाज्झलाश्रये चाव्यपदेश आमिश्रत्वात् ( ६।१।९ वा. ४-७ ) या चार वार्तिकांत वार्तिककारांनीं जे घेतले आहेत ते.

---

१२ इयक्षमाणा ह्या वैदिक प्रयोगामध्यें अश् धातूहून सन्- छान्दस प्रयोग म्हणून इट् आगम झाला नाहीं. पहिल्या एकाचाला द्वित्व, अभ्यासाच्या अकाराला इत्व (७।४।७९), इयङ् ( ६।४।७८ ), धातूच्या शकाराला षत्व ( ८।२।३६ ), कत्व ( ८।२।४१ ), सनाच्या सकाराला षत्व (८।३।५९) आणि नंतर इयक्ष या सन् प्रत्ययान्त धातूहून लट् व त्याला शानच् झाला आहे. सन्यङोः ही षष्ठी घेतली तर अश्स् या सन् प्रत्ययान्त धातूमध्यें द्वितीय एकाच् संभवत असल्यामुळें त्यालाच द्वित्व होईल आणि प्रथम एकाचाला होणार नाहीं असा दोष येतो. आतां छान्दस प्रयोग म्हणून प्रथम एकाचाला द्वित्व केलें तरी स्थानेद्विर्वचनपक्षी अश्स् याला अश्स् अश्स् असा आदेश झाल्यामुळें त्या आदेशांतील सकार हा सन् प्रत्ययाचा अवयव आहे असें समजण्याला कांही मार्ग नसल्यामुळें त्याला षत्व होणार नाहीं असा दोष येतो.

१३. सन्यङोः ही षष्ठी घेतली असतां द्वित्व करतांना पहिल्या एकाच्-भागामध्यें सनाचा सकार हा द्वित्वामध्यें अधिक सापडतो. आणि तशांत स्थानेद्विर्वचन पक्ष घेतला म्हणजे चिचीषति, जिघांसति, जुहूषति, यियक्षति वगैरे उदाहरणांमध्यें 'सन् प्रत्ययाच्या सकारासहित पूर्वीचा धातु' एवढा प्रथम एकाच् भाग नष्ट होऊन त्याच्या जागीं त्याच्या दुप्पट आकाराचा निराळाच भाग येत असल्यामुळें त्या निराळ्या भागांत धातु कोणता व प्रत्ययाचा सकार कोणता ही फोड होत नाहीं. त्यामुळें वरील उदाहरणांमध्यें क्रमानें दीर्घ (६।४।१६) कुत्व ( ७।३।५५ ) संप्रसारण ( ६।१।१५ ) आणि षत्व ( ८।३।५९ ) हीं कार्यें होणार नाहींत.

१४. सन्यङोः ही षष्ठी घेतली असतां आप् व ऋध् हे अजादि धातू असल्यामुळें द्वितीय एकाच् जो सन् प्रत्यय त्याला धातूमधील शेवटच्या व्यंजनासहित द्वित्व होईल आणि पूर्वी सांगितल्याप्रमाणें प्रकृति व प्रत्यय यांची फोड करतां येणार नाहीं. शिवाय द्वित्वानें नवीन आलेला दुप्पट भाग अभ्यस्तसंज्ञक ( ६।१।५ ) असल्यामुळें अभ्यस्तनिमित्तक कार्यें होऊं लागतील व त्यांचा निषेध करावा लागेल.

१५. सन् प्रत्ययाला ( ३।१।५ ) आरंभ करून महिङ् ( ३।४।७८ ) या ङकारापर्यंत सङ् हा प्रत्याहार आहे. त्या सङ् प्रत्ययाच्या निमित्तानें होणारीं कार्यें ( ८।२।२२ वा. १ ) तसेंच झलादि सन् पुढें असतांना सांगितलेलीं कार्यें स्थानेद्विर्वचनपक्षीं समुदायाला समुदाय आदेश होऊन प्रकृतिप्रत्ययाचें मिश्रण झालें असल्यामुळें आणि ही प्रकृति व हा प्रत्यय असा निरनिराळा व्यवहार करतां येत नसल्यामुळें सन्-प्रत्ययान्त स्थलीं होणार नाहींत.

अस्तु तर्हि द्विःप्रयोगो द्विर्वचनम् ।

**द्विःप्रयोग इति चेण्णकारषकारादेशादेरेत्त्ववचनं लिटि ॥ १८ ॥**

द्विःप्रयोग इति चेण्णकारषकारादेशादेरेत्त्वं लिटि वक्तव्यम् । नेमतुः नेमुः । सेहे सेहाते सेहिरे । अनादेशादेरिति प्रतिषेधः प्राप्नोति । स्थाने पुनर्द्विर्वचने सति समुदायस्य समुदाय आदेशस्तत्र संप्रमुग्धत्वात्प्रकृतिप्रत्ययस्य नष्टः स आदेशादिर्भवति ॥ द्विःप्रयोगेऽपि द्विर्वचने सति न दोषः । वक्ष्यति तत्र लिड्ग्रहणस्य प्रयोजनं लिटि य आदेशादिस्तदादेर्नेति ॥

**इड्वचनं च यङ्लोपे ॥ १९ ॥**

इट् च यङ्लोपे वक्तव्यः । बेभिदिता बेभिदितुम् । एकाच उपदेशेऽनुदात्तात् [ ७.२.१० ] इतीट्प्रतिषेधः प्राप्नोति । स्थाने पुनर्द्विर्वचने सति समुदायस्य समुदाय आदेशस्तत्र संप्रमुग्धत्वात्प्रकृतिप्रत्ययस्य नष्टः स भवति य एकाजुपदेशेऽनुदात्तः ॥ द्विःप्रयोगेऽपि द्विर्वचने न दोषः । एकाज्ग्रहणेनाङ्गं विशेषयिष्यामः । एकाचोऽङ्गादिति । ननु चैकैकमत्राङ्गम् । समुदाये या वाक्यपरिसमाप्तिस्तयाङ्गसंज्ञा भविष्यति । कुत एतत् । शास्त्रहानेः । एवं हि शास्त्रम-

---

तर मग द्विःप्रयोगरूप द्विर्वचन हा पक्ष घ्यावा.

( वा. १८ ) द्विःप्रयोगरूप द्विर्वचन हा पक्ष गृहीत धरला तर णकार अथवा षकार यांचे स्थानीं झालेला जो अनुक्रमें नकार अथवा सकार तो आरंभीं असलेल्या अशा धातूला लिट् पुढें असतां एत्व होण्याकरितां वचन करावें लागेल. उदा० नेमतुः नेमुः; सेहे सेहाते सेहिरे. येथें 'अत एकहल्मध्ये०' ( ६।४।१२० ) या एत्वाचा 'अनादेशादेः' हा प्रतिषेध प्राप्त होत आहे. पण स्थानेद्विर्वचनपक्षीं समुदायाला समुदाय आदेश केला असतां त्यांत प्रकृतिप्रत्ययविभागाची फोड होत नाहीं आणि त्यामुळें त्यांतील नकार किंवा सकार हा आदेश झालेला आहे असें समजण्याला कांहींच मार्ग नसल्यामुळें सूत्रानेंच एत्व साधत आहे.

द्विःप्रयोगरूप द्विर्वचन या पक्षींही हा दोष येत नाहीं. कारण त्या सूत्रामध्यें जें लिटि असें म्हटलें आहे त्याचा उपयोग तेथें असा सांगण्यांत येणार आहे कीं धातूच्या आरंभींच्या वर्णाला लिटाच्या निमित्तानें आदेश झाला असेल तरच तेथें एत्व होत नाहीं.

( वा. १९ ) यङाचा लोप झाला असतां तेथें इट् आगम होतो असें वचन करावें. जसें बेभेदिता बेभेदितुम्. येथें 'एकाच उपदेशे०' ( ७।२।१० ) यानें इट् आगमाचा निषेध प्राप्त होत आहे. आणि स्थानेद्विर्वचनपक्षीं भिद्य हा पूर्वींचा समुदाय जाऊन त्याचे ठिकाणीं भिद् भिद् असा निराळा समुदाय आदेश केला असतां तेथें प्रकृतिप्रत्ययविभागाची फोड नसल्यामुळें उपदेशीं एकाच् आणि उपदेशीं अनुदात्त असा हल्लीं कोण आहे ते समजत नाहीं म्हणून निषेध येऊं शकत नाहीं.

द्विःप्रयोगपक्षींही हा दोष येत नाहीं. कारण एकाच् हें अंगाचें विशेषण केलें आहे. त्यामुळें एकाच् जें अंग असा अर्थ होतो.

पण द्विःप्रयोगरूप-द्विर्वचनपक्षीं एका सारखेंच दुसरें उच्चारिलें असल्यामुळें दोघांनाही निरनिराळी अंगसंज्ञा होत नाहीं ना ?

तरी पण येथें दोहोंना मिळून अंगसंज्ञा करतां येत असल्यामुळें समुदाये वाक्यपरिसमाप्तिः या न्यायानें समुदायालाच अंगसंज्ञा करावयाची आहे.

असें कशावरून ?

अशावरून कीं समुदायाला अंगसंज्ञा केली

हीनं भवति ॥

**इड्दीर्घप्रतिषेधश्च ॥ २० ॥**

इटो दीर्घत्वस्य च प्रतिषेधो वक्तव्यः। जरीगृहिता जरीगृहितुम् । ग्रहोऽलिटि दीर्घः [७.२.३७] इति दीर्घत्वं प्राप्नोति। स्थाने पुनर्द्विर्वचने समुदायस्य समुदाय आदेशस्तत्र संप्रमुग्धत्वात्प्रकृतिप्रत्ययस्य नष्टो ग्रहिः ॥ द्विःप्रयोगेऽपि द्विर्वचने न दोषः। ग्रहिणाङ्गं विशेषयिष्यामः । ग्रहेरङ्गादिति। ननु चैकैकमप्यत्राङ्गम्। समुदाये या वाक्यपरिसमाप्तिस्तयाङ्गसंज्ञा भविष्यति। कुत एतत् । शास्त्राहानेः । एवं हि शास्त्रमहीनं भवति ॥

**पदादिविधिप्रतिषेधश्च ॥ २१ ॥**

पदादिलक्षणविधेः प्रतिषेधो वक्तव्यः। सिषेच सुष्वाप। सात्पदाद्योः [८.३.१११] इति षत्वप्रतिषेधः प्राप्नोति । स्थाने पुनर्द्विर्वचने सति न दोषः । समुदायस्य समुदाय आदेशस्तत्र संप्रमुग्धत्वात्प्रकृतिप्रत्ययस्य नष्टः स पदादिर्भवति ॥ द्विः-

---

असतां अंगसंज्ञाशास्त्र झुगारून दिलेसें होत नाहीं.[१६]

( वा० २० ) तसेंच द्विःप्रयोगरूप द्विर्वचनपक्षीं इट् आगमाला प्राप्त झालेल्या दीर्घाचा प्रतिषेध करावा लागेल. उदा०—जरीगृहिता जरीगृहितुम् . येथें 'जरीगृह्य' या यङन्त धातूहून तृच् प्रत्यय इट् आगम अल्लोप व यलोप केले असतां ' ग्रहोऽलिटि० ' ( ७।२।३७ ) यानें इट् आगमाला दीर्घ प्राप्त होत आहे. पण स्थानेद्विर्वचपक्षीं ग्रह्य् या समुदायाचे स्थानीं ग्रह्य् ग्रह्य् असा निराळाच समुदाय आदेश झाल्यामुळें तेथें ही प्रकृति व हा प्रत्यय हें कांहींच कळत नाहीं. तेव्हां अर्थातच तेथें ग्रह धातूच नष्ट झाल्यामुळें दीर्घ होत नाहीं.

द्विःप्रयोगपक्षींही हा दोष येत नाहीं. कारण ग्रहः हें अंगाचें विशेषण केलें म्हणजे ग्रह हें जें अंग असा अर्थ होईल.

पण द्विःप्रयोगरूप द्विर्वचन या पक्षीं एकासारखेंच दुसरें उच्चारलें असल्यामुळें दोघांपैकीं प्रत्येकाला निरनिराळी अंगसंज्ञा आहे ना ?

तरी पण येथें दोहोंना मिळून अंगसंज्ञा करतां येत असल्यामुळें समुदाये वाक्यपरिसमाप्तिः या न्यायाचा अवलंब करून समुदायालाच अंगसंज्ञा होईल.

असें कशावरून ?

अशावरून कीं समुदायाला अंगसंज्ञा केली असतां अंगसंज्ञा सांगणारें शास्त्र सोडलें असें होत नाहीं.

( वा. २१ ) द्विःप्रयोगपक्षीं पदादि ह्या निमित्तानें सांगितलेला जो विधि म्ह० 'सात्पदाद्योः ' (८।३।१११ ) हा निषेध, त्याचा प्रतिषेध करावा लागेल. उदा० सिषेच सुष्वाप. येथें 'सात्पदाद्योः ' यानें षत्वनिषेध प्राप्त होत आहे. पण स्थानेद्विर्वचनपक्षीं हा दोष येत नाहीं. कारण सिच् या समुदायाचे स्थानीं सिच् सिच् असा निराळाच समुदाय आदेश झाल्यामुळें तेथें ही प्रकृति व हा प्रत्यय हें कांहींच कळत नाहीं. अर्थातच तेथें पदादि नष्ट झाल्यामुळें षत्वाचा निषेध होत नाहीं.

द्विःप्रयोगपक्षींही हा दोष येत नाहीं.

---

१६. समुदायाला आणि त्यांतील अवयवाला अंगसंज्ञा करण्याकरितां येथें अंगसंज्ञाशास्त्र उपस्थित होतें. त्यांत जर अवयवालाच अंगसंज्ञा केली तर समुदायाला ती न झाल्यामुळें तें शास्त्र झुगारल्यासारखें होतें. आणि समुदायालाच जर अंगसंज्ञा केली तर अवयवाला निराळी जरी केली नाहीं तरी तो अवयव अंगसंज्ञा झालेल्या समुदायापैकींच असल्यामुळें त्याला ती अंगसंज्ञा केल्यासारखीच होते म्हणून शास्त्र झुगारलेंसें होत नाहीं.

प्रयोगे चापि द्विर्वचने न दोषः । सुप्तिङ्भ्यां पदं विशेषयिष्यामः । यस्मात्सुप्तिङ्विधिस्तदादि सुबन्तं तिङन्तं च । ननु चैकैकस्मात्सुप्तिङ्विधिः । समुदाये या वाक्यपरिसमाप्तिस्तया पदसंज्ञा भविष्यति । कुत एतत् । शास्त्राहानेः । एवं हि शास्त्रमहीनं भवति ॥

तावेव सुप्तिङौ यौ ततः परौ सैव च प्रकृतिराद्या ।
आदिग्रहणं प्रकृतं समुदायपदत्वमेतेन ॥

## अजादेर्द्वितीयस्य ॥ ६ । १ । २॥

द्वितीयस्येत्यवचनमजादेरिति कर्मधारयात्पञ्चमी ॥ १ ॥

द्वितीयस्येति शक्यमवक्तुम् । कथम् । अजादेरिति नैषा बहुव्रीहेः षष्ठी । अजादिर्यस्य सोऽयमजादिः अजादेरिति । किं तर्हि । कर्मधारयात्पञ्चमी । अजादिरजादिः अजादेः परस्येति । तत्रान्तरेण द्वितीयग्रहणं द्वितीयस्यैव भविष्यति ॥

द्वितीयद्विर्वचने प्रथमनिवृत्तिः प्राप्तत्वात् ॥ २ ॥

द्वितीयद्विर्वचने प्रथमस्य निवृत्तिर्वक्तव्या । अटिटिषति अशिशिषतीति । किं कारणम् । प्राप्तत्वात् । प्राप्नोत्येकाचो द्वे

---

कारण सुप् आणि तिङ् हीं पदाचीं विशेषणें करावयाचीं आहेत. म्हणजे सुप्-प्रत्ययान्त आणि तिङ्प्रत्ययान्त असें जें पद असा अर्थ होईल. म्हणजे सुप् अथवा तिङ् प्रत्यय जिच्याहून केला असेल त्या प्रकृतीला आरंभ करून तो प्रत्यय शेवटीं असलेलें असें जें पद त्याच्या आदि सकाराला षत्व होत नाहीं असा सात्पदाद्योः या सूत्राचा अर्थ होईल.

पण द्विःप्रयोगपक्षीं पहिल्यासारखेंच दुसरें उच्चारलें असल्यामुळें सिषेच येथें तिङ् प्रत्यय हा पहिल्याप्रमाणें दुसऱ्या सिच् याहूनही केला आहे असें म्हणतां येत आहे ना ?

तरी पण पहिल्या सिच् याहून तिङ् प्रत्यय केला आहे. त्यामुळें सिच् सिच् अ या समुदायाला पदसंज्ञा करतां येतें.

पण समुदाये वाक्यपरिसमाप्तिः या न्यायानें त्या समुदायालाच पदसंज्ञा होईल असें कशावरून ?

अशावरून कीं समुदायाला पदसंज्ञा केली असतां अमुक भागाला पदसंज्ञा सांगणारें शास्त्र सोडलें असें कोठेंच होत नाहीं. असें पहा कीं सुप् व तिङ् प्रत्यय जे या उदाहरणामध्यें केले तेच द्वित्व केल्यानंतर पुढें दिसत आहेत; तसेंच ज्या प्रकृतीहून ते प्रत्यय केले ती प्रकृतीही द्वित्वानंतर दिसत असलेला पहिला भाग आहे, मध्यें जो कांहीं नवीन भाग शिरला आहे तो त्यामध्यें सामील होण्याकरितां तदादि या शब्दांत आदिग्रहण केलेंच आहे. तेव्हां एकंदरीत समुदायालाच पदसंज्ञा होते.

(सू. २ वा. १). या सूत्रामध्यें द्वितीयस्य हें पद घातलें नाहीं तरी चालेल. कारण, अजादेः येथें अच् आदिर्यस्य अजादिः असा बहुव्रीहि समास करून त्याहून षष्ठी केलेली नाहीं. तर अच् चासौ आदिश्च अजादिः असा कर्मधारय करून त्याहून पंचमी विभक्ति केली आहे. तेव्हां आदिभूत जो अच् त्याहून पुढील जो एकाच् भाग त्याला द्वित्व होतें, असा अर्थ होत असल्यामुळें द्वितीयस्य हें पद घातल्यावांचूनही द्वितीय भागालाच द्वित्व होईल.

(वा. २) अटिटिषति अशिशिषति इत्यादि ठिकाणीं जेथें द्वितीय एकाचाला द्विर्वचन सांगण्यांत येतें तेथें प्रथम एकाचाला 'एकाचो द्वे प्रथमस्य' यानें प्राप्त होणाऱ्या द्विर्वचनाचा निषेध करण्यांत यावा.

काय कारण ?

---

१. (सू. २) हेंही पूर्वसूत्राप्रमाणें अधिकारसूत्रच आहे.

प्रथमस्य [ ६. १. १ ] इति ॥ ननु च द्वितीयद्विर्वचनं प्रथमद्विर्वचनं बाधिष्यते । कथमन्यस्योच्यमानमन्यस्य बाधकं स्यात् । असति खल्वपि संभवे बाधनं भवत्यस्ति च संभवो यदुभयं स्यात ॥

**न वा प्रथमविज्ञाने हि द्वितीयाप्राप्तिरद्वितीयत्वात् ॥ ३ ॥**

न वा वक्तव्यम् । किं कारणम् । प्रथमविज्ञाने हि सति द्वितीयस्याप्राप्तिः स्यात् । किं कारणम् । अद्वितीयत्वात् । न हीदानीं प्रथमद्विर्वचने कृते द्वितीयो द्वितीयो भवति । कस्तर्हि । तृतीयः । तद्यथा । द्वयोरासीनयोस्तृतीय उपजायते न द्वितीयो द्वितीयो भवति । कस्तर्हि । तृतीयः ॥ न हि किंचिदुच्यतेऽकृते द्विर्वचने यो द्वितीयस्तस्य भवितव्यमिति । किं तर्हि । कृते द्विर्वचने यो द्वितीयस्तस्य द्विर्वचनं भविष्यति ॥ अनारम्भसममेवं स्यात् । अटेः प्रथमस्य द्विर्वचनं स्याद्धलादिशेषो द्वितीयस्य द्विर्वचनं हलादिशेषः । त्रयाणामकाराणां पररूपत्वेऽटिष-

---

कारण असें कीं–प्रथम एकाचाला एकाचो द्वे प्रथमस्य या सूत्रानें द्वित्वाची प्राप्ति येत आहे.

पण द्वितीय एकाचाला सांगितलेलें द्विर्वचन हें प्रथम एकाचाला प्राप्त झालेल्या द्विर्वचनाचा बाध करील.

असें म्हणतां येत नाहीं. कारण एका भागाला होणारें द्वित्व दुसऱ्या भागाला प्राप्त झालेल्या द्वित्वाचा कसा बरें बाध करील ?

दोनही कार्यें होणें जेथें संभवनीय नसेल तेथें एकानें दुसऱ्याचा बाध करणें योग्य होतें. येथें तर दोनही कार्यें होणें संभवनीय आहे.

( वा. ३ ) पहिल्या द्विर्वचनाचा येथें निषेध करावयास नको. कारण येथें दोनही द्वित्वें होणें संभवत नाहीं. असें पहा कीं क्रमानें पूर्वी पहिल्या एकाचाला द्विर्वचन केलें असतां त्यानंतर दुसऱ्या एकाच् भागाला द्वित्व करतां येणारच नाहीं.

काय कारण ?

कारण असें कीं द्वित्व केल्यानंतर पूर्वीचा दुसरा राहूं शकत नाहीं. प्रथम एकाच् भागाचे द्वित्वानें दोन एकाच् भाग झाल्यानंतर पूर्वीच्या दुसऱ्याला दुसरा म्हणतांच येणार नाहीं.

मग कितवा म्हणतां येईल ?

तिसरा. उदा० दोघांमध्यें तिसरा येऊन बसला असतां पूर्वीच्या दुसऱ्याचा दुसरेपणा राहात नाहीं.

तर मग तो कितवा होतो ?

तिसरा होतो.

बरें; पण द्विर्वचन करण्याच्यापूर्वी जो दुसरा होता त्याला द्विर्वचन होतें असें कांहीं सांगितलें नाहीं.

मग काय तुमचें म्हणणें आहे ?

द्विर्वचन केलें असतां जो द्वितीय एकाच् भाग त्याला द्वित्व होईल.

पण असें होईल तर ‘ अजादेर्द्वितीयस्य ’ हें सूत्र न केल्यासारखेंच होईल. असें पहा कीं अट् इस अशी स्थिति असतां प्रथमैकाचाला द्वित्व करून अट् अट् इ स असें झालें. नंतर ‘ हलादिः शेषः ’ यानें पहिल्या टकाराचा लोप केला असतां अ अट् इ स असें झालें. पुढें द्वितीय एकाचाला द्वित्व करून ‘ हलादि शेषः ’ यानें त्यांतील पहिल्या टकाराचा लोप झाला असतां अ अ अट् इ स अशा स्थितीमध्यें तिन्ही अकारांचें पररूप होऊन अटिषति असें रूप तयार होईल.

---

२. तेव्हां पहिल्या एकाचाला द्वित्व करून नंतर दुसऱ्या एकाचाला द्वित्व केलें काय आणि न केलें काय अटिषति असें रूप सारखेंच होत असल्यामुळे ‘ अजादेर्द्वितीयस्य ’ हें शास्त्र व्यर्थ होत आहे.

तीत्येवं रूपं स्यात् ॥ नानारम्भसमम् । अटः प्रथमस्य द्विर्वचनं हलादिशेष इत्त्वं द्वितीयस्य द्विर्वचनं हलादिशेष इत्त्वं द्वयोरिकारयोः सवर्णदीर्घत्वमभ्यासस्यासवर्णे [ ६. ४. ७८ ] इतीयङादेश इयटिषतीत्येतद्रूपं यथा स्यादोणेश्चोवोणिषतीति ॥ नानिष्टार्था शास्त्रप्रवृत्तिर्भवितुमर्हति ॥

यथा वादिविकारेऽलोऽन्त्यविकाराभावः ॥ ४ ॥

यथा वादिविधावलोऽन्त्यविधिर्न भवत्येवं द्वितीयद्विर्वचने प्रथमद्विर्वचनं न भविष्यति ॥ विषम उपन्यासः । नाप्राप्तेऽलोऽन्त्यविधावादिविधिरारभ्यते स तस्य बाधको भविष्यति । इदमप्येवंजातीयकम् । नाप्राप्ते प्रथमद्विर्वचने द्वितीयद्विर्वचनमारभ्यते तद्बाधकं भविष्यति ॥ यदप्युच्यतेऽसति खल्वपि संभवे बाधनं भवत्यस्ति च संभवो यदुभयं स्यादिति नैतदस्ति । सत्यपि संभवे बाधनं भवति । तद्यथा । दधि ब्राह्मणेभ्यो दीयतां तक्रं कौण्डिन्यायेति सत्यपि दधि-

---

अजादेर्द्वितीयस्य हें सूत्र न केल्यासारखें होणार नाहीं. अट् या प्रथम एकाचाला द्वित्व करून अट् अट् असें होतें. नंतर पहिल्या ठिकाणीं हलादिशेष करून अकाराला 'सन्यतः' यानें इत्त्व व त्यानंतर द्वितीय एकाच् अट् याला द्वित्व करून हलादिशेष व इत्व केलें असतां इ इ अट् इस असें असतां 'अभ्यासस्यासवर्णे' यानें पुढील इकाराला इयङ् आदेश करून सवर्ण दीर्घ झाला म्हणजे इयटिषति असें रूप होईल व त्याकरितां द्वितीय द्विर्वचन पाहिजे. तसेंच ओण् धातूहून सन् इट्. ओण्-इ-स असें असतां प्रथमैकाचाला द्वित्व, हलादिशेष व अभ्यास-ऱ्हस्व. पुढें ओण् या द्वितीय एकाचाला द्वित्व, हलादिशेष, व ऱ्हस्व केल्यानंतर 'अभ्यासस्यासवर्णे' यानें पुढील उकाराला उवङ् आदेश करून सवर्ण-दीर्घ केला असतां ऊवोणिषति असें रूप होईल. तेव्हां द्वितीय द्विर्वचन हें आवश्यकच आहे.

परंतु अनिष्ट रूप तयार करण्याकरितां शास्त्राची प्रवृत्ति नसते.

(वा. ४) किंवा जसें 'आदेः परस्य' (१।१।५४) याविषयीं 'अलोऽन्त्यस्य (१।१।५२) हा विधि प्रवृत्त होत नाहीं तसें द्वितीय द्विर्वचनाविषयीं प्रथम द्विर्वचनाची प्रवृत्ति होणार नाहीं.

हा दृष्टान्त बरोबर नाहीं. कारण दृष्टांतामध्यें अन्त्य आणि आदि या दोघांना एकदम आदेश होण्याचा संभव नसल्यामुळें तेथें अलोऽन्त्यविधि नाप्राप्त असतांना आदिविधीचा आरंभ केला आहे, म्हणून आदिविधि अलोऽन्त्यविधीचा बाध करतो हें बरोबर आहे. पण येथें द्वित्वाविषयीं तशी स्थिति नाहीं.

द्वित्वाविषयीं येथेंही तसेंच आहे. प्रथम द्विर्वचन नाप्राप्त असतां द्वितीय द्विर्वचनाचा आरंभ केला आहे म्हणून द्वितीय द्विर्वचन हें प्रथम द्विर्वचनाचा बाध करील.[१]

आतां दोघांचा एकदम संभव नसेल तरच बाध होत असतो आणि येथें तर दोन्हीही द्वित्वें एकाच प्रयोगामध्यें करतां येतात असा संभव आहे असें जें म्हटलें आहे तें बरोबर नाहीं. कारण दोन्ही विधींचा संभव असतांनाही बाध्य-बाधकभाव होत असतो. जसें ब्राह्मणांना दही द्यावें आणि कौडिन्य नांवाच्या ब्राह्मणाला ताक द्यावें असें सांगितलें असतां तेथें कौडिन्याला ताक देऊन दही सुद्धां देतां येतें; तरी पण तक्र-

---

१. एकंदरीत अजादेर्द्वि० हें व्यर्थ होत आहे. तेव्हां विरोधास्तव तें प्रथम एकाचाला प्राप्त झालेल्या द्वित्वाचा बाध करील.

दानस्य संभवे तक्रदानं निवर्तकं भवति। एवमिहापि सत्यपि संभवे प्रथमद्विर्वचनस्य द्वितीयद्विर्वचनं बाधिष्यते॥

तत्र पूर्वस्याचो निवृत्तौ व्यञ्जनस्यानिवृत्तिर्वक्तव्या। अटिटिषतीति। यथैवाचो निवृत्तिर्भवत्येवं व्यञ्जनस्यापि प्राप्नोति।

**तत्र पूर्वस्याचो निवृत्तौ व्यञ्जनानिवृत्तिरशासनात्पूर्वस्य॥ ५॥**

तत्र पूर्वस्याचो निवृत्तौ व्यञ्जनस्यानिवृत्तिः सिद्धा। कुतः। अशासनात्पूर्वस्य। नेह वयं पूर्वस्य प्रतिषेधं शिष्मः। किं तर्हि। द्वितीयस्य द्विर्वचनमारभामहे। व्यञ्जनानि पुनर्नटभार्यावद्भवन्ति। तद्यथा। नटानां स्त्रियो रङ्गं गता यो यः पृच्छति कस्य यूयं कस्य यूयमिति तं तं तव तवेत्याहुः। एवं व्यञ्जनान्यपि यस्य यस्याचः कार्यमुच्यते तं तं भजन्ते॥

**न्द्रादिप्रतिषेधाच्च॥ ६॥**

यदयं न न्द्राः संयोगादयः [ ६. १. ३ ] इति प्रतिषेधं शास्ति तज्ज्ञापयत्याचार्यः

---

दान दधिदानाचा बाध करतें असें लोकामध्यें दृष्टीस पडतें. त्याप्रमाणें येथेंही दोन्ही द्वित्वांचा संभव असतांनासुद्धां द्वितीय द्विर्वचन प्रथम द्विर्वचनाचा बाध करील.

द्वितीय द्विर्वचनानें प्रथम द्विर्वचनाचा बाध केला तर तेथें जसा प्रथम एकाच् भागांतील अच् द्वित्वांतून सुटतो तशीं त्या अचाच्या पुढील व्यंजनेंही द्वित्वांतून सुटतील; तीं न सुटण्याकरितां प्रयत्न केला पाहिजे उदा०—अटिटिषति. येथें जसा द्वितीय एकाच् भागामध्यें प्रथम एकाच् भागांतील अकार शिरत नाहीं तसा त्या प्रथम एकाच् भागांतील टकारही शिरणार नाहीं.

( वा. ५ ) अटिटिषति इत्यादि अजादि धातूंविषयीं द्वितीय द्विर्वचनानें बाध केल्यामुळें पहिल्या अकाराला द्विर्वचनाची निवृत्ति झाली तरी प्रथमैकाच् भागांतील टकाराला द्विर्वचनाची निवृत्ति होत नाहीं.

तें काय म्हणून ?

कारण 'अजादेर्द्वितीयस्य' यानें प्रथम एकाच् भागाला द्विर्वचनाचा निषेध सांगितला नाहीं: आम्ही पहिल्या भागाला द्वित्वाचा निषेध सांगत नाहीं.

तर मग काय करतां ?

फक्त द्वितीय एकाच् भागाला द्विर्वचन सांगतों. आणि व्यंजनें ही तर नटभार्येप्रमाणें असतात, म्हणजे नाटकांत स्त्रीचें सोंग घेऊन रंगभूमीवर नाचणाऱ्या नटीला तूं कोणाची ? तूं कोणाची ? असें जो जो नट विचारतो त्याला त्याला मी तुझी, मी तुझी असें जशी ती नटभार्या सांगते (व कार्यानुसारें त्या त्या प्रत्येक नटाची ती बायको बनते) त्याप्रमाणें व्यंजनें हीं ज्या ज्या अचाला कार्य सांगितलें जातें त्या त्या अचाचा आश्रय करून राहतात.[४]

( वा. ६ ) शिवाय ज्या अर्थी हा आचार्य पाणिनि 'न न्द्राः संयोगादयः' ( ६।१।३ ) या सूत्रानें आदिभूत अचाहून पुढें असून संयोगाच्या आरंभीं असलेल्या नकार दकार आणि रेफ यांना द्विर्वचनाचा निषेध करतो त्या अर्थी तो असें सुचवितो कीं आदिभूत अचाला द्विर्वचनाची निवृत्ति झाली तरी त्याच्या

---

४. तेव्हां 'आट' अशा ज्या ठिकाणीं प्रथम एकाच् भागाला द्वित्व होतें तेथें टकार हा प्रथम अचाला धरून असतो. आणि अटिटिषति अशा ज्या ठिकाणीं द्वितीय एकाच् भागाला द्वित्व होतें तेथें टकार हा त्या द्वितीय अचाला धरून असतो.

पूर्वेनिवृत्तौ व्यञ्जनस्यानिवृत्तिरिति ॥

**तत्र द्वितियाभावे प्रथमाद्विर्वचनं प्रतिषिद्धत्वात् ॥ ७ ॥**

तत्र द्वितीयस्यैकाचोऽभावे प्रथमस्य द्विर्वचनं न प्राप्नोति। आटतुः आटुः। किं कारणम्। प्रतिषिद्धत्वात्। अजादेर्द्वितीयस्येति प्रतिषेधात् ॥ नैष दोषः। सति तस्मिन्प्रतिषेधः। सति द्वितीयद्विर्वचने प्रथमस्य प्रतिषेधः ॥

**सति तस्मिन्प्रतिषेध इति चेद्धलादिशेषे दोषः ॥ ८ ॥**

सति तस्मिन्प्रतिषेध इति चेद्धलादिशेषे दोषो भवति। हलादिशेषे सत्याद्ये हल्यनाद्यस्य लोपः स्यात्। इहैव स्यात्। पपाचेति। इह न स्यात्। आटतुः आटुरिति ॥

**लोकवद्धलादिशेषे ॥ ९ ॥**

लोकवद्धलादिशेषे सिद्धम्। तद्यथा। लोक ईश्वर आज्ञापयति ग्रामाद्ग्रामान्मनुष्या आनीयन्तां प्रागाङ्गं ग्रामेभ्यो ब्राह्मणा आनीयन्तामिति। येषु तत्र ग्रामेषु ब्राह्मणा न सन्ति न तर्हीदानीं ततोऽन्यस्यानयनं भवति। यथा तत्र क्वचिदपि ब्राह्मणस्य सत्ताब्राह्मणस्य निवर्तिका भवत्येवमिहापि क्वचिदपि हलाद्यः सन्सर्वस्यानाद्यस्य हलो निवर्तको भवति ॥

---

पुढील व्यंजनाला द्विर्वचनाची निवृत्ति होत नाहीं.

( वा० ७ ) बरें; आतां अजादि धातूमध्यें द्वितीय एकाच् भागाचा अभाव असतां तेथें प्रथम एकाचाला द्विर्वचन प्राप्त होणार नाहीं. उदा० आटतुः आटुः.

काय कारण ?

' अजादेर्द्वितीयस्य ' यानें त्याचा निषेध प्राप्त होत आहे ?[५]

हा दोष येत नाहीं.

द्वितीय एकाचाला द्विर्वचन जेथें होत असेल तेथेंच प्रथम एकाचाला द्विर्वचनाचा निषेध होईल.

( वा. ८ ) ज्या विधीमुळें दुसऱ्याला आर्थिक निषेध प्रतीत होतो त्या विधीची ज्या ठिकाणीं प्रवृत्ति होत असेल तेथेंच तो आर्थिक निषेध येतो असें असेल तर त्याच न्यायानें हलादिशेषाविषयीं आदि हलाचा शेष जेथें होत असेल तेथेंच इतर हलांची निवृत्ति होईल, असा दोष येतो. उदा० पपाच पपाठ. येथेंच च् ठ् वगैरे हलांची निवृत्ति होईल; परंतु आटतुः आटुः इत्यादि ठिकाणीं टकार वगैरेंची निवृत्ति होणार नाहीं.

( वा. ९ ) हलादिशेषाविषयीं लोकव्यवहाराप्रमाणें व्यवस्था समजावी. लोकांमध्यें राजानें प्रत्येक गावांतील एका मनुष्याला बोलवा आणि अंगदेशापर्यंत मात्र प्रत्येक गावांतील एका ब्राह्मणालाच बोलवा असा हुकूम सोडला असतां अंगदेशापर्यंतच्या प्रदेशांतील ज्या एकाद्या गावांत ब्राह्मणवस्ती मुळींच नसेल तेथें केवळ ब्राह्मण नाहीं या सबबीवर इतर जातीचा मनुष्य आणिला जात नाहीं. तेव्हां जसें तेथें अंगदेशापूर्वीच्या गावांत ज्या ठिकाणीं ब्राह्मणांचें अस्तित्व आहे तेथेंच तें इतराचा निषेध करतें असें नाहीं तर अंगदेशापर्यंत सर्व गावांमध्यें इतराचा निषेध करतें त्याप्रमाणें येथेंही कांहीं अभ्यासामध्यें आदि हल् असला तर तो सर्वच अभ्यासांमधील आदि नसलेल्या हलांची निवृत्ति करूं शकतो.

---

५. अजादि धातु असेल तर तेथें द्वितीय एकाच् भागाला द्वित्व करावें असें सांगितलें म्हणजे अर्थात् तेथें ' प्रथम एकाचाला करूं नये ' असा निषेध मनांत येतो.

**क्वचिदन्यत्र लोप इति चेद् द्विर्वचनम् ॥ १० ॥**

क्वचिदन्यत्र लोप इति चेद् द्विर्वचनमप्येवं प्राप्नोति । क्वचिदपि द्वितीयः सन्सर्वस्य प्रथमस्य निवर्तकः स्यात् ॥ तस्मादस्तु सति तस्मिन्प्रतिषेध इत्येव। ननु चोक्तं सति तस्मिन्प्रतिषेध इति चेद्धलादिशेषे दोष इति। प्रतिविधास्यते हलादिशेषे ॥ २ ॥

**न न्द्राः संयोगादयः ॥६।१।३॥**

किमर्थमिदमुच्छते ।

**न्द्रादेर्द्विर्वचनप्रसङ्गस्तत्र न्द्राणां प्रतिषेधः ॥ १ ॥**

न्द्रादेरेकाचो द्विर्वचनं प्राप्नोति तत्र न्द्राणां संयोगादीनां प्रतिषेध उच्यते ॥

**ईर्ष्यतेस्तृतीयस्य ॥ २ ॥**

ईर्ष्यतेस्तृतीयस्य द्वे भवत इति वक्तव्यम् । केचित्तावदाहुरेकाच इति ईर्ष्यिषिषति । अपर आह व्यञ्जनस्येति । ईर्ष्यियिषति ॥

**कण्ड्वादीनां च ॥ ३ ॥**

कण्ड्वादीनां च तृतीयस्य द्वे भवत इति वक्तव्यम् । कण्डूयियिषति असूयियिषति ॥

**वा नामधातूनाम् ॥ ४ ॥**

वा नामधातूनां तृतीयस्य द्वे भवत इति वक्तव्यम् । अश्वीयियिषति अशिश्वीयिषति ॥ अपर आह । यथेष्टं वा । यथेष्टं वा नामधातूनामिति । पुपुत्रीयिषति पुतित्रीयिषति पुत्रीयियिषति ॥

---

( वा. १० ) जर काहीं ठिकाणीं अभ्यासाच्या आरंभीं हल् आहे म्हणून तेवढ्यावरून आरंभीं हल् नसेल तेथेंही इतर हलांचा लोप होऊं लागेल तर द्वित्वाविषयींही तसेंच होईल. म्हणजे कोठें तरी एखाद्या धातूमध्ये द्वितीय एकाचाला होणारें द्विर्वचन सर्व धातूंमध्यें प्रथम द्विर्वचनाची निवृत्ति करील. तेव्हां द्वितीय एकाचाला जेथें द्वित्व होत असेल तेथेंच तें प्रथम द्विर्वचनाची निवृत्ति करील असें म्हणणें अवश्य आहे.

पण असें असेल तर हलादिशेषाविषयीं दोष येतो असें पूर्वी म्हटलें आहे ना ?

याचें उत्तर तेथेंच ('हलादिः शेषे' या सूत्राचें व्याख्यान करतेवेळीं ) देऊं.

(सू. ३) हें सूत्र कशाकरितां केलें आहे ?

( वा. १ ) द्वितीय एकाच् भागामध्यें शिरलेल्या नकार दकार व रेफ यांना द्वित्व प्राप्त होत आहे. तेव्हां जेथें ते वर्ण संयोगाच्या आरंभीं असतील तेथें त्यांना द्वित्व होऊं नये म्हणून हें सूत्र केलें आहे.

( वा. २ ) ईर्ष्य धातूच्या तृतीयाला द्विर्वचन होतें असें वचन करावें. या वार्तिकाचा अर्थ सांगतांना तृतीय एकाचाला द्वित्व होतें असें कोणी म्हणतात. जसें—ईर्ष्यिषिषति. येथें तृतीय एकाच् स या भागाला द्वित्व केलें आहे. तृतीय व्यञ्जनाला द्वित्व होतें असें कोणी म्हणतात. जसें—ईर्ष्यियिषति. येथें यि या भागाला द्वित्व केलें आहे.

( वा. ३ ) कण्ड्वादि यगन्त धातूंच्याही तृतीय एकाचाला द्वित्व होतें असें वचन करावें. जसें— कण्डूयियिषति असूयियिषति.

( वा. ४ ) नामधातूंच्या तृतीय एकाचाला विकल्पानें द्वित्व होतें असें वचन करावें. जसें अश्वीयियिषति अशिश्वीयिषति.

अन्य कोणी एक वैयाकरण म्हणतो कीं— ' यथेष्टं वा ' म्हणजे नामधातूंच्या प्रथम द्वितीय आणि तृतीय या एकाचांपैकीं आपल्या इच्छेस येईल त्या एकाच् भागाला द्वित्व करावें. जसें--पुपुत्रीयिषति, पुतित्रीयिषति, पुत्रीयियिषति.

---

१. ( सू. ३ ) अचाहून पर आणि संयोगाच्या आरंभीं असलेले असे जे नकार दकार आणि रेफ त्यांना द्वित्व होत नाहीं.

## पूर्वोऽभ्यासः ॥ ६ । १ । ४ ॥

पूर्वोऽभ्यास इत्युच्यते कस्य पूर्वोऽभ्याससंज्ञो भवति । द्वे इति वर्तते । द्वयोरिति वक्तव्यम् ॥ स तर्हि तथा निर्देशः कर्तव्यः । न कर्तव्यः । अर्थाद्विभक्तिविपरिणामो भविष्यति । तद्यथा । उच्चानि देवदत्तस्य गृहाणि । आमन्त्रयस्वैनम् । देवदत्तमिति गम्यते । देवदत्तस्य गावोऽश्वा हिरण्यम् । आढ्यो वैधवेयः । देवदत्त इति गम्यते । पुरस्तात्षष्ठीनिर्दिष्टं सदर्थात्प्रथमानिर्दिष्टं च भवति । एवमिहापि पुरस्तत्प्रथमानिर्दिष्टं सदर्थात्षष्ठीनिर्दिष्टं भविष्यति ॥

## उभे अभ्यस्तम् ॥ ६ । १ । ५ ॥

### अभ्यस्तसंज्ञायां सहवचनम् ॥ १ ॥

अभ्यस्तसंज्ञायां सहग्रहणं कर्तव्यम् । उभे अभ्यतं सहेति वक्तव्यम् ॥ किं प्रयोजनम् ।

### आद्युदात्तत्वे पृथगप्रसङ्गार्थम् ॥२॥

आद्युदात्तत्वं सहभूतयोर्यथा स्यादेकैकस्य मा भूदिति ॥ यस्मिन्नेवाभ्यस्तकार्येऽदोषस्तदेव पठितम् । अनुदात्तं पदमेकवर्जम् [ ६. १. १५८ ] इति नास्ति यौगपद्येन

---

( सू. ४ ) पूर्व म्ह० प्रथम भाग अभ्याससंज्ञक होतो असें येथें म्हटलें आहे. पण तो कोणाचा प्रथम भाग समजावयाचा ?

द्वे या पदाची अनुवृत्ति येत आहे. ( तेव्हां दोहोंपैकीं प्रथम असा अर्थ होईलच ).

पण येथें द्वयोः असा शब्द पाहिजे.

तर मग येथें तसा शब्द घालावा.

तसा शब्द घालावयास नको. कारण अनुवृत्त येत असलेल्या द्वे या प्रथमा विभक्तीच्या रूपाचा षष्ठीच्या रूपांत विपरिणाम होईल. जसें देवदत्ताचीं घरें उंच उंच आहेत; त्याला बोलाव. असें म्हटलें असतां तेथें त्याला या शब्दानें जो देवदत्ताचा परामर्श होतो तो त्याच्या द्वितीयेच्या रूपांत होतो. तसेंच, ' हें सर्व गाई घोडे वगैरे द्रव्य देवदत्ताचें आहे, रांडलेक मोठा संपन्न झाला आहे' असें म्हटलें असतां पूर्व वाक्यांतील देवदत्ताचा पुढील वाक्यामध्यें प्रथमेच्या रूपांत संबंध होतो. तसें येथें द्वे या प्रथमान्ताचा द्वयोः असा षष्ठ्यन्तामध्यें विपरिणाम समजला जाईल.

( सू. ५ वा. १ ) या अभ्यस्त संज्ञेविषयीं सहग्रहण करावें. म्हणजे ' उभे अभ्यस्तं सह ' असें सूत्र पढावें.

तसें करण्याचें प्रयोजन काय ?

(वा. २) 'अभ्यस्तानामादिः' (६।१।१८९) ह्यानें सांगितलेला आदि उदात्त स्वर दोघांना मिळून व्हावा, प्रत्येकाला न व्हावा.

प्रत्येकाला अभ्यस्तसंज्ञा झाली तर त्या संज्ञेचें कार्य प्रत्येकाला होईल असा दोष दाखविण्याकरितां जें कार्य पुढें केलें आहे तें असें केलें आहे कीं त्या कार्याच्या संबंधानें दोषच येत नाहीं. असें पहा कीं येथें प्रत्येकाला निरनिराळी अभ्यस्तसंज्ञा झाली तरी दोन्ही अभ्यस्तांना एके वेळीं दोन आद्युदात्त प्राप्त होणार नाहींतच. कारण,

---

१. ( सू. ४ ) ह्या सहाव्या अध्यायांतील द्वित्वप्रकरणामध्यें सांगितलेलें जें द्वित्व तें केल्यानंतर दोहींमधील पूर्वीच्या खंडाला अभ्यास अशी संज्ञा होते.

१. ( सू. ५ ) ह्या सहाव्या अध्यायांत सांगितलेलें जें द्वित्व तें केल्यानंतर त्या दोन्ही खंडांना मिळून अभ्यस्तसंज्ञा होते.

२. तसें केलें म्हणजे दोहोंना निरनिराळी अभ्यस्तसंज्ञा न होतां दोहोंना मिळून एकच होईल.

संभवः। पर्यायस्तर्हि प्रसज्येत। पर्यायश्च पूर्वस्य तावत्परेण रूपेण व्यवहितत्वान्न भविष्यति। परस्य तर्हि स्यात्। तत्राचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयति न परस्य भवतीति यदयं बिभेत्यादीनां पिति प्रत्ययात्पूर्वमुदात्तं भवतीत्याह। एवं व्यवधानान्न पूर्वस्य ज्ञापकान्न परस्योच्यते चेदमभ्यस्तानामादिरुदात्तो भवतीति तत्र स एव दोषः पर्यायः प्रसज्येत। तस्मात्सहग्रहणं कर्तव्यम्॥

न कर्तव्यम्। उभेग्रहणं क्रियते तत्सहार्थं विज्ञास्यते। अस्त्यन्यदुभेग्रहणस्य प्रयोजनम्। किम्। उभेग्रहणं संज्ञिनिर्देशार्थम्। अन्तरेणाप्युभेग्रहणं प्रक्लृप्तः संज्ञिनिर्देशः। कथम्। द्वे इति वर्तते॥ इदं तर्हि प्रयोजनं यत्रोभे शब्दरूपे श्रूयेते तत्राभ्यस्तसंज्ञा यथा स्यात्। इह मा भूत्। ईर्त्संन्ति

---

ज्या पदामध्यें उदात्त किंवा स्वरित विहित असेल त्या पदांतील तो उदात्त किंवा स्वरित असा एकटाच अच् वगळून बाकीच्या सर्व अचांना अनुदात्त करावा असें 'अनुदात्तं पदमेकवर्जम्' (६।१।१५८) या परिभाषेनें सांगितलें आहे.

तरी पण एकच अच् वगळावयाचा झाल्यास तो द्विरुक्तापैकीं पूर्व खंडांतीलच किंवा उत्तर खंडांतीलच सोडावा असा नियम नसल्यामुळें केव्हां पूर्व खंडातील व केव्हां उत्तर खंडांतील अच् सोडला गेल्यानें पर्यायानें म्हणजे पाळीपाळीनें दोघांनाही आद्युदात्त प्राप्त होईल. तो[1] पर्याय असा:—जेव्हां पूर्व खंडाला आद्युदात्त करावयास प्रवृत्त व्हावें तेव्हां उत्तर खंडानें व्यवधान असल्यामुळें अव्यवहित प्रत्यय पुढें नसतो म्हणून पूर्वखंडाला आद्युदात्त होत नाहीं. बरें, उत्तर खंडाला आद्युदात्त करावा तर तोही करतां येत नाहीं. कारण भी ह्री वगैरे अभ्यस्तांना पित् सार्वधातुक प्रत्यय पुढें असतांना प्रत्ययाहून पूर्व अचाला उदात्त सांगितला (६।१।१९२) आहे; तेथें आतां 'अनुदात्ते च' (६।१।१९०) यानें अभ्यस्ताला आदि उदात्त सांगितलेला प्रत्ययाहून पूर्व अचालाच होणार असें असतां ज्याअर्थी 'प्रत्ययात्पूर्वं पिति' असें सूत्रकार म्हणत आहेत, त्याअर्थी अभ्यस्त संज्ञकाला सांगितलेला आदि उदात्त उत्तर खंडाला होत नाहीं असें ते सुचवीत आहेत. तेव्हां एकंदरीत व्यवधानामुळे पूर्व खंडाला आद्युदात्त होऊं शकत नाहीं व ज्ञापकावरून उत्तर खंडालाही होऊं शकत नाहीं; आणि अभ्यस्ताना आद्युदात्त होतो असें विधान तर केलें आहे. तेव्हां त्या विधानाचे जोरावर पूर्वी सांगितल्याप्रमाणें पर्याय होईल असा दोष येतो. तो टाळण्याकरितां सहग्रहण केलें पाहिजे.

सहग्रहण करावयास नको.

(वा. ३) उभे हा शब्दच सह या अर्थाचा समजण्यांत येईल.

पण उभे या शब्दाचें प्रयोजन दुसरेंच आहे. तें कोणतें?

अभ्यस्त संज्ञा कोणाला करावयाची तें उद्देश्य दाखविणें हें तें प्रयोजन आहे.

उभेग्रहण केल्यावाचूनच संज्ञेचें उद्देश्य म्हणजे संज्ञी दाखविणें शक्य आहे.

तें कसें?

द्वे हें पद अनुवृत्तीनें येत आहे. त्यावरून उद्देश्य समजेल.

तर मग उद्देश्यग्रहणाचें प्रयोजन हें समजावें कीं जेथें पूर्वखंड आणि उत्तरखंड ह्या दोन्ही शब्दस्वरूपांचें श्रवण होतें तेथेंच अभ्यस्तसंज्ञा व्हावी आणि त्यांपैकीं एकाचेंच जेथें श्रवण होत असेल तेथें न व्हावी. उदा०—ईर्त्संन्ति

---

[1] तेव्हां पुढचा उदात्त अच् सोडला तर मागचा अच् अनुदात्त होईल. आणि मागचा सोडला तर पुढचा अनुदात्त होईल. एकदम दोन सोडतां येत नाहींत.

ईप्सन्ति । ईर्त्सन् ईप्सन् । ऐर्त्सन् ऐप्सन् । किं च स्यात् । अद्भावो नुम्प्रतिषेधो जुस्भाव इत्येते विधयः प्रसज्येरन् ॥ अद्भावे तावन्न दोषः । सप्तमे योगविभागः करिष्यते । इदमस्त्यदभ्यस्तात् [ ७. १. ४ ] इति । तत आत्मनेपदेषु । आत्मनेपदेषु चाद्भवति । अनत इत्युभयोः शेषः ॥ यदप्युच्यते नुम्प्रतिषेध इत्येकादेशे कृते व्यपवर्गाभावान्न भविष्यति ॥ इदमिह संप्रधार्यम् । नुम्प्रतिषेधः क्रियतामेकादेश इति किमत्र कर्तव्यम् । परत्वान्नुम्प्रतिषेधः । नित्य एकादेशः । कृतेऽपि नुम्प्रतिषेधे प्राप्नोत्यकृतेऽपि । एकादेशोऽप्यनित्यः । अन्यस्य कृते नुम्प्रतिषेधे प्राप्नोत्यन्यस्याकृते शब्दान्तरस्य

---

ईप्सन्ति; ईर्त्सन्, ईप्सन्; ऐर्त्सन्, ऐप्सन्.

येथें अभ्यस्तसंज्ञा झाली तर काय होईल ?

अद्भाव, नुम्प्रतिषेध व जुस्भाव हे विधी[४] होऊं लागतील.

अत् आदेशासंबंधानें तर दोष येत नाहीं. कारण सातव्या अध्यायाच्या पहिल्या पादामध्यें 'अदभ्यस्तात्' ( ७।१।४ ) असें सूत्र आहे. व त्यापुढें 'आत्मनेपदेष्वनतः' असें दुसरें सूत्र आहे. तेथें योगविभाग करून प्रथम 'आत्मनेपदेषु' हें सूत्र व नंतर 'अनतः' असें दुसरें अशीं दोन सूत्रें करण्यांत येतील. त्यांत 'अनतः' हें 'अदभ्यस्तात्' व 'आत्मनेपदेषु' या दोहोंचा शेष[५] म्हणून घेतलें जाईल.

आतां ईर्त्सन् इत्यादि स्थलीं 'नाभ्यस्ताच्छतुः' हा नुम्प्रतिषेध प्राप्त होतो असें जें म्हटलें आहे तोही दोष येत नाहीं. कारण ईप्सन् येथें ईप्स या सन्नन्त धातूहून शतृप्रत्यय, मध्यें शप्, आणि नंतर सन् असे प्रत्यय होतात. येथें सन् शप् आणि शतृ या तिन्ही प्रत्ययांच्या अकारांचा एकादेश जें पररूप तें (६।१।९७) झाल्यानंतर अभ्यस्त कोणतें व त्याच्या पुढें शतृ प्रत्यय कोणता तें सांगतां येत नाहीं म्हणून नुम् आगमाचा निषेध होणार नाहीं.

आतां येथें असा विचार उत्पन्न होतो कीं ईर्त्स अत् अशी स्थिति असतां पहिल्यानें एकादेश करावा किंवा नुमाचा प्रतिषेध करावा.

मग यांपैकीं काय बरें करावें ?

एकादेशापेक्षां पर असल्यामुळें प्रथमतः नुम्-प्रतिषेध करावा.

पण नुम्प्रतिषेध केला अथवा न केला तरी एकादेश प्राप्त होत असल्यामुळें एकादेश हा नित्य आहे.

एकादेशही अनित्यच आहे. कारण नुम्प्रतिषेध केला असतां इर्त्स अत् येथें एकादेश येत आहे. आणि नुमागम केला असतां ईर्त्स अन्त् येथें एकादेश येत आहे. व जो विधि एकाच लक्ष्यांत कालभेदानें भिन्न भिन्न शब्दांविषयीं येतो तो विधि अनित्य होतो अशी परिभाषा आहे.

---

४. ऋध् आणि आप् या धातूंहून सन् प्रत्यय. द्वित्व झाल्यानंतर उत्तरखंडांतील आकार आणि ऋकार यांना ईकार आदेश ( ७।४।५५ ) आणि अभ्यासाचा लोप ( ७।४।५८ ) होऊन ईर्त्सन्ति ईप्सन्ति वगैरे रूपें सिद्ध झालीं आहेत. येथें अभ्यस्तसंज्ञा झाली तर सन्-प्रत्ययान्त धातूच्या पुढील झि प्रत्ययाच्या झकाराला अत् आदेश ( ।१।४ ) होऊं लागेल. तसेंच पुढें शतृ प्रत्यय केला असतां नुम् आगमाचा निषेध ( ७।१।७८ ) होऊं लागेल. व त्याप्रमाणेंच पुढील झि प्रत्ययाला जुस् आदेश ( ३।४।१०९ ) होऊं लागेल.

५. त्या 'अनतः' सूत्राचा पुढें दिल्याप्रमाणें अर्थ होईल:—'अदभ्यस्तात्' आणि 'आत्मनेपदेषु०' या दोन सूत्रांनीं जो अत् आदेश सांगितला आहे तो मागें ऱ्हस्व अकार नसेल तर करावा. म्हणून सन्प्रत्ययान्त धातूच्या शेवटीं ऱ्हस्व अकार असल्यामुळें तेथें अत् आदेश होणार नाहीं.

च प्राप्नुवन्विधिरनित्यो भवति । अन्तरङ्गस्तर्ह्येकादेशः । कान्तरङ्गता । वर्णावाश्रित्यैकादेशो विधिविषये नुम्प्रतिषेधो विधिश्च नुमः सर्वनामस्थाने प्राक्तु सर्वनामस्थानोत्पत्तेरेकादेशः । तत्र नित्यत्वाच्चान्तरङ्गत्वाच्चैकादेश एकादेशे कृते व्यपवर्गाभावान्न भविष्यति ॥ यदप्युच्यते जुस्भाव इत्येकादेशे कृते व्यपवर्गाभावान्न भविष्यति । एकादेश इत्युच्यते केन चात्रैकादेशः । अन्तिना । नात्रान्तिभावः प्राप्नोति । किं कारणम् । जुस्भावेन बाध्यते । नात्र जुस्भावः प्राप्नोति । किं कारणम् । शपा व्यवहितत्वात् । एकादेशे कृते नास्ति व्यवधानम् । एकादेशः पूर्वविधौ स्थानिवद्भवतीति व्यवधानमेव ॥ किं पुनः कारणं निमित्तवानन्तिरेकादेशं तावत्प्रतीक्षते न पुनस्तावत्येव निमित्तमस्तीत्यन्तिभावेन भवितव्यम् । इहापि तर्हि तावत्येव निमित्तमस्तीत्यन्तिभावः स्यात् । अनेनिजुः अवेविषुः । अस्तु । अन्तिभावे कृते स्थानिवद्भावाज्झिग्रहणेन ग्रहणाज्जु-

---

तर मग एकादेश हा अंतरंग आहे असें म्हणतां येईल.

तें अंतरंगत्व कसें ?

दोन वर्णांचा आश्रय करून एकादेश प्राप्त होत आहे. शिवाय, विधीचा जो विषय तोच प्रतिषेधाचा विषय होतो आणि येथें विधीला तर सर्वनामस्थान प्रत्ययाची जरूर आहे; आणि सर्वनामस्थानप्रत्यय उत्पन्न होण्यापूर्वींच एकादेश प्राप्त होत आहे[६]. तेव्हां नित्यत्वास्तव आणि अंतरंगत्वास्तव पूर्वी एकादेश केला असतां अभ्यस्त व शतृ यांचें पौर्वापर्य नसल्यामुळें नुम्प्रतिषेध होणार नाहीं.

आतां ऐर्त्सन् ऐप्सन् येथें झि प्रत्ययाला जुस्भाव प्राप्त होतो असा जो दोष दिला तोही दोष येत नाहीं. कारण एकादेश केला असतां अभ्यस्त आणि झि प्रत्यय यांचें पौर्वापर्य नसल्यामुळें जुस्भाव होणार नाहीं.

पण येथें एकादेश केला असतां असें म्हटलें आहे. तो एकादेश कोणाशीं बरें केला आहे ?

अन्ति प्रत्ययाच्या अकाराशीं ?

पण येथें अन्ति आदेशच होऊं शकत नाहीं.

काय म्हणून ?

जुस् आदेशानें अन्ति आदेशाचा बाध केला जातो म्हणून.

पण येथें जुस् आदेशच प्राप्त होत नाहीं.

काय म्हणून ?

शपानें व्यवधान येत आहे म्हणून.

एकादेश केला असतां शपानें व्यवधान येत नाहीं.

पण पूर्वाला विधि कर्तव्य असतांना एकादेशाला स्थानिवद्भाव होईल व व्यवधान कायम राहीलच.

पण झि प्रत्यय केल्याबरोबर प्राप्त होणारा अन्त् आदेश एकादेश प्राप्त होईपर्यन्त कां बरें थांबून राहील ? उलट आपल्या प्रवृत्तीचें निमित्त जो प्रत्ययावयव झकार तो दृष्टीस पडल्याबरोबर अन्त् आदेश बेधडक प्रवृत्त होईल.

पण असें म्हटलें तर अनेनिजुः पर्यवेविषुः येथेंही झि प्रत्यय झाल्याबरोबर अन्त् आदेश हा शपाचीही वाट न पाहतां प्रवृत्त होईल.

खुशाल प्रवृत्त होवो; हरकत नाहीं. अन्त् आदेश केल्यानंतर स्थानिवद्भावानें ( १।१।५६) अन्ति याचें झिग्रहणानें ग्रहण झाल्यामुळें जुस् आदेश होईल.

---

६. तेव्हां अशा रीतीनेंही एकादेश अंतरंग होत आहे.

स्भावो भविष्यति ॥ अथवा यद्यपि निमित्तवानन्तिरयं तस्य जुस्भावोऽपवादो न चापवादविषय उत्सर्गोऽभिनिविशते । पूर्वं ह्यपवादा अभिनिविशन्ते पश्चादुत्सर्गाः । प्रकल्प्य वापवादविषयं तत उत्सर्गोऽभिनिविशते । न तावदत्र कदाचिदप्यन्तिभावो भवति। अपवादं जुस्भावं प्रतीक्षते ॥ न खल्वपि क्वचिदभ्यस्तानां झेश्चानन्तर्यम् । सर्वत्र विकरणैर्व्यवधानम् । तेनानेनावश्यं विकरणनाशः प्रतीक्ष्यः क्वचिल्लुका क्वचिच्छ्लुना क्वचिदेकादेशेन । स यथैव श्लुलुकौ प्रतीक्षत एवमेकादेशमपि प्रतीक्षते ॥ एवं तर्हीदमिह व्यपदेश्यं सदाचार्यो न व्यपदिशति । किम् । स्थानिवद्भावम् । स्थानिवद्भावाद्व्यवधानं व्यवधानान्न भविष्यति । पूर्वविधौ स्थानिवद्भावो न चायं पूर्वस्य विधिः । पूर्वस्मादपि विधिः पूर्वविधिः ॥ तदेतदसति प्रयोजन उभेग्रहणं सहार्थं विज्ञास्यते ॥

कथं कृत्वैकैकस्याभ्यस्तसंज्ञा प्राप्नोति । प्रत्येकं वाक्यपरिसमाप्तिर्दृष्टेति । तद्यथा । प्रत्येकं वृद्धिगुणसंज्ञे भवतः । ननु चायम-

---

अथवा झि करण्याबरोबर अन्त् आदेशाचें निमित्त उपस्थित झालें असलें तरी त्या अन्त् आदेशाचा जुस्भाव हा अपवाद आहे. आणि अपवादाच्या विषयामध्यें तर उत्सर्ग प्रवृत्त होत नाहीं. अपवाद हे प्रथम मनांत येतात व मागाहून अपवादशास्त्राचा विषय वगळून उत्सर्ग प्रवृत्त होतात असा नियम आहे. म्हणून येथें केव्हांही अन्त् आदेश हा पूर्वी प्रवृत्त होत नाहीं. तर आपला अपवाद जो जुस्भाव त्याची वाट पाहतो.

आतां जुस्भाव करतेवेळीं सर्व ठिकाणीं विकरणांनीं व्यवधान असल्यामुळें अभ्यस्त व झि यांचें पौर्वापर्य नसतें म्हणून जुस्भावानें विकरणांच्या नाशाची वाट पहात बसलें पाहिजे. तो विकरणाचा नाश कोठें लुक्‌शब्दानें कोठें श्लुशब्दानें तर कोठें एकादेशानें होतो. तेव्हां तो जुस्भाव जशी लुक् व श्लु होण्याची प्रतीक्षा करतो तशी एकादेश होण्याचीही प्रतीक्षा करीलँच.

तर मग येथें आम्ही असें म्हणतों कीं ऐत्सन् इत्यादि उदाहरणांमध्यें जुस्भाव न होण्याचें कारण दाखवितांना आचार्यांनीं आणखी एका कारणाचा उल्लेख केला पाहिजे होता तो केला नाहीं एवढेंच काय तें.

असें तें कारण कोणतें ?

स्थानिवद्भाव हें तें कारण होय. म्हणजे स्थानिवद्भावानें (१।१।५७) व्यवधान येत असल्यामुळें जुस्भाव होत नाहीं.

पण स्थानिभूत अचाहून पूर्वाला विधि म्हणजे कार्य कर्तव्य असतांना स्थानिवद्भाव सांगितला आहे. आणि हा जुस्भाव तर पूर्वाला विधि नाहीं.

तर मग पञ्चमी–समासानें पूर्वाहून पराला कार्य कर्तव्य असतांनाही स्थानिवद्भाव होतो असें समजावें. एकंदरीत उभेग्रहणाचें कांहींही प्रयोजन संभवत नसल्यामुळें तें सह या अर्थाचें समजलें जाईल. म्हणून निराळें सहग्रहण करावयास नको.

पण अगोदर येथें 'उभे अभ्यस्तम्' असें स्पष्ट म्हटलें असल्यामुळें प्रत्येकाला अभ्यस्तसंज्ञा होणार तरी कशी ?

अनेकांना जें कार्य सांगितलें जातें त्या कार्याचा अनेकांपैकीं प्रत्येक व्यक्तीला संबंध करावा अशा अर्थाचा 'प्रत्येकं वाक्यपरिसमाप्तिः' असें जें आचार्य वार्तिककारांनीं म्हटलें आहे तें जमत नाहीं.

---

७. तेव्हां अभ्यस्ताच्या पुढें झि प्रत्यय संभवतो. म्हणून 'एकादेश केल्यानंतर व्यपवर्गाभावात् म्हणजे 'अभ्यस्त आणि झि प्रत्यय यांचें पौर्वापर्य नसल्यामुळें'

प्यस्ति दृष्टान्तः समुदाये वाक्यपरिसमाप्तिरिति । तद्यथा । गर्गाः शतं दण्ड्यन्तामिति । अर्थिनश्च राजानो हिरण्येन भवन्ति न च प्रत्येकं दण्डयन्ति । सत्येतस्मिन्दृष्टान्ते तत्र यदि प्रत्येकमित्युच्यत इहापि सहग्रहणं कर्तव्यम् । अथ तत्रान्तरेण प्रत्येकमिति वचनं प्रत्येकं गुणवृद्धिसंज्ञे भवत इहापि नार्थः सहग्रहणेन ॥

## [1]जक्षित्यादयः षट् ॥ ६ । १ । ६ ॥

### जक्षित्यादिषु सप्तग्रहणं वेवीत्यर्थम् ॥ १ ॥

जक्षित्यादिषु सप्तग्रहणं कर्तव्यम् । सप्त जक्षित्यादयोऽभ्यस्तसंज्ञका भवन्तीति वक्तव्यम् । किं प्रयोजनम् । वेवीत्यर्थम् । वेवीतेरभ्यस्तसंज्ञा यथा स्यात् । वेव्यते ॥

### अपरिगणनं वा गणान्तत्वात् ॥ २ ॥

न वार्थः परिगणनेन । अस्त्वागणान्तमभ्यस्तसंज्ञा ॥ इहापि तर्हि प्राप्नोति । आङः शासु । अस्तु । अभ्यस्तकार्याणि कस्मान्न भवन्ति । भूयिष्ठानि परस्मैपदेष्वात्मनेपदी चायम् ।

---

असा न्याय लोकांत आहे. उदा० गुण ही संज्ञा अ ए व ओ तसेंच वृद्धि ही संज्ञा आ ऐ व औ यांपैकीं प्रत्येक वर्णाला होते. तसें येथेंही प्रत्येक भागाला अभ्यस्तसंज्ञा होऊं शकते.

पण अनेकांना उद्देशून जें कार्य सांगितलें असतें त्या कार्याचा प्रत्येक व्यक्तीशीं संबंध न करतां समुदायाशींच संबंध केला जातो अशा अर्थाचा ' समुदाये वाक्यपरिसमाप्तिः ' असाही न्याय लोकांत आहे. उदा० ' गर्गाः शतं दण्ड्यन्ताम् ' म्हणजे गर्गांच्या कडून शंभर रुपये दंड घ्यावा असें सांगितलें असतां तेथें राजेलोकांना द्रव्याची अपेक्षा असतांनाही गर्गांपैकीं प्रत्येकाला शंभर रुपये दंड करीत नाहींत तर सर्वांना मिळूनच ते दंड करतात. तेव्हां दोन्ही प्रकारचे दृष्टान्त लोकांमध्यें दिसत असल्यामुळें जर गुण व वृद्धि या संज्ञांविषयीं प्रत्येक वर्णाला संज्ञा होण्याकरितां प्रत्येकम् असें म्हटलें जाईल तर येथेंही समुदायाला संज्ञा होण्याकरितां सहग्रहण करावें लागेल. आतां तेथें प्रत्येकम् असें म्हटल्यावांचूनच जर प्रत्येकाला गुण व वृद्धि संज्ञा होतात तर येथेंही सहग्रहणावांचूनच समुदायाला संज्ञा होणें शक्य असल्यामुळें सहग्रहण करण्याचें कारण नाहीं.

( सू. ६ वा. १ ) जक्षित्यादिकांविषयीं सप्तग्रहण करावें; म्हणजे जक्ष जागृ इत्यादि सात धातूंना अभ्यस्त संज्ञा होतें असें सांगावें.

हें करण्याचें काय प्रयोजन ?

वेवीङ् धातूलाही अभ्यस्त संज्ञा व्हावी म्हणून. उदा०— वेव्यते. येथें अभ्यस्त संज्ञा झाल्यामुळें ' अभ्यस्तानामादिः ' ( ६।१।१८९ ) या सूत्रानें आद्युदात्त स्वर होतो.

( वा. २ ) जक्षित्यादिकांचें परिगणन करावयास नको. अदादिगण समाप्त होईपर्यंत सर्व धातूंना अभ्यस्त संज्ञा होऊं दे.

तर मग आङ्पूर्वक शास् धातूलाही अभ्यस्तसंज्ञा [2]प्राप्त होते.

त्यालाही अभ्यस्त संज्ञा झाली तर होऊं दे.

मग अभ्यस्तसंज्ञेमुळें होणारीं कार्यें त्याला कां बरें होत नाहींत ?

अभ्यस्त संज्ञेमुळें होणारीं कार्यें बहुतेक परस्मैपदामध्यें होणारीं आहेत. आणि हा शास् धातू तर आत्मनेपदी आहे.

---

१. ( सू. ६ ) जक्ष् धातु आणि त्याच्या पुढील सहा धातु यांना अभ्यस्तसंज्ञा होते. जागृ, दरिद्रा, शास्, चकास् दीधी आणि वेवी, हे ते सहा धातू होत.

२. द्वितीयगणामध्यें वेवीङ् धातूनंतर ' आङः शासु इच्छायाम् ' असा कोणी पाठ करतात; तो गृहीत धरून हा आक्षेप केला आहे.

स्वरस्तर्हि प्राप्नोति। यत्राप्यस्यात्मनेपदेष्वभ्यस्तकार्यं स्वरस्तत्राप्यनुदात्तेतः परं लसार्वधातुकमनुदात्तं भवतीत्यनुदात्तत्वे कृते नास्ति विशेषो धातुस्वरेणोदात्तत्वे सत्यभ्यस्तस्वरेण वा ॥ षसिवशी छान्दसौ । दृष्टानुविधिश्छन्दसि भवति ॥ चर्करीतमभ्यस्तमेव ॥ ह्नुङ्स्तर्हि प्राप्नोति । अस्तु । अभ्यस्तकार्याणि कस्मान्न भवन्ति । भूयिष्ठानि परस्मैपदेष्वात्मनेपदी चायम् । स्वरस्तर्हि प्राप्नोति। अह्न्विङोरिति प्रतिषेधविधानसामर्थ्यात्स्वरो न भविष्यति॥

अथवा सप्तैवेमे धातवः पठ्यन्ते । जक्षभ्यस्तसंज्ञो भवति। इत्यादयश्च षट्। जक्षित्यादयः षडिति ॥

तर मग अभ्यस्त संज्ञेमुळें होणारा आद्युदात्तस्वर ( ६।१।१८९ ) प्राप्त होत आहे.

पण त्या बाबतींतही अनुदात्तेत् अशा या शास् धातूहून पुढें असलेल्या लसार्वधातुकाला ' तास्यनुदात्तेत्० ' ( ६।१।१८५ ) या सूत्रानें अनुदात्त केला असतां धातुस्वरानें ( ६।१।१६२ ) आद्युदात्तच होत आहे. तेव्हां अभ्यस्तस्वरानें आद्युदात्त केला काय किंवा धातुस्वरानें केला काय त्यांत कांहीं फरक होत नाहीं. या शास् धातूच्या पुढें षस् आणि वश् हे दोन धातू आहेत पण ते छान्दस म्हणजे वेदामध्येंच आढळणारे आहेत आणि वेदामध्यें तर जीं कार्यें दृष्ट आहेत तेवढींच करावयाचीं असा नियम आहे. यङ्लुगन्त हें तर अभ्यस्तसंज्ञक आहेच[3].

तर मग ' ह्नुङ् अपनयने ' अशा रीतीनें अपनयन या अर्थाच्या ह्नुङ् धातूला अभ्यस्तसंज्ञा होऊं लागेल.

होईल तर होऊं दे.

तर मग अभ्यस्त संज्ञेचीं कार्यें कां बरें होत नाहींत ?

अभ्यस्त संज्ञेचीं कार्यें पुष्कळशीं परस्मैपदामध्येंच सांगितलीं आहेत. आणि हा ' ह्नुङ् ' धातू तर आत्मनेपदी आहे.

तर मग अभ्यस्त संज्ञेमुळें आद्युदात्त स्वर होऊं लागेल.

' अह्न्विङोः ' हा प्रतिषेध केला आहे त्या जोरावर आद्युदात्त स्वर होणार नाहीं[4].

अथवा ' जक्षित्यादयः' या सूत्रामध्यें सातच धातू घेतले आहेत असेंही म्हणतां येईल. जक्ष् हें निराळें पद आहे. जक्ष् धातु अभ्यस्तसंज्ञक होतो हा त्याचा अर्थ करावा. त्यानंतर ' इत्यादयश्च षट् ' हीं पदें आहेत. त्यांचा अर्थ तो जक्ष् धातु ज्याच्या पूर्वी आहे असे सहा धातूही अभ्यस्तसंज्ञक होतात[5].

३. वश् धातूपुढें त्या द्वितीयगणामध्यें ' चर्करीतम् ' असें म्हटलें आहे. चर्करीत ही संज्ञा यङ्लुगन्ताची आहे. पण तेथें प्रकृत सूत्रानें सप्त असें परिगणन केलें नाहीं तर अभ्यस्तसंज्ञा होईल असा दोष देतां येत नाहीं. यङ्लुगन्तप्रयोगामध्यें द्वित्व झालें असतां त्यामुळें त्याला पूर्व सूत्रानें अभ्यस्तसंज्ञा होतच असते.

४. अह्न्विङोः हा निषेध ( ६।१।१८६ ) केला असल्यामुळें ह्नु धातूच्या पुढील ल सार्वधातुकाला अनुदात्त होत नाही. तेव्हां प्रत्ययस्वरानें अन्तोदात्त पद होतें. परंतु जर ह्नुङ् धातूला अभ्यस्तसंज्ञा झाली तर ह्नु याला आदि उदात्त होऊन एकंदर पद अन्तोदात्त होणार नाहीं. तेव्हां अर्थातच ह्नुङ् धातूला जो हा निषेध केला आहे तो व्यर्थ होईल. अह्न्विङोः या पदाची अनुवृत्ति ' अभ्यस्तानामादिः ' येथें करून ह्नुते ह्नुवाते वगैरे ठिकाणचा दोष घालवावा.

५. इत्यादयः या बहुव्रीहींतील आदि शब्द आद्यावयव या अर्थाचा न घेतां पूर्व या अर्थाचा घ्यावा. म्हणजे इत्यादि पदानें जक्ष् सोडून त्याच्या पुढील सहा धातू घेतां येतील.

## तुजादीनां दीर्घोऽभ्यासस्य ॥ ६ । १ । ७ ॥

**तुजादिषु च्छन्दःप्रत्ययग्रहणम् ॥१॥**

तुजादिषु च्छन्दःप्रत्ययग्रहणं कर्तव्यम् । छन्दसि तुजादीनां दीर्घो भवतीति वक्तव्यम् । अस्मिंश्चास्मिंश्च प्रत्यय इति वक्तव्यम् । इह मा भूत् । तुतोज शबलान् हरीन् ॥

**अनारम्भो वापरिगणितत्वात् ॥ २ ॥**

अनारम्भो वा पुनश्छन्दसि दीर्घत्वस्य न्याय्यः । कुतः । अपरिगणितत्वात् । न हि च्छन्दसि दीर्घस्य परिगणनं कर्तुं शक्यम् । किं कारणम् ।

**अन्येषां च दर्शनात् ॥ ३ ॥**

येषामपि दीर्घत्वं नारभ्यते तेषामपि च्छन्दसि दीर्घत्वं दृश्यते । तद्यथा । पूरुषः नारक इति ॥

**अनेकान्तत्वाच्च ॥ ४ ॥**

येषां चाप्यारभ्यते तेषामप्यनेकान्तः । यस्मिन्नेव च प्रत्यये दीर्घत्वं दृश्यते तस्मिन्नेव च न दृश्यते । मामहान उक्थपात्रम् । ममहान इति च ॥

## [1]लिटि धातोरनभ्यासस्य ॥ ६ । १ । ८ ॥

धातोरिति किमर्थम् । ईहांचक्रे । नैतदस्ति । लिटीत्युच्यते न चात्र लिटं पश्यामः । प्रत्ययलक्षणेन । न लुमता तस्मिन्निति प्रत्ययलक्षणस्य प्रतिषेधः । इदं

---

( सू. ७ वा. १ ) हा जो तुज् वगैरे धातूंच्या अभ्यासाला दीर्घ सांगितला आहे तो वेदामध्यें होतो असें म्हणावें, तसेंच प्रत्ययग्रहणही करावें. म्हणजे अमुक एक अमुक एक प्रत्यय पुढें असतांना दीर्घ होतो असेंही म्हणावें. कारण ' तुतोज शबलान् हरीन् ' येथें अभ्यासाला दीर्घ न झाला पाहिजे.

( वा. २ ) वेदामध्यें दीर्घांच्या विधानाचा आरंभ न करणेंच न्याय्य होय. कारण वेदामध्यें अमुकाला अमुक पुढें असतांना दीर्घ होतो असें दीर्घांचें परिगणन करणें शक्य नाहीं.

याचें काय कारण ?

( वा. ३ ) ज्या शब्दांना दीर्घाचें विधान केलें नाहीं त्यांनाही वेदामध्यें दीर्घ केलेला दृष्टीस पडतो. जसें–पूरुषः नारकः इत्यादि.

( वा. ४ ) बरें, ज्या शब्दांना जो प्रत्यय पुढें असतांना दीर्घ सांगितला आहे तो प्रत्यय पुढें असतांना त्यांना दीर्घ होतोच असा नियम नाहीं. जसें–मामहान उक्थपात्रम्, ममहान उक्थपात्रम् असे दोनही प्रयोग दृष्टीस पडतात.

( सू. ८ ) येथें धातोः असें जें म्हटलें आहे तें कशाकरितां म्हटलें आहे ?

ईहांचक्रे येथें ईहाम् या आमन्ताला द्वित्व न व्हावें म्हणून.

हें धातुग्रहणाचें प्रयोजन होत नाहीं. कारण लिट् पुढें असतांना असें तेथें म्हटलें आहे. आणि येथें तर लिट् दृष्टीस पडत नाहीं. प्रत्ययलक्षणानें लिट् पुढें आहे अशी कल्पना करावी तर लिटाचा लुक् ( २।४।८१ ) झाला असल्यामुळें ' न लुमता तस्मिन्० ' ( १।१।६३ ) यानें प्रत्ययलक्षणाचा प्रतिषेध होत आहे.

---

१. ( सू. ७ ) तुज् वगैरे धातूंच्या अभ्यासाला दीर्घ होतो.

१. ( सू ८ ) लिट् प्रत्यय पुढें असतांना धातूचा अवयव असा जो अभ्यास नसलेला एकाच् प्रथम भाग त्याला द्वित्व होतें; आणि धातु अजादि असून जर त्यामध्यें अभ्यास नसलेला असा द्वितीय एकाच् भाग असेल तर मात्र तेथें त्या दुसऱ्या एकाच् भागालाच द्वित्व होतें.

तर्हि । ससृवांसो विशृण्विरे ॥

**लिटि द्विर्वचने जागर्तेर्वावचनम् ॥१॥**

लिटि द्विर्वचने जागर्तेर्वेति वक्तव्यम् । यो जागार तमृचः कामयन्ते । यो जजागार तमृचः कामयन्ते ॥

अनभ्यासस्येति किम् । कृष्णो नोनाव वृषभो यदीदम् । नोनूयतेर्नोनाव ॥

**अभ्यासप्रतिषेधानर्थक्यं च च्छन्दसि वावचनात् ॥ २ ॥**

अभ्यासप्रतिषेधश्चानर्थकः । किं कारणम् । छन्दसि वावचनात् । अवश्यं छन्दसि वा द्वे भवत इति वक्तव्यम् । किं प्रयोजनम् ।

**प्रयोजनमादित्यान्याचिषामहे ॥ ३ ॥**

यियाचिषामह इति प्राप्ते । देवता नो दाति प्रियाणि । ददाति प्रियाणि । मघवा दातु । मघवा ददातु । स न स्तुतो वीरव-

---

तर मग ' ससृवांसो विशृण्विरे ' या वाक्यांतील विशृण्विरे या पदामध्यें श्रु धातूला द्वित्व न होणें हें धातुग्रहणाचें प्रयोजन समजावें.

( वा. १ ) हें जें लिट् पुढे असतांना द्वित्व सांगितलें आहे तें जागृ धातूला विकल्पानें होतें असें वचन करावें. उदा०—' यो जागार तमृचः कामयन्ते ' तसेंच ' यो जजागार तमृचः कामयन्ते. '

आतां येथें ' अनभ्यासस्य ' असें कशाकरितां म्हटलें आहे ?

'कृष्णो नोनाव वृषभो यदीदम्' हें वाक्य पहा. येथें नोनूय यांतील नो याला द्वित्व होत नाहीं. नोनूय या यङ्प्रत्ययान्त नु धातूचें लिट् प्रत्ययाचें नोनाव हें रूप आहे.

( वा. २ ) अभ्यासाचा जो येथें प्रतिषेध केला आहे तो निष्फल आहे. कारण वेदामध्यें विकल्पानें द्विर्वचन होतें असें वचन अवश्य केलें पाहिजे.

त्याचें प्रयोजन काय ?

( वा. ३ ) 'आदित्यान् याचिषामहे ' येथें याचिषामहे याच्या ऐवजीं यियाचिषामहे असें प्राप्त होत आहे तें होऊं नये हा त्या वचनाचा उपयोग आहे; तसेंच देवता नो दाति प्रियाणि येथें ददाति प्रियाणि असें प्राप्त होतें आणि मघवा दातु येथें ददातु असें प्राप्त होतें; त्याप्रमाणेंच वीरवद्धातु येथें दधातु असें प्राप्त होत आहे. या सर्व ठिकाणीं द्वित्व न होतांही प्रयोग व्हावे म्हणून वेदामध्यें द्वित्वविकल्प सांगितला पाहिजे.

---

२. विशृण्विरे हा वैदिक प्रयोग आहे. येथें वि उपसर्गपूर्वक श्रु धातूहून लिट् प्रत्यय, प्रथमपुरुष बहुवचन झ प्रत्यय, त्याचे स्थानीं इरे आदेश ( ३।४।८१ ), त्याला सार्वधातुक संज्ञा ( ३।४।११७ ), धातूला शृ आदेश आणि विकरण श्नु प्रत्यय ( ३।१।७४ ) अशीं कार्यें झालीं आहेत. येथें श्नु प्रत्ययानें व्यवधान असल्यामुळें धातूला द्वित्व होत नाहीं. जर येथें धातुग्रहण केलें नाहीं तर शृणु या अंगाला लिट् प्रत्यय पुढें अव्यवहित असल्यामुळें द्वित्व होऊं लागेल.

३. नु धातूहून यङ् प्रत्यय, त्याचा लुक्. नोनू या धातूहून लिट् प्रत्यय, प्रथमपुरुष एकवचन तिप् प्रत्यय, त्याला णल् आदेश (३।४।८२) आणि वृद्धि (७।२।११५) आव् आदेश अशीं कार्यें झालीं आहेत. येथें पूर्वीच यङ्-प्रत्ययामुळें पुढील सूत्रानें द्वित्व झालें आहे व त्यामुळें नो याला अभ्याससंज्ञा झाली आहे म्हणून प्रकृत सूत्रानें लिट् प्रत्ययाच्या निमित्तानें प्राप्त झालेलें द्वित्व होत नाही. ' नोनाव ' हा प्रयोग वैदिक आहे.

४. तेव्हां या वेदामधील द्वित्वविकल्पामुळेंच नोनाव या वैदिक प्रयोगांत द्वित्व होणार नाहीं म्हणून अनभ्यासस्य असें म्हणावयास नको. पण सन्प्रत्ययान्त किंवा यङ्प्रत्ययान्त धातूहून णिच् प्रत्यय करून पुढें लुङ् प्रत्यय करून मध्यें चङ् प्रत्यय केला असतां तेथें पुढील सूत्रानें द्वित्व होतें. परंतु त्यानंतर ' चङि ' ( ६।१।११ ) यानें द्वित्व होत नाहीं. त्याकरितां ' चङि ' या सूत्रामध्यें अनुवृत्ति व्हावी म्हणून येथें अनभ्यासस्य असें म्हटलें पाहिजे.

द्धातु । वीरवद्धातु ॥ यावतेदानीं छन्दसि वा द्वे भवत इत्युच्यते धातुग्रहणेनापि नार्थः । कस्मान्न भवति सस्वांसो विश्रृण्विर इति । छन्दसि वावचनात् ॥ तदेतद्धातुग्रहणं सांन्यासिकं तिष्ठतु तावत् ॥

**सन्यङोः ॥ ६।१।९ ॥**

किमियं षष्ठ्याहोस्वित्सप्तमी । कुतः संदेहः । समानो निर्देशः । किं चातः । यदि षष्ठी सन्यङन्तस्य द्विर्वचनेन भवितव्यम् । अथ सप्तमी सन्यङोः परतः पूर्वस्य द्विर्वचनम् ॥ कश्चात्र विशेषः ।

**सन्यङोः परत इति चेदिटो द्विर्वचनं परादित्वात् ॥ १ ॥**

सन्यङोः परत इति चेदिटो द्विर्वचनं कर्तव्यम् । अटिटिषति अशिशिषति । किं पुनः कारणं न सिध्यति । परादित्वात् । इट् परादिः ॥

**हन्तेश्चेटः ॥ २ ॥**

हन्तेश्चेटो द्विर्वचनं कर्तव्यम् । जेघ्नीयते ॥ ननु च यस्यापि सन्यङन्तस्य द्विर्वचनं तस्यापि स्थानिवद्भावप्रसङ्गः । ईटि स्थानिवद्भावादीटो द्विर्वचनं न प्राप्नोति । नैष दोषः ।

---

बरें; वेदामध्यें द्वित्व विकल्पानें होतें असें आहे तर मग आता धातुग्रहण करण्यांत कांहीं अर्थ दिसत नाहीं.

पण मग विशृण्विरे येथें कां बरें द्वित्व होत नाहीं ?

वेदामध्यें द्विर्वचनाचा विकल्प आहे म्हणून.

तथापि प्रस्तुत सूत्रांत जें धातुग्रहण केलें आहे तें तसेंच राहूं दे.

( सू. ९ ) सन्यङोः ही षष्ठी आहे किंवा सप्तमी आहे ?

ह्या संशयाचें काय कारण ?

कारण असें कीं सन्यङोः हें षष्ठीचें तसेंच सप्तमीचेंही द्विवचनाचें रूप सारखेंच होत आहे.

बरें; षष्ठी अथवा सप्तमी यांत फरक काय ?

जर सन्यङोः हें षष्ठ्यन्त समजलें तर सन्नन्ताला व यङन्ताला द्विर्वचन प्राप्त होतें. आणि सप्तम्यन्त समजलें तर सन् व यङ् पुढें असतांना पूर्वाला द्वित्व प्राप्त होतें.

या दोन तऱ्हांपैकीं कोणत्या तऱ्हेंत काय विशेष होणार आहे ?

( वा. १ ) सन् किंवा यङ् पुढें असतांना मागें असलेल्या धातूला द्विर्वचन होतें असें म्हटलें तर अटिटिषति अशिशिषति इत्यादि स्थळीं इट् आगमाला द्विर्वचनाचें विधान करावें लागेल.

पण काय कारणानें बरें इडागमाला द्वित्व होणार नाहीं ?

इट् हा सन् प्रत्ययाचा अवयव आहे म्हणून.

(वा. २) हन् धातूसंबंधीं इटालाही द्वित्वाचें विधान करावें लागेल. उदा०—जेघ्नीयते.

पण सन्नन्ताला तसेंच यङन्ताला दित्व होतें या पक्षींही येथें दोष येत आहे. रूपस्थानिवद्भावानें (१।१।५९) हन् यालाच द्वित्व प्राप्त होत आहे. कारण हनाहून पुढच्या यङाला ईट् आगम झाल्यानंतर तोच अच् पुढें असल्यामुळें रूपस्थानिवद्भाव होईल आणि ईटाला द्वित्व प्राप्त होणार नाहीं.

हा दोष येत नाहीं. कारण द्वित्वाचें निमित्त

---

५ पुढें अनुवृत्ति होण्याकरितां येथें धातुग्रहण ठेवावें. ( ६।१।४५ वा. ८ ).

१ ( सू. ९ ) सन्प्रत्ययान्त आणि यङ्प्रत्ययान्त धातूंमधील प्रथम एकाच् भागाला द्वित्व होतें. आणि तो धातु अजादि असेल तर द्वितीय एकाच् भागाला द्वित्व होतें.

२ हन् धातूच्या पुढील यङ् प्रत्ययाला ईट् आगम ( ७।४।३० वा. १ ) सांगितला आहे तो पक्ष घेऊन हें लिहिलें आहे. त्या पक्षीं यङ् प्रत्ययाला ईट् आगम व उपधालोप ( ६।४।९८ ) झाल्यानंतर घ्नीय् या भागाला द्वित्व करून जेघ्नीयते हें रूप साधावयाचें आहे.

द्विर्वचननिमित्तेऽचि स्थानिवदित्युच्यते न चासौ द्विर्वचननिमित्तम् । यस्मिन्नपि द्विर्वचनं यस्यापि द्विर्वचनं सर्वोऽसौ द्विर्वचननिमित्तम् ॥ तस्मादीटो द्विर्वचनम् । तस्मादुभाभ्यामेवेटो द्विर्वचनं कर्तव्यं यश्चोभयोर्दोषो न तमेकश्चोद्यो भवति ॥

**एकाच उपदेशेऽनुदात्तादित्युपदेशवचनमनुदात्तविशेषणं चेत्सन इट्प्रतिषेधः ॥ ३ ॥**

एकाच उपदेशेऽनुदात्तात् [ ७. २. १० ] इत्युपदेशवचनमनुदात्तविशेषणं चेत्सन इट्प्रतिषेधो वक्तव्यः । बिभित्सति चिच्छित्सति । द्विर्वचने कृत उपदेशेऽनुदात्तादेकाचः श्रूयमाणादितीट्प्रतिषेधो न प्राप्नोति ॥

अस्तु तर्हि सन्यङन्तस्य ।

**सन्यङन्तस्येति चेदशेः सन्यनिटः ॥ ४ ॥**

सन्यङन्तस्येति चेदशेः सन्यनिटो द्विर्वचनं वक्तव्यम् । इयक्षमाणा भृगुभिः सजोषाः ॥ यस्यापि सन्यङोः परतो द्विर्वचनं तेनाप्यत्रावश्यमिडभावे यत्नः कर्तव्यः । किं कारणम् । अशेर्हि प्रतिपदमिड् विधीयते

---

असा अच् पुढें असतांना रूपस्थानिवद्भाव सांगितला आहे. आणि यङन्ताला द्वित्व होतें या षष्ठ्यन्तपक्षीं तर हा ईट् द्वित्वाचा उद्देश्य होत असल्यामुळें त्याला द्वित्वाचें निमित्त म्हणतां येत नाहीं.

पण जो पुढें असतांना द्वित्व सांगितलें आहे किंवा ज्याला द्वित्व सांगितलें आहे ते दोघेही द्वित्वनिमित्त म्हटले जातात. तेव्हां षष्ठ्यन्त आणि सप्तम्यन्त या दोन्ही पक्षीं ईटाला द्वित्व होण्याकरितां वचन करावें लागत आहे. तेव्हां दोघांच्याही मतावर जो दोष येतो तो दोष एकानें दुसऱ्याच्या मतावर लादणें बरोबर नाहीं.

( वा. ३ ) एकाच उपदेशेऽनुदात्तात् ( ७।२।१० ) येथील उपदेशग्रहण हें फक्त अनुदात्ताचेंच विशेषण समजलें तर उपदेशीं अनुदात्त आणि हल्लीं एकाच् अशा अंगाच्या पुढील वलादि प्रत्ययाला इट् आगम होत नाहीं असा अर्थ ठरल्यामुळें बिभित्सति चिच्छित्सति इत्यादि ठिकाणीं द्विर्वचन केलें असतां इट्प्रतिषेध प्राप्त होत नाहीं म्हणून सनाला इट्प्रतिषेध होण्याकरितां वचन करावें लागेल.

तर मग हा दोष जाण्याकरितां सन्नन्ताला व यङन्ताला द्वित्व होतें असा षष्ठ्यन्त पक्षच राहूं दे.

( वा. ४ ) सन्नन्ताला व यङन्ताला द्वित्व होतें असें म्हटलें तर अश् धातूच्या पुढील सन् प्रत्ययाला इट् आगम झाला नाहीं अशा स्थितींत अश् धातूला द्वित्वाचें विधान करावें लागणार आहे. उदा०— इयक्षमाणा भृगुभिः सजोषाः.

सन् व यङ् पुढें असतांना द्वित्व होतें या पक्षीं जरी अश् धातूला आपोआपच द्वित्व होईल तरी येथें इट् आगम न होण्याकरिता प्रयत्न केलाच पाहिजे. कारण ‘ स्मिपूङ्रञ्ज्वशां सनि ’ ( ७।२।७४ ) या सूत्रानें अश् धातूच्या पुढील

३ यङन्ताला द्वित्व सांगितलें असलें तरी त्यांतील ईट् याला द्वित्वाचा अनुभव नाहीं. कारण तो प्रथम एकाच् भागांत सांपडत नाहीं. म्हणून त्याला निमित्त म्हणण्यास हरकत नाहीं.

४ षष्ठ्यन्त पक्षीं सन् प्रत्ययाचा सकार द्वित्वामध्यें सापडतो. तेव्हां द्वित्व हें केवळ भिद् धातूलाच होत नसल्यामुळें धातूचें एकाच्त्व कायमच राहतें. सप्तम्यन्त पक्षीं भिद् एवढ्यालाच द्वित्व होईल. तेव्हां भिद्भिद् एवढा भिद् धातु अनेकाच् होत आहे म्हणून इट् आगमाचा निषेध होणार नाहीं.

५ मागें ( ६।१।१ टीप १२ ) पहा.

स्मिपूङ्रञ्ज्वशां सनि [ ७. २. ७४ ] इति। तेनैव द्वितीयद्विर्वचनमपि न भविष्यति ॥ अथवा नैतदश्नेः रूपम्। यजेरेष च्छान्दसो वर्णलोपः। तद्यथा। तुभ्येदमग्ने। तुभ्यमिदमग्न इति प्राप्ते। अम्बानां चरुम्। नाम्बानां चरुमिति प्राप्ते। आव्याधिनीरुगणाः। सुगणा इति प्राप्ते। इष्कर्तारमध्वरस्य। निष्कर्तारमध्वरस्येति प्राप्ते। शिवा उद्रस्य भेषजी। शिवा रुद्रस्य भेषजीति प्राप्ते ॥ अश्यर्थो वै गम्यते। कः पुनरश्नेरर्थः। अश्नोतिर्व्याप्तिकर्मा। यजिरप्यश्यर्थे वर्तते। कथं पुनरन्यो नामान्यस्यार्थे वर्तते। बह्वर्था अपि धातवो भवन्तीति। तद्यथा। वपिः प्रकिरणे दृष्टश्छेदने चापि वर्तते। केशान्वपतीति। ईडिः स्तुतिचोदनायाच्ञासु दृष्ट ईरणे चापि वर्तते। अग्निर्वा इतो वृष्टिमीट्टे मरुतोऽमुतश्च्यावयन्ति। करोतिरयमभूतप्रादुर्भावे दृष्टो निर्मलीकरणे चापि वर्तते। पृष्ठं कुरु। पादौ कुरु। उन्मृदानेति गम्यते। निक्षेपणे चापि दृश्यते। कटे कुरु। घटे कुरु। अश्मानमितः कुरु। स्थापयेति गम्यते ॥ एवं तर्हि

---

सनाला प्रतिपदोक्त इट् आगम सांगितला आहे. तेव्हां ज्या कारणामुळें इट् आगम दूर करावयाचा त्याच कारणामुळें द्वितीय द्विर्वचनही दूर केलें जाईल.[६] अथवा इयक्षमाणा हें अश् धातूचें रूपच नव्हे. तर सन्नन्त यज् धातूचें रूप आहे आणि छान्दसत्वास्तव अभ्यासांतील यकाराचा लोप झाला आहे. उदा०— तुभ्येदमग्ने येथें तुभ्यमिदमग्नये असें प्राप्त झालें असतां छान्दसत्वास्तव मकाराचा लोप झाला आहे. तसेंच अम्बानां चरुम् येथें नाम्बानां चरुम् असें पाहिजे असता नकाराचा छान्दस लोप केला आहे. तसेंच—आव्याधिनीः उगणाः येथें सुगणाः यांतील सकाराचा लोप करून उगणाः असें केलें आहे. इष्कर्तारमध्वरस्य येथेंही निष्कर्तारम् यातील नकाराचा लोप केला आहे. त्याप्रमाणेंच शिवा रुद्रस्य भेषजी येथें रुद्रस्य यांतील रेफाचा लोप करून उद्रस्य असें म्हटलें आहे. वरील उदाहरणांप्रमाणें इयक्षमाणा हाही वैदिक प्रयोग आहे असें समजावें.

पण इयक्षमाणा भृगुभिः या प्रयोगामध्यें अश् धातूचा अर्थ प्रतीत होत आहे ना ?

अश् धातूचा काय अर्थ आहे ?

अश् धातूचा अर्थ व्यापणें असा आहे.

तर यज् धातूही अश् धातूच्या अर्थी आहे.

पण एक धातु दुसऱ्या धातूच्या अर्थी कसा बरें असूं शकेल ?

धातू हे अनेकार्थक असतात. जसें—पेरणें या अर्थाचा वप् धातु छेदन या अर्थींही दिसतो. उदा०—केशान् वपति. तसेंच स्तुति चोदना व याचना या अर्थाचा ईड् धातु प्रेरणा या अर्थींही दिसतो. जसें—अग्निर्वा इतो वृष्टिमीट्टे मरुतोऽमुतश्च्यावयन्ति. तसेंच उत्पत्ति या अर्थाचा कृ धातू हा स्वच्छ करणें या अर्थींही दिसतो. जसें—पृष्ठं कुरु पादौ कुरु असें म्हटलें असतां घासून स्वच्छ कर असा अर्थ प्रतीत होतो. तसेंच स्थापन करणें या अर्थींही कृ धातू दिसतो. जसें—घटे कुरु अश्मानम् असें म्हटलें असतां घागरीवर धोंडा ठेव असा अर्थ समजला जातो. त्याप्रमाणें यज् धातूही व्यापणें या अर्थी समजला जाईल.

असें आहे तर—[७]

---

६ तेव्हां वैदिक प्रयोग आहे म्हणून जसा इट् आगम होत नाहीं तसें द्वित्वही द्वितीय एकाच् भागाला न होतां प्रथम एकाच् भागालाच होईल.

७. सन्यङोः ही षष्ठी मानली असतांही इयक्षमाणा या प्रयोगाची उपपत्ति होते असें असेल तर.

## दीर्घकुत्वप्रसारणषत्वमधिकस्य द्विर्वचनात् ॥ ५ ॥

दीर्घत्वं द्विर्वचनाधिकस्य न सिध्यति । चिचीषति तुष्टूषति । समुदायस्य समुदाय आदेशस्तत्र संप्रमुग्धत्वात्प्रकृतिप्रत्ययस्य नष्टः सन्भवति । तत्राजन्तानां सनीति दीर्घत्वं न प्राप्नोति ॥ इदमिह संप्रधार्यम् । दीर्घत्वं क्रियतां द्विर्वचनमिति किमत्र कर्तव्यम् । परत्वाद्दीर्घत्वम् । नित्यं द्विर्वचनम् । कृतेऽपि दीर्घत्वे प्राप्नोत्यकृतेऽपि प्राप्नोति । दीर्घत्वमपि नित्यम् । कृतेऽपि द्विर्वचने प्राप्नोत्यकृतेऽपि प्राप्नोति । अनित्यं दीर्घत्वं न हि कृते द्विर्वचने प्राप्नोति । किं कारणम् । समुदायस्य समुदाय आदेशस्तत्र संप्रमुग्धत्वात्प्रकृतिप्रत्ययस्याजन्तता नास्तीति दीर्घत्वं न प्राप्नोति । द्विर्वचनमप्यनित्यम् । अन्यस्य कृते दीर्घत्वे प्राप्नोत्यन्यस्याकृते शब्दान्तरस्य च प्राप्नुवन्विधिरनित्यो भवति । उभयोरनित्ययोः परत्वाद्दीर्घत्वम् ॥ यत्तर्हि नाकृते द्विर्वचने दीर्घत्वं तन्न सिध्यति । जुहूषतीति ॥ कुत्वं

---

( वा. ५ ) षष्ठ्यन्त पक्षीं धातूला द्वित्व करतांना त्या प्रथम एकाच् भागामध्यें सन् प्रत्ययाचा सकार हा अधिक शिरत असल्यामुळें दीर्घ, कुत्व, संप्रसारण आणि षत्व हीं कार्यें होणार नाहींत. उदा०–चिचीषति तुष्टूषति. या ठिकाणीं चि धातूहून सन् प्रत्यय केला असतां चिस् हा समुदाय नष्ट होऊन त्याचे स्थानीं चिस् चिस् असा निराळाच समुदाय आदेश झाल्यानंतर त्यांत ही प्रकृति व हा प्रत्यय अशी फोड करतां येत नसल्यामुळें सन् प्रत्यय कोणता तें कळत नाहीं. तेव्हां सन् पुढें असतांना अजन्त अंगाला सांगितलेला दीर्घ ( ६।४।१६ ) होणार नाहीं.

आता येथें असा विचार उत्पन्न होतो कीं–चि–स असें असतां प्रथमतः दीर्घ करावा किंवा द्विर्वचन करावें ?

यांपैकीं काय बरें प्रथम करावें ?

दीर्घ हा पर असल्यामुळें अगोदर करावा.

पण दीर्घ केला अथवा न केला तरी द्विर्वचन हें प्राप्त होत असल्यानें द्विर्वचन नित्य आहे.

दीर्घ देखील नित्यच आहे. कारण द्वित्व केलें अथवा न केलें तरी दीर्घ प्राप्त होत आहे.

दीर्घ नित्य नाहीं. कारण द्विर्वचन केलें असतां दीर्घ प्राप्त होत नाहीं.

काय कारण ?

कारण असें कीं चिस् या समुदायाला चिस् चिस् असा निराळाच समुदाय आदेश झाला असल्यामुळें त्यामध्यें ही प्रकृति व हा प्रत्यय ही फोड करतां येत नाहीं. तेव्हां अजन्त अंग कोणतें तें समजत नसल्यामुळें दीर्घाची प्राप्ति येत नाहीं.

द्विर्वचनही अनित्यच आहे. कारण दीर्घ केला असतां चीस् या शब्दाला द्वित्व येतें आणि दीर्घ न केला तर चिस् या शब्दाला द्वित्व येतें, आणि अशा रीतीनें भिन्न भिन्न शब्दव्यक्तींना प्राप्त होणारा विधि अनित्य समजला जातो. तेव्हां दोघेही अनित्य असल्यामुळें परत्वास्तव प्रथमतः दीर्घ होईल.

तर मग ज्या ठिकाणीं द्विर्वचन केल्यावांचून दीर्घाची प्राप्तीच येत नाहीं तेथें दीर्घ साधणार नाहीं. उदा० जुहूषति.

---

८. येथें द्वित्व केल्यानंतर अभ्यस्तसंज्ञा होणार, त्यानंतर त्या संज्ञेमुळें संप्रसारण ( ६।१।३३ ) होणार, आणि नंतर त्या उकाराचा दीर्घ करावयाचा. परंतु सन्यङोः ही षष्ठी घेतली असतां सनाचा सकार द्वित्वामध्यें सांपडत असल्यामुळें पूर्वी सांगितल्याप्रमाणें द्वित्वानें समुदायाला समुदाय आदेश होईल. तेव्हां प्रकृति कोणती तें कळत नसल्यामुळें दीर्घ होणार नाहीं. याच कारणानें ' हलः ' ( ६।४।२ ) यानेंही येथें दीर्घ होणार नाहीं.

द्विर्वचनाधिकस्य न सिध्यति । जिघांसति जङ्घन्यते । किं कारणम् । समुदायस्य समुदाय आदेशस्तत्र संप्रमुग्धत्वात्प्रकृतिप्रत्ययस्य नष्टो हन्तिर्भवति । तत्राभ्यासाद्धन्तिहकारस्येति कुत्वं न प्राप्नोति ॥ संप्रसारणं च द्विर्वचनाधिकस्य न सिध्यति । जुहूषति जोहूयते । समुदायस्य समुदाय आदेशस्तत्र संप्रमुग्धत्वात्प्रकृतिप्रत्ययस्य नष्टो ह्वयतिर्भवति । तत्र ह्वः संप्रसारणमभ्यस्तस्येति संप्रसारणं न प्राप्नोति ॥ नैष दोषः । वक्ष्यति ह्येतद्ध्वोऽभ्यस्तनिमित्तस्येति । यावता चेदानीं ह्वोऽभ्यस्तनिमित्तस्येत्युच्यते सोऽप्यदोषो भवति यदुक्तं यत्तर्हि नाकृते द्विर्वचने दीर्घत्वं तन्न सिध्यतीति ॥ षत्वं च द्विर्वचनाधिकस्य न सिध्यति । पिपक्षति यियक्षति । समुदायस्य समुदाय आदेशस्तत्र संप्रमुग्धत्वात्प्रकृतिप्रत्ययस्य नष्टः सन्भवति । तत्रेण्कुभ्यामुत्तरस्य प्रत्ययसकारस्येति षत्वं न प्राप्नोति ॥ इदमिह संप्रधार्यम् । द्विर्वचनं क्रियतां

---

तसेंच द्विर्वचनानें शब्दान्तर झाल्यामुळें कुत्व साधत नाहीं. जसें—जिघांसति, जङ्घन्यते.

काय कारण ?

कारण असें कीं, हन्–स असें असतां हन्स् या समुदायाचे स्थानीं हन्स् हन्स् असा समुदाय आदेश झाल्यामुळें तेथें प्रकृतिप्रत्ययाची विभागणी होत नाहीं. तेव्हां हन् धातु कोणता तें कळत नसल्यामुळें अभ्यस्ताच्या पुढील हन् धातूच्या हकाराला सांगितलेलें ( ७।३।५५ ) कुत्व होऊं शकत नाहीं.

तसेंच द्विर्वचनानें शब्दान्तर झाल्यामुळें संप्रसारण सिद्ध होत नाहीं. जसें—जुहूषति, जोहूयते. येथेंही सन् प्रत्ययाच्या सकारासहित पूर्वीच्या समुदायाला त्यापेक्षां दुप्पट आकाराचा निराळाच समुदाय आदेश केला असतां तेथें प्रकृतिप्रत्ययविभागाचा संमोह होऊन ह्वेञ् धातु कोणता तें कळत नसल्यामुळें अभ्यस्तसंज्ञक ह्वेञ् धातूला सांगितलेलें संप्रसारण प्राप्त होऊं शकत नाहीं.

हा दोष येत नाहीं. कारण अभ्यस्तनिमित्ते[१] ( ६।१।३३ वा. ३ ) असें ( वार्तिककार ) पुढें सांगणार आहेत. शिवाय जुहूषति येथें द्वित्व केल्याशिवाय दीर्घ होऊंच शकत नाहीं म्हणून तेथें दीर्घ होणार नाहीं असा जो पूर्वी ( पृ. १४ पं. २६ ) दोष दिला आहे तोही दोष या आताच्या म्हणण्यानें दूर होत आहे.

तसेंच द्विर्वचनानें शब्दान्तर झाल्यामुळें षत्व सिद्ध होत नाहीं. उदा० पिपक्षति; यियक्षति. येथें यज्-स असें असतां यज्स् या समुदायाचे स्थानीं यज्स् यज्स् असा निराळाच समुदाय आदेश झाल्यामुळें प्रकृतिप्रत्ययविभागाचा संमोह होऊन सन् प्रत्यय कोणता तें समजत नाहीं. तेव्हां इण् व कवर्गाहून पुढील प्रत्ययाच्या अवयव सकाराला सांगितलेलें ( ८।३।५९ ) षत्व प्राप्त होऊं शकत नाहीं.

पण येथें अगोदर असा विचार करावा कीं—यज् स असें असतां प्रथमतः द्वित्व करावें किंवा षत्व करावें.

मग यांत काय बरें प्रथम करावें ?

---

१. अभ्यस्तसंज्ञा द्वित्वामुळें होणार आहे. तेव्हां त्या द्वित्वाचें निमित्त असलेला असा जो प्रत्यय तोच द्वित्वाच्या द्वारानें अभ्यस्तसंज्ञेचें निमित्त म्हणून समजला जाईल. अभ्यस्तनिमित्ते असें म्हटलें असतां त्या संप्रसारणाला अभ्यस्तसंज्ञा कारण नसून द्वित्वाचा निमित्त-प्रत्यय कारण आहे असें होतें. त्यामुळें द्वित्वाचा निमित्तभूत असा प्रत्यय केला कीं लगेच द्वित्वाच्या पूर्वीच संप्रसारणाची प्राप्ति येते. त्या वेळीं प्रकृतिप्रत्ययांचा संमोह नसल्यामुळें संप्रसारण होण्यास कांहीं अडचण पडत नाहीं.

षत्वमिति किमत्र कर्तव्यम् । परत्वात्षत्वम् । पूर्वत्रासिद्धे षत्वं सिद्धासिद्धयोश्च नास्ति संप्रधारणा ॥

आबृध्योश्चाभ्यस्ताविधिप्रतिषेधः ॥६॥

आबृध्योश्चाभ्यस्ताश्रयो विधिः प्राप्नोति स प्रतिषेध्यः । ईप्सन्ति ईर्त्सन्ति । ईप्सन् ईर्त्सन् । ऐप्सन् ऐर्त्सन् । किं च स्यात् । अद्भावो नुम्प्रतिषेधो जुस्भाव इत्येते विधयः प्रसज्येरन् ॥ नैष दोषः । उक्ता अत्र परिहाराः ॥

सङाश्रये च समुदायस्य समुदायादेशत्वाज्झलाश्रये चाव्यपदेश आमिश्रत्वात् ॥ ७ ॥

सङाश्रये च कार्ये समुदायस्य समुदायादेशत्वाज्झलाश्रये चाव्यपदेशः । किं कारणम् । आमिश्रत्वात् । आमिश्रीभूतमिवेदं भवति । तद्यथा । क्षीरोदके संपृक्ते । आमिश्रत्वान्न ज्ञायते कियत्क्षीरं कियदुदकमिति कस्मिन्वावकाशे क्षीरं कस्मिन्नवकाश उदकमिति । एवमिहाप्यामिश्रत्वान्न ज्ञायते का प्रकृतिः कः प्रत्ययः कस्मिन्वावकाशे प्रकृतिः कस्मिन्नवकाशे प्रत्यय इति । तत्र को दोषः। सङि झलीति कुत्वादीनि न सिध्यन्ति ॥ इदमिह संप्रधार्यम् । द्विर्वचनं क्रियतां कुत्वादीनीति किमत्र कर्तव्यम् । परत्वात्कुत्वादीनि । पूर्वत्रासिद्धे कुत्वादीनि सिद्धासिद्ध-

---

पर असल्यामुळें प्रथमतः षत्व करावें.

पण षत्व हें त्रिपादीमध्यें पठित आहे. आणि सिद्ध व असिद्ध या परस्परांमध्यें तर विप्रतिषेधच मुळीं असूं शकत नाहीं.

( वा. ६ ) आॅप् व ऋध् या धातूंविषयीं अभ्यस्तसंज्ञेमुळें जे विधी प्राप्त होतात त्यांचा प्रतिषेध करावा लागणार आहे. जसें—ईप्सन्ति ईर्त्सन्ति. ईप्सन् ईर्त्सन्. ऐप्सन् ऐर्त्सन्.

येथें काय होईल ?

येथें अद्भाव, नुम्प्रतिषेध, आणि जुस्भाव हे विधी होतील.

हा दोष येत नाहीं. या विषयींचे परिहार मागें ( पृ. १० पं. १ ) सांगितले आहेत.

सङ् प्रत्यहारांतील प्रत्ययावर अवलंबून असलेलीं कार्यें तसेंच झलादि सन् पुढें असतांना सगितलेलीं कार्यें कर्तव्य असतांना समुदायाला समुदाय आदेश झाल्यामुळें तेथें ही प्रकृति आणि हा सङ् प्रत्यय व हा झलादि सन् प्रत्यय असा व्यवहार करतां येणार नाहीं.

काय कारण ?

कारण असें कीं— तेथें प्रकृति व प्रत्यय यांच्या अवयवांचें जणूं काय मिश्रण होत असतें. जसें दूध व पाणी एके ठिकाणीं मिसळलें असतां तेथें पाणी किती आहे व दूध किती आहे, आणि पाणी कोणत्या जागेंत आहे व दूध कोणत्या जागेंत आहे हें कांहींच समजत नाहीं तसें येथेंही प्रकृति कोणती व प्रत्यय कोणता आणि कोणत्या वर्णापर्यंत प्रकृति व कोणत्या वर्णापासून प्रत्यय हें कांहींच समजत नाहीं.

मग तसें झालें असतां काय दोष येईल ?

सङ् प्रत्ययामुळें व झलादि प्रत्ययामुळें होणारीं जीं कुत्व दीर्घ वगैरे कार्यें तीं साधत नाहींत.

आतां येथें असा विचार उत्पन्न होतो कीं— पच् स अशा अवस्थेंत प्रथमतः द्विर्वचन करावें किंवा कुत्व ( ८।२।३० ) वगैरें कार्यें करावीं.

मग दोहोंत काय बरें करावें ?

पर असल्यामुळें कुत्व वगैरें कार्यें प्रथमतः करावीं.

पण ' पूर्वत्रासिद्धम् ' ( ८।२।१ ) या असिद्ध कांडामध्यें कुत्व वगैरे कार्यें पठित

---

१०. मागें ( ६।१।१ टी. १४ ) आणि ( ६।१।५ टी. ४ ) पहा.

११ मागें ( ६।१।१ टी. १५ ) पहा.

योश्च नास्ति संप्रधारणा ॥ एवं तर्हि पूर्वत्रासिद्धीयमद्विर्वचन इति वक्तव्यम् । तच्चावश्यं वक्तव्यम् । विभाषिताः प्रयोजयन्ति । द्रोग्धा द्रोग्धा । द्रोढा द्रोढा ॥ यावता चेदानीं पूर्वत्रासिद्धीयमद्विर्वचन इत्युच्यते सोऽप्यदोषो भवति यदुक्तं षत्वं न सिध्यतीति ॥

इह स्थाने द्विर्वचने णिलोपोऽपरिहृतः । सन्यङोः परतो द्विर्वचन इटो द्विर्वचनं वक्तव्यम् । सन्यङन्तस्य द्विर्वचने हन्तेः कुत्वमपरिहृतम् । तत्र सन्यङन्तस्य द्विर्वचनं द्विःप्रयोगश्चेत्येष पक्षो निर्दोषः । तत्रेदम-

---

आहेत. व सिद्ध कांडामध्यें द्विर्वचन पठित आहे. आणि सिद्ध व असिद्ध यांचा तर परस्परांमध्यें विप्रतिषेधच मुळीं संभवत नाहीं.

असें आहे तर 'पूर्वत्रासिद्धीयमद्विर्वचने' असें वचन करावें, म्हणजे द्विर्वचनभिन्न पूर्वशास्त्र कर्तव्य असतांना परशास्त्र[१२] असिद्ध होतें असें म्हणावें. आणि हें वचन तर अवश्य केलेंच पाहिजे. वैकल्पिक विधी हे या वचनाचें प्रयोजन होत. उदा०—द्रोग्धा द्रोग्धा[१३], द्रोढा द्रोढा.

आणि वर दिलेल्या कारणाकरितां जर 'पूर्वत्रासिद्धीय०' हें वचन अवश्य स्वीकारावें लागतच आहे तेव्हां यियक्षति इत्यादि स्थलीं षत्व होणार नाहीं असा जो दोष दिला आहे तोही आतां येत[१४] नाहीं.

[१५] आतां येथें स्थानेद्विर्वचन—पक्षीं आटिटत् येथें णिलोप होणार नाहीं असा जो दोष दिला आहे त्याचा परिहार केलेला नाहीं. तसेंच सन् व यङ् पुढें असतांना पूर्व धातूला द्विर्वचन होतें असें म्हटलें तर अटिटिषति इत्यादि स्थलीं इट् आगमाला द्वित्व होण्याकरितां वचन करावें लागणार आहे. आणि सन्नन्ताला तसेंच यङन्ताला द्वित्व होतें या पक्षीं जिघांसति येथें हन् धातूला कुत्व होणार नाहीं असा जो दोष दिला आहे त्याचा परिहार केला जात नाहीं. या सर्व पक्षांपैकीं सन्प्रत्ययान्त आणि यङ्प्रत्ययान्त यांना द्वित्व होतें असा 'षष्ठयन्त पक्ष' आणि 'द्विःप्रयोगरूप द्विर्वचन' हा पक्ष हे दोन्ही निर्दुष्ट आहेत. आतां येथें षष्ठयन्त पक्ष घेऊन

---

१२ अर्थात् द्वित्वाच्या दृष्टीनें त्रिपादीतील शास्त्र सिद्धच असल्यामुळें त्यांमध्यें विप्रतिषेध संभवतो.

१३ द्रुह् धातूहून लुट्, तिप्, डा, तास्, टिलोप आणि गुण हीं कार्यें होऊन द्रोह्-ता या स्थितींत घत्व (८।२।३२) विकल्पानें होतें म्हणून एकदां ढत्व (८।२।३१) होऊन द्रोग्धा व द्रोढा अशीं दोन रूपें होतात. नंतर द्वित्व (८।१।४) होऊन द्रोग्धा दोग्धा व द्रोढा द्रोढा अशीं दोन रूपें होतात. जर द्वित्वाच्या दृष्टीनें घत्व वगैरे त्रिपादींतील कार्यें असिद्ध असल्यामुळें द्रोह्-ता या स्थितींत अगोदर द्वित्व होईल तर द्रोह्ता द्रोह्ता या द्वित्वानें झालेल्या आदेशापैकीं दोन्ही खंडांमध्यें घत्वच केलें पाहिजे किंवा ढत्वच केलें पाहिजे असा नियम नसल्यामुळें पूर्व खंडांत घत्व व उत्तर खंडांत ढत्व होऊन कदाचित् द्रोग्धा द्रोढा असें भलतें रूप होईल. किंवा त्याच्या उलट द्रोढा द्रोग्धा असेंही कदाचित् होईल असा दोष येतो.

१४. कारण 'पूर्वत्रासिद्धीयमद्विर्वचने' या वचनानें द्वित्वाच्या पूर्वींच षत्व होणार आहे व त्यामुळें तो सनाचा सकार प्रत्ययाचा अवयव आहे असें स्पष्टच समजत आहे.

१५ पूर्वीं (६।१।१) द्वित्वासंबधानें स्थानेद्विर्वचनपक्ष आणि द्विःप्रयोगद्विर्वचनपक्ष असे दोन पक्ष दाखवून त्या दोन्ही पक्षांवर दोष दाखवून कांहीं ठिकाणीं त्या दोषांचा परिहार केला. पण त्यांत ग्राह्य पक्ष कोणता तें मात्र सांगितलें नाहीं. तसेंच प्रकृत सूत्रींही सन्यङोः ही षष्ठी किंवा सप्तमी असे दोन पक्ष दाखवून त्या दोन्ही पक्षांवर दोष दाखवून कांहीं ठिकाणीं त्या दोषांचा परिहारही केला. पण येथेंही त्यांत ग्राह्य पक्ष कोणता तें सांगितलें नाहीं. तें आतां भाष्यकार ठरवीत आहेत.

परिहृतं सन इट्प्रतिषेध इति । एतस्यापि सप्तमे परिहारं वक्ष्यत्युभयविशेषणत्वात्सिद्धमिति । कथं जेघ्नीयते । वक्ष्यत्येतद्यङ्प्रकरणे हन्तेर्हिंसायां घ्नीति ॥

[ श्लौ ॥ ६।१।१० ॥

चङि ॥ ६।१।११ ॥ ]

**दाश्वान्साह्वान्मीढ्वांश्च ॥ ६ । १ । १२ ॥**

दाश्वानिति किं निपात्यते ।

**दाशेर्वसौ द्वित्वेट्प्रतिषेधौ ॥ १ ॥**

दाशेर्वसौ द्वित्वेट्प्रतिषेधौ निपात्येते । दाश्वांसो दाशुषः सुतम् । दाश्वान् ॥ साह्वानिति किं निपात्यते ।

**सहेर्दीर्घत्वं च ॥ २ ॥**

किं च । द्वित्वेट्प्रतिषेधौ च । साह्वान्बलाहकः । साह्वान् ॥

मीढ्वानिति किं निपात्यते ।

**मिहेर्ढत्वं च ॥ ३ ॥**

यच्च पूर्वयोः । किं च पूर्वयोः । द्वित्वेट्प्रतिषेधौ दीर्घत्वं च । मीढ्वस्तोकाय तन-

---

द्विःप्रयोगरूप द्विर्वचन पक्ष घेतला असतां बिभित्सति वगैरे स्थलीं सनाला इट्प्रतिषेधाचें वचन करावें असा जा दोष दिला आहे त्याचा परिहार केला नाहीं. पण त्याचा परिहार 'उभयविशेषणत्वासिद्धम्' (७।२।१० वा.६) म्हणजे उपदेशे हें एकाचः व अनुदात्तात् या दोघांचेंही विशेषण असल्यामुळें बिभित्सति इत्यादि स्थलीं सनाला इट् आगमाचा निषेध सिद्ध होत आहे असें वार्तिककार सातव्या अध्यायामध्यें सांगणार आहेत.

आतां जेघ्नीयते येथें जो दोष दिला आहे ( वा. २ ) त्याची काय वाट ?

'यङ्प्रकरणे हन्तेर्हिंसायां घ्नी.' म्ह० हिंसा अर्थ असतांना यङ् पुढें असलेल्या हन् धातूला 'घ्नी' आदेश होतो असें 'यङि च' ( ७।४।३० ) येथें सांगावयाचेंच आहे.

( सू. १२ ) दाश्वान् येथें कशाचें निपातन केलें आहे ?

( वा. १ ) दाश् धातूहून क्वसु प्रत्यय केला असतां तेथें द्विर्वचन व इट् आगम यांच्या प्रतिषेधाचें निपातन केलें आहे. जसें— दाश्वांसो दाशुषः सुतम्.

आतां साह्वान् येथें कशाचें निपातन केलें आहे ?

( वा. २ ) सह् या धातूला परस्मैपद, उपधेला दीर्घ, आणि द्वित्वाचा व इडागमाचा निषेध यांचें निपातन केलें आहे. साह्वान् बलाहकः.

आतां मीढ्वान् येथें कशाचें निपातन केलें आहे ?

( वा. ३ ) मिह् धातूला ढत्वाचें निपातन केलें आहे. आणि दाश्वान् व साह्वान् येथें ज्या कार्यांचें निपातन केलें आहे त्याही कार्यांचें येथें निपातन आहेच.

तीं कोणतीं कार्यें ?

उपधादीर्घ व द्वित्वाचा आणि इडागमाचा प्रतिषेध. हीं सर्व कार्यें निपातनानें मिह् धातूला होतात. उदा०—मीढ्वस्तोकाय तनयाय मृड, यथेयमिन्द्र मीढ्वः.

---

१. ( सू. १० ) श्लु झाला असतां धातूमधील प्रथम एकाच् भागाला द्वित्व होतें, आणि अजादि धातु असून द्वितीय एकाच् भाग असेल तर त्या द्वितीय एकाच् भागाला द्वित्व होतें. उ० जुहोति.

१. ( सू. ११ ) चङ् प्रत्यय पुढें असतांना धातूमधील प्रथम एकाच् भागाला द्वित्व होतें आणि अजादि धातु असून द्वितीय एकाच् भाग असेल तर त्या द्वितीय एकाच् भागाला द्वित्व होतें उदा०— मीढ्वान् आटिटत्

१. ( सू. १२ ) दाश्वान् साह्वान् आणि मीढ्वान् हे तीन शब्द निपातन केले जातात.

याय मृड । यथेयमिन्द्र मीढ्वः ॥ मह्यर्थो वै गम्यते । कः पुनर्मह्यर्थः । मंहतिर्दानकर्मा । अतः किम् । इत्वमपि निपात्यम् ।

**मह्यर्थ इति चेन्मिहेस्तदर्थत्वात्सिद्धम् ॥ ४ ॥**

मह्यर्थं इति चेन्मिहिरपि मह्यर्थे वर्तते । कथं पुनरन्यो नामान्यस्यार्थे वर्तते । बह्वर्था अपि धातवो भवन्तीति । अस्ति पुनरन्यत्रापि कचिन्मिहिर्मह्यर्थे वर्तते । अस्तीत्याह । मिहेर्मेघः । मेघश्च कस्माद्भवति । अपो ददातीति ॥

**द्विर्वचनप्रकरणे कृञादीनां के ॥ ५ ॥**

द्विर्वचनप्रकरणे कृञादीनां क उपसंख्यानं कर्तव्यम् । चक्रम् चिक्लिदम् चक्नसमिति ॥ कादिष्विति वक्तव्यम् । इहापि यथा स्यात् । बभ्रुः ययुरिति ॥

**चरिचलिपतिवदीनामच्याक्चाभ्यासस्य ॥ ६ ॥**

चरिचलिपतिवदीनामचि द्वे भवत इति वक्तव्यम् । आक्चाभ्यासस्य । चराचरः चलाचलः पतापतः वदावदः ॥

**हन्तेर्घश्च ॥ ७ ॥**

---

पण मीढ्वान् येथें मह् धातूचा अर्थ प्रतीत होत आहे.

तो मह् धातूचा अर्थ कोणता ?

मह् धातु दान या क्रियेचा वाचक आहे.

मग त्या दृष्टीनें मह् धातूचें निपातन समजल्यास काय करावयास पाहिजे ?

तसें समजल्यास इत्वाचेंही निपातन केलें आहे असें समजलें पाहिजे.

( वा. ४ ) मीढ्वान् येथें मह् धातूचा अर्थ प्रतीत होतो असें म्हणणें असेल तर मिह् धातूच मह् धातूच्या अर्थींही आहे म्हणून इष्ट गोष्ट सिद्ध होत आहे.

पण मह् हा एक धातु मिह् या दुसऱ्या धातूच्या अर्थी कसा बरें असूं शकेल ?

धातूंना अनेकही अर्थ असतात.

पण मिह् धातु मह् धातूच्या अर्थी वापरलेला दुसरीकडे कोठें दृष्टीस पडतो काय ?

होय. उदा०— मिह् धातूपासून मेघशब्द बनला आहे. मेघ हे आपल्याला पाणी देतात म्हणून त्यांना मेघ हें नांव मिळालें आहे.

( वा. ५ ) कृञ् क्लिद् वगैरे धातूंना क प्रत्यय[2] पुढें असतांना द्वित्व होतें असें वचन करावें. उदा०— क्रियतेऽनेनेति चक्रम्. चिक्लिदम्. चक्नसम्.

या वचनामध्यें क प्रत्यय पुढें असतांना असें जें म्हटलें आहे तेथें क वगैरे प्रत्यय पुढें असतांना कृञ् वगैरे धातूंना द्वित्व होतें असें म्हणावें. कारण, बभ्रुः[3] ययुः इत्यादि ठिकाणींही द्वित्व झालें पाहिजे.

( वा. ६ ) चर् चल् पत् आणि वद् या धातूंना अच् प्रत्यय पुढें असतांना द्वित्व होतें आणि अभ्यासाला आक् असा आगम होतो असें वचन करावें. जसें— [4]चराचरः चलाचलः पतापतः वदावदः.

---

२. कृ, क्लिद् व क्नस् या धातूंहून घञ् प्रत्ययाच्या अर्थी क प्रत्यय ( ३।३।५८ वा. ४ ) झाला आहे.

३. भृ धातूहून कुर्भ्रश्च ( उणा. १।२२ ) या सूत्रानें कु प्रत्यय झाला आहे. त्या सूत्रामध्यें च हा शब्द घातला आहे त्यामुळें या पा वगैरे धातूंहूनही कु प्रत्यय होतो.

४. अभ्यासस्यानचि ( ७।४।५८ वा. १) या वचनामुळें हलादिः शेषः ( ७।४।६० ) याची प्रवृत्ति येथें होत नाहीं.

हन्तेर्घश्च वक्तव्यः । अचि द्वे भवत आक्चाभ्यासस्य । घनाघनः ॥

**पाटेर्णिलुक्च दीर्घश्चाभ्यासस्योक्च ॥ ८ ॥**

पाटयतेर्णिलुक् च वक्तव्यः । अचि द्वे भवत इति वक्तव्यं दीर्घश्चाभ्यासस्य ऊक्चागमः । पाटूपटः ॥

**द्विर्वचनं यणयवायावादेशाल्लोपोपधालोपणिलोपकिकिनोरुत्त्वेभ्यः ॥ ९ ॥**

यणयवायावादेशाल्लोपोपधालोपणिलोपकिकिनोरुत्त्वेभ्यो द्विर्वचनं भवति विप्रतिषेधेन ॥ द्विर्वचनस्यावकाशः । बिभिदतुः बिभिदुः । यणादेशस्यावकाशः । दध्यत्र मध्वत्र । इहोभयं प्राप्नोति । चक्रतुः चक्रुरिति ॥ अयवायावादेशानामवकाशः । चयनम् चायकः । लवनम् लावकः । द्विर्वचनस्य स एव । इहोभयं प्राप्नोति । चिचाय चिचयिथ । लुलाव लुलविथ ॥ आल्लोपस्यावकाशः । गोदः कम्बलदः । द्विर्वचनस्य स एव । इहोभयं प्राप्नोति । ययतुः ययुः । तस्थतुः तस्थुः ॥ उपधालोपस्यावकाशः । श्लेष्मघ्नं मधु । पित्तघ्नं घृतम् । द्विर्वचनस्य स एव । इहोभयं प्राप्नोति । जग्मतुः जग्मुः । जघ्नतुः जघ्नुः ॥ णिलोपस्यावकाशः । कारणा हारणा । द्विर्वचनस्य स एव । इहोभयं प्राप्नोति । आटिटत् आशिशत् ॥ उत्त्व-

---

(वा. ७) हन् धातूला अच् प्रत्यय पुढें असतांना द्वित्व होतें व हकाराचे स्थानीं घकार आदेश होतो, आणि अभ्यासाला आक् आगम होतो असें वचन करावें. जसें–घनाघनः.

(वा. ८) णिजन्त पट् धातूहून अच् प्रत्यय पुढें असतांना णि प्रत्ययाचा लुक् होतो, धातूला द्वित्व होतें, अभ्यासाला दीर्घ होतो आणि ऊक् आगम होतो, असें वचन करावें. उदा०–पाटूपटः.

(वा. ९) यण्, अय्, अव्, आय्, आव्, आल्लोप, उपधालोप, णिलोप, आणि कि व किन् प्रत्यय पुढें असतांना होणारें उत्व, या विधींपेक्षां द्विर्वचन हें पूर्वविप्रतिषेधानें अगोदर होतें असें वचन करावें. द्विर्वचनाला (६।१।८) बिभिदतुः बिभिदुः येथें अवकाश आहे, व दध्यत्र मध्वत्र येथें यणाला (६।१।७७) अवकाश आहे; आणि चक्रतुः चक्रुः येथें यण् व द्वित्व या दोहोंची प्राप्ति येत आहे. तसेंच, अय् अव् आय् आणि आव् (६।१।७८) यांना चयनं चायकः, लवनं लावकः येथें अवकाश आहे; व द्वित्वाला अवकाश पूर्वी दाखविलाच आहे; चिचाय चिचयिथ लुलाव लुलविथ येथें दोहोंची प्राप्ति येत आहे. तसेंच आकारलोपाला (६।४।६४) गोदः कम्बलदः येथें अवकाश आहे, व द्वित्वाला अवकाश पूर्वी दाखविलाच आहे; आणि ययतुः ययुः, तस्थतुः तस्थुः येथें दोहोंची प्राप्ति येत आहे. तसेंच उपधालोपाला (६।४।९८) पित्तघ्नम् श्लेष्मघ्नम् येथें अवकाश आहे, व द्वित्वाला अवकाश पूर्वी दाखविलाच आहे; आणि जग्मतुः जग्मुः जघ्नतुः जघ्नुः येथें दोहोंची प्राप्ति येत आहे. तसेंच णिलोपाला (६।४।५१) कारणा हारणा[५] येथें अवकाश आहे, व द्वित्वाला अवकाश पूर्वी दाखविलाच आहे; आणि आटिटत् आशिशत् येथें दोहोंचीहि प्राप्ति येत आहे. तसेंच उत्त्वाला (७।१।१०२)

---

५. कृ व हृ या धातूंहून णिच् प्रत्यय करून पुढें युच् प्रत्यय (३।३।१०७) केला आहे.

स्यावकाशः । निपूर्ताः पिण्डाः । द्विर्वचनस्य स एव । इहोभयं प्राप्नोति । मित्रावरुणौ ततुरिः । दूरे ह्यध्वा जगुरिः ॥ द्विर्वचनं भवति पूर्वविप्रतिषेधेन ॥ स तर्हि पूर्वविप्रतिषेधो वक्तव्यः । न वक्तव्यः । इष्टवाची परशब्दः । विप्रतिषेधे परं यदिष्टं तद्भवतीति ॥

**द्विर्वचनात्प्रसारणात्त्वधात्वादिविकाररीत्वेत्त्वेत्त्वोत्त्वगुणवृद्धिविधयः ॥ १० ॥**

द्विर्वचनात्प्रसारणात्त्वधात्वादिविकाररीत्वेत्त्वेत्त्वोत्त्वगुणवृद्धिविधयो भवन्ति विप्रतिषेधेन ॥ द्विर्वचनस्यावकाशः । बिभिदतुः बिभिदुः । संप्रसारणस्यावकाशः । इष्टम् सुप्तम् । इहोभयं प्राप्नोति । ईजतुः ईजुरिति । नैतदस्ति प्रयोजनम् । अस्त्वत्र द्विर्वचनं द्विर्वचने कृते परस्य रूपस्य कितीति भविष्यति पूर्वस्य लिट्यभ्यासस्योभयेषाम् [ ६. १. १७ ] इति । इदं तर्हि । सोषुप्यते ॥ इदं

निपूर्ताः पिण्डाः येथें अवकाश आहे, व द्वित्वाला अवकाश पूर्वी दाखविलाच आहे; आणि 'मित्रावरुणौ ततुरिः' 'दूरे ह्यध्वा जगुरिः' येथें दोहोंची प्राप्ति येत आहे. ह्या सर्व ठिकाणीं पूर्वविप्रतिषेधाने द्विर्वचन प्रथमतः होतें.

तर मग तसें पूर्वविप्रतिषेधाचें वचन केलें पाहिजे.

वचन करावयास नको. कारण 'विप्रतिषेधे परं कार्यम्' (१।४।२) येथील पर हा शब्द इष्ट या अर्थाचा आहे. त्यामुळें विप्रतिषेध असतां जें पर म्ह० इष्ट असेल तें शास्त्र करावें, असा अर्थ होत असल्यामुळें सर्व सिद्ध होत आहे.

(वा. १०) संप्रसारण आत्व धात्वादिविकार रीङ् ईत्व इत्व उत्व गुण आणि वृद्धि हे विधी द्विर्वचनापेक्षां विप्रतिषेधानें होतात. द्विर्वचनाला बिभिदतुः बिभिदुः इत्यादि स्थलीं अवकाश आहे. तसेंच संप्रसारणाला (६।१।१५) इष्टम्, सुप्तम् येथें अवकाश आहे; आणि ईजतुः ईजुः येथें दोहोंची प्राप्ति येत आहे.

हा दोष येत नाहीं. येथें द्विर्वचन प्रथमतः झालें तरी होऊं दे. द्वित्व केलें असतां उत्तर खंडाला 'वचिस्वपि०' यानें संप्रसारण होईल व पूर्व खंडाला 'लिट्यभ्यासस्यो०' (६।१।१७) यानें संप्रसारण झाल्यामुळें दोष येत नाहीं.

तर मग सोषुप्यते हें उदाहरण समजावें.

६. निपूर्ताः येथें नि उपसर्गपूर्वक पॄ धातूहून क्त प्रत्यय, ऋकाराला उत्व आणि त्या उकाराला दीर्घ (८।२।७७) झाला आहे.

७. तॄ व गॄ या धातूंहून कि प्रत्यय किंवा किन् प्रत्यय (३।२।१७१) करून तो लिटासारखा समजला असल्यामुळें द्वित्व झाल्यानंतर उत्तर खंडांतील ऋकाराला उत्व रपर असें (१।१।५१) झालें आहे. पूर्व खंडाला अभ्यास-कार्यें झालीं आहेत.

८. विप्रतिषेधे परं कार्यम् येथें पर शब्द इष्ट या अर्थाचा घेऊन यण् वगैरे कार्यापेक्षां जसें द्वित्व अगोदर केलें जातें तसें संप्रसारण वगैरे कार्यापेक्षांही तें अगोदर होतें की काय ही शंका दूर करण्याकरितां येथून तीं संप्रसारण वगैरे कार्यें भाष्यकार दाखवीत आहेत. येथें यज् धातूहून लिट् प्रथमपुरुष द्विवचन व बहुवचन प्रत्यय पुढें ठेवले असतां संप्रसारण केल्यानंतर द्वित्व झालें आहे.

९ येथें स्वप् धातूहून यङ् प्रत्यय केला आहे. 'स्वपिस्यमि०' (६।१।१९) यानें येथें संप्रसारण झालें आहे. लिट् पुढें नसल्यामुळें अभ्यासाला येथें संप्रसारणाची प्राप्ति येत नाहीं.

चाप्युदाहरणम् ईजतुः ईजुरिति। ननु चोक्तमस्त्वत्र द्विर्वचनं द्विर्वचने कृते परस्य रूपस्य कितीति भविष्यति पूर्वस्य लिट्यभ्यासस्योभयेषामिति। न सिध्यति। न संप्रसारणे संप्रसारणम् [३७] इति प्रतिषेधः प्राप्नोति। अकारेण व्यवहितत्वान्न भविष्यति। एकादेशे कृते नास्ति व्यवधानम्। एकादेशः पूर्वविधौ स्थानिवद्भवतीति स्थानिवद्भावाद्व्यवधानमेव। एवं तर्हि समानाङ्गग्रहणं तत्र चोदयिष्यति॥ आत्त्वस्यावकाशः। ग्लाता म्लाता। द्विर्वचनस्य स एव। इहोभयं प्राप्नोति। जग्ले मम्ले॥ धात्वादिविकाराणामवकाशः। नमति सिञ्चति। द्विर्वचनस्य स एव। इहोभयं प्राप्नोति। ननाम सिषेच सस्नौ॥ रीत्वस्यावकाशः। मात्रीयति पित्रीयति। द्विर्वचनस्य स एव। इहोभयं प्राप्नोति। चेक्रीयते जेह्रीयते॥ ईत्त्वस्यावकाशः। पीयते गीयते। द्विर्वचनस्य स एव। इहोभयं प्राप्नोति। पेपीयते जेगीयते॥

---

ईजतुः ईजुः हेंही पूर्वविप्रतिषेधाचें उदाहरण होत आहे.

पण येथें पूर्वी द्विर्वचन झालें तरी दोष नाहीं असें म्हटलें आहे ना?

तें बरोबर नाहीं. कारण उत्तर खंडाला (संप्रसारण) केले असतां पूर्व खंडाला 'न संप्रसारणे०' (६।१।३७) यानें निषेध प्राप्त होत आहे.

पण अभ्यासांतील अकारानें व्यवधान असल्यामुळें निषेध येणार नाहीं.

आतां य इज् अतुस् असें असतां अकार व इकार यांचा एकादेश गुण (६।१।८७) झाला म्हणजे व्यवधान नाहीं असेंही म्हणतां येत नाहीं. कारण पूर्वविधि कर्तव्य असतांना स्थानिवद्भाव (१।१।५७) होत असल्यामुळें व्यवधान कायमच राहणार आहे.

तर मग तेथें 'समानाङ्गग्रहण' करावें (६।१ ३७ वा. २) असें सांगणार आहे.

आत्वाला (६।१।४५) ग्लाता म्लाता येथें अवकाश आहे, व द्वित्वाला अवकाश पूर्वी दाखविलाच आहे; पण जग्ले व मम्ले येथें दोहोंची प्राप्ति येत आहे. तसेंच धात्वादि विकारांना (६।४।६४,६५) नमति सिञ्चति येथें अवकाश आहे, व द्वित्वाला अवकाश पूर्वी दाखविलाच आहे; पण ननाम सिषेच सस्नौ येथें दोहोंची प्राप्ति येत आहे. तसेंच रीङ् आदेशाला (७।४।२७) मात्रीयति पित्रीयति येथें अवकाश आहे, व द्वित्वाला अवकाश पूर्वी दाखविलाच आहे; पण चेक्रीयते[११] जेह्रीयते येथें दोहोंची प्राप्ति येत आहे. ईत्त्वाला (६।४।६६) पीयते गीयते येथें अवकाश आहे, व द्वित्वाला अवकाश पूर्वी दाखविलाच आहे; पण पेपीयते[१२] जेगीयते येथें दोहोंची प्राप्ति येत आहे. तसेंच

---

१०. 'न संप्रसारणे०' या निषेधाचे निमित्त जें संप्रसारण आणि ज्या यणाला संप्रसारणाचा निषेध करावयाचा तो निमित्ती यण् हे दोन्ही एका अंगांत असले म्हणजे तो निषेध प्रवृत्त होतो. अव्यवहित असेंच संप्रसारण पुढें पाहिजे असा आग्रह नाहीं, असा 'न संप्रसारणे०' याचा अर्थ आहे.

११. कृ व ह्री या धातूंहून यङ् प्रत्यय केल्यावर ऋकाराला रीङ् आदेश झाल्यानंतर द्वित्व झालें आहे.

१२. पा व गा या धातूंहून यङ् प्रत्यय केल्यानंतर आकाराला ईत्व झाल्यानंतर द्वित्व झालें आहे.

ह्रस्वोत्त्वयोरवकाशः। आस्तीर्णम् निपूर्ताः। द्विर्वचनस्य स एव। इहोभयं प्राप्नोति। आतेस्तीर्यते निपोपूर्यते ॥ गुणवृद्ध्योरवकाशः। चेता गौः। द्विर्वचनस्य स एव। इहोभयं प्राप्नोति। चिचाय चिचयिथ। लुलाव लुलविथ। नैतदस्ति प्रयोजनम्। अस्त्वत्र द्विर्वचनं द्विर्वचने कृते परस्य रूपस्य गुणवृद्धी भविष्यतः। इदं तर्हि। इयाय इययिथ। ननु चात्राप्यस्तु द्विर्वचनं द्विर्वचने कृते परस्य रूपस्य गुणवृद्धी भविष्यतः। न सिध्यति। अन्तरङ्गत्वात्सवर्णदीर्घत्वं प्राप्नोति। वार्णादाङ्गं बलीय इति गुणवृद्धी भविष्यतः। किं वक्तव्यमेतत्। न हि। कथमनुच्यमानं गंस्यते। आचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयति वार्णादाङ्गं बलीयो भवतीति यदयमभ्यासस्यासवर्णे [ ६. ४. ७८ ] इत्यसवर्णग्रहणं करोति। कथं कृत्वा ज्ञापकम्। न ह्यन्तरेण गुणवृद्धी असवर्णपरोऽभ्यासो भवति ॥ नैतदस्ति ज्ञापकम्। अस्त्यर्थमेत-

---

इत्त्वाला ( ७।१।१०० ) व उत्त्वाला ( ७।१०१) आस्तीर्णम् निपूर्तम् येथें अवकाश आहे, व द्वित्वाला अवकाश पूर्वीं दाखविलाच आहे; पण आतेस्तीर्यते निपोपूर्यते[13] येथें दोहोंची प्राप्ति येत आहे. तसेंच गुण ( ७।३।८४ ) व वृद्धि ( ७।२।११५ ) यांना चेता व गौः येथें अवकाश आहे, व द्वित्वाला अवकाश पूर्वीं दाखविलाच आहे; पण चिचाय चिचयिथ लुलाव लुलविथ येथें दोहोंची प्राप्ति येत आहे.[14]

चिचाय लुलविथ वगैरे स्थलें विप्रतिषेधाचें प्रयोजन होऊं शकत नाहींत. कारण तेथें द्विर्वचन प्रथमतः झालें तरी हरकत नाहीं. द्वित्व केल्यानंतर उत्तर खंडाला गुण व वृद्धि झाल्यानें रूपें साधत आहेत.

तर मग इयाय इययिथ इत्यादि ठिकाणीं प्रयोजन समजावें.

पण येथेंही द्वित्व पूर्वीं केलें असतां उत्तर भागाला गुण व वृद्धि होतील.

गुण व वृद्धि होणार नाहींत, कारण इ इ अ, इ इ इथ या अवस्थेंत गुण व वृद्धि यांपेक्षां अंतरंग असल्यामुळें सवर्णदीर्घ ( ६।१।१०१ ) प्राप्त होत आहे.

परंतु 'वार्णादाङ्गं बलीयः' म्ह. वर्णाश्रय कार्यापेक्षां अंगाधिकारस्थ कार्य बलवत्तर असल्यामुळें सवर्ण दीर्घाला मागें सारून प्रथमतः गुण व वृद्धि होतील.

पण तसें वचन केलें पाहिजे कीं काय ?

वचन करावयास नको.

तर मग वार्णादाङ्गं बलीयः हें कसें बरें समजलें जाईल ?

आचार्योनीं जे 'अभ्यासस्यासवर्णे' येथें असवर्णे असें म्हणून असवर्ण अच् पुढें असतांना अभ्यासाला इयङ् व उवङ् सांगितले आहेत त्यावरूनच त्यांनीं वार्ण कार्यापेक्षां अंगकार्य प्रबल आहे असें सुचविलें आहे.

हें ज्ञापक कसें बरें जमतें ?

असें जमतें कीं गुण व वृद्धि पूर्वीं केल्यावाचून असवर्ण अच् पुढें असलेला असा अभ्यास संभवतच नाहीं.[15]

हें ज्ञापक येत नाहीं. कारण ऋ धातूच्या उदा-

---

१३. स्तॄ व पॄ या धातूंहून यङ् प्रत्यय केल्यानंतर ऋकाराला इत्व व उत्व केल्यावर द्वित्व झालें आहे.

१४. तेव्हां हीं संप्रसारण वगैरे सर्व कार्ये विप्रतिषेधामुळें द्वित्वापेक्षां पूर्वीं होतात असें म्हटलें पाहिजे.

१५. आणि 'वार्णादाङ्गं बलीयः' ही परिभाषा घेतल्याशिवाय सवर्ण दीर्घाच्या पूर्वीं गुण व वृद्धि होणार नाहीत. तेव्हां अर्थातच अभ्यासस्यासवर्णे हें सूत्र त्या परिभाषेचें ज्ञापक होत आहे.

स्यात्। इयृतः इयृथः। यत्तर्हि दीर्घ इणः किति [७. ४. ६९] इति दीर्घत्वं शास्ति। एतस्याप्यस्ति वचने प्रयोजनम्। किम्। सवर्णदीर्घबाधनार्थमेतत्स्यात्। स यथैव तर्हि सवर्णदीर्घत्वं बाधत एवं यणादेशमपि बाधेत। एवं तर्हि यणादेशे योगविभागः करिष्यते। इदमस्ति इणो यणभवति। तत एरनेकाचः। एश्चानेकाच इणो यणभवति। ततोऽसंयोगपूर्वस्य। एरनेकाच इत्येव॥ असवर्णग्रहणमेव तर्हि ज्ञापकम्। ननु चोक्तमर्त्यर्थमेतत्स्यादिति। नैकमुदाहरणमसवर्णग्रहणं प्रयोजयति॥ एवमपि

---

हरणामध्यें इयङ् होण्याकरितां सूत्राची जरूर आहेच. उदा. इयृतः[१६] इयृथः उत्तीर्ण उत्तीर्णिय.

तर मग 'दीर्घ इणः किति' (७।४।६९) यानें केलेले जे दीर्घविधान तें ज्ञापक होईल[१७].

पण या दीर्घ विधानाचें प्रयोजन आहे.

तें काय?

हा दीर्घ सवर्ण दीर्घाचा अपवाद म्हणूनच बाध करील[१८]. इतकेंच नव्हे पण जसा हा दीर्घ नाप्राप्त अशा सवर्ण दीर्घाचा बाधक आहे तसा यणादेशाचाही बाधक होईल[१९].

असें आहे तर यणादेशविधायक सूत्रामध्यें योगविभाग करण्यांत येईल. तो असा– इणो यण् (६।४।८१) इण् धातूला यण् होतो. त्याचे पुढें 'एरनेकाचः' एवढेंच सूत्र समजावें. इण् धातूच्या अनेकाच् अंगांतील शेवटच्या इकाराला यण् होतो. त्यापुढें 'असंयोगपूर्वस्य' हें सूत्र होय. येथें एरनेकाचः हें अनुवृत्त आहे.

तर मग असवर्ण अच् पुढें असतां इयङ् व उवङ् सांगणारें सूत्रच ज्ञापक समजावें.

पण तें ऋ धातूकरितां पाहिजे असें म्हटलें आहे ना?

एक ऋ धातूच फक्त मनांत धरून त्याकरितां सूत्रकार 'अभ्यासस्यासवर्णे' असें सामान्य सूत्र कधींही करणार नाहींत[२१].

---

१६. तिसऱ्या गणांतील ऋ धातूहून लट्, तस्, शप्, श्लु (२।४।७५) द्वित्व (६।१।१०) आणि अभ्यासऋकाराला इत्व (७।४।७७) झाल्यानंतर इ ऋ तस् अशी स्थिति असतां गुणवृद्धीवाचून असवर्ण अच् पुढें असलेला अभ्यासाचा इकार संभवतो. तसेंच ओण् धातूहून लिट् तिप् णल् द्वित्व आणि अभ्यासाला ऱ्हस्व केल्यानंतर असवर्ण अच् पुढें असलेला अभ्यासाचा उकार संभवतो. अमन्त्रे (३।१।३५) असें म्हटलें असल्यामुळें उवोण येथें आम् झाला नाहीं.

१७. ईयतुः येथें इ इ अतुस् अशी स्थिति असतां 'वार्णादाङ्गं बलीयः' या परिभाषेनें सवर्णदीर्घाचा बाध करून 'इणो यण्' (६।४।८१) यानें उत्तरखंडी यण् केला तरच अभ्यासाला दीर्घ सांगणाऱ्या या सूत्राला उदाहरण मिळणार आहे. तेव्हां अर्थातच हें सूत्र त्या परिभाषेला ज्ञापक होईल.

१८. तेव्हां 'वार्णादाङ्गं बलीयः' ही परिभाषा घेतल्याशिवायच ह्या सूत्राला उदाहरण मिळत आहे म्हणून हें ज्ञापक होत नाही.

१९. तेव्हां ज्ञापक तर होत नाहींच, पण उलट ईयतुः हें उदाहरण साधत नाहीं हा दोष येत आहे.

२०. ईयतुः इत्यादि उदाहरणांमध्यें 'इणो यण्' याचा 'दीर्घ इणः किति' यानें बाध केला गेल्यामुळें तेथें यण् होण्याकरितां हें मुद्दाम निराळें यणाचें विधान केलें आहे.

२१. उः एवढेंच सूत्र केलें तरी ऋ धातूचीं उदाहरणें साधतील. तेव्हां सामान्य सूत्र हें त्या परिभाषेचें ज्ञापक होणारच आहे. उः ही ऋ या वर्णाची षष्ठी आहे. एकंदरीत इयाय इययिथ येथें विप्रतिषेधानें

स्थानिवद्भावादियङ् न प्राप्नोति । अथ सत्यपि विप्रतिषेधे यावता स्थानिवद्भावः कथमेवैतत्सिध्यति । योऽनादिष्टादचः पूर्वस्तस्य विधिं प्रति स्थानिवद्भाव आदिष्टाच्चैषो ऽचः पूर्वो भवति ॥

इति श्रीभगवत्पतञ्जलिविरचिते व्याकरणमहाभाष्ये षष्ठस्याध्यायस्य प्रथमे पादे प्रथममाह्निकम् ॥

---

तरी पण[22] प्रथमतः द्वित्व करून मागून गुण अथवा वृद्धि केली तर उत्तर खंडीं गुणाला अथवा वृद्धीला स्थानिवद्भाव ( १।१।५७ ) झाल्यानें असवर्ण अच् पुढें नसल्यामुळें अभ्यासाला इयङादेश प्राप्त होत नाहीं.

पण आतां जर स्थानिवद्भावच होणार तर विप्रतिषेध घेतला तरी तो होणारच. तेव्हां हीं रूपें कशीं बरें साधावीं ?

विप्रतिषेधानें द्वित्वाच्या पूर्वी गुण अथवा वृद्धि झाली असतां मात्र स्थानिवद्भाव होत नाहीं. कारण, अनादिष्ट अचाहून जो पूर्व त्याला कार्य कर्तव्य असतांना स्थानिवद्भाव होतो असें सांगितलें आहे. आणि हा तर अभ्यास आदिष्ट अचाहून पूर्व आहे.[23]

याप्रमाणें भगवान् पतंजलींनीं रचिलेल्या व्याकरणमहाभाष्यांतील सहाव्या अध्यायाच्या पहिल्या पादांतील पहिलें आह्निक समाप्त झालें.

---

द्वित्वाचें पूर्वी गुण अथवा वृद्धि केली नाहीं तरी द्वित्व झाल्यानंतर सवर्णदीर्घाचा ' वार्णादाङ्गं बलीयः ' या परिभाषेनें बाध झाल्यावर उत्तरखंडीं गुण अथवा वृद्धि केली असतां हीं रूपें साधतील. म्हणून विप्रतिषेधाची जरूर नाहीं, असें सिद्ध होतें.

२२. इयाय इययिथ येथें द्वित्वाच्या पूर्वींच गुण अथवा वृद्धि झाली पाहिजे असें येथून सूत्रकार दाखवीत आहेत.

२३. ज्या आदेशाला स्थानिवद्भाव करावयाचा तो आदेश करण्यापूर्वी त्याच्या स्थानीच्या मागें जो भाग असेल त्यांतील कोणाला तरी कार्य कर्तव्य असतांना स्थानिवद्भाव होतो. गुण अथवा वृद्धि ही द्वित्वाच्या पूर्वींच जर झाली तर त्या वेळीं मागें अभ्यास हा भाग मुळींच नसतो. तेव्हां अर्थातच स्थानिवद्भावाची प्राप्तीच येत नाहीं.

अध्याय ६ पाद १ आह्निक १ समाप्त.

**ष्यङः संप्रसारणं पुत्रपत्योस्तत्पुरुषे ॥ ६ । १ । १३ ॥**

**ष्यङः संप्रसारणे पुत्रपत्योस्तदादावतिप्रसङ्गः ॥ १ ॥**

ष्यङः संप्रसारणे पुत्रपत्योस्तदादावतिप्रसङ्गो भवति । पुत्रपत्यादौ संप्रसारणं प्राप्नोति । कारीषगन्ध्यापुत्रकुलम् कारीषगन्ध्यापतिकुलम् ॥ वर्णग्रहणात्सिद्धम् । वर्णग्रहण एतद्भवति यस्मिन्विधिस्तदादाविति न चेदं वर्णग्रहणम् ॥

**वर्णग्रहण इति चेत्तदन्तप्रातिषेधः ॥२॥**

वर्णग्रहण इति चेत्तदन्तस्य प्रतिषेधो वक्तव्यः । पुत्रपत्यन्ते संप्रसारणं प्राप्नोति । कारीषगन्ध्यापरमपुत्रः कारीषगन्ध्यापरमपतिः । कौमुदगन्ध्यापरमपुत्रः कौमुदगन्ध्यापरमपतिः । किं कारणम् । यत्र हि तदादिविधिर्नास्ति तदन्तविधिना तत्र भवितव्यम् ॥

**सिद्धं तूत्तरपदवचनात् ॥ ३ ॥**

सिद्धमेतत् । कथम् । उत्तरपदवचनात् । पुत्रपत्योरुत्तरपदयोरिति वक्तव्यम् ॥ तत्तर्हि वक्तव्यम् । न वक्तव्यम् । पूर्वपदमुत्तरपदमिति संबन्धिशब्दावेतौ ।

---

( सू. १३ वा. १ ) पुत्र व पति शब्द पुढें असतांना ष्यङन्ताला सांगितलेल्या संप्रसारणाविषयीं अतिप्रसंग येतो म्हणजे पुत्र किंवा पति हे शब्द आरंभीं असलेला असा पुत्र कुल वगैरे सामासिक शब्द उत्तरपद पुढें असतांही संप्रसारण प्रसक्त होतें उदा. कारीषगन्ध्यापुत्रकुलम्[२] कारीषगन्ध्यापतिकुलम्.

वर्णग्रहणामुळें ही गोष्ट सिद्ध होईल. म्हणजे वर्णग्रहण असतां ' यस्मिन्विधिस्तदादौ० ' ( १।१।७२ वा. २९ ) या परिभाषेनें तदादि विधि सांगितला आहे; पण येथें ' पुत्रपत्योः ' हें वर्णग्रहण नव्हे. तर समुदायग्रहण आहे.

(वा. २) शिवाय , वर्णग्रहणाविषयीं तदादिविधि प्रवृत्त होतो असें म्हटलें तर कारीषगन्ध्यापरमपुत्रः कारीषगन्ध्यापरमपतिः कौमुदगन्ध्यापरमपुत्रः कौमुदगन्ध्यापरमपतिः येथें पुत्र किंवा पति हे शब्द शेवटीं असलेला परमपुत्र वगैरे सामासिक शब्द उत्तरपद पुढें असतांना ष्यङन्ताला संप्रसारण प्राप्त होतें.

तें काय म्हणून ?

कारण, जेथें तदन्त-विधीचा ( १।१।७२ ) अपवाद अशा तदादि-विधीची प्रवृत्ति होत नाहीं अशा ठिकाणीं अर्थात् तदन्त विधि होणें योग्यच असतें.

( वा. ३ ) हे सिद्ध होत आहे.

तें कसें ?

उत्तरपदवचनात् म्हणजे ' पुत्रपत्योरुत्तरपदयोः ' ( पुत्र किंवा पति शब्द उत्तरपद असतांना ) असें म्हणावें.

तर मग उत्तरपदवचन करावयास पाहिजे.

तसें वचन करावयास नको. कारण पूर्वपद व उत्तरपद हे संबन्धि-शब्द आहेत. पूर्वपद अस-

---

१. ( सू. १३ ) तत्पुरुष समासामध्यें पुत्र किंवा पति शब्द उत्तरपद पुढें असतांना ष्यङ्प्रत्ययान्त पूर्वपदांतील ष्यङ् प्रत्ययाच्या यकाराला संप्रसारण होतें.

२. पुत्रस्य कुलं पुत्रकुलम् हा समास अगोदर करून नंतर कारीषगन्ध्या शब्दाचा त्या पुत्रकुल शब्दाबरोबर समास केला आहे. जर कारीषगन्ध्या शब्दाचा पुत्र शब्दाबरोबर समास करून नंतर त्याचा कुलशब्दाबरोबर समास केला तर तेथें कारीषगन्धीपुत्रकुलम् असें संप्रसारण होतेंच. करीषगन्धशब्दाहून त्याचें अपत्य ( कन्या ) या अर्थीं इञ् प्रत्यय ( ४।१।९५ ) होऊन त्याचे स्थानीं ष्यङ् प्रत्यय ( ४।१।७८ ) आदेश व त्याच्या पुढें चाप् प्रत्यय ( ४।१।७४ ) झाला आहे.

सति पूर्वपद उत्तरपदं भवति सति चोत्तरपदे पूर्वपदमिति न चात्र पुत्रपती उत्तरपदे ॥ इहापि तर्हि न प्राप्नोति । कारीषगन्धीपुत्रः कारीषगन्धीपतिरिति । किं कारणम् । पूर्वपदमित्युच्यते न ह्यत्र ष्यङ् पूर्वपदमस्ति । ष्यङन्तमेतत्पूर्वपदम् । कथम् । प्रत्ययग्रहणे यस्मात्स तदादेर्ग्रहणं भवतीति ॥ यदि प्रत्ययग्रहणे यस्मात्स तदादेर्ग्रहणं भवतीत्युच्यते परमकारीषगन्धीपुत्रः परमकारीषगन्धीपतिरिति न सिध्यति । प्रत्ययग्रहणे यस्मात्स तदादेर्ग्रहणं भवत्यस्त्रीप्रत्ययेनेति ॥ यद्यस्त्रीप्रत्ययेनेत्युच्यते अतिक्रान्तः कारीषगन्ध्यामतिकारीषगन्ध्यः तस्य पुत्रोऽतिकारीषगन्ध्यपुत्रः अतिकारीषगन्ध्यपति-

---

तांनाच उत्तरपद असें म्हणतां येतें, व उत्तरपद असतांनाच पूर्वपद असें म्हणता येतें.[3] तेव्हां कारीषगन्ध्यापरमपुत्रः इत्यादिस्थलीं पुत्र व पति हे शब्द उत्तरपदभूत नसल्यामुळें संप्रसारण होणार नाहीं.

तर मग कारीषगन्धीपुत्रः कारीषगन्धीपतिः येथेंहीं संप्रसारण होणार नाहीं.

काय कारण ?

कारण असें कीं सूत्रामध्यें ष्यङः असें उच्चारलें असल्यामुळें त्या ष्याशींच पूर्वपदाचा संबंध होईल. आणि येथे तर ष्यङ् हा पूर्वपद नाहीं.

तरी पण ष्यङन्त हें पूर्वपद आहे.

ष्यङन्त हा अर्थ कसा होतो ?

प्रत्ययग्रहण केलें असतां तेथें तो प्रत्यय शेवटीं असलेला व तो प्रत्यय ज्या प्रकृतीहून केला असेल ती प्रकृति आदि असलेला असा समुदाय घ्यावयाचा ( १।४।१३ वा. ७ ) असतो. त्यामुळें ष्यङन्त पूर्वपदाला असा अर्थ होतो.

आतां प्रत्यय ज्याहून केला तदादि तदन्त समुदाय घ्यावयाचा असें म्हटलें तर परमकारीषगन्धीपुत्रः परमकारीषगन्धीपतिः हीं उदाहरणें साधत नाहींत.[4]

प्रत्यय-ग्रहण असतां तेथें तो प्रत्यय ज्याहून केला तदादि समुदाय घ्यावयाचा हा नियम ' स्त्रीप्रत्ययाशिवाय इतर ठिकाणीं ' समजावयाचा आहे.[5]

पण तसें म्हटलें तर कारीषगन्ध्याम् अतिक्रान्तः अतिकारीषगन्ध्यः तस्य पुत्रः अतिकारीषगन्ध्यपुत्रः अतिकारीषगन्ध्यपतिः इत्यादि स्थलींहीं संप्रसारण होऊं लागेल.

तर मग ' स्त्रीप्रत्ययाशिवाय इतर ठिकाणीं'

---

३. येथें सूत्रामध्यें तत्पुरुषे असें म्हटलें असल्यामुळें पूर्वपद व उत्तरपद यांचा आक्षेप होतो. पूर्वपदाचा आक्षेप झाल्यामुळें कारीषगन्ध्याबन्धु शब्दाचा पुत्र शब्दाशी तत्पुरुष समास केला असतां त्या तत्पुरुष समासामध्यें कारीषगन्ध्या हें ष्यङन्त पूर्वपद नसल्यामुळें संप्रसारण होत नाहीं. त्या पूर्वपदामुळें उत्तरपदाचा आक्षेप झाल्यमुळें आणि त्या उत्तरपदाचा अर्थातच पुत्र अथवा पति शब्दाशीं संबंध झाल्यामुळें जेथें परमपुत्र वगैरे उत्तरपद असेल तेथें संप्रसारण होणार नाहीं.

४. कारण येथें ष्यङ् प्रत्यय कारीषगन्ध या प्रकृतीहून केला असल्यामुळे कारीषगन्ध्या एवढ्यालाच ष्यङन्त म्हणतां येतें; आणि येथें तर पूर्वपदामध्यें परम हा शब्द ज्यास्त आहे.

५. तेव्हां येथें ष्यङ् हा स्त्रीप्रत्यय असल्यामुळें तदादिनियम घेतां येत नाहीं, म्हणजे तो ष्यङ् प्रत्यय ज्या प्रकृतीहून केला जातो त्या प्रकृतीला आरंभ करूनच तो समुदाय घ्यावयाचा असें नाहीं. म्हणून परमकारीषगन्ध्या एवढ्या समुदायालाही ष्यङन्त असें म्हणतां येतें.

रित्यत्रापि प्राप्नोति । अस्त्रीप्रत्ययेनानुपसर्जनेन । यो ह्युपसर्जनं स्त्रीप्रत्ययो भवत्येषा तत्र परिभाषा प्रत्ययग्रहणे यस्मात्स तदादेर्ग्रहणं भवतीति ॥

ष्यङन्ते यावन्तो यणस्तेषां सर्वेषां संप्रसारणं प्राप्नोति । वाराहीपुत्रः तार्णकर्णीपुत्रः । तत्राप्रत्ययस्थस्य प्रतिषेधो वक्तव्यः ।

**यथागृहीतस्यादेशवचनादप्रत्ययस्थे सिद्धम् ॥ ४ ॥**

निर्दिश्यमानस्यादेशा भवन्तीत्येवमप्रत्ययस्थस्य न भविष्यति ॥

**अन्यन्त्यविकारे ऽन्त्यसदेशस्य वा ॥ ५ ॥**

अथवानन्त्यविकारे ऽन्त्यसदेशस्य कार्यं भवतीत्येषा परिभाषा कर्तव्या ॥ कः पुनरत्र विशेष एषा वा परिभाषा क्रियेताप्रत्ययस्थस्य वा प्रतिषेध उच्येत । अवश्यमेषा परिभाषा कर्तव्या । बहून्येतस्याः परिभाषायाः प्रयोजनानि । कानि ।

**प्रयोजनं न संप्रसारणे संप्रसारणम् ॥ ६ ॥**

न संप्रसारणे संप्रसारणम् । [ ६. १. ३७ ] इत्येतन्न वक्तव्यं भवति । कथं व्यधे-

---

येथील स्त्रीप्रत्ययपदानें अनुपसर्जन[६] स्त्रीप्रत्यय घ्यावयाचा आहे. तेव्हां जो स्त्रीप्रत्यय विशेषण असेल तेथें तेवढ्यापुरता तदादिनियम कायमच राहाणार आहे.

आता ष्यङन्त पूर्वपदामध्यें जितके यण् असतील त्या सर्वांना संप्रसारण प्राप्त होत आहे. जसें—वाराहीपुत्रः[७] तार्णकर्णीपुत्रः. येथें त्या ष्यङ् प्रत्ययामध्यें नसलेल्या यणाला संप्रसारणाचा निषेध सांगितला पाहिजे.

(वा. ४) सूत्रामध्यें गृहीताला म्ह० निर्दिश्यमानाला आदेश होतात ( ६।४।१३० वा. ३ ) असें वचन असल्यामुळें प्रत्ययामध्यें नसलेल्या यणाला संप्रसारण होणार नाहीं.

(वा. ५) किंवा जें कार्य अनन्त्य अशा अनेकांना प्राप्त होतें तें अन्त्याच्या जवळच्याला करावें अशी परिभाषा करावी.

पण ही परिभाषा केली काय आणि 'प्रत्ययांत नसलेल्या यणाला संप्रसारण होत नाहीं' असें वचन केलें काय यांत काय बरें विशेष आहे ?

ही परिभाषा तर अवश्य केलीच पाहिजे. कारण या परिभाषेचीं पुष्कळ उदाहरणें आहेत.

तीं उदाहरणें कोणतीं ?

( वा. ६ ) 'न संप्रसारणे संप्रसारणम्' हें सूत्र करावयास नको.

तर मग व्यध् धातूपासून विद्ध हा शब्द कसा सिद्ध होईल ?

---

६. उपसर्जन म्ह० विशेषण. ष्यङ् प्रत्ययाचा अर्थ जोंपर्यंत दुसऱ्याला विशेषण झाला नाहीं तोंपर्यंत त्याला कितीही विशेषणें लागलीं तरी तीं सर्व ष्यङन्त समुदायामध्यें घेतां येतील. पण तो ष्यङ् प्रत्ययाचा अर्थ विशेषण झाला असेल तर मात्र जें त्याचें विशेष्य असेल तें ष्यङन्त समुदायामध्यें घेतां येत नाहीं. तेव्हां अतिकारीषगन्ध्य हें जें पूर्वपद तें ष्यङन्त नाहीं म्हणून संप्रसारण होत नाहीं.

७. वराह व तृणकर्ण या शब्दांहून गोत्रापत्य-स्त्री या अर्थी इञ् प्रत्यय ( ४।१।९५ ) व त्याला ष्यङ् प्रत्यय आदेश ( ४।१।७८ ) व पुढें चाप् प्रत्यय झाला आहे. त्याचा पुत्र शब्दाशीं तत्पुरुष समास केल्यानंतर 'ष्यङः संप्रसारणं०' ( ६।१।१३ ) या प्रकृत सूत्रानें संप्रसारण होऊन वाराहीपुत्रः तार्णकर्णीपुत्रः अशीं रूपें होतात. येथें वकार व रेफ यांनाही संप्रसारण होऊं लागेल.

र्विद्ध इति । अनन्त्यविकारेऽन्त्यसदेशस्य कार्यं भवतीति न दोषो भवति ॥ नैतदस्ति प्रयोजनम् । क्रियते न्यास एव ॥

## सान्तमहतो दीर्घत्वे ॥ ७ ॥

सान्तमहतो दीर्घत्वे प्रयोजनम् । पयांसि यशांसि । प इत्यस्यापि प्राप्नोति । अनन्त्यविकारेऽन्त्यसदेशस्य कार्यं भवतीति न दोषो भवति । एतदपि नास्ति प्रयोजनम् । नोपधायाः [ ६. ४. ७ ] इति तत्र वर्तते । एवमप्यनांसि मनांसीत्यत्रापि प्राप्नोति । नैष दोषः । सान्तसंयोगेन नोपधां विशेषयिष्यामः । सान्तसंयोगस्य नोपधाया इति ॥ एवमपि हंसशिरांसि ध्वंसशिरांसीत्यत्रापि प्राप्नोति । नैष दोषः । हम्मतेर्हंसः । कः पुनराह हम्मतेर्हंस इति । किं तर्हि । हन्तेर्हंसः । हन्त्यध्वानमिति । एवं तर्हि सर्वनामस्थान इति वर्तते सर्वनामस्थानपरतया सान्तसंयोगं विशेषयिष्यामः सान्तसंयोगेन

---

'अनन्त्य अशा अनेकांना प्राप्त झालेलें कार्य अन्त्याच्या जवळच्याला करावें' या परिभाषेनें येथें दोष येत नाहीं.

हें प्रयोजन नव्हे. कारण याकरितां 'न संप्रसारणे संप्रसारणम्' असें आचार्यांनीं सूत्र केलें आहे.

( वा. ७ ) 'सान्तमहत: संयोगस्य' (६।४।१० ) यानें सांगितलेल्या दीर्घाविषयीं या परिभाषेचा उपयोग आहे. उदा०—पयांसि यशांसि. येथें सकारान्त संयोग शेवटीं असलेल्या पयस् या अंगामध्यें जसा य यांतील अकाराला दीर्घ होतो तसा प यातील अकारालाही प्राप्त होतो· पण अंत्याच्या जवळच्यालाच कार्य करावें असें या परिभाषेनें सांगितलें असल्यामुळें दोष येत नाहीं.

हेंही प्रयोजन नव्हे. कारण 'नोपधायाः' हें अनुवृत्त आहे.

तरी देखील अनांसि मनांसि येथें दोष येतोच.

सकारान्त संयोगाचा नोपधेकडे संबंध केला म्हणजे सकारान्त संयोगांतील नकाराच्या उपधेला दीर्घ होतो असा अर्थ झाल्यामुळें मनांसि इत्यादि स्थलीं दोष येत नाहीं.

तरी पण हंसशिरांसि ध्वंसशिरांसि इत्यादि स्थळीं दोष येतो.

हा दोष येत नाहीं. कारण हम्म धातूपासून हंस शब्द बनला आहे.

पण हम्म धातूपासून हंस बनला आहे असें कोण म्हणतो ?

तर मग कोणत्या धातूपासून बनला आहे ?

हन् धातूपासून हंस शब्द बनला आहे. अध्वानं हन्ति म्ह. गच्छति ( जातो ) अशी हंस शब्दाची व्युत्पत्ति आहे.

तर मग सर्वनामस्थाने हें अनुवृत्त आहे. त्यांत सर्वनामस्थानाचा सकारान्त संयोगाकडे संबंध करून त्या सकारान्त संयोगाचा नोपधेकडे संबध केला म्हणजे सर्वनामस्थान पुढें असतांना जो सकारान्त संयोग तत्संबंधी नकाराच्या उपधेला दीर्घ होतो, असा नोपधायाः

---

८. व्यध् धातूहून क्त प्रत्यय केला असतां 'ग्रहिज्या०' ( ६।१।१६ ) या सूत्रानें होणारें संप्रसारण वकार व यकार अशा अनन्त्य दोन्ही वर्णांना प्राप्त होतें. पण त्यांतल्या त्यांत यकार हा अन्त्याच्या म्ह० धकाराच्या जवळ असल्यामुळें या परिभाषेनें यकारालाच संप्रसारण होईल तेव्हां कोणताही दोष येत नाहीं.

९. तेव्हां नकाराची जी उपधा म्ह० पूर्वीचा वर्ण त्याला दीर्घ होतो असा अर्थ होतो. तेव्हां पयस् येथें य यांतील अकार नुम् आगमाच्या नकाराच्या पूर्वी असल्यामुळें त्यालाच दीर्घ होतो.

१०. तेव्हां सकारान्त संयोगाच्या आरंभीं मकार आहे नकार नाहीं. त्यामुळें दोष येत नाहीं.

नोपधाम् । सर्वनामस्थानपरस्य सान्तसंयोगस्य नोपधाया इति ॥

अन्कारान्तस्याल्लोपे ॥ ८ ॥

अन्कारान्तस्याल्लोपे प्रयोजनम् । तक्ष्णा तक्ष्ण इति । त इत्यत्रापि प्राप्नोति । अनन्त्यविकारेऽन्त्यसदेशस्य कार्यं भवतीति न दोषो भवति ॥ एतदपि नास्ति प्रयोजनम् । अनाकारं विशेषयिष्यामः । अनो योऽकार इति । एवमप्यनसा अनस इत्यत्रापि प्राप्नोति । अन्कारेणाङ्गं विशेषयिष्यामो ऽनाकारम् । अन्कारान्तस्याङ्गस्यानो योऽकार इति ॥ एवमप्यनस्तक्ष्णा अनस्तक्ष्ण इत्यत्रापि प्राप्नोति । एवं तर्हि कार्यकालं हि संज्ञापरिभाषं यत्र कार्यं तत्रोपस्थितं द्रष्टव्यम् । भस्येत्युपस्थितमिदं भवति यचि भम् [ १. ४. १८ ] इति तत्र यजादिपरतयान्कारं विशेषयिष्यामोऽनाकारम् । यजादिपरस्यानो योऽकार इति ॥

मृजेर्वृद्धिविधौ ॥ ९ ॥

मृजेर्वृद्धिविधौ प्रयोजनम् । न्यमार्ट् । अटोऽपि वृद्धिः प्राप्नोति । अनन्त्यविकारेऽन्त्यसदेशस्य कार्यं भवतीति न दोषो भवति ॥ एतदपि नास्ति प्रयोजनम् । यथापरिभाषितमिको गुणवृद्धी [ १. १. ३ ]

---

या सूत्राचा अर्थ होतो म्हणून दोष येत नाहीं.

( वा. ८ ) 'अल्लोपोऽनः' ( ६।४।१३४ ) यानें अन् याच्या ह्रस्व अकाराचा जो लोप सांगितला आहे त्याविषयीं या परिभाषेचा उपयोग आहे. उदा० तक्ष्णा तक्ष्णः येथें त यांतील अकाराचाही लोप प्राप्त होतो. पण अन्त्याच्या जवळच्यालाच कार्य करावें असें या परिभाषेनें सांगितलें असल्यामुळें हा दोष येत नाहीं.

हेंही प्रयोजन नाहीं. कारण अन् याचा अकाराकडे संबंध केला म्हणजे अन् यांतील जो अकार त्याचा लोप होतो असा अर्थ होतो. म्हणून हा दोष येत नाहीं.

तरीही अनसा अनसे येथें दोष येतोच.

अन् याचा अंगाकडे संबंध करावयाचा आहे तसाच अन् याचा अकाराकडे संबंध करावयाचा आहे. म्हणजे अन् शेवटीं असलेल्या अंगांतील अनाच्या अकाराचा लोप होतो असा अर्थ झाल्यामुळें दोष येत नाहीं.

तरीही अनस्तक्ष्णा अनस्तक्ष्णे वगैरे ठिकाणीं दोष येतो.

तर मग संज्ञा व परिभाषा यांविषयीं कार्यकाल पक्ष घेतल्यामुळें जेथें कार्य पठित आहे तेथें संज्ञासूत्र उपस्थित होतें. तेव्हां 'अल्लोपोऽनः' येथें 'भस्य' ( ६।४।१२९ ) हा अधिकार येत असल्यामुळ येथें 'यचि भम्' ( १।४।१८ ) हें सूत्र उपस्थित होत आहे. तेव्हां त्यांतील यजादिप्रत्ययाचा अन् याच्याकडे संबंध केला आणि त्या अन् याचा अकाराकडे संबंध केला म्हणजे यकारादि किंवा अजादि प्रत्यय पुढें असतांना जो अन् त्यांतील अकाराचा लोप होतो असा अर्थ होतो म्हणून अनस्तक्ष्णा इत्यादिस्थलीं दोष येत नाहीं.

( वा ९ ) मृज् धातूला सांगितलेल्या वृद्धीविषयीं ( ७।२।११४ ) परिभाषेचा उपयोग आहे. उदा० न्यमार्ट्. येथें अडागमालाही वृद्धि प्राप्त होत आहे. परंतु अन्त्याच्या जवळच्यालाच कार्य करावें असें या परिभाषेनें सांगितलें असल्यामुळें दोष येत नाहीं.

हेंही प्रयोजन नाहीं. कारण 'इको गुणवृद्धी' ( १।१।३ ) अशी परिभाषा असल्यामुळें इकालाच गुण व वृद्धि होतील.

इतीक एव वृद्धिर्भविष्यति ॥ एवमपि मिमार्जिषतीत्यत्र प्राप्नोति । अस्तु । अभ्यासनिर्ह्रासेन ह्रस्वो भविष्यति ॥

## वसोः संप्रसारणे च ॥ १० ॥

वसोः संप्रसारणे च प्रयोजनम् । विदुषः पश्य । विदिवकारस्यापि प्राप्नोति । अनन्त्यविकारेऽन्त्यसदेशस्येति न दोषो भवति ॥ एतदपि नास्ति प्रयोजनम् । न संप्रसारणे संप्रसारणम् [ ६. १. ३७ ] इति प्रतिषेधो भविष्यति । दकारेण व्यवहितत्वान्न प्राप्नोति । एवं तर्हि निर्दिश्यमानस्यादेशा भवन्तीति न भविष्यति ॥

## युवादीनां च ॥ ११ ॥

युवादीनां च संप्रसारणे प्रयोजनम् । यूनः यूना यूने । यकारस्यापि प्राप्नोति । अनन्त्यविकारेऽन्त्यसदेशस्येति न दोषो भवति ॥ एतदपि नास्ति प्रयोजनम् । न संप्रसारणे संप्रसारणमिति न भविष्यति । उकारेण व्यवहितत्वान्न प्राप्नोति । एकादेशे कृते नास्ति व्यवधानम् । एकादेशः पूर्वविधौ स्थानिवद्भवतीति स्थानिवद्भावाद्व्यवधानमेव । एवं तर्हि समानाङ्गग्रहणं तत्र चोदयिष्यति ॥

---

तरी देखील मिमार्जिषति येथें अभ्यासालाही वृद्धि प्राप्त होते.

अभ्यासाला वृद्धि झाली तरी हरकत नाहीं. 'ह्रस्वः' ( ७।४।५९ ) यानें वृद्धि झाल्यावर ह्रस्व होईल.

( वा. १० ) वस्वन्ताला सांगितलेल्या संप्रसारणाविषयीं ( ६।४।१३१ ) या परिभाषेचा उपयोगच आहे. उदा० विदुषः पश्य. येथें विद् धातूच्या वकारालाही संप्रसारण प्राप्त होत आहे. अन्त्याच्या जवळच्यालाच कार्य करावें असें या परिभाषेनें सांगितलें असल्यामुळें दोष येत नाहीं.

हेंही प्रयोजन नाहीं. कारण ' न संप्रसारणे संप्रसारणम् ' ( ६।१।३७ ) यानें धातूच्या वकाराला संप्रसारणाचा निषेध होईल.

पण विद् यांतील इद् शब्दानें व्यवधान असल्यामुळें 'न संप्रसारणे०' हा निषेध येत नाहीं.

तर मग ' निर्दिश्यमानस्याऽऽदेशा भवन्ति ' म्ह. सूत्रोच्चारितालाच आदेश होतात अशी परिभाषा असल्यामुळें वस् प्रत्ययाच्याच वकाराला संप्रसारण होईल, धातूच्या वकाराला होणार नाहीं.

( वा. ११ ) 'श्वयुवमघोना०' (६।४।१३३) यानें सांगितलेल्या संप्रसारणाविषयीं परिभाषेचा उपयोग आहे. जसें–यूनः यूना, यूने. येथें यकारालाही संप्रसारण प्राप्त होत आहे. परंतु अन्त्याच्या जवळच्यालाच कार्य करावें असें या परिभाषेनें सांगितलें असल्यामुळें हा दोष येत नाहीं.

हेंही प्रयोजन नाहीं. कारण ' न संप्रसारणे०' यानें यकाराला संप्रसारणाचा निषेध होईल.

पण उकारानें व्यवधान असल्यामुळें निषेध होऊं शकत नाहीं.

पण असें म्हणशील तर एकादेश[11] केला असतां व्यवधान रहात नाहीं.

तरी पण पूर्वविधि कर्तव्य असतांना एकादेशाला स्थानिवद्भाव ( १।१।५७ ) होत असल्यामुळें व्यवधान येत आहेच.

बरें तर ' न संप्रसारणे० ' येथें ' समानाङ्ग[12]ग्रहणं च ' (६।१।३७ वा. २ ) असें वार्तिककार सांगणार आहेतच.

---

११. युवन् शब्दांतील मूळचा उकार आणि वकाराचें स्थानीं संप्रसारणानें झालेला उकार या दोघांचे स्थानीं सवर्णदीर्घ हा एकादेश होय.

१२. मागें सूत्र १२ टीप १० पहा.

**वोंरुपधाग्रहणं च ॥ १२ ॥**

वोंश्चोपधाग्रहणं न कर्तव्यं भवति। इह कस्मान्न भवति । अबिभर्भवान्। अनन्त्यविकारेऽन्त्यसदेशस्येति न दोषो भवति ॥ एतदपि नास्ति प्रयोजनम्। क्रियते न्यास एव ॥

**आदित्यदादिविधिसंयोगादिलोपकुत्वढत्वभष्भावषत्वणत्वेष्वातिप्रसङ्गः ॥ १३ ॥**

आदिविधावतिप्रसङ्गो भवति। धात्वादेः षः सः [ ६. १. ६४ ] णो नः [ ६५ ]। इहैव स्यात् नेता सोता । इह न स्यात् नमति सिञ्चतीति । आदि ॥ त्यदादिविधि। इहैव स्यात् तद् सः। त्यद् स्य इत्यत्र न स्यात्। त्यदादिविधि ॥ संयोगादिलोप । इहैव स्यात् मङ्क्ता। मङ्क्तव्यमित्यत्र न स्यात्। संयोगादिलोप ॥ कुत्व। इहैव स्यात्

---

( वा. १२ ) 'वोंरुपधाया दीर्घ इकः' ( ८।२।७६ ) येथें उपधाग्रहण करावयास नको.

तर मग अबिभर्भवान्[13] येथें कां बरें दीर्घ होत नाहीं ?

अन्त्याच्या जवळच्यालाच कार्य करावें असें या परिभाषेनें सांगितलें असल्यामुळें येथें दोष येत नाहीं.

हेंही प्रयोजन नाहीं. कारण सूत्रामध्यें उपधाग्रहण केलेंच आहे.

( वा. १३ ) आतां ही परिभाषा स्वीकारली असता आदिविधि, त्यदादिविधि, संयोगादिलोप, कुत्व, ढत्व, भष्भाव, षत्व, आणि णत्व, या विधींविषयीं दोष येतो. जसें– 'धात्वादेःषःसः' (६।१।६४ ) 'णो नः' ( ६।१।६५ ) या सूत्रांनीं धातूच्या आरंभीं असलेला षकार आणि णकार यांना सांगितलेलें सत्व तसेंच नत्व नेता सोता येथेंच होईल; आणि नमति सिञ्चति येथें होणार नाहीं.[14] तसेंच 'तदोः सः सौ०' ( ७।२।१०६ ) हें सत्व तद् सः येथेंच होईल. आणि त्यद् स्यः येथें होणार नाहीं.[15] तसेंच संयोगादिलोप ( ८।२।२३ ) मङ्क्ता येथेंच होईल. आणि मङ्क्तव्यम् येथें होणार नाहीं[16]

तसेंच 'चोः कुः' (८।२।३०) हें कुत्व पक्ता येथेंच होईल. आणि पक्तव्यम् येथें होणार नाहीं.

---

१३. भृ धातूहून लङ्, तिप्, इकाराचा लोप ( ३।४।१०० ), शप्, श्लु, द्वित्व, अभ्यासांतील ऋकाराला इत्व ( ७।४।७६ ), उत्तर खंडांतील ऋकाराला गुण ( ७।३।८४ ) रपर, अट् आगम, पुढील तिप् प्रत्ययाचा लोप ( ६।१।६८ ), आणि विसर्ग हीं कार्यें होऊन अबिभः असें क्रियापद होतें. येथें अन्त्य जो रेफ त्याच्या जवळ इकार नाहीं, म्हणून त्याला दीर्घ होत नाहीं गीः अथवा कीः येथें अन्त्यरेफाच्या जवळ इकार आहे म्हणून तेथेंच दीर्घ होतो असा आशय आहे.

१४. णी आणि षु या धातूंतील णकार व षकार हे अन्त्य ईकार आणि उकार यांच्या जवळचे आहेत म्हणून तेथेंच नत्व अथवा सत्व होईल. आणि णम् व षिच् या धातूंतील णकार व षकार हे अन्त्याच्या जवळचे नसल्यामुळें तेथें नत्व किंवा सत्व होणार नाही.

१५. त्यद् आणि तद् या सर्वनाम शब्दांहून सु प्रत्यय करून अत्व ( ७।२।१०२ ) आणि सत्व ( ७।२।१०६ ) केल्यावर स्यः आणि सः अशीं रूपें होतात. यांपैकीं तकार हा अंत्य अकाराच्या जवळ सः येथें आहे, स्यः येथें नाहीं म्हणून तेथें तकाराला सकार होणार नाहीं.

१६. मस्ज् धातूहून तृ आणि तव्य हे प्रत्यय केल्यानंतर नुम् आगम ( ७।१।६० ) धातूमधील सकाराच्या पुढें ( १।१।४७ वा. २ ) होतो. तेथें धातूमधील सकार तृ प्रत्यय केला असतां तेथें अंत्य ऋकाराच्या जितका जवळ पडतो तितका तो तव्य प्रत्यय केला म्हणजे अंत्य अकाराच्या जवळ पडत नाहीं.

पक्त्वा । पक्तव्यमित्यत्र न स्यात् । कुत्व ॥ ढत्व । इहैव स्यात् लेढा । लेढव्यमित्यत्र न स्यत् । ढत्व ॥ भष्भाव । इहैव स्यात् अभुत्सि । अभुत्सातामित्यत्र न स्यात् । भष्भाव ॥ षत्व । इहैव स्यात् द्रष्टा । द्रष्टव्यमित्यत्र न स्यात् । षत्व ॥ णत्व । इहैव स्यात् माषवापेण । माषवापाणामित्यत्र न स्यात् । णत्व ॥

एते दोषाः समा भूयांसो वा तस्मान्नार्थोऽनया परिभाषया ॥ न हि दोषाः सन्तीति परिभाषा न कर्तव्या लक्षणं वा न प्रणेयम् । न हि भिक्षुकाः सन्तीति स्थाल्यो नाधिश्रीयन्ते न च मृगाः सन्तीति यवा नोप्यन्ते । दोषाः खल्वपि साकल्येन परिगणिताः प्रयोजनानामुदाहरणमात्रम् । कुत एतत् । न हि दोषाणां लक्षणमस्ति । तस्माद्यान्येतस्याः परिभाषायाः प्रयोजनानि तदर्थमेषा परिभाषा कर्तव्या प्रतिविधेयं दोषेषु ॥ इदं प्रतिविधीयते ।

**उदात्तनिर्देशात्सिद्धम् ॥ १४ ॥**

यत्रैषा परिभाषेष्यते तत्रोदात्तनिर्देशः

---

तसेंच ‘ हो ढः’ ( ८।२।३१ ) हें ढत्व लेढा येथेंच होईल. आणि लेढव्यम् येथें होणार नाहीं. तसेंच भष् भाव ( ८।२।३७ ) अभुत्सि[१७] येथेंच होईल. आणि अभुत्साताम् येथें होणार नाहीं. तसेंच षत्व ( ८।२।३६ ) द्रष्टा येथेंच होईल. आणि द्रष्टव्यम् येथें होणार नाहीं. तसेंच ‘ प्रातिपदिकान्तनुम्० ’ ( ८।४।११ ) हें णत्व माषवापेण येथेंच होईल आणि माषवापाणाम् येथें होणार नाहीं.

आतां असे जे हे दोष येत आहेत ते दोष परिभाषेच्या प्रयोजनांच्या इतके असोत अथवा अधिक असोत. एकंदरींत परिभाषा करण्यांत कांहीं अर्थ दिसत नाहीं.

पण दोष येत आहेत म्हणून परिभाषा करूं नये कीं काय अथवा शास्त्रच करूं नये कीं काय ? भिक्षेकरी आहेत म्हणून चुलीवर भाताची हंडीच चढवावयाची नाहीं कीं काय ? तसेंच रानामध्यें हरिण फार आहेत म्हणून कोणीं शेतें पेरावयाचीं सोडलीं आहेत कीं काय ?

शिवाय दोष हे खरोखर सगळेच दाखविले आहेत आणि उदाहरणांची मात्र फक्त दिशा दाखविली आहे.

असें करण्याचें काय कारण ?

कारण असें कीं दोषांचा कांहीं कोणीं अनुगम केलेला नसतो[१८]. तात्पर्य या परिभाषेचीं जीं प्रयोजनें आहेत त्यांकरितां ही परिभाषा करण्यांत यावी. आतां परिभाषा केली असतां दोष जे दिसतील त्या दोषांचें निरसन करणें हें रीतसर कर्तव्य होय. तें निरसन पुढें दिल्याप्रमाणें करण्यांत येत आहे.

( वा. १४ ) जेथें ही परिभाषा प्रवृत्त होणें इष्ट आहे तेथें उदात्त–निर्देश करावा. आणि होणार नाहीं.

---

१७. अभुत्सि येथें बुध् धातूहून लुङ्, उत्तम पुरुष एकवचन इट्, च्लि, सिच्, अट् आगम, आणि धातूच्या बकाराला भष्भाव हीं कार्यें झालीं आहेत. अभुत्साताम् येथें प्रथमपुरुष द्विवचन आताम् प्रत्यय झाला आहे. येथें धातूचा बकार हा अभुत्सि येथें अंत्य इकाराच्या जितका जवळ आहे तितका अभुत्साताम् येथें अंत्य मकाराच्या जवळ नाहीं. म्हणून तेथें भष्भाव

१८. असिद्ध परिभाषा व संनिपात परिभाषा कशा स्थितीमध्यें प्रवृत्त होतात तें सांगितलें आहे. परंतु कशा स्थितीमध्यें त्या परिभाषांवर दोष येतात तें दाखविलें नाहीं व कांहीं ठिकाणीं दाखवितां येणारही नाहीं. त्यामुळें येथें सगळे दोष दाखविणें भाग पडलें आहे.

कर्तव्यः । ततो वक्तव्यमनन्त्यविकारेऽन्त्यसदेशस्य कार्यं भवत्युदात्तनिर्देश इति ॥

स तर्ह्युदात्तनिर्देशः कर्तव्यः। न कर्तव्यः। यत्रैवान्त्यसदेशश्चानन्त्यसदेशश्च युगपत्समवस्थितौ तत्रैषा परिभाषा भवति दोषेषु चान्यत्रान्त्यसदेशोऽन्यत्रानन्त्यसदेशः प्रयोजनेषु पुनस्तत्रैवान्त्यसदेशश्चानन्त्यसदेशश्च । तथाजातीयकानि खल्वप्याचार्येण प्रयोजनानि पठितानि यान्युभयवन्ति । इदमेकं यथा दोषास्तथा वोरुपधाग्रहणमिति । अबिभर्भवान् । तच्चापि क्रियते न्यास एव ॥

**[1]बन्धुनि बहुव्रीहौ ॥ ६।१।१४ ॥**

मातज्मातृकमातृषु ष्यङ् प्रसार्यो विभाषया ॥

मातच् । कारीषगन्ध्या माताऽस्य कारीषगन्धीमातः कारीषगन्ध्यामातः । मातच् ॥ मातृक । कारीषगन्धीमातृकः कारीषगन्ध्यामातृकः । मातृक॥ मातृ । कारीषगन्धीमाता कारीषगन्ध्यामाता ॥

**[ [1]वचिस्वपियजादीनां किति ॥ ६।१।१५ ॥ ]**

**[1]ग्रहिज्यावयिव्यधिवष्टिविचतिवृश्चतिपृच्छतिभृज्जतीनां ङिति च॥ ६ । १ । १६ ॥**

---

मग ' अनन्त्यविकारेऽन्त्यसदेशस्योदात्तनिर्देशे ' अशी परिभाषा करावी.

तर मग तो उदात्त-निर्देश करावयास पाहिजे.

तो करावयास नको.

कारण अन्त्याच्या जवळ असलेल्याला आणि अंत्यापासून त्याच्या पेक्षां दूर असलेल्याला अशा दोघांना एकाच उदाहरणामध्यें बरोबर कार्य प्राप्त होत असेल तेथेच ही परिभाषा प्रवृत्त होते. आतां जे दोष दाखविले तेथें एका उदाहरणामध्यें अंत्याच्या जवळच्याला कार्य आलें तर अंत्यापासून दूर असलेल्याला दुसऱ्याच उदाहरणामध्यें कार्य प्राप्त होत आहे. आणि जीं उदाहरणें दाखविलीं तेथें पहावें तर अंत्याच्या जवळच्याला आणि दूरच्याला एकाच उदाहरणामध्यें बरोबरच कार्य प्राप्त होत आहे. शिवाय, तशींच उदाहरणें आचार्य वार्तिकारांनीं दाखविलीं आहेत कीं ज्यांमध्यें एकाच उदाहरणाध्यें अंत्याजवळचा आणि दूरचा असे दोन्ही आहेत. त्यांत एक मात्र निराळ्या तऱ्हेचें उदाहरण अबिभर्भवान् हें 'वोरुपधाग्रहणं च ' या वार्तिकानें दाखविलेलें दिसतें, पण तेथें सूत्रकारांनींच सूत्रामध्यें उपधाग्रहण करून ठेविलें आहे.

( सू १४ वा. १ ) मातच्, मातृक आणि मातृ हे शब्द पुढें असतांना ष्यङन्त पूर्वपदांतील ष्यङ् प्रत्ययाच्या यकाराला बहुव्रीहि समासामध्यें विकल्पानें संप्रसारण होतें. जसें—कारीषगन्ध्या माता अस्य सः कारीषगन्धीमातः कारीषगन्ध्यामातः; कारीषगन्धीमातृकः कारीषगन्ध्यामातृकः; कारीषगन्धीमाता कारीषगन्ध्यामाता.

---

१. ( सू. १४ ) बहुव्रीहि समासामध्यें बन्धु शब्द उत्तरपद पुढें असतांना ष्यङ्प्रत्ययान्त पूर्वपदांतील ष्यङ् प्रत्ययाच्या यकाराला संप्रसारण होतें.

२. येथें बहुव्रीहीमध्यें उत्तरपद असलेल्या मातृ शब्दाला याच वचनाच्या जोरावर मातच् असा आदेश विकल्पानें होतो. तसाच कप् प्रत्यय ( ५।४।१५२ ) नित्य प्राप्त झालेला या वचनाच्या जोरावर विकल्पानें होतो. मातच् आदेशांतील चकार इत्संज्ञक असल्यामुळें येथें बहुव्रीहींतील शेवटचा अकार उदात्त होतो.

१. ( सू. १५ ) वच् स्वप् आणि यजादिक धातू यांतील यणाला कित् प्रत्यय पुढें असतांना संप्रसारण होतें. यज्, वप्, वह, वस्, वे व्ये, ह्वे, वद् आणि श्वि हे यजादिक धातू होत.

१. ( सू. १६ ) ग्रह् ज्या वय् व्यध् वश् व्यच् व्रश्च् प्रच्छ् आणि भ्रस्ज् या धातूंतील यणाला कित् किंवा ङित् प्रत्यय पुढें असतांना संप्रसारण होतें.

वयिग्रहणं किमर्थं न वेञ्यजादिषु पठ्यते वेञश्च वयिरादेशः क्रियते तत्र यजादीनां कितीत्येव सिद्धम् । तत्रैतत्स्याङ्क्दिर्थो ऽयमारम्भ इति । तच्च न । लिट्ययमादेशो लिट् च किदेव ॥ अत उत्तरं पठति ।

**वयिग्रहणं वेञः प्रतिषेधात् ॥ १ ॥**

वयिग्रहणं क्रियते वेञः प्रतिषेधात् । वेञो लिटि प्रतिषेधं वक्ष्यति स वयेर्मा भूदिति । यथैव हि वेञ्ग्रहणाद्विधिः प्राप्येत एवं प्रतिषेधोऽपि प्राप्नोति ॥

**न वा यकारप्रतिषेधो ज्ञापकोऽप्रतिषेधस्य ॥ २ ॥**

न वैष दोषः । किं कारणम् । यदयं लिटि वयो यः [ ६. १. ३८ ] इति वयेर्यकारस्य संप्रसारणप्रतिषेधं शास्ति तज्ज्ञापयत्याचार्यो न वेञ्ग्रहणाद्वयेः संप्रसारणप्रतिषेधो भवतीति ॥ नैतदस्ति ज्ञापकम् । पित्यभ्यासार्थमेतत्स्यात् । वयेः पित्सु वचनेष्वभ्यासस्य यकारस्य संप्रसारणं मा भूदिति । ननु च वेञ्ग्रहणादेव वयेः पित्स्वपि वचनेष्वभ्यासयकारस्य संप्रसारणप्रतिषेधः सिद्धः । न सिध्यति । किं कारणम् । कितीति तत्रानुवर्तते ॥ एवमपि वयेः पित्सु वचनेष्वभ्यासयकारस्य संप्रसारणं न प्राप्नोति । किं

---

( सू. १६ ) येथें वयिग्रहण कशाकरितां केलें आहे ? तें करावयास नको. कारण यजादिकांमध्यें वेञ् धातु हा पठित आहे. आणि वयि हा आदेश तर वेञ् धातूलाच होणारा (२।४।४१) आहे. तेव्हां 'वचिस्वपि यजादीनां०' या पूर्वसूत्रानेंच त्याला संप्रसारण सिद्ध होत आहे. आतां ङित् प्रत्यय पुढें असतांना संप्रसारण होण्याकरितां येथें ग्रहण केलें असें म्हणावें तर वय् आदेश हा फक्त लिटामध्येंच होणारा आहे. आणि लिट् हा तर कितच आहे. हें मनांत आणून वार्तिककार म्हणतात.

( वा. १ ) वेञ् धातूला लिटामध्यें संप्रसारणाचा निषेध ( सूत्रकार ) पुढें ( ६।१।४० ) सांगणार आहेत. तो वय् आदेशाला लागू न व्हावा म्हणून येथें वयिग्रहण केलें आहे. नाहीं तर स्थानिवद्भावानें ( १।१।५६ ) वेञ्ग्रहणानें वय् आदेशाचें ग्रहण होऊन जसा संप्रसारणाचा विधि प्राप्त होतो तसा त्याचा निषेधही प्राप्त होईल.

( वा. २ ) हा दोष येत नाहीं. कारण ज्या अर्थी 'लिटि वयो यः' ( ६।१।३८ ) यानें वय् आदेशाच्या यकाराला संप्रसारणाचा निषेध केला आहे त्या अर्थी वेञ् धातूला सांगितलेला संप्रसारणाचा निषेध वय् आदेशाला लागूं होत नाहीं असें आचार्य सुचवीत आहेत.

हें ज्ञापक जमत नाहीं. कारण पित् प्रत्यय पुढें असतांना अभ्यासासाठीं या संप्रसारणनिषेधाची जरूर आहे. म्हणजे सिप् व मिप् हे पित् प्रत्यय पुढें असतांना वय् आदेशाच्या अभ्यासातील यकाराला संप्रसारण होऊं नये हा त्याचा उपयोग आहे.

पण सूत्रांत वेञ् असा शब्द उच्चारला असल्यामुळें पिद्वचनामध्येंही वय् आदेशाच्या अभ्यासांतील यकारालाही संप्रसारण–निषेध स्थानिवद्भावामुळेंच होईल.

होणार नाहीं.

काय कारण ?

कारण असें कीं वेञः येथें किति याची अनुवृत्ति आहे.

तरी पण पित् प्रत्यय पुढें असतांना वय् आदेशाच्या अभ्यासांतील यकाराला संप्रसारणच प्राप्त होत नाहीं.

काय कारण ?

कारण असें कीं हलादिशेषानें त्या संप्रसारणाचा बाध होत आहे.

कारणम् । हलादिशेषेण बाध्यते । नात्र हलादिशेषः प्राप्नोति । किं कारणम् । वक्ष्यति ह्येतदभ्याससंप्रसारणं हलादिशेषाद्विप्रतिषेधेनेति ॥ स एष वयेर्यकारस्य संप्रसारणप्रतिषेधः पित्यभ्यासार्थो न ज्ञापकार्थो भवति ॥

**पित्यभ्यासार्थमिति चेन्नाविशिष्टत्वात् ॥ ३ ॥**

पित्यभ्यासार्थमिति चेत्तन्न । किं कारणम् । अविशिष्टत्वात् । अविशेषेण प्रतिषेधः । निवृत्तं तत्र कितीति । आतश्चाविशेषेण वेञोऽपि हि पित्सु वचनेष्वभ्यासस्य संप्रसारणं नेष्यते । ववौ ववियेति । विकृतिग्रहणं खल्वपि प्रतिषेधे क्रियते न च विकृतिः प्रकृतिं गृह्णाति ॥

**लिट्यभ्यासस्योभयेषाम् ॥६।१।१७॥**

ग्रहिवृश्चतिपृच्छतिभृज्जतीनामविशेषः ॥

---

पण येथें हलादिशेष प्राप्तच होत नाहीं.

काय कारण ?

कारण असें कीं हलादिशेषापेक्षां प्रथमतः अभ्यासाला संप्रसारण पूर्वविप्रतिषेधानें होतें (६।१।१७ वा. १) असें पुढें वार्तिककार सांगणार आहेत म्हणून तो येथें ज्ञापक होऊं शकत नाहीं.

( वा. ३ ) पित् प्रत्यय पुढें असतांना वय् आदेशाच्या अभ्यासांतील यकाराला संप्रसारणनिषेधाकरतां ' लिटि वयो यः ' हें सूत्र चरितार्थ आहे असें म्हटलें तें बरोबर नाहीं.

काय कारण ?

कारण असें कीं-वेञः येथें किति याची अनुवृत्ति नसल्यामुळें सामान्यतः लिटामध्यें तो निषेध प्रवृत्त होत आहे. शिवाय खुद्द वेञ् धातूलाही पित् लिटामध्यें अभ्यासाला संप्रसारण इष्ट नाहीं. उदा० ववौ ववियें.[२]

आता लिटि वयो यः या निषेधशास्त्रामध्यें वयः असें आदेशाचें ग्रहण केलें आहे. आणि आदेशानें तर स्थानीचें ग्रहण मुळीं होतच नाहीं. तात्पर्यः– वय् आदेशाच्या यकाराला संप्रसारणाचा निषेध जो सांगितला आहे तो पित् प्रत्यय पुढें असतांना अभ्यासाचे ठिकाणीं चरितार्थ आहे.

(सू. १७ ) ग्रह् व्रश्च् प्रच्छ् आणि भ्रस्ज् या चार धातूंच्या अभ्यासांतील यणाला म्हणजे रेफाला संप्रसारण झालें काय आणि न झालें काय त्यांत कांहींच फरक होत नाहीं.

---

२. तेव्हां वेञः येथें वेञ् या पदानें वय् याचें ग्रहण करावयाचें नाहीं असें ज्ञापक कायम झाल्यामुळें ' वञ्चिस्वपि० ' यानेंच संप्रसारण सिद्ध होतें. म्हणून प्रकृत सूत्रामध्यें वयि-ग्रहण करावयास नको असें सिद्ध झालें.

३. आतां वेञः हें सूत्र असेल तर त्यानें सिद्ध होत असल्यामुळें ' लिटि वयो यः ' हें ज्ञापक जमेल, परंतु तें वेञः हें सूत्र मुळींच नको; कारण ' लिटि वयो यः ' येथें ' लिटि वयः ' असा फक्त योगविभाग केला म्हणजे त्यांतील वय् यानें वेञ् याचें ग्रहण केलें गेल्यामुळें काम भागेल अशी जी शंका येते तिचें हें उत्तर दिलें आहे.

१. ( सू. १७ ) पूर्वीच्या दोन्ही सूत्रांमध्यें गृहीत धरलेल्या धातूंच्या अभ्यासांतील यणाला लिट् प्रत्यय पुढें असतांना संप्रसारण होतें.

२. कारण अभ्यासांतील रेफाला संप्रसारणानें ऋकार झाला तरी त्याला पूर्व–रूप ( ६।१।१०८ ) व अत्व ( ७।४।६६ ) होऊन अभ्यासामध्यें अकार येणार. आणि संप्रसारण झालें नाहीं तर रेफाचा ' हलादिः शेषः ' यानें लोप होऊन पुढील अकारच राहणार. तेव्हां अशा रीतीनें कांहींच फरक होत नाहीं.

यदुच्यते वृश्चेरविशेष इति तन्न । यद्यत्र रेफस्य संप्रसारणं न स्याद्वकारस्य प्रसज्येत । रेफस्य पुनः संप्रसारणे सत्युरदत्त्वस्य स्थानिवद्भावान्न संप्रसारणे संप्रसारणम् [ ६. १. ३७ ] इति प्रतिषेधः सिद्धो भवति । तस्माद्वक्तव्यं ग्रहेरविशेषः पृच्छतिभृज्जत्योरविशेष इति ॥

अथोभयेषांग्रहणं किमर्थम् । उभयेषामभ्यासस्य संप्रसारणं यथा स्याद्वचिस्वपियजादीनां ग्रहादीनां च । नैतदस्ति प्रयोजनम् । प्रकृतमुभयेषां ग्रहणमनुवर्तते ॥ यद्यनुवर्तते ग्रहिज्यावयिव्यधिवष्टिविचतिवृश्चतिपृच्छतिभृज्जतीनां ङिति चेति यजादीनां ङित्यपि प्राप्नोति । नैष दोषः । संबन्धमनुवर्तिष्यते । वचिस्वपियजादीनां किति । ग्रहादीनां ङिति च वचिस्वपियजादीनां किति । ततो लिट्यभ्यासस्योभयेषाम् । किति ङितीति निवृत्तम् ॥ अथवा मण्डूकगतयोऽधिकाराः । यथा मण्डूका उत्प्लुत्योत्प्लुत्य गच्छन्ति तद्वदधिकाराः ॥ अथवैकयोगः करिष्यते । वचिस्वपियजादीनां किति ग्रहादीनां ङिति चेति । ततो

---

व्रश्च् धातूच्या अभ्यासाला संप्रसारण होण्यांत विशेष नाहीं असें जें म्हटलें आहे तें मात्र बरोबर नाहीं. कारण जर वृश्चतीच्या अभ्यासांतील रेफाला संप्रसारण होणार नाहीं तर वकाराला संप्रसारण होऊं लागेल आणि रेफाला संप्रसारण झालें म्हणजे मात्र ऋच्या स्थानीं झालेल्या अकाराला 'अचः परस्मिन्०' ( १।१।५७ ) यानें स्थानिवद्भाव झाल्यामुळें 'न संप्रसारणे संप्रसारणम्' हा निषेध सिद्ध होत आहे. तेव्हां ग्रह् तसेंच प्रच्छ् व भ्रस्ज् यांच्या अभ्यासांतील यणाला संप्रसारण होण्यांत कांहीं विशेष नाहीं असें म्हणतां येईल.

आतां उभयेषाम् असें जें म्हटलें आहे तें कशाकरितां ?

वच् वगैरे तसेंच ग्रह् वगैरे जे धातू त्या दोन्हींच्याही अभ्यासाला संप्रसारण व्हावें म्हणून म्हटलें आहे.

हें प्रयोजन नाहीं. कारण 'वचिस्वपि०' आणि 'ग्रहिज्या०' या दोन्ही सूत्रांतून वच्यादिक व ग्रहादिक या दोहोंची अनुवृत्ति आणावी म्हणजे झालें.

पण जर अनुवृत्ति आणली तर 'ग्रहिज्या०' या मधल्या सूत्रामध्यें वच्यादिकांची अनुवृत्ति केलीच पाहिजे. तेव्हां यजादिकाना ङित् प्रत्यय पुढें असतांनाही संप्रसारण होऊं लागेल.

हा दोष येत नाहीं. कारण किताशीं संबंध झालेल्या अशा वच्यादिकांची अनुवृत्ति करण्यांत येईल. ती अशी कीं—'वचिस्वपियजादीनां आणि किति या दोन्ही पदांची परस्पर संबंध झालेल्यांची अनुवृत्ति येते. पुढें 'लिट्यभ्यासस्योभयेषाम्' येथें किति व ङिति या दोनही पदांची निवृत्ति होते.

किंवा मंडूकांच्या गतीप्रमाणें अधिकार शास्त्रांची गति असते. बेडूक जसा उड्या मारण्यानें मधल्या प्रदेशाला स्पर्श न करतां तो ओलांडून जातो त्यांप्रमाणें कांहीं सूत्रें ओलांडून पुढच्या सूत्रांत अधिकार जातात.[३]

अथवा 'वचिस्वपि०' व 'ग्रहिज्या०' ही दोन सूत्रें मिळून एकच सूत्र करण्यांत येईल. व त्यानंतर 'लिट्यभ्यासस्य०' हें सूत्र करण्यांत येईल. आणि एकच सूत्र केलें असतां तेथें एका पोट-

---

३. तेव्हां 'वचिस्वपियजादीनाम्' हें पद 'ग्रहिज्या' या सूत्राला ओलांडून एकदम प्रकृत सूत्रामध्यें येईल.

लिट्यभ्यासस्येति । न चैकयोगेऽनुवृत्तिर्भवति ॥ अथवोभयं निवृत्तं तदपेक्षिष्यामहे ॥

इदं तर्ह्युभयेषांग्रहणस्य प्रयोजनमुभयेषामभ्यासस्य संप्रसारणमेव यथा स्याद्यदन्यत्प्राप्नोति तन्मा भूदिति । किं चान्यत्प्राप्नोति । हलादिःशेषः । अभ्याससंप्रसारणं हलादिशेषाद्विप्रतिषेधेनेति वक्ष्यति स पूर्वविप्रतिषेधो न पठितव्यो भवति ॥

**अभ्याससंप्रसारणं हलादिशेषाद्विप्रतिषेधेन ॥ १ ॥**

अभ्याससंप्रसारणं हलादिशेषाद्भवति विप्रतिषेधेन । अभ्याससंप्रसारणस्यावकाशः । इयाज उवाप । हलादिशेषस्यावकाशः । बिभिदतुः बिभिदुः । इहोभयं प्राप्नोति । विव्याध विव्यधिथ । अभ्याससंप्रसारणं भवति पूर्वविप्रतिषेधेन ॥ स तर्हि पूर्वविप्रतिषेधो वक्तव्यः ।

**न वा संप्रसारणाश्रयबलीयस्त्वादन्यत्रापि ॥ २ ॥**

न वा वक्तव्यः । किं कारणम् । संप्रसारणाश्रयस्य बलीयस्त्वादन्यत्रापि । संप्रसारणं संप्रसारणाश्रयं च बलीयो भवतीति वक्तव्यम् । अन्यत्रापि नावश्यमिहैव वक्तव्यम् ॥ किं प्रयोजनम् ।

**प्रयोजनं रमाल्लोपेयङ्यणः ॥ ३ ॥**

रम् । भृष्टः भृष्टवान् । संप्रसारणं च

---

वाक्यांतील पदाची अनुवृत्ति त्याच सूत्रांतील दुसऱ्या पोट वाक्यामध्यें येत नसतेच.

किंवा वच्यादिक आणि ग्रह्यादिक या दोहोंचीही येथें निवृत्तीच करावी. आतां येथें कोणाचा अभ्यास अशी आकांक्षा आली असतां मागील जवळच्या दोन सूत्रामध्यें उच्चारलेलेच धातू मनांत येतील.

तर मग उभयेषां या पदाचें पुढें दिल्याप्रमाणें प्रयोजन समजावें. तें असें:– वच्यादिक आणि ग्रह्यादिक या दोहोंच्या अभ्यासाला संप्रसारणच व्हावें व जर दुसरें कार्य येत असेल तर तें न व्हावें.

पण यांच्या अभ्यासाला दुसरें कोणतें बरें कार्य प्राप्त होत आहे ?

' हलादिः शेषः ' यानें लोप प्राप्त होत आहे. तेव्हां ' हलादिशेषापेक्षां पूर्वविप्रतिषेधानें अभ्यासाला संप्रसारण होतें ' असें जें वचन आतांच पुढें ( ६।१।१७ वा. ) सांगण्यांत येणार आहे तें सांगावयास नको.

( वा. १ ) हलादिशेषापेक्षां पूर्वविप्रतिषेधानें अभ्यासाला संप्रसारण होतें असें वचन करावें. अभ्यास-संप्रसारणाला इयाज उवाप येथें अवकाश आहे; व हलादिशेषाला बिभिदतुः बिभिदुः येथें अवकाश आहे. आणि विव्याध विव्यधिथ येथें यकाराला दोहोंची प्राप्ति येत आहे. तेथें पूर्व-विप्रतिषेधानें संप्रसारण होतें.

तर मग तसा पूर्वविप्रतिषेध सांगितला पाहिजे.

( वा. २ ) पूर्वविप्रतिषेधवचन येथेंच मुद्दाम निराळें सांगावयास नको. कारण संप्रसारण व संप्रसारणाश्रय कार्य हीं बलिष्ठच समजावीं असें सामान्यतःच वचन केलें पाहिजे. याचा अन्य ठिकाणींही उपयोग आहे. केवळ प्रस्तुत उदाहरणांकरितांच उपयोग आहे असें नाहीं.

कोठें कोठें तसा उपयोग आहे ?

( वा. ३ ) रम्, आल्लोप, इयङ् आणि यण् हीं प्रयोजनें होत. उदा०– भृष्टः भृष्टवान्. येथें

---

४. उभयेषाम् असें निराळें सूत्र करून पुनः मुद्दाम संप्रसारणाचें विधान केलें म्हणजे इतर कार्यांच्या बाधाकडे त्याचा उपयोग होईल.

प्राप्नोति रम्भावश्च । परत्वाद्रम्भावः स्यात् । संप्रसारणं बलीयो भवतीति वक्तव्यं संप्रसारणं यथा स्यात् ॥ आल्लोपः । जुहुवतुः जुहुवुः । संप्रसारणं च प्राप्नोत्याल्लोपश्च । परत्वादाल्लोपः स्यात् । संप्रसारणं बलीयो भवतीति वक्तव्यं संप्रसारणं यथा स्यात् । संप्रसारणे कृते पूर्वत्वं च प्राप्नोत्याकारलोपश्च । परत्वादाल्लोपः स्यात् । संप्रसारणाश्रयं च बलीयो भवतीति वक्तव्यं पूर्वत्वं यथा स्यात् ॥ इयङ् । शुशुवतुः शुशुवुः । संप्रसारणं च प्राप्नोतीयङादेशश्च । परत्वादियङादेशः स्यात् । संप्रसारणं बलीयो भवतीति वक्तव्यं संप्रसारणं यथा स्यात् ॥ यण् । संप्रसारणे कृते पूर्वत्वं च प्राप्नोति यणादेशश्च । परत्वाद्यणादेशः स्यात् । संप्रसारणाश्रयं च बलीयो भवतीति वक्तव्यं पूर्वत्वं यथा स्यात् ।

नैतानि सन्ति प्रयोजनानि । यत्तावदुच्यते रमितीदमिह संप्रधार्यम् । रम्भावः क्रियतां संप्रसारणमिति किमत्र कर्तव्यम् । परत्वाद्रम्भावः । नित्यं संप्रसारणम् । कृतेऽपि रम्भावे प्राप्नोत्यकृतेऽपि । रम्भावोऽपि नित्यः । कृतेऽपि संप्रसारणे प्राप्नोत्यकृतेऽपि । कथम् । योऽसावृकारे रेफस्तस्य चोपधा-

---

भ्रस्ज् धातूहून क्त अथवा क्तवतु प्रत्यय केला असतां संप्रसारण ( ६।१।१६ ) व रम् आगम ( ६।४।४७ ) प्राप्त होतात; आणि पर असल्यामुळे रम् आगम होईल. तेव्हां संप्रसारण होण्याकरितां संप्रसारण ज्यास्ती प्रबल होय असें वचन केलें पाहिजे. तसेंच जुहुवतुः जुहुवुः येथें ह्वे धातूहून आत्व लिट् द्वित्व तस् व अतुस् केले असतां आकारलोप ( ६।४।६४ ) व संप्रसारण ( ६।१।१५ ) प्राप्त होतात, आणि परत्वास्तव आकार लोप होईल. तेव्हां संप्रसारण होण्याकरितां 'संप्रसारण ज्यास्ती प्रबल होय' असें वचन केलें पाहिजे. या उदाहरणांमध्येंच संप्रसारण केल्यानंतर पूर्वरूप (६।१।१०८) व आकार–लोप प्राप्त होतात व त्यांमध्यें परत्वास्तव आकारलोप होईल. तेव्हां पूर्वरूप होण्याकरितां 'संप्रसारणाश्रय कार्य ज्यास्ती प्रबल असतें' असें वचन केलें पाहिजे. तसेंच शुशुवतुः शुशुवुः येथें श्वि धातूहून लिट् तस् व अतुस् केले असतां संप्रसारण व इयङ् ( ६।४।७७ ) प्राप्त होतात, आणि परत्वास्तव इयङ् होईल. तेव्हां संप्रसारण होण्याकरितां 'संप्रसारण ज्यास्ती प्रबल होय' असें वचन केलें पाहिजे. तेथेंच संप्रसारण केल्यानंतर पूर्वरूप व यणादेश ( ६।४।८२ ) प्राप्त होतात. तेथें परत्वास्तव यण् होईल. तेव्हां पूर्वरूप होण्याकरिताही 'संप्रसारणाश्रय कार्य ज्यास्ती प्रबल असतें' असें वचन केलें पाहिजे.

हीं प्रयोजनें होत नाहींत. त्यांत आरंभीं जें रम् होण्यासंबंधानें म्हटलें आहे तेथें प्रथम असा विचार केला पाहिजे कीं भ्रस्ज् क्त असें असतां प्रथम रम् आगम करावा किंवा संप्रसारण करावें ?

मग त्यांत काय बरें प्रथम करावें ?

परत्वास्तव रम् आगम करावा.

पण रम् आगम केला तरी अथवा न केला तरी संप्रसारणाची प्राप्ति येत असल्यामुळें संप्रसारण नित्य[5] आहे.

रम् आगमही नित्य आहे. संप्रसारण केलें तरी अथवा न केलें तरी रम् आगम प्राप्त होत आहे.

पण संप्रसारण केलें असतां रम् आगम कसा बरें प्राप्त[6] होतो ?

---

५. रम् आगम झाल्यानंतर त्याच रेफाला संप्रसारण प्राप्त होतें आणि तो होण्यापूर्वी धातूमधील मूळच्या रेफाला तें प्राप्त होतें.

६. कारण रेफाचें स्थानीं संप्रसारण झाल्यानंतर धातूमध्यें रेफच रहात नाहीं.

याश्च प्राप्नोति । अनित्यो रम्भावो न हि कृते संप्रसारणे प्राप्नोति । किं कारणम् । न हि वर्णैकदेशा वर्णग्रहणेन गृह्यन्ते । अथापि गृह्यन्त एवमप्यनित्यः । उपदेश इति वर्तते । तच्चावश्यमुपदेशग्रहणमनुवर्त्यं बरीभृज्ज्यत इत्येवमर्थम ॥ आल्लोपेयङ्यणः । नित्यं संप्रसारणम् । अन्तरङ्गं पूर्वत्वम् ॥

तदेतदनन्यार्थं संप्रसारणाश्रयं बलीयो भवतीति वक्तव्यं पूर्वविप्रतिषेधो वा वक्तव्यः ॥ उभयं न वक्तव्यम् । उक्तमत्रोभयेषांग्रहणस्य प्रयोजनमुभयेषामभ्यासस्य संप्रसारणमेव यथा स्याद्यदन्यत्प्राप्नोति तन्मा भूदिति ॥

**व्यचेः कुटादित्वमनस्यञ्णिति संप्रसारणार्थम् ॥ ४ ॥**

व्यचेः कुटादित्वमनसीति वक्तव्यम् । किं प्रयोजनम् । अञ्णिति संप्रसारणार्थम् । अञ्णिति संप्रसारणं यथा स्यात् । उद्विचिता उद्विचितुम् उद्विचितव्यम् । अनसीति किमर्थम् । उरुव्यचाः कण्टकः ॥

---

जो हा ऋकारांतील रेफ तो व उपधा या दोघांना रम् आगम प्राप्त होतो.

तथापि रम् आगम अनित्य आहे. कारण संप्रसारण केल्यानंतर तो येऊं शकत नाहीं.

काय कारण ?

कारण असें कीं वर्णाचा एकदेश हा वर्ण म्हटला जात नाहीं.

आतां वर्णाचा एकदेश वर्ण समजला जातो असें समजलें तरींही रम् आगम अनित्यच होय. कारण तेथें मागाहून ( ६।४।३७ ) उपदेशे या पदाची अनुवृत्ति येत आहे. त्यामुळें उपदेशीं जो रेफ त्याला रम् होतो असा अर्थ होतो[८]. व त्या उपदेश पदाची तर अवश्य अनुवृत्ति आणिलीच पाहिजे. म्हणूनच बरीभृज्यते येथें रीक् आगमाच्या रेफाची निवृत्ति होत नाहीं.

आल्लोप इयङ् आणि यण् यांच्या संबंधानेंही असें म्हणतां येतें कीं संप्रसारण नित्य आहे व पूर्वरूप तर अंतरंगच आहे. तेव्हां फक्त प्रकृत उदाहरणाकरितांच 'संप्रसारणं तदाश्रयं च बलवत्' असें म्हटलें पाहिजे. किंवा पूर्वविप्रतिषेध तरी सांगितला पाहिजे.

दोन्हीही सांगावयास नकोत. कारण वच्यादिक व ग्रह्यादिक यांच्या अभ्यासाला संप्रसारणच होतें आणि दुसरें जें कांहीं कार्य प्राप्त होतें तें होत नाहीं असा प्रकृत सूत्रांतील उभयेषाम् या पदाचा उपयोग आतांच सांगितला आहे.

( वा. ४ ) व्यच् धातु हा अस् प्रत्ययाशिवाय दुसरा कोणताही कृत् प्रत्यय पुढें असतांना कुटादि समजला जावा, असें वचन करावें.

त्याचा काय उपयोग ?

उपयोग असा कीं ञित् व णित् यांहून निराळ्या कृत् प्रत्ययाला ङित्व ( १।२।१ ) झाल्यामुळें उद्विचिता उद्विचितुम् उद्विचितव्यम् येथें संप्रसारण सिद्ध होतें.

पण अनसि असें कशाकरितां म्हटलें आहे ?

उरुव्यचाः[१०] कण्टकः येथें संप्रसारण न व्हावें म्हणून.

---

७. तेव्हां ऋकारांतील जो रेफासारखा भाग आहे तो रेफ समजून त्याला रम् आगम करतां येणार नाहीं.

८. संप्रसारणानें ऋकार हा नवीन झाला असल्यामुळें त्यांतील रेफ हा मूळ धातूपैकीं नव्हे.

९. तेव्हां अर्थात् आल्लोप वगैरेंपेक्षां संप्रसारण व पूर्वरूप अगोदर होतीलच. म्हणून 'संप्रसारणं तदाश्रयं च कार्यं बलवत्' या परिभाषेचा इतर ठिकाणीं उपयोग येत नाहीं.

१० व्यच् धातूहून अस् प्रत्यय ( उणा. ४।२२२ ) झाला आहे. उरु व्यचतीति उरुव्यचाः.

**स्वापेश्चङि ॥ ६ । १ । १८ ॥**

चङ्ग्रहणं शक्यमकर्तुम्। कथम्। ङितीति वर्तते न चान्यः स्वापेर्ङिदस्त्यन्यदतश्चङः ॥

**[स्वपिस्यमिव्येञां यङि ॥६।१।१९ ॥]**

**न वशः ॥ ६ । १ । २० ॥**

**वशेर्यङि प्रतिषेधः ॥ १ ॥**

वशेर्यङि प्रतिषेधो वक्तव्यः संप्रसारणस्य। वावश्यते। क मा भूत्। उष्टः उशन्तीति ॥ स तर्हि तथा प्रतिषेधो वक्तव्यः। न वक्तव्यः। यङीति वर्तते। एवं तर्ह्यन्वाचष्टे यङीति वर्तत इति। नैतदन्वाख्येयमधिकारा अनुवर्तन्त इति। एष एव न्यायो यदुताधिकारा अनुवर्तेरन्निति ॥

**[चायः की ॥ ६ । १ । २१ ॥**

**स्फायः स्फी निष्ठायाम् ॥ ६।१ । २२ ॥**

**स्त्यः प्रपूर्वस्य ॥ ६ । १ । २३ ॥**

**द्रवमूर्तिस्पर्शयोःश्यः॥६।१।२४॥**

**प्रतेश्च ॥ ६ । १ । २५ ॥**

**विभाषाभ्यवपूर्वस्य॥६।१।२६॥]**

---

( सू. १८ ) येथें चङ् ग्रहण करावयास नको.

तें कसें ?

मागून ङिति याची अनुवृत्ति आहे. आणि ण्यन्त स्वप् धातूच्या पुढें ङित् प्रत्यय तर चङाहून अन्य संभवतच नाहीं.

( सू. २० वा. १ ) हा जो वश् धातूला संप्रसारणाचा प्रतिषेध सांगितला आहे तो यङ् पुढें असतांनाच होतो असें सांगावें. उदा०— वावश्यते.

पण तसें म्हटल्यामुळें कोठें बरें संप्रसारणाचा निषेध होत नाहीं ?

उष्टः उशन्ति येथें.

तर मग तसा प्रतिषेध करावयास पाहिजे.

करावयास नको. कारण पूर्व सूत्रांतून यङि याची अनुवृत्ति येत आहे.

तर मग येथें यङि याची अनुवृत्ति येत आहे हेंच या वार्तिकानें सांगितलें आहे असें समजावें.

परंतु अधिकार हे अनुवृत्त होतात असें कांहीं सांगावें लागत नाहीं. उलट अधिकारांची पुढें अनुवृत्ति होणें हें न्यायाला धरूनच असतें.

---

१. ( सू. १८ ) स्वप् धातूहून णिच् प्रत्यय करून पुढें चङ् प्रत्यय केला असतां त्या स्वप् धातूमधील वकाराला संप्रसारण होतें. उदा० असूषुपत्.

१. ( सू. १९ ) स्वप् स्यम् आणि व्येञ् या धातूंमधील यणाला यङ् प्रत्यय पुढें असतांना संप्रसारण होतें.

१ ( सू. २० ) वश् धातूमधील वकाराला यङ् प्रत्यय पुढें असतांना संप्रसारण होत नाहीं.

१ ( सू. २१ ) चाय् धातूला यङ् प्रत्यय पुढें असतांना की असा आदेश होतो. उदा० चेकीयते.

१. ( सू. २२ ) स्फाय् धातूला स्फी असा आदेश निष्ठा प्रत्यय पुढें असताना होतो. उदा०— स्फीतः स्फीतवान्.

१. ( सू. २३ ) प्र उपसर्गाच्या पुढील स्त्या धातूच्या यकाराला संप्रसारण निष्ठा प्रत्यय पुढें असतांना होतें. उदा० प्रस्तीतः प्रस्तीतवान्.

१ ( सू. २४ ) पातळ पदार्थ थिजून घट्ट होणें किंवा स्पर्श करणें हा अर्थ गम्यमान असतांना श्या धातूच्या यकाराला संप्रसारण निष्ठा प्रत्यय पुढें असतांना होतें. उदा०— शीनं घृतम् ; शीतो वायुः.

१. ( सू. २५ ) प्रति या उपसर्गाच्या पुढील श्या धातूच्या यकाराला संप्रसारण निष्ठा प्रत्यय पुढें असतांना होतें. उदा०— प्रतिशीनः, प्रतिशीनवान्.

१ ( सू. २६ ) अभि किंवा अव या उपसर्गाच्या

## शृतं पाके ॥ ६ । १ । २७ ॥

किं निपात्यते ।

### श्राश्रप्योः शृभावः ॥ १ ॥

श्राश्रप्योः शृभावो निपात्यते ॥

क्षीरहविषोरिति वक्तव्यम् । शृतं क्षीरम् । शृतं हविः । क मा भूत् । श्राणा यवागूः । श्रपिता यवागूरिति ॥

### श्रपेः शृतमन्यत्र हेतोः ॥ २ ॥

श्रपेः शृतमन्यत्र हेतोरिति वक्तव्यम् । इह मा भूत् । श्रपितं क्षीरं देवदत्तेन यज्ञदत्तेनेति ॥

## प्यायः पी ॥ ६ । १ । २८ ॥

### आङ्पूर्वादन्धूधसोः ॥ १ ॥

आङ्पूर्वादन्धूधसोरिति वक्तव्यम् । आपीनोऽन्धुः । आपीनमूधः । किं प्रयोजनम् । नियमार्थम् । आङ्पूर्वादन्धूधसोरेव । क मा भूत् । आप्यानश्चन्द्रमा इति ॥ उभयतो नियमश्चायं द्रष्टव्यः । आङ्पूर्वादेवान्धूधसोः । अन्धूधसोरेवाङ्पूर्वादिति । क मा भूत् । प्रप्यानोऽन्धुः । प्रप्यानमूधः ॥

---

(सू. २७) येथें कशाचें निपातन केलें आहे ?

(वा. १) श्रा धातु आणि श्रपि म्हणजे णिच् प्रत्ययान्त श्रा धातु यांचे स्थानीं शृ आदेशाचें निपातन केलें आहे क्षीर किंवा हविर्द्रव्य हे अर्थ गम्यमान असतांना असें म्हणावें. जसें— शृतं क्षीरम्, शृतं हविः.

क्षीरहविषोः असें म्हटल्यामुळें कोठें बरें शृ आदेश होत नाहीं ?

श्राणा यवागूः, श्रपिता यवागूः, येथें होत नाहीं.

(वा. २) पाक करणाऱ्याला प्रयोजक ज्या ठिकाणीं दाखविला जात असेल तेथें शृत हें निपातन होत नाहीं; त्यावाचून इतर ठिकाणीं तें निपातन होतें असें म्हणावें. कारण श्रपितं क्षीरं देवदत्तेन यज्ञदत्तेन[2] येथें शृ आदेश न व्हावा.

(सू. २८ वा १) आङ्पूर्वक जो प्याय् धातु त्याचे स्थानीं पी असा आदेश होतो अन्धु म्ह० कूप व ऊधस् म्ह० कास हे अर्थ गम्यमान असतांना, असें वचन करावें उदा०— आपीनोऽन्धुः, आपीनमूधः.

हें वचन कशाकरितां केले आहे ?

आङ् उपसर्ग असतांना जर प्याय् धातूला प्रकृत सूत्रानें पी आदेश होईल तर अन्धु किंवा ऊधस् हे अर्थ असतांनाच होईल असा नियम करण्याकरितां केलें आहे. त्यामुळें आप्यानश्चन्द्रमाः येथें पी आदेश होत नाहीं.

हा दोन्ही प्रकारचा नियम आहे असें समजावें[2]. तो असा कीं-अन्धु व ऊधस् हे अर्थ गम्यमान असतांना जर प्रकृत सूत्रानें पी आदेश होईल तर आङ् पूर्वी असतांनाच होईल; तसेंच आङ् पूर्वी

---

पुढील श्या धातूच्या यकाराला संप्रसारण निष्ठा प्रत्यय पुढें असतांना विकल्पानें होतें. उदा०— अभिशीनम्, अभिश्यानम्; अवशीनम् अवश्यानम्.

१. (सू. २७) श्रा धातूहून क्त प्रत्यय केला असतांना तेथें शृत असा शब्द निपातन केला जातो; शिजलेलें अन्न असा अर्थ असला पाहिजे. उदा०—शृतं हविः. श्रा धातूहून णिच् प्रत्यय करून पुढें क्त प्रत्यय केला तरी तेथें ही शृत असा शब्द निपातन केला जातो.

२. यज्ञदत्तानें देवदत्ताकडून क्षीर शिजविलें असा येथें अर्थ आहे.

१. (सू. २८) प्याय् धातूला पी असा आदेश होतो निष्ठा प्रत्यय पुढें असतांना. उदा०— पीनं मुखम्.

२. कारण सूत्रानें मोघमच पी आदेश सांगितला असल्यामुळें वाटेल तो उपसर्ग असला तरी किंवा मुळींच नसला तरी पी आदेश होईल. तसाच कोणता ही अर्थ गम्यमान असला तरी होईल.

आङ्पूर्वाच्चैष नियमो द्रष्टव्यः । भवति हि पीनं मुखम् पीनाः शम्बटयः श्लक्ष्णपीनमुखी कन्येति ॥

**[ लिड्यङोश्च[1] ॥ ६ । १ । २९ ॥ ]**

**विभाषा श्वेः[1] ॥ ६ । १ । ३० ॥**

**श्वेर्लिटयभ्यासलक्षणप्रतिषेधः ॥ १ ॥**

श्वेर्लिटयभ्यासलक्षणं संप्रसारणं नित्यं प्राप्नोति तस्य प्रतिषेधो वक्तव्यः । शिश्वियतुः शिश्वियुः ॥ किमुच्यते लिटयभ्यासलक्षणस्येति न पुनः किल्लक्षणस्यापि । किल्लक्षणमपि हि नित्यमत्र प्राप्नोति । किल्लक्षणं श्वयतिलक्षणं बाधिष्यते । यथैव तर्हि किल्लक्षणं श्वयतिलक्षणं बाधत एवमभ्यासलक्षणमपि बाधेत ॥ न ब्रूमोऽपवादत्वाच्छ्वयतिलक्षणं किल्लक्षणं बाधिष्यत इति । किं तर्हि । परत्वात् । श्वयतिलक्षणस्यावकाशः पिन्ति वचनानि । शुशाव शुशविथ । शिश्वाय शिश्वयिथ । किल्लक्षणस्यावकाशोऽन्ये कितः । शूनः शूनवान् । इहोभयं प्राप्नोति । शिश्वियतुः शिश्वियुरिति । श्वयतिलक्षणं भवति विप्रतिषेधेन ॥ अभ्यासलक्षणादपि तर्हि

---

असतांना जर पी आदेश होईल तर अन्धु किंवा ऊधस् हे अर्थ असतांनाच होईल. त्यांत पहिल्या नियमामुळें प्रप्यानोऽन्धुः प्रप्यानमूधः येथें आङ् पूर्वी नसल्यामुळें पी आदेश होत नाहीं. आङ्-पूर्वक प्याय् धातूलाच पी आदेश होतो या नियमानें इतर उपसर्गांची व्यावृत्ति होते, मुळींच उपसर्ग नसेल तेथें व्यावृत्ति होत नाहीं; म्हणून केवळ प्याय् धातूला सर्व ठिकाणीं पी आदेश होतो. सबब पीनं मुखम्, पीनाः शम्बस्यः, श्लक्ष्णपीनमुखी कन्या इत्यादि प्रयोगांमध्यें पीन आदेश सिद्ध होतो.

( सू. ३० वा. १ ) श्वि धातूहून लिट् केला असतां 'लिट्यभ्यासस्यो॰' ( ६।१।१७ ) यानें अभ्यासाला नित्य संप्रसारण प्राप्त होतें त्याचा प्रतिषेध करण्यात यावा. उदा॰-शिश्वियतुः शिश्वियुः

पण श्विधातूहून लिट् पुढें असतांना अभ्यासनिमित्तक संप्रसारणाचा प्रतिषेध जेव्हां सांगतां तेव्हां 'वचिस्वपि॰' या कित्–निमित्तक संप्रसारणाचाही प्रतिषेध सांगावयास नको कां ? कारण कित्–निमित्तक संप्रसारणही येथें नित्य प्राप्त होत आहे.

' विभाषा श्वेः ' हें श्वयतिलक्षण संप्रसारण कित्–लक्षण संप्रसारणाचा बाध करील.

तर मग जसें कित्–लक्षण संप्रसारणाचा श्वयतिलक्षण संप्रसारण बाध करतें तसें अभ्यासलक्षण संप्रसारणाचाही बाध करील.

श्वयतिलक्षण संप्रसारण हें कित्–लक्षण संप्रसारणाचा अपवादत्वास्तव बाध करतें असें आम्ही म्हणत नाहीं तर परत्वास्तव बाध करतें असें म्हणतों. श्वयतिलक्षण संप्रसारणाला पित् वचनांमध्यें अवकाश आहे. उदा॰– शुशाव शुशविथ, शिश्वाय शिश्वयिथ. तसेंच कित्–लक्षण संप्रसारणाला लिटावांचून अन्य कित् प्रत्ययांमध्यें अवकाश मिळतो. उदा॰ शूनः शूनवान्. शिश्वियतुः शिश्वियुः येथें दोहोंचीही प्राप्ति येते. असें असतां कित् लक्षणाचा परत्वास्तव बाध करून वैकल्पिक श्वयतिलक्षण संप्रसारण होतें.

---

१. ( सू. २९ ) लिट् किंवा यङ् प्रत्यय पुढें असतांना प्याय् धातूला पी आदेश होतो. उदा॰– आपिप्ये, आपेपीयते

१. ( सू. ३० ) लिट् किंवा यङ् प्रत्यय पुढें असतांना श्वि धातूच्या वकाराला संप्रसारण विकल्पानें होतें. उदा॰– शुशाव शिश्वाय. शोशूयते शेश्वीयते.

श्वयतिलक्षणं भविष्यति विप्रतिषेधेन। अभ्यासलक्षणस्यावकाशोऽन्ये यजादयः। इयाज उवाप। श्वयतिलक्षणस्यावकाशः परं धातुरूपम्। शुशुवतुः शुशुवुः शुशविथ। श्वयतेरभ्यासस्योभयं प्राप्नोति। शिश्वियतुः शिश्वियुः। श्वयतिलक्षणं भविष्यति विप्रतिषेधेन॥ नैष युक्तो विप्रतिषेधो न हि श्वयतेरभ्यासस्यान्ये यजादयोऽवकाशः। श्वयतेर्यजादिषु यः पाठः सोऽनवकाशस्तस्यानवकाशत्वादयुक्तो विप्रतिषेधः। तस्मात्सुष्ठूच्यते श्वेर्लिट्यभ्यासलक्षणप्रतिषेध इति।[1]

## [णौ च संश्चङोः ॥६।१।३१॥]

## ह्वः संप्रसारणमभ्यस्तस्य च ॥ ६।१।३२-३३॥

### ह्वः संप्रसारणे योगविभागः ॥ १ ॥

ह्वः संप्रसारणे योगविभागः कर्तव्यः। ह्वः संप्रसारणं भवति णौ च संश्चङोः। ततोऽभ्यस्तस्य च। अभ्यस्तस्य च ह्वः संप्रसारणं भवतीति॥ किमर्थो योगविभागः।

### णौ च संश्चङ्विषयार्थः ॥ २ ॥

---

तर मग अभ्यासलक्षण संप्रसारणाचाही श्वयतिलक्षण संप्रसारण विप्रतिषेध असल्यामुळें बाध करील. तो असा:— अभ्यासनिमित्तक संप्रसारणाला श्वि धातूवाचून इतर यजादिक धातूंमध्यें अवकाश मिळतो. उदा० इयाज उवाय येथें. व श्वयतिलक्षण संप्रसारणाला द्वित्व झाल्यानंतर उत्तर खंडामध्यें अवकाश मिळतो. उदा० शुशुवतुः शुशुवुः शुशविथ येथें. शिश्वियतुः शिश्वियुः इत्यादि स्थलीं अभ्यासाला अभ्यासलक्षण व श्वयतिलक्षण या दोहोंची प्राप्ति आली असतां विप्रतिषेध असल्यामुळें परत्वास्तव अभ्यासलक्षणाचा बाध करून वैकल्पिक श्वयतिलक्षण संप्रसारण होईल.

हा विप्रतिषेध योग्य नाहीं. कारण श्वि धातूच्या अभ्यासाला जें संप्रसारण सांगितलें आहे त्याला अन्य यजादिक धातूंचे ठिकाणीं अवकाश आहे हें म्हणणें अगदीं अयोग्य आहे; श्वि धातूविषयीं अवकाश पाहिजे तो मिळत नाहीं. तेव्हां 'लिट्यभ्यासस्यो०' या कार्याच्या उद्देशानें यजादिकामध्यें केलेला श्वि धातूचा पाठ अनवकाश असल्यामुळें अभ्यासलक्षण व श्वयतिलक्षण या दोहोंमधील विप्रतिषेध अयोग्य होय. तेव्हां 'श्वेर्लिट्यभ्यासलक्षणप्रतिषेधः' असें जें वचन केलें आहे तें बरोबरच आहे.

(सू. ३२,३३ वा. १) ह्वा धातूला संप्रसारण सांगणाऱ्या ह्या एका सूत्राचीं दोन सूत्रें करावीं. तीं अशीं—'ह्वः संप्रसारणम्' एवढेंच एक सूत्र होय. ह्वा धातूला संप्रसारण होतें सन् किंवा चङ् प्रत्यय पुढें असलेला णिप्रत्यय पुढें असतांना, असा त्याचा अर्थ होय. उदा. जुहावयिषति, अजूहवत्. त्यानंतर 'अभ्यस्तस्य च' असें दुसरें सूत्र होय. त्याचा अर्थ ह्वा धातूच्या अभ्यस्ताला संप्रसारण होतें. उदा० जुहाव, जुहूषति.

येथे 'ह्वः संप्रसारणम्' हें निराळें सूत्र कशाकरितां केलें आहे?

---

१. (सू. ३१) सन् किंवा चङ् पुढें असलेला णि प्रत्यय पुढें असतानां श्वि धातूंतील वकाराला संप्रसारण विकल्पानें होतें. उदा० शुशावयिषति शिश्वाययिषति; अशूशवत् अशिश्वयत्.

१. (सू. ३२) सन् किंवा चङ् प्रत्यय पुढें असलेला णि प्रत्यय पुढें असतांना ह्वा धातूंतील वकाराला संप्रसारण होतें. उदा०— जुहावयिषति अजूहवत्.

२. (सू. ३३) अभ्यस्तसंज्ञा होण्यासारख्या उदाहरणांमध्यें ह्वा धातूंतील वकाराला संप्रसारण होतें. उदा० जुहाव जुहूषति.

णौ च संश्चङ्विषये संप्रसारणं यथा स्यात् । जुहावयिषति अजूहवत् ॥ किं पुनः कारणं न सिध्यति । ह्वोऽभ्यस्तस्येत्युच्यते न चैतद् ह्वोऽभ्यस्तम् । कस्य तर्हि । ह्वाययतेः । ह्व एतदभ्यस्तम् । कथम् । एकाचो द्वे प्रथमस्य [ ६. १. १ ] । एवं तर्हि ह्वयतेरभ्यस्तस्येत्युच्यते न चात्र ह्वयतिरभ्यस्तः । कस्तर्हि । ह्वाययतिः । ह्वयतिरेवात्राभ्यस्तः । कथम् । एकाचो द्वे प्रथमस्येति ॥ एवमपि

## अभ्यस्तनिमित्तेऽनभ्यस्तप्रसारणार्थम् ॥ ३ ॥

अभ्यस्तनिमित्त इति वक्तव्यम् । किं प्रयोजनम् । अनभ्यस्तप्रसारणार्थम् । अनभ्यस्तस्य प्रसारणं यथा स्यात् । जुहूषति जोहूयते ॥

## अभ्यस्तप्रसारणे ह्यभ्यासप्रसारणाप्राप्तिः ॥ ४ ॥

अभ्यस्तप्रसारणे ह्यभ्यासप्रसारणस्याप्राप्तिः

---

( वा. २ ) सन् किंवा चङ् पुढें असलेला णिप्रत्यय पुढें असतांना ह्वाधातूला संप्रसारण होण्याकरितां केलें आहे. उदा० जुहावयिषति, अजूहवत्.

पण 'ह्वः संप्रसारणमभ्यस्तस्य च' असें एकच सूत्र असलें तर कां बरें येथें संप्रसारण होणार नाहीं ?

एक सूत्र असतांना ह्वा धातूच्या अभ्यस्ताला संप्रसारण होतें असा अर्थ होईल. व प्रकृत स्थलीं तर हें ह्वा धातूचें अभ्यस्त नव्हे.

तर मग कोणत्या धातूचें हें अभ्यस्त आहे ?

णिजन्त ह्वायि धातूचें हें अभ्यस्त आहे.

तरी पण ह्वा धातूचेंही हें अभ्यस्त आहे.

तें कसें ?

सन्नन्ताला किंवा चङ्परक ण्यन्त धातूला द्वित्व सांगितलें असलें तरी 'एकाचो द्वे०' या अधिकारामुळें प्रथम एकाच् भागाला म्ह० केवळ ह्वा धातूलाच द्वित्व होत आहे. तेव्हां ह्वा धातूचें हें अभ्यस्त आहे असें म्हणण्याला कांहीं हरकत नाहीं.

तर ' मग ह्वा धातूचें जें अभ्यस्त ' असा अर्थ न करतां 'जो अभ्यस्त ह्वा धातू' असा अर्थ करतां येईल. आणि येथें तर ह्वा धातू अभ्यस्तसंज्ञक नाहीं.

तर मग येथें कोण अभ्यस्तसंज्ञक आहे ?

णिजन्त ह्वायि धातू.

ह्वा धातूच येथें अभ्यस्त आहे.

तो कसा ?

द्वित्व कोणालाही सांगितलें असलें तरी तें प्रथम एकाच् भाग जो ह्वा धातु त्यालाच होत आहे.

असें आहे तरी पण—

( वा. ३ ) येथें अभ्यस्त–निमित्तें प्रत्यय पुढे असतांना असें म्हटलें पाहिजे.

त्याचें काय प्रयोजन ?

अनभ्यस्त अवस्थेंत म्ह० अभ्यस्त संज्ञा होण्याच्या पूर्वीच ह्वा धातूला संप्रसारण व्हावें म्हणून. उदा० जुहूषति, जोहूयते.

( वा ४ ) अभ्यस्ताला संप्रसारण होतें असें म्हटलें तर अभ्यासाला संप्रसारण प्राप्त होणार

---

३. द्वित्व झालेल्याला अभ्यस्तसंज्ञा ( ६।१।५ ) होते. अजूहवत् येथें ' चङि ' ( ६।१।११ ) यानें चङ् पुढें असतांना त्याच्या मागील ह्वायि या णि-प्रत्ययान्त धातूला द्वित्व झालें आहे. तेव्हां अर्थातच येथें हें अभ्यस्त ह्वायि धातूचें आहे असें सिद्ध होतें.

४. जुहावयिषति तसेंच अजूहवत् येथें अभ्यस्त-निमित्त जो सन् तसाच चङ् प्रत्यय तो णिच् प्रत्ययाने व्यवहित असल्यामुळें संप्रसारण होणार नाहीं. याकरितां ' ह्वः संप्रसारणम् ' एवढें निराळें सूत्र केलेंच पाहिजे.

५. अभ्यस्तनिमित्ते असें न म्हणतां मूळचेंच सूत्र कायम ठेवलें तर द्वित्व झाल्यानंतरच संप्रसारण उत्तर खंडामध्यें होईल.

स्यात्। न संप्रसारणे संप्रसारणम् [६.१.३७] इति प्रतिषेधः प्रसज्येत। नैष दोषः। व्यवहितत्वान्न भविष्यति।

**समानाङ्गे प्रसारणप्रतिषेधात्प्रतिषेधः ॥ ५ ॥**

समानाङ्गे प्रसारणप्रतिषेधात्प्रतिषेधः प्राप्नोति। समानाङ्गग्रहणं तत्र चोदयिष्यति॥

**कृदन्तप्रतिषेधार्थं च ॥ ६ ॥**

कृदन्तप्रतिषेधार्थं चाभ्यस्तनिमित्त इति वक्तव्यम्। किं प्रयोजनम्। ह्वायकमिच्छति ह्वायकीयति। ह्वायकीयतेः सन् जिह्वायकीयिषति॥

स तर्हि निमित्तशब्द उपादेयो न ह्यन्तरेण निमित्तशब्दं निमित्तार्थो गम्यते। अन्तरेणापि निमित्तशब्दं निमित्तार्थो गम्यते। तद्यथा। दधित्रपुसं प्रत्यक्षो ज्वरः। ज्वरनिमित्तमिति गम्यते। नड्वलोदकं पादरोगः। पादरोगनिमित्तमिति गम्यते। आयुर्घृतम्। आयुषो निमित्तमिति गम्यते॥ अथवाकारो मत्वर्थीयः। अभ्यस्तमस्मिन्नस्ति

---

नाहीं. कारण–'न संप्रसारणे०' हा निषेध प्राप्त होत आहे.

पण व्यवधान असल्यामुळें अभ्यासाला 'न संप्रसारणे०' हा निषेध प्राप्त होऊं शकणार नाहीं.

( वा. ५ ) पुढें असलेलें संप्रसारण व मागें ज्याला संप्रसारण प्राप्त होतें तो वर्ण हे दोन्ही एका अंगांत सांपडले असतां 'न संप्रसारणे० हा निषेध प्रवृत्त होतो असें म्हटलें असल्यामुळें येथे निषेध प्राप्त होत आहे. 'समानाङ्गग्रहण करावें' असें तेथें ( ६।१।३७ वा. २ ) आचार्य वार्तिककार सांगणारच आहेत.

( वा. ६ ) शिवाय, कृदन्तस्थलीं ह्वा धातूच्या अभ्यस्ताला संप्रसारण न व्हावें याकरितांही 'अभ्यस्तनिमित्त प्रत्यय पुढें असतांना' असें म्हटलें पाहिजे.

त्याचा काय उपयोग ?

उपयोग असा कीं–ह्वा धातूहून ण्वुल्, अक आदेश व युक् होऊन ह्वायक असें रूप झालें आहे. त्याहून इच्छार्थी क्यच्, ह्वायकमिच्छति ह्वायकीयति, क्यजन्ताहून इच्छार्थी सन् प्रत्यय, जिह्वायकीयिषति. येथें संप्रसारण होत नाहीं.[६]

तर मग 'अभ्यस्तनिमित्ते' असा 'निमित्त' शब्द सूत्रांत घालणें भाग आहे. कारण निमित्त शब्द घातल्यावांचून अभ्यस्तनिमित्ते असा निमित्त हा अर्थ प्रतीत होणार नाहीं.

निमित्त शब्द घातल्यावांचूनही निमित्त या अर्थाची प्रतीति होते. जसें 'दधित्रपुसं प्रत्यक्षो ज्वरः' असें म्हटलें असतां दधित्रपुस म्हणजे दह्यांत मिसळलेलें शेंदाड हें ज्वराचें निमित्त आहे असा अर्थ समजला जातो. तसेंच नड्वलोदकं पादरोगः' असें म्हटलें असतां नड्वलोदक म्हणजे डबक्यांतील पाणी हें पादरोगाचें निमित्त आहे असा अर्थ समजला जातो. तसेंच आयुर्घृतम् असें म्हटलें असता घृत हें आयुर्वृद्धीचें निमित्त आहे असा अर्थ समजला जातो.

किंवा अभ्यस्त शब्दामध्यें मत्वर्थीय अकार प्रत्यय केला आहे असें समजावें. अभ्यस्तमस्ति यस्मिन् सोऽभ्यस्तः. म्हणजे जो प्रत्यय असतांना अभ्यस्तसंज्ञा होते तो, असा अभ्यस्त शब्दाचाच अर्थ होतो.

---

६. कारण अभ्यस्तनिमित्त प्रत्यय सन् आणि ह्वा धातु यांमध्यें अक व क्यच् या प्रत्ययांनीं व्यवधान येत आहे.

७. त्रपुस म्हणजे शेंदाड. नड्वलोदक म्ह. ज्यामध्यें घाणेरडें गवत उगवलें आहे अशा डबक्यांतलें पाणी.

सो ऽयमभ्यस्तः अभ्यस्तस्येति ॥ अथवा-भ्यस्तस्येति नैषा ह्वयतिसमानाधिकरणा षष्ठी । का तर्हि । संबन्धषष्ठी । अभ्यस्तस्य यो ह्वयतिः । किं चाभ्यस्तस्य ह्वयतिः । प्रकृतिः । ह्वोऽभ्यस्तस्य प्रकृतेरिति ॥ योगविभागस्तु कर्तव्य एव । नात्र ह्वयतिरभ्यस्तस्य प्रकृतिः । किं तर्हि । ह्वाययतिः ॥

[ बहुलं छन्दसि ॥ ६ । १ । ३४ ॥

चायः की ॥ ६ । १ । ३५ ॥ ]

## अपस्पृधेथामानृचुरानृहुश्चिच्युषे तित्याज श्राताः श्रितमाशीराशीर्तः ॥ ६ । १ । ३६ ॥

अपस्पृधेथामिति किं निपात्यते । स्पर्धेर्लङ्यात्मनेपदानां मध्यमपुरुषस्य द्विवचन आथामि द्विर्वचनं संप्रसारणमकारलोपश्च निपात्यते । इन्द्रश्च विष्णो यदपस्पृधेथाम् । अस्पर्धेथामिति भाषायाम् ॥

---

किंवा अभ्यस्तस्य हे ह्वः याचें समानाधिकरण विशेषण म्ह० अभ्यस्तसंज्ञक जो ह्वा धातु अशा अर्थाचें नव्हे; तर केवळ संबंध दाखविणारें तें विशेषण आहे. म्हणजे अभ्यस्ताचा जो ह्वा धातु असा त्याचा अर्थ समजावा.

अभ्यस्ताचा ह्वा धातु म्हणजे कशा प्रकारचा समजावा ?

अभ्यस्ताचा जो प्रकृतिभूत तो असा समजावा. तेव्हां अभ्यस्ताची प्रकृति असा जो ह्वा धातु त्याला संप्रसारण होतें असा अर्थ होतो. तरी पण योगविभाग केलाच पाहिजे. कारण अजूहवत् येथें ह्वा धातु ही अभ्यस्ताची प्रकृति नव्हे, तर ह्वायि ही प्रकृति आहे.

( सू. ३६ ) अपस्पृधेथाम् येथें निपातनानें काय बरें कार्य साधलें आहे ?

स्पर्ध् धातूहून लङ्, आत्मनेपद, मध्यमपुरुष द्विवचन आथाम् प्रत्यय केला असता धातूला द्विर्वचन, रेफाला संप्रसारण व रेफाच्या मागील अकाराचा लोप हीं कार्यें निपातनानें केलीं आहेत. उदा० इन्द्रश्च विष्णो यदपस्पृधेथाम्. हें वेदामध्यें निपातन केलें आहे म्हणून भाषेमध्यें अस्पर्धेथाम् असें रूप होतें.

---

८. तसेंच जुहावयिषति येथें सन्प्रत्ययान्त ही अभ्यस्ताची प्रकृति आहे. अभ्यस्त संज्ञा ही द्वित्वामुळें होणारी आहे. तेव्हां द्वित्व ज्याला सांगितलें असेल तीच येथें अभ्यस्ताची प्रकृति समजली जाईल. मग प्रत्यक्ष द्वित्व कोणत्याही भागाला होवो.

१. ( सू. ३४ ) वेदामध्यें ह्वा धातूच्या वकाराला संप्रसारण बाहुल्येकरून होतें उदा ० इन्द्राग्नी हुवे.

१. ( सू. ३५ ) वेदामध्यें चाय् धातूला की आदेश बाहुल्येकरून होतो. उदा० नान्यं चिक्युः.

१. ( सू. ३६ ) वेदामध्यें अपस्पृधेथाम् आनृचुः आनृहुः चिच्युषे तित्याज श्राताः श्रितम् आशीः आणि आशीर्तः हे शब्द निपातन केले जातात. यांपैकीं पहिलीं पांच क्रियापदें आहेत. आनृचुः आणि आनृहुः येथें अर्च् व अर्ह् धातूंहून लिट्, प्रथम पुरुष बहुवचन झि प्रत्यय, उस् आदेश व द्वित्व वगैरे कार्यें झालीं आहेत. निपातनामुळें धातूंतील रेफाला संप्रसारण व त्या रेफाच्या मागील अकाराचा लोप झाला आहे. लोकामध्यें आनर्चुः आनर्हुः असेच प्रयोग होतात. चिच्युषे येथें च्यु धातूहून लिट् थास्, त्याला से आदेश, द्वित्व वगैरे कार्यें झालीं आहेत. निपातनामुळें इट् आगम झाला नाहीं. आणि अभ्यासाला संप्रसारण झालें आहे. लोकामध्यें चुच्यविषे असा प्रयोग होतो. तित्याज येथें त्यज् धातूहून लिट्, तिप्, णल् द्वित्व वगैरे कार्यें झालीं आहेत. निपातनामुळें अभ्यासाला संप्रसारण झालें आहे. लोकांमध्यें तत्याज असें होतें. आशीः आणि आशीर्त येथें श्री धातूहून क्विप् आणि क्त प्रत्यय केले असतां धातूला शीर् आदेश निपातनामुळें झाला आहे. आशीर्त येथें क्त प्रत्ययाच्या तकाराला नकार ( ८।२।४२ ) झाला नाहीं. मागें आङ् उपसर्ग आहे.

अपर आह। अपपूर्वात्स्पर्धेर्लङ्यात्मनेपदानां मध्यमपुरुषस्य द्विवचन आथामि संप्रसारणमकारलोपश्च निपात्यते। इन्द्रश्च विष्णो यदपस्पृधेथाम्। अपास्पर्धेथामिति भाषायाम्॥

श्राताः श्रितमिति किं निपात्यते। श्रीणातेः क्ते श्राभावश्रिभावौ निपात्येते। क्व पुनः श्राभावः क्व वा श्रिभावः। सोमे श्राभावोऽन्यत्र श्रिभावः। न तर्हीदानीमिदं भवति श्रितः सोम इति। बहुवचने श्राभावः। न तर्हीदानीमिदं भवति श्रिता नो ग्रहाः। सोमबहुत्वे श्राभावोऽन्यत्र श्रिभावः॥

## न संप्रसारणे संप्रसारणम्॥ ६। १। ३७॥

किमर्थमिदमुच्यते। वचिस्वपियजादीनां ग्रहादीनां च संप्रसारणमुक्तम्। तत्र यावन्तो यणः सर्वेषां संप्रसारणं प्राप्नोति। इष्यते च परस्य यथा स्यान्न पूर्वस्य तच्चान्तरेण यत्नं न सिध्यतीति न संप्रसारणे संप्रसारणम्। एवमर्थमिदमुच्यते॥ किमन्येऽप्येवं विधयो भवन्ति। अतो दीर्घो यञि सुपि च [ ७. ३. १०१;१०२ ] इति। घटाभ्याम्। अकारमात्रस्य दीर्घत्वं कस्मान्न

---

अन्य कोणी एक वैयाकरण असें म्हणतो कीं येथें अप उपसर्गपूर्वक स्पर्ध् धातूहून लङ् आत्मनेपद मध्यमपुरुष द्विवचन आथाम् प्रत्यय केला असतां रेफाला संप्रसारण आणि अकाराचा लोप हीं कार्यें निपातनानें[२] केलीं आहेत. उदा० इन्द्रश्च वायो यदपस्पृधेथाम्. भाषेमध्यें अपास्पर्धेथाम् असें होतें.

आतां श्राताः आणि श्रित येथें काय निपातन केलें आहे ?

क्र्यादिगणांतील श्री धातूहून क्त प्रत्यय केला असतां धातूचें स्थानीं श्रा आणि श्रि या आदेशांचें निपातन केलें आहे.

पण त्यामध्यें श्रा आदेश कोठें होतो व श्रि आदेश कोठें होतो ?

सोमाविषयीं प्रयोग असतां श्रा आदेश आणि इतराविषयीं श्रि आदेश होतो.

तर मग श्रितः सोमः असा सोमाविषयीं श्रि आदेश होत नाहीं काय ?

होतो. पण बहुवचनी प्रयोगामध्यें श्रा आदेश व अन्य ठिकाणीं श्री आदेश होतो.

तर मग आतां श्रिता नो ग्रहाः येथें बहुवचनामध्यें श्रि आदेश होत नाहीं काय ?

होतो. पण सोमांचें बहुत्व दाखवावयाचें असेल तेथेंच श्रा आदेश व इतर ठिकाणीं श्री आदेश होतो.

( सू. ३७ ) हें सूत्र कशाकरितां केलें आहे ?

वच्, स्वप्, यज् वगैरे धातू आणि 'ग्रहिज्या०' या सूत्रांतील ग्रह वगैरे धातू यांना संप्रसारण सांगितलें आहे. या धातूंमध्यें जितके यण् आहेत त्या सर्वांना संप्रसारण प्राप्त होतें. पण त्यापैकीं पुढच्या यणालाच संप्रसारण इष्ट आहे आणि पूर्व यणाला इष्ट नाहीं. ही गोष्ट सूत्र केल्यावांचून साधणार नाहीं म्हणून हें सूत्र[१] केलें आहे.

पण काय हो अन्य विधी अशा प्रकारें म्हणजे अनेक ठिकाणीं होत असतात काय ?

उदा० 'सुपि च' ( ७।३।१०२ ) हा ह्रस्व अकारान्त अंगाला य प्रत्यय पुढें असतांना सांगितलेला दीर्घ घटाभ्याम् येथें सर्वच अकारांना कां बरें होत नाहीं ?

---

२. येथें निपातनामुळेंच अट् आगम ( ६।४।७१ ) झाला नाहीं.

१. ( सू. ३७ ) संप्रसारण पुढें असतांना मागील यणाला संप्रसारण होत नाहीं.

भवति । अस्त्यत्र विशेषः । इयमत्र परिभाषोपतिष्ठते ऽलोन्त्यस्य [ १.१.५२ ] इति । ननु चेदानीमेतया परिभाषयेह शक्यमुपस्थातुम् । नेत्याह न हि वचिस्वपियजादीनां ग्रहादीनां चान्त्यो यणस्ति । एवं तर्ह्यनन्त्यविकारेऽन्त्यसदेशस्य कार्यं भवतीत्यन्त्यसदेशो यो यण् तस्य कार्यं भविष्यति । नैतस्याः परिभाषायाः सन्ति प्रयोजनानि ॥

एवं तर्ह्याचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयति न सर्वस्य यणः संप्रसारणं भवतीति यदयं प्यायः पीभावं शास्ति । कथं कृत्वा ज्ञापकम् । पीभाववचन एतत्प्रयोजनमापीनोऽन्धुः आपीनमूधः एतद्रूपं यथा स्यादिति । यदि चात्र सर्वस्य यणः संप्रसारणं स्यात्पीभाववचनमनर्थकं स्यात् । संप्रसारणे कृते संप्रसारणपरपूर्वत्वे च द्वयोरिकारयोरेकादेशे सिद्धं रूपं स्यादापीनोऽन्धुः आपीनमूध इति । पश्यति त्वाचार्यो न सर्वस्य यणः संप्रसारणं भवतीति ततः प्यायः पीभावं शास्ति ॥ नैतदस्ति ज्ञापकम् । सिद्धे हि विधिरारभ्यमाणो ज्ञापकार्थो भवति न च प्यायः संप्रसारणेन सिध्यति । संप्रसारणे

---

पण येथें विशेष आहे. अलोऽन्त्यस्य ही परिभाषा येथें उपस्थित होतें. त्यामुळें ' सुपि च ' यानें यञादि सुप् पुढें असतांना अकारान्त अंगाला दीर्घ सांगितला तरी तो अन्त्य अकारालाच होतो.

तर मग 'वचिस्वपि०' ' ग्रहिज्या० ' इत्यादि संप्रसारण विधींचें ठिकाणींही अलोऽन्त्य परिभाषा उपस्थित होणें शक्य आहे.

असें म्हणतां येत नाहीं. कारण वचिस्वपियजादिक धातू व ग्रह्यादिक धातू यांमध्यें शेवटीं यण् कोठेंहीं नाहीं.

तरी पण अनन्त्यविकारेऽन्त्यसदेशस्य[२] ह्या परिभाषेनें अंत्याच्या जवळच्याच यणाला संप्रसारण होईल.

पण हीं त्या परिभाषेचीं उदाहरणेंच नाहींत.

असें आहे तर ज्या अर्थी आचार्य पाणिनि प्याय् धातूचे स्थानीं पी आदेशाचें विधान करीत आहेत ( ६।१।२८ ) त्यावरून ते असें सुचवीत आहेत कीं अनेक यणांना संप्रसारण होत नाहीं.

हें ज्ञापक कसें बरें जमतें ?

प्याय् धातूला पी-भाव सांगण्याचें हें प्रयोजन आहे कीं निष्ठा प्रत्यय पुढें असतां प्याय् धातूला पी आदेश होऊन आपीनोऽन्धुः आपीनमूधः अशीं रूपें व्हावीं. जर सर्व यणांना संप्रसारण होईल तर पी आदेशाचें विधान व्यर्थ होईल. मागाहून चालू असलेलें संप्रसारणच सांगावें. प्याय् धातूंतील दोन्ही यकारांना संप्रसारणानें इकार व पूर्वरूप केलें असतां दोन इकारांचा सवर्ण-दीर्घ केल्यानंतर आपीन असें रूप साधतें. तेव्हां अर्थातच सर्व यणांना संप्रसारण होत नाहीं अशी आचार्यांची खास समजूत असली पाहिजे. म्हणूनच ते पी आदेशाचें विधान करीत आहेत.

पण हें ज्ञापक जुळत नाहीं. कारण जी गोष्ट अन्य तऱ्हेनें साधत असेल त्याकरितां सूत्राचा आरंभ केला असतां तो ज्ञापक होतो. आणि प्याय् धातूला संप्रसारण केल्यानें तर आपीन असें रूप साधत नाहीं. प्याय् धातूला संप्रसारणाचें विधान केलें असतां अलोऽन्त्य परिभाषेनें एकट्या अन्त्य यकारालाच संप्रसारण होईल.

---

२. अंत्याला कार्य न येतां जर तें एकच कार्य अंत्याच्या जवळच्याला आणि दूरच्याला असें दोघांना एकदम प्राप्त होईल तर अंत्याच्या जवळच्यालाच करावें, दूरच्याला करूं नये असा त्या परिभाषेचा अर्थ आहे.

हि सत्यन्त्यस्य प्रसज्येत ॥ एवमपि ज्ञापकमेव । कथम् । प्याय इति नैषा स्थानषष्ठी । का तर्हि । विशेषणषष्ठी । प्यायो यो यणिति । तदेतज्ज्ञापयत्याचार्यो न सर्वस्य यणः संप्रसारणं भवतीति यदयं प्यायः पीभावं शास्ति ॥ एवमप्यनैकान्तिकमेतत् । एतावज्ज्ञाप्यते न सर्वस्य यणः संप्रसारणं भवतीति । तत्र कुत एतत्परस्य भविष्यति न पूर्वस्येति ॥

उच्यमानेऽप्येतस्मिन्कुत एतत्परस्य भविष्यति न पूर्वस्येति । एकयोगलक्षणं खल्वपि संप्रसारणम् । तद्यदि तावत्परमभिनिर्वृत्तं पूर्वमप्यभिनिर्वृत्तमेव । प्रसक्तस्य चानभिनिर्वृत्तस्य प्रतिषेधेन निवृत्तिः शक्या कर्तुं नाभिनिर्वृत्तस्य । यो हि भुक्तवन्तं ब्रूयान्मा भुक्था इति किं तेन कृतं स्यात् । अथापि पूर्वमनभिनिर्वृत्तं परमप्यनभिनिर्वृत्तमेव । तत्र निमित्तसंश्रयोऽनुपपन्नो न संप्रसारणे संप्रसारणमिति ॥ नैष दोषः । यत्तावदुच्यत उच्य-

---

तरी पण हें ज्ञापक जमतें. कारण प्यायः ही स्थान-षष्ठी समजूं नये. तर संबंध दाखविणारी षष्ठी समजावी. प्याय् धातूसंबंधी जो यण् असा तेथें अर्थ होतो. तेव्हां स्थान-षष्ठी नसल्यामुळें अलोऽन्त्यपरिभाषा प्रवृत्त होत नाहीं. अर्थात् दोन्ही यकारांना संप्रसारण झाल्यामुळें आपीन हें रूप साधत आहे. असें असतांही आचार्य ज्या अर्थी पी आदेशाचें विधान करीत आहेत त्या अर्थी सर्व यणांना संप्रसारण होत नाहीं असें ते सुचवीत आहेत.

तरी पण हें ज्ञापक मोघम असल्यामुळें निर्णायक होत नाहीं. कारण सर्व यणांना संप्रसारण होत नाहीं एवढयावरून 'पर यणालाच संप्रसारण होतें व पूर्व यणाला होत नाहीं' हें ठरवितां येणें शक्य नाहीं.

पण हें सूत्र केलें असतांही पुढील यणाला संप्रसारण होतें व पूर्वाला होत नाहीं हें कसें ठरतें ?

कारण, एकाच सूत्रानें दोन्ही यणांना संप्रसारण एकदमच प्राप्त होत आहे. तेथें जर पर यणाला संप्रसारण झालें असें गृहीत धरलें तर त्याबरोबर पूर्ण यणालाही संप्रसारण होऊन गेलेंच असलें पाहिजे. आणि जें फक्त प्राप्त झालें असेल पण लक्ष्यामध्यें प्रवृत्त झालें नसेल त्याचीच निवृत्ति प्रतिषेधानें करतां येते. लक्ष्यामध्यें प्रवृत्त झालेल्याची निवृत्ति निषेधानें करतां येणें शक्य नाहीं. उदा० ज्याचें भोजन झालें आहे त्याला जेवणाचा निषेध केला तर त्याचा काय उपयोग होणार ? आतां पूर्व यणाला संप्रसारण अद्याप व्हावयाचें आहे अशा अवस्थेंत निवृत्ति करणें शक्य आहे असें म्हणशील तर त्या अवस्थेंत पर यणाला सुद्धां संप्रसारण झालेलें नसतें. तेव्हां निषेधाचें निमित्त जें संप्रसारण तेंच पुढें नसल्यामुळें निषेधाची प्रवृत्ति होणार नाहीं.

हा दोष येत नाहीं. 'हें सूत्र केलें असतांही पर यणाला संप्रसारण होतें व पूर्वाला होत नाहीं हें कशावरून ?' असें जें म्हटलें आहे त्यासंबंतार्थ्य येत आहे.

---

३. कदाचित् याच्या उलट म्ह. पूर्व यणाला संप्रसारण होतें, पर यणाला होत नाहीं असेंही समजणें शक्य आहे. कारण कोणालाही एकाला संप्रसारण होत नाहीं अशी कल्पना केली कीं पी आदेशाला चारि-

४. संप्रसारण पुढें असतांना असें प्रकृत निषेधाचें निमित्त असल्यामुळें पुढील संप्रसारण झाल्यानंतरच हा निषेध प्रवृत्त होणार आहे.

मात्रे ऽप्येतस्मिन्कुत एतत्परस्य भविष्यति न पूर्वस्येतीहेङ्गितेन चेष्टितेन निमिषितेन महता वा सूत्रप्रबन्धेनाचार्याणामभिप्रायो गम्यते। एतदेव ज्ञापयति परस्य भविष्यति न पूर्वस्येति यदयं न संप्रसारणे संप्रसारणमिति प्रतिषेधं शास्ति ॥ यदप्युच्यत एकयोगलक्षणं खल्वपि संप्रसारणं तद्यदि तावत्परमभिनिर्वृत्तं पूर्वमप्यभिनिर्वृत्तमेव प्रसक्तस्य चानभिनिर्वृत्तस्य प्रतिषेधेन निवृत्तिः शक्या कर्तुमित्यस्तूभयोरभिनिर्वृत्तिः। न वयं पूर्वस्य प्रतिषेधं शिष्मः। किं तर्हि। संप्रसारणाश्रयं यत्प्राप्नोति तस्य प्रतिषेधम्। ततः पूर्वत्वे प्रतिषिद्धे यणादेशेन सिद्धम् ॥ यदप्युच्यतेऽथापि पूर्वमनभिनिर्वृत्तं परमप्यनभिनिर्वृत्तमेव तत्र निमित्तसंश्रयोऽनुपपन्न इति ताद्र्थ्यात्ताच्छब्द्यं भविष्यति। तद्यथा। इन्द्रार्था स्थूणेन्द्र इति। एवमिहापि संप्रसारणार्थे संप्रसारणम्। तद्यत्प्रसारणार्थं प्रसारणं तस्मिन्प्रतिषेधो भविष्यति ॥

---

याने असें सांगावयाचें आहे कीं—मानसिक धोरण, शरीरव्यापार, नेत्रव्यापार व प्रत्यक्ष सूत्ररूपानें बोलणें अशा अनेक कारणांवरून आचार्यांचा अभिप्राय जाणिला जातो. तेव्हां 'न संप्रसारणे॰' हा जो निषेध केला आहे तोच असें सुचवितो कीं— पर यणाला संप्रसारण होतें व पूर्व यणाला होत नाहीं.

आणखीही जें म्हटलें आहे कीं "एकाच सूत्रानें पूर्व व पर अशा दोन्ही यणांना संप्रसारण एकदमच प्राप्त होत आहे. त्यांत जर पर यणाला संप्रसारण झालेलें असेल तर त्याबरोबर पूर्व यणाला संप्रसारण होऊन गेलें असलेंच पाहिजे. आणि जें फक्त प्राप्त झालें असेल पण लक्ष्यांत अद्यापि झालेलें नाहीं त्याचीच निवृत्ति होऊं शकते. झालेल्याची निवृत्ति होत नाहीं." त्यासंबंधानें असें म्हणतां येतें कीं पूर्व व पर अशा दोन्ही यणांना संप्रसारण होवो. त्यांमध्यें कांहीं आम्ही 'न संप्रसारणे॰' यानें पूर्व यणाला संप्रसारणाचा निषेध करूं इच्छित नाहीं. तर संप्रसारण पुढें असतांना पूर्वीच्या संप्रसारणाला जें कांहीं कार्य प्राप्त होतें त्याचा निषेध करतों. तेव्हां पूर्वरूपाचा निषेध झाला असतां यणादेश केल्यानें रूप सिद्ध होत आहे.

आणखीही जें म्हटलें आहे कीं "पूर्व यणाला संप्रसारण प्राप्त झालें त्याच वेळीं त्याचा निषेध करावा तर पर यणालाही त्या वेळीं संप्रसारण फक्त प्राप्त झालेलें परंतु न झालेलें असल्यामुळें संप्रसारण पुढें नाहीं म्हणून निषेध करतां येत नाहीं." त्याच्याही संबंधानें असें म्हणतां येतें कीं ज्या पदार्थाकरितां जी वस्तु घेतली जाते त्या वस्तूला त्या पदार्थाचा शब्द देतां येतो. जसें इन्द्राकरितां उभारिलेल्या ध्वजाला इन्द्र असेंच म्हणतात. तसें या प्रकृत सूत्रामध्यें 'संप्रसारणे' असा जो सप्तम्यन्त शब्द आहे तो त्या संप्रसारणाकरितां जो यण् म्हणजे ज्याला संप्रसारण होतें असा यण् या अर्थाचा आहे. तेव्हां संप्रसारणाकरितां जो यण् तो पुढें असतांना मागील यणाला संप्रसारणाचा निषेध होईल.

---

५. विध्यति येथें व्यध् धातूमधील यकाराला संप्रसारणानें इकार झाला असतां जरी त्याच्या बरोबरच मागील वकाराला संप्रसारणानें उकार झाला तरी त्या उकाराला प्रकृत सूत्रानें पूर्वरूपाचा (६।१।१०८) निषेध झाला असतां यणानें वकार होऊन पूर्वीप्रमाणेंच विध्यति हें रूप साधेल. तात्पर्य, संप्रसारणाचा निषेध झाला नाहीं तरी पूर्वरूपाच्या निषेधानें काम भागेल.

अथ संप्रसारणमिति वर्तमाने पुनः संप्रसारणग्रहणं किमर्थम् ।

**प्रसारणप्रकरणे पुनः प्रसारणग्रहणमतोऽन्यत्र प्रसारणप्रतिषेधार्थम् ॥ १ ॥**

संप्रसारणमिति वर्तमाने पुनः प्रसारणग्रहण एतत्प्रयोजनं विदेशस्थमपि यत्संप्रसारणं तस्यापि प्रतिषेधो यथा स्यात् । व्यथो लिटि [ ७. ४. ६८ ] विव्यथे ॥ नैतदस्ति प्रयोजनम् । हलादिशेषापवादोऽत्र संप्रसारणम् ॥ इदं तर्हि । श्वयुवमघोनामतद्धिते [ ६. ४. १३३ ] यूना यूने ॥ उच्यमानेऽप्येतस्मिन्न सिध्यति । किं कारणम् । उकारेण व्यवधानात् । एकादेशे कृते नास्ति व्यवधानम् । एकादेशः पूर्वविधौ स्थानिवद्भवतीति स्थानिवद्भावाद् व्यवधानमेव ॥ एवं तर्हि

**समानाङ्गग्रहणं च ॥ २ ॥**

समानाङ्गग्रहणं च कर्तव्यम् । न संप्रसारणे संप्रसारणं समानाङ्ग इति वक्तव्यम् ॥

**तत्रोपोषुषि दोषः ॥ ३ ॥**

तत्रोपोषुषि दोषो भवति । उपोषुषा उपोषुषे उपोषुषीति ॥

---

आतां येथें ‘ ह्वः संप्रसारणम् ’ (६।१।३२) येथून संप्रसारण पदाची अनुवृत्ति येत असतांना पुनः येथें संप्रसारण-ग्रहण केलें आहे तें कशाकरितां ?

( वा. १ ) संप्रसारण-ग्रहणाची अनुवृत्ति येत असतांना पुन: येथें संप्रसारण-ग्रहण केलें आहे तें विदेशस्थ म्ह० ह्या प्रकरणाशिवाय इतर ठिकाणीं सांगितलेल्या संप्रसारणाचाही निषेध व्हावा म्हणून केलें आहे. त्यामुळें विव्यथे येथें विदेशस्थ ‘व्यथो लिटि’ (७।४।६८) याचाही निषेध झाला आहे.

हें प्रयोजन नाहीं. कारण तें संप्रसारण ‘ हलादिः शेषः ’ ( ७।४।६० ) याचा अपवाद आहे.

तर मग यूना यूने वगैरे स्थलीं ‘ श्वयुव० ’ ( ६।४।१३३ ) या विदेशस्थ संप्रसारणाचा निषेध होणें, हें येथील संप्रसारण-ग्रहणाचें प्रयोजन समजावें.

पण येथें संप्रसारण-ग्रहण केलें तरीही यूना इत्यादि स्थलीं निषेध सिद्ध होत नाहीं.

काय कारण ?

कारण असें कीं उकारानें व्यवधान असल्यामुळें निषेध येऊं शकत नाहीं.

यु-उ येथें सवर्णदीर्घ एकादेश केल्यानंतर व्यवधान रहात नाहीं.

पण पूर्व यणाला संप्रसारणाचा निषेध कर्तव्य असतांना ‘ अचः परस्मिन्० ’ ( १।१।५७ ) यानें एकादेशाला स्थानिवद्भाव होत असल्यामुळें व्यवधान कायमच राहतें.

तर मग—

( वा. २ ) ‘ समानाङ्ग ’ शब्द सूत्रांत घालावा. म्हणजे ‘ न संप्रसारणे संप्रसारणं समानाङ्गे ’ असें सूत्र करावें.

( वा. ३ ) ‘ न संप्रसारणे० ’ या निषेधाविषयीं समानाङ्गग्रहण केलें तर उपोषिवस् शब्दाचे ठिकाणीं दोष येत आहे. उदा० उपोषुषा, उपोषुषे, उपोषुषि.

---

६. तेव्हां उत्सर्गसमानदेशा अपवादाः, म्हणजे सामान्यशास्त्र ज्या ठिकाणीं होतें तेथेंच अपवादशास्त्र होतें या न्यायानें ‘ व्यथो लिटि ’ यानें सांगितलेलें संप्रसारण यकारालाच होईल.

७. मागें ( ६।१।१२ टीप १० ) पहा.

८. उप उपसर्गपूर्वक वस् धातूहून लिट् , त्याला

**न वा यस्याङ्गस्य प्रसारणप्राप्तिस्तस्मिन्प्राप्तिप्रतिषेधात् ॥ ४ ॥**

न वैष दोषः । किं कारणम् । यस्याङ्गस्य प्रसारणप्राप्तिस्तस्मिन्द्वितीया या प्राप्तिः सा प्रतिषिध्यते । अत्र च वसिः क्वसावङ्गं क्वस्वन्तं पुनर्विभक्तौ ॥ अथवा यस्याङ्गस्य प्रसारणप्राप्तिरित्यनेन किं क्रियते । यावद् ब्रूयात्प्रसक्तस्यानभिनिर्वृत्तस्य प्रतिषेधेन निवृत्तिः शक्या कर्तुमिति । अत्र च यदा वसेर्न तदा क्वसोर्यदा च क्वसोरभिनिर्वृत्तं तदा वसेर्भवति ॥ अथवा यस्याङ्गस्य प्रसारणप्राप्तिरित्यनेन किं क्रियते । यावद् ब्रूयादसिद्धं बहिरङ्गमन्तरङ्ग इति । असिद्धत्वाद्बहिरङ्गलक्षणस्य वसुसंप्रासारणस्यान्तरङ्गलक्षणः प्रतिषेधो न भविष्यति ॥

**ऋचि त्रेरुत्तरपदादिलोपश्छन्दसि ॥ ५ ॥**

ऋचि त्रेः संप्रसारणं वक्तव्यम् । उत्तरपदादिलोपश्छन्दसि वक्तव्यः । तृचं

---

(वा. ४) हा दोष येत नाहीं.

काय कारण ?

कारण असें कीं संप्रसारण पुढें असतांना असें या निषेधाला निमित्त असलेलें संप्रसारण ज्या अंगामुळें झालें असेल त्याच अंगामध्यें दुसऱ्यानदा जी संप्रसारणाची प्राप्ति येत असेल त्या प्राप्तीचा प्रकृत सूत्रानें निषेध केला जात आहे. आणि येथें तर ज्या वस् धातूला संप्रसारण झालें आहे त्याला अंगसंज्ञा क्वसु प्रत्ययामुळें आहे. आणि क्वसु प्रत्ययान्ताला जें संप्रसारण झालें आहे त्याला अंगसंज्ञा पुढील विभक्तिप्रत्ययामुळें आहे.

अथवा 'ज्या अंगामध्यें संप्रसारण झालें आहे त्याच अंगामध्यें जी द्वितीय संप्रसारणाची प्राप्ति तिचा निषेध होतो' या म्हणण्यानें काय सुचविलें आहे तर फक्त प्राप्त असून लक्ष्यामध्यें न झालेल्याचीच या निषेधानें निवृत्ति केली जात आहे. आणि प्रकृत स्थलीं तर जेव्हां वस् धातूला संप्रसारण होतें तेव्हां क्वसु प्रत्ययाला संप्रसारण झालेलें नसतें, व जेव्हां क्वसु प्रत्ययाला संप्रसारण प्राप्त होतें तेव्हां तर वस् धातूला संप्रसारण पूर्वींच होऊन गेलेलें असतें. अथवा ज्या अंगामध्यें संप्रसारण झालें आहे, इत्यादि म्हणण्यानें काय केलें आहे, तर 'असिद्धं बहिरङ्गमन्तरङ्गे' असें म्हटलें असतां जो अर्थ मनांत येतो तो मनांत घेऊन हें म्हटलें आहे. म्हणजे वसुसंप्रसारण बहिरंग असल्यामुळें असिद्ध आहे म्हणून अशा ठिकाणीं अंतरंग निषेध प्रवृत्त होणार नाहीं.

(वा. ५) ऋच् शब्द पुढें असतांना त्रि शब्दाला संप्रसारण होतें आणि उत्तरपदाच्या आद्य वर्णाचा लोप होतो वेद हा अर्थ गम्यमान असतांना असें वचन करावें. उदा० तृचं सूक्तम्, तृचं साम.

---

क्वसु आदेश (३।२।१०८), धातूला संप्रसारण (६।१।१५), द्वित्व वगैरे कार्ये केलीं असतां इट् आगम (७।२।६७) होऊन उपोषिवस् शब्द तयार होतो. या शब्दाच्या पुढें भ संज्ञा होण्यासारखे टा ङे ङि वगैरे प्रत्यय केले असतां भ संज्ञा होऊन क्वसु प्रत्ययाला संप्रसारण (६।४।१३१) होतें. व तशा ठिकाणीं क्वसु प्रत्ययाचें वलादित्व नष्ट होत असल्यामुळें क्वसु प्रत्ययाला पूर्वींच इट् आगम होत नाहीं, त्यामुळें उपोषुषा उपोषुषे उपोषुषि अशीं रूपें होतात. येथें वस् धातूला जें संप्रसारण होतें त्याचा प्रकृत सूत्रानें निषेध होऊं लागेल. कारण क्वसु प्रत्ययाला जें संप्रसारण झालें तें पुढें आहे आणि वस् धातु आणि क्वसु प्रत्यय हे एका अंगांत आहेतच.

सूक्तम्। तृचं साम। छन्दसीति किम्। त्र्यृचानि ॥

**रयेर्मतौ बहुलम् ॥ ६ ॥**

रयेर्मतौ संप्रसारणं बहुलं वक्तव्यम्। आ रेवानेतु नो विशः। न च भवति। रयिमान्पुष्टिवर्धनः ॥

**कक्ष्यायाः संज्ञायाम् ॥ ७ ॥**

कक्ष्यायाः संज्ञायां मतौ संप्रसारणं वक्तव्यम्। कक्षीवन्तं य औशिजः। कण्वः कक्षीवान्। संज्ञायामिति किमर्थम्। कक्ष्यावान्हस्ती ॥

**[ लिटि वयो यः ॥ ६।१।३८ ]**

**[1]वश्वास्यान्यतरस्यां किति ॥ ६। १। ३९ ॥**

वश्वास्यग्रहणं शक्यमकर्तुम्। अन्यतरस्यां किति वेञो न संप्रसारणं भवतीत्येव सिद्धम्। कथम्। प्रसारणे कृत उवङादेशे च द्विर्वचनं सवर्णदीर्घत्वम्। तेन सिद्धं ववतुः ववुः ऊवतुः ऊवुः। वयेरपि नित्यं यकारस्य प्रतिषेधः संप्रसारणस्य। ऊयतुः ऊयुः। त्रैशब्द्यं चेह साध्यं तच्चैवं सति सिद्धं भवति ॥ यद्येवं ववौ वविथेति न

---

येथें छन्दसि असें म्हणण्याचें काय प्रयोजन ?

त्र्यृचानि[1] कर्माणि येथें संप्रसारण न व्हावें.

( वा. ६ ) मतुप् प्रत्यय पुढें असतांना रयि शब्दांतील यकाराला वेदामध्यें बाहुल्येकरून संप्रसारण होतें, असें वचन करावें. जसें— आ रेवानेतु नो विशः. क्वचित् संप्रसारण होत नाहीं. जसें— रयिमान् पुष्टिवर्धनः

( वा. ७) मतुप् प्रत्यय पुढें असतांना कक्ष्या शब्दांतील यकाराला संप्रसारण होतें संज्ञा गम्यमान असतांना असें वचन करावें. जसें—कक्षीवन्तं य औशिजः, कण्वः कक्षीवान्.

येथें संज्ञायाम् असें कशाकरितां म्हटलें आहे ?

कक्ष्यावान् हस्ती. येथें संज्ञा नसल्यामुळें संप्रसारण होत नाहीं.

( सू. ३९ ) येथें वश्वास्य हे शब्द सूत्रांत घातले नाहींत तरी चालेल. ' अन्यतरस्यां किति वेञः[2] ' एवढेंच सूत्र पुरें आहे. कित् लिट् पुढें असतांना वेञ् धातूला विकल्पानें संप्रसारण होत नाहीं असा अर्थ झाल्यामुळेंच सर्व साधत आहे.

तें कसें ?

असें कीं संप्रसारण केलें नाहीं तेव्हां ववतुः व ववुः तसेंच संप्रसारणपक्षीं संप्रसारण व उवङ् केल्यानंतर द्विर्वचन व सवर्णदीर्घ झाले असतां ऊवतुः ऊवुः हीं रूपें साधतील. आणि एकदां वय् आदेश केला असतां यकाराला संप्रसारणाचा निषेध नित्य असल्यामुळें ऊयतुः ऊयुः हींही रूपें साधतात. कोणीकडून तरी तीन प्रकारचीं रूपें येथें साधलीं पाहिजेत. तीं अशा रीतीनें साधत आहेत.

---

१. तीन ऋचा ज्या कर्मांमध्यें आहेत अशीं कर्में.

१. ( सू. ३८ ) वेञ् धातूला जो वय् आदेश ( २।४।४१ ) होतो त्यांतील यकाराला संप्रसारण होत नाहीं, लिट् पुढें असतांना. उदा० उवाय ऊयतुः.

१. ( सू. ३९ ) वय् आदेशांतील यकाराला वकार आदेश विकल्पानें होतो कित् लिट् पुढें असतांना. उदा०— ऊवतु, ऊयतुः.

२. वेञः हें पुढील सूत्र निराळें न करतां वेञः हें पद याच सूत्रामध्यें घालावें.

सिध्यति । ल्यपि च [ ४१ ] इत्यनेन चकारेण लिडनुकृष्यते । तस्मिन्नित्ये प्रसारणप्रतिषेधे प्राप्त इयं किति विभाषारभ्यते ॥

[ वेञः ॥ ६।१।४० ॥

ल्यपि च ॥ ६।१।४१॥

ज्यश्च ॥६।१।४२॥

व्यश्च ॥ ६।१।४३ ॥

विभाषा परेः ॥ ६।१।४४ ॥ ]

इति श्रीभगवत्पतञ्जलिविरचिते व्याकरणमहाभाष्ये षष्ठस्याध्यायस्य प्रथमे पादे द्वितीयमाह्निकम् ॥

---

असें आहे तर ववौ व वविथ हीं रूपें साधत नाहींत. कारण, आतां कित् लिटामध्यें वेञ् धातूला संप्रसारणनिषेध आहे. व येथें तर कित् लिट् नाहीं. तेव्हां अभ्यासाला संप्रसारण प्राप्त होत आहे.

ल्यपि च या उत्तर सूत्रांतील चकारानें लिटाचा अनुकर्ष करून लिटामध्यें वेञ् धातूला संप्रसारण-निषेध केल्यानें ववौ इत्यादि रूपेंही साधत आहेत. हा जो चकारानें लिटामध्यें नित्य संप्रसारण-निषेध सांगितला आहे त्याचा कित् लिट् पुढें असतांना प्रकृत सूत्रानें विकल्प केला आहे.

याप्रमाणें भगवान् पतंजलींनीं रचिलेल्या व्याकरणमहाभाष्यांतील सहाव्या अध्यायाच्या पहिल्या पादांतील दुसरें आह्निक समाप्त झालें.

---

१. ( सू. ४० ) वेञ् धातूला लिट् पुढें असतांना संप्रसारण होत नाहीं. उदा०- ववौ ववतुः.

१. ( सू. ४१ ) ल्यप् पुढें असतांना वेञ् धातूला संप्रसारण होत नाहीं. उदा०- प्रवाय.

१. ( सू. ४२ ) ल्यप् प्रत्यय पुढें असतांना ज्या धातूला संप्रसारण होत नाहीं. उ०- प्रज्याय.

१. ( सू. ४३ ) ल्यप् पुढें असतांना व्या धातूला संप्रसारण होत नाहीं. उदा०- प्रव्याय.

१. ( सू. ४४ ) परि या उपसर्गाच्या पुढील व्या धातूला विकल्पानें संप्रसारण होत नाहीं ल्यप् प्रत्यय पुढें असतांना. उदा०- परिवीय, परिव्याय.

अध्याय ६ पाद १ आह्निक २ समाप्त.

## [1]आदेच उपदेशेऽशिति ॥६।१।४५॥

कथमिदं विज्ञायते । एज्य उपदेश इति । आहोस्विदेजन्तं यदुपदेश इति । किं चातः । यदि विज्ञायत एज्य उपदेश इति ढौकिता त्रौकिता अत्रापि प्राप्नोति । अथ विज्ञायत एजन्तं यदुपदेश इति न दोषो भवति ॥ ननु चैजन्तं यदुपदेश इत्यपि विज्ञायमानेऽत्रापि प्राप्नोति । एतदपि हि व्यपदेशिवद्भावेनैजन्तं भवत्युपदेशे । अर्थवता व्यपदेशिवद्भावः ॥ ननु चैज्य उपदेश इत्यपि विज्ञायमाने न दोषो भवति । अशितीत्युच्यते न चात्राशितं पश्यामः । ननु च ककार एवात्राशित् । न ककारे भवितव्यम् । किं कारणम् । नञिवयुक्तमन्यसदृशाधिकरणे तथा ह्यर्थगतिः । नञ्युक्तमिवयुक्तं चान्यस्मिंस्तत्सदृशे कार्यं विज्ञायते तथा ह्यर्थो गम्यते । तद्यथा । लोकेऽब्राह्मणमानयेत्युक्ते ब्राह्मणसदृशमानयति नासौ लोष्टमानीय कृती भवति । एवमिहाप्यशितीति शित्प्रतिषेधाद-

(सू. ४५) उपदेशीं जो एच् त्याला आत्व होतें असा या सूत्राचा अर्थ आहे, किंवा उपदेशीं जें एजन्त त्याला आत्व होतें असा आहे ?

मग यांत काय बरें विशेष आहे ?

जर उपदेशीं जो एच् त्याला आत्व होतें असा अर्थ समजला तर ढौकिता त्रौकिता येथेंही औकाराला आत्व प्राप्त होतें. आतां उपदेशकालीं जें एजन्त त्याला आत्व होतें असें समजलें तर येथें दोष येत नाहीं.

पण उपदेशीं जें एजन्त असें समजलें तरीही ढौकिता इत्यादि स्थलीं औकाराला आत्व प्राप्त होत आहे. कारण उपदेशीं असलेला ढौक् यांतील औकार हाच व्यपदेशिवद्भावानें एजन्त समजला जात आहे.

तसें समजतां येत नाहीं. कारण–अर्थवान् म्हणजे असहाय असतां व्यपदेशिवद्भाव होत असतो.

पण उपदेशीं जो एच् त्याला आत्व होतें या पक्षींही येथें दोष येत नाहीं. कारण, अशिति म्ह० शिद्भिन्न पुढें असतांना असें म्हटलें आहे. आणि येथें तर शिद्भिन्न कोणी पुढें दिसत नाहीं.

पण येथें ककार हाच शिद्–भिन्न पुढें आहे ना ?

ककार वगैरे कोणीतरी शिद्भिन्न चालणार नाहीं. कारण, ' नञिवयुक्तमन्यसदृशाधिकरणे तथा ह्यर्थगतिः ' असा न्याय आहे. म्हणजे ज्या ठिकाणीं नञ् किंवा इव या शब्दाचा प्रयोग असेल तेथें जें कार्य सांगितलें असेल तें अशाच ठिकाणीं होतें कीं त्या नञाचा किंवा इवाचा ज्याच्याशीं संबंध असेल त्याहून निराळा आणि त्याच्या सारखा असा पदार्थ असला पाहिजे. कारण लोकामध्यें तेथें तसाच अर्थ मनांत येतो. उदा० अब्राह्मणमानय असें म्हटलें असतां तेथें ब्राह्मणाहून भिन्न पण ब्राह्मणासारखा असा दुसरा कोणी तरी मनुष्यच आणिला जातो. तेथें जर काष्ठ किंवा लोष्ट वगैरें कांहीं तरी आणिलें तर त्याला कोणी शहाणा म्हणणार नाहीं. याप्रमाणें येथेंही अशिति असें म्हटलें असल्यामुळें शित् नव्हे पण शितासार-

---

१. (सू. ४५) उपदेशीं एजन्त जो धातु त्याच्या एचाला आकार आदेश होतो. इत्संज्ञक शकार आरंभीं असलेला प्रत्यय पुढें असतांना मात्र होत नाहीं. उदा०– दधौ.

२. धातुपाठामध्यें जो धातूंचा उपदेश केला आहे तेथें ढौक् असा ककारान्त उपदेश करण्याविषयीं तात्पर्य आहे. औकारान्त उपदेश दाखविण्याविषयीं तात्पर्य नाहीं.

न्यस्मिन्नशिति शित्सदृशे कार्यं विज्ञास्यते। किं चान्यदशिच्छित्सदृशम्। प्रत्ययः॥ इह तर्हि ग्लै ग्लानीयम् म्लै म्लानीयम् वेञ् वानीयम् शो निशानीयम् परत्वादायादयः प्राप्नुवन्ति। ननु चैजन्तं यदुपदेश इत्यपि विज्ञायमाने परत्वादायादयः प्राप्नुवन्ति। सन्तु। आयादिषु कृतेषु स्थानिवद्भावादेज्ग्रहणेन ग्रहणात्पुनरात्त्वं भविष्यति। ननु चैज्य उपदेश इत्यपि विज्ञायमाने परत्वादायादिषु कृतेषु स्थानिवद्भावादेज्ग्रहणेन ग्रहणादात्त्वं भविष्यति। न भविष्यति। अनल्विधौ स्थानिवद्भावोऽल्विधिश्चायम्॥ एवं तर्ह्येजन्तं यदुपदेश इत्यपि विज्ञायमाने हूतः हूतवानित्यत्रापि

---

त्याच जर कोणी पुढें असेल तरच तेथें आत्व होईल. आतां शितापेक्षां निराळा आणि शितासारखा असा कोण बरें समजावा ?

अर्थात् प्रत्यय. तर मग ग्लै धातूचें ग्लानीयम् हें रूप; म्लै धातूचें म्लानीयम्; वेञ् धातूचें वानीयम्; तसेंच शो धातूचें निशानीयम् हें रूप. या सर्व स्थळीं परत्वास्तव आयादिक प्राप्त होतात.[4]

पण उपदेशीं जें एजन्त त्याला आत्व होतें या पक्षींही येथें आत्वापेक्षां पर असल्यामुळें आयादिक आदेश प्राप्त होत आहेतच.

परंतु त्या वेळीं आय् वगैरे आदेश झाले तरी दोष येत नाहीं. कारण आयादिक केले असतां स्थानिवद्भावानें (१।१।५६) त्यांना एजन्त समजून मागाहून आत्व होईल.

तर मग उपदेशामध्यें जो एच् त्याला आत्व होतें या पक्षींही परत्वास्तव आय् वगैरे आदेश केले असतां त्यांना स्थानिवद्भावामुळें एच् समजून आत्व होईल.

असें म्हणणें बरोबर नाहीं. कारण अनल्विधि म्हणजे जो विधि अलाला म्हणजे केवळ वर्णाला नसतो तो कर्तव्य असतांना स्थानिवद्भाव सांगितला आहे. आणि उपदेशामधील एचाला म्हणजे वर्णाला आत्व येथें सांगितलें आहे. तेव्हां आत्व करणें हा अल्विधि होत आहे.[5]

तर मग उपदेशीं जें एजन्त त्याला आत्व होतें याही पक्षीं दुसरीकडे दोष येतोच. तो असा कीं हूतः हूतवान् येथें आत्व होऊं लागेल.[6]

---

३. तेव्हां उपदेशीं जो एच् त्याला आत्व होतें असा अर्थ घेतला तरी ढौक् धातूमधील औकाराला आत्व होणार नाहीं. कारण ककार हा पुढें प्रत्यय नाहीं.

४. शिद्भिन्न प्रत्यय पुढें असतांना आत्व होतें असें म्हटलें असल्यामुळें ग्लै वगैरे धातूंना प्रत्यय केल्याशिवाय पूर्वी आत्व करतां येत नाहीं. म्हणून अनीयर् प्रत्यय अगोदर केला असतां आय् वगैरे आदेश परत्वास्तव होऊं लागतील.

५. तेव्हां स्थानिवद्भाव होत नसल्यामुळें आय् आदेश झाल्यानंतर आत्व होणार नाहीं असा ' एचाला आत्व होतें ' या पक्षीं दोष येतो. आतां एजन्ताला आत्व होतें असें म्हटलें तरी एच् या अलाची जरूर असल्यामुळें आत्व हें अल्विधि होणारच. तरी पण स्थानिवद्भाव झाला नाहीं तरी आय् आदेश केल्यानंतर ग्लाय् हें उपदेशीं एजन्त आहे अशा दृष्टीनें आत्व करतां येत असल्यामुळें दोष नाहीं.

६. ग्लानीयम् येथें आय् आदेश झाल्यानंतर आत्व झालें असतां जसें रूप साधतें तसें हूतः येथें संप्रसारण झाल्यानंतर उपदेशीं एजन्त आहे म्हणून आत्व झालें तर रूप बिघडेल.

प्राप्नोति । भवत्येवात्रात्त्वम् । श्रवणं कस्मान्न भवति । पूर्वत्वमस्य भवति । न सिध्यति । इदमिह संप्रधार्यम् । आत्त्वं क्रियतां पूर्वत्वमिति किमत्र कर्तव्यम् । परत्वात्पूर्वत्वम् । एवं तर्हीदमिह संप्रधार्यम् । आत्त्वं क्रियतां संप्रसारणमिति किमत्र कर्तव्यम् । परत्वादात्त्वम् । नित्यं संप्रसारणम् । कृतेऽप्यात्त्वे प्राप्नोत्यकृतेऽपि । आत्त्वमपि नित्यम् । कृतेऽपि संप्रसारणे प्राप्नोत्यकृतेऽपि । अनित्यमात्त्वं न हि कृते संप्रसारणे प्राप्नोति । किं कारणम् । अन्तरङ्गं पूर्वत्वं तेन बाध्यते । यस्य च लक्षणान्तरेण निमित्तं विहन्यते न तदनित्यम् । न च संप्रसारणमेवात्त्वस्य निमित्तं विहन्ति । अवश्यं लक्षणान्तरं पूर्वत्वं प्रतीक्ष्यम् । उभयोर्नित्ययोः परत्वादात्त्वे कृते संप्रसारणं संप्रसारणपूर्वत्वम् । कार्यकृतत्वात्पुनरात्त्वं न भविष्यति । अथापि कथंचिदात्त्वमनित्यं स्यात् । एवमपि न दोषः । उपदेशग्रहणं न करिष्यते ॥

---

येथें आत्व होतेंच.

तर मग येथें आकाराचें श्रवण कां बरें होत नाहीं ?

'संप्रसारणाच्च' (६।१।१०८) यानें पूर्वरूप झाल्यामुळें श्रवण होत नाहीं. तरी पण इष्ट सिद्ध होत नाहीं. कारण संप्रसारण केल्यानंतर आत्व अगोदर करावें किंवा पूर्वरूप करावें हा विचार प्रथमतः येथें केला पाहिजे.

मग काय बरें प्रथमतः करावें ?

पर असल्यामुळें प्रथमतः पूर्वरूप करणें न्याय्य आहे. तर मग त्याचेही अगोदर असा विचार उत्पन्न होतो कीं येथें पूर्वी आत्व करावें किंवा संप्रसारण करावें.

मग यांत पूर्वी काय बरें करावें ?

पर असल्यामुळें आत्व अगोदर करावें.

पण आत्व केलें अथवा न केलें तरी संप्रसारण हें प्राप्त होत असल्यामुळें तें नित्य आहे ना ?

आत्वही नित्य आहे. कारण संप्रसारण केलें अथवा न केलें तरी आत्वाची प्राप्ति येत आहे.

पण आत्व अनित्य आहे. कारण संप्रसारण केल्यानंतर आत्व प्राप्त होत नाहीं.

काय कारण ?

कारण असें कीं पूर्वरूप अन्तरंग असल्यानें त्यानें आत्वाचा बाध केला जातो म्हणून आत्व अनित्य होय.

पण हें म्हणणें बरोबर दिसत नाहीं. कारण ज्याच्या निमित्ताचा दुसऱ्या शास्त्रानें विघात होतो त्याला अनित्य म्हणतां येत नाहीं. कारण केवळ संप्रसारण करण्यानेंच आत्वाच्या निमित्ताचा नाश होत नाहीं, तर त्या कामीं पूर्वरूप शास्त्राकडे नजर टाकावी लागते. तेव्हां दोघांनाही नित्यत्व सारखेंच असल्यामुळें पर असल्यामुळें प्रथमतः परत्वास्तव आत्व करून मग संप्रसारण करावयाचें. संप्रसारण केल्यानंतर पूर्वरूप करावयाचें. तेव्हां पूर्वी एकदां आत्व केलें असल्यामुळें पूर्वरूपानंतर पुनः आत्व होणार नाहीं.

आतां जरी कसें तरी आत्वाला अनित्य ठरविलें तरीही दोष येत नाहीं. कारण सूत्रांतील उपदेश शब्दच मुळीं काढून टाकला म्हणजे सर्व

---

७. तात्पर्य, आत्वही नित्यच होत आहे.

८ संप्रसारण झाल्यानंतर आत्वाची प्राप्ति येते खरी, तरी पण दुसरें शास्त्र कां होईना, तें त्या आत्वाला मार्गें सारणारें आहे. एवढ्याच कारणामुळें आत्वाला अनित्य म्हणतां येणें शक्य आहे.

यदि न क्रियते चेता स्तोतेत्यत्रापि प्राप्नोति। नैष दोषः । आचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयति न परनिमित्तकस्यात्त्वं भवतीति यदयं क्रीङ्जीनां णावात्त्वं शास्ति । नैतदस्ति ज्ञापकम् । नियमार्थमेतत्स्यात् । क्रीङ्जीनां णावेवेति। यत्तर्हि मीनातिमिनोतिदीङां ल्यपि च [ ५० ] इत्यत्रैज्ग्रहणमनुवर्तयति ॥ इह तर्हि ग्लै ग्लानीयम् म्लै म्लानीयम् वेञ् वानीयम् शो निशानीयम् परत्वादायादयः प्राप्नुवन्ति । अत्राप्याचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयति नायादय आत्त्वं बाधन्त इति यदयमशितीति प्रतिषेधं शास्ति । यदि हि बाधेरञ्शित्यपि बाधेरन् ॥ अथवा पुनरस्त्वेज्य उपदेश इति । ननु चोक्तं ग्लै ग्लानीयम् म्लै म्लानीयम् वेञ् वानीयम् शो निशानीयम् परत्वादायादयः प्राप्नुवन्तीति । अत्रापि

---

काम भागेल.[9]

जर उपदेश शब्द काढून टाकला तर चेता स्तोता इत्यादि स्थलीं गुणानें झालेल्याही एचाला आत्व प्राप्त होईल.

हा दोष येत नाहीं. कारण ज्या अर्थी आचार्य पाणिनि वृद्धीनें झालेल्या ऐकाराला 'क्रीङ्जीनां णौ' (६।१।४८) या सूत्रानें आत्वाचें विधान करीत आहेत त्या अर्थी 'आदेच उपदेशे' या प्रकृत सूत्रानें परनिमित्तक एचाला आत्व होत नाहीं असें तें ज्ञापन करीत आहेत.

हें ज्ञापक होणार नाहीं. पण क्रीङ्जीनां णौ हें सूत्र नियमार्थ होईल. तो नियम असा-कीं, इङ् आणि जि या धातूंच्या एचाला आत्व करणें झाल्यास णि पुढें असतांनाच करावें.[10]

तर मग 'मीनातिमिनोतिदीङां ल्यपि च' (६।१।५०) या सूत्रामध्यें एच् शब्दाची अनुवृत्ति करून जें त्या धातूंच्या एचाला आत्व सांगितलें आहे तें 'परनिमित्तक एचाला आत्व होत नाहीं' याविषयीं ज्ञापक समजावें.'

तर मग 'ग्लै'चें ग्लानीयम्[11] 'म्लै'चें म्लानीयम् व 'नि+शो' चें निशानीयम् हीं जीं रूपें होतात त्या ठिकाणीं परत्वास्तव आत्वाचा बाध करून आयादिक प्राप्त होतील.

तेथेंही आय् वगैरे आदेश आत्वाचा बाध करीत नाहींत असें आचार्यांचा व्यवहारच सुचवीत आहे; कारण आचार्य पाणिनि हे अशिति हा प्रतिषेध करीत आहेत. जर आयादिक आत्वाचा बाध करते तर शित् प्रत्यय पुढें असतांनाही त्यांनीं बाध केला असता, आणि तेथें आत्वाच्या निषेधाकरितां केलेलें अशिद्ग्रहण व्यर्थ झालें असतें. अथवा उपदेशीं जो एच् त्याला आत्व होतें असाच पक्ष असूं दे.

पण तो पक्ष घेतला असतां ग्लानीयम्, म्लानीयम्, वानीयम्, निशानीयम् इत्यादि ठिकाणीं परत्वास्तव आय् वगैरे आदेश होतील असा दोष दाखविला आहे ना ?

---

९. हूतः येथें ह्वे धातूला संप्रसारण व पूर्वरूप झाल्यानंतर उपदेशीं एजन्त आहे म्हणून हू याला आत्व होऊं लागेल, हा दोष उपदेशग्रहण काढलें म्हणजे येत नाहीं. कारण आतां प्रत्यक्ष एजन्तालाच आत्व होणार आहे. आणि संप्रसारण व पूर्वरूप झाल्यानंतर धातू एजन्तच नाहीं तेव्हां कांहीं दोष येत नाहीं.

१०. या नियमामुळें क्रेता इत्यादि उदाहरणांमध्यें आत्व होणार नाहीं; पण चेता स्तोता येथें मात्र दोष कायम राहतात.

११. उपदेशे हें पद सूत्रांत घातलें नाहीं तरी ढौक् यांतील ढौ हें एजन्त आहे खरें पण त्या औकाराला आत्व होत नाहीं. कारण शिद्भिन्न प्रत्यय पुढें नाहीं. आतां ग्लानीयम् येथें मात्र शिद्भिन्न प्रत्यय अनीयर् केल्यानंतर अगोदर आय् आदेश झाला तरी जें त्याला उपदेशीं एजन्त समजून आत्व करतां येत होतें तें मात्र उपदेश-ग्रहण टाकलें तर करतां येणार नाहीं.

शित्प्रतिषेधो ज्ञापको नायादय आत्वं बाधन्त इति ॥

आत्त्व एश्युपसंख्यानम् ॥ १ ॥

आत्त्व एश्युपसंख्यानं कर्तव्यम् । जग्ले मम्ले । अशितीति प्रतिषेधः प्राप्नोति ॥ नैष दोषः । नैवं विज्ञायते शकार इद्यस्य सोऽयं शित् न शिदशित् अशितीति । कथं तर्हि । शकार इत् शित् न शिदशित् अशितीति । यद्येवं स्तनंधय इत्यत्रापि प्राप्नोति । अत्रापि शश्शिद्भवति ॥

किं पुनरयं पर्युदासो यदन्यच्छित इति । आहोस्वित्प्रसज्यायं प्रतिषेधः शिति नेति । कश्चात्र विशेषः ।

अशित्येकादेशे प्रतिषेध आदिवत्त्वात् ॥ २ ॥

अशित्येकादेशे प्रतिषेधो वक्तव्यः । ग्लायन्ति म्लायन्ति । किं कारणम् । आदिवत्त्वात् । शिदशितोरेकादेशोऽशित आदिवत्स्यात् । अस्त्यन्यच्छित इति कृत्वात्त्वं प्राप्नोति ॥

प्रत्ययविधिः ॥ ३ ॥

प्रत्ययविधिश्च न सिध्यति । सुग्लः

---

तेथेंही आय् वगैरे हे आत्वाचा बाध करीत नाहींत अशाविषयीं अशिति हा प्रतिषेध ज्ञापक घेतां येईल.

( वा. १ ) एश् आदेश पुढें असतांना आत्व होण्याबद्दल वचन करावें. उदा० जग्ले, मम्ले. येथें वचन केलें नाहीं तर अशिति हा प्रतिषेध होईल.

हा दोष येत नाहीं. कारण तेथें अशिति असें म्हटलें आहे; अशित् हा शकारः इत् यस्य या अर्थाचा बहुव्रीहिसमास समजूं नये. तर शकारः इत् शित् असा कर्मधारय[१२] करून न शित् अशित् असा नञ्तत्पुरुष समजावा.

इत्संज्ञक शकारादि असा कर्मधारय केला तर स्तनंधयः येथेंही आत्व प्राप्त होतें.[१३]

येथें खश् केला असतां विकरण शप् प्रत्यय होतो त्यामुळें आत्व होत नाहीं.

पण काय हो न शित् अशित् म्ह. शिताहून अन्य प्रत्यय पुढें असतांना असा हा पर्युदास समजावयाचा किंवा शित् पुढें असतांना आत्व होत नाहीं असा प्रसज्यप्रतिषेध समजावयाचा ?

या दोन तन्हांमध्यें काय बरें फरक आहे ?

( वा. २ ) शिद्भिन्न असा पर्युदास समजला तर एकादेशाचे ठिकाणीं आत्वाचा निषेध करावा लागेल. उदा० ग्लायन्ति म्लायन्ति.

काय कारण ?

कारण असें कीं, ग्लै अ अन्ति असें असतां शप् प्रत्यय जरी शित् आहे तरी त्याचा अन्ति या शिद्भिन्न प्रत्ययाच्या अकाराबरोबर झालेला एकादेश अ हा ( ६।१।९७ ) परादिवद्भावानें[१४] ( ६।१।८५ ) शिद्भिन्न असा अन्ति प्रत्यय म्हणून पुढें असल्यामुळें आत्व प्राप्त होतें.

( वा. ३ ) पर्युदास समजला तर इष्ट असलेला प्रत्ययविधीही साधत नाहीं. उदा० सुग्लः सुम्लः. येथें 'आतश्चोपसर्गे' (३।१।१३७) यानें

---

१२. कर्मधारय केला म्हणजे शित् हें अल्ग्रहण होत असल्यामुळें तदादिविधि ( १।१।७२ वा. २९ ) होतो. तेव्हां इत्संज्ञक शकारादि प्रत्यय पुढें असतांना आत्व होत नाहीं असा अर्थ झाल्यामुळें शप् श्यन् वगैरे प्रत्यय पुढें असतांना आत्व होणार नाहीं. एश् याचा शकार आदि नसल्यामुळें तेथें निषेध येत नाहीं.

१३. येथें जरी खश् ( ३।२।२९ ) हा शित् प्रत्यय आहे तरी तो शकार प्रत्ययाच्या आरंभीं नाहीं.

१४. एकादेशाला पूर्वान्तवद्भावानें शित् असेंही जरी म्हणतां येतें तरी त्याचा पर्युदासपक्षीं कांहीं उपयोग नाहीं. कारण पर्युदासपक्षीं शित् हें विधीचें किंवा निषेधाचें निमित्त होत नाहीं.

सुम्लः । आकारान्तलक्षणः प्रत्ययविधिर्न प्राप्नोति । अनिष्टे प्रत्ययेऽवस्थित आत्त्वम् । अनिष्टस्य प्रत्ययस्य श्रवणं प्रसज्यते ॥

**अभ्यासरूपं च ॥ ४ ॥**

अभ्यासरूपं च न सिध्यति । जग्ले मम्ले । इवर्णाभ्यासता प्राप्नोति ॥

**अयवायावां प्रतिषेधश्च ॥ ५ ॥**

अयादीनां च प्रतिषेधो वक्तव्यः । ग्लै ग्लानीयम् म्लै म्लानीयम् शो निशानीयम् वेञ् वानीयम् । परत्वादायादयः प्राप्नुवन्ति ॥ अस्तु तर्हि प्रसज्यप्रतिषेधः शिति नेति ।

**शिति प्रतिषेधे श्लुलुकोरुपसंख्यानम् ररीध्वम् त्राध्वम् शिशीते ॥ ६ ॥**

शिति प्रतिषेधे श्लुलुकोरुपसंख्यानं कर्तव्यम् । दिवो नो वृष्टिं मरुतो ररीध्वम् । लुक् । त्राध्वं नो देवा निजुरो वृकस्य । शिशीते शृङ्गे रक्षसे विनिक्षे ॥ नैष दोषः ।

---

क प्रत्यय होणें इष्ट आहे. अशित् पुढें असतां आत्व होतें या पर्युदास पक्षीं सुग्लः सुम्लः येथें प्रत्यय करण्याच्या पूर्वी आत्व येऊं शकत नाहीं. म्हणून पूर्वी इष्ट नसला तरी अच् प्रत्यय करणें भाग पडेल व तो केल्यास अर्थात् तोच पुढें राहील.

( वा. ४ ) अभ्यासाचें रूपही इष्ट असलेलें साधत नाहीं. उदा० जग्ले, मम्ले. पर्युदास मानिला तर येथें अभ्यासामध्यें इकार येऊं लागेल[१५].

( वा.५ ) तसेंच पर्युदास पक्षीं अय् अव् आय् आव् यांच्या प्रतिषेधाकरितां वचन करावें लागेल. उदा० ग्लै ग्लानीयम्, म्लै म्लानीयम्, शो शानीयम्, वेञ् वानीयम्. येथें पर्युदास पक्षीं शिद्-भिन्न प्रत्यय पुढें केल्यानंतर आत्व होणार असल्यामुळें त्याच्या अगोदर परत्वास्तव आयादिक प्राप्त होऊं लागतील.

तर मग अशिति हा 'शिति न' म्हणजे शित् प्रत्यय पुढें असतांना आत्व होत नाहीं असा प्रसज्यप्रतिषेध होऊं दे[१६].

( वा. ६ ) शिति न म्ह० शित् प्रत्ययाच्या विषयांत आत्व होत नाहीं असा प्रसज्यप्रतिषेध घेतला असतां ज्या ठिकाणीं शप् प्रत्ययाचा श्लु किंवा लुक् होतो तेथें आत्वाचें विधान केलें पाहिजे. जसें—दिवो नो वृष्टिं मरुतो ररीध्वम्[१७] ( ऋ. सं. ५।८३।६ ); त्राध्वं नो देवा निजुरो वृकस्य. ( ऋ. सं. २।२९।६ ); शिशीते शृङ्गे रक्षसे विनिक्षे ( ऋ. सं.५।२।९).

---

१५. ग्लै धातूला प्रत्यय पुढें केल्यानंतरच पर्युदास पक्षीं आत्व होणार आहे. परंतु द्वित्वाच्या पूर्वी 'द्विर्वचनेऽचि' (१।१।५९) या निषेधामुळें तें होणार नाहीं. तेव्हां ग्लै याला द्वित्व झालें असतां अभ्यासांतील ऐकाराला ह्रस्वानें ( ७।४।५९ ) इकार होईल.

१६. या प्रसज्यप्रतिषेध पक्षीं आत्वाला कांहींच निमित्त नसल्यामुळें प्रत्यय करण्याच्या पूर्वीच आत्व होतें. त्या वेळीं प्रत्यय पुढें नसल्यामुळें जग्ले येथें द्विर्वचनेऽचि हा निषेध येत नाहीं. सुग्लः येथें आकारान्ताहून क प्रत्यय करतां येतो. ग्लानीयम् येथें आय् आदेशाची तर प्राप्तीच येत नाहीं. ग्लायन्ति येथें पूर्वान्तवद्भावानें शित् पुढें असल्यामुळें आत्व होत नाहीं.

१७. ररीध्वम् त्राध्वम् व शिशीते हे वैदिक प्रयोग आहेत. वैदिक प्रयोगामध्यें जीं जीं कार्ये केलेलीं दृष्टीस पडतात ती तीं सूत्रानें साधण्याबद्दल शक्य तितका प्रयत्न करावयाचा असतो. म्हणून येथें आत्व होण्याकरितां प्रयत्न चालू आहे. ररीध्वम् येथें रै धातूला आत्व, पुढें लोट् मध्यम पुरुष बहुवचन ध्वम् प्रत्यय, शप्, श्लु, द्वित्व, अभ्यासाला इत्त्व ( ७।४।१।१३ ), आणि उत्तर खंडामध्यें ईत्व ( ६।४।११३ ) झालें आहे. येथे पर्युदास-पक्षीं ध्वम् व त हे शिद्भिन्न प्रत्यय पुढें असल्यामुळें प्रकृत सूत्रानें आत्व होतें. प्रसज्यप्रतिषेध-पक्षीं आत्व होणार नाहीं. कारण शप् हा शित् प्रत्यय तेथें आहे.

इह तावद्दिवो नो वृष्टिं मरुतो ररीध्वमिति नैवद्रै इत्यस्य रूपम् । कस्य तर्हि । रातेर्दानकर्मणः । शिशीते शृङ्गे इति नैतच्छ्यते रूपम् । कस्य तर्हि । शीङः । श्यत्यर्थो वै गम्यते । कः पुनः श्यतेरर्थः । श्यतिर्निशाने वर्तते । शीङपि श्यत्यर्थे वर्तते । कथं पुनरन्यो नामान्यस्यार्थे वर्तते । बह्वर्था अपि धातवो भवन्ति । तद्यथा । वपिः प्रकिरणे दृष्टश्छेदने चापि वर्तते । केशान्वपतीति । ईडिः स्तुतिचोदनायाच्ञासु दृष्टः प्रेरणे चापि वर्तते । अग्निर्वा इतो वृष्टिमीट्टे मरुतोऽमुतश्च्यावयन्ति । करोतिरभूतप्रादुर्भावे दृष्टो निर्मलीकरणे चापि वर्तते । पृष्ठं कुरु । पादौ कुरु । उन्मृदानेति गम्यते । निक्षेपणे चापि वर्तते । घटे कुरु । कटे कुरु । अश्मानमितः कुरु । स्थापयेति गम्यते ॥ सर्वेषामेव परिहारः । शितीत्युच्यते न चात्र शितं पश्यामः । प्रत्ययलक्षणेन । न लुमता तस्मिन्निति प्रत्ययलक्षणप्रतिषेधः ॥ त्राध्वमिति लुङेष व्यत्ययेन भविष्यति ॥

अथवा पुनरस्तु पर्युदासः । ननु चोक्तमशित्येकादेशे प्रतिषेध आदिवत्त्वादिति ।

---

या तीनही ठिकाणीं दोष येत नाहीं. ररीध्वम् हें रै धातूचें रूपच नव्हे. तर दानार्थक अदादि गणांतील रा धातूचें रूप आहे. तसेंच शिशीते हेंहीं शो धातूचें रूपच नव्हे. तर शीङ् स्वप्ने यांचें रूप आहे.

पण शिशीते शृङ्गे या उदाहरणामध्यें शो धातूचा अर्थ प्रतीत होत आहे.

कोणता बरें तो अर्थ ?

शो धातु तीक्ष्ण करणें या अर्थी आहे.

तर मग शीङ् धातूही शो धातूच्या अर्थी आहे.

पण एक धातु दुसऱ्या धातूच्या अर्थी कसा बरें असूं शकेल ?

धातू हे अनेकार्थक असतात. जसें—पेरणें या अर्थाचा वप् धातु हा छेदन या अर्थीही दिसतो. जसें—केशान् वपति. तसेंच स्तुति, चोदना, याच्ञा या अर्थांचा ईड् धातु प्रेरणा या अर्थीही दिसतो. जसें—'अग्निर्वा इतो वृष्टिमीट्टे मरुतोऽमुतश्च्यावयन्ति.' तसेंच उत्पत्ति या अर्थाचा कृ धातु हा निर्मल करणें या अर्थीही दिसतो. जसें—पृष्ठं कुरु, पादौ कुरु असें म्हटलें असतां घासून स्वच्छ कर असा अर्थ प्रतीत होतो. तसेंच स्थापन करणें या अर्थीही कृ धातु दिसतो. जसें—घटे कुरु अश्मानम् असें म्हटलें असतां तेथें घागरीवर धोंडा ठेव असा अर्थ प्रतीत होतो[18].

शिवाय, वरील सर्व स्थळीं दोषाचा परिहार असा समजावा कीं—येथें शिति म्ह० इत्संज्ञक शकारादि पुढें असतांना आत्व होत नाहीं असें म्हटलें आहे. आणि ररीध्वम् शिशीते इत्यादि स्थलीं तर शित् प्रत्यय दृष्टीस पडत नाहीं. प्रत्ययलक्षणानें शित् पुढें आहे असें म्हणावें तर 'न लुमता तस्मिन्' (१।१।६३) असा प्रत्ययलक्षणाचा निषेध आहे. त्राध्वम् येथें तर लोट् प्रत्ययाच्या अर्थी व्यत्ययानें लुङ् समजावा. म्हणजे सहजच आत्व साधेल.

अथवा अशिति हा पर्युदासच असूं दे.

पण ग्लायन्ति वगैरे ठिकाणीं शप् आणि अन्ति यांचा एकादेश हा परादिवद्भावानें अशित् समजला जात असल्यामुळें आत्व प्राप्त होतें असा दोष दाखविला आहे ना ?

हा दोष येत नाहीं. कारण पूर्वविधि कर्तव्य

---

१८. एकंदरींत शिशीते येथें शीङ् धातूचा तीक्ष्ण करणें हा अर्थ घेतां येईल असें सिद्ध झालें.

नैष दोषः । एकादेशः पूर्वविधौ स्थानिवद्भवतीति स्थानिवद्भावाद् व्यवधानम् ॥ यदपि प्रत्ययविधिरित्याचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयति भवत्येजन्तेभ्य आकारान्तलक्षणः प्रत्ययविधिरिति यदयं ह्वावामश्च [ ३. २. २ ] इत्यणं कबाधनार्थं शास्ति ॥ यदप्यभ्यासरूपमिति प्रत्याख्यायते स योगः । अथापि क्रियते एवमपि न दोषः । कथम् । लिटीत्यनुवर्तते द्विलकारकश्चायं निर्देशः । लिटि लकारादाविति । एवं च कृत्वा सोऽप्यदोषो भवति यदुक्तमात्त्व एश्युपसंख्यानमिति ॥ यदप्युक्तमयवायावां प्रतिषेधश्चेति शिति प्रतिषेधो ज्ञापको नायादय आत्त्वं बाधन्त इति ॥

**प्रातिपदिकप्रतिषेधः ॥ ७ ॥**

प्रातिपदिकानां प्रतिषेधो वक्तव्यः ।

---

असतांना 'अचः परस्मिन्०' ( १।१।५७ ) या सूत्रानें स्थानिवद्भाव केल्यानंतर एजन्त व अशित् प्रत्यय या दोहोंमध्यें अकारानें व्यवधान येत असल्यामुळें आत्व प्राप्त होणार नाहीं. तसेंच पर्युदास पक्षीं ग्ले वगैरे एजन्त धातूंहून आकारान्ताहून सांगितलेला प्रत्यय सिद्ध होत नाहीं असें जें म्हटलें आहे तोही दोष येत नाहीं. कारण ज्या अर्थी आचार्य पाणिनि हे आकारान्त धातूहून सांगितलेल्या (३।२।३ ) क प्रत्ययाचा बाध होण्याकरितां 'ह्वावामश्च' ( ३।२।२ ) या सूत्रानें ह्वेञ् वेञ् आणि मेङ् या धातूंहून पुनः अण् प्रत्ययाचें विधान करीत आहेत त्या अर्थी आकारान्त धातूंहून सांगितलेला प्रत्यय आत्व होण्याला योग्य अशा एजन्त धातूंहूनही होतो असें ते सुचवीत आहेत. तसेंच जग्ले वगैरे ठिकाणीं 'द्विर्वचनेऽचि' या निषेधामुळें आत्वाच्या पूर्वी ग्लै याला द्वित्व होऊन अभ्यासामध्यें इवर्ण येईल असा जो दोष दिला आहे तोही दोष येत नाहीं. कारण 'द्विर्वचनेऽचि' ह्या सूत्राचीच मुळीं जरूर नाहीं.[19]

आतां द्विर्वचनेऽचि हें सूत्र आहे असें गृहीत धरलें तरीही दोष येत नाहीं.

तो कसा ?

'आदेच उपदेशेऽशिति' या प्रकृत सूत्रामध्यें 'लिटि धयो यः' ( ६।१।३८ ) या सूत्रांतून लिटि या पदाची अनुवृत्ति येत आहे. व तें लिटि पद 'ल्लिटि' असें दोन लकार ज्यांत आहेत असें आहे,[20] व त्यामुळें लिट् लकारावस्थेंतच पुढें असतांना आत्व होतें असा अर्थ होतो; आणि लकारावस्थेंतच आत्व होत असल्यामुळें 'एश् पुढें असतांना आत्वाचें विधान करावें' असें जें म्हटलें आहे तोही दोष येत नाहीं. तसेंच आणखी जें अय् अव् आय् आणि आव् यांच्या प्रतिषेधाकरितां वचन करावें असें म्हटलें आहे त्याचें उत्तर असें कीं 'आयादिक हे आत्वाचा बाध करीत नाहींत' असें अशिति हा प्रतिषेधच[21] सुचवीत आहे.

( वा. ७ ) प्रातिपदिकांना आत्व होत नाहीं

१९. 'द्विर्वचनं यणयवा०' ( ६।१।१२ वा. ९ ) या पूर्वविप्रतिषेधानें सर्व उदाहरणें साधत आहेत.

२०. 'लिटि धयो यः' येथें लिटि याच्या मागें आणखीं एक लकार सूत्रकारांनीं उच्चारला आहे. 'न संप्रसारणे०' या सूत्रांतील शेवटच्या मकारामुळें त्या लकाराचा लोप ( ८।४।६४ ) झाला आहे. त्या लकाराची आणि लिटि याची प्रकृत सूत्रामध्यें अनुवृत्ति करून तेवढ्याचा निराळा वाक्यार्थ करावयाचा. तो असा कीं– लिट् पुढें असतांना जर हें आत्व कर्तव्य झालें तर तें लकारावस्थेंतच करावें. म्हणजे त्या वेळीं अच् पुढें नसल्यामुळें द्विर्वचनेऽचि हा निषेध येत नाहीं.

२१. ग्लायति येथें आय् आदेशानें आत्वाचा बाध झाला म्हणजे रूप साधतें. म्हणून अशिति हा निषेध व्यर्थ होत आहे.

गोभ्याम् गोभिः । नौभ्याम् नौभिः ॥ स तर्हि वक्तव्यः । न वक्तव्यः । आचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयति न प्रातिपदिकानामात्त्वं भवतीति यदयं रायो हलि [ ७. २. ८५ ] इत्यात्वं शास्ति । नैतदस्ति ज्ञापकम् । नियमार्थमेतत्स्यात् । रायो हल्येवेति । यत्तर्ह्यौतोऽम्शसोः [ ६. १. ९३ ] इत्यात्वं शास्ति । एतस्याप्यस्ति वचने प्रयोजनम् । अमि वृद्धिबाधनार्थमेतत्स्याच्छसि प्रतिषेधार्थं च । तस्मात्प्रातिपदिकानां प्रतिषेधो वक्तव्यः ॥ न वक्तव्यः ।

धात्वधिकारात्प्रातिपदिकस्याप्राप्तिः ॥ ८ ॥

धात्वधिकारात्प्रातिपदिकस्यात्त्वं न भविष्यति । धातोरिति वर्तते । क्व प्रकृतम् । लिटि धातोरनभ्यासस्य [ ६. १. ८ ] इति ॥ अथापि निवृत्तम् । एवमप्यदोषः । उपदेश इत्युच्यत उद्देशश्च प्रातिपदिकानां नोपदेशः ।

[ न[1] व्यो लिटि ॥ ६ । १ । ४६ ॥
स्फुरतिस्फुलत्योर्घञि[1] ॥ ६ । १ । ४७ ॥ ]

---

असें वचन करणें जरूर आहे. उदा० गोभ्याम् गोभिः, नौभ्याम् नौभिः.

तर मग तसें वचन करावें.

तसें वचन करावयास नको. कारण ज्याअर्थी आचार्य 'रायो हलि' ( ७।२।८५ ) या सूत्रानें भ्याम् भिस् वगैरे हलादि विभक्ती पुढें असतांना रै शब्दाला आत्वाचें विधान करीत आहेत त्या अर्थी 'प्रातिपदिकांना आत्व होत नाहीं' असें ते ज्ञापन करीत आहेत.

हें ज्ञापक होत नाहीं; अजादि व हलादि या सर्व विभक्ती पुढें असतांना आत्व प्राप्त होत असल्यामुळें तेथें हलादि विभक्ति पुढें असतांनाच रै शब्दाला आत्व होतें असा नियम घालून देण्याकरितां तें सूत्र केलें आहे असा त्या सूत्राचा उपयोग आहे.

तर मग जें 'औतोऽम्शसोः' ( ६।१।९३ ) यानें अम् किंवा शस् पुढें असतांना ओकारान्ताला आत्व सांगितलें आहे तें ज्ञापक समजावें.

पण याही सूत्राचा दुसरा उपयोग आहे. अम् पुढें असतांना गां पश्य येथें 'गोतो णित्' (७।१।९० ) यानें णित्त्व होत असल्यानें वृद्धि (७।२।११५ ) प्राप्त होत आहे तिच्या बाधाकरितां, तसेंच गाः पश्य येथें शस् पुढें असतांना अचिति यानें आत्वाचा प्रतिषेध प्राप्त होत आहे त्याच्या निषेधाकरितां या सूत्राची जरूर आहे.

तेव्हां एकंदरीत प्रातिपदिकांना आत्व होत नाहीं असें प्रतिषेधवचन केलें पाहिजे.

तसें प्रतिषेधवचन करण्याची जरूर नाहीं.

( वा. ८ ) येथें धातोः असा अधिकार आहे तेव्हां एजन्त धातूला आत्व होतें असा अर्थ होत असल्यामुळें प्रातिपदिकांना आत्व होणार नाहीं. धातोः असें तर मागाहून चालूच आहे.

मागें कोठें धातोः असें आहे ?

'लिटि धातोः०' ( ६।१।८ ) येथें धातोः हें पद आहे. आतां धातोः हें मध्येंच निवृत्त झालें असें म्हटलें तरीही दोष नाहीं. कारण येथें उपदेशे असें म्हटलें आहे. तेव्हां अर्थात् आद्योच्चारणविषय अशाच एजन्ताला आत्व होतें; आणि प्रातिपदिकांचा तर उपदेशच नाहीं. प्रातिपदिकांच्या निर्देशाला उद्देश असें म्हणतात.

---

१. ( सू. ४६ ) व्ये धातूला लिट् पुढें असतांना आत्व होत नाही. उदा० विव्याय.

१. ( सू. ४७ ) स्फुर् आणि स्फुल् या धातूंच्या ( गुणानें झालेल्या ) ओकाराला घञ् प्रत्यय पुढें असतांना आत्व होतें उदा० विस्फारः, विस्फालः

## क्रीङ्जीनां णौ ॥ ६।१।४८ ॥

### आत्त्वे णौ लीयतेरुपसंख्यानं प्रलम्भनशालीनीकरणयोः ॥ १ ॥

आत्त्वे णौ लीयतेरुपसंख्यानं कर्तव्यम्। किं प्रयोजनम्। प्रलम्भने चार्थे शालीनीकरणे च नित्यमात्त्वं यथा स्यात्। प्रलम्भने तावत्। जटाभिरालापयते। श्मश्रुभिरालापयते। शालीनीकरणे। श्येनो वर्तिकामुल्लापयते। रथी रथिनमपलापयते ॥

## सिध्यतेरपारलौकिके ॥ ६।१।४९ ॥

### सिध्यतेरज्ञानार्थस्य ॥ १ ॥

सिध्यतेरज्ञानार्थस्येति वक्तव्यम् ॥

### इतरथा ह्यनिष्टप्रसङ्गः ॥ २ ॥

अपारलौकिक इत्युच्यमानेऽनिष्टं प्रसज्येत। अन्नं साधयति ब्राह्मणेभ्यो दास्यामीति ॥ अस्ति पुनरयं सिध्यतिः कचिदन्यत्रापि ज्ञानार्थे वर्तते। अस्तीत्याह। तपस्तापसं सेधयति। ज्ञानमस्य प्रकाशमीति। स्वान्येवैनं कर्माणि सेधयन्ति। ज्ञानमस्य प्रकाशयन्तीत्यर्थः ॥

## मीनातिमिनोतिदीङां ल्यपि च ॥ ६।१।५० ॥

---

(सू ४८ वा. १) णि प्रत्यय पुढें असतांना ली धातूला आत्वाचें विधान करावें.

त्याचें प्रयोजन काय?

वञ्चना आणि पराभव हे अर्थ असतांना ली धातूला नित्य आत्व व्हावें म्हणून. उदा०—जटाभिरालापयते, श्मश्रुभिरालापयते. येथें वंचना करतो असा अर्थ आहे. श्येनो वर्तिकामुल्लापयते, रथी रथिनमपलापयते येथें पराभव करतो असा अर्थ आहे.

(सू. ४९ वा. १) ज्ञानभिन्न अर्थी विद्यमान जो सिध् धातु त्याच्या एचाला आत्व होतें असें वचन करावें.

(वा. २) नाहीं तर 'अपारलौकिके' असें म्हटलें असतां 'अन्नं साधयति ब्राह्मणेभ्यो ददामीति' येथें आत्व होणार नाहीं असा दोष येईल.

पण हा सिध् धातु ज्ञान या अर्थाचा कोठें तरी आहे कां?

आहे असें आम्ही म्हणतों. उदा०—तपस्तापसं सेधयति. येथें तपश्चर्या ही तापसाला ज्ञान करून देते असा अर्थ प्रतीत होत असल्यामुळें सिध् धातूचा ज्ञान हा अर्थ निश्चित होतो. तसेंच 'स्वान्येवैनं कर्माणि सेधयन्ति' येथेंही तीं कर्मेंच त्याला ज्ञान करून देतात असा अर्थ प्रतीत होतो.

(सू. ५० वा. १) मीनाति वगैरे धातूंना

---

१. (सू. ४८) क्री इङ् आणि जि या धातूंच्या (वृद्धीनें झालेल्या) ऐकाराला णि प्रत्यय पुढें असतांना आत्व होतें. उदा० क्रापयति, अध्यापयति, जापयति.

१ (सू. ४९) सिध् धातूच्या (गुणानें झालेल्या) एकाराला णि प्रत्यय पुढें असतांना आत्व होतें; परंतु त्या सिध् धातूचा अर्थ जी क्रिया ती परलोकासंबंधीं नसली पाहिजे. उदा० ग्रामं साधयति. तपस्तापसं सेधयति येथें आत्व होत नाहीं. तपश्चर्या ही तपस्व्याला तत्वज्ञान करून देते व तिच्या योगानें त्याला परलोकगति चांगली मिळते.

२. ब्राह्मणांना देईन या बुद्धीनें अन्न तयार करतो असा येथें अर्थ आहे. त्या अन्नदानापासून परलोकगति मिळावी असा उद्देश असल्यामुळें येथें पारलौकिक क्रियेशीं संबंध आहे.

१. (सू. ५०) क्र्यादि गणांतील मी धातु स्वादि गणातील मि धातु आणि दिवादि गणांतील दी धातु यांच्या ईकाराला गुण किंवा वृद्धि होण्यासारखा प्रत्यय किंवा ल्यप् प्रत्यय कर्तव्य असतांना आत्व होतें. उदा० माता, दाता, प्रमाय, उपदाय.

**मीनात्यादीनामात्त्व उपदेशवचनं प्रत्ययविध्यर्थम् ॥ १ ॥**

मीनात्यादीनामात्त्व उपदेशिवद्भावो वक्तव्यः। उपदेशावस्थायामात्त्वं भवतीति वक्तव्यम्। किं प्रयोजनम्। प्रत्ययविध्यर्थम्। उपदेशावस्थायामात्त्वे कृत इष्टः प्रत्ययविधिर्यथा स्यात् ॥ के पुनः प्रत्यया उपदेशिवद्भावं प्रयोजयन्ति। काः। कास्तावन्न प्रयोजन्ति। किं कारणम्। एच इत्युच्यते न च केष्वेजस्ति ॥ णघञ्युज्विधयस्तर्हि प्रयोजयन्ति। ण। अवदायः। आत इति णः सिद्धो भवति। ण। घञ्। अवदायो वर्तते। आत इति घञ्सिद्धो भवति। किं च भो आत इति घञुच्यते। न खल्वप्यात इत्युच्यत आतस्तु विज्ञायते। कथम्। अविशेषेण घञुत्सर्गस्तस्येवर्णान्तादुवर्णान्ताच्चाजपावपवादौ। तत्रोपदेशावस्थायामात्त्वे कृतेऽपवादस्य निमित्तं नास्तीति कृत्वोत्सर्गेण घञ्सिद्धो भवति। एवं च कृत्वा न चात इत्युच्यत आतस्तु विज्ञायते।

---

सांगितलेल्या आत्वाविषयीं उपदेश-ग्रहण करावें. म्हणजे प्रत्ययाच्या उपदेशकालीं प्रत्यय उत्पन्न होण्याच्या पूर्वींच आत्व होतें असें वचन करावें.

असें करण्याचें काय प्रयोजन ?

प्रत्यय करतां यावा म्हणून. म्हणजे प्रत्ययोत्पत्तीच्या पूर्वीं आत्व करून इष्ट असलेला प्रत्यय करतां आला पाहिजे म्हणून.

उपदेशकालीं आत्व केलें असतां त्याहून होण्यासारखे असे प्रत्यय तरी कोणते ?

' क '[२] हे प्रत्यय तसे आहेत.

हे प्रत्यय प्रत्ययोत्पत्तीच्या पूर्वीं आत्व करण्यानें होणारे नव्हेत.

काय कारण ?

मी वगैरे धातूंच्या एचाला आत्व येथें सांगितलें आहे आणि हे क प्रत्यय पुढें असतांना तर ' क्ङिति च ' ( १।१।५ ) या गुणाच्या निषेधामुळें त्या धातूंचा एच् संभवतच नाहीं.

तर मग, ण घञ् व युच् हे प्रत्यय त्या धातूंना उपदेशकालीं आत्व केले असतां त्याहून होण्यासारखे आहेत. उदा०—अवदायः. येथें दीङ् धातूला उपदेशकालींच आत्व झाल्यामुळें ' श्याद्व्यधा '० (३।१।१४१) यानें आकारान्त धातूहून सांगितलेला ण प्रत्यय सिद्ध होतो. तसेंच अवदायो वर्तते येथें आकारान्ताहून सांगितलेला घञ् प्रत्यय होतो.

काय हो, पण आकारान्ताहून घञ् प्रत्यय कोठें सांगितला आहे कां ?

नाहीं. आकारान्ताहून घञ् प्रत्यय होतो असें मुळींच कोठेंही म्हटलें नाहीं. तथापि येथें पूर्वीं आत्व झालें आहे म्हणूनच त्या आकारान्ताहून घञ् करतां आला.

तो कसा ?

घञ् प्रत्यय हा मोघमच सामान्यतः सर्व धातूंहून सांगितला आहे. त्याचा अपवाद इवर्णान्त धातूहून अच् ( ३।३।५६ ) आणि उवर्णान्त धातूहून अप् हे प्रत्यय ( ३।३।५७ ) सांगितले आहेत. तेथें उपदेशकालींच आत्व झाल्यामुळें अपवाद अशा अच् प्रत्ययाचें निमित्त जें इवर्णान्तत्व तें नष्ट होतें. म्हणून तेथें अर्थातच सामान्य शास्त्रानें घञ् प्रत्यय होतो. याच अभिप्रायानें घञ् प्रत्यय आकारान्ताहून होतो असें सांगितलें नसतांही येथें आकारान्ताहून होणारा घञ् असें म्हटलें आहे. तसेंच ईषदव-

---

२. अगोदर आत्व झालें म्हणजे आकारान्त धातूहून सांगितलेला क प्रत्यय (३।१।१३६ ) होईल तसा ' आतोऽनुपसर्गे कः ' ( ३।२।३ ) यानें जो अकारान्त धातूहून क प्रत्यय सांगितला आहे तोही होईल. अङ् प्रत्ययही तसाच होईल.

युच् । ईषद्वदानम् स्ववदानम् । आत इति युच्सिद्धो भवति ॥

इदं विप्रतिषिद्धमेच उपदेश इति । यद्येचो नोपदेशेऽथोपदेशे नैचः । एचश्चोपदेशे चेति विप्रतिषिद्धम् ॥ नैतद्विप्रतिषिद्धम् । आह्वायमेच उपदेश इति । यद्येचो नोपदेशेऽथोपदेशे नैचः । ते वयं विषयं विज्ञास्यामः । एज्विषय इति ॥

तत्तर्ह्युपदेशग्रहणं कर्तव्यम् । न कर्तव्यम् । प्रकृतमनुवर्तते । क्व प्रकृतम् । आदेच उपदेशेऽशिति [ ४५ ] इति । तद्वै प्रकृतिविशेषणं विषयविशेषणेन चेहार्थः । न चान्यार्थं प्रकृतमन्यार्थं भवति । न खल्वप्यन्यत्प्रकृतमनुवर्तनादन्यद्भवति न हि गोधा सर्पन्ती सर्पणादहिर्भवति ॥ यत्तावदुच्यते न चान्यार्थं प्रकृतमन्यार्थं भवतीत्यन्यार्थमपि प्रकृतमन्यार्थं भवति । तद्यथा । शाल्यर्थं कुल्याः प्रणीयन्ते ताभ्यश्च पानीयं

---

दानम् स्ववदानम् येथें पूर्वी आत्व झाल्यामुळे 'आतो युच्' ( ३।३।१२८ ) यानें युच् प्रत्यय सिद्ध होतो.

हें सर्व असो. पण येथें मुळांतच विरोध दिसतो त्याची वाट काय? ह्या धातूंच्या एचाला आत्व होतें आणि ते उपदेशीं होतें हें परस्पर विरुद्ध[3] नव्हे कां? एचाला आत्व करावयाचें असेल तर तें उपदेशीं करतां येणार नाहीं. आणि जर उपदेशीं करावयाचें असेल तर एचाला करतां येणार नाहीं. तेव्हां एचालाही करावयाचें म्हणतां आणि उपदेशींही करावयाचें म्हणतां हें अगदीं विरुद्ध दिसतें.

हें विरुद्ध आहे असें समजूं नये. कारण, जर एचाला करावें तर उपदेशीं करतां येत नाहीं, आणि जर उपदेशीं करावें तर एचाला करतां येत नाहीं, आणि सूत्रकार तर 'उपदेशीं एचाला आत्व होतें' असें म्हणतात. तेव्हां अर्थातच येथें त्यांच्या मनांतील कांहीतरी गूढ अभिप्राय निराळा असला पाहिजे. तो हा कीं— एचाचा विषय[4] असतांना उपदेशींच आत्व होतें.

तर मग तें उपदेश-ग्रहण करावयास पाहिजे.

उपदेश-ग्रहण करावयास नको. कारण तें मागून अनुवृत्त येत आहे.

मागें कोठें उपदेश पद आहे ?

'आदेच उपदेशेऽशिति' येथें आहे.

पण तें उपदेश-ग्रहण तेथें प्रकृतीचें विशेषण आहे. आणि येथें तर विषयाचें विशेषण कर्तव्य आहे[5]. तेव्हां जें पूर्वी एकीकडे संबंध पावलें तें येथें दुसरीकडे लागणार नाहीं. अनुवृत्त झालें म्हणून कांहीं त्याचें स्वरूप बदलत नाहीं. कारण घोरपड सापाप्रमाणें सरपटत चालली म्हणून कांहीं ती सर्प बनूं शकत नाहीं.

आतां पूर्वी ज्याचा एकीकडे संबध झाला त्याचा दुसरीकडे संबंध होणार नाहीं असें जें म्हटलें आहे त्याचें उत्तर— एकीकडे संबंध झालेल्याचाही दुसरीकडे संबंध होतो. असें पहा कीं— पिकाला उपयोग व्हावा याकरितां बांधलेलें धरण पाणी पिण्याच्या कामींही उपयोगी पडतें म्हणजे त्या पाण्यावर आपलें स्नान पान वगैरे

---

३. कारण, ह्या भी वगैरे धातूंमध्यें उपदेशीं एच् नाहीं. प्रत्यय केल्यानंतर गुणानें किंवा वृद्धीनें त्यांमध्यें एच् संभवतो.

४. गुण किंवा वृद्धि होण्यासारखा प्रत्यय कर्तव्य असेल तेथें एचाचा विषय आहे असें समजावें.

५ 'आदेच उपदेशे०' येथें उपदिष्ट जी एजन्त प्रकृति असा अर्थ आहे; कारण तेथें धातूचा उपदेश घ्यावयाचा आहे. आणि येथें उपदिष्ट प्रत्यय घ्यावयाचा आहे. म्हणजे एज्–विषय जो प्रत्यय त्याच्या उपदेशकालीं असा अर्थ आहे.

पीयत उपस्पृश्यते च शालयश्च भाव्यन्ते। यदप्युच्यते न खल्वप्यन्यत्प्रकृतमनुवर्तनादन्यद्भवति न हि गोधा सर्पन्ती सर्पणादहिर्भवतीति भवेद् द्रव्येष्वेतदेवं स्यात्। शब्दस्तु खलु येन येनाभिसंबध्यते तस्य तस्य विशेषको भवति। तद्यथा। गौः शुक्लः। अश्वश्च। शुक्ल इति गम्यते॥

**निमिमीलियां खलचोः प्रतिषेधः॥२॥**

निमिमीलियां खलचोः प्रतिषेधो वक्तव्यः। ईषन्निमयम् सुनिमयम्। निमयो वर्तते। निमयः। मि॥ मी। ईषत्प्रमयम् सुप्रमयम्। प्रमयो वर्तते। प्रमयः। मी॥ ली। ईषद्विलयम् सुविलयम्। विलयो वर्तते। विलयः॥

**विभाषा लीयतेः॥६।१।५१॥**

किमिदं लीयतेरिति। लिनातिलीयत्योर्यका निर्देशः॥

**[ खिदेश्छन्दसि॥६।१।५२॥**

**अपगुरो णमुलि॥६।१।५३॥**

**चिस्फुरोर्णौ॥६।१।५४॥**

**प्रजने वीयतेः॥६।१।५५॥ ]**

---

होतें व धान्यही पिकतें. शिवाय अनुवृत्त झालें म्हणून कांहीं त्याचें स्वरूप बदलत नाहीं कारण घोरपड ही सर्पाप्रमाणें सरपटत चालली म्हणून कांहीं ती सर्प होत नाहीं असें जें म्हटलें आहे तेथें द्रव्याविषयीं तसें असूं शकेल. पण शब्द हा ज्याच्या ज्याच्याशीं संबंध पावतो त्याचा त्याचा तो विशेष दाखवितो. जसें—गौः शुक्लः अश्वश्च असें म्हटलें असतां बैलाशीं संबंध पावलेला शुक्ल शब्द बैलावरील पांढरा रंग दाखवितो; पण त्याचा पुढें घोड्याशीं संबंध झाला कीं तो घोड्याचाही पांढरा रंग दाखवितो.

(वा. २) नि उपसर्गपूर्वक मि धातु व मी धातु आणि ली धातु यांना खल् किंवा अच् प्रत्यय कर्तव्य असतांना आत्व होत नाहीं असें वचन करावें. नि उपसर्ग पूर्वी असलेल्या मि धातूची उदाहरणें—ईषन्निमयम्, सुनिमयम्, निमयो वर्तते, निमयः. मी धातूचीं उदाहरणें—ईषत्प्रमयम्, सुप्रमयम्, प्रमयो वर्तते, प्रमयः इत्यादि. ली धातूचीं उदाहरणें—ईषद्विलयम्, सुविलयम्, विलयो वर्तते, विलयः

(सू. ५१) लीयतेः हें काय आहे?

लीयतेः हा क्र्यादि गणांतील आणि दिवादि गणांतील ली धातूला यक् प्रत्यय लावून निर्देश केला आहे.

---

६. ईषत् आणि सु उपपद असतांना नि उपसर्गपूर्वक मि धातूहून खल् प्रत्यय (३।३।१२६) झाला आहे: निमयो वर्तते. येथें त्याच धातूहून भाव या अर्थी अच् प्रत्यय (३।३।५६) झाला आहे. तसेंच निमयः येथें त्याच धातूहून कर्तरि अच् प्रत्यय (३।३।१३४) झाला आहे. असेच पुढें प्र उपसर्गपूर्वक मी धातु आणि वि उपसर्गपूर्वक ली धातु यांहून प्रत्यय झाले आहेत

१ (सू. ५१) दिवादि गणांतील आणि क्र्यादि गणांतील ली धातूच्या ईकाराला गुण किंवा वृद्धि होण्यासारखा प्रत्यय किंवा ल्यप् प्रत्यय कर्तव्य असतांना आत्व विकल्पानें होतें. उदा०-विलाता विलेता, विलाय विलीय.

१. (सू. ५२) वेदामध्ये खिद् धातूच्या एचाला आत्व विकल्पानें होतें. उदा० चिखाद चिखेद.

१ (सू. ५३) अप उपसर्गपूर्वक गुर् धातूच्या एचाला आत्व विकल्पानें होतें णमुल् प्रत्यय पुढें असतांना. उदा०—अपगारमपगारम्, अपगोरमपगोरम्.

१ (सू. ५४) चि आणि स्फुर् या धातूंच्या एचाला णि प्रत्यय पुढें असतांना आत्व होतें. उदा०—चापयति चाययति; स्फारयति स्फोरयति.

१ (सू० ५५) गर्भग्रहण करणें या अर्थाच्या वी धातूच्या एचाला णि प्रत्यय पुढें असतांना विक-

## बिभेतेर्हेतुभये ॥ ६ । १ । ५६ ॥

हेतुभय इति किमर्थम् । कुञ्चिकयैनं भाययति । अहिनैनं भाययति ॥ हेतुभय इत्युच्यमानेऽप्यत्र प्राप्नोति । एतदपि हि हेतुभयम् ॥ हेतुभय इति नैवं विज्ञायते हेतोर्भयं हेतुभयम् हेतुभय इति । कथं तर्हि । हेतुरेव भयं हेतुभयम् हेतुभय इति । यदि स एव हेतुर्भयं भवतीति ॥

## [ नित्यं स्मयतेः ॥६॥१॥५७॥ ]

## सृजिदृशोर्झल्यमकिति ॥ ६ । १ । ५८ ॥

### अमि सङ्ग्रहणम् ॥ १ ॥

अमि सङ्ग्रहणं कर्तव्यम् । किमिदं सङिति । प्रत्याहारग्रहणम् । क संनिविष्टानां प्रत्याहारः । सनः प्रभृत्या महिङो ङकारात् ॥ किं प्रयोजनम् ।

---

(सू. ५६) हेतुभये असें येथें कशाकरितां म्हटलें आहे ?

कुञ्चिकयैनं भाययति, अहिनैनं भाययति[२] या ठिकाणीं आत्व होऊं नये म्हणून.

पण 'हेतुभये' असें म्हटलें असतांही येथें आत्व प्राप्त होत आहे; कारण येथेंही हेतूपासून भीति आहेच[३].

हेतोर्भयं हेतुभयम् असा तत्पुरुष समास आम्ही येथें समजत नाहीं; तर हेतुरेव भयं[४] हेतुभयम् असा कर्मधारय समजतों. तेव्हां हेतु म्हणजे जो प्रयोजक कर्ता त्यापासूनच साक्षात् भय असेल तर, असा अर्थ होतो.

( सू. ५८ वा. १ ) ह्या अम् आगम सांगणाऱ्या सूत्रामध्यें 'सङ्' ग्रहण करावें.

सङ् हें काय बरें आहे ?

सङ् हा प्रत्याहार आहे. म्हणजे सङ् प्रत्याहारांतील प्रत्यय पुढें असतांना अम् आगम होतो असें म्हणावें.

कोठें उच्चारलेल्या ( वर्णांचा अथवा शब्दांचा) हा प्रत्याहार आहे ?

'गुप्तिज्किद्भ्यः०' ( ३।१।५ ) या सूत्रांतील सनाच्या सकारापासून 'तिप्तस्झि०' ( ३।४।७८ ) या सूत्रांतील ङकारापर्यन्त मध्यें सांपडलेल्या प्रत्ययांचा सङ् हा प्रत्याहार झालेला आहे.

हा प्रत्याहार घेण्याचें काय प्रयोजन ?

---

ल्पानें आत्व होतें. उदा०-पुरोवातो गाः प्रवापयति, प्रवाययति,

१ ( सू. ५६ ) जुहोत्यादि गणांतील भी धातूच्या एचाला आत्व विकल्पानें होतें णि प्रत्यय पुढें असतांना, आणि धातूचा अर्थ जें भय तें ज्यापासून होतें तोच प्रयोजक कर्ता असतांना. उदा०जटिलो बालं भापयते, भीषयते.

२. देवदत्त हा मुलाला कुंचिका व सर्प यांच्या द्वारानें भिववितो असा अर्थ आहे.

३. जरी भीति कुंचिका व सर्प यांच्या पासून साक्षात् उत्पन्न झाली तरी त्यांच्या द्वारानें भीति दाखविणारा प्रयोजक कर्ता आहेच

४. बिभेति अस्मादिति भयम् अशी येथें भय शब्दाची व्युत्पत्ति आहे. भी धातूहून अच् प्रत्यय ( ३।३।५६ ) भावीं केला नाहीं; अपादान या अर्थीं केला आहे.

१ ( सू. ५७ ) स्मि धातूच्या एचाला आत्व नित्य होतें णि प्रत्यय पुढें असतांना, आणि धातूचा अर्थ जो विस्मय तो प्रयोजक कर्त्यापासूनच साक्षात् होत असतांना. उदा०-जटिलो विस्मापयते.

१ ( सू. ५८ ) कित्-भिन्न झलादि प्रत्यय पुढें असतांना सृज् आणि दृश् या धातूंना अम् आगम होतो. उदा०-स्रष्टा द्रष्टा. येथें धातूच्या ऋकारापुढें अम् आगम होऊन ऋकाराला यण् झाला आहे.

**क्विप्प्रतिषेधार्थम् ॥ २ ॥**

क्विबन्तस्य मा भूत्। रज्जुसृड्भ्याम् रज्जुसृड्भिः। देवदृग्भ्याम् देवदृग्भिः॥

**उक्तं वा ॥ ३ ॥**

किमुक्तम्। धातोः स्वरूपग्रहणे तत्प्रत्ययविज्ञानात्सिद्धमिति ॥

**[ अनुदात्तस्य चर्दुपधस्यान्यतरस्याम् ॥६।१।५९॥ ]**

**शीर्षंश्छन्दसि ॥ ६ । १ । ६० ॥**

**शीर्षन्छन्दसि प्रकृत्यन्तरम् ॥ १ ॥**

शीर्षन्छन्दसि प्रकृत्यन्तरं द्रष्टव्यम्। किं प्रयोजनम्।

**आदेशप्रतिषेधार्थम् ॥ २ ॥**

आदेशो मा विज्ञायि प्रकृत्यन्तरं यथा विज्ञायेत। किं च स्यात्। अस्कारान्तस्य च्छन्दसि श्रवणं न स्यात्। शिरो मे शीर्यते मुखे। इदं ते शिरो भिनद्मीति। तद्वा अथर्वणः शिरः॥

**ये च तद्धिते ॥ ६ । १ । ६१ ॥**

**ये च ताद्धिते शिरस आदेशार्थम् ॥१॥**

ये च तद्धित इत्यत्र शिरसो ग्रहणं कर्तव्यम्। किं प्रयोजनम्। आदेशार्थम्। आदेशो यथा विज्ञायेत प्रकृत्यन्तरं मा विज्ञायि। किं च स्यात्। यकारादौ तद्धितेऽस्कारान्तस्य श्रवणं प्रसज्येत। शीर्षण्यो हि मुख्यो भवति। शीर्षण्यः स्वरः॥

---

( वा.२ ) सृज् व दृश् या धातूंहून क्विप् प्रत्यय करून पुढें सुप् प्रत्यय केला असतां तेथें अम् आगम न व्हावा म्हणून. उदा० रज्जुसृड्भ्याम्, रज्जुसृड्भिः; देवदृग्भ्याम्, देवदृग्भिः.

( वा. ३ ) अथवा हें सांगितलेंच आहे. ( ७।२।११४ वा. २ ).

तें काय सांगितलें आहे ?

असें सांगितलें आहे कीं धातूला सांगितलेलें कार्य धातोः या अधिकारांत सांगितलेला प्रत्यय पुढें असतांनाच होतें. तेव्हां हें सिद्ध होत आहे.

(सू. ६० वा. १) वेदामध्यें शिरस् शब्दाच्या अर्थी शीर्षन् असा एक स्वतन्त्र शब्द आहे असें समजावें.

असें कळविण्याचें काय प्रयोजन ?

( वा. २ ) शिरस् शब्दाचे स्थानीं शीर्षन् असा आदेश सांगितला आहे असें समजूं नये. हा स्वतंत्रच शब्द समजला पाहिजे. आदेश समजला तर काय होईल ?

वेदामध्यें शिरो मे शीर्यते मुखे, इदं ते शिरो भिनद्मि, तद्वा अथर्वणः शिरः, वगैरे ठिकाणीं शिरस् असा अस् शेवटीं असलेला शब्द दिसत आहे तो दिसणार नाहीं.

( सू. ६१ वा. १ ) या सूत्रामध्यें शिरसः असें म्हणावें.

त्याचा काय उपयोग ?

भाषेमध्यें शीर्षन् हा स्वतन्त्र शब्द आहे अशी समजूत न होतां उलट हा शिरस् शब्दाचे स्थानीं आदेश आहे अशी समजूत व्हावी.

पण स्वतंत्र शीर्षन् शब्दाची कल्पना केल्यास काय होईल ?

यकारादि तद्धित प्रत्यय पुढें असतांना अस् शेवटीं असलेल्या अशा शिरस् शब्दाचाही प्रयोग होऊं लागेल. वस्तुतः तशा ठिकाणीं शीर्षण्यो हि मुख्यः, शीर्षण्यः स्वरः असे प्रयोग होत असतात.

---

१ ( सू. ५९ ) ह्रस्व ऋकार उपधेला असलेला जो अनुदात्त धातु त्याला अम् आगम विकल्पानें होतो किद्भिन्न झलादि प्रत्यय पुढें असतांना. उदा०-त्रप्तातर्पा,

१ (सू. ६०) वेदामध्यें शिरस् या अर्थाचा शीर्षन् असा एक स्वतंत्र शब्द आहे.

१ ( सू. ६१ ) शिरस् शब्दाला शीर्षन् असा आदेश होतो यकारादि तद्धित प्रत्यय पुढें असतांना. उदा०-शिरसि भवः शीर्षण्यः स्वरः.

## वा केशेषु ॥ २ ॥

वा केशेषु शिरसः शीर्षन्भावो वक्तव्यः। शीर्षण्याः केशाः। शिरस्याः।

## अचि शीर्षः ॥ ३ ॥

अचि परतः शिरसः शीर्षभावो वक्तव्यः। हास्तिशीर्षिः स्थौलशीर्षिः पैलुशीर्षिः ॥

## छन्दसि च ॥ ४ ॥

छन्दसि च शिरसः शीर्षभावो वक्तव्यः। द्वे शीर्षे ॥

इह हास्तिशीर्ष्या पैलुशीर्ष्येति शिरसो ग्रहणेन ग्रहणाच्छीर्षन्भावः प्राप्नोति। अस्तु। नस्तद्धिते [ ६. ४. १४४ ] इति टिलोपो भविष्यति। न सिध्यति। ये चाभावकर्मणोः [ ६. ४. १६८ ] इति प्रकृतिभावः प्रसज्येत ॥ यदि पुनर्येऽचि तद्धित इत्युच्येत। किं कृतं भवति। इञि शीर्षन्भावे कृते टिलोपेन सिद्धम्। नैवं शक्यम्। इह हि स्थूलशिरस इदं स्थौलशीर्षमित्यनणीति प्रकृतिभावः प्रसज्येत। तस्मान्नैवं शक्यम्। न चेदेवं शिरसो ग्रहणेन ग्रहणाच्छीर्षन्भावः प्राप्नोति ॥ पाक्षिक

---

(वा. २) केश हा अर्थ असतांना ह्या सूत्रांनें सांगितलेला शीर्षन् आदेश विकल्पानें होतो असें वचन करावें. जसें-शीर्षण्याः[2] केशाः, शिरस्याः.

(वा. ३) अजादि तद्धित प्रत्यय पुढें असतांना शिरस् शब्दाचे स्थानीं शीर्ष असा आदेश होतो, असें वचन करावें जसें—हस्तिशिरसोऽपत्यं हास्तिशीर्षिः[3], स्थौलशीर्षिः, पैलुशीर्षिः.

(वा. ४) वेदामध्यें शिरस् शब्दाला शीर्ष आदेश होतो असेंही वचन करावें. जसें—द्वे शीर्षे.

आतां हास्तिशीर्ष्या पैलुशीर्ष्या[4] येथें शीर्ष हा आदेश स्थानिवद्भावानें शिरस् शब्द आहे असें समजून 'ये च तद्धिते' या सूत्रानें शीर्षन् आदेश प्राप्त होतें आहे.

होऊं दे प्राप्त झाला तर. 'नस्तद्धिते' (६।४।१४४) या सूत्रानें टिलोप होऊन योग्य रूप साधेल.

तसें रूप साधणार नाहीं; कारण 'ये चाभावकर्मणोः' (६।४।१६८) या सूत्रानें टिलोपाचा बाधक प्रकृतिभाव तेथें प्राप्त होतो.

आतां जर 'ये च तद्धिते' याच्या ऐवजीं 'येऽचि तद्धिते' असें सूत्र केलें तर?

मग तसें सूत्र केलें तर काय होईल?

हस्तिशिरस् या शब्दाहून इञ् केला असतां लागलींच शीर्षन् आदेश करून व टिलोप (६।४।१४४) करून नंतर ष्यङ् आदेश केला जाईल.

पण हें शक्य नाहीं. कारण, स्थूलशिरस इदं स्थौलशीर्षम् येथें 'येऽचि०' या नवीन केलेल्या सूत्रानें शीर्षन् आदेश केला असतां 'अन्' (६।४।१६७) या सूत्रानें टिलोपाचा बाधक प्रकृतिभाव होईल. म्हणून 'येऽचि' असें सूत्र फिरविणें शक्य नाहीं. आतां जर 'येऽचि' असा न्यास करतां येणें शक्य नाहीं तर पूर्वी सांगितल्याप्रमाणें हास्तिशीर्ष्या येथें शीर्षन् आदेश प्राप्त होत आहे.

---

२. शिरस् शब्दाहून 'तत्र भवः' या अर्थी यत् प्रत्यय (४।३।५५) झाला आहे.

३. हस्तिशिरस् आणि पीलुशिरस् या शब्दांहून अपत्य या अर्थी इञ् प्रत्यय (४।१।९६) केला आहे.

४. हस्तिशिरस् आणि पीलुशिरस् या शब्दांहून अपत्य अर्थी जो इञ् प्रत्यय होतो तो गोत्रापत्य स्त्री या अर्थी केला तर शिरस् शब्दाला शीर्ष असा आदेश झाला असतां त्या इञ् प्रत्ययाचे स्थानीं ष्यङ् आदेश (४।१।७८) व पुढें चाप् प्रत्यय (४।१।७४) होऊन हास्तिशीर्ष्या पैलुशीर्ष्या अशीं रूपें होतात.

५. आतां जरीं ष्यङ् हा यकारादि तद्धित प्रत्यय पुढें आहे तरी शीर्षन् आदेश मात्र होणार नाहीं.

एष दोषः । कतरस्मिन्पक्षे । ष्यङ्विधौ द्वैतं भवति । अणिञोर्वादेशः ष्यङणिञ्भ्यां वा पर इति । तद्यदा तावदणिञोरादेशस्तदैष दोषः । यदा ह्यणिञ्भ्यां परो न तदा दोषो भवत्यणिञ्भ्यां व्यवहितत्वात् ॥

## [ अचि शीर्षः ॥ ६ । १ । ६२ ॥ ]

## पद्दन्नोमास्हृन्निशसन्यूषन्दोषन्यकञ्शकनुदनासञ्शस्प्रभृतिषु ॥ ६ । १ । ६३ ॥

शस्प्रभृतिष्वित्युच्यतेऽशस्प्रभृतिष्वपि दृश्यते । शलादोषणी । ककुद्दोषणी याचते महादेवः ।

## पदादिषु मांस्पृत्स्नूनामुपसंख्यानम् ॥ १ ॥

पदादिषु मांस्पृत्स्नूनामुपसंख्यानं कर्तव्यम् । यन्नीक्षणं मांस्पचन्याः । मांसपचन्या इति प्राप्ते । मांस् ॥ पृत् । पृत्सु मर्त्यम् । पृतनासु मर्त्यमिति प्राप्ते । पृत् ॥ स्नु । न ते दिवो न पृथिव्या अधि स्नुषु । अधि सानुष्विति प्राप्ते ।

## नस्नासिकाया यत्तस्क्षुद्रेषु ॥ २ ॥

यत्तस्क्षुद्रेषु परतो नासिकाया नस्भावो

---

पण हा दोष एकाच पक्षीं येत आहे.

कोणत्या एका पक्षीं ?

ष्यङ् विधीविषयीं दोन पक्ष आहेत ते असे– अण् किंवा इञ् यांचे स्थानीं ष्यङ् आदेश होतो हा एक; व अण् अथवा इञ् यांहून पुढें ष्यङ् प्रत्यय होतो हा दुसरा. त्यांपैकीं अण् अथवा इञ् यांचे स्थानीं ष्यङ् आदेश होतो या पक्षीं हा दोष येत आहे. जेव्हां अण् अथवा इञ् याहून पुढें ष्यङ् प्रत्यय होतो असा पक्ष घेतला जातो तेव्हां दोष येत नाहीं. कारण इञ् प्रत्ययानें व्यवधान येत आहे.[६]

( सू. ६३ ) शस्‌प्रभृति म्ह० शस् प्रत्ययाच्या नंतरचे विभक्ति प्रत्यय पुढें असतांना असें येथें म्हटलें आहे. पण शस्प्रभृति नव्हेत असे म्हणजे अर्थात् शसाच्या मागील प्रत्यय पुढें असतांना देखील आदेश केलेले दृष्टीस पडतात. जसें शलादोषणी, ककुद्दोषणी याचते महादेवः .

( वा. १ ) पद् वगैरे आदेश सांगणाऱ्या या सूत्रामध्यें मांस पृतना आणि सानु या तीन शब्दांना क्रमानें मांस् पृत् आणि स्नु असे आदेश सांगावे. उदा०– यन्नीक्षणं मांस्पचन्याः. येथें मांसपचन्याः असा प्रयोग प्राप्त असतां या वार्तिकानें मांस शब्दाचें स्थानीं मांस् आदेश केला आहे. पृत्सु मर्त्यम् येथें पृतनासु मर्त्यम् असें प्राप्त झालें आहे. न ते दिवो न पृथिव्या अधि स्नुषु येथें अधि सानुषु असें प्राप्त झालें आहे.

( वा. २ ) यत् तस् आणि क्षुद्र हे शब्द पुढें असतांना नासिका शब्दाला नस् असा

---

६. तेव्हां हाच पक्ष घेऊन हारितशीर्ष्या येथील दोष दूर करावा. इञ् प्रत्ययाचा लोप ( ६।१।१४८ ) झाला तरी स्थानिवद्भावानें ( १।१।५७ ) व्यवधान कायम राहणारच आहे.

१ ( सू. ६२ ) ' ये च तद्धिते ' या पूर्वीच्या सूत्रावर जें ' अचि शीर्षः ' ( वा. ३ ) असें वार्तिक आहे तेंच हें सूत्रपाठामध्यें आलेलें आहे.

१ (सू. ६३) पाद दन्त नासिका मास हृदय निशा असृज् यूष दोष यकृत् शकृत् उदक आणि आस्य या शब्दांचे स्थानीं क्रमानें पद् दत् नस् मास् हृद् निश् असन् यूषन् दोषन् यकन् शकन् उदन् आणि आसन् हे आदेश विकल्पानें होतात शस् प्रत्ययापासून पुढील प्रत्यय पुढें असतांना. उदा०–पदः पादान्.

२. शलाकेच्या आकाराचे दोन बाहू असा याचा अर्थ आहे. येथें औ प्रत्ययाला शी आदेश (७।१।१९) झाला आहे. औ प्रत्यय हा शस् प्रत्ययाच्या पूर्वी असूनही येथें दोषन् आदेश झाला आहे.

वक्तव्यः । यत् नस्यम् । यत् ॥ तस् । नस्तः । तस् ॥ क्षुद्र । नःक्षुद्रः ॥

अवर्णनगरयोरिति वक्तव्यम् । इह मा भूत् । नासिक्यो वर्णः । नासिक्यं नगरम् ॥ तत्तर्हि वक्तव्यम् । न वक्तव्यम् । इह तावन्नासिक्यो वर्ण इति परिमुखादिषु पाठः करिष्यते । नासिक्यं नगरमिति संकाशादिषु पाठः करिष्यते ॥

## धात्वादेः षः सः ॥ ६ । १ । ६४ ॥

धातुग्रहणं किमर्थम् । इह मा भूत् । षोडन् षण्डः षडिकः । अथादिग्रहणं किमर्थम् । इह मा भूत् । पेष्टा पेष्टुम् । नैतदस्ति प्रयोजनम् । अस्त्वत्र सत्वं सत्वे कृत इण उत्तरस्यादेशसकारस्येति षत्वं भविष्यति ॥ इदं तर्हि । लषिता लषितुम् । इदं चाप्युदाहरणम् । पेष्टा पेष्टुम् । ननु चोक्तमस्त्वत्र सत्वं सत्वे कृत इण उत्तरस्यादेशसकारस्येति षत्वं भविष्यतीति । नैवं शक्यम् । इह हि पेक्ष्यतीति षत्वस्यासिद्धत्वात्षढोः

---

आदेश होतो असें वचन करावें. जसें–नस्यम्, नस्तः, नःक्षुद्रः. वर्ण किंवा नगर हे अर्थ असतांना नस् आदेश होत नाहीं असें म्हणावें. जसें–नासिक्यो वर्णः, नासिक्यं नगरम्.

तर मग 'अवर्णनगरयोः' असें वचन केलें पाहिजे.

वचन करावयास नको. कारण परिमुखादि गणामध्यें नासिकाशब्दाचा पाठ करण्यांत येईल. तसेंच संकाशादि गणामध्येंही पाठ केल्यानें नासिक्यं नगरम् हें सिद्ध होत आहे.

(सू. ६४) येथें धातु शब्द कशाकरितां घातला आहे ?

षोडन् षण्ढः षडिकः येथें षकाराला सकार न व्हावा म्हणून. बरें, आदि शब्द कशाकरितां घातला आहे ? पेष्टा पेष्टुम् येथें धातूच्या शेवटच्या षकाराला सकार न व्हावा म्हणून.

आदिग्रहणाचें हें प्रयोजन बरोबर दिसत नाहीं. कारण येथें सकार होऊं दे; सकार झाला तरी इणाहून पुढें अशा आदेश सकाराला षत्व (८।३।५९) होईलच.

तर मग लषिता लषितुम् येथें सकार न होणें हें आदिग्रहणाचें प्रयोजन समजावें. पेष्टा पेष्टुम् येथील पिष् धातूही उदाहरण होऊं शकतो.

पण पेष्टा पेष्टुम् येथें सकार झाला तरी आदेश सकाराला षत्व होईल असें म्हटलें आहे ना ?

तें बरोबर नाहीं. कारण पेक्ष्यति येथें आदेश सकार केल्यास त्या सकाराला षत्व करून

---

३. नासिका शब्दाहून तस्मै हितम् या अर्थी यत् प्रत्यय (५।१।६) झाला आहे. नस्तः येथें नासिका शब्दाहून तस् प्रत्यय (५।४।४५) झाला आहे. नःक्षुद्रः येथें नासिकया क्षुद्रः नःक्षुद्रः असा समास (२।१।४) झाला आहे.

४. तेव्हां ञ्य प्रत्ययच (४।३।५८ वा. १) नासिक्य शब्दामध्यें केला आहे. यत् प्रत्यय नसल्यामुळें नस् आदेश होत नाहीं.

५. संकाश वगैरे शब्दांहून ञ्य प्रत्ययच (४।२।८०) सांगितला आहे.

१ (सू. ६४) धातूच्या आरंभीं असलेल्या षकाराला सकार आदेश होतो.

२. षट् दन्ता अस्य षोडन्. षष् आणि दन्त या शब्दांचा बहुव्रीहि. दन्त शब्दाला दत् आदेश (५।४।१४१) षष् शब्दाच्या शेवटच्या षकाराला उकार आणि दत् याच्या दकाराला डकार (६।३।१०९ वा. ३) असे आदेश झाले आहेत. षण्ढ हा शब्द अव्युत्पन्न आहे. षडिक हा शब्द षडङ्गुलि शब्दापासून साधला आहे. (५।३।८४ वा. ५).

कः सि [ ८. २. ४१ ] इति कत्वं न स्यात् ॥

**सादेशे सुब्धातुष्ठिवुष्वष्कतीनां प्रतिषेधः ॥ १ ॥**

सादेशे सुब्धातुष्ठिवुष्वष्कतीनां प्रतिषेधो वक्तव्यः । सुब्धातु । षोडीयति षण्डीयति । ष्ठिवु । ष्ठीवति । ष्वष्क । ष्वष्कते ॥ सुब्धातूनां तावन्न वक्तव्यः । उपदेश इति वर्तत उद्देशश्च प्रातिपदिकानां नोपदेशः ॥ यद्येवं नार्थो धातुग्रहणेन । कस्मान्न भवति षोडन् षण्डः षडिक इति । उपदेश इति वर्तत उद्देशश्च प्रातिपदिकानां नोपदेशः ॥ ष्ठिवेरपि द्वितीयो वर्णष्ठकारः । यदि ठकारस्तेष्ठीव्यत इति न सिध्यति । एवं तर्हि थकारः । यदि थकारष्टुष्ठथूषति टेष्ठीव्यत इति न सिध्यति । एवं तर्हि द्वाविमौ ष्ठिवू । एकस्य द्वितीयो वर्णष्ठकारोऽपरस्य थकारः । यस्य थकारस्तस्य सत्वं प्राप्नोति ॥ एवं तर्हि द्वाविमौ द्विषकारौ ष्ठिवुष्वष्कती । किं कृतं भवति । पूर्वस्य सत्वे कृते परेण संनिपाते ष्टुत्वं भविष्यति । नैवं शक्यम् । इह हि श्वलिट् ष्ठीव्यति मधुलिट् ष्वष्कते ष्टुत्वस्यासिद्धत्वाड्डः सि धुट् [ ८. ३. २९ ]

---

पेष्‌-स्यति असें असतां षत्व असिद्ध असल्यामुळें 'षढोः कः सि' (८।२।४१) यानें ककार होणार नाहीं.

( वा. १ ) सुब्‌-धातु, ष्ठिवु, आणि ष्वष्क यांना सत्व होत नाहीं असें वचन करावें. सुब्‌धातूचीं उदाहरणें– षोडीयति षण्डीयति. ष्ठिव्‌ धातूचें ष्ठीवति व ष्वष्क्‌ धातूचें ष्वष्कते.

सुब्‌-धातूंना सत्वाचा प्रतिषेध करावयास नको. कारण तेथें 'आदेच उपदेशेऽशिति' (६।१।४५) येथून उपदेश पदाची अनुवृत्ति येत आहे. आणि प्रातिपदिकांना उद्देशच असतो उपदेश नसतो.

असें आहे तर मग सूत्रामध्यें धातुग्रहण करण्यांत काहीं अर्थ दिसत नाहीं.

पण धातुग्रहण केलें नाहीं तर षोडन्‌ षण्डः षडिकः येथें षकाराला सकार कां बरें होत नाहीं ?

उपदेशे याची अनुवृत्ति येत आहे. आणि प्रातिपदिकांना तर उद्देश असतो उपदेश नसतो.

ष्ठिवु धातूसंबंधानेंही निषेध करावयास नको. कारण त्यातील दुसरा वर्ण ठकार आहे.

जर दुसरा वर्ण ठकार असेल तर तेष्ठीव्यते हें साधणार नाहीं.

तर मग द्वितीय वर्ण थकारच असूं दे.

पण असें असेल तर टुष्ठयूषति व टेष्ठीव्यते हीं रूपें साधणार नाहींत.

तर मग ष्ठिवु धातू दोन आहेत. एकांतील द्वितीय वर्ण ठकार आहे व दुसऱ्यांतील द्वितीय वर्ण थकार आहे.

पण ज्याचा द्वितीय वर्ण थकार आहे त्याचा थकार कायम राहूं लागेल.

तर मग ष्ठिवु आणि ष्वष्क्‌ या दोहोंमध्यें आरंभीं दोन षकार आहेत असें समजावें.

यांत काय फायदा ?

फायदा असा कीं पहिल्या षकाराला प्रकृत सूत्रानें सत्व झालें तरी पुढें षकार असल्यामुळें सकाराला ष्टुत्वानें षकार होईल.

असें म्हणणें शक्य नाहीं. कारण श्वलिट्‌ ष्ठीव्यति मधुलिट्‌ ष्वष्कते येथें ष्टुत्वानें झालेला षकार असिद्ध असल्यामुळें 'डः सि धुट्‌' (८।३।२९ ) यानें धुट्‌ आगम होऊं लागेल.

---

३. तेव्हां ष्ठिव्‌ धातूच्या आरंभींच्या षकाराला प्रकृत सूत्रानें सकार झाला तरी पुनः ष्टुत्वानें ( ८।४।४१ ) षकार होईलच.

४. कारण अभ्यासामध्यें टकार येईल.

इति धुट् प्रसज्येत ॥ एवं तर्हि यकारादी ष्ठिवुष्वष्कती। किं यकारो न श्रूयते। लुप्तनिर्दिष्टो यकारः ॥

अथ किमर्थं षकारमुपदिश्य तस्य सकार आदेशः क्रियते न सकार एवोपदिश्येत। लघ्वर्थमित्याह। कथम्। अविशेषेणायं षकारमुपदिश्य सकारमादेशमुक्त्वा लघुनोपायेन षत्वं निर्वर्तयत्यादेशप्रत्यययोः [८. ३. ५९] इति। इतरथा हि येषां षत्वमिष्यते तेषां तत्र ग्रहणं कर्तव्यं स्यात् ॥

के पुनः षोपदेशा धातवः पठितव्याः। कोऽत्र भवतः पुरुषकारः। यद्यन्तरेण पाठं किंचिच्छक्यते वक्तुं तदुच्यताम्। अन्तरेणापि पाठं किंचिच्छक्यते वक्तुम्। कथम्। अज्दन्त्यपराः सादयः षोपदेशाः स्मिङ्स्वदिस्विदिस्वञ्जिस्वपयश्च सृपिसृजिस्तृस्त्यासेक्सृवर्जम् ॥

**णो नः ॥ ६ । १ । ६५ ॥**

अथ किमर्थं णकारमुपदिश्य तस्य नकार आदेशः क्रियते न नकार एवोपदि-

---

तर मग ष्ठिवु आणि ष्वष्क् या धातूंच्या आरंभीं यकार आहे असें समजावें.

मग यकाराचें श्रवण कां बरें होत नाहीं ?

यकाराचा लोपानें निर्देश केला आहे.[५]

आतां धातूंच्या आरंभीं षकार लावून त्याला सकार करण्यापेक्षां मुळांतच या धातूंच्या आरंभीं सकार कां बरें उच्चारला नाहीं ?

लाघवाकरितां तसें केलें आहे.

तें लाघव कसें ?

प्रायः सर्व ठिकाणीं मूळचा षकार आहे असें कळवून व त्या षकाराला सकाराचें विधान करून इण् किंवा कवर्ग मागें असतां त्या सकाराला 'आदेशप्रत्यययोः' या लहानशा उपायानें षकाराची निष्पत्ति (आचार्य पाणिनि) करीत आहे. जर मूळचा सकारच उच्चारला असता तर षत्वाकरितां ज्यांना षत्व पाहिजे असेल त्या सर्व धातूंचें 'आदेशप्रत्यययोः' (८।३।५९) या सूत्रामध्यें ग्रहण करावें लागलें असतें.

आतां मूळचा षकार असलेले असे धातू तरी कोणते सांगितले आहेत असें म्हणावें ?

तशा धातूंचा प्रत्यक्ष पाठ करण्यांत काय बरें शहाणपण आहे ?

जर प्रत्यक्ष पाठ न करितां कांहीं खुणेनें सांगण्यासारखे असतील तर सांगा.

प्रत्यक्ष पाठ केल्यावांचूनही कांहीं सांगतां येतील.

ते कसे ?

ज्या एकाच् धातूंच्या आरंभींच्या सकारापुढील वर्ण स्वर किंवा तवर्ग असेल त्या धातूंच्या आरंभीं मूळचा षकार आहे असें समजावें. याशिवाय स्मिङ् स्वद् स्विद् स्वञ्ज् आणि स्वप् या धातूंच्याही आरंभीं मूळचा षकार आहे असें समजावें. आतां यांतून सृप् सृज् स्तृ स्त्या सेक् आणि सृ हे मात्र वगळावे म्हणजे त्यांच्या आरंभीं मूळचा षकार नाहीं असें समजावें.

(सू. ६५) धातूमध्यें मूळचा णकार मानून त्या णकाराला जो नकार सांगितला आहे त्यापेक्षां उपदेशकालीं नकारच कां बरें पठन केला नाहीं ?

---

५. 'लोपो व्योर्वलि' (६।१।६६) यानें त्या यकाराचा लोप झाला आहे तेव्हां धातूच्या आरंभीं यकार आहे षकार नाहीं, म्हणून प्रकृत सूत्रानें सकार होत नाहीं.

१. (सू. ६५) धातूच्या आरंभीं असलेल्या णकाराला नकार आदेश होतो.

दृश्येत । लध्वर्थमित्याह । कथम् । अविशेषेणायं णकारमुपदिश्य तस्य नकारमादेशमुक्त्वा तस्य लघुनोपायेन णत्वं निर्वर्तयत्युपसर्गादसमासेऽपि णोपदेशस्य [ ८.४.१४ ] इति । इतरथा हि येषां णत्वमिष्यते तेषां तत्र ग्रहणं कर्तव्यं स्यात् ॥

के पुनर्णोपदेशा धातवः पठितव्याः । कोऽत्र भवतः पुरुषकारः । यद्यन्तरेण पाठं किंचिच्छक्यते वक्तुं तदुच्यताम् । अन्तरेणापि पाठं किंचिच्छक्यते वक्तुम् । कथम् । सर्वे नादयो णोपदेशा नृतिनन्दिनर्दिनकिनाटिनाथृनाधृनॄवर्जम् ॥

## लोपो व्योर्वलि ॥ ६ । १ । ६६ ॥

### व्योर्लोपे क्कावुपसंख्यानम् ॥ १ ॥

व्योर्लोपे क्कावुपसंख्यानं कर्तव्यम् । इहापि यथा स्यात् । कण्डूयतेरप्रत्ययः कण्डूरिति । किं पुनः कारणं न सिध्यति । वलीत्युच्यते न चात्र वलादिं पश्यामः । ननु चायं क्किबेव वलादिर्भवति । क्विब्लोपे कृते वलाद्यभावान्न प्राप्नोति ॥ इदमिह संप्रधार्यम् । क्विब्लोपः क्रियतां यलोप इति । किमत्र कर्तव्यम् । परत्वात्क्विब्लोपो नित्य-

---

लाघव होत आहे म्हणून तसें केलें आहे. नकारादि सर्व धातूंमध्यें प्रायः उपदेशीं णकार उच्चारून त्या णकाराला नकार आदेश सांगून त्या नकाराला 'उपसर्गादसमासेऽपि णोपदेशस्य' ( ८।४।१४ ) यानें थोडक्या उपायानें णत्व सांगितलें आहे. जर मूळचा नकारच उच्चारला असता तर प्र वगैरे उपसर्ग मागें असतां ज्या धातूंच्या नकाराला णत्वाची जरूर आहे त्या सर्व धातूंचा ' उपसर्गादसमासे० ' या सूत्रामध्यें णत्वाकरितां पाठ करावा लागला असता.

आतां मूळचा णकार असलेले धातू तरी कोणते म्हणावे ?

तशा धातूंचा प्रत्यक्ष पाठ करण्यांत काय बरें शहाणपण आहे ?

जर प्रत्यक्ष पाठ न करतां थोडक्यांत कांहीं सांगतां आले तर सांगा.

पाठ केल्यावांचूनही कांहीं सांगतां येणें शक्य आहे.

ते कसे ?

सर्वच नकारादि धातूंच्या आरंभीं मूळचा णकार आहे. फक्त नृत् नन्द् नर्द् नक्क् नाटि नाथृ नाधृ आणि नॄ हे आठ धातू सोडावे.

( सू. ६६ वा. १ ) हा जो वकार व यकार यांचा लोप सांगितला आहे तो क्विप् प्रत्यय पुढें असतांनाही होतो असें विधान करावें. उदा० कण्डूः. कण्डूय या धातूहून क्विप् प्रत्यय केला असतां येथेंही लोप व्हावा म्हणून.

पण काय बरें कारण कीं येथें सूत्रानें लोप होत नाहीं ?

वल् पुढें असतांना असें सूत्रांत म्हटलें आहे. आणि येथें तर वलादि कांहींच दृष्टीस पडत नाहीं.

पण क्विप् हाच येथें वलादि आहे ना ?

क्विपाचा ' वेरपृक्तस्य ' यापुढील सूत्रानें लोप झाला असतां वलादि पुढें नसल्यामुळें यलोपाची प्राप्ति येत नाहीं.

असें आहे तर मग येथें प्रथमतः क्विपाचा लोप करावा कीं यकाराचा लोप करावा हें ठरविलें पाहिजे.

मग यांत पूर्वी काय बरें करावें ?

क्विपाचा लोप पर आहे व नित्यही आहे.

---

१ ( सू. ६६ ) वकार आणि यकार यांचा लोप होतो वल् पुढें असतांना.

२. कण्डू धातूहून यक् प्रत्यय ( ३।१।२७ ) करून किंवा कण्डू शब्दाहून क्यच् प्रत्यय ( ३।१।७ ) करून पुढें क्विप् प्रत्यय करावा.

त्वाच्च । नित्यः खल्वपि क्विब्लोपः । कृतेऽपि यलोपे प्राप्नोत्यकृतेऽपि प्राप्नोति । नित्यत्वात्परत्वाच्च क्विब्लोपः । क्विब्लोपे कृते वलाद्यभावाद्यलोपो न प्राप्नोति ॥ एवं तर्हि प्रत्ययलक्षणेन भविष्यति । वर्णाश्रये नास्ति प्रत्ययलक्षणम् । यदि वा कानिचिद्वर्णाश्रयाणि प्रत्ययलक्षणेन भवन्ति तथेदमपि भविष्यति ॥ अथवैवं वक्ष्यामि । लोपो व्योर्वलि । ततो वेः । व्यन्तयोश्च व्योर्लोपो भवति । ततोऽपृक्तस्य । अपृक्तस्य च लोपो भवति । वेरित्येव ॥

**वलोपाप्रसिद्धिरूड्भाववचनात् ॥२॥**

वलोपस्याप्रसिद्धिः । आस्रेमाणम् जीरदानुरिति । किं कारणम् । ऊड्भाववचनात् । च्छ्वोः शूडनुनासिके च [ ६.४.१९ ] इत्यूठ् प्राप्नोति ॥

**अतिप्रसङ्गो व्रश्चादिषु ॥ ३ ॥**

व्रश्चादिषु चातिप्रसङ्गो भवति । इहापि प्राप्नोति । व्रश्चनः व्रीहिः व्रण इति ॥ उपदेशसामर्थ्यात्सिद्धम् । उपदेशसामर्थ्याद्व्रश्चादिषु लोपो न भविष्यति ।

**उपदेशसामर्थ्यात्सिद्धमिति चेत्संप्रसारणहलादिशेषेषु सामर्थ्यम् ॥ ४ ॥**

उपदेशसामर्थ्यात्सिद्धमिति चेदस्त्यन्यदुपदेशवचने प्रयोजनम् । संप्रसारणहलादिशेषेषु कृतेषु वकारस्य श्रवणं यथा स्यात् ।

---

कारण यलोप केला अथवा न केला तरी क्विपाचा लोप प्राप्त होतो. तेव्हां पर व नित्य असल्यामुळें पूर्वी क्विपाचा लोप करावा. आणि तो क्विपाचा लोप केला असतां वलादि पुढें नसल्यामुळें यलोप प्राप्त होत नाहीं.

तर मग प्रत्ययलक्षणानें यलोप होईल.

वर्णाश्रय कार्य कर्तव्य असतांना प्रत्ययलक्षण होत नाहीं.

पण जशीं इतर वर्णाश्रय कार्यें प्रत्ययलक्षणानें होतात तसें हेंही वर्णाश्रय कार्य प्रत्ययलक्षणानें होईल. किंवा पुढें दिल्याप्रमाणें व्याख्यान करूं: ' लोपो व्योर्वलि ' याचे पुढें ' वेः ' एवढेंच सूत्र आहे. वि–प्रत्ययान्त असें जें यकारान्त अथवा वकारान्त शब्दस्वरूप त्याच्या अन्त्याचा लोप होतो असा त्याचा अर्थ होतो. त्याच्या पुढें ' अपृक्तस्य ' हें सूत्र आहे. येथें वेः या पदाची अनुवृत्ति आहे. अपृक्त–संज्ञक जो वि प्रत्यय त्याचा लोप होतो, असा त्याचा अर्थ आहे.

(वा. २) हा वलोप सिद्ध होत नाहीं. उदा० आस्रेमाणम्, जीरदानुः. कारण च्छ्वोः शूडनुनासिके च या सूत्रानें त्याचा बाधक ऊठ् प्राप्त होतो.

(वा. ३) शिवाय, व्रश्च् वगैरे धातूंमध्यें वकाराचा लोप होऊं लागेल असाही दोष येतो उदा०— व्रश्चनः व्रीहिः व्रणः वगैरे.

पण व्रश्च् वगैरे धातूंचे ठिकाणीं लोप होऊं लागला तर तेथें वकारोच्चारण व्यर्थ होईल. सबब त्या जोरावर वलि–लोप होणार नाहीं.

(वा. ४) व्रश्चादिकांचे ठिकाणीं वकारोच्चारणाचे सामर्थ्यास्तव लोप होणार नाहीं असें म्हणणें असेल तर वकार उच्चारण्याचें दुसरें प्रयोजन आहे. संप्रसारण केलें असतां व हलादिःशेष केला असतां वकाराचें श्रवण व्हावें म्हणून

---

३. प्रत्ययलक्षण ( १।१।६२ ) सूत्रावरील वार्तिक १३ पहावें.

४. आ–उपसर्ग–पूर्वक स्रिव् धातूहून मनिन् प्रत्यय ( उणा० ४।१४४ ), गुण व प्रकृत सूत्रानें वकाराचा लोप झाला आहे. तसेंच जीव् धातूहून रदानुक् प्रत्यय झाला आहे, आणि प्रकृत सूत्रानें वकाराचा लोप झाला आहे. हीं वलोपाचीं उदाहरणें आहेत. यांपैकीं आस्रेमाणम् येथें ऊठ् ( ६।४।१९ ) प्राप्त होत आहे.

वृक्णः वृक्णवान् विव्रश्चिषतीति ॥

**न वा बहिरङ्गलक्षणत्वात् ॥ ५ ॥**

न वैतत्प्रयोजनमस्ति । किं कारणम् । बहिरङ्गलक्षणत्वात् । बहिरङ्गाः संप्रसारणहलादिशेषाः । अन्तरङ्गो लोपः । असिद्धं बहिरङ्गमन्तरङ्गे ॥

**अनारम्भो वा ॥ ६ ॥**

अनारम्भो वा पुनर्वलोपस्य न्याय्यः । कथमास्रेमाणम् जीरदानुरिति ।

**आस्रेमाणं जीरदानुरिति वर्णलोपात्**

आस्रेमाणम् जीरदानुरिति च्छान्दसाद्वर्णलोपात्सिद्धम् ।

**यथा संस्फानो गयस्फानः ॥ ७ ॥**

तद्यथा । संस्फायनः संस्फानः । गयस्फायनो गयस्फान इति ॥

**वेरपृक्तस्य ॥ ६ । १ । ६७ ॥**

दर्विजागृव्योः प्रतिषेधो वक्तव्यः । दर्विः जागृविः ॥ किमुच्यते दर्विजागृव्योः प्रतिषेधो वक्तव्य इति यदापृक्तस्येत्युच्यते । भवति वै किंचिदाचार्याः क्रियमाणमपि चोदयन्ति । तद्वा कर्तव्यं दर्विजागृव्योर्वा प्रतिषेधो वक्तव्यः ॥

---

वकाराचें उच्चारण केलें आहे. जसें—वृक्णः वृक्णवान् विव्रश्चिषति.[५]

(वा. ५) वकारोच्चारणाचें हें फल घडून येत नाहीं. कारण संप्रसारण व हलादिशेष हे बहिरंग आहेत आणि व्रश्च् वगैरे धातूंचे ठिकाणीं होणारा वलि – लोप हा अंतरंग आहे. तेव्हां बहिरंग जे संप्रसारण व हलादिःशेष ते असिद्ध असल्यामुळें त्यांचे पूर्वीच वलोप प्राप्त होत आहे.

(वा. ६) किंवा येथें वकाराचा लोप सांगूंच नये.

तर मग आस्रेमाणम् जीरदानुः येथें वलोप कसा व्हावा ?

(वा.७) आस्रेमाणम् जीरदानुः येथें छान्दसत्वास्तव वर्णलोप करावा. उदाहरणार्थ, संस्फायनः[६] व गयस्फायनः या शब्दांमध्यें यकाराचा लोप होऊन संस्फानः व गयस्फानः असे शब्द वेदामध्यें दिसतात.

(सू. ६७) दर्वि आणि जागृवि यांतील वि शब्दाच्या लोपाचा प्रतिषेध करावा. उदा० दर्विः, जागृविः.

पण काय हो हा प्रतिषेध करावा असें जें म्हटलें आहे तें कशाकरितां ? कारण सूत्रामध्यें अपृक्तस्य असें म्हटलेंच आहे.[२]

कोठें असेंही होतें कीं सूत्रामध्यें केलेल्या अर्थावर आक्षेप घ्यावयाचा असतो. म्हणून त्या अर्थाकडे लक्ष न देतांच आचार्य बोलूं लागतात. तेव्हां येथें वार्तिककारांचा अभिप्राय असा आहे कीं-'अपृक्तस्य' हें करावें किंवा दर्वि व जागृवि येथील लोपाचा प्रतिषेध करावा.

---

५. व्रश्च् धातूहून क्त किंवा क्तवतु प्रत्यय (३।२।१०२), रेफाला संप्रसारण (६।१।१६), सकाराचा लोप (८।२।२९), कुत्व (८।२।३०), व प्रत्याच्या तकाराला नकार (८।२।४५), हीं कार्यें झालीं आहेत. विव्रश्चिषति येथें रेफाचा हलादिः शेषः (७।४।६०) यानें लोप झाला आहे. तेव्हां वल् पुढें नसल्यामुळें वकाराच्या लोपाची प्राप्ति येत नाहीं.

६. सम् आणि गय हे शब्द मागें असतांना स्फाय् धातूहून ल्युट् प्रत्यय केला आहे.

१ (सू. ६७) वि प्रत्ययाचा जो अपृक्तसंज्ञक वकार त्याचा लोप होतो. क्विप् क्विन् अथवा विच् या प्रत्ययांतील इत्संज्ञक वर्णांचा लोप होऊन जो वकार राहतो त्याचा या प्रकृत सूत्रानें लोप होतो.

२. आणि दर्वि व जागृवि यांतील वि शब्दाला अपृक्त संज्ञाच नाहीं. ती फक्त एकवर्णरूप प्रत्ययालाच होत असते (१।२।४१).

**वेर्लोपे दर्विजागृव्योरप्रतिषेधोऽनुनासिकपरत्वात् ॥ १ ॥**

वेर्लोपे दर्विजागृव्योरप्रतिषेधः । अनर्थकः प्रतिषेधोऽप्रतिषेधः । लोपः कस्मान्न भवति । अनुनासिकपरत्वात् । अनुनासिकपरस्य विशब्दस्य ग्रहणं न चात्रानुनासिकपरो विशब्दः शुद्धपरश्चात्र विशब्दः ॥ यद्यनुनासिकपरस्य विशब्दस्य ग्रहणमित्युच्यते घृतस्पृक् दलस्पृक् अत्र न प्राप्नोति न ह्येतस्माद्विशब्दादनुनासिकं परं पश्यामः । अनुनासिकपरत्वादिति । नैवं विज्ञायते अनुनासिकः परोऽस्मात्सोऽयमनुनासिकपरः अनुनासिकपरत्वादिति । कथं तर्हि । अनुनासिकः परोऽस्मिन्सोऽयमनुनासिकपरः अनुनासिकपरत्वादिति । एवमपि प्रियदर्वि अत्र प्राप्नोति । असिद्धोऽत्रानुनासिकः ॥ एवमपि धात्वन्तस्य प्रतिषेधो वक्तव्यः । इवि दिवि धिवि ।

**धात्वन्तस्य चार्थवद्ग्रहणात् ॥ २ ॥**

अर्थवतो विशब्दस्य ग्रहणं न धात्वन्तोऽर्थवान् ॥

**वस्य वानुनासिकत्वात्सिद्धम् ॥ ३ ॥**

---

( वा. १ ) वेरपृक्तस्य या लोपाविषयीं दर्वि व जागृवि येथील विशब्दाच्या लोपाचा प्रतिषेध केला आहे तो अनर्थक होत आहे. कारण ' वेरपृक्तस्य ' येथें अनुनासिकपर[३] अशा विशब्दाचें ग्रहण केलें आहे. आणि दर्वि व जागृवि येथें तर अनुनासिकपर असा वि शब्द नाहीं. तेथें निरनुनासिकपर असा वि शब्द आहे.

जर अनुनासिकपर[४] अशा वि शब्दाचें ग्रहण केलें तर घृतस्पृक् तैलस्पृक् येथें वि शब्दाचा लोप प्राप्त होत नाहीं. कारण तेथें वि शब्दाच्या पुढें अनुनासिक दृष्टीस पडत नाहीं[५].

अनुनासिकपर या शब्दाचा अनुनासिक आहे पुढें ज्याहून असा अर्थ घेऊं नये तर अनुनासिक आहे पर अवयव ज्यामध्यें असा अर्थ घ्यावा.

तरीही प्रियदर्वि कुलम् येथें वि शब्दाचा लोप प्राप्त होत आहे[६].

येथें केलेल्या अनुनासिकाला असिद्धत्व असल्यामुळें लोप होत नाहीं.

असें आहे तरीही धातूच्या शेवटीं असलेल्या वि शब्दाचा लोप प्राप्त होत आहे. उदा० इवि[७] दिवि धिवि.

( वा. २ ) 'वेरपृक्तस्य' येथें वि शब्दानें अर्थवान् अशा वि शब्दाचें ग्रहण समजावयाचें आहे. आणि धातूच्या शेवटीं असलेला वि शब्द तर अर्थवान् नाहीं.

---

३. वि शब्दांतील जो पर इकार तो अनुनासिक असला पाहिजे. क्विप्, क्विन् व विच् या प्रत्ययांतील इकार हा मूळचा अनुनासिक उच्चारला आहे. म्हणूनच त्याला इत्संज्ञा ( १।३।२ ) होते आणि त्याचा लोप ( १।३।९ ) होतो.

४. अनुनासिकपर याचा अर्थ ' अनुनासिक वर्ण आहे पुढें ज्याहून ' असा मनांत घेऊन ही शंका केली आहे.

५. येथें क्विन् प्रत्यय ( ३।२।५८ ) केला आहे. त्यामध्यें वि शब्दाच्या पुढें अनुनासिक नकार जरी लावला आहे तरी त्याचा लोप झाल्यानंतर वि शब्दाचा लोप करतेवेळीं तो दृष्टीस पडत नाहीं.

६. कारण येथें दर्वि शब्दांतील शेवटच्या इकाराला अनुनासिक ( ८।४।५७ ) झाला आहे.

७. या धातूंच्या शेवटीं असलेला इकार इत्संज्ञक आहे. तेव्हां तो अर्थातच मूळचा अनुनासिक उच्चारलेला आहे.

अथवा वकारस्यैवेदमनुनासिकस्य ग्रहणम्। सन्ति हि यणः सानुनासिका निरनुनासिकाश्च ॥

**[1]हल्ङ्याब्भ्यो दीर्घात्सुतिस्यपृक्तं हल् ॥ ६ । १ ॥ ६८ ॥**

यदि पुनरयमपृक्तलोपः संयोगान्तलोपो विज्ञायेत। किं कृतं भवति । द्विहल्पृक्तग्रहणं तिस्योश्च ग्रहणं न कर्तव्यं भवति।

**हलन्तादपृक्तलोपः संयोगान्तलोपश्चेन्नलोपाभावो यथा पचन्निति ॥ १ ॥**

हलन्तादपृक्तलोपः संयोगान्तलोपश्चेन्नलोपाभावः। राजा तक्षा । संयोगान्तलोपस्यासिद्धत्वान्नलोपो न प्राप्नोति। यथा पचन्निति । तद्यथा। पचन् यजन्नित्यत्र संयोगान्तलोपस्यासिद्धत्वान्नलोपो न भवति॥ नैष दोषः। आचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयति सिद्धः

---

( वा. ३ ) अथवा वेः येथें अनुनासिक अशा वकारानेंच ग्रहण केलें आहे. य, व, आणि ल हे अनुनासिक व निरनुनासिक असे दोनही प्रकारचे आहेतच.

( सू. ६८ ) हलन्ताहून पुढील अपृक्ताचा जो हा लोप सांगितला आहे तो जर संयोगान्तलोप ( ८।२।२३ ) समजला जाईल[2] तर—

तर मग काय होईल ?

ह्या सूत्रामध्यें हल्-ग्रहण, अपृक्त ग्रहण, तसेंच ति व सि, यांचेंही ग्रहण करावयाची जरूर राहणार नाहीं.

हलन्ताहून होणारा हा अपृक्तलोप जर संयोगान्त-लोप समजला जाईल तर राजा व तक्षा येथें संयोगान्त-लोप असिद्ध असल्यामुळें नलोप ( ८।२।७ ) होणार नाहीं. उदा० जसा पचन् व यजन् येथें तकाराचा ' संयोगान्तस्य लोपः ' यानें केलेला लोप असिद्ध असल्यामुळें नलोप होत नाहीं, तसाच येथेंही होणार नाहीं.

हा दोष येत नाहीं. कारण आचार्यांनीं जो संबुद्धि पुढें असतांना नलोपाचा निषेध (८।२।८)

---

८. क्विप् क्विन् व विच् या प्रत्ययांतील वकार मूळचा अनुनासिक उच्चारला आहे असें समजावें. इवि दिवि आणि धिवि या धातूंमधील वकार मात्र अनुनासिक नाहीं. एकंदरींत दर्वि व जागृवि येथें लोपाचा प्रतिषेध करावयास नको, व प्रकृत सूत्रामध्यें अपृक्तस्य असेंही म्हणावयास नको.

१ ( सू. ६८ ) हलन्ताहून पर किंवा दीर्घ जे ङी व आप् तदन्ताहून पर असें जें सु ति किंवा सि या प्रत्ययां-संबंधीं अपृक्त हल् त्याचा लोप होतो. उदा०–राजा, नदी, रमा.

२. भूभृत् वगैरे हलन्त शब्दांच्या पुढील प्रथमा एकवचन सु प्रत्ययाचा प्रकृत सूत्रानें लोप होतो. तो तसा न करतां ' संयोगान्तस्य लोपः ' ( ८।२।२३ ) यानेच लोप केला[3] तर—

३. पद–संज्ञक जें प्रातिपदिक त्याच्या शेवटी असलेल्या नकाराचा लोप त्या सूत्राने सांगितला आहे. राजन् शब्दाहून सुप्रत्यय, उपधेला दीर्घ ( ६।४।८ ) व प्रकृत सूत्रानें सुप्रत्ययाचा लोप केला असतां मागील प्रातिपदिक हें प्रत्ययलक्षणानें ( १।१।६२ ) पद असल्यामुळें नकाराचा लोप झाला आहे. पचन् येथें पचत् शब्दाहून सु प्रत्यय, नुम् आगम ( ७।१।७० ), प्रकृत सूत्रानें सु प्रत्ययाचा लोप; व तकाराचा संयोगान्त–लोप ( ८।२।२३ ) झाला आहे. संयोगान्त-लोप हा असिद्ध ( ८।२।१ ) असल्यामुळें नलोपाच्या दृष्टीनें पचन् त् असें दिसतें; पदाच्या शेवटीं नकार नाहीं म्हणून नकाराचा लोप होत नाहीं. तसा जर राजा ह्या प्रथमा एकवचनाच्या उदाहरणामध्यें सु प्रत्ययाचा संयोगान्तलोप केला तर तो असिद्ध असल्यामुळें नलोपाच्या दृष्टीनें राजन् स् असें पद दिसेल आणि पदाच्या शेवटीं नकार नसल्यामुळें नलोप होणार नाहीं.

संयोगान्तलोपो नलोपो इति यदयं न ङिसंबुद्ध्योः [८. २. ८] इति संबुद्धौ प्रतिषेधं शास्ति। इहापि तर्हि प्राप्नोति । पचन्। यजन् । तुल्यजातीयस्य ज्ञापकं भवति। कश्च तुल्यजातीयः । यः संबुद्धावनन्तरः॥

**वस्वादिषु दत्वं संयोगादिलोपबलीयस्त्वात्**

वस्वादिषु दत्वं न सिध्यति। उखास्रत् पर्णध्वत्। किं कारणम्। संयोगादिलोपबलीयस्त्वात् । संयोगान्तलोपात्संयोगादिलोपो बलीयान्॥

**यथा कूटतडिति ॥ २॥**

तद्यथा कूटतट् काष्ठतडित्यत्र संयोगान्तलोपात्संयोगादिलोपो बलीयान्भवति ॥ ननु च दत्वे कृते न भविष्यति। असिद्धं दत्वं तस्यासिद्धत्वात्प्राप्नोति। सिद्धकाण्डे पठितं वस्वादिषु दत्वं सौ दीर्घत्व इति । तत्र सौ दीर्घत्वग्रहणं न करिष्यते । वस्वादिषु

---

केला आहे त्यावरून त्यांनीं 'नलोप कर्तव्य असतांना संयोगान्तलोप सिद्ध आहे' असें सुचविलें आहे.

पण तसें गृहीत धरलें तर पचन् व यजन् येथें तकाराचा संयोगान्त-लोपही सिद्ध होत असल्यामुळें तेथेंही नलोप होऊं लागेल.

हा दोष येत नाहीं. कारण 'संयोगान्त लोप हा नलोपाच्या दृष्टीनें सिद्ध समजावा' या अर्थाचें ज्ञापक संबुद्धिग्रहण हें आहे म्हणून त्या संबुद्धीच्या उदाहरणामध्यें जसा विषय आहे तसा विषय असला तरच संयोगान्तलोप सिद्ध समजला जाईल.

तसा विषय म्हणजे कसा ?

राजन् येथें जसा संबुद्धि-प्रत्ययाच्या जवळ नकार आहे तसा प्रत्ययाच्या जवळ नकार असला पाहिजे या तऱ्हेचा.

(वा. २) तर मग सु प्रत्ययाचा संयोगान्तलोप केला असतां असा दोष येतो कीं 'वसुस्रंसुध्वंसु०' (८।२।७२) यानें सांगितलेलें दत्व उखास्रत् पर्णध्वत् येथें होणार नाहीं. कारण, संयोगादिलोप हा संयोगान्तलोपाचा अपवाद असल्यामुळें संयोगान्तलोपाचा बाध करून संयोगादिलोप (८।२।२९) प्राप्त होईल.

उदाहरणार्थ पहा: कूटतट् व काष्ठतट् येथें प्रकृत सूत्रानें सु प्रत्ययाचा लोप केला असतां कूटतक्ष् व काष्ठतक्ष् अशा स्थितींत संयोगान्तलोपाचा अपवादत्वास्तव बाध करून जसा संयोगादिलोप होतो तसाच येथेंही होईल[६].

हा दोष येत नाहीं. कारण उखास्रस्स् असें असतां प्रथमत: 'वसुस्रंसु०' हें दत्व केलें असतां संयोगादिलोप प्राप्त होत नसल्यामुळें अर्थात् संयोगान्तलोपच होईल.

पण दत्व हें असिद्ध असल्यामुळें त्या दत्वाच्या पूर्वी संयोगादिलोपच प्राप्त होत आहे ना ?

असिद्धाचा अपवाद म्हणून सिद्धकांडामध्यें 'वस्वादिषु दत्वं सौ दीर्घत्वे' (८।२।६ वा. ८) म्हणजे 'वसुस्रंसु० हें दत्व सु प्रत्ययाच्या निमित्तानें दीर्घ (६।४।१४) कर्तव्य असतांना सिद्ध समजावें' असें जें वचन आहे त्या वचनांतील 'सौ दीर्घत्वे' हे शब्द काढून टाकून

---

४. सु प्रत्ययाचा संयोगान्तलोप केला तर राजा येथें नलोप होणार नाहीं तसा राजन् येथेंही होणार नाहीं, तेव्हां त्याकरितां संबुद्धिग्रहण (८।२।८) करावयास नको.

५. पचन् येथें प्रत्ययाच्या जवळ नकार नाहीं मध्यें तकारानें व्यवधान आहे म्हणून तेथें संयोगान्तलोप सिद्ध समजला जात नाहीं.

६. तेव्हां उखास्रत् या शब्दांतील सकाराचा संयोगादिलोप झाल्यानंतर पुढील प्रत्ययाच्या सकाराला रुत्व व विसर्ग होऊन भलतेंच रूप होईल.

दत्वमित्येव ॥ एवमप्यपदान्तत्वान्न प्राप्नोति । अथ सावपि पदं भवति राजा तक्षा नलोपे कृते विभक्तेः श्रवणं प्राप्नोति । सैषोभयतस्पाशा रज्जुर्भवति ॥

## रात्तलोपो नियमवचनात् ॥ ३ ॥

रात्तलोपो वक्तव्यः । अबिभर्भवान् । अजागर्भवान् । किं पुनः कारणं न सिध्यति । नियमवचनात् । रात्सस्य [ ८. २. २४ ] इत्येतस्मान्नियमान्न प्राप्नोति ॥ नैष दोषः । रात्सस्येत्यत्र तकारोऽपि निर्दिश्यते । यद्येवं कीर्तयतेरप्रत्ययः कीरिति प्राप्नोति कीर्त् इति चेष्यते । यथालक्षणमप्रयुक्ते ॥

## रोरुत्वं च ॥ ४ ॥

---

'वस्वादिषु दत्वं सिद्धम्' एवढेंच म्हणण्यांत येईल.

पण अशा रीतीनें सिद्ध होईल असें समजलें तरी उखास्रस् असें असतां सु प्रत्ययाच्या मागील उखास्रस् याला पद संज्ञा नसल्यामुळें दत्व येणार नाहीं.

बरें; आतां प्रथमैकवचन सु प्रत्यय पुढें असतांना मागील शब्दाला पदसंज्ञा होते असा पक्ष घेतला तर राजा व तक्षा येथें राजन्स् अशा स्थितींत राजन् याला पद संज्ञा असल्यामुळें संयोगान्त लोपाच्या अगोदरच नलोप होऊन विभक्तीचें श्रवण होऊं लागेल. तेव्हां जशी एखादी चमत्कारिक दोरी असते कीं तिची कोणतीही बाजू घेतली तरी गळ्याशीं फास अडकतो तशा प्रकारची अवस्था येथें होत आहे.

( वा. ३) तसेंच, रेफाहून पुढच्या तकाराचा लोप होण्याकरितां वचन करावें लागणार आहे. जसें– अबिभर्भवान् अजागर्भवान्.

पण येथें संयोगान्तलोपानें कां बरें सिद्धि होणार नाहीं ?

रेफाहून सकाराचाच संयोगान्तलोप करावयाचा असा नियम असल्यामुळें येथें संयोगान्तलोप येऊं शकत नाहीं.

हा दोष येत नाहीं. कारण 'रात्सस्य' येथें त्सस्य असा तकार आणि सकार या दोघांचा निर्देश केला आहे. तेव्हां रेफाहून तकार किंवा सकार यांचाच लोप होतो असा नियम ठरल्यामुळें वरील दोष येत नाहीं.

पण जर 'रात्सस्य' येथें तकाराचाही निर्देश असेल तर कॄत् धातूहून णिच् ( ३।१।२५ ) प्रत्यय करून पुढें क्विप् प्रत्यय केला असतां कीर्त् असा शब्द होतो. त्याच्या प्रथमा एकवचनामध्यें तकाराचा लोप होऊन कीः असें रूप होऊं लागेल. आणि कीर्त् असें तर रूप इष्ट आहे.

अशा तऱ्हेच्या शब्दाविषयीं शास्त्राची प्रवृत्ति न करणेंच उचित होय.

---

७. तेव्हां संयोगादिलोपाच्या दृष्टीनेंही दत्व सिद्ध असल्यामुळें संयोगादिलोपाचा परत्वारतव बाध करून दत्वच होईल असा अभिप्राय आहे.

८ मागें ( १।४।१७ ) भा. पृ. ३१९ पं. १८ पहा.

९. भृ धातूचें लङ् प्रथम पुरुष एकवचनी क्रियापदाचें रूप अबिभः असें होतें. तसेंच अजागः हें जागृ धातूचें रूप आहे. अबिभः येथें शप्, श्लु, द्वित्व, अभ्यासाला इत्त्व ( ७।४।७६ ), उत्तर खंडामध्यें ऋकाराला गुण आणि अट् आगम होऊन अबिभर् या हलन्ताच्या पुढील ति प्रत्ययाचा प्रकृत सूत्रानें लोप होतो. तसेंच अजागः येथें शप्, लुक्, गुण आणि अट् आगम होऊन अजागर् या हलन्ताच्या पुढील ति प्रत्ययाचा प्रकृत सूत्रानें लोप होतो. आतां जर येथें संयोगान्तलोपानें सिद्धि होईल असें म्हणावें तर तसें होणार नाहीं. कारण रात्सस्य ( ८।२।२४ ) हा त्याचा नियम आहे.

रोश्चोत्त्वं वक्तव्यम् । अभिनोऽत्र । अच्छिनोऽत्र । संयोगान्तलोपस्यासिद्धत्वादतो ऽतीत्युत्त्वं न प्राप्नोति ॥

**न वा संयोगान्तलोपस्योत्त्वे सिद्धत्वात्**

न वैष दोषः । किं कारणम् । संयोगान्तलोपस्योत्त्वे सिद्धत्वात् । संयोगान्तलोप उत्त्वे सिद्धो भवति ॥

**यथा हरिवो मेदिनमिति ॥ ५ ॥**

तद्यथा । हरिवो मेदिनं त्वेत्यत्र संयोगान्तलोप उत्त्वे सिद्धो भवति ॥

स एव तर्हि दोषः सैषोभयतस्पाशेति । तस्मादशक्योऽपृक्तलोपः संयोगान्तलोपो विज्ञातुम् । न चेद्विज्ञायते द्विहल्पृक्तग्रहणं तिस्योश्च ग्रहणं कर्तव्यमेव ॥

**एङ्ह्रस्वात्संबुद्धेः ॥ ६ । १ । ६९ ॥**[1]

**संबुद्धिलोपे डतरादिभ्यः प्रतिषेधः ॥ १ ॥**

संबुद्धिलोपे डतरादिभ्यः प्रतिषेधो वक्तव्यः । हे कतरत् । हे कतमत् ॥

---

( वा. ४ ) तसेंच 'रु'चें स्थानीं सांगितलेलें उत्व होण्याकरितांही वचन करावें लागणार आहे. उदा० अभिनोऽत्र अच्छिनोऽत्र. येथें 'अतो रोरप्लुता०' या सूत्राच्या दृष्टीनें संयोगान्तलोप असिद्ध असल्यामुळें सकारानें व्यवधान येतें. म्हणून अकार पुढें असतांना 'रु'चें स्थानीं सांगितलेलें उत्व होणार नाहीं.[10]

( वा. ५ ) उत्व होण्याबद्दल वचन करावयास नको.

काय कारण ?

कारण असें कीं उत्व कर्तव्य असतांना संयोगान्तलोपाला सिद्धत्व आहे. हरिवो[11] मेदिनं त्वा येथें जसा उत्व कर्तव्य असतांना संयोगान्तलोप सिद्ध समजला जातो तसेंच हें होय.

तर मग दोन्ही बाजूला फास असलेल्या दोरीसारखा जो उखासत् येथें पूर्वी दोष दाखविला आहे तोच दोष प्रकृत सूत्रामध्यें हल् वगैरे शब्द काढले असतां कायमचा समजावा. तात्पर्य, प्रकृत सूत्रानें जो हलन्ताहून अपृक्ताचा लोप सांगितला आहे तो संयोगान्तलोप समजणें अशक्य आहे. जर तसें समजतां येणें शक्य नाहीं तर दोन वेळ हल्, अपृक्त, आणि ति व सि यांचें ग्रहण करणें जरूर आहे.

(सू. ६९ वा. १) हा जो संबुद्धिलोप सांगितला आहे तेथें डतरादि पांचांहून पुढें असलेल्या संबुद्धीचा लोप होत नाहीं असा निषेध

---

१०. भिद् आणि छिद् या धातूंहून लङ् प्रत्यय व मध्यम पुरुष एकवचन दाखविणारा सिप् प्रत्यय केला असतां त्याचा प्रकृत सूत्रानें लोप, श्नम् विकरण, अट् आगम आणि धातूच्या दकाराला रुत्व ( ८।२।७५ ) होऊन अभिनः व अच्छिनः अशीं क्रियापदें होतात. त्या क्रियापदांपुढें अत्र हा शब्द ठेवला असतां 'रु' चें स्थानीं विसर्ग न होतां उत्व ( ६।१।११३) गुण (६।१।८७) व पूर्वरूप ( ६।१।१०९ ) होऊन अभिनोऽत्र व अच्छिनोऽत्र अशीं रूपें होतात. येथें जर सिप् प्रत्ययाचा लोप प्रकृत सूत्रानें न करतां 'संयोगान्तस्य लोपः' यानें केला तर तो लोप असिद्ध असल्यामुळें उत्व होणार नाहीं.

११. हरि शब्दाहून मतुप् प्रत्यय केला असतां हरिवत् असा शब्द सिद्ध होतो. पुढें संबुद्धि सु प्रत्यय, नुम् आगम ( ७।१।७० ), प्रकृत सूत्रानें सु प्रत्ययाचा लोप, तकाराचा संयोगान्तलोप, व नकाराला रुत्व ( ८।३।१ ) होऊन हे हरिवः असें रूप होतें. मेदिनम् हा शब्द पुढें असल्यामुळें 'रु'चें स्थानीं विसर्ग न होतां उत्व ( ६।१।११४ ) व गुण होऊन हरिवो मेदिनम् असें होतें. येथें तकाराचा झालेला संयोगान्तलोप सिद्ध आहे म्हणूनच उत्व झालें आहे.

१ ( सू. ६९ ) एङन्त किंवा ह्रस्वान्त याच्या पुढील हलाचा लोप होतो पण तें हल् संबुद्धि-प्रत्ययासंबंधीं असलें पाहिजे.

किमुच्यते डतरादिभ्यः प्रतिषेधो वक्तव्य इति यदापृक्तस्येत्यनुवर्तते ।

**अपृक्ताधिकारस्य निवृत्तत्वात् ॥ २ ॥**

निवृत्तोऽपृक्ताधिकारः ॥ किं डतरादिभ्यः प्रतिषेधं वक्ष्यामीत्यतोऽपृक्ताधिकारो निवर्त्यते । नेत्याह ।

**तच्चामर्थम् ॥ ३ ॥**

स चावश्यमपृक्ताधिकारो निवर्त्यः । किमर्थम् । अमर्थम् । अमो लोपो यथा स्यात् । हे कुण्ड । हे पीठ ॥ निवृत्तेऽपि वा अपृक्ताधिकारे ऽमो लोपो न प्राप्नोति । किं कारणम् । न हि लोपः सर्वापहारी । मा भूत्सर्वस्य लोपः । अलोऽन्त्यस्य विधयो भवन्तीत्यन्त्यस्य लोपे कृते द्वयोरकारयोः पररूपेण सिद्धं रूपं स्यात् हे कुण्ड हे पीठेति ॥ यद्येतल्लभ्येत कृतं स्यात् । तत्तु न लभ्यम् । किं कारणम् । अत्र हि तस्मादित्युत्तरस्यादेः परस्य [ १. १. ६७; ५४ ] इत्यकारस्य लोपः प्राप्नोति । अकारलोपे च सति मकारे ऽतो दीर्घो यञि सुपि च [ ७. ३. १०१; १०२ ] इति दीर्घत्वे हे कुण्डाम् हे पीठामित्येतद्रूपं प्रसज्येत ॥ एवं

---

सांगावा. जसें—हे कतरत्[२], हे कतमत्.

डतरादिकांच्या पुढें संबुद्धिलोपाचा प्रतिषेध सांगावा असें हें काय हो म्हणत आहां ? कारण, अपृक्तस्य याची अनुवृत्ति येतच आहे[३].

( वा. २ ) अपृक्ताधिकार निवृत्त झाला आहे.

पण डतरादिकांहून संबुद्धिलोपाचा प्रतिषेध सांगावयाचा आहे म्हणून तो अधिकार निवृत्त झाला असें म्हणतां कीं काय ?

नाहीं.

तर मग काय ?

( वा. ३ ) अपृक्ताधिकार निवृत्त झाला असें समजलेंच पाहिजे.

तें कशाकरितां ?

हे कुण्ड, हे पीठ इत्यादि ठिकाणीं अम् याचा लोप झाला पाहिजे म्हणूनें[४].

पण अपृक्ताधिकाराची निवृत्ति समजली तरीही सगळ्या अमाचा लोप प्राप्त होत नाहींच. कारण लोप हा संपूर्ण स्थानीचा अपहार करतोच असा नियम नाहीं.

येथें संपूर्ण अमाचा लोप न झाला तरी हरकत नाहीं. 'अलोऽन्त्यस्य' ( १।१।५२ ) यानें मकाराचा लोप झाला असतां दोन्ही अकारांचें पररूप झाल्यामुळें हे कुण्ड हे पीठ इत्यादि रूपें साधतील.

परंतु अशी ही प्रक्रिया लाभली तर बरेंच. पण शास्त्रावरून ही प्रक्रिया लाभत नाहीं.

काय कारण ?

कारण असें कीं ह्रस्वाहून पुढील संबुद्धीचा लोप सांगितला असल्यामुळें येथें 'तस्मादित्युत्तरस्य' ( १।१।६७ ) आणि 'आदेः परस्य' ( १।१।५४ ) या परिभाषांच्या जोडीनें अमाच्या अकाराचा लोप प्रसक्त होतो. आणि तो अकाराचा लोप केला असतां मकार पुढें असल्यामुळें 'सुपि च' ( ७।३।१०२ ) यानें अदन्त अंगाला दीर्घ झाल्यामुळें कुण्डाम् व पीठाम् अशीं संबुद्धीचीं भलतींच रूपें होऊं लागतील.

---

२. कतर व कतम या शब्दांच्या पुढील संबुद्धि सु प्रत्ययाला अद् आदेश ( ७।१।२५ ) झाला आहे. हा आदेश अद्ड् असा आहे. पण तो डित् नाही, अद् एवढाच आहे असें गृहीत धरून हा विचार केला आहे.

३. तेव्हां अद् एवढ्याला अपृक्त संज्ञा नसल्यामुळें तेथें लोप होणारच नाहीं.

४. कुण्ड व पीठ या नपुंसकलिंगी शब्दांच्या पुढील संबुद्धि सु प्रत्ययाला अम् ( ७।१।२४ ) झाल्यानंतर त्याचा प्रकृत सूत्रानें लोप होत असतो. अपृक्ताधिकार चालू असला तर अम् याला अपृक्त संज्ञा नसल्यामुळें लोप होणार नाहीं आणि हे कुण्ड असें रूप होणार नाही.

तर्हि हलो लोपः संबुद्धिलोपः । तद्धल्ग्रहणं कर्तव्यम् । न कर्तव्यम् । प्रकृतमनुवर्तते । क प्रकृतम् । हल्ङ्याब्भ्यो दीर्घात्सुतिस्यपृक्तं हल् [ ६८ ] इति । तद्वै प्रथमानिर्दिष्टं षष्ठीनिर्दिष्टेन चेहार्थः । नैष दोषः । एङ्ह्रस्वादित्येषा पञ्चमी हलित्यस्याः प्रथमायाः षष्ठीं प्रकल्पयिष्यति तस्मादित्युत्तरस्येति । एवमपि प्रथमयोः पूर्वसवर्णदीर्घत्वे कृते हे कुण्डा हे पीठा इत्येतद्रूपं प्रसज्येत । अमि पूर्वत्वमत्र बाधकं भविष्यति । अमीत्युच्यते न चात्रामं पश्यामः । एकदेशविकृतमनन्यवद्भवतीति ॥ अथवेदमिह संप्रधार्यम् । संबुद्धिलोपः क्रियतामेकादेश इति किमत्र कर्तव्यम् । परत्वादेकादेशः । एवमप्येकादेशे कृते व्यपवर्गाभावात्संबुद्धिलोपो न प्राप्नोति । अन्तादिवद्भावेन व्यपवर्गो भविष्यति । उभयत आश्रये नान्तादिवत् । नोभयत आश्रयः करिष्यते । कथम् । नैवं

असें आहे तर मग हा संबुद्धिलोप संबुद्धीच्या व्यंजनाचा लोप म्हणून समजण्यांत येईल.

पण तसें समजण्याकरितां सूत्रामध्यें हल् शब्द घालावा लागेल.

हल् शब्द घालावयास नको. कारण पूर्वी हल्–ग्रहण केलें आहे तेंच येथें अनुवृत्त होत आहे.

पूर्वी कोठें केलें आहे ?

' हल्ङ्याब्भ्यो दीर्घात्सुतिस्यपृक्तं हल् ' या सूत्रांत.

पण तेथें तें प्रथमान्त आहे. आणि येथें तर षष्ठ्यन्त पाहिजे.

हा दोष येत नाहीं. कारण 'तस्मादित्युत्तरस्य' या परिभाषेच्या साहाय्यानें एङ्ह्रस्वात् ही पंचमी हल् या प्रथमान्ताला षष्ठ्यन्त बनवील.

पण अशा रीतीनें हलाचा लोप झाला तरी अकार कायम असल्यामुळें 'प्रथमयोः पूर्वसवर्णः' (६।१।१०२) यानें दीर्घ होऊन हे कुण्डा हे पीठा अशीं संबुद्धीचीं रूपें होऊं लागतील.

त्या पूर्वसवर्ण-दीर्घाचा ' अमि पूर्वः ' (६।१।१०७) हें पूर्वरूप बाध करील.

पण तेथें अम् पुढें असतांना असें म्हटलें आहे. आणि येथें तर अम् दृष्टीस पडत नाहीं.

मकार लुप्त झाला तरी उरलेल्या अकारालाच अम् असें म्हणावयास हरकत नाहीं.[5]

अथवा येथें असा विचार करावा कीं–कुण्ड अम् अशा स्थितींत प्रथमतः संबुद्धिलोप करावा किंवा एकादेश करावा.

मग येथें या दोहोंपैकीं पूर्वी काय बरें करावें ?

पर असल्यामुळें एकादेश म्ह० पूर्वरूप प्रथमतः करावें.

पण तसें केलें असतां पीठम् असें झाल्यामुळें ऱ्हस्वाहून पर जी संबुद्धि अशा रीतीचें ऱ्हस्व आणि संबुद्धि यांचें पौर्वापर्य संभवत नाहीं. म्हणून संबुद्धिलोप प्राप्त होत नाहीं.

' अन्तादिवच्च ' (६।१।८५) यानें तें पौर्वापर्य जुळेल.

पण एकाच वेळीं एकच एकादेश पूर्वाचा अन्तही समजून त्याच वेळीं तो पराचा आदि कसा बरें समजला जाईल ? कारण असें समजणें हें युक्तीला धरून नाहीं.[6]

पण प्रकृत सूत्राला या दोन गोष्टींची जरूर आम्ही ठेवीतच नाहीं.

५. कारण, एखाद्या पदार्थाच्या कांहीं भागाला विकार झाला तरी तो पदार्थ निराळा समजला जात नाहीं. कुत्र्याचें शेपूट तुटलें तरी त्याला कुत्रेच म्हणतात. हाच एकदेश–विकृत–न्याय होय.

६. कुण्ड अम् येथें पूर्वरूप एकादेश होऊन कुण्डम् असें झाल्यानंतर तो एकच अकार पूर्वीपैकीं समजून

विज्ञायते ह्रस्वादुत्तरस्याः संबुद्धेर्लोपो भवतीति। कथं तर्हि। ह्रस्वादुत्तरस्य हलो लोपो भवति स चेत्संबुद्धेरिति॥

स तर्हि प्रतिषेधो वक्तव्यः। न वक्तव्यः।

**उक्तं वा ॥ ४ ॥**

किमुक्तम्। सिद्धमनुनासिकोपधत्वादिति॥ एवमपि दलोपः साधीयः प्राप्नोति। दुक्करणाद्वा। अथवा दुग्डतरादीनामिति वक्ष्यामि॥ डित्करणाद्वा। अथवा डिद्-च्शब्दः करिष्यते। स तर्हि डकारः कर्तव्यः। न कर्तव्यः। क्रियते न्यास एव। द्विडकारको निर्देशः। अद्ड्डतरादिभ्य इति॥ एवमपि लोपः प्राप्नोति। विहितविशेषणं ह्रस्वग्रहणम्। यस्माद्ध्रस्वात्संबुद्धिर्विहितेति॥

**अपृक्तसंबुद्धिलोपाभ्यां लुक् ॥ ९ ॥**

---

ती हो कशी ?

ती अशी कीं– येथें ऱ्हस्वाहून पर जी संबुद्धि असा अर्थच आम्ही करीत नाहीं. तर ऱ्हस्वाहून पर हलाचा लोप होतो पण हल् संबुद्धीचा अवयव असेल तर, असा आम्ही अर्थ करतों.

पण असा अर्थ केला तर 'डतरादिकांच्याहून पुढील जी संबुद्धि तिच्या लोपाचा प्रतिषेध सांगावा ' असें जें पूर्वी म्हटलें आहे तें वचन आतां करावयास पाहिजे.

तें वचन करावयास नको.

( वा. ४ ) कारण अनुनासिकोपधत्वात्सिद्धम् ( ७।१।२५ वा. २ ) असें सांगितलेंच आहे.

पण अनुनासिकोपध असा अद् आदेश केला तर त्यामुळें तेथें प्रकृत सूत्रानें प्राप्त झालेला लोप दूर कसा होणार ? उलट सरळच दकाराचा लोप प्राप्त होईल.

याला उत्तर– 'दुक्करणाद्वा' ( ७।१।२५ वा. ३ ) म्हणजे डतरादिकांना दुक् आगम होतो असें सांगितलें आहे.

किंवा "डित्करणाद्वा" (७।१।२५ वा. ४) यानें डकारेत्संज्ञक असा अद् आदेश केला जाईल.

तर मग अद् आदेशाला तो डकार जोडावयास पाहिजे.

जोडावयास नको. सूत्रांत डकार जोडलाच आहे. 'अद्ड् डतरादिभ्यः पञ्चभ्यः' असा दोन डकारांचा निर्देश केला आहे.

दोन डकारांचा निर्देश केला तरीही अद् यांतील जो अकार तोच ऱ्हस्व घेऊन त्याच्या पुढील दकाराचा लोप प्राप्त होत आहे.

ऱ्हस्वग्रहण हें विहितविशेषण आहे. म्हणजे ज्या ऱ्हस्वाहून संबुद्धि करण्यांत आली त्या ऱ्हस्वाच्या पुढील हलाचा लोप होतो असा सूत्राचा अर्थ होतो.

( वा. ५ ) पूर्व सूत्रानें सांगितलेला अपृक्त-

---

कुण्ड हें ऱ्हस्वान्त अंग समजलें आणि तोच अकार पुढच्यापैकीं समजून अम् हा संबुद्धि प्रत्यय समजला तरी तो संबुद्धि प्रत्यय अम् हा कुण्ड याच्या पुढें आहे असें म्हणतां येत नाहीच.

७. असा अर्थ केला म्हणजे ऱ्हस्वाच्या पुढें हल् पाहिजे आणि तें हल् संबुद्धीपैकीं पाहिजे एवढीच अट आहे; ऱ्हस्वाच्या पुढें संबुद्धि पाहिजे अशी अट नाहीं.

८. अद् आदेशांतील अकार अनुनासिक आहे तेव्हां त्याला इत्संज्ञा होऊन लोप झाला म्हणजे कतरत् येथें एकादेश मुळींच नाहीं असें होतें.

९. दुक् हा कतर याचा अवयव झाला असल्यामुळें त्याच्या लोपाची शंकाच येत नाहीं. पुढील संबुद्धि सु प्रत्ययाचा लुक् ( ७।१।२३ ) झाला आहे.

१०. अद्ड् असा डित् आदेश मानला म्हणजे त्या डकारामुळें मागील कतर यांतील शेवटच्या अकाराचा लोप होतो.

अपृक्तसंबुद्धिलोपाभ्यां लुग्भवति विप्रतिषेधेन । अपृक्तलोपस्यावकाशः । गोमान् यवमान् । लुकोऽवकाशः । त्रपु जतु । इहोभयं प्राप्नोति । तद्ब्राह्मणकुलम् यद्ब्राह्मणकुलम् । संबुद्धिलोपस्यावकाशः । अग्ने वायो । लुकः स एव । इहोभयं प्राप्नोति । हे त्रपु । हे जतु । लुग्भवति विप्रतिषेधेन ॥ स तर्हि विप्रतिषेधो वक्तव्यः । न वक्तव्यः ।

**न वा लोपलुकोर्लुगवधारणाद्यथानडुह्यत इति ॥ ६ ॥**

न वार्थो विप्रतिषेधेन । किं कारणम् । लोपलुकोर्लुगवधारणात् । लोपलुकोर्हि लुगवधार्यते । लुग्लोपयणयवायावेकादेशेभ्यः । यथानडुह्यत इति । तद्यथा । अनड्वानिवाचरत्यनडुह्यत इत्यत्र लोपलुकोर्लुगवधार्यते । एवमिहापि ॥

**[1]शेश्छन्दसि बहुलम् ॥ ६।१।७० ॥**

अयं योगः शक्योऽवक्तुम् । कथमग्ने त्री ते वाजिना त्री षधस्था ता ता पिण्डानामिति । पूर्वसवर्णेनाप्येतत्सिद्धम् ॥ न सिध्यति । नुमा व्यवहितत्वात्पूर्वसवर्णो न प्राप्नोति ॥ छन्दसि नपुंसकस्य पुंवद्भावो

---

लोप आणि प्रकृत सूत्रानें सांगितलेला संबुद्धिलोप या दोहोंपेक्षां लुक् हा विप्रतिषेधानें पूर्वी होतो. अपृक्तलोपाला गोमान् यवमान् वगैरे ठिकाणीं अवकाश आहे. तसेंच लुकाला ( ७।१।२३ ) त्रपु जतु येथें अवकाश आहे. तद् ब्राह्मणकुलम् यद् ब्राह्मणकुलम् येथें दोहोंचीही प्राप्ति येत आहे. तसेंच संबुद्धिलोपाला हे अग्ने हे वायो वगैरे ठिकाणीं अवकाश आहे. व लुकाला त्रपु जतु हा अवकाश दाखविलाच आहे. आणि हे त्रपु हे जतु येथें दोहोंचीही प्राप्ति येत आहे. तेव्हां विप्रतिषेध असल्यामुळें पूर्वी लुक् होतो.

तर मग तसा विप्रतिषेध सांगितला पाहिजे.

सांगावयास नको. कारण—

( वा. ६ ) विप्रतिषेध सांगण्याचें प्रयोजन नाहीं. कारण, लोप आणि लुक यांमध्यें लुक् प्रबल असें ठरलेंच आहे. लोपापेक्षांच काय ? तर लुक् हा लोप यण् अय् अव् आय् आव् आणि एकादेश या सर्वांपेक्षांच ज्यास्त बलवान् आहे. जसें—अनड्वानिव आचरति [11]अनडुह्यते. येथें लोप आणि लुक् हे प्राप्त झाले असतां लुकच केला जातो. तसेंच येथें पण लुकच केला जाईल.

( सू. ७० ) हें सूत्र केलें नाहीं तरी चालेल. तर मग "अग्ने त्री ते वाजिना त्री षधस्था" "ता ता पिण्डानाम्" येथें त्री व ता हीं रूपें कशीं साधावयाचीं ?

त्रि–इ असें असतां पूर्वसवर्णदीर्घ ( ६।१।१०२ ) केल्यानेंही त्री असें रूप साधत आहे.

साधत नाहीं. कारण, अगोदर नुम् आगम होईल, आणि नंतर त्यानें व्यवधान येत असल्यामुळें पूर्वसवर्णदीर्घ प्राप्त होणार नाहीं.

---

११. अनडुह् शब्दाहून सु प्रत्यय करून पुढें क्यङ् प्रत्यय ( ३।१।११ ) झाला आहे. क्यङ्प्रत्ययान्ताला धातुसंज्ञा ( ३।१।३२ ) असल्यामुळें 'सुपो धातु०' ( २।४।७१ ) यानें सु प्रत्ययाचा लुक् प्राप्त झाला आहे आणि पूर्व सूत्रानें लोप प्राप्त झाला आहे, त्यांमध्यें लुकच होतो. जर लोप झाला असता तर प्रत्ययलक्षणानें अनड्वान् याप्रमाणें आम् नुम् वगैरे झाले असते.

१. ( सू. ७० ) वेदामध्यें शि प्रत्ययाचा बाहुल्येंकरून लोप होतो. उदा०-अग्ने त्री ते. नपुंसकलिंगी त्रि शब्दाचें जे प्रथमेचें तसेंच द्वितीयेचें बहुवचन त्रीणि असें होतें त्याचे ऐवजीं त्री असें येथें झालें आहे. 'जश्शसोः शिः' ( ७।१।२० ) यानें झालेल्या शि आदेशाचा प्रकृत सूत्रानें लोप झाल्यानंतर नकाराचाही लोप ( ८।२।७ ) झाला आहे. तसेंच ता ता पिण्डानाम् या वैदिक वाक्यामध्यें तानि तानि याच्या ऐवजीं ता ता असें झालें आहे.

वक्तव्यो मधोर्गृह्णाति मधोस्तृप्ता इवासत इत्येवमर्थम्। तत्र पुंवद्भावेन नुमो निवृत्तिः। नुमि निवृत्ते पूर्वसवर्णेन सिद्धम्॥ भवेत्सिद्धमग्ने त्री ते वाजिना त्री षधस्थेति। इदं तु न सिध्यति ता ता पिण्डानामिति॥ इदमपि सिद्धम्। कथम्। साप्तमिके पूर्वसवर्णे कृते पुनः षाष्ठिको भविष्यति॥ एवमपि जसि गुणः प्राप्नोति॥ वक्ष्यत्येतज्जसादिषु च्छन्दोवावचनं प्राङ् णौ चङ्युपधाया इति॥

[१]ह्रस्वस्य पिति कृति तुक्॥ ६। १। ७१॥

तुकि पूर्वान्ते नपुंसकोपसर्जनह्रस्वत्वं द्विगुस्वरश्च॥ १॥

तुकि पूर्वान्ते नपुंसकोपसर्जनह्रस्वत्वं द्विगुस्वरश्च न सिध्यति। आराशस्त्रि च्छत्रम् धानाशष्कुलि च्छत्रम्। निष्कौशाम्बि च्छत्रम् निर्वाराणसि च्छत्रम्। द्विगुस्वर। पञ्चारत्नि च्छत्रम् दशारत्नि च्छत्रम्। तुकि कृतेऽनन्त्यत्वादेते विधयो न प्राप्नुवन्ति॥

---

वेदामध्यें नपुंसकलिंगी शब्द पुल्लिंगासारखा समजावा. उदा० मधोर्गृह्णाति तसेंच मधोस्तृप्ताः. येथें मधु शब्द पुल्लिंगासारखा समजल्यामुळें जसा नुम् आगम ( ७।१।७२ ) होत नाहीं तसा त्री या ठिकाणींही पुंवद्भाव केला म्हणजे नुम् आगम होणार नाहीं. आणि पूर्वसवर्ण दीर्घ करून रूप साधेल.

पूर्वसवर्णदीर्घ केल्यामुळें त्रीणि या अर्थी त्री हें उदाहरण साधतें. परंतु तानि या अर्थी ता हें साधत नाहीं.[२]

हेंही रूप साधतें.

तें कसें ?

त-इ असें असतां 'सुपां सुलुक्०' (७।१।३९) या सातव्या अध्यायातील सूत्रानें इकाराचे स्थानीं पूर्वसवर्ण अकार करून नंतर सहाव्या अध्यायांत सांगितलेला पूर्वसवर्णदीर्घ ( ६।१।१०२ ) होईल.

तरी पण त्री या उदाहरणामध्यें त्रि–इ असें असतां 'जसि च' ( ७।३।१०९ ) यानें गुण प्राप्त होत आहे.

" जसादिषु च्छन्दसि वावचनं प्राङ् णौ चङ्युपधायाः" ( ७।३।१०९ वा. १ ) असा पुढें गुणाचा विकल्प सांगावयाचाच आहे.[३]

(सू. ७१ वा. १) तुक् हा पूर्वाचा अन्तावयव केला आहे. पण त्यामुळें 'ह्रस्वो नपुंसके०' ( १।२।४७ ) या सूत्रानें सांगितलेला ऱ्हस्व, 'गोस्त्रियो०' ( १।२।४८ ) या सूत्रानें सांगितलेला ऱ्हस्व, आणि 'इगन्तकालकपाल०' ( ६।२।२९ ) या सूत्रानें सांगितलेला द्विगुस्वर हे साधत नाहींत. उदा० आराशस्त्रि[२] च्छत्रम्, धानाशष्कुलि च्छत्रम्, निष्कौशाम्बि च्छत्रम्, निर्वाराणसि च्छत्रम्, पञ्चारत्नि च्छत्रम्, दशारत्नि छत्रम् या ठिकाणीं तुक् आगम झाला असतां अच् शेवटीं नसल्यामुळें ऱ्हस्व आणि द्विगुस्वर हे

---

२. तानि याच्या ऐवजीं जें ता असें रूप होतें तेथें नुम् आगम झाला नाही तरी गुण (६।१।८७) होईल. कारण पूर्वसवर्णदीर्घाचा ( ६।१।१०२ ) नादिचि ( ६।१।१०४ ) हा निषेध आहे.

३. तेव्हां हा वैदिक प्रयोग साधण्याकरितां गुण न करण्याची परवानगी आहे.

१. ( सू. ७१ ) ऱ्हस्वाला तुक् असा आगम होतो पकार इत् असलेला कृत्प्रत्यय पुढें असतांना उ०

स्तुत्यः.

२. आरा आणि शस्त्री या शब्दांचा तसेंच धाना आणि शष्कुली या शब्दांचा समाहारद्वंद्व केला आहे. तो नपुंसकलिंगी ( २।४।१७ ) असल्यामुळें 'ऱ्हस्वो नपुंसके०' यानें शेवटच्या स्वराला ऱ्हस्व होतो. तसेंच निर् आणि कौशाम्बी किंवा वाराणसी या पंचम्यन्त शब्दाबरोबर पंचमी-तत्पुरुष केला आहे. तेथें 'गोस्त्रियोः०' या सूत्रानें ऱ्हस्व होतो. या चारी शब्दांपुढें छत्र शब्द

**न वा बहिरङ्गलक्षणत्वात् ॥ २ ॥**

न वैष दोषः । किं कारणम् । बहिरङ्गलक्षणत्वात् । बहिरङ्गलक्षणस्तुक् । अन्तरङ्गा एते विधयः । असिद्धं बहिरङ्गमन्तरङ्गे ॥ इह तर्हि ग्रामणिपुत्रः सेनानिपुत्र इति ह्रस्वत्वे कृते तुक्प्राप्नोति ।

**ग्रामणिपुत्रादिषु चाप्राप्तिः ॥ ३ ॥**

ग्रामणिपुत्रादिषु चाप्राप्तिः । किं कारणम् । बहिरङ्गलक्षणत्वादेव ॥ अथवा परादिः करिष्यते ।

**परादौ संयोगादेरित्यतिप्रसङ्गः ॥ ४ ॥**

परादौ संयोगादेरित्यतिप्रसङ्गो भवति । अपच्छायात् । वान्यस्य संयोगादेः [ ६. ४. ६८ ] इत्येवं प्रसज्येत ॥

**विलोपवचनं च ॥ ५ ॥**

वेश्च लोपो वक्तव्यः । अग्निचित् सोमसुत् । अपृक्तस्येति वेर्लोपो न प्राप्नोति ॥ नैष दोषः । अपृक्तग्रहणं न करिष्यते । यदि

---

विधी प्राप्त होत नाहींत.

( वा. ) हा दोष येत नाहीं.

काय कारण ?

कारण असें कीं छत्र या पुढील पदांतील छकाराची जरूर असल्यामुळें तुक् आगम बहिरंग आहे. आणि एकाच पदावर अवलंबून असल्यामुळें ऱ्हस्व व स्वर हे अंतरंग आहेत. तेव्हां अंतरंगाच्या दृष्टीनें बहिरंग असिद्ध असल्यामुळें तुगागमापेक्षां पूर्वींच ऱ्हस्व आणि स्वर होतील.

तर मग ग्रामणिपुत्रः सेनानिपुत्रः. येथें 'इको ह्रस्वो०' (६।३।६१) यानें ह्रस्व केला असतां तुक् आगम प्राप्त होतो[3] आहे.

( वा.३ ) ग्रामणिपुत्रः इत्यादि स्थलीं तुगागम प्राप्त होत नाहीं.

काय कारण ?

बहिरंग आहे हेंच कारण होय.[4]

अथवा, पराचा आद्यावयव अर्थात् तुट् असा आगम करण्यांत येईल.

( वा. ४ ) पराचा आद्यावयव तुट् केला असतां पुढें असलेले धातु वगैरे संयोगादि होत असल्यामुळें अतिप्रसंग येऊं लागेल. जसें- अपच्छायात्. येथें तुट् आगम छा धातूचा आद्यावयव झाल्यामुळें 'वाऽन्यस्य संयोगादेः' (६।४ ६८) यानें एत्व प्राप्त होऊं लागेल.

( वा. ५ ) तसेंच वि शब्दाच्या लोपाचें विधान करावयास पाहिजे. जसें-अग्निचित् सोमसुत्. येथें तुट् आगम पराचा म्ह० क्विप् प्रत्ययाच्या वकाराचा आद्यावयव झाल्यामुळें 'वेरपृक्तस्य' (६।१।६७) यानें वकाराचा लोप प्राप्त होणार नाहीं.[5]

---

लावला असतां 'दीर्घात्' (६।१।७५) यानें तुक् आगम केल्यानंतर छकाराच्या पूर्वींचा शब्द हा अजन्त नसल्यामुळें ऱ्हस्व होणार नाहीं. तसेंच पञ्चन् किंवा दशन् शब्दाचा अरत्नि शब्दाबरोबर तद्धितार्थी द्विगुसमास (२।१।५१) केला आहे. पुढें छत्र शब्द लावला असतां 'छे च' (६।१।७३) यानें तुक् आगम केल्यानंतर इगन्त उत्तरपद नसल्यामुळें 'इगन्त०' (६।२।२९) यानें पूर्वपदाला प्रकृतिस्वर होणार नाहीं.

३. ग्राम किंवा सेना हे शब्द उपपद असतांना नी धातूहून क्विप् प्रत्यय केला आहे. त्या ग्रामणी आणि सेनानी शब्दांचा पुत्र शब्दाबरोबर तत्पुरुष करून पूर्वपदाला ऱ्हस्व केल्यानंतर प्रकृत सूत्रानें तुक् आगम होऊं लागेल. कारण प्रत्ययलक्षणानें (१।१।६२) क्विप् हा पकारेत्संज्ञक कृत् प्रत्यय पुढें आहे.

४. येथें ऱ्हस्वच बहिरंग आहे. कारण त्याला उत्तरपदाची जरूर आहे. तेव्हां अंतरंग अशा तुक् आगमाच्या दृष्टीनें बहिरंग ऱ्हस्व असिद्ध असल्यामुळें तुक् आगम होत नाहीं.

५. कारण क्विप् प्रत्ययाच्या वकाराचा आद्यावयव तुक् आगम झाल्यामुळें त्व् एवढा दोन वर्णांचा प्रत्यय

न क्रियते दर्विः जागृविः अत्रापि प्राप्नोति । अनुनासिकपरस्य विशब्दस्य ग्रहणं शुद्धपरश्चात्र विशब्दः । एवमपि सतुकस्य लोपः प्राप्नोति । निर्दिश्यमानस्यादेशा भवन्तीत्येवं न भविष्यति ॥

इट्प्रतिषेधश्च ॥ ६ ॥

इट्प्रतिषेधश्च वक्तव्यः । परीतत् । सतुकस्य वलादिलक्षण इट् प्रसज्येत ॥ एवं तर्ह्यभक्तः करिष्यते ।

अभक्ते स्वरः ॥ ७ ॥

यद्यभक्तस्तर्हि स्वरे दोषो भवति । दधि च्छादयति । मधु च्छादयति । तिङ्ङतिङः [ ८. १. २८ ] इति निघातो न प्राप्नोति । ननु च तुगेवातिङ् । न तुकः परस्य निघातः प्राप्नोति । किं कारणम् । नञिवयुक्तमन्यसदृशाधिकरणे तथा ह्यर्थगतिः । नञ्युक्त इवयुक्ते वान्यस्मिंस्तत्सदृशे कार्यं विज्ञायते तथा ह्यर्थो गम्यते । तद्यथा ।

---

हा दोष येत नाहीं. कारण ' वेरपृक्तस्य ' येथें अपृक्तग्रहणच मुळीं केलें जाणार नाहीं.

पण जर अपृक्त ग्रहण केलें नाहीं तर दर्विः जागृविः येथें वि शब्दाचा लोप होऊं लागेल ना ?

वेः येथें वि शब्दापैकीं पुढील इकार अनुनासिक उच्चारला आहे. आणि दर्विः व जागृविः येथें तर इकार निरनुनासिक आहे. म्हणून तेथें लोप होणार नाहीं.

अशा रीतीनें क्विप् प्रत्ययाच्या वकाराला तुट् आगम झाला तरी लोपाची प्राप्ति येते ही गोष्ट खरी, पण तो लोप तकारविशिष्ट वकाराचा होईल ना ?

निर्दिश्यमानस्याऽऽदेशा भवन्ति या परिभाषेनें निर्दिश्यमानाला म्हणजे दाखविलेल्यालाच आदेश होतात असा निर्णय असल्यामुळें तकार सोडून केवळ वकाराचाच लोप होईल.

( वा. ६ ) तसेंच इडागमाच्या निषेधाकरितां वचन करावें लागेल. उदा०परीतत्[६]. येथें तुट् आगम हा क्विपाचा आद्यावयव केला असतां तेथें वलादि प्रत्ययाला सांगितलेला इट् आगम ( ७।२।३५ ) होऊं लागेल.

असें आहे तर मग हा तकार पूर्वाचा अथवा पराचा कोणाचाही अवयव न होतां मध्यें विकरणाप्रमाणें करण्यांत येईल.

( वा. ७ ) जर तकार कोणाचाही अवयव नसलेला असा करण्यांत आला तर स्वरामध्यें बदल होऊं लागेल. उदा०दधिच्छादयति मधुच्छादयति. येथें 'तिङ्ङतिङः ' (८।१ २८) यानें तिङन्ताला निघातस्वर प्राप्त होणार नाहीं[७].

अहो, पण अनवयव असा जो तकार मध्यें आहे तोच अतिङन्त समजून त्याहून पुढच्या छादयति या तिङन्ताला निघात स्वर होईल.

अनवयव अशा तकाराहून पुढच्याला निघात होणार नाहीं.

काय कारण ?

कारण असें कीं– 'नञिवयुक्तमन्यसदृशाधिकरणे तथा ह्यर्थगतिः' असा न्याय आहे. म्हणजे ज्या ठिकाणीं नञ् शब्दाचा किंवा इव शब्दाचा प्रयोग असेल तेथें जें कार्य सांगितलें असेल तें अशाच ठिकाणीं होतें कीं त्या नञाचा किंवा इवाचा ज्याच्याशीं संबंध असेल त्याहून निराळा आणि त्याच्या सारखा असा पदार्थ तेथें असला पाहिजे. कारण, लोकामध्यें तशा वाक्यापासून

---

बनतो. तेव्हां त्याला अपृक्त संज्ञा (१।२।४१) होत नाहीं.

६. परि उपसर्ग पूर्वी असलेल्या तन् धातूहून क्विप्, धातूच्या नकाराचा ' गमादीनामिति वक्तव्यम् ' (६।४। ४० वा.) या वार्तिकानें लोप, प्रकृत सूत्रानें तुक् आगम, आणि परि याला दीर्घ ( ६।३।१२२ ) अशीं कार्यें येथें झालीं आहेत.

७. कारण, दधि या अतिङन्ताहून छादयति हें तिङन्त पर नाहीं. मध्यें तकारानें व्यवधान येत आहे.

अब्राह्मणमानयेत्युक्ते ब्राह्मणसदृशमेवानयति नासौ लोष्टमानीय कृती भवति। एवमिहाप्यतिङिति तिङ्प्रतिषेधादन्यस्मादतिङस्तिङ्सदृशात्कार्यं विज्ञास्यते। किं चान्यदतिङ् तिङ्सदृशम्। पदम्॥

## संहितायाम्॥ ६। १। ७२॥

अयं योगः शक्योऽवक्तुम्। कथम्। अधिकरणं नाम त्रिप्रकारं व्यापकमौपश्लेषिकं वैषयिकमिति। शब्दस्य च शब्देन कोऽन्योऽभिसंबन्धो भवितुमर्हत्यन्यदत उपश्लेषात्। इको यणचि [६. १. ७७] अच्युपश्लिष्टस्येति। तत्रान्तरेण संहिताग्रहणं संहितायामेव भविष्यति॥

## [छे च॥ ६। १। ७३॥]

## आङ्माङोश्च॥ ६। १। ७४॥

अथ किमर्थमाङ्माङोः सानुबन्धकयो-

---

तसाच अर्थ मनांत येतो. जसें अब्राह्मणमानय असें म्हटलें असतां ब्राह्मणाहून निराळा पण त्यासारखा क्षत्रिय वगैरे मनुष्यच आणण्यांत येतो. ब्राह्मणाहून निराळा डिखूळ किंवा धोंडा कोणी आणिल्यास लोक त्याला शहाणा म्हणत नाहींत. तसें येथेंही अतिङः असें म्हटलें असल्यामुळें तिङन्त नव्हे पण तिङन्तासारखें असेंच जर कांहीं असेल तरच त्याच्या पुढील तिङन्ताला निघात होईल.

आतां तिङन्ताहून निराळें पण तिङन्तासारखें असें तरी काय बरें समजावें?

पद हें तसें समजावें.

(सू. ७२) हें सूत्र केलें नाहीं तरी चालेल. तें कसें.

व्यापक, औपश्लेषिक आणि वैषयिक असें तीन प्रकारचें अधिकरण असतें. जेव्हां एक शब्द हा दुसऱ्या शब्दाचें अधिकरण अशा रीतीनें दाखविला असेल तेथें शब्दाचा शब्दाशीं उपश्लेषावांचून दुसरा कोणता संबंध असणें शक्य आहे? उपश्लेष हाच संबंध संभवतो. तेव्हां 'इको यणचि' इत्यादि स्थलीं अचाच्या समीप उच्चारलेल्या इकाला यण् होतो असा अर्थ होतो. तेव्हां अर्थात् संहितायाम् हा शब्द नसला तरी संहिता असतांनाच इकाला यण् होणार हें निश्चित होतें.

(सू. ७४) येथें जें ङकार या इत्संज्ञकानें युक्त अशा आङ् आणि माङ् यांचें ग्रहण केलें

---

८. तेव्हां तकार हा पदसंज्ञक नसल्यामुळें त्याच्या पुढील तिङन्ताला निघात होणार नाही. हा दोष अनवयव पक्षावर कायम राहतो. तात्पर्य, पूर्वाचा अन्तावयव असा जो तुक् केला आहे तोच बरोबर आहे.

१. (सू. ७२) हें अधिकार सूत्र आहे. संहिता म्हणजे अत्यंत सामीप्य (१।४।१०९). एक वर्ण उच्चारल्यानंतर दुसरा वर्ण उच्चारतांना मध्यें नाइलाजास्तव जेवढा वेळ जातो तेवढ्याच वेळानें जे वर्ण उच्चारले जातील त्यामध्यें संहिता असते. ज्या ठिकाणीं त्यापेक्षां ज्यास्त वेळ मध्ये जातो तेथें संहिता नसते. तेव्हां भूभृति हें उच्चारल्यानंतर थोड्या वेळानें छत्रम् असें उच्चारलें तर तेथें पुढील सूत्रानें तुक् आगम होत नाहीं. 'अनुदात्तम्०' (१।१।१५८) या सूत्रापर्यंत हा अधिकार आहे.

२. तिलेषु तैलम् येथें तीळ हें तेलाचें व्यापक असें अधिकरण आहे. कारण तिळांना व्यापूनच तेल असतें. पथि गृहम् म्ह० रस्त्यावर घर आहे. येथें रस्ता हे घराचें औपश्लेषिक अधिकरण आहे. उपश्लेष म्हणजे जवळ असणें. घर हें रस्त्यांत नाहीं रस्त्याच्या जवळच आहे. पुत्रे प्रेम येथें पुत्र हें प्रेमाचें वैषयिक अधिकरण आहे. कारण पुत्राविषयींच प्रेम असतें.

१. (सू. ७३) छकार पुढें असतांना ऱ्हस्वाला तुक् असा आगम होतो, संहिता असतांना, उदा०—नृपच्छत्रम्.

१. (सू. ७४) आङ् आणि माङ् यांना तुक् आगम होतो छकार पुढें असतांना व संहिता असतांना.

निर्देशः ।

**आङ्माङोः सानुबन्धकनिर्देशो गतिकर्मप्रवचनीयप्रतिषेधसंप्रत्ययार्थः ॥ १ ॥**

आङ्माङोः सानुबन्धकयोर्निर्देशः क्रियत आङो गतिकर्मप्रवचनीयसंप्रत्ययार्थो माङः प्रतिषेधसंप्रत्ययार्थः । इह मा भूत् । आ छाया आ च्छाया । प्रमा छन्दः प्रमा च्छन्दः ॥

**[१]दीर्घात् ॥ ६ । १ । ७५ ॥**

**[१]पदान्ताद्वा ॥ ६ । १ । ७६ ॥**

**दीर्घात्पदान्ताद्वा विश्वजनादीनां छन्दसि ॥ १ ॥**

दीर्घात्पदान्ताद्वेत्यत्र विश्वजनादीनां छन्दस्युपसंख्यानं कर्तव्यम् । विश्वजनस्य छत्रम् विश्वजनस्य च्छत्रम् । न छायां कुरवोऽपराम् न च्छायां कुरवोऽपराम् ॥

**[१]इको यणचि ॥ ६ । १ । ७७ ॥**

इग्ग्रहणं किमर्थम् । इह मा भूत् । अग्निचिदत्र सोमसुदत्र । नैतदस्ति प्रयोजनम् । जश्त्वमत्र बाधकं भविष्यति ।

**जश्त्वं न सिद्धं यणमत्र पश्य**

असिद्धमत्र जश्त्वं तस्यासिद्धत्वाद्यणादेशः प्राप्नोति ॥

**यश्चापदान्तो हलचश्च पूर्वः ।**

---

आहे तें कशाकरितां ?

( वा. १ ) अनुबन्धविशिष्ट अशा आङाचा उल्लेख करण्यानें गतिसंज्ञक व कर्मप्रवचनीयसंज्ञक अशा आङाचें ग्रहण सुचविलें आहे. त्यामुळें आ छाया आ च्छाया येथें प्रकृत सूत्रानें नित्य तुक् आगम होत नाहीं. तसेंच अनुबंधविशिष्ट माङाच्या उल्लेखानें निषेधार्थक मा शब्दाचें ग्रहण सुचविलें आहे. त्यामुळें प्रमा छन्दः प्रमा च्छन्दः येथें प्रकृत सूत्रानें नित्य तुक् आगम होत नाहीं.

( सू. ७५, ७६ वा. १ ) या ठिकाणीं विश्वजन वगैरे शब्दांच्या पुढें छकार आला असतांना वेदामध्यें विकल्पानें तुक् आगम होतो, असें वचन करावें. जसें–विश्वजनस्य छत्रम् विश्वजनस्य च्छत्रम्; न छायां कुरवोपराम् नच्छायां कुरवोपराम्.

( सू. ७७ ) येथें इकः असें जें म्हटलें आहे तें कशाकरितां ?

अग्निचिदत्र तसेंच सोमसुदत्र येथें अच् पुढें असतांना तकाराला यण् न व्हावा म्हणून.

हें प्रयोजन होत नाहीं. कारण परत्वास्तव यणाचा बाध करून जश्त्व होईल.

( वा. १ ) येथें जश्त्व हें त्रैपादिक असल्यामुळें असिद्ध आहे. तेव्हां येथें यणाचीच प्राप्ति येते.

तसेंच पदाच्या शेवटीं नसलेल्या व ज्याच्या

---

उदा०–आच्छादयति. ‘पदान्ताद्वा’ ( ६।१।७६ ) या विकल्पाचा हा अपवाद आहे.

२. उपसर्ग जो आङ् त्याला गति संज्ञा आहे. मर्यादा व अभिविधि या अर्थीं आङ् याला कर्मप्रवचनीय संज्ञा ( १।४।८९ ) सांगितली आहे.

३. छाया म्हणजे छायेचें साधन जी छत्री ती असें एक दुसऱ्याला स्मरणानें सांगत आहे. त्या स्मरणाचेंच द्योतक ‘आ’ हें अव्यय आहे.

४. प्र उपसर्गपूर्वक मा धातूहून क्विप् प्रत्यय केला आहे.

१ ( सू. ७५ ) दीर्घाला तुक् आगम होतो छकार पुढें असतांना व संहिता असतांना. उदा०–चेच्छिद्यते.

१. (सू ७६) पदाच्या शेवटीं असलेल्या दीर्घाला तुक् आगम विकल्पानें होतो संहिता असतांना. उदा०–कया छायया कयाच्छायया.

१ ( सू. ७७ ) इकाचे स्थानीं यण् होतो अच् पुढें असतांना व संहिता असताना. हें पुढेंही चालू आहे. उदा०–सुधी आणि उपास्यः यांचा संधि सुध्युपास्यः असा होतो.

यश्चापदान्तो हलचश्च पूर्वस्तस्य प्राप्नोति। पचतीति ॥ एवं तर्हि

## दीर्घस्य यण्

दीर्घस्य यणादेशं वक्ष्यामि । तद्दीर्घग्रहणं कर्तव्यम् । न कर्तव्यम् । प्रकृतमनुवर्तते । क प्रकृतम् । दीर्घात्पदान्ताद्वा [ ७५; ७६ ] इति । तद्वै पञ्चमीनिर्दिष्टं षष्ठीनिर्दिष्टेन चेहार्थः । अचीत्येषा सप्तमी दीर्घादिति पञ्चम्याः षष्ठीं प्रकल्पयिष्यति तस्मिन्निति निर्दिष्टे पूर्वस्य [ १. १. ६६ ] इति ॥ भवेत्सिद्धं कुमार्यत्र ब्रह्मबन्ध्वर्थमिति । इदं तु न सिध्यति दध्यत्र मध्वत्रेति ।

## ह्रस्व इति प्रवृत्तं

ह्रस्वग्रहणमपि प्रकृतमनुवर्तते । क प्रकृतम् । ह्रस्वस्य पिति कृति [७१] इति ॥ यदि तदनुवर्तते दीर्घात्पदान्ताद्वा ह्रस्वस्येति ह्रस्वादपि पदान्ताद्विकल्पेन प्राप्नोति ।

## संबन्धवृत्त्या

संबन्धमनुवर्तिष्यते । ह्रस्वस्य पिति कृति तुक् [७१] । संहितायाम् [७२] ह्रस्वस्य पिति कृति तुक् । छे च [७३] ह्रस्वस्य पिति कृति तुक् । आङ्माङोश्च [७४] ह्रस्वस्य पिति कृति तुक् । दीर्घात्पदान्ताद्वा [ ७५; ७६ ] ह्रस्वस्य पिति कृति तुक् । तत इको यणचि । ह्रस्वस्येति वर्तते पिति कृति तुगिति निवृत्तम् ॥ इह तर्हि प्राप्नोति ।

---

पुढें अच् आहे अशा व्यंजनाला यण् प्राप्त होतो. उदा० पचति.

तर मग दीर्घाचे स्थानीं यण् होतो असें सांगतां येईल.

पण त्याकरितां सूत्रामध्यें दीर्घ-ग्रहण करावयास पाहिजे.

करावयास नको. कारण, मागून अनुवृत्तीनें येईल.

मागें कोठें बरें तें केलें आहे ?

' दीर्घात्पदान्ताद्वा ' येथें.

पण तें तेथें पंचम्यन्त आहे. आणि येथें तर दीर्घस्य असें षष्ठ्यन्त पाहिजे.

तस्मिन्निति निर्दिष्टे पूर्वस्य ( १।१।६७ ) या परिभाषेच्या साहाय्यानें अचि ही सप्तमी दीर्घात् या पंचमीची षष्ठी बनवील.

अशा रीतीनें कुमार्यत्र ब्रह्मबन्ध्वर्थम् इत्यादि दीर्घाचीं उदाहरणें सिद्ध होतील; पण दध्यत्र मध्वत्र हीं ह्रस्वाचीं उदाहरणें साधणार नाहींत.

ऱ्हस्वग्रहणही येथें अनुवृत्तीनें येत आहे.

तें ऱ्हस्वग्रहण मागें कोठेंसें आहे ?

' ह्रस्वस्य पिति कृति तुक् ' येथें.

पण जर तेथील ऱ्हस्वग्रहण येथें अनुवृत्त येत आहे तर मध्यें ' दीर्घात्पदान्ताद्वा ' येथेंही ऱ्हस्वग्रहणाचा संबंध होईल आणि पदान्तीं विद्यमान ह्रस्वाहून छकार पुढें असेल तेथेंही तुक् आगम विकल्पानें होऊं लागेल.

तर मग ऱ्हस्वस्य याचा जो पिति कृति तुक् याच्याशीं संबंध झाला आहे त्याच्यासुद्धां अनुवृत्ति करावी म्हणजे झालें. ती अशी– ह्रस्वस्य पिति कृति तुक् असें सूत्र आहे. त्याच्या पुढें संहितायाम् येथें ह्रस्वस्य पिति कृति तुक् याची अनुवृत्ति आहे. छे च येथें ह्रस्वस्य पिति कृति तुक् याची अनुवृत्ति आहे. आङ्माङोश्च येथें ह्रस्वस्य पिति कृति तुक् याची अनुवृत्ति आहे. दीर्घात्पदान्ताद्वा येथें ह्रस्वस्य पिति कृति तुक् याची अनुवृत्ति आहे. इको यणचि येथें मात्र केवळ ह्रस्व ग्रहणाचीच अनुवृत्ति येते; पिति कृति तुक् याची अनुवृत्ति येत नाहीं.[२]

तर मग चयनं चायकः लवनं लावकः येथेंही

---

२. तेव्हां अर्थानच येथें ऱ्हस्वस्य याचा यणाकडे संबंध होईल आणि ऱ्हस्वाचीं उदाहरणें साधतील.

चयनम् चायकः । लवनम् लावकः । अयादयोऽत्र बाधका भविष्यन्ति ॥ इह तर्हि प्राप्नोति । खट्वेन्द्रः मालेन्द्रः । खट्वैलका मालैलका ।

**गुणवृद्धिबाध्यः ॥**

गुणवृद्धी अत्र बाधिके भविष्यतः ॥ इदं तर्हि प्रयोजनमिकोऽचि यणेव यथा स्याद्यदन्यत्प्राप्नोति तन्मा भूदिति । किं चान्यत्प्राप्नोति । शाकलम् । सिन्नित्यसमासयोः शाकलप्रतिषेधं चोदयिष्यति स न वक्तव्यो भवति ॥

**यणादेशः प्लुतपूर्वस्य च ॥ १ ॥**

यणादेशः प्लुतपूर्वस्य चेति वक्तव्यम् । अग्ना३इ इन्द्रम् अग्ना३यिन्द्रम् । पटा३उ उदकम् पटा३वुदकम् । अग्ना३इ आशा अग्ना३याशा । पटा३उ आशा पटा३वाशा । किं पुनः कारणं न सिध्यति । असिद्धः प्लुतः प्लुतविकारौ चेमौ ॥ सिद्धः प्लुतः स्वरसंधिषु । कथं ज्ञायते । यदयं प्लुतप्रगृह्या अचि [ ६. १. १२५ ] इति प्लुतस्य प्रकृतिभावं

---

यण् प्राप्त होतो.

येथें अपवादत्वास्तव यणाचा बाध करून अय् वगैरे आदेश होतील.

तरी पण खट्वेन्द्रः मालेन्द्रः, खट्वैलका मालैलका वगैरे स्थलीं आकाराला यण् होऊं लागेल.

पण येथें यणाचा गुण ( ६।१।८७ ) व वृद्धि ( ६।१।८८ ) बाध करतील.

तर मग आतां इक्–ग्रहणाचें हें प्रयोजन समजावें कीं- अच् पुढें असतांना इकाला यणच व्हावा आणि तेथें दुसरें जें कांहीं प्राप्त होत असेल तें न व्हावें.

अच् पुढें असतांना इकाला दुसरें काय बरें प्राप्त होण्यासारखें आहे ?

‘इकोऽसवर्णे शाकल्यस्य०’ हा शाकल्य मतानें सांगितलेला प्रकृतिभाव प्राप्त होत आहे. तो प्रकृतिभाव कांहीं ठिकाणीं इष्ट नाहीं म्हणून ‘सिन्नित्यसमासयोः शाकलप्रतिषेधः’ ( ६।१।१२७ वा. १ ) असा जो प्रकृतिभावाचा प्रतिषेध करण्यांत येणार आहे तो आतां करावयास नको[४]

ज्याच्या पूर्वी प्लुत आहे अशा इकाला यण् होतो असें वचन करावें. उदा० अग्नौ[५] ३ इ इन्द्रम् अग्ना ३ यिन्द्रम्; पटा ३ उ उदकम् पटा ३ वुदकम्. अग्ना ३ इ आशा अग्ना ३ याशा, पटा ३ उ आशा पटा ३ वाशा.

पण येथे ‘इको यणचि’ यानें कां बरें यण् होत नाहीं.

प्लुत हा त्रैपादिक असल्यामुळें असिद्ध आहे; आणि त्याच सूत्रानें प्लुताच्या बरोबरच हे इकार व उकार सांगितले आहेत.

पण स्वरसंधि कर्तव्य असतांना प्लुत शास्त्राला सिद्धत्व आहे ना ?

हें कसे बरें समजावें ?

ज्या अर्थी आचार्य हे ‘प्लुतप्रगृह्या अचि

---

३. गुणाने व वृद्धीनें झालेला जो एच् तो दीर्घ असल्यामुळे त्याला यण् होऊं लागेल.

४. ऱ्हस्वाला व दीर्घाला यण् होतो अशा अर्थानें काम भागत असतांना पुनः जें इकः असें उच्चारलें आहे व त्याला यणाचें विधान केलें आहे त्याचा आणि ‘इकोऽसवर्णे०’ ( ६।१।१२७ ) या प्रकृतिभावाचा विषय सारखाच होत असल्यामुळें त्या दोघांची कांही तरी व्यवस्था उदाहरणांच्या धोरणानें ठरविली जाईल. ती अशी की–सकारेत्संज्ञक प्रत्यय आणि समास येथे यणच होतो व वाक्यामध्यें पाळीपाळीनें दोन्ही होतात.

५. अग्ने हें संबोधन आहे. त्यांतील एकारापैकीं पूर्वीच्या अर्ध्या भागाला प्लुत अ३ कार आणि पुढील अर्ध्या भागाला इकार होतो ( ८।२।१०७ ). तसेंच पटो या संबोधनांतील ओकारापैकी पूर्वीच्या अर्ध्या भागाला प्लुत अ३ कार होतो, आणि पुढील अर्ध्या भागाला उकार होतो.

शास्ति तज्ज्ञापयत्याचार्यः सिद्धः प्लुतः स्वरसंधिष्विति । कथं कृत्वा ज्ञापकम् । सतो हि कार्यिणः कार्येण भवितव्यम् ॥ इदं तर्हि प्रयोजनम् ।

दीर्घशाकलप्रतिषेधार्थम् ॥ २ ॥

दीर्घत्वं शाकलं च मा भूदिति ॥ एतदपि नास्ति प्रयोजनम् । आरभ्यते प्लुतपूर्वस्य यणादेशस्तयोर्य्वावचि संहितायाम् [ ८. २. १०८ ] इति तद्दीर्घशाकलप्रतिषेधार्थं भविष्यति ॥ तत्र वक्तव्यं भवति ॥ ननु च तस्मिन्नप्युच्यमान इदं न वक्तव्यं भवति ॥ अवश्यमिदं वक्तव्यं यौ प्लुतपूर्वाविदुतावप्लुतविकारौ तदर्थम् । भो३ इ इन्द्रम् भो३यिन्द्रम् । भो३ इ इह भो३ यिहेति ॥ यदि तर्ह्यस्य निबन्धनमस्तीदमेव वक्तव्यं तन्न वक्तव्यम् ॥ तदप्यवश्यं स्वरार्थं वक्तव्यम् । अनेन हि सत्युदात्तस्वरितयोर्यणः [८.२.४] इत्येष स्वरः प्रसज्येत । तेन पुनः सत्यसिद्ध-

---

नित्यम्' (६।१।१२५) या सूत्रानें प्लुताला प्रकृतिभाव सांगतात त्यावरूनच ते वरील गोष्ट सुचवितात.

हें ज्ञापक कसें बरें जमतें ?

तें जमतें. यास कारण प्लुत सिद्ध असेल तरच त्याला प्रकृतिभाव सांगणें योग्य होतें.

तर मग प्लुत पूर्वी असलेल्या इकाला यण् सांगण्याचें प्रयोजन पुढें दिल्याप्रमाणें समजावें–

सवर्णदीर्घ आणि शाकल प्रकृतिभाव हे न व्हावे हें तें प्रयोजन.

हेंही प्रयोजन संभवत नाहीं. कारण प्लुत पूर्वी असलेल्या इकाला 'तयोर्य्वावचि०' (८।२।१०८) यानें मुद्दाम यणादेशाचें विधान केलेंच आहे. तेंच दीर्घ व प्रकृतिभाव यांना दूर सारील.

पण हें वार्तिक केलें म्हणजे तें सूत्र करावयास नको.

मग तसेंच 'तयोर्य्वावचि०' हें सूत्र केलें असतां प्रकृत वार्तिक करावयास नको असेंही म्हणतां येतें.

तसें नाहीं. प्रकृत वार्तिक हें अवश्य केलेंच पाहिजे. जे इकार व उकार प्लुताच्या बरोबर सांगितलेले नव्हेत पण त्यांच्या पूर्वी प्लुत मात्र होतो त्यांना यण् होण्याकरितां या वार्तिकाची जरूर आहे. उदा० भो[8] ३ इ इन्द्र, भो ३ यिन्द्र. भो ३ इ इह. भो ३ यिह.

तर मग असें जर हे वार्तिक करण्याचें कारण बरोबर दिसतें तर हें वार्तिकच असूं दे. तें सूत्र करावयास नको.

'तयोर्य्वावचि०' हें सूत्रही असणें जरूर आहे. कारण, अग्ना ३ याशा, पटा ३ वाशा इत्यादि उदाहरणांमध्यें प्रकृत वार्तिकानें यण् आदेश केल्यास तो सिद्ध असल्यामुळें त्याहून पुढच्या अनुदात्ताला 'उदात्तस्वरितयोर्यणः०' (८।२।४) यानें स्वरित होऊं लागेल. आणि 'तयोर्य्वावचि०' (८।२।१०८) यानें यणादेश केल्यास तो असिद्ध असल्यामुळें स्वरित होऊं शकत नाहीं.

---

६. तेव्हां अर्थातच ह्या आचार्यांच्या कृतीवरून स्वरसंधि प्रकरणांतील शास्त्रांच्या दृष्टीनें प्लुत प्रकरण सिद्ध आहे ही गोष्ट सूचित होते.

७. अग्ना ३ इ इन्द्रम् येथें यणाचा बाधक जो सवर्णदीर्घ तो होईल. तसेंच अग्ना ३ इ आशा येथें प्रकृतिभाव (६।१।१२७) होईल. म्हणून तेथें यण् होण्याकरितांच वार्तिक पाहिजे.

८. भो हें भवत् शब्दाचें संबोधन आहे. त्याला प्लुत झाला आहे. पुढें इ हें स्वतंत्र अव्यय आहे. हा इकार 'एचोऽप्रगृह्यस्य० (८।२।१०७) यानें झालेला नसल्यामुळें त्याच्या पुढील सूत्रानें त्यालाच सांगितलेला यण् येथें होणार नाहीं म्हणून हें वार्तिक पाहिजे.

त्वान्न भविष्यति ॥ यदि तर्हि तस्य निबन्धनमस्ति तदेव वक्तव्यमिदं न वक्तव्यम् । ननु चोक्तमिदमप्यवश्यं वक्तव्यं यौ प्लुतपूर्वाविद्रुतावप्लुतविकारौ तदर्थं भो३ यिन्द्रम् भो३ यिहेति । छान्दसमेतद् दृष्टानुविधिश्छन्दसि भवति। यत्तर्हि न च्छान्दसम् । भो३ यिन्द्रम् भो३ यिहेति साम गायति । एषोऽपि च्छन्दसि दृष्टस्यानुप्रयोगः क्रियते ॥

जंश्त्वं[10] न सिद्धं यणमत्र पश्य यश्चापदान्तो हलचश्च पूर्वः । दीर्घस्य यण्ह्रस्व इति प्रवृत्तं संबन्धवृत्त्या गुणवृद्धिबाध्यः ॥ १ ॥
नित्ये[11] च यः शाकलभाक्समासे तदर्थमेतद्भगवांश्चकार ।
सामर्थ्ययोगान्न हि किंचिदस्मिन् पश्यामि शास्त्रे यदनर्थकं स्यात् ॥२॥

[ एचो[1]ऽयवायावः ॥६।१।७८॥ ]

वान्तो यि प्रत्यये ॥६।१।७९॥

वान्तादेशे स्थानिनिर्देशः ॥ १ ॥

वान्तादेशे स्थानिनिर्देशः कर्तव्यः । ओकारौकारयोरिति वक्तव्यम् । एकारैकार-

---

तर मग आतां ' तयोर्य्वावचि० ' या सूत्राचें असें प्रयोजन असल्यामुळें तें सूत्र आवश्यक असेल तर तें सूत्रच स्वीकारावें आणि हें प्रकृत वार्तिक करूं नये.

पण आतांच सांगितलें आहे ना कीं प्रकृत वार्तिकही अवश्य स्वीकारलें पाहिजे. ज्याठिकाणीं इकार व उकार प्लुताच्या बरोबर सांगितलेले नसून प्लुत मात्र त्यांच्यामागें आहे— भो ३ यिन्द्र, भो ३ यिह वगैरे— अशा उदाहरणांकरितां वार्तिक पाहिजे.

असें सांगितलें खरें, पण हे प्रयोग छान्दस आहेत. आणि वेदामध्यें तर या प्रयोगांमध्यें जेवढें कार्य दृष्ट आहे तेवढें कसें तरी करावयाचेच अशी मर्यादा आहे.

तर ( जो छान्दस प्रयोग नव्हे तेथें ) भो ३ यिन्द्र, भो ३ यिहेति साम गायति अशा प्रकारचा यण् आदेश होण्याकरितां प्रकृत वार्तिकाची जरूर आहे असें म्हणणें असेल तर त्यास येवढेंच उत्तर कीं वेदांतील प्रयोगाचें अनुकरण करूनच भाषेमध्यें हा प्रयोग केला आहे.

(सू. ७९) अव् आव् हे जे वकारान्त आदेश येथें सांगितले आहेत त्यांच्या स्थानींचा निर्देश करण्यांत यावा. म्हणजे 'ओकारौकारयोः' ( ओ व औ यांचे स्थानी ते अनुक्रमें होतात ) असें म्हणावें. कारण एकार व ऐकार यांना हे आदेश होऊं नयेत.

---

९. वेदामध्यें सर्वच विधी वैकल्पिक समजावे या परिभाषेनें भो ३ यिन्द्र येथें प्रकृतिभाव व सवर्णदीर्घ हे दोन्ही होणार नाहींत. तेव्हां तेथें इको यणचि या सामान्य सूत्रानेंच काम भागेल.

१०. या श्लोकांतील वाक्यांचा अर्थ मागें सांगितलाच आहे.

११. ज्या इकाला नित्यसमासामध्ये प्रकृतिभाव होण्यासारखा आहे त्याला यण् होण्याकरितां भगवान् सूत्रकारांनीं ह्या प्रकृत सूत्रामध्यें इकः असें उच्चारून यणाचें पुनः विधान केलें आहे ( टीप ४ पहा ). आचार्य सूत्रकारांचें असें कांहीं विलक्षण सामर्थ्य आहे कीं ह्या शास्त्रामध्यें एकादा वर्ण सुद्धां अनर्थक दिसत नाहीं.

१. ( सू. ७८ ) ए ओ ऐ व औ यांना क्रमानें अय् अव् आय् आणि आव् असे आदेश होतात अच् पुढें असतांना तसेंच संहिता असतांना. उदा०-हरये, विष्णवे; नायकः, पावकः.

१. ( सू. ७९ ) ओ आणि औ यांना क्रमानें अव् आणि आव् असे आदेश यकारादि प्रत्यय पुढें असतांना होतात उदा०-गव्यम्, नाव्यम्.

योमो भूदिति ॥ स तर्हि कर्तव्यः । न कर्तव्यः । वान्तग्रहणं न करिष्यते । एचो यि प्रत्ययेऽयादयो भवन्तीत्येव सिद्धम् । यदि वान्तग्रहणं न क्रियते चेयम् जेयमित्यत्रापि प्राप्नोति । क्षय्यजय्यौ शक्यार्थे [ ६. १. ८१ ] इत्येतन्नियमार्थं भविष्यति । क्षिज्योरेवैच इति । तयोस्तर्हि शक्यार्थादन्यत्रापि प्राप्नोति । क्षेयं पापम् जेयो वृषल इति । उभयतो नियमो विज्ञास्यते । क्षिज्योरेवैचः । तयोश्च शक्यार्थ एवेति । इहापि तर्हि नियमान्न प्राप्नोति । लव्यम् पव्यम् । अवश्यलाव्यम् अवश्यपाव्यम् । तुल्यजातीयस्य नियमः । कश्च तुल्यजातीयः । यथाजातीयकः क्षिज्योरेच् । कथंजातीयकः क्षिज्योरेच् । एकारः । एवमपि रायमिच्छति रैयति अत्रापि प्राप्नोति । रायिश्छान्दसो दृष्टानुविधिश्छन्दसि भवति ॥

## गोर्यूतौ छन्दसि ॥ २ ॥

गोर्यूतौ छन्दस्युपसंख्यानं कर्तव्यम् । आ

---

तर मग तसा स्थानिनिर्देश केला पाहिजे.

स्थानिनिर्देश करावयास नको. येथें वान्तः हा शब्द काढून टाकून 'यि प्रत्यये' एवढेंच सूत्र करावें. एचः याची अनुवृत्ति आहेच. तेव्हां यकारादि प्रत्यय पुढें असतांना एचाला अय् वगैरे आदेश होतात असा अर्थ झाल्यामुळें ओकार व औकार यांनाच हे वकारान्त आदेश होतील.

पण जर 'वान्त' शब्द काढून टाकला तर चेयम् जेयम् येथें एकारालाही अय् आदेश होऊं लागेल.

क्षय्यजय्यौ शक्यार्थे (६।१।८१) हें पुढील सूत्र नियमार्थ होईल. तो नियम असा— यकारादि प्रत्यय पुढें असतांना क्षि आणि जि या धातूंच्याच एचाला अय् वगैरे आदेश होतात.

तर मग क्षि आणि जि यांच्या एचाला शक्यार्थ नसेल तेथेंही अय् आदेश होऊं लागेल. उदा. क्षेयं पापम्[२], जेयो वृषलः.

'क्षय्यजय्यौ०' हा नियम दोन प्रकारचा समजण्यांत येईल. तो असा— यादि प्रत्यय पुढें असतांना क्षि व जि यांच्याच एचाला अय् वगैरे आदेश होतात; आणि ते सुद्धां त्यांना शक्यार्थ असतांनाच होतात.

पण ह्या पहिल्या नियमामुळें लव्यम्, पव्यम्; अवश्यलाव्यम्, अवश्यपाव्यम्; येथेंही लू व पू या धातूंच्या एचाला अय् वगैरे आदेश प्राप्त होणार नाहींत.

कोणताही नियम सजातीयालाच लागू होतो.

आतां येथें सजातीय कोणता बरें समजावा ?

ज्या प्रकारचा क्षि व जि या धातूंचा एच् आहे त्या प्रकारचा जो असेल तो सजातीय समजावा.

कोणत्या प्रकारचा क्षि व जि यांचा एच् आहे ?

त्यांचा एच् एकार आहे[३].

तरीही रायमिच्छति रैयति येथें आय् आदेश प्राप्त होत आहे.

'रायिश्छान्दसः' म्ह. क्यजन्त रै शब्दाचा वेदामध्येंच प्रयोग होतो, व वेदामध्यें तर प्रयोगांत दृष्ट असलेलेंच कार्य करावयाचें असतें.

(वा. २) वेदामध्यें यूति शब्द पुढें असताना गो शब्दांतील ओकाराला अव् आदेश होतो असें वचन करावें. जसें-" आ नो मित्रा-

---

२. पाप हें क्षय करण्यास योग्य आहे पण ज्याच्या दृष्टीनें त्याचा क्षय करणें शक्य नाहीं तो क्षेयं पापम् असाच प्रयोग करतो. तेथें पूर्वीच्या नियमानें अय् आदेशाची व्यावृत्ति होणार नाहीं.

३. तेव्हां चेयम् व जेयम् येथें एकारांची व्यावृत्ति होईल पण लव्यम् व लाव्यम् येथें ओकार व औकार यांची व्यावृत्ति होत नाहीं. म्हणून अव् आणि आव् हे आदेश तेथें होतील.

नो मित्रावरुणा घृतैर्गव्यूतिमुक्षतम् । गोयूतिमित्येवान्यत्र ॥

**अध्वपरिमाणे च ॥ ३ ॥**

अध्वपरिमाणे च गोयूतावुपसंख्यानं कर्तव्यम् । गव्यूतिमध्वानं गतः । गोयूतिमित्येवान्यत्र ॥

**धातोस्तन्निमित्तस्यैव ॥६।१।८०॥**

एवकारः किमर्थः । नियमार्थः । नैतदस्ति प्रयोजनम् । सिद्धे विधिरारभ्यमाणोऽन्तरेणैवकारं नियमार्थो भविष्यति ॥ इष्टतोऽवधारणार्थस्तर्हि । यथैवं विज्ञायेत धातोस्तन्निमित्तस्यैवेति । मैवं विज्ञायि धातोरेव तन्निमित्तस्येति । किं च स्यात् । अधातोस्तन्निमित्तस्य न स्यात् । शङ्कव्यं दारु । पिचव्यः कार्पास इति ॥

**[ क्षय्यजय्यौ शक्यार्थे ॥ ६ । १ । ८१ ॥ ]**

**क्रय्यस्तदर्थे ॥ ६ । १ । ८२ ॥**

तदित्यनेन किं प्रतिनिर्दिश्यते । स एव क्रीणात्यर्थः । इह मा भूत् । क्रेयं नो धान्यं

---

वरुणा घृतैर्गव्यूतिमुक्षितम्" ( भाषेमध्यें 'गोयूतिम्' असा अव् आदेशरहितच प्रयोग करावा.

( वा. ३ ) मार्गाचें परिमाण हा अर्थ असेल तर यूति शब्द पुढें असतांना गो शब्दांतील ओकाराला अव् आदेश होतो असें वचन करावें. जसें—गव्यूतिमध्वानं गतः. दोन कोस मार्ग चालून गेला. मार्गाचें परिमाण नसेल तर गोयूति असेंच होतें.

( सू. ८० ) येथें एव शब्द कशाकरितां घातला आहे.

नियमार्थ घातला आहे.

हें प्रयोजन म्हणतां येत नाहीं. कारण सिद्ध असतां आरंभिलेला विधि एवकार घातल्यावांचूनच नियमार्थ होईल.

नियम होईल हें खरें; पण भलता नियम न होतां इष्ट नियम झाला पाहिजे म्हणून एव शब्द घातला आहे. उदा०— धातूच्या एचाला जर नकारान्त आदेश कर्तव्य झाला तर तो यकारादि प्रत्ययामुळें उत्पन्न झालेल्याच एचाला करावा असाच नियम झाला पाहिजे. आणि यकारादि प्रत्ययानें उत्पन्न झालेल्या एचाला जर नकारान्त आदेश कर्तव्य झाला तर धातूच्याच एचाला तो करावा असा नियम न झाला पाहिजे.

तसा नियम झाला तर काय होईल ?

धातूचा एच् नसेल तर तो यकारादि प्रत्ययानें उत्पन्न केला असला तरी त्याला होणार नाहीं. जसें—शङ्कवे हितं शङ्कव्यम्. दारु; पिचव्यः कार्पासः.

( सू. ८२ ) तदर्थ यांतील तद् शब्दानें कोणाचा निर्देश केला आहे ?

क्री धातूचा अर्थ जो विकणें त्याचा निर्देश केला आहे. तेव्हां आमचें धान्य विकण्यास योग्य आहे पण विकावयाचें मात्र नाहीं असा

---

१. ( सू. ८० ) यकारादि प्रत्यय पुढें असतांना धातूच्या एचाला जर अव् आणि आव् हे आदेश होतील तर तो एच् त्या यकारादि प्रत्ययांच्या निमित्तानें झाला असेल तरच होतात.

२. शङ्कु व पिचु या शब्दाहून त्याला हितकारक या अर्थी यत् प्रत्यय ( ५।१।२ ), उकाराला गुण ( ६।४।१४६ ) आणि पूर्व सूत्रानें अव् आदेश झाला आहे.

१. ( सू. ८१ ) क्षय करण्याला शक्य या अर्थी क्षय्य शब्द आणि जिंकण्याला शक्य या अर्थी जय्य शब्द येथें निपातन केले आहेत. पाप हें क्षय करण्याला योग्य आहे पण शक्य नाही. तेथे क्षेयं पापम् असाच प्रयोग होतो. तसेंच मन हें जिंकण्याला योग्य आहे पण शक्य नाही तेथेंही जेयं मनः असाच प्रयोग होतो.

१. ( सू. ८२ ) विकण्याकरितां बाजारांत मांडलेला पदार्थ दाखवावयाचा असतां क्रय्य असा शब्द निपातन केला जातो.

न चास्ति क्रय्यमिति ॥

**भय्यप्रवय्ये च च्छन्दसि ॥ ६ । १ । ८३ ॥**

**भय्यादिप्रकरणे हृद्य्या उपसंख्यानम् ॥ १ ॥**

भय्यादिप्रकरणे हृद्य्या उपसंख्यानं कर्तव्यम् । हृद्य्या आपः ॥

**अव्शरस्य च ॥ २ ॥**

शरस्य च हृदस्य चातोऽव् वक्तव्यः । हृद्व्या आपः । शरव्या वै तेजनम् । शरव्यस्य पशूनभिघातुकः स्यात् ॥

**शरुवृत्ताद्वा सिद्धम् ॥ ३ ॥**

शरुवृत्ताद्वा पुनः सिद्धमेतत् ॥

**ऋज्ञती शरुरित्यपि दृश्यते ॥ ४ ॥**

ऋज्ञती शरुरित्यपि शरुशब्दप्रवृत्तिर्दृश्यते ॥

**शरुहस्त इति च लोके ॥ ५ ॥**

शरुहस्त इति च लोके शरहस्तमुपाचरन्ति ॥

इति श्रीभगवत्पतञ्जलिविरचिते व्याकरणमहाभाष्ये षष्ठस्याध्यायस्य प्रथमे पादे तृतीयमाह्निकम् ॥

---

अर्थाच्या ' क्रेयं नो धान्यं न चास्ति क्रय्यम् ' या दोन वाक्यांतील पहिल्या वाक्यामध्यें अय् आदेश होत नाहीं.

( सू. ८३ वा. १ ) भय्य वगैरे शब्दांच्या प्रकरणामध्यें हृदय्या शब्दाचें उपसंख्यान करावें. उदा०-हृदे भवा हृदय्या[2] आपः.

( वा. २ ) 'शर शब्द व हृद शब्द यांतील शेवटच्या अकाराला अव् आदेश होतो यत् प्रत्यय पुढें असतांना' असें वचन करावें, उदा-० ' हृदव्या आपः ' ' शरव्या वै तेजनम्, ' शरव्यस्य पशूनभिघातुकः स्यात् '.

( वा. ३ ) शरु शब्दापासून हें रूप सिद्ध केलें असतां वचनावांचूनच शरव्य हें रूप सिद्ध होत आहे. शरु शब्दाचा प्रयोग वेदामध्यें आणि लोकांमध्येंही दृष्टीस पडतो. उदाहरणार्थ—

( वा. ४ ) ' ऋज्ञती शरुः ' या वाक्यामध्यें शरु शब्दाचा प्रयोग दिसतो.

( वा. ५ ) ' शरुहस्तः ' असा शरु शब्दाचा शरहस्त या अर्थी उपयोग लोकांमध्येंही दिसतो.

याप्रमाणें भगवान् पतंजलींनीं रचिलेल्या व्याकरण महाभाष्याच्या सहाव्या अध्यायाच्या पहिल्या पादांतील तिसरें आह्निक समाप्त झालें.

---

१. ( सू. ८३ ) भय्य शब्द आणि प्रवय्या असा स्त्रीलिंगी शब्द हे वेदामध्ये निपातन केले जातात. बिभेत्यस्मादिति भय्यः; प्रवातुं योग्या प्रवय्या.

२. हृद शब्दाहून 'तत्र भवः' या अर्थी यत् प्रत्यय (४।४।११०) व अकारालाच अय् आदेश झाला आहे.

३. शरुणा वृत्तं शरुवृत्तम् म्ह० शरुशब्दाने वृत्त म्ह० निष्पत्ति. शरवे हितं शरव्यम्.

४. शर या अर्थी शरु असा शब्द नाहींच असा भ्रम दूर करण्याकरितां हें व तसेंच पुढचेंही वार्तिक आहे.

**एकः पूर्वपरयोः ॥ ६ । १ । ८४ ॥**

एकवचनं किमर्थम् ।

**एकवचनं पृथगादेशप्रतिषेधार्थम् ॥ १ ॥**

एकवचनं क्रियत एक आदेशो यथा स्यात्पृथगादेशो मा भूदिति ॥

**न वा द्रव्यवत्कर्मचोदनायां द्वयोरेकस्याभिनिर्वृत्तेः ॥ २ ॥**

न वैतत्प्रयोजनमस्ति । किं कारणम् । द्रव्यवत्कर्मचोदनायां द्वयोरेकस्याभिनिर्वृत्तेरेक आदेशो भविष्यति । तद्यथा । द्रव्येषु कर्मचोदनायां द्वयोरेकस्याभिनिर्वृत्तिर्भवति । अनयोः पूलयोः कटं कुरु । अनयोर्मृत्पिण्डयोर्घटं कुर्विति । न चोच्यत एकमित्येकं चासौ करोति ॥ किं पुनः कारणं द्रव्येषु कर्मचोदनायां द्वयोरेकस्याभिनिर्वृत्तिर्भवति ।

**तच्चैकवाक्यभावात् ॥ ३ ॥**

एकवाक्यभावाद् द्रव्येषु कर्मचोदनायां द्वयोरेकस्याभिनिर्वृत्तिर्भवति । आतश्चैकवाक्यभावाद्व्याकरणेऽपि ह्यन्यत्र द्वयोः स्थानिनोरेक आदेशो भवति । ज्वरत्वरस्रिव्यविमवामुपधायाश्च [ ६. ४. २० ] भ्रस्जो रोपधयो रमन्यतरस्याम् [ ६. ४. ४७ ] इति ॥ यत्तावदुच्यत एकवाक्यभावादिति तन्न । अर्थात्प्रकरणाद्वा लोके द्वयोरेकस्या-

( सू. ८४ ) येथें एकः असें जें पद घातलें आहे तें कशाकरितां ?

( वा. १ ) पूर्व आणि पर या दोघांना मिळून एकच आदेश व्हावा, प्रत्येकाला वेगवेगळा होऊं नये म्हणून एकः असें म्हटलें आहे.

( वा. २ ) हें एकग्रहणाचें प्रयोजन देतां येत नाहीं. कारण, लोकामध्यें जसें दोन पदार्थांचें मिळून कांहीं द्रव्य करावयास सांगितलें असतां तेथें जसें तें एकच केलें जातें तसा येथें एकच आदेश होईल.

जसें हे दोन पूल[2] म्हणजे कळकांचे भारे आहेत, याचा तट्या तयार कर, हे दोन मातीचे गोळे आहेत यांचा घट बनव असें म्हटलें असतां तेथें ' एक कर ' असा एक शब्द उच्चारला नसताही एकच तयार केला जातो.

पण दोन पदार्थांचें कांहीं द्रव्य करावयास सांगितलें असतां तेथें एकच द्रव्य केलें जातें याचें कारण काय बरें ?

( वा. ३ ) वाक्यार्थ एकच असल्यामुळें दोघांपासूनही एकच द्रव्य बनविलें जातें. वाक्यार्थ एक असणें हेंच कार्य एकच होण्याचें कारण असावें यासंबंधानें आणखी असें पहा कीं या व्याकरणशास्त्रांतही इतर ठिकाणीं एका वाक्यानें दोघांचे स्थानीं एक आदेश केल्याचें दृष्टीस पडतें. उदा०—ज्वरत्वरस्रिव्यविमवामुपधायाश्च ( ६।४।२० ) किंवा भ्रस्जो रोपधयो रमन्यतरस्याम् ( ६।४।४७ ) येथें दोन्ही स्थानींचे ठिकाणीं मिळून एकच आदेश केल्याचें दृष्टीस पडतें.

आतां एक वाक्यार्थ असला म्हणजे तेथें दोघांचे स्थानीं एकच आदेश होतो असें जें लौकिक दृष्टान्तावरून ठरविलें तें बरोबर नाहीं. कारण, अर्थावरून किंवा प्रकरणावरून लोकां-

१. ( सू. ८४ ) हें अधिकारसूत्र आहे. ऋत उत् ( ६।१।१११ ) ह्या सूत्रापर्यंत प्रत्येक सूत्रामध्यें एकः व पूर्वपरयोः या पदांचा संबंध होतो.

२. कळकांच्या कामट्यांचा भारा.

३. ज्वर् धातूहून क्विप् प्रत्यय केला असतां तेथें उपधा-अकार आणि वकार या दोन वर्णांचे स्थानीं एकच ऊठ् आदेश होतो. उदा० जूः जुरौ. तसेंच बभर्ज येथें भ्रस्ज् धातूची उपधा-सकार आणि रेफ असे दोन स्थानी असतांही एकच रम् हा आगम होतो.

भिनिर्वृत्तिर्भवति । अर्थो वास्यैकेन भवति प्रकृतं वा तत्र भवतीदमेकमेव कर्तव्यमिति । आतश्चार्थात्प्रकरणाद्वा । व्याकरणेऽपि ह्यन्यत्र द्वयोः स्थानिनोर्द्वावादेशौ भवतः । रदाभ्यां निष्ठातो नः पूर्वस्य च दः [ ८. २. ४२ ] उभौ साभ्यासस्य [ ८. ४. २१ ] इति । कथं यत्तदुक्तं व्याकरणेऽपि ह्यन्यत्र द्वयोः स्थानिनोरेक आदेशो भवति ज्वरत्वरस्त्रिव्यविमवामुपधायाश्च भ्रस्जो रोपधयो रमन्यतरस्यामिति । इह तावज्ज्वरत्वरस्त्रिव्यविमवामुपधायाश्चेति स्तां द्वावूठौ नास्ति दोषः सवर्णदीर्घत्वेन सिद्धम् । इह भ्रस्जो रोपधयो रमन्यतरस्यामिति वक्ष्यति ह्येतद् भ्रस्जो रोपधयोर्लोप आगमो रम्विधीयत इति ॥ यदुच्यते ऽर्थात्प्रकरणाद्वेति तन्न । किं कारणम् । एकवाक्यभावादेव लोके द्वयोरेकस्याभिनिर्वृत्तिर्भवति । आतश्चैकवाक्यभावात् । अङ्ग हि भवान्ग्राम्यं पांसुरपादमप्रकरणज्ञमागतं ब्रवीत्वनयोः पूलयोः कटं कुर्वनयोर्मृत्पिण्डयोर्घटं कुर्वित्येकमेवासौ करिष्यति । कथं यदुक्तं व्याकरणेऽपि ह्यन्यत्र द्वयोः स्थानिनोर्द्वावादेशौ भवतः रदाभ्यां निष्ठातो नः पूर्वस्य च दः उभौ साभ्यासस्येति । इह तावद्रदाभ्यां निष्ठातो नः पूर्वस्य

---

मध्यें दोन पदार्थांचें एकच कार्य केलें जातें. थोडक्यांत म्हणावयाचें म्हणजे— तेथें एकानेंच काम भागतें, किंवा तेथें एकच कार्य बनवावयाचें आहे अशा अर्थाचा मागून कांहीं संदर्भ चालू असतो. शिवाय अपेक्षेवरून किंवा संदर्भावरून एक कार्य केलें जातें हें म्हणणेंच रास्त दिसतें. असें पहा कीं या व्याकरणशास्त्रामध्येंही कांहीं इतर ठिकाणीं दोन स्थानींचे ठिकाणीं दोन आदेश होतात. उदा०— 'रदाभ्यां निष्ठातो नः पूर्वस्य च दः' (८।२।४२) 'उभौ साभ्यासस्य' (८।४।२१) या ठिकाणीं.

तर मग व्याकरणशास्त्रामध्येंच इतर ठिकाणीं म्हणजे 'ज्वरत्वर०' आणि 'भ्रस्जो रोपधयोः०' येथे दोन स्थानींचे ठिकाणीं एक आदेश होतो असें जें म्हटलें आहे तें कसें ?

'ज्वरत्वर०' येथें स्थानी दोन असल्यामुळें त्यांचे स्थानीं आदेश दोन ऊठ् होतात असें म्हटलें तरी सवर्ण दीर्घ केल्यामुळें रूप साधतें म्हणून दोष येत नाहीं. 'भ्रस्जो रोपधयोः' येथेंही 'भ्रस्जो रोपधयोर्लोप आगमो रम् विधीयते' असें भारद्वाजीय वचन आहे. त्यामुळें तेथेंही दोघांचा लोप व एक रम् आगम होतो.

आतां लोकांमध्यें अपेक्षा व पूर्वसंदर्भ पाहूनच एक कार्य केलें जातें असें जें म्हटलें आहे तें बरोबर नाहीं. कारण एक वाक्यार्थ असल्यामुळेंच लोकामध्यें दोहोंपासून एक कार्य केलें जातें. शिवाय, एक कार्य करण्याचें कारण 'एक वाक्यार्थ असणें, हेंच रास्त दिसतें. आपणच पहा कीं जर एकादा गांवढळ माणूस धुळीनें भरलेल्या पायाचा म्हणजे नुकताच गांवाहून आलेला अर्थात् ज्याला कांहीं पूर्व संदर्भ माहीत नाहीं असा असला व आल्याबरोबर जर त्याला ह्या पूलांचा तट्या कर, ह्या मातींच्या गोळयाचा घट कर असें मोघम सांगितलें तर तो काय करतो तें; खात्रीनें तो एकच पदार्थ करील. तर मग व्याकरणामध्येंच कांहीं इतर ठिकाणीं उदा०– 'रदाभ्यां निष्ठातो नः०' 'उभौ साभ्यासस्य' येथें दोन स्थानींचे ठिकाणीं दोन आदेश होतात असें म्हटल्यास कसें बरें चालेल?

'रदाभ्यां निष्ठातो०' येथें निरनिराळे दोन

---

४. भिन्नः येथें धातूचा दकार आणि क्त प्रत्ययाचा तकार या दोन स्थानींचे ठिकाणीं दोन नकार निरनिराळे केले जातात. तसेंच प्राणिणिषति येथें दोन नकारांना निरनिराळें णत्व केलें जातें.

च द इति द्वे वाक्ये । कथम् । योगविभागः करिष्यते । रदाभ्यां निष्ठातो नः । ततः पूर्वस्य च द इति । इहाप्युभौ साभ्यासस्येत्युभौग्रहणसामर्थ्याद् द्वावादेशौ भविष्यतः ॥

**तत्रावयवे शास्त्रार्थसंप्रत्ययो यथा लोके ॥४॥**

तत्रावयवे शास्त्रार्थसंप्रत्ययः प्राप्नोति यथा लोके । तद्यथा । लोके वसन्ते ब्राह्मणोऽग्नीनादधीतेति सकृदाधाय कृतः शास्त्रार्थ इति कृत्वा पुनःप्रवृत्तिर्न भवति । तथा गर्भाष्टमे ब्राह्मण उपनेय इति सकृदुपनीय कृतः शास्त्रार्थ इति कृत्वा पुनःप्रवृत्तिर्न भवति । तथा त्रिर्हृदयंगमाभिरद्भिरशब्दाभिरुपस्पृशेदिति सकृदुपस्पृश्य कृतः शास्त्रार्थ इति कृत्वा पुनःप्रवृत्तिर्न भवति । एवमिहापि खट्वेन्द्रे कृतः शास्त्रार्थ इति कृत्वा मालेन्द्रादिषु न स्यात् ॥

**सिद्धं तु धर्मोपदेशने ऽनवयवविज्ञानाद्यथा लौकिकवैदिकेषु ॥ ५ ॥**

सिद्धमेतत् । कथम् धर्मोपदेशनमिदं

---

वाक्यार्थ आहेत.

ते कसे ?

'रदाभ्यां निष्ठातो नः' व 'पूर्वस्य च दः' अशीं तेथें योगविभागानें दोन सूत्रें समजावयाचीं[५]. उभौ साभ्यासस्य येथेंही सूत्रकारांनीं मुद्दाम उभौ हा जो शब्द घातला आहे त्याच्यामुळें तेथें दोन णकार[६] होतात.

( वा. ४ ) आतां हे जें शास्त्रानें गुण वगैरेंसारखें कार्य सांगितलें आहे ते एखाद्या उदाहरणामध्येंच होईल; कारण तेवढ्यानेंच शास्त्रार्थ पाळिला जातो. उदाहरणार्थ पहा— लोकांमध्यें 'वसन्त ऋतूंत ब्राह्मणानें अग्नींचे आधान करावें' अशी आज्ञा केली असतां एकदां आधान केल्यानें शास्त्रार्थाचें परिपालन होतें म्हणून पुनः आधानाविषयीं प्रवृत्ति होत नाहीं. तसेंच गर्भापासून आठव्या वर्षीं ब्राह्मणाची मुंज करावी असें सांगितलें असतां त्या वेळीं एकदां मुंज केल्यानें कायदा पाळिला जातो म्हणून पुनः मुंज करावयाची प्रवृत्ति होत नाहीं. ' शब्द न होईल अशा रीतीनें चांगल्या पाण्यानें तीन वेळां आचमन करावें ' हा विधि एकदां आचमन केलें असतां सांभाळला जातो म्हणून पुनः पुनः प्रवृत्ति होत नाहीं. त्याप्रमाणें येथेंही खट्वेन्द्रः या एका उदाहरणामध्यें गुण आदेश केला असता तेवढ्यानें सूत्रकारांची आज्ञा सांभाळिली जाते तेव्हां मालेन्द्रः इत्यादि उदाहरणांमध्यें गुण करण्याविषयीं प्रवृत्ति होणार नाहीं.

( वा. ५ ) हें सिद्ध होत आहे.

तें कसें ?

धर्मनियम[७] करणारें हें शास्त्र आहे. तेव्हां

---

५ तेव्हां अर्थातच दोन सूत्रांचे दोन निरनिराळे वाक्यार्थ झाल्यामुळें दोन नकार होतात हें बरोबर आहे. तेव्हां ' वाक्यार्थ एक असूनच स्थानी दोन असल्यामुळें आदेश दोन होतात ' अशी भलती समजूत करून घेऊं नये.

६ उभौ हें पद तेथें आदेशाकडेच लावावयाचें आहे. स्थानी जे दोन नकार मनांत येतात ते अर्थात् साभ्यास जो अनिति या म्हणण्यानेंच येतात. एकंदरींत प्रकृत आद् गुणः इत्यादि सूत्रांमध्यें एकच वाक्यार्थ असल्यामुळें एकच आदेश होईल. तेव्हां एकग्रहण करावयास नको.

७. आद् गुणः वगैरे शास्त्रांचें फक्त गुण वगैरे कार्य सांगण्याविषयींच तात्पर्य आहे असें समजूं नये; तर गुण वगैरे कार्यें करून तयार झालेला शब्दच साधुशब्द समजावा व तशा दृष्टीनेंच त्याचा प्रयोग करावा म्हणजे पुण्य उत्पन्न होतें इतकें त्यांचें तात्पर्य आहे. तेव्हां अर्थातच हें शास्त्र धर्मासंबंधानें उपदेश करणारें आहे असें सिद्ध होतें.

शास्त्रं धर्मोपदेशने चास्मिञ्शास्त्रेऽनवयवेन शास्त्रार्थः संप्रतीयते यथा लौकिकेषु वैदिकेषु च कृतान्तेषु ॥ लोके तावद्ब्राह्मणो न हन्तव्यः सुरा न पेयेति ब्राह्मणमात्रं न हन्यते सुरामात्रं च न पीयते। यदि चावयवेन शास्त्रार्थसंप्रत्ययः स्यादेकं च ब्राह्मणमहत्वैकां च सुरामपीत्वान्यत्र कामचारः स्यात्। तथा पूर्ववया ब्राह्मणः प्रत्युत्थेय इति पूर्ववयोमात्रं प्रत्युत्थीयते। यदि चावयवेन शास्त्रार्थसंप्रत्ययः स्यादेकं पूर्ववयसं प्रत्युत्थायान्यत्र कामचारः स्यात् ॥ तथा वेदे खल्वपि वसन्ते ब्राह्मणो ऽग्निष्टोमादिभिः क्रतुभिर्यजेतेत्यग्न्याधाननिमित्तं वसन्ते वसन्त इज्यते। यदि चावयवेन शास्त्रार्थसंप्रत्ययः स्यात्सकृदिष्ट्वा पुनरिज्या न प्रवर्तेत ॥ उभयथेह लोके दृश्यतेऽवयवेनापि शास्त्रार्थसंप्रत्ययोऽनवयवेनापि। कथं पुनरिदमुभयं लभ्यम्। लभ्यमित्याह। कथम्। इह तावद्वसन्ते ब्राह्मणो ऽग्नीनादधीतेत्यग्न्याधानं यज्ञमुखप्रतिपत्त्यर्थम्। सकृदाधाय कृतः शास्त्रार्थः प्रतिपन्नं यज्ञमुखमिति कृत्वा पुनःप्रवृत्तिर्न भवति। अतोऽत्रावयवेन शास्त्रार्थः संप्रतीयते। तथा गर्भाष्टमे ब्राह्मण उपनेय इत्युपनयनं संस्कारार्थम्। सकृच्चासावु

---

धर्मांचा उपदेश करणाऱ्या ह्या शास्त्रामध्यें शास्त्राची प्रवृत्ति अखंड असते म्हणजे सर्व उदाहरणांमध्यें होते. उदा० लोकांमध्यें ब्राह्मणाला मारूं नये, तसेंच सुरा पिऊं नये असें सांगितलें असतां कोणत्याही ब्राह्मण व्यक्तीला मारतां येत नाहीं, तसेंच कोणत्याही प्रकारच्या सुरेचें पान केलें जात नाहीं. जर एखाद्या उदाहरणामध्यें हे निषेध सांभाळण्यानें काम भागलें जाईल तर एखादी ब्राह्मण व्यक्ति न मारिल्यानें व एखादी सुरा न प्याल्यानें निषेध संभाळला जातो म्हणून इतर व्यक्तींविषयीं स्वेच्छावर्तन होईल. तसेंच आपल्यापेक्षां वडील माणूस आला असतां त्याला प्रत्युत्थान द्यावें असें सांगितलें असतां जो जो म्हणून वडील माणूस येईल त्याला त्याला प्रत्युत्थान दिलें जातें. जर एखाद्या ठिकाणीं प्रत्युत्थान दिल्यानें हा विधि पाळला गेला तर एका वडील माणसाला प्रत्युत्थान दिल्यानें काम भागेल आणि दुसऱ्या वडील माणसाला प्रत्युत्थान देणें किंवा न देणें हें आपल्या मर्जीवर अवलंबून राहील. तसें वेदामध्येंही अग्निहोत्री ब्राह्मणानें वसन्त ऋतूमध्यें अग्निष्टोम वगैरे क्रतू करावे, असा विधि केला असतां त्याला प्रत्येक वसंतामध्यें याग करतां येतो. जर तेथें एकदां याग केल्यानें शास्त्रार्थ पाळिला जाईल तर पुनः यागाविषयीं प्रवृत्ति होणार नाहीं.

असो, पण अग्न्याधान, उपनयन, आणि आचमन हे पूर्वोक्त दृष्टान्त आणि आतांचे दृष्टान्त यांवरून लोकामध्यें दोन्ही तऱ्हेची प्रवृत्ति दृष्टीस पडते. पण कांहीं ठिकाणीं एक वेळां व कांहीं ठिकाणीं अनेक वेळां शास्त्रार्थांचें परिपालन केलें जातें या परस्पर–विरुद्ध अशा दोन्ही गोष्टी शिष्टाचारांत धरल्या जातात कां ?

होय.

याचें काय बरें कारण ?

कारण असें कीं—वसन्त ऋतूमध्यें ब्राह्मणानें अग्नींचें आधान करावें असें जें आधान सांगितलें आहे तें यज्ञांचें तोंड लागण्याकरितां सांगितलें आहे. कारण त्याशिवाय यज्ञाचा अधिकार येत नाहीं. तेव्हां एकदां आधान केलें म्हणजे विधि संभाळला जातो व यज्ञाचेंही तोंड लागतें; म्हणून आधानाविषयीं पुनः प्रवृत्ति होत नाहीं. तेव्हां तो विधि एकदाच केला जातो. तसेंच गर्भ राहिल्यापासून आठव्या वर्षी मुंज केली जाते ती पुढें केलें जाणाऱ्या वेदाध्ययनादिकांचा अधिकार प्राप्त होण्याकरितां त्या ब्राह्मणाचा

पनीतः संस्कृतो भवति । अतोऽत्राप्यवयवेन शास्त्रार्थः संप्रतीयते । तथा त्रिर्हृदयंगमाभिरद्भिरशब्दाभिरुपस्पृशेदित्युपस्पर्शनं शौचार्थम् । सकृच्चासावुपस्पृश्य शुचिर्भवति । अतोऽत्राप्यवयवेन शास्त्रार्थः संप्रतीयते ॥ इहेदानीं ब्राह्मणो न हन्तव्यः सुरा न पेयेति ब्राह्मणवधे सुरापाने च महान्दोष उक्तः । स ब्राह्मणवधमात्रे सुरापानमात्रे च प्रसक्तः । अतोऽत्रानवयवेन शास्त्रार्थः संप्रतीयते । तथा पूर्ववया ब्राह्मणः प्रत्युत्थेय इति पूर्ववयसोऽप्रत्युत्थाने दोष उक्तः प्रत्युत्थाने च गुणः । कथम् ।

ऊर्ध्वं प्राणा ह्युत्क्रामन्ति यूनः स्थविर आयति
प्रत्युत्थानाभिवादाभ्यां पुनस्तान्प्रतिपद्यत इति ॥

स च पूर्ववयोमात्रे प्रसक्तः । अतोऽत्राप्यनवयवेन शास्त्रार्थः संप्रतीयते । तथा वसन्ते ब्राह्मणोऽग्निष्टोमादिभिः क्रतुभिर्यजेतेतीज्यायाः किंचित्प्रयोजनमुक्तम् । किम् । स्वर्गे लोकेऽप्सरस एनं जाया भूत्वोपशेरत इति । तच्च द्वितीयस्यास्तृतीयस्याश्चेज्यायाः फलं भवितुमर्हति । अतोऽत्राप्यनवयवेन शास्त्रार्थः संप्रतीयते । तथा शब्दस्यापि ज्ञाने

---

एक संस्कार म्हणून केली जाते. तेव्हां एकदां मुंज केल्यानेंच तो संस्कार प्राप्त होतो, म्हणून मुंज एकदांच केली जाते. तसेंच ' शब्द न होईल अशा रीतीनें चांगल्या पाण्यानें तीन वेळां आचमन करावें ' हा विधि शुद्धता येण्याकरितां आहे. तेथेंही एकदां त्या विधीप्रमाणें आचमन केलें असतां शुद्धता प्राप्त होते म्हणून तें आचमनही एकदांच केलें जातें. आतां ब्राह्मणाचा वध करूं नये व सुरापान करूं नये असें जें सांगितलें आहे तेथें ब्राह्मणवध किंवा सुरापान केलें असतां मोठा दोष सांगितला आहे व तो दोष प्रत्येक ब्राह्मणाच्या वधप्रसंगीं आणि प्रत्येक सुरापानाच्या वेळीं प्रसक्त होतो. तो महादोष टाळण्याकरितां प्रत्येक ब्राह्मणाचा वध आणि प्रत्येक सुरापान टाळणे जरूर आहे. म्हणून तेथें अनेक वेळां निषेध–शास्त्राची प्रवृत्ति केल्यानेंच शास्त्रार्थ पाळिला जातो. तसेंच आपल्यापेक्षां वडील माणूस आला असतां त्याला प्रत्युत्थान द्यावयास सांगितलें आहे, तें न दिल्यास दोष आहे; व दिल्यास गुण आहे.

तें कशावरून ?

वयोवृद्ध आपल्याकडे येत असतां तरुणाचे प्राण वरवर उचंबळून येतात आणि प्रत्युत्थान नमस्कार वगैरे केल्यानें पुनः ते जाग्यावर येतात. हे गुण व दोष वडील माणूस पुनः पुनः केव्हांही आला तरी उत्पन्न होणारच. तेव्हां दोष टाळून गुण संपादन करण्याकरितां प्रत्येक खेपेस प्रत्युत्थान देणें जरूर आहे. तसेंच वसन्त ऋतूमध्यें ब्राह्मणाला अग्निष्टोमादि याग करावयास सांगितले आहेत व त्या यागांचें फळ स्वर्गलोकांत गेल्यावर अप्सरा त्याच्या बायका होऊन सेवा चाकरी करतात, असें सांगितले आहे. तें फळ दुसऱ्यानदां किंवा तिसऱ्यानदां याग केला तर त्या मानानें ज्यास्त ज्यास्तच मिळणार. म्हणून तेथेंही पुनः पुनः प्रवृत्ति होते हें बरोबरच आहे. असो, एकंदरींत नित्यकर्माचें जे दोष त्यांच्या परिहाराकरितां पुनः पुनः अनुष्ठान केलें जातें. नैमित्तिकाचें अनुष्ठान निमित्तांच्या अनुरोधानें होणारे जे गुण व दोष त्यांच्या संपादन व परिहाराकरितां पुनः पुनः केलें जातें. आणि काम्याचें अनुष्ठान फलभूयस्त्वाकरितां पुनः पुनः केलें जातें. अर्थात् नित्यत्व, नैमित्तिकत्व, आणि काम्यत्व हीं पुनःपुनरनुष्ठाननिमित्तक होत असें तात्पर्य आहे. जें कर्म केवळ संस्मरणार्थ म्ह० अधिकारसंपत्त्यर्थ असतें–– जसें आधान उपनयन वगैरे म्हणजे अर्थात् पुढें उभारिल्या जाणाऱ्या इमारतीच्या पायासारखें––त्याचें एकदां अनुष्ठान केल्यानेंच काम भागतें तेथें पुनरनुष्ठानाचें कार-

प्रयोगे प्रयोजनमुक्तम् । किम् । एकः शब्दः सम्यग्ज्ञातः शास्त्रान्वितः सुप्रयुक्तः स्वर्गे लोके कामधुग्भवतीति । यद्येकः शब्दः सम्यग्ज्ञातः शास्त्रान्वितः सुप्रयुक्तः स्वर्गे लोके कामधुग्भवति किमर्थं द्वितीयस्तृतीयश्च प्रयुज्यते । न वै कामानां तृप्तिरस्ति ॥

अथ पूर्वपरग्रहणं किमर्थम् ।

**पूर्वपरग्रहणं परस्यादेशप्रतिषेधार्थम् ॥ ६ ॥**

पूर्वपरग्रहणं क्रियते परस्यादेशप्रतिषेधार्थम् । परस्यादेशो मा भूत् । आद् गुणः [ ६. १. ८७ ] इति ॥ कथं च प्राप्नोति ।

**पञ्चमीनिर्दिष्टाद्धि परस्य ॥ ७ ॥**

पञ्चमीनिर्दिष्टाद्धि परस्य कार्यमुच्यते । तद्यथा । द्व्यन्तरुपसर्गेभ्योऽप ईत् [ ६. ३. ९७ ] इति ॥

**षष्ठीनिर्दिष्टार्थं तु ॥ ८ ॥**

षष्ठीनिर्देशार्थं च पूर्वपरग्रहणं क्रियते । षष्ठीनिर्देशो यथा प्रकल्पेत ॥

**अनिर्दिष्टे हि षष्ठ्यर्थाप्रसिद्धिः ॥९॥**

अक्रियमाणे हि पूर्वपरग्रहणे षष्ठ्यर्थस्याप्रसिद्धिः स्यात् । कस्य । स्थानेयो-

---

णच उरत नाहीं. तसें प्रकृत स्थलीं आद् गुणः इत्यादि शास्त्रावरून जें साधु शब्दाचें ज्ञान होतें त्याचेंही फल सांगितलें आहे.

तें कोणतें ?

एकच शब्द शास्त्राला अनुसरून उत्तम प्रकारें जाणून त्याचा प्रयोग केला असतां तो शब्द स्वर्गलोकामध्यें त्या मनुष्याच्या कामना पूर्ण करतो हें.

पण जर एक शब्द जाणिल्यानें मनुष्याच्या कामना पूर्ण होतात तर दुसरा व तिसरा शब्द जाणण्याचें कारण काय ?

कारण असें कीं कामनांची तृप्ति केव्हांही होत नाहीं.[८]

आतां येथें पूर्वपरयोः असें जें म्हटलें आहे ते कशाकरितां ?

( वा. ६ ) एकट्या पराचेच स्थानीं आदेश न होतां तो पूर्व आणि पर या दोहोंचे स्थानीं मिळून व्हावा यासाठीं पूर्वपरयोः असें म्हटलें आहे.

पण तो आदेश एकट्या पराचेच स्थानीं कसा बरें प्राप्त होतो ?

( वा. ७ ) आद् गुणः येथें आत् हा पंचमीनिर्देश असल्यामुळें त्या पंचमीनिर्दिष्ट अवर्णाहून पुढील अचाचे स्थानीं आदेश प्राप्त होतो. जसें द्व्यन्तरुपसर्गेभ्योऽप ईत् ( ६।३।९७) येथें पंचमीनिर्दिष्ट अशा द्वि वगैरे शब्दांहून पुढील अप् शब्दाला ईत्व होतें तसेंच हें होय.

( वा. ८ ) षष्ठीनिर्देशाकरितां पूर्वपरयोः असें म्हटलें आहे. त्यामुळें 'आद् गुणः' इत्यादि सूत्रांमध्यें स्थानी कोण हें समजेल.

( वा. ९ ) पूर्वपरयोः असें येथें म्हटलें नाहीं तर षष्ठ्यर्थाची येथें सिद्धि होणार नाहीं.[९]

कोणता तो षष्ठ्यर्थ ?

स्थानी कोण तें दाखविणारा.

---

८. तेव्हां त्या कामांना अनुसरून अनेक शब्द साधण्याकडे पुनः पुनः प्रवृत्ति होणें साहजिकच आहे. ( पस्पशान्हिक वार्तिक ९ भाग १ पृष्ठें २३-२४ पहावीं ). शिवाय अपशब्दाच्या ज्ञानापासून जो अधर्म उत्पन्न होतो तो टाळण्याकरितां शास्त्राची प्रवृत्ति सर्वत्र केलीच पाहिजे.

९. तेव्हां अधिक फळ मिळविण्याकरितां शास्त्राची प्रवृत्ति सर्व उदाहरणांमध्यें होणारच असें सिद्ध झालें.

गत्वस्य ॥ नैष दोषः । आदित्येषा पञ्चम्यचीति सप्तम्याः षष्ठीं प्रकल्पयिष्यति तस्मादित्युत्तरस्य [ १. १. ६७ ] इति । तथाचीत्येषा सप्तम्यादिति पञ्चम्याः षष्ठीं प्रकल्पयिष्यति तस्मिन्निति निर्दिष्टे पूर्वस्य [ १. १. ६६ ] इति ॥ एवं तर्हि सिद्धे सति यत्पूर्वपरग्रहणं करोति तज्ज्ञापयत्याचार्यो नोभे युगपत्प्रकल्पिके भवत इति । किमेतस्य ज्ञापने प्रयोजनम् । यदुक्तं सप्तमीपञ्चम्योश्च भावादुभयत्र षष्ठीप्रक्लृप्तिस्तत्रोभयकार्यप्रसङ्ग इति स न दोषो भवति ॥

## अन्तादिवच्च ॥ ६ । १ । ८५ ॥

किमर्थमिदमुच्यते ।

### अन्तादिवद्वचनमामिश्रस्यादेशवचनात् ॥ १ ॥

अन्तादिवदित्युच्यत आमिश्रस्यादेशवचनात् । आमिश्रस्यायमादेश उच्यते स नैव पूर्वग्रहणेन गृह्यते नापि परग्रहणेन । तद्यथा । क्षीरोदके संपृक्ते आमिश्रत्वान्नैव क्षीरग्रहणेन गृह्येते नाप्युदकग्रहणेन । इष्यते च ग्रहणं स्यादिति तच्चान्तरेण यत्नं न सिध्यतीत्यन्तादिवद्वचनम् । एवमर्थमिदमुच्यते ॥ अस्ति प्रयोजनमेतत् । किं तर्हीति ।

### तत्र यस्यान्तादिवत्तन्निर्देशः ॥ २ ॥

तत्र यस्यान्तादिवद्भाव इष्यते तन्निर्देशः

---

हा दोष येत नाहीं. कारण आत् ही पञ्चमी 'तस्मादित्युत्तरस्य' ( १।१।६७ ) या परिभाषेच्या साहाय्यानें अचि या सप्तमीला षष्ठी बनवील. तसेंच अचि ही सप्तमी 'तस्मिन्निति निर्दिष्टे पूर्वस्य' ( १।१।६६ ) या परिभाषेच्या साहाय्यानें आत् या पंचमीला षष्ठी बनवील.

तर मग अशा रीतीनें येथें इष्ट असे स्थानी कोण तें समजत असतां ज्या अर्थी आचार्यांनीं पूर्वपरयोः असें येथें म्हटलें आहे त्या अर्थी एकाच सूत्रामध्यें पंचमी व सप्तमी या दोन्ही विभक्ती आपल्या संबंधानें दुसऱ्या पदांतील विभक्तीला षष्ठी बनवूं शकत नाहींत असें त्यांनीं सुचविलें आहे.

हें सुचविण्याचें काय फल ?

सप्तमीपञ्चम्योश्च भावादुभयत्र षष्ठीप्रक्लृप्तिस्तत्रोभयकार्यप्रसङ्गः ( १।१।६९ वा. १७ ) असें जें म्हटलें आहे तो दोष येत नाहीं.

( सू. ८५ ) हें अतिदेश-सूत्र कशाकरितां केलें आहे ?

( वा. १ ) अन्तादिवच्च हें अतिदेश सूत्र केलें आहे त्याचें कारण असें कीं पूर्व आणि पर या दोहोंचे ठिकाणीं जेव्हां एक आदेश केला जातो तेव्हां त्याला धड पूर्वापैकींही समजतां येत नाहीं आणि परापैकींही समजतां येत नाहीं. जसें दूध आणि पाणी एका ठिकाणीं मिसळलें असतां त्याला दूधही म्हणतां येत नाहीं आणि पाणीही म्हणतां येत नाहीं. आणि येथें तर हा एकआदेश केव्हां केव्हां पूर्वापैकींही समजला पाहिजे व केव्हां केव्हां परापैकींही समजला पाहिजे. ही गोष्ट यत्नावाचून साधणार नाहीं. याकरितां हें अन्तादिवद्वचन केलें आहे.

हा उपयोग आहे खरा. पण---

(वा. २) ह्या सूत्रांत नुसते अन्त व आदि हे शब्द उच्चारिले आहेत; तरी हा कोणाच्या अन्ता-

---

१०. आने मुक् ( ७।२।८२ ) येथें अतः या पंचमीमुळें आने या सप्तमीला आणि आने या सप्तमीमुळें अतः या पंचमीला जर बरोबरच षष्ठीची कल्पना झाली तर दोहोंना मिळून मुक् आगम होईल असा दोष येतो.

१. ( सू. ८५ ) एकादेश हा पूर्वाच्या अन्तासारखा आणि पराच्या आदीसारखा समजावा.

कर्तव्यः। अस्यान्तवद्भवत्यस्यादिवद्भवतीति वक्तव्यम्॥

सिद्धं तु पूर्वपराधिकारात्॥ ३॥

सिद्धमेतत्। कथम्। पूर्वपराधिकारात्। पूर्वपरयोरिति वर्तते। पूर्वस्य कार्यं प्रत्यन्तवद्भवति। परस्य कार्यं प्रत्यादिवद्भवति॥ अथ यत्रोभयमाश्रीयते किं तत्र पूर्वस्यान्तवद्भवत्याहोस्वित्परस्यादिवद्भवति। उभयत आश्रये नान्तादिवत्। किं वक्तव्यमेतत्। न हि। कथमनुच्यमानं गंस्यते। लौकिकोऽयं दृष्टान्तः। तद्यथा। लोके यो द्वयोस्तुल्यबलयोरेकः प्रेष्यो भवति स तयोः पर्यायेण कार्यं करोति। यदा तु तमुभौ युगपत्प्रेषयतो नानादिक्षु च कार्ये भवतस्तत्र यद्यसावविरोधार्थी भवति तत उभयोर्न करोति। किं पुनः कारणमुभयोर्न करोति। यौगपद्यासंभवात्। नास्ति यौगपद्येन संभवः॥

अथान्तवत्त्वे कानि प्रयोजनानि।

---

सारखा व कोणाच्या आदीसारखा हें समजणें इष्ट आहे; तेव्हां तसा निर्देश करण्यांत यावा.

( वा. ३ ) हें सिद्ध होत आहे.

तें कसें ?

असें कीं — पूर्वपरयोः हा अधिकार येथें येत असल्यामुळें पूर्वाला कार्य कर्तव्य असतांना पूर्वाच्या अन्तावयवासारखा व पराला कार्य कर्तव्य असतांना पराच्या आद्यावयवासारखा होतो असा अर्थ होईल.

आता ज्या कार्याकरितां एकादेश हा पूर्व आणि पर या दोन्ही बाजूंचा दाखविण्याची जरूर असेल तेथें तो पूर्वाच्या अन्तावयवासारखा समजावयाचा किंवा पराच्या आद्यावयवासारखा समजावयाचा ?

“उभयत आश्रये नान्तादिवत्” म्हणजे एकादेश हा दोन्ही बाजूंचा आहे असें दाखवावयाचें असेल तर तेथें तो कोणीकडचाच समजूं नये.[2]

तर मग “उभयत आश्रये नान्तादिवत्” असें वचन अपूर्व करावयाचें कीं काय ?

नाहीं.

पण सांगितल्यावांचून तें कसें बरें समजेल ?

लोकामध्येंही हेंच दृष्टीस पडतें. उदा० बरोबरीच्या अधिकाराच्या अशा दोन मालकाकडे एक इसम नोकरीला जेव्हां असतो तेव्हां तो पाळीपाळीनें दोघाही मालकांचीं कामें करीत असतो. पण जेव्हां दोघे मालक एकाच वेळीं विरुद्ध दिशेचीं कामें सांगतात तेव्हां दोघांचीं मर्जी संभाळण्याकरितां त्या वेळीं तो दोघांपैकीं कोणाचेंच काम करूं इच्छित नाहीं.

पण दोघांचेंही काम करूं इच्छित नाहीं याचें काय बरें कारण असतें ?

एकाच वेळीं विरुद्ध दिशेचीं दोन कामें करतां येणें शक्य नाहीं.[3] म्हणून एकदम दोन्ही कामें करण्याची अशक्यता हेंच न करण्याचें कारण ?

आतां एकादेशाला जे हे पूर्वान्तवद्भाव आणि परादिवद्भाव सांगितले आहेत त्यांपैकीं पूर्वान्तवद्भावाचीं प्रयोजनें कोणतीं ?

---

२. म्हणून अभीयात् येथें ‘एतेर्लिङि’ (७।४।२४) या सूत्रानें ऱ्हस्व होत नाहीं. त्या ऱ्हस्वाला उपसर्ग आणि इण् धातु या दोहोंची जरूर आहे. अभि हा उपसर्ग आणि इयात् हें इण् धातूचें क्रियापद यांचा एकादेश जो ईकार ( ६।१।१०१ ) झाला आहे तो पूर्वाचा अन्तावयव समजून अभी हा उपसर्ग, आणि पराचा आद्यावयव समजून ई हा इण् धातु अशा दोनही कल्पना केल्या तर ऱ्हस्व होऊं लागेल.

३. तेव्हां या दृष्टान्तावरून ‘उभयत आश्रये नान्तादिवत्’ हें सिद्ध होतें.

**अन्तवत्त्वे प्रयोजनं बह्वच्पूर्वपदाट्ठज्विधाने ॥ ४ ॥**

अन्तवत्त्वे बह्वच्पूर्वपदाट्ठज्विधाने प्रयोजनम्। द्वादशान्यिकः। पूर्वपदोत्तरपदयोरेकादेशः पूर्वपदस्यान्तवद्भवति। यथा शक्येत कर्तुं बह्वच्पूर्वपदाट्ठञ्भवतीति। क तर्हि स्यात्। यत्र कृतेऽप्येकादेशे बह्वच्पूर्वपदं भवति। त्रयोदशान्यिकः॥

**प्रत्ययैकादेशः पूर्वविधौ ॥ ५ ॥**

प्रत्ययैकादेशः पूर्वविधौ प्रयोजनम्। मधु पिबन्ति। शिदशितोरेकादेशः शितोऽन्तवद्भवति। यथा शक्येत कर्तुं शितीति पिबादेशः। क तर्हि स्यात् यत्रैकादेशो न भवति। पिबति॥

**वैभक्तस्य णत्वे ॥ ६ ॥**

वैभक्तस्य णत्वे प्रयोजनम्। क्षीरपेण सुरापेण। उत्तरपदविभक्त्योरेकादेश उत्तरपदस्यान्तवद्भवति। यथा शक्येत कर्तुमेकाजुत्तरपदे णो भवतीति। क तर्हि स्यात्। यत्रैकादेशो न भवति। क्षीरपाणाम् सुरापाणाम्॥

**अदस ईत्त्वोत्वे ॥ ६ ॥**

---

(वा. ४) ज्या समासाच्या पूर्वपदामध्यें पुष्कळ स्वर आहेत अशा समासाहून तसें कर्म ज्याच्या अध्ययनामध्यें झालें आहे या अर्थी ठच् प्रत्यय (४।४।६४) सांगितला आहे तेथें अन्तवद्भावाचा उपयोग आहे. उदा०- द्वादशान्यिकः. येथें द्वादश आणि अन्य या दोन पदाच्या अकारांना मिळून झालेला आकार हा एकादेश पूर्वपदाचा अन्तावयव समजल्यामुळें द्वादशान्य या सामासिक शब्दाहून ठच् प्रत्यय करतां येतो.

बरें, पण हा अन्तवद्भाव नसता तर हा ठच् प्रत्यय कोठें बरें करतां आला असता ?

जेथें एकादश केला तरी त्याशिवाय पूर्व पदामध्ये पुष्कळ अच् सांपडतील तेथें तो झाला असता उदा०- त्रयोदशान्यिकः.

(वा. ५) अन्ति प्रत्ययाबरोबर शप् प्रत्ययाचा एकादेश झाला असतां तेथें पूर्वाला विधि कर्तव्य असतांना अन्तवद्भावाचा उपयोग होतो. उदा० मधु पिबन्ति. येथें शित् जो शप् आणि अशित् जो अन्ति यांचा एकादेश जो अकार तो शित् विकरणाच्या अन्तासारखा झाल्यामुळें पा धातूचें स्थानीं शित् प्रत्यय पुढें असतांना सांगितलेला पिब आदेश करतां येतो.

बरें पण हा अन्तवद्भाव नसेल तर हा पिब आदेश कोठें बरें झाला असता ?

जेथें एकादेश होत नाहीं तेथें म्हणजे पिबति येथें.

(वा. ६) विभक्तिस्थ नकाराला णत्व कर्तव्य असतां अन्तवद्भावाचा उपयोग होतो. उदा० क्षीरपेण, सुरापेण. येथें प हें उत्तर पद आणि इन ही विभक्ति यांच्या मध्यें झालेला गुण हा एकादेश उत्तर पदाचा अन्तावयव समजला जातो. व त्यामुळें पे हें उत्तरपद एकाच् होतें म्हणून 'एकाजुत्तरपदे णः' (८।४।१२) यानें विभक्तिस्थ नकाराला णत्व करतां येतें.

बरें पण अन्तवद्भाव नसेल तर हें णत्व कोठें बरें झालें असतें ?

जेथें एकादेश होत नाहीं तेथें. उदा०–क्षीरपाणाम् सुरापाणाम्.

(वा. ७) अदस् शब्दांतील दकाराला

---

४. ज्याच्या अध्ययनामध्यें बारा ठिकाणीं स्वर चुकला आहे असा मनुष्य हा या शब्दाचा अर्थ आहे.

५. येथें एकादेश हा पूर्वान्तवद्भावानें पूर्वपदापैकीं समजला तरी ठच् प्रत्यय होण्याला कांहींच अडचण नाहीं.

अदस ईत्त्वोत्वे प्रयोजनम् । अमी अत्र अमी आसते । अमू अत्र अमू आसाते । अदस्विभक्त्योरेकादेशो ऽदसो ऽन्तवद्भवति । यथा शक्येत कर्तुमदसो ऽसेर्दादु दो म एत ईद्बहुवचने [ ८. २. ८०; ८१ ] इति । क्व तर्हि स्यात् । यत्रैकादेशो न भवति । अमीभिः अमूभ्याम् ॥

स्वरितत्वे प्रयोजनम् । कार्या हार्या । तिदतितोरेकादेशस्तितोऽन्तवद्भवति । यथा शक्येत कर्तुं तित्स्वरितम् [ ६. १. १८५ ] इति । क्व तर्हि स्यात् । यत्रैकादेशो न भवति । कार्यः हार्यः ।

## स्वरितत्वं विप्रतिषेधात् ॥ ८ ॥

स्वरितत्वं क्रियतामेकादेश इति किमत्र कर्तव्यम् । परत्वात्स्वरितत्वं भविष्यति विप्रतिषेधेन ॥ नैष युक्तो विप्रतिषेधः । नित्य एकादेशः । कृतेऽपि स्वरितत्वे प्राप्नोत्यकृतेऽपि । अनित्य एकादेशः । अन्यथास्वरस्य कृते स्वरितत्वे प्राप्नोत्यन्यथास्वरस्याकृते स्वरितत्वे प्राप्नोति स्वरभिन्नस्य च प्राप्नुवन्विधिरनित्यो भवति । अन्तरङ्गस्तर्ह्येकादेशः । कान्तरङ्गता । वर्णावाश्रित्यैकादेशः

---

मकार आणि पुढच्या वर्णाला ऊकार व ईकार सांगितले आहेत (८।२।८०,८१) त्या ठिकाणीं अन्तवद्भावाचा उपयोग आहे. उदा०–अमी अत्र, अमी आसते; अमू अत्र, अमू आसाते. येथें अदस् शब्द आणि पुढील विभक्ति प्रत्यय यांमध्यें झालेला एकादेश हा पूर्वान्तवद्भावानें अदस् शब्दाचा अन्तावयव समजला जातो. म्हणून ‘ अदसोऽसेर्दादु दो मः’ व ‘ एत ईद्बहुवचने ’ या सूत्रांनीं मूत्व आणि मीत्व करतां येतें. बरें, पण हा अन्तवद्भाव नसता तर हें मूत्व आणि मीत्व कोठें बरें झालें असतें ?

जेथें एकादेश होत नाहीं तेथें. उदा०– अमीभिः अमूभ्याम्.

“ स्वरितत्वे प्रयोजनम् ” स्वरित स्वर कर्तव्य असतांना अन्तवद्भावाचा उपयोग होतो. उदा०– कार्या, हार्या. येथें तित् म्ह० तकार इत्संज्ञक ज्याचा आहे असा जो ण्यत् प्रत्यय आणि तित् नव्हे असा जो पुढील टाप् प्रत्यय या दोहोंमध्यें झालेला सवर्ण-दीर्घ एकादेश हा पूर्वान्तवद्भावानें तित् प्रत्ययापैकींच समजला जातो. म्हणून ‘ तित्स्वरितम् ’ (६।१।१८५) यानें आकाराला स्वरित स्वर होतो.

बरें, पण अन्तवद्भाव नसता तर हा स्वरित स्वर कोठें बरें झाला असता ?

जेथें एकादेश नाहीं तेथें. उदा०—कार्यः, हार्यः.

( वा. ८ ) पण कार्या येथें कार्य-आ असें असतां प्रथमतः स्वरित करावा किंवा एकादेश करावा ? या दोहोंमध्यें पूर्वी काय बरें करावें ?

विप्रतिषेध असल्यामुळें एकादेशापेक्षां पूर्वी स्वरित स्वर होईल.

हा विप्रतिषेध बरोबर नाहीं. कारण स्वरित स्वर केला अथवा न केला तरी एकादेश प्राप्त होतो म्हणून तो नित्य आहे[१]; व परशास्त्रापेक्षां नित्यशास्त्र प्रबल असतें.

तरी पण एकादेश अनित्य आहे. कारण स्वरित स्वर केला असतांना त्या स्वरिताबरोबर एकादेश प्राप्त होतो आणि स्वरित स्वर केला नसतांना उदात्ताबरोबर एकादेश प्राप्त होतो. अशा रीतीनें भिन्न भिन्न स्वराच्या वर्णाला प्राप्त होणारा विधि अनित्य म्हटला जातो.

तर मग एकादेश हा अंतरंग आहे ?

तो कसा ?

असा कीं– एकादेशाला फक्त दोन वर्णांची

---

१. तेव्हां एक नित्य आणि दुसरें अनित्य यांची बरोबरी नसल्यामुळें त्यांमध्यें विप्रतिषेध म्ह० परस्पर-विरोध आहे असें म्हणतां येत नाहीं.

पदस्य स्वरितत्वम् । स्वरितत्वमप्यन्तरङ्गम् । कथम् । उक्तमेतत्पदग्रहणं परिमाणार्थमिति । उभयोरन्तरङ्गयोः परत्वात्स्वरितत्वं स्वरितत्वे कृत आन्तर्यतः स्वरितानुदात्तयोरेकादेशः स्वरितो भविष्यति ॥

लिङ्गविशिष्टग्रहणाद्वा ॥ ९ ॥

अथवा प्रातिपदिकग्रहणे लिङ्गविशिष्टस्यापि ग्रहणं भवतीत्येवमत्र स्वरितत्वं भविष्यति ॥

पूर्वपदान्तोदात्तत्वं च प्रयोजनम् । गुडोदकम् मथितोदकम् । पूर्वपदोत्तरपदयोरेकादेशः पूर्वपदस्यान्तवद्भवति । यथा शक्येत कर्तुमुदकेऽकेवले पूर्वपदस्यान्त उदात्तो भवतीति । क्व तर्हि स्यात् । यत्रैकादेशो नास्ति । उदश्विदुदकम् ॥

पूर्वपदान्तोदात्तत्वं च ॥ १० ॥

पूर्वपदान्तोदात्तत्वं च विप्रतिषेधात् । पूर्वपदान्तोदात्तत्वं क्रियतामेकादेश इति किमत्र कर्तव्यम् । परत्वात्पूर्वपदान्तोदात्तत्वम् । पूर्वपदान्तोदात्तत्वस्यावकाशः । उद-

---

जरूर आहे. आणि स्वरिताँला पदाची जरूर आहे.

स्वरितही अंतरंग आहे.

तो कसा ?

असा कीं 'अनुदात्तं पदमेकवर्जम्' येथील पद-शब्द ज्याला पदसंज्ञा पुढें होणार आहे अशा अर्थाचा लाक्षणिक आहे असें सांगितलें आहे. ( ४।३।१४० वा. ४ ) तेव्हां पदसंज्ञा झाल्यावरच त्याची प्राप्ति येते असें नाहीं. तेव्हां एकादेश आणि स्वरित या दोघांनाही, अंतरंगत्व असल्यामुळें परत्वास्तव प्रथमतः स्वरित होईल आणि नंतर स्वरित व अनुदात्त यांचे स्थानीं होणारा जो एकादेश तो 'स्थानेऽन्तरतमः' ( १।१।५० ) या परिभाषेनें स्वरित होईल.

( वा. ९ ) अथवा "प्रातिपदिकग्रहणे लिङ्गविशिष्टस्यापि ग्रहणम्" म्हणजे प्रातिपदिकाला होणारें कार्य लिंगप्रत्ययसहितालाही होतें या परिभाषेनें कार्या या टाबन्ताला स्वरित होईल.

"पूर्वपदान्तोदात्तत्वं च प्रयोजनम्" म्हणजे पूर्वपदाला अन्तोदात्त होणें हेंही अन्तवद्भावाचें प्रयोजन होतें. उदा० गुडोदकम्, मथितोदकम्. येथें पूर्वपद गुड आणि उत्तरपद उदक यांचा एकादेश गुण हा पूर्वपदाचा अन्तावयव समजला जातो म्हणून 'उदकेऽकेवले' ( ६।२।९६ ) या सूत्रानें गुडो या पूर्वपदाला अन्तोदात्त करतां येतो.

बरें पण हा अन्तवद्भाव नसेल तर अन्तउदान्त कोठें बरें होईल. ?

जेथें एकादेश नाहीं तेथें. उदा० उदश्विदुदकम्.

( वा. १० ) गुडोदकम् येथें विप्रतिषेधानें एकादेशाच्या पूर्वींच अन्तोदात्त होतो. गुड उदकम् असें असतां प्रथमतः पूर्वपदाला अन्तोदान्त करावा किंवा एकादेश करावा ?

मग यांपैकीं येथें पूर्वी काय बरें करावें ?

पर असल्यामुळें पूर्वपदाला प्रथम अन्तोदात्त करावा. उदश्विदुदकम् येथें पूर्वपदान्तोदात्ताला

---

७. अनुदात्तं पदमेकवर्जम् ह्याची तित्स्वरितम् येथें उपस्थिति झाल्यामुळें तित् प्रत्ययाला स्वरित होतो आणि त्या पदांतील बाकीचे वर्ण अनुदात्त होतात असा अर्थ होतो. तेव्हां अर्थातच सुप् किंवा तिङ् प्रत्यय करून पदसंज्ञा झाल्यानंतर स्वरिताची प्राप्ति येणार म्हणून स्वरित हा बहिरंग आहे.

८. एकंदरींत अन्तवद्भावाचें हें प्रयोजन नाहीं असें सिद्ध झालें.

श्विदुदकम् । एकादेशस्यावकाशः । दण्डाग्रम् क्षुपाग्रम् । इहोभयं प्राप्नोति । मथितोदकम् गुडोदकम् । पूर्वपदान्तोदात्तत्वं भवति विप्रतिषेधेन ॥ स चावश्यं विप्रतिषेध आश्रयितव्यः ।

**एकादेशे हि स्वरिताप्रसिद्धिः ॥११॥**

एकादेशे हि स्वरितस्याप्रसिद्धिः स्यात् । यो हि मन्यतेऽस्त्वत्रैकादेश एकादेशे कृते पूर्वपदान्तोदात्तत्वं भविष्यतीति स्वरितत्वं तस्य न सिध्यति स्वरितो वानुदात्ते पदादौ [ ८. २. ६ ] इति । गुडोदकम् मथितोदकम् ॥

कृदन्तप्रकृतिस्वरत्वं च प्रयोजनम् । प्राटिता प्राशिता । कृद्गत्योरेकादेशो गतेरन्तवद्भवति । यथा शक्येत कर्तुं गतिकारकोपपदात्कृदन्तमुत्तरपदं प्रकृतिस्वरं भवतीति । क तर्हि स्यात् । यत्र नैकादेशः । प्रकारकः प्रकरणम् ।

**कृदन्तप्रकृतिस्वरत्वं च ॥ १२ ॥**

कृदन्तप्रकृतिस्वरत्वं च विप्रतिषेधात् । कृदन्तप्रकृतिस्वरत्वं क्रियतामेकादेश इति किमत्र कर्तव्यम् । परत्वात्कृदन्तप्रकृतिस्वरत्वं भवति विप्रतिषेधेन । कृदन्तप्रकृतिस्वरस्यावकाशः । प्रकारकः प्रकरणम् । एकादेशस्यावकाशः । दण्डाग्रम् क्षुपाग्रम् । इहोभयं प्राप्नोति । प्राटिता प्राशिता ।

---

अवकाश आहे व दण्डाग्रम् क्षुपाग्रम् येथें एकादेशाला अवकाश आहे. पण मथितोदकम् गुडोदकम् येथें दोहोंची एकदम प्राप्ति आली असतां विप्रतिषेध असल्यामुळें पूर्वपदान्तोदात्तच प्रथमतः होतो. आणि हा विप्रतिषेध तर अवश्य स्वीकारलाच पाहिजे.

( वा. ११ ) विप्रतिषेध मनांत न घेतां गुडोदकम् व मथितोदकम् येथें पूर्वी एकादेश झाला तरी नंतर पूर्वपदान्तोदात्त होईल असें जो समजतो त्याच्या मतीं एकादेशाला 'स्वरितो वाऽनुदात्ते पदादौ ' ( ८।२।६ ) यानें सांगितलेला पाक्षिक स्वरित[९] साधत नाहीं.

कृदन्तप्रकृतिस्वरत्वं च प्रयोजनम् म्हणजे कृदन्ताला प्रकृतिस्वर होणें हेंही अन्तवद्भावाचें प्रयोजन होय. उदा०— प्राटिता प्राशिता. येथें प्र हा गतिसंज्ञक व अटिता हें कृदन्त यांचा एकादेश सवर्णदीर्घ हा पूर्वान्तवद्भावानें गतिसंज्ञक शब्दाचा अन्तावयव समजला जातो; म्हणून गति, कारक, आणि उपपद यांच्या पुढील कृदन्त उत्तरपदाला सांगितलेला प्रकृतिस्वर ( ६।२।१३९ ) करतां येतो.

बरें पण अन्तवद्भाव नसेल तर हा प्रकृतिस्वर कोठें बरें झाला असता ?

जेथें एकादेश नाहीं तेथें. उदा० प्रकारकः, प्रकरणम्.

( वा. १२ ) प्राटिता येथें विप्रतिषेधानें एकादेशाच्या पूर्वी अटिता या कृदन्ताला प्रकृतिस्वर होतो. प्र अटिता असें असतां कृदन्त प्रकृतिस्वर प्रथमतः करावा किंवा एकादेश करावा ?

मग या दोहोंपैकीं येथें पूर्वी काय बरें करावें ?

कृदन्ताला होणारा प्रकृतिस्वर हा विप्रतिषेधामुळें परत्वास्तव अगोदर होईल. प्रकारकः प्रकरणम् वगैरे स्थलीं कृदन्त–प्रकृतिस्वराला अवकाश आहे; व दण्डाग्रम् क्षुपाग्रम् येथें एकादेशाला अवकाश आहे. आणि प्राटिता व

---

९. एकादेशाच्या पूर्वी पूर्वपदाला अन्तोदात्त झाला म्हणजे शेष-निघातानें (६।१।१५८) उत्तर पदामधील सर्व स्वरांना अनुदात्त झाल्यानंतर एकादेश होतो. म्हणून येथें विकल्पानें स्वरित सिद्ध होतो.

कृदन्तप्रकृतिस्वरत्वं भवति विप्रतिषेधेन ॥ स चावश्यं विप्रतिषेध आश्रयितव्यः ।

**एकादेशे ह्यप्रसिद्धिरुत्तरपदस्यापरत्वात् ॥ १३ ॥**

यो हि मन्यतेऽस्त्वत्रैकादेश एकादेशे कृते कृदन्तप्रकृतिस्वरत्वं भविष्यतीति कृदन्तप्रकृतिस्वरत्वं तस्य न सिध्यति । किं कारणम् । उत्तरपदस्यापरत्वात् । न हीदानीमेकादेशे कृत उत्तरपदं परं भवति । ननु चान्तादिवद्भावेन परम् । उभयत आश्रये नान्तादिवत् ॥

**उत्तरपदवृद्धिश्चैकादेशात् ॥ १४ ॥**

उत्तरपदवृद्धिश्चैकादेशाद्भवति विप्रतिषेधेन । उत्तरपदवृद्धेरवकाशः । पूर्वत्रैगर्तकः अपरत्रैगर्तकः । एकादेशस्यावकाशः । दण्डाग्रम् क्षुपाग्रम् । इहोभयं प्राप्नोति । पूर्वैषुकामशमः अपरैषुकामशमः । उत्तरपदवृद्धिर्भवति विप्रतिषेधेन ॥

**एकादेशप्रसङ्गस्त्वन्तरङ्गबलीयस्त्वात् ॥ १५ ॥**

एकादेशस्तु प्राप्नोति । किं कारणम् । अन्तरङ्गस्य बलीयस्त्वात् । अन्तरङ्गं बलीयो भवति ॥ तत्र को दोषः ।

**तत्र वृद्धिविधानम् ॥ १६ ॥**

---

प्राशिता येथें दोघांची युगपत् प्राप्ति आली असतां तेथें विप्रतिषेध असल्यामुळें प्रथमतः कृदन्त–प्रकृतिस्वर होतो. आणि हा विप्रतिषेध तर अवश्य स्वीकारलाच पाहिजे.

( वा. १३ ) विप्रतिषेध मनांत न घेतां प्राटिता येथें प्रथमतः एकादेश झाला तरी कृदन्त प्रकृतिस्वर होईल असें जो समजतो त्याचे मतीं कृदन्ताला प्रकृतिस्वर साधत नाहीं.

याचें काय कारण ?

कारण ‘ उत्तरपदस्यापरत्वात् ’ म्हणजे एकादेश केल्यावर उत्तरपद हें गतिसंज्ञक शब्दाच्या पुढें आहे असें म्हणतां येत नाहीं. आतां प्रकृत सूत्रानें काम भागेल असेंही म्हणतां येत नाहीं. कारण एकाच वेळीं पूर्वान्तवद्भाव व परादिवद्भाव स्वीकारतां येत नाहींत.

( वा. १४ ) याप्रमाणेंच विप्रतिषेध असल्यामुळें एकादेशापेक्षां उत्तरपदवृद्धि प्रथमतः होत असते. उत्तरपदवृद्धीला पूर्वत्रैगर्तकः अपरत्रैगर्तकः वगैरे स्थलीं अवकाश आहे; व दण्डाग्रम क्षुपाग्रम् वगैरे स्थलीं एकादेशाला अवकाश आहे. असें असून पूर्वैषुकामशमः अपरैषुकामशमः येथें पूर्व-इषुकामशम असें असतां दोघाची प्राप्ति एकदम येते. तेथें विप्रतिषेध असल्यामुळें पूर्वी उत्तरपदवृद्धि होते.

( वा. १५ ) पूर्व-इषुकामशम असें असतां तेथें एकादेश अगोदर प्राप्त होतो.

काय कारण ?

कारण असें कीं-अंतरंगाला बलीयस्त्व असल्यामुळें उत्तरपदवृद्धीला मागें सारून पूर्वी एकादेश प्रसक्त होतो.

एकादेश पूर्वी झाला असतां काय बरें दोष येतो ?

( वा. १६ ) एकादेश प्रथमतः झाला तर अशा ठिकाणीं वृद्धीचें विधान करावें लागेल.[११]

---

१०. ‘ पूर्वेषु त्रिगर्तेषु ’ असा तद्धितार्थी समास ( २।१।५१ ), पुढें वुञ् प्रत्यय ( ४।२।१२५ ), आणि ‘ दिशोऽमद्राणाम् ’ ( ७।३।१३ ) यानें उत्तरपदवृद्धि हीं कार्यें झालीं आहेत.

११. कारण पूर्वैषुकामशमः येथें वृद्धीच्या अगोदर एकादेश गुण झाला तर एकादेश हा दोन्ही बाजूला एकदम धरतां येत नसल्यामुळें दिग्वाचक पूर्वपद कोणतें आणि ग्रामवाचक उत्तरपद कोणतें तें सांगतां येत नाहीं म्हणून वृद्धि प्राप्त होत नाहीं.

तत्र वृद्धिर्विधेया ॥ नैष दोषः । आचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयति पूर्वपदोत्तरपदयोस्तावत्कार्यं भवति नैकादेश इति यदयं नेन्द्रस्य परस्य [ ७. ३. २२ ] इति प्रतिषेधं शास्ति । कथं कृत्वा ज्ञापकम् । इन्द्रे द्वावचौ । तत्रैको यस्येति लोपेन ह्रियतेऽपर एकादेशेन । अनच्क इन्द्रः संपन्नः । तत्र को वृद्धेः प्रसङ्गः । पश्यति त्वाचार्यः पूर्वपदोत्तरपदयोस्तावत्कार्यं भवति नैकादेश इति ततो नेन्द्रस्य परस्येति प्रतिषेधं शास्ति ॥

अथादिवत्त्वे कानि प्रयोजानि ।

**आदिवत्त्वे प्रयोजनं प्रगृह्यसंज्ञायाम् ॥ १७ ॥**

आदिवत्त्वे प्रगृह्यसंज्ञायां प्रयोजनम् । अग्नी इति वायू इति । द्विवचनाद्विवचनयोरेकादेशो द्विवचनस्यादिवद्भवति । यथा शक्येत कर्तुमीदूदेद्द्विवचनं प्रगृह्यम् [ १. १. ११ ] इति । क तर्हि स्यात् । यत्रैकादेशो न भवति । त्रपुणी इति जतुनी इति ॥

**सुप्तिङाब्विधिषु ॥ १८ ॥**

सुप्तिङाब्विधिषु प्रयोजनम् । सुप् । वृक्षे तिष्ठति । प्लक्षे तिष्ठति । सुबसुपोरेका-

---

हा दोष येत नाहीं.

कारण आचार्यांचा व्यवहारच सुचवीत आहे कीं पूर्वपद आणि उत्तरपद यांच्या संबंधानें सांगितलेलें कार्यच प्रथमतः होतें; एकादेश प्रथमतः होत नाहीं. आणि म्हणूनच आचार्य हे ' नेन्द्रस्य परस्य ' ( ७।३।२२ ) असा वृद्धीचा निषेध करीत आहेत.

हें ज्ञापक कसें बरें जमतें ?

असें जमतें कीं सौमेन्द्रः[१२] येथें इन्द्र या उत्तर पदाला वृद्धि ( ७।३।२१ ) न होण्याकरितां ' नेन्द्रस्य परस्य ' असा निषेध केला आहे. पण विचार केला असतां इन्द्र शब्दामध्यें दोनच अच् आहेत. त्यांपैकीं पुढील अकार ' यस्येति च ' (६।४।१४८) या लोपानें घालविला आणि पूर्वीचा इकार एकादेशानें घालविला तर इन्द्र शब्दामध्यें एकही अच् उरत नाहीं. मग तेथें वृद्धीची प्राप्ति तरी कशी येणार ! अर्थातच निषेध नकोसा होत आहे. तेव्हां सूत्रकार खात्रीनें मनांत असें समजत आहेत कीं-' पूर्वपद आणि उत्तरपद यांच्या संबंधानें सांगितलेलें कार्यच अगोदर होतें, तोंपर्यंत एकादेश होत नाहीं.[१३] '

आणि ह्या समजुतीनेंच ' नेन्द्रस्य- परस्य ' हा निषेध ते करीत आहेत.

आतां परादिवद्भावाचे कोणकोणते उपयोग आहेत ?

( वा. १७ ) प्रगृह्यसंज्ञेविषयीं परादिवद्भावाचा उपयोग होत आहे. उदा०-अग्नी इति, वायू इति. येथें द्विवचन औ आणि द्विवचनभिन्न असा मागील अग्नि शब्द यांमध्यें झालेला ई हा एकादेश ( ६।१।१०२ ) पदाच्या आद्यावयवासारखा समजला जातो म्हणून ' ईदूदेद्द्विवचनं प्रगृह्यम् ' (१।१।११) या सूत्रानें प्रगृह्य संज्ञा करतां येते.

पण जर परादिवद्भाव नसता तर प्रगृह्यसंज्ञा कोठें बरें झाली असती ?

जेथें एकादेश नाहीं तेथें. उदा०-त्रपुणी इति, जतुनी इति.

( वा. १८ ) सुप् तिङ् आणि आप् ह्या प्रत्ययांच्या संबधानें विधि कर्तव्य असतांना आदिवद्भावाचा उपयोग होतो. सुपाचें उदाहरण- वृक्षे तिष्ठति, प्लक्षे तिष्ठति. येथें सुप् जो ङि प्रत्यय आणि सुप्-भिन्न जो वृक्ष शब्द त्यांच्या

---

१२. सोम आणि इन्द्र हे ज्याची देवता आहेत अशा अर्थी सोमेन्द्र शब्दाहून अण् प्रत्यय ( ४।२। २४ ) झाला आहे.

१३. तेव्हां प्राप्तिता येथें एकादेशाच्या पूर्वीच उत्तरपदाला प्रकृति-स्वर होईल म्हणून तेथें अन्तवद्भावाचा कांहीं उपयोग नाहीं असें सिद्ध झालें.

देशः सुप आदिवद्भवति । यथा शक्येत कर्तुं सुबन्तं पदमिति । क तर्हि स्यात् । यत्रैकादेशो न भवति । वृक्षस्तिष्ठति । प्लक्षस्तिष्ठति । सुप् ॥ तिङ् । पचे यज इति । तिङतिङोरेकादेशस्तिङ आदिवद्भवति । यथा शक्येत कर्तुं तिङन्तं पदमिति । क तर्हि स्यात् । यत्रैकादेशो न भवति । पचति यजति । तिङ् ॥ आप् । खट्वा माला । आबनापोरेकादेश आप आदिवद्भवति । यथा शक्येत कर्तुमाबन्तात्सोर्लोपो भवतीति । क तर्हि स्यात् । यत्रैकादेशो न । कुञ्चा उष्णिहा देवविशा ॥

## आङ्ग्रहणे पदविधौ ॥ १९ ॥

आङ्ग्रहणे पदविधौ प्रयोजनम् । अद्याहते । कदाहते । अङनाङोरेकादेश आङ आदिवद्भवति । यथा शक्येत कर्तुमाङो यमहनः [ १. ३. २८ ] इत्यात्मनेपदं भवतीति । क तर्हि स्यात् । यत्रैकादेशो न । आहते ॥

## आटश्च वृद्धिविधौ ॥ २० ॥

आटश्च वृद्धिविधौ प्रयोजनम् । अद्यैहिष्ट । कदैहिष्ट । आटोऽद्यशब्दस्य चैकादेश आट

---

मध्यें झालेला गुण हा एकादेश परादिवद्भावानें सुप् प्रत्ययांपैकीं समजला जातो. म्हणून ' सुप्तिङन्तं पदम् ' ( १।४।१४ ) या सूत्रानें पदसंज्ञा करतां येते.

बरें, पण जर परादिवद्भाव नसता तर पदसंज्ञा कोठें बरें झाली असती ?

जेथें एकादेश नाहीं तेथें. उदा०—वृक्षस्तिष्ठति. तिङ् प्रत्ययाचें उदाहरण—पचे यजे. येथें इकार हा तिङ् आणि तिङ्भिन्न पच हा शब्द यांच्यामध्यें झालेला गुण हा एकादेश परादिवद्भावानें तिङ्प्रत्ययांपैकीं समजला जातो म्हणून 'सुप्तिङन्तं पदम्' यानें पदसंज्ञा करतां येते.

पण जर परादिवद्भाव नसता तर ही पदसंज्ञा कोठें बरें झाली असती ?

जेथें एकादेश नाहीं तेथें. उदा०—पचति, यजति. आप् प्रत्ययाचें उदा०—खट्वा. येथें आकार हा आप् प्रत्यय आणि आप्-भिन्न खट्व शब्द यांच्या मध्यें झालेला दीर्घ हा एकादेश परादिवद्भावानें आप् प्रत्ययापैकीं समजला जातो. म्हणून ' हल्ङ्याब्भ्यः' ( ६।१।६८ ) यानें आबन्ताहून पुढील सुप्रत्ययाचा लोप करतां येतो. बरें पण जर परादिवद्भाव नसता तर आबन्ताहून पुढील सु प्रत्ययाचा लोप कोठें बरें झाला असता ?

जेथें एकादेश नाहीं तेथें. जसें कुञ्चा[14], उष्णिहा.

( वा. १९ ) आङाच्या संबंधानें पुढें विधि कर्तव्य असतांना परादिवद्भावाचा उपयोग होत आहे. जसें—अद्याऽऽहते[15] कदाऽऽहते. येथें आङ् व आङ्भिन्न अद्य व कदा हे मागील शब्द यांच्यामध्यें झालेला एकादेश परादिवद्भावानें आङ् समजला जातो म्हणून ' आङो यमहनः ' ( १।३।२८ ) यानें आत्मनेपद करतां येतें.

बरें पण परादिवद्भाव नसेल तर हें आत्मनेपद कोठें बरें होईल ?

जेथें एकादेश नाहीं तेथें उदा०—आहते[15].

( वा. २० ) आटश्च ( ६।१।९० ) यानें वृद्धि कर्तव्य असतांना परादिवद्भावाचा उपयोग होतो उदा०—अद्यैहिष्ट कदैहिष्ट. ऐहिष्ट हें ईह धातूचें लुङन्ताचें रूप आहे. आट् आगमाचा अद्य शब्दाशीं संबंध करून अद्य आ ईहिष्ट असें असतां अद्यशब्दाचा आटाबरोबर झालेला जो सवर्ण-दीर्घ एकादेश तो आट् सम-

---

१४. कुञ्च् उष्णिह् व देवविश् हे हलन्त शब्द अजादिगणामध्यें आहेत म्हणून तेथें टाप् प्रत्यय ( ४।१।४ ) झाला आहे.

१५. आङ् उपसर्गपूर्वक हन् धातूचें लटाचें प्रथम पुरुष एकवचनाचें ' आहते ' असें रूप होतें.

आदिवद्भवति । यथा शक्येत कर्तुमाटश्चाचि वृद्धिर्भवतीति । क्व तर्हि स्यात् । यत्रैकादेशो न । ऐहिष्ट ऐक्षिष्ट ॥

**कृदन्तप्रातिपदिकत्वे च ॥ २१ ॥**

कृदन्तप्रातिपदिकत्वे च प्रयोजनम् । धारयः पारयः । कृदकृतोरेकादेशः कृत आदिवद्भवति । यथा शक्येत कर्तुं कृदन्तं प्रातिपदिकमिति । क्व तर्हि स्यात् । यत्रैकादेशो न । कारकः हारकः ॥

**नाभ्यासादीनां ह्रस्वत्वे ॥ २२ ॥**

अभ्यासादीनां ह्रस्वत्वे नान्तादिवद्भवतीति वक्तव्यम् । के पुनरभ्यासादयः । अभ्यासोहाम्बार्थनदीनपुंसकोपसर्जनानि । अभ्यासह्रस्वत्वम् । उपेयाज उपोवाप । ऊहे-ह्रस्वत्वम् । उपोह्यते प्रोह्यते परोह्यते । अम्बार्थनदीनपुंसकोपसर्जनह्रस्वत्वानि । अम्बात्र अक्कात्र । कुमारीदम् किशोरीदम् । आराशस्त्रीदम् धानाशष्कुलीदम् । निष्कौशाम्बीदम् निर्वाराणसीदम् । अभ्यासोहार्थनदीनपुंसकोपसर्जनग्रहणेन ग्रहणाद्ध्रस्वत्वं

---

जला जातो म्हणून 'आटश्च' यानें वृद्धि करितां येते. बरें; पण जर परादिवद्भाव नसता तर ही वृद्धि कोठें बरें झाली असती ?

जेथे एकादेश नाहीं तेथे. उदा० -ऐक्षिष्ट.

( वा. २१ ) कृदन्ताला प्रातिपदिक संज्ञा कर्तव्य असतांना परादिवद्भावाचा उपयोग होतो. उदा०– धारयः[१६] पारयः. येथें कृत् प्रत्यय श व कित्-भिन्न शप् यांच्या मध्यें झालेला पररूप ( ६।१।९७ ) हा एकादेश परादिवद्भावानें कृत् प्रत्ययांपैकीं समजला जातो. म्हणून धारय पारय या कृदन्ताला प्रातिपदिक संज्ञा करतां येते. बरें, पण परादिवद्भाव नसेल तर कृदन्ताला प्रातिपदिक सज्ञा कोठें बरें होईल ?

जेथें एकादेश नाहीं तेथें. जसें–कार्यम् हार्यम् वगैरे ठिकाणीं.

( वा. २२ ) अभ्यास वगैरेंना ऱ्हस्व कर्तव्य असतांना प्रकृत सूत्रानें अन्तादिवद्भाव होत नाहीं असें म्हणावें.

अभ्यास वगैरे ते कोणते ?

अभ्यास, ऊह धातु, अम्बार्थक शब्द, नदीसंज्ञक शब्द, नपुसक शब्द आणि उपसर्जन शब्द, हे अभ्यास वगैरे होत. अभ्यास–ऱ्हस्वाचें उदाहरण–उपेयाज[१७] उपोवाप. ऊह धातूच्या ऱ्हस्वाचें उदाहरण–प्रोह्यते उपोह्यते. अम्बार्थक, नदीसंज्ञक, नपुसक, आणि उपसर्जन या शब्दांचीं उदाहरणें–अम्बाऽत्र अक्काऽत्र, कुमारीदम्, किशोरीदम्, आराशस्त्रीदम् धानाशष्कुलीदम्, निष्कौशाम्बीदम् निर्वाराणसीदम्. यांपैकीं अभ्यास आणि ऊह धातु यांच्या उदाहरणांमध्यें एकादेश हा परादिवद्भावानें अभ्यास आणि ऊह धातु यांच्या पैकीं आहे असें समजल्यामुळें ऱ्हस्व (७।४।५९, ७।४।२३) प्राप्त होतो. तसेंच पुढील उदाहरणांमध्यें एकादेश हा पूर्वान्तवद्भावानें अम्बार्थक, नदीसंज्ञक, नपुंसक, आणि उपसर्जन या शब्दांपैकीं आहे असें समजल्यामुळें ऱ्हस्व ( ७।३।१०७, १।२।४७–४८ ) प्राप्त होतो.

---

१६. धारि व पारि या णि–प्रत्ययान्त धातूंहून श प्रत्यय (३।१।१३८) झाला आहे व मध्यें शप् विकरण आणि पररूप ( ६।१।९६ ) हीं कार्यें झालीं आहेत.

१७. इयाज हें यज् धातूचें लिटाचें प्रथमपुरुष एकवचनाचें रूप आहे. यांतील अभ्यास जो इकार त्याच्या बरोबर उप यातील अकाराचा झालेला एकादेश जर परादिवद्भावानें अभ्यासापैकीं समजला गेला तर ऱ्हस्व होईल. आराशस्त्रि आणि धानाशष्कुलि हे समाहार–द्वंद्व करून नपुंसकलिंगी शब्द बनले आहेत. निष्कौशाम्बि हा शब्द कौशाम्बींतून निघालेला या अर्थी पुल्लिंगी घेतला तर इदम् शब्दाबरोबर त्याचा समास करावा. नपुंसकलिंगी घेतला तर समास केला

प्राप्नोति ॥

**न वा बहिरङ्गलक्षणत्वात् ॥ २३ ॥**

न वैतद्वक्तव्यम् । किं कारणम् । बहिरङ्गलक्षणत्वात् । अन्तरङ्गं ह्रस्वत्वम् बहिरङ्गा एते विधयः । असिद्धं बहिरङ्गमन्तरङ्गे ॥

**वर्णाश्रयविधौ च ॥ २४ ॥**

वर्णाश्रयविधौ च नान्तादिवद्भवतीति वक्तव्यम् । किं प्रयोजनम् ।

**प्रयोजनं खट्वाभिर्जुहावास्या अश्व इति ॥ २५ ॥**

इह खट्वाभिः मालाभिः अतो भिस ऐस्भवतीत्यैस्भावः प्राप्नोति । नैष दोषः । तपरकरणसामर्थ्यान्न भविष्यति । अस्त्यन्यत्तपरकरणे प्रयोजनम् । किम् । कीलालपाभिः शुभंयाभिः ॥ जुहाव । आत औ

( वा. २३ ) अथवा हें प्रतिषेध-वचन करावयास नको.

काय कारण ?

कारण ह्या सर्व उदाहरणांमध्यें एकाच पदाच्या संबंधानें ऱ्हस्व होत असल्यामुळें तो अंतरंग आहे आणि एकादेश हे विधी दुसऱ्या पदाच्या संबंधानें होणारे असल्यामुळें ते बहिरंग आहेत. तेव्हां अंतरंग ऱ्हस्व कर्तव्य असतांना बहिरंग एकादेश असिद्ध असल्यामुळें ऱ्हस्व होणार नाहीं.

( वा. २४ ) ज्या विधीला वर्णावरील धर्माची जरूर आहे तो विधि कर्तव्य असतांना एकादेश हा अन्तादिवद्भावानें त्या धर्माचा म्हणजे पूर्वाच्या अंतासारखा किंवा पराच्या आदीसारखा आहे असें समजूं नये.

असें न समजण्याचा काय उपयोग ?

( वा. २५ ) खट्वाभिः[18], जुहाव, अस्या अश्वः हे याचे उपयोग आहेत. खट्वाभिः मालाभिः इत्यादि रूपांमध्यें एकादेश हा पूर्वीच्या अंतासारखा आहे असें समजल्यास ' अतो भिस् ऐस् ' यानें ऐस् आदेश प्राप्त होत आहे.

हा दोष येत नाहीं. कारण ' अतो भिस ऐस् ' येथें अतः असें जें तपरकरण केलें आहे त्याचे जोरावर खट्वाभिः इत्यादि स्थलीं ऐस् होणार नाहीं.

हें बरोबर नाहीं. कारण तपरकरणाचा दुसरीकडे चांगला उपयोग येत आहे.

तो कोणता ?

कीलालपाभिः शुभंयाभिः इत्यादि ठिकाणीं ऐस् आदेश न होणे हा तो[19] उपयोग होय.

नाहीं तरी चालेल. येथें नपुंसक-ऱ्हस्व आणि उपसर्जन-ऱ्हस्व या दोन्ही ऱ्हस्वांची प्राप्ति येते.

१८. खट्व शब्दांतील ऱ्हस्व अकाराचा पुढील टाप् प्रत्ययाबरोबर झालेला जो सवर्णदीर्घ एकादेश तो पूर्वान्तवद्भावानें ऱ्हस्व अकार समजला गेला तर पुढील भिस् प्रत्ययाला ऐस् आदेश ( ७।१।९ ) होऊं लागेल. तसेंच जुहाव येथें ह्वा धातूच्या वकाराला संप्रसारणानें ( ६।१।३३ ) झालेला जो उकार त्याचा पुढील आकाराबरोबर झालेला जो पूर्वरूप एकादेश (६।१।१०८) तो परादिवद्भावानें आकार समजला गेला तर पुढील णल् प्रत्ययाला औकार आदेश ( ७।१।३४ ) होऊं लागेल. तसेंच अस्यै या इदम् शब्दाच्या चतुर्थी-एकवचनामध्यें स्याट् आगमाच्या अकाराचा पुढील प्रत्ययाच्या एकाराबरोबर झालेला जो वृद्धिरूप एकादेश ( ६।१।८८ ) तो परादिवद्भावानें एङ् समजला गेला तर पुढें अश्व शब्दांतील ऱ्हस्व अकाराबरोबर त्याला पूर्वरूप ( ६।१।१०९ ) एकादेश होऊं लागेल.

१९. जर हा तपर-करणाचा सरळ उपयोग संभवला नसता तर तपर-करण व्यर्थ झालें असतें आणि मग त्याच्या सामर्थ्यानें 'अतिदेशानें ऱ्हस्व अकार समजला तरी वस्तुतः असलेल्या दीर्घाची व्यावृत्ति होते ' अशी कल्पना झाली असती.

णलः [ ७. १. ३४ ] इत्यौत्वं प्राप्नोति ॥ अस्या अश्व इति । एङः पदान्तादति [ ६. १. १०९ ] इति पूर्वत्वं प्राप्नोति ॥

न वाताद्रूप्यातिदेशात् ॥ २६ ॥

न वा वक्तव्यम् । किं कारणम् । अताद्रूप्यातिदेशात् । नेह ताद्रूप्यमतिदिश्यते । रूपाश्रया वा एते विधयो ऽताद्रूप्यान्न भविष्यन्ति ॥

षत्वतुकोरसिद्धः ॥ ६ । १ । ८६ ॥

किमर्थमिदमुच्यते ।

षत्वतुकोरसिद्धवचनमादेशलक्षणप्रतिषेधार्थमुत्सर्गलक्षणभावार्थं च ॥ १ ॥

षत्वतुकोरसिद्धत्वमुच्यत आदेशलक्षणप्रतिषेधार्थमुत्सर्गलक्षणभावार्थं च । आदेशलक्षणप्रतिषेधार्थं तावत् । कोऽसिञ्चत् । योऽसिञ्चत् । एकादेशे कृत इण इति षत्वं प्राप्नोति । असिद्धत्वान्न भवति । उत्सर्गलक्षणभावार्थं च । अधीत्य प्रेत्य । एकादेशे कृते ह्रस्वस्येति तुग्न प्राप्नोति । असिद्धत्वाद्भवति ॥ अस्ति प्रयोजनमेतत् । किं तर्हीति ।

तत्रोत्सर्गलक्षणाप्रसिद्धिरुत्सर्गाभावात् ॥ २ ॥

तत्रोत्सर्गलक्षणस्य कार्यस्याप्रसिद्धिः । अधीत्य प्रेत्येति । किं कारणम् । उत्सर्गा-

---

तसेंच जुहाव येथें 'आत औ णलः' यानें णलाला औत्व प्राप्त होत आहे. तसेंच 'अस्या अश्वः' येथें 'अस्यै–अश्वः' या स्थितींत 'एङः पदान्तादति' याने पररूप प्राप्त होत आहे.

( वा. २६ ) वर्णाश्रय विधि कर्तव्य असतांना अन्तादिवद्भावाचा प्रतिषेध सांगावयास नको.

काय कारण ?

कारण असें कीं अन्तादिवद्भावाने वर्णाच्या रूपाचा अतिदेश केला जात नाहीं, आणि ऐस्, औत्व वगैरे विधी तर वर्णाच्या त्या त्या रूपावर अवलंबून होणारे आहेत. म्हणून येथें ते होत नाहींत.

( सू. ८६ ) असिद्ध वचन करण्याचें काय बरें प्रयोजन ?

( वा. १ ) षत्व किंवा तुक् कर्तव्य असतांना एकादेशाला जें असिद्धत्व सांगितलें आहे तें आदेशामुळें प्राप्त होणाऱ्या कार्याची निवृत्ति व्हावी व स्थानीमुळें प्राप्त होणाऱ्या कार्याची प्रवृत्ति व्हावी म्हणून सांगितलें आहे. आदेशामुळें प्राप्त होणाऱ्या कार्याच्या निवृत्तीचें उदाहरण–कोऽसिञ्चत्[2], योऽसिञ्चत् वगैरे. येथें पूर्वरूप एकादेश ओकार ( ६।१।१०९ ) केल्यानंतर ओ ह्या इणाहून पर आदेश सकार पडत असल्यामुळें सकाराला षत्व ( ८।३।५९ ) प्राप्त होत आहे पण एकादेश असिद्ध असल्यामुळे षत्व होत नाहीं. तसेंच स्थानीमुळें प्राप्त होणाऱ्या कार्याच्या प्रवृत्तीचें उदाहरण–अधीत्य प्रेत्य. येथें एकादेशानें ऱ्हस्वाचा नाश झाल्यामुळें 'ह्रस्वस्य पिति०' (६।१।७१) हा तुक् आगम प्राप्त होत नाहीं. पण एकादेश असिद्ध मानिला गेल्यामुळे तुक् आगम होतो.

हें प्रयोजन आहे. पण—

( वा. २ ) अधीत्य प्रेत्य इत्यादि स्थलीं स्थानिप्रयुक्त कार्याची सिद्धि होत नाहीं.

---

१. ( सू. ८६ ) षत्व किंवा तुक् आगम कर्तव्य असतांना एकादेश–शास्त्र असिद्ध समजावें. उदा०–कोऽसिचत्, अधीत्य.

२. कः असिचत्, कः अस्य अशी पदें आहेत. षिच् धातूच्या षकाराला सकार झाल्यामुळें तो आदेशरूप आहे आणि अस्य येथें स्य हा प्रत्ययाचा अवयव आहे. पूर्वरूप एकादेश असिद्ध झाल्यामुळें सकाराच्या मागें अकार आहे असें वाटत असल्यामुळें मागें इण् नाहीं म्हणून षत्व होत नाही. कोऽसिचत्, कोऽस्य हा पाठ घेऊन ही टीप लिहिली आहे.

भावात् । ह्रस्वस्येत्युच्यते न चात्र ह्रस्वं पश्यामः ॥ ननु चासिद्धवचनात्सिद्धम् ।

**असिद्धवचनात्सिद्धमिति चेन्नान्यस्यासिद्धवचनादन्यस्य भावः ॥ ३ ॥**

असिद्धवचनात्सिद्धमिति चेत्तन्न । किं कारणम् । नान्यस्यासिद्धवचनादन्यस्य भावः । न ह्यन्यस्यासिद्धवचनादन्यस्य प्रादुर्भावो भवति । न हि देवदत्तस्य हन्तरि हते देवदत्तस्य प्रादुर्भावो भवति ॥

**तस्मात्स्थानिवद्वचनमसिद्धत्वं च ॥४॥**

तस्मात्स्थानिवद्भावो वक्तव्यो ऽसिद्धत्वं च । अधीत्य प्रेत्येति स्थानिवद्भावः । कोऽसिच्चत् योऽसिच्चदित्यत्रासिद्धत्वम् ॥

**स्थानिवद्वचनानर्थक्यं शास्त्रासिद्धत्वात् ॥ ५ ॥**

स्थानिवद्वचनमनर्थकम् । किं कारणम् । शास्त्रासिद्धत्वात् । नानेन कार्यासिद्धत्वं क्रियते । किं तर्हि । शास्त्रासिद्धत्वमनेन क्रियते । एकादेशशास्त्रं तुक्शास्त्रेऽसिद्धं भवतीति ॥

संप्रसारणङीट्सु सिद्धः । संप्रसारणङीट्सु सिद्ध एकादेश इति वक्तव्यम् । शक-

---

काय कारण ?

कारण असें कीं ऱ्हस्वाला तुक् सांगितला आहे. आणि येथें तर एकादेश झाल्यानंतर ऱ्हस्व दृष्टीस पडत नाहीं.

बरें, पण येथें एकादेश जो दीर्घ तो असिद्ध असल्यामुळें इष्ट रूप सिद्ध होईल ना ?

( वा. ३ ) एकादेश असिद्ध असल्यामुळें ऱ्हस्व सिद्ध आहे पण त्यामुळें इष्ट रूप सिद्ध होईल असें म्हणतां येणार नाहीं. कारण, एकाला असिद्धत्व सांगितल्यामुळ दुसऱ्याचा प्रादुर्भाव होत नाहीं. देवदत्ताला मारणारा (वाघ) मारला म्हणून तेवढ्यानें कांहीं देवदत्त जिवंत होत नाहीं.

( वा. ४ ) म्हणून स्थानिवद्भाव आणि असिद्धत्व हे दोन्ही प्रकारचे अतिदेश येथें सांगितले पाहिजेत. अधीत्य व प्रेत्य येथें दीर्घाला ऱ्हस्व समजण्याकरितां स्थानिवद्भाव पाहिजे आणि कोऽसिच्चत् व योऽसिच्चत् येथे असिद्धत्व पाहिजे.

(वा० ५) स्थानिवद्भाव सांगावयास नको.

काय कारण ?

कारण असें कीं या प्रकृतशास्त्रानें एकादेशरूप कार्याला असिद्धत्व सांगितलें नाहीं; तर एकादेश सांगणारें शास्त्रच तुक् शास्त्राच्या दृष्टीनें असिद्ध होतें असें शास्त्रासिद्धत्व सांगितले आहे.

संप्रसारण, सप्तमी एकवचन ङिप्रत्यय, आणि आत्मनेपद उत्तम पुरुष एकवचन इट् प्रत्यय यांचे स्थानीं झालेला एकादेश सिद्धच समजला पाहिजे. संप्रसारणाचें उदाहरण--शकहूषु, परिवीषु.

---

३. तेव्हां अर्थात् येथें एकादेश झालाच नाहीं अशी समजूत असल्यामुळें येथें ऱ्हस्व आहे असें वाटणें साहजिकच आहे.

४. शकहूषु येथे शक शब्द पूर्वी असलेल्या ह्वा धातूहून क्विप् प्रत्यय, धातूमधील वकाराला संप्रसारण (६।१।१५), पूर्वरूप एकादेश (६।१।१०८), दीर्घ (६।३।१३९), पुढें सप्तमी बहुवचन सुप्रत्यय व षत्व अशीं कार्यें झालीं आहेत. परिवीषु येथें परि उपसर्ग पूर्वी असलेला व्या धातु आहे. येथें संप्रसारणाच्या या सूत्रानें झालेला पूर्वरूप हा एकादेश असिद्ध झाला तर अकारानें व्यवधान होत असल्यामुळे षत्व होणार नाहीं. वृक्ष शब्दाहून सप्तमी एकवचन ङि प्रत्यय आणि गुण-एकादेश हीं कार्यें झालीं आहेत. येथे दीर्घ एकाराला विकल्पानें तुक् आगम ( ६।१।७६ ) होतो. गुण-एकादेश असिद्ध झाला तर तुक् आगम ( ६।१।७३ ) नित्य होईल. पच् धातूहून लङ् उत्तम पुरुष एकवचन इट् प्रत्यय, अट् आगम, शप् व गुण-एकादेश होऊन 'अपचे' असें क्रियापद होतें. येथेंही गुण असिद्ध समजला तर नित्य तुक् आगम होईल.

हूषु परिवीषु । संप्रसारण । ङि । वृक्षे च्छत्रम् वृक्षे छत्रम् । ङि । इट् । अपचे च्छत्रम् अपचे छत्रम् ॥

**संप्रसारणङीट्सु सिद्धः पदान्तपदाद्योरेकादेशस्यासिद्धवचनात् ॥ ६ ॥**

संप्रसारणङीट्सु सिद्ध एकादेशः । कुतः । पदान्तपदाद्योरेकादेशस्यासिद्धवचनात् । पदान्तपदाद्योरेकादेशोऽसिद्धो भवतीत्युच्यते न चैष पदान्तपदाद्योरेकादेशः ॥ यदि पदान्तपदाद्योरेकादेशोऽसिद्धः सुसस्या ओषधीस्कृधि सुपिप्पला ओषधीस्कृधि अत्र षत्वं प्राप्नोति । तुग्विधिं प्रति पदान्तपदाद्योरेकादेशोऽसिद्धः षत्वं प्रत्येकादेशमात्रमसिद्धं भवति ॥ यदि षत्वं प्रत्येकादेशमात्रमसिद्धं शकहूषु परिवीषु अत्र षत्वं न प्राप्नोति । अस्तु तर्ह्यविशेषेण । कथं सुसस्या ओषधीस्कृधि सुपिप्पला ओषधीस्कृधीति । नैष दोषः । भ्रातुष्पुत्रग्रहणं ज्ञापकमेकादेशनिमित्तात्षत्वप्रतिषेधस्य । यदयं कस्कादिषु भ्रातुष्पुत्रग्रहणं करोति

---

ङि प्रत्ययाचें उदाहरण—वृक्षे छत्रम् वृक्षे च्छत्रम्. इट् प्रत्ययाचें उदाहरण—अपचे छत्रम् अपचे च्छत्रम्.

( वा. ६ ) संप्रसारण, ङिप्रत्यय, आणि इट् प्रत्यय, यांचे स्थानीं झालेला एकादेश हा सिद्ध आहेच !

काय कारण ?

कारण असें कीं—पदाचा अन्त्यवर्ण आणि पदाचा आदिवर्ण या दोन वर्णांचे स्थानीं झालेलाच एकादेश हा प्रकृत सूत्रानें असिद्ध होतो. आणि शकहूषु वगैरे उदाहरणातील एकादेश हा पदाचा अन्त्यवर्ण आणि पदाचा आदिवर्ण अशा दोन वर्णांचे स्थानीं झालेला नाहीं.

पण जर पदाचा अन्त्यवर्ण आणि पदाचा आदिवर्ण अशाच दोन वर्णांना झालेला एकादेश प्रकृत सूत्रानें असिद्ध असेल तर ' सुसस्या ओषधीस्कृधि[५], सुपिप्पला ओषधीस्कृधि येथें षत्व होऊं लागेल.

हा दोष येत नाहीं. कारण, पदाचा अंत्य आणि पदाचा आदि अशाच दोन वर्णांचा एकादेश असला पाहिजे ही अट फक्त तुक् विधीपुरतीच आहे. षत्व कर्तव्य असतांना कसलाही एकादेश असला तरी तो असिद्ध होतो.

पण जर षत्व कर्तव्य असतांना कसलाही एकादेश असिद्ध होत असेल तर शकहूषु परिवीषु येथें षत्व होणार नाहीं हा दोष येतो.

तर मग पदाचा अंत्य आणि पदाचा आदि अशाच वर्णांचा एकादेश असला पाहिजे ही अट षत्व आणि तुक् या दोघांविषयीं सारखीच समजावी.

पण तशी समजली तर ' सुसस्या ओषधीस्कृधि ' ' सुपिप्पला ओषधीस्कृधि ' येथें कसें ?

हा दोष येत नाहीं. कारण एकादेशानें झालेला जो वर्ण त्याच्या पुढील वर्णाला षत्व होत नाहीं अशाविषयीं भ्रातुष्पुत्र–ग्रहण ज्ञापक आहे. म्हणजे कस्कादिगणामध्यें षत्व होण्याकरितां जो भ्रातुष्पुत्र शब्दाचा पाठ केला आहे तेथें ' इदुदुपधस्य०' यानेंच षत्व सिद्ध होत असल्यामुळें तो व्यर्थ होत आहे म्हणून वरील गोष्ट ज्ञापित होते.

---

५. ओषधीः हें ओषधि शब्दाचें द्वितीयेचें बहुवचन आहे. ओषधि शब्दाचा इकार व शस् प्रत्ययाचा अकार या दोन वर्णांचे स्थानीं झालेला पूर्वसवर्णदीर्घ ( ६।१।१०२ ) एकादेश प्रकृत सूत्रानें असिद्ध असल्यामुळें ' इणः षः ' ( ८।३।३९ ) यानें षत्व होत नाहीं. तर विसर्गाला येथें सत्वच ( ८।३।५० ) होतें. येथें पदाचा अन्त आणि पदाचा आदि अशा दोन वर्णांचे स्थानी एकादेश झाला नसल्यामुळें जर प्रकृत सूत्र आलें नाहीं तर षत्व होऊं लागेल.

तज्ज्ञापयत्याचार्यो नैकादेशनिमित्तात्षत्वं भवतीति । यद्येतज्ज्ञाप्यते शकहूषु परिवीष्विवत्यत्र षत्वं न प्राप्नोति । तुल्यजातीयस्य ज्ञापकम् । किं च तुल्यजातीयम् । यः कुप्वोः ॥ यद्येवं वेञोऽप्रत्यये परत उरिति प्राप्नोति । उदिति चेष्यते । यथालक्षणमप्रयुक्ते । अथवा नैवं विज्ञायते पूर्वस्य च पदादेः परस्य च पदान्तस्येति । कथं तर्हि । परस्य च पदादेः पूर्वस्य च पदान्तस्येति ॥

**आद् गुणः ॥ ६ । १ । ८७ ॥**

गुणग्रहणं किमर्थं नादेको भवतीत्येवोच्येत ।

**आदेकश्चेद् गुणः केन**

आदेकश्चेद् गुणः केनेदानीं भविष्यति ।

---

पण जर हें ज्ञापन केलें तर शकहूषु परिवीषु इत्यादि स्थलीं षत्व प्राप्त होत नाहीं.

हा दोष येत नाहीं. कारण भ्रातुष्पुत्र शब्दावरून ज्ञापित केलेला अर्थ भ्रातुष्पुत्र शब्दासारख्या ठिकाणींच घ्यावयाचा आहे.

तें सारखें ठिकाण कसें बरें ओळखावें ?

कवर्ग किंवा पवर्ग यांतील व्यंजन पुढें असेल तर भ्रातुष्पुत्र शब्दासारखें तें ठिकाण आहे असें ओळखावें.[६]

असें आहे तर वेञ् धातूहून क्विप् प्रत्यय करून पुढें प्रथमेच्या एकवचनाचा सु प्रत्यय केला असतां उँः असें रूप प्राप्त होतें. आणि उत् असें तर इष्ट आहे.

ज्या शब्दांचा प्रयोग पूर्वी कोठें केलेला दृष्टीस पडत नसेल अशा ठिकाणीं शास्त्राला धरून जसें रूप बनेल तसें बनवावें. अथवा ज्या दोन वर्णांचा एकादेश झाला असेल त्यांपैकीं पहिला वर्ण पदाचा आदि आणि पुढील वर्ण पदाचा अन्त्य असे पदाचा अन्त्य आणि पदाचा आदि वर्ण उपयोगीचे नाहींत. तर मग पदाचा अन्त्य आणि पदाचा आदि कसे पाहिजेत ?

ज्या दोन वर्णांचा एकादेश झाला असेल त्यांपैकीं पहिला वर्ण पदाचा अन्त्य पाहिजे आणि पुढील वर्ण पदाचा आदि पाहिजे.

(सू. ८७) येथें गुणः असें कशाकरिता म्हटलें आहे ? तें म्हणावयास नको. अवर्णाहून अच् पुढें असतांना पूर्व व पर यांचे स्थानीं एक आदेश होतो एवढेंच म्हणावें.

( श्लोक १ ) अवर्णाहून अच् पुढें असतांना

---

६. तेव्हां शकहूषु येथें कवर्ग किंवा पवर्ग यांतील व्यंजन नसल्यामुळे 'एकादेशानें झालेल्या वर्णाच्या पुढील वर्णाला षत्व होत नाहीं' हा ज्ञापित निषेध येत नाहीं.

७. वेञ् धातूला आत्व ( ६।१।४५), क्विप् प्रत्यय, वकाराला संप्रसारणानें उकार, त्या उकाराचा पुढील आकाराबरोबर पूर्वरूप एकादेश व तुक आगम ( ६।१।७१ ) अशीं कार्यें होऊन उत् असें प्रथमेच्या एकवचनाचें रूप होतें. येथें जर तुक् आगमाच्या दृष्टीनें पूर्वरूप एकादेश असिद्ध झाला तर आकारानें व्यवधान येत असल्यामुळें तुक् आगम होणार नाहीं आणि पुढील सुप्रत्ययाला रुत्व व विसर्ग होऊन उः असें रूप होईल. येथें एकादेश हा पदाचा अन्त आणि पदाचा आदि अशाच दोन वर्णांचा झालेला आहे. उकार हा पदाचा आदि आहे आणि आकार हा पदाचा अन्त आहे. सु प्रत्यय पुढें असतांना मागील शब्दाला पद संज्ञा (१।४।१७ पृ. ३१९ ) होत असल्यामुळें 'उ आ' एवढेंच येथें पद आहे.

८. तेव्हां येथें उः असेंच रूप होतें असें समजावें.

९. असे समजलें असतां उत् हेंही रूप साधेल.

१. ( सू. ८७ ) अवर्णाहून अच् पुढें असतांना पूर्व व पर यांचे स्थानीं गुण एकादेश होतो. उदा०— उपेन्द्रः गङ्गोदकम्.

खट्वेन्द्रः मालेन्द्रः । खट्वोदकम् मालोदकम् ॥

**स्थानेऽन्तरतमो हि सः ।**

स्थाने प्राप्यमाणानामन्तरतम आदेशो भवति ॥ ऐदौतावपि तर्हि प्राप्नुतः ।

**ऐदौतौ नैचि तावुक्तौ**

ऐदौतौ न भविष्यतः । किं कारणम् । एचि ह्यैदौतावुच्येते ॥ इह तर्हि खट्वऋश्यः मालऋश्यः ऋकारस्तर्हि प्राप्नोति ।

**ऋकारो नोभयान्तरः ॥ १ ॥**

उभयोर्योऽन्तरतमस्तेन भवितव्यं न च ऋकार उभयोरन्तरतमः ॥ आकारस्तर्हि प्राप्नोति ।

**आकारो नर्ति धातौ सः**

आकारो न भविष्यति । किं कारणम् । ऋति धातावाकार उच्यते तन्नियमार्थं भविष्यति । ऋकारादौ धातावेव नान्यत्रेति ॥ प्लुतस्तर्हि प्राप्नोति ।

**प्लुतश्च विषये स्मृतः ।**

विषये प्लुत उच्यते यदा च स विषयो भवितव्यमेव तदा प्लुतेन ॥

**आन्तर्यात्त्रिचतुर्मात्राः**

---

पूर्व व पर यांचे स्थानीं एक होतो असें म्हटलें तर खट्वेन्द्रः, मालेन्द्रः, खट्वोदकम्, मालोदकम् येथें गुण कसा बरें होईल ?

पूर्व व पर यांचे स्थानीं एक आदेश होतो असें म्हटलें असतां स्थानीसारखा जो असेल तोच होईल[2].

पण तसें झाल्यास ऐकार, व औकारही तेथें प्राप्त होऊं लागतील.

ऐकार व औकार होणार नाहींत.

काय कारण ?

कारण असें कीं अवर्णाहून एच् पुढें असतांना वृद्धि होते अशा रीतीनें ते पुढील सूत्रानें सांगितले आहेत[3].

तर मग खट्वऋश्यः व मालऋश्यः येथें ऋकार एकादेश प्राप्त होत आहे.

पूर्व आणि पर या दोघांना जो अन्तरतम तो एक–आदेश व्हावयाचा आहे आणि ऋकार हा तर दोघांनाही अन्तरतम असा नाहीं म्हणून तो होणार नाहीं.

तर मग आकार प्राप्त होत आहे.

( श्लोक २ ) आकारही होणार नाहीं.

काय कारण ?

कारण असें कीं ऋकारादि धातु पुढें असतांना आकाराचें विधान केलें आहे (६।१।९१) तें नियमार्थ होईल. तो नियम असा–अवर्णाहून ऋकार पुढें असतांना जर आकार होईल तर ऋकारादि धातु पुढें असतांनाच होईल.

तर मग एकादेश प्लुत होईल त्याची वाट काय ?

प्लुत होण्याची निमित्तें कोणतीं तीं दूर अंतरावरून हाक मारणें (८।२।८४) वगैरे सूत्रकारांनीं सांगितलींच आहेत. आणि प्रकृत सूत्राच्या उदाहरणांमध्यें जर त्या निमित्तांपैकीं एखादें निमित्त असलें तर तेथें प्लुत होईलच.

---

२. अकाराचें कण्ठ स्थान आणि इकाराचें तालु स्थान आहे. तेव्हां अर्थातच त्याचे स्थानीं कण्ठ व तालु या स्थानांचा एकार होईल. उकाराचें ओष्ठ स्थान आहे म्हणून अकार आणि उकार या दोघांचे स्थानीं कण्ठोष्ठ स्थानाचा ओकार होईल. ( १।१।५० ).

३. तेव्हां एच् पुढें असतांनाच ते आदेश होतात असा पुढील सूत्रानें नियम होईल. शिवाय एच् पुढें असतांना तेच होतात असाही नियम होईल. म्हणून खट्वा: इन्द्रः येथें ऐकार होत नाहीं आणि खट्वा एडका येथें एकार होत नाहीं.

इदं तर्हि प्रयोजनमान्तर्यतस्त्रिमात्रचतुर्मात्राणां स्थानिनां त्रिमात्रचतुर्मात्रा आदेशा मा भूवन्निति । खट्वा इन्द्रः खट्वेन्द्रः । खट्वा उदकं खट्वोदकम् । खट्वा ईषा खट्वेषा । खट्वा ऊढा खट्वोढा । खट्वा एलका खट्वैलका । खट्वा ओदनः खट्वौदनः । खट्वा ऐतिकायनः खट्वैतिकायनः । खट्वा औपगवः खट्वौपगवः ॥ अथ क्रियमाणेऽपि गुणग्रहणे कस्मादेवात्र त्रिमात्रचतुर्मात्राणां स्थानिनां त्रिमात्रचतुर्मात्रा आदेशा न भवन्ति ।

**तपरत्वान्न ते स्मृताः ॥ २ ॥**

तपरे गुणवृद्धी । ननु च तः परो यस्मात्सोऽयं तपरः । नेत्याह । तादपि परस्तपरः । यदि तादपि परस्तपर ऋदोरप् [ ३. ३. ५७ ] इहैव स्यात् यवः स्तवः । लवः पव इत्यत्र न स्यात् । नैष तकारः । कस्तर्हि । दकारः । किं दकारे प्रयोजनम् । अथ किं तकारे । असंदेहार्थस्तकारः । यद्यसंदेहार्थस्तकारो दकारोऽपि । अथ मुखसुखार्थस्त-

---

तर गुणग्रहणाचें हें प्रयोजन समजावें कीं दोन स्थानी मिळून तीन मात्रा होतील तर तीन मात्रांचा आदेश होऊं लागेल तसेंच जर चार मात्रा होतील तर चार मात्रांचा आदेश होऊं लागेल तो तसा होऊं नये. उदा०– खट्वा–इन्द्रः, खट्वा–उदकम्. खट्वा–ईषा, खट्वा–ऊढा, खट्वा–एलका, खट्वा–ओदनः, खट्वा–ऐतिकायनः खट्वा-औपगवः.

आतां गुणग्रहण केलें तरी येथें त्रिमात्र किंवा चतुर्मात्र स्थानींचे ठिकाणीं कां बरें त्रिमात्र किंवा चतुर्मात्र आदेश होत नाहींत ?

गुण व वृद्धि संज्ञा सांगणाऱ्या सूत्रांमध्यें अदेङ् (१।१।२) आदच् (१।१।१) असें तपरकरण केलें असल्यामुळें (१।१।७०) त्रिमात्र किंवा चतुर्मात्र अशा एकार वगैरेंना गुण व वृद्धि या संज्ञा होत नाहींत म्हणून त्रिमात्र किंवा चतुर्मात्र आदेश होत नाहींत.

पण 'तपर' येथें 'तः परो यस्मात्' असा पंचमी बहुव्रीहि असल्यामुळें अदेङ् व आदैच् येथें तपर–करणाचा उपयोग अकार व आकार यांच्याकडे होईल. एङ् व ऐच् यांच्याकडे होणार नाहीं.

असें नाहीं. तर तादपि परस्तपरः असा पंचमी–तत्पुरुषही आहे.

जर 'तपरः' येथें पंचमी–तत्पुरुष स्वीकारला तर 'ऋदोरप्' ( ३।३।५७ ) हा अप् प्रत्यय यवः व स्तवः येथें यु व स्तु या ऱ्हस्व उकारान्त धातूंहूनच होईल; आणि लवः व पवः येथें लू व पू या दीर्घ ऊकारान्त धातूंहून होणार नाहीं.

ऋदोरप् येथें तकाराचा जश्त्वानें झालेला दकार आहे असें समजूं नये; तर मूळचाच दकार आहे.

पण मध्यें दकार घालण्याचें काय बरें प्रयोजन ?

तकार घालण्याचें तरी काय बरें प्रयोजन ?

असंदेहार्थ तकार घातला आहे.

आतां जर तकार हा असंदेहार्थ ( संशय न यावा याकरितां ) आहे असें म्हणणें असेल तर त्याच कारणाकरितां दकारही आहे, असें म्हणतां येईल. आतां जर सुखानें उच्चारण व्हावें असें म्हणणें असेल तर दकारालाही त्याकरि–

---

४. मध्यें तकार घातला नाहीं तर ऋ आणि उ यांचा संधि होऊन मूळचा कोणता वर्ण उच्चारलेला आहे याविषयीं संशय उत्पन्न होईल तो न व्हावा याकरितां मध्यें तकार घातला आहे.

५. मध्यें व्यंजन नसलेल्या दोन स्वरांचा उच्चार करण्यांत स्पष्ट उच्चार होण्याकरितां जो थोडासा प्रयत्न करण्यांत येतो तो न करतां सहज स्पष्ट उच्चार होणें.

कारो दकारोऽपि ॥

**गुणे ङिशीटामुपसंख्यानं दीर्घत्वबाधनार्थम् ॥ १ ॥**

गुणे ङिशीटामुपसंख्यानं कर्तव्यम् । ङि । वृक्ष इन्द्रः प्लक्ष इन्द्रः । शी । य इन्द्रम् त इन्द्रम् । इट् । अपच इन्द्रम् अयज इन्द्रम् । किं प्रयोजनम् । दीर्घत्वबाधनार्थम् । सवर्णदीर्घत्वं मा भूदिति ॥

**न वा बहिरङ्गलक्षणत्वात् ॥ २ ॥**

न वा कर्तव्यम् । किं कारणम् । बहिरङ्गलक्षणत्वात् । बहिरङ्गलक्षणं सवर्णदीर्घत्वम् । अन्तरङ्गो गुणः । असिद्धं बहिरङ्गमन्तरङ्गे ॥

**आदेकश्चेद्गुणः केन स्थानेऽन्तरतमो हि सः ।**
**ऐदौतौ नैचि तावुक्तावृकारो नोभयान्तरः ॥ १ ॥**
**आकारो नर्ति धातौ स प्लुतश्च विषये स्मृतः ।**
**आन्तर्यात्त्रिचतुर्मात्रास्तपरत्वान्न ते स्मृताः ॥ २ ॥**

**[ वृद्धिरेचि ॥ ६ । १ । ८८ ॥ ]**[1]

**एत्येधत्यूठ्सु ॥ ६ । १ । ८९ ॥**[1]

किमिदमेत्येधत्यो रूपग्रहणमाहोस्विद्धातुग्रहणम् । किं चातः । यदि रूपग्रहणं सिद्धमुपैति प्रैति उपैषि प्रैषि उपैमि प्रैमीति न

---

तांच उच्चारला आहे असें समजावें.

( वा. १ ) अवर्णाहून ङि, शी, आणि इट् हे प्रत्यय पुढे असतांना पूर्व व पर याचे स्थानीं गुण एकादेश होतो असें मुद्दाम निराळें वचन करावें. जसें--वृक्ष[6] इन्द्रः, प्लक्ष इन्द्रः, य इन्द्रम्, त इन्द्रम्, अपच इन्द्रम्, अयज इन्द्रम्.

पण आद् गुणः या सूत्रानेच सिद्धि होत असतांना निराळें गुणविधान करण्याचें काय बरें प्रयोजन ?

दीर्घत्वबाधनार्थम् म्हणजे वृक्ष इ इन्द्रः असें असतां दोन इकारांचा सवर्णदीर्घ प्राप्त होतो त्याचा बाध व्हावा याकरितां पुनः गुणविधान केलें पाहिजे.

( वा. २ ) पुन्हां गुणाचें विधान करावयास नको.

काय कारण ?

कारण असें कीं पुढील दुसऱ्या पदामुळें प्राप्त होणारा सवर्णदीर्घ हा बहिरंग आहे. व गुण दुसऱ्या पदाची जरूर नसल्यामुळें अंतरंग आहे. तेव्हां अंतरंग गुण कर्तव्य असतांना बहिरंग दीर्घ असिद्ध असल्यामुळें येथें गुणच होईल.

( सू. ८९ ) येथें एति अशा स्वरूपाचें क्रियापद घ्यावयाचें किंवा एति या पदानें इण् धातूच घ्यावयाचा ?

या दोहोंमध्यें काय बरें फरक होतो ?

जर एति अशा स्वरूपाचें क्रियापद घेतलें तर उपैति प्रैति येथे वृद्धि सिद्ध होते, पण उपैमि प्रैमि येथें वृद्धि साधत नाहीं.

---

६. वृक्ष व प्लक्ष या शब्दांहून सप्तमी एकवचन ङि प्रत्यय व पुढें इन्द्र शब्द जोडला आहे. तसेंच 'ये' व 'ते' येथें यद् व तद् शब्दांच्या पुढील जस् प्रत्ययाला शी आदेश ( ७।१।१७ ) झाला आहे. तसेंच अपचे आणि अयजे येथें पच् व यज् धातूंहून लङ्, उत्तमपुरुष एकवचन इट् , मध्यें शप् व अट् आगम झाला आहे.

१ ( सू. ८८ ) अवर्णाहून एच् पुढें असतांना पूर्वपरांचे स्थानीं वृद्धि एकादेश होतो. उदा०— खट्वैडका, गङ्गौघः.

१ ( सू. ८९ ) अवर्णाहून एच् आरंभी असलेले इण् व एध् धातु पुढें असतांना किंवा ऊठ् पुढें असतांना पूर्व व पर यांचे स्थानीं वृद्धिरूप एकादेश होतो. उदा०— उपैति, उपैधते. पररूपाचा (६।१।९४ ) बाध करून वृद्धि होण्याकरितां येथें मुद्दाम वृद्धि सांगितली आहे. ऊठाचें उदाहरण प्रष्ठौहः.

सिध्यति । अथ धातुग्रहणं सिद्धमेतद्भवति ॥ किं तर्हीति ।

**इणीकारादौ वृद्धिप्रतिषेधः ॥ १ ॥**

इणीकारादौ वृद्धेः प्रतिषेधो वक्तव्यः । उपेतः प्रेत इति ॥

**योगविभागात्सिद्धम् ॥ २ ॥**

योगविभागः करिष्यते । वृद्धिरेचि[८८]। तत एत्येधत्योः । एत्येधत्योश्चैचि वृद्धिर्भवति । तत ऊठि । ऊठि च वृद्धिर्भवतीति ॥ एवमपि आ इत एतः उपेतः प्रेत इत्यत्रापि प्राप्नोति । आङि पररूपमत्र बाधकं भविष्यति । नाप्राप्ते पररूप इयं वृद्धिरारभ्यते सा यथैङि पररूपं बाधत एवमाङि पररूपं बाधेत । न बाधते । किं कारणम् । येन नाप्राप्ते तस्य बाधनं भवति न चाप्राप्त एङि पररूप इयं वृद्धिरारभ्यत आङि पररूपे पुनः प्राप्ते चाप्राप्ते च । अथवा पुरस्तादपवादा अनन्तरान्विधीन्बाधन्त इतीयं वृद्धिरेङि पररूपं बाधिष्यते नाङि पररूपम् ॥

**अक्षादूहिन्याम् ॥ ३ ॥**

अक्षादूहिन्यां वृद्धिर्वक्तव्या । अक्षौहिणी॥

**प्रादूहोढोढ्येषैष्येषु ॥ ४ ॥**

---

आतां एति पदानें इण् धातूचें ग्रहण समजलें तर उपैमि प्रैमि वगैरे रूपें साधतात, पण —

(वा. १) इकारादि इण् धातूचें रूप पुढें असतांना वृद्धीचा प्रतिषेध सांगितला पाहिजे. उदा० उपेतः प्रेतः.

(वा. २) योगविभागानें हें सिद्ध होतें. तो योगविभाग असा—वृद्धिरेचि, याच्या पुढें 'एत्येधत्योः' एवढेंच सूत्र समजावें. येथें एचि हें अनुवृत्त आहे. तेव्हां एजादि इण् धातु व एध् धातु पुढें असतांना वृद्धि होते असा अर्थ होईल. त्याच्या पुढें 'ऊठि' हें सूत्र समजावें. अवर्णाहून ऊठ् पुढें असतांनाही वृद्धि होते असा त्याचा अर्थ होईल.

असें केलें तरीहि उपेतः येथें वृद्धि प्राप्त होते. येथें आङ् उपसर्गपूर्वक इण् धातूचें आ-इतः एतः असें रूप होतें. व त्याचे मागें जर उप अथवा प्र शब्द जोडला तर येथें वृद्धि प्राप्त होते.

येथें 'ओमाङोश्च' (६।१।९५) हें पररूप वृद्धीचा बाध करील.

बाध करणार नाहीं. कारण पररूप नाप्राप्त असतांना म्हणजे सर्व ठिकाणीं प्राप्त होत असतांना 'एत्येधत्यू०' ही वृद्धि ज्याअर्थी आरंभिली आहे त्याअर्थी ही वृद्धि 'एङि पररूपम्' या पररूपाचा जसा बाध करते तसा 'ओमाङोश्च' या पररूपाचा बाध करणार नाहीं.

काय कारण ?

कारण असें कीं— एखाद्या विधीची अवश्य प्राप्ति असतां जर दुसरा एखादा विधि आरंभिला गेला तर तो दुसरा विधि ज्याची अवश्य प्राप्ति असते त्याचाच बाध करतो. 'एङि पर०' हें पररूप नाप्राप्त म्हणजे अवश्य प्राप्त असतांनाही प्रकृत वृद्धि आरंभिली आहे. पण 'ओमाङोश्च' हें पररूप अवश्य प्राप्त नाहीं त्याची कांहीं ठिकाणीं प्राप्ति असते व कांहीं ठिकाणीं प्राप्ति नसते म्हणून 'एङि पर०' याचाच या वृद्धीनें बाध केला जाईल आणि ओमाङोः० याचा बाध केला जाणार नाहीं. अथवा, पूर्वी पठित असलेले अपवाद आपल्या संनिहित असलेल्या विधीचाच बाध करतात, त्यापेक्षां दूर असलेल्या विधींचा बाध करीत नाहींत. या कारणानेंही ही प्रकृत वृद्धि 'एङि पररूपम्' याचाच बाध करील आणि ओमाङोश्च याचा बाध करणार नाहीं.

(वा. ३) अक्ष शब्दाहून ऊहिनी शब्द पुढें असतांना पूर्व व पर अचांचे स्थानीं वृद्धि होते असें वचन करावें. उदा० अक्ष+ऊहिनी अक्षौहिणी.

प्रादूह ऊढ ऊढि एष एष्येत्येतेषु वृद्धिर्वक्तव्या । प्रौहः प्रौढः प्रौढिः प्रैषः प्रैष्यः ॥

**स्वादीरेरिणोः ॥ ५ ॥**

स्वादीर ईरिनित्येतयोर्वृद्धिर्वक्तव्या । स्वैरः स्वैरी । ईरिन्ग्रहणं शक्यमकर्तुम् । कथं स्वैरीति । इनिनैतन्मत्वर्थीयेन सिद्धम् । स्वैरोऽस्यास्तीति स्वैरी ॥

**ऋते च तृतीयासमासे ॥ ६ ॥**

ऋते च तृतीयासमासे वृद्धिर्वक्तव्या । सुखार्तः दुःखार्तः । ऋत इति किम् । सुखेतः दुःखेतः । तृतीयाग्रहणं किम् । परमर्तः । समास इति किम् । सुखेनर्तः ॥

**प्रवत्सतरकम्बलवसनानां चर्णे ॥ ७ ॥**

प्रवत्सतरकम्बलवसनानां चर्णे वृद्धिर्वक्तव्या । प्रार्णम् वत्सतरार्णम् कम्बलार्णम् वसनार्णम् ॥

**ऋणदशाभ्यां च ॥ ८ ॥**

ऋणदशाभ्यां च वृद्धिर्वक्तव्या । ऋणार्णम् दशार्णम् ॥

**आटश्च ॥ ६ । १ । ९० ॥**[1]

किमर्थश्चकारः । वृद्धेरनुकर्षणार्थः । नैतदस्ति प्रयोजनम् । प्रकृता वृद्धिरनुवर्तिष्यते । इदं तर्हि प्रयोजनमाटो ऽचि वृद्धि-

---

( वा. ४ ) प्र शब्दाहून ऊह ऊढ ऊढि एष आणि एष्य हे शब्द पुढें असतांना पूर्व व पर अचांचे स्थानीं वृद्धि होते असे वचन करावें. जसे—प्र+ऊहः प्रौहः. याप्रमाणेंच प्रौढः प्रौढिः प्रैषः प्रैष्यः वगैरे रूपे समजावीं.

( वा. ५ ) स्व शब्दाहून ईर व ईरिन् हे शब्द पुढें असतांना पूर्व आणि पर अचांचे स्थानीं वृद्धि होते असें वचन करावें. उदा०—स्व+ईरः स्वैरः, त्याप्रमाणेंच स्वैरी.

येथें ईरिन् शब्दाचें ग्रहण केलें नाहीं तरी चालेल.

पण तें केलें नाहीं तर स्वैरी हें कसें साधावें ?

स्वैर शब्दाहून मत्वर्थी इनि प्रत्यय करून स्वैर ज्याला आहे तो स्वैरी असें रूप साधेतें.[2]

तृतीया-समासामध्यें ऋत शब्द पुढे असतांना पूर्व आणि पर अचांचे स्थानीं वृद्धि होते असें विधान करावें. जसें—सुखेन ऋतः सुखार्तः, तसेंच दुःखार्तः, ऋत शब्द पुढें असताना असें म्हटल्यामुळें सुखेन इतः सुखेतः येथें वृद्धि होत नाहीं. तृतीया असें म्हटल्यामुळें परमश्चासौ ऋतश्च परमर्तः येथें समास आहे तरी तृतीया समास नसल्यामुळें वृद्धि होत नाहीं.

समासे असें म्हटलें असल्यामुळें सुखेनर्तः येथें वाक्यामध्यें तृतीया आहे तरी समास नसल्यामुळें वृद्धी होत नाहीं.

( वा. ७ ) प्र, वत्सतर, कम्बल आणि वसन यांहून ऋणशब्द पुढें असतांना पूर्व आणि पर अचांचे स्थानीं वृद्धि होते असें वचन करावें. जसें— प्र+ऋणम् प्रार्णम्. तसेंच वत्सतरार्णम्, कम्बलार्णम्. वसनार्णम्.

( वा. ८ ) ऋण व दश यांहूनही ऋण शब्द पुढे असतांना वृद्धि होते असें विधान करावें. जसें—ऋणार्णम्. दशार्णम्.

( सू. ९० ) येथें 'च' शब्द कशाकरितां घातला आहे ?

वृद्धीचें अनुकर्षण करण्याकरितां घातला आहे.

हा उपयोग बरोबर दिसत नाहीं. कारण चालू असलेल्या वृद्धि पदाची येथे अनुवृत्ति सहजच होईल.

तर मग हें प्रयोजन समजावें कीं—आटाहून

---

२. आपली प्रेरणा ज्याला आहे तो म्हणजे स्वच्छन्दी माणूस. येथें ईर शब्द पुढें असल्यामुळेंच वृद्धि होईल. तेव्हां ईरिन् शब्द निराळा उच्चारावयास नको.

१. ( सू. ९० ) आट् आगमाहून अच् पुढें असतांना पूर्व व पर अचांचे स्थानीं वृद्धि होते.

रेव यथा स्याद्यदन्यत्प्राप्नोति तन्मा भूदिति। किं चान्यत्प्राप्नोति। पररूपम्। उस्योमाङ्क्ष्वाटः पररूपप्रतिषेधं चोदयिष्यति स न वक्तव्यो भवति॥

## उपसर्गादृति धातौ॥६।१।९१॥

धाताविति किमर्थम्। इह मा भूत् प्रर्षभं वनम्।

### उपसर्गाद् वृद्धिविधौ धातुग्रहण उक्तम्॥ १॥

किमुक्तम्। गत्युपसर्गसंज्ञाः क्रियायोगे यत्क्रियायुक्ताः प्रादयस्तं प्रतीति वचनमिति॥ क्रियमाणेऽपि धातुग्रहणे प्रर्च्छक इति प्राप्नोति। यत्क्रियायुक्ताः प्रादयस्तं प्रतीति वचनान्न भवति॥ इदं तर्हि प्रयोजनमुपसर्गादृति धातौ वृद्धिरेव यथा स्याद्यदन्यत्प्राप्नोति तन्मा भूदिति। किं चान्यत्प्राप्नोति। ह्रस्वत्वमृत्यकः [ ६. १. १२८ ] इति। ऋति ह्रस्वादुपसर्गाद्वृद्धिः पूर्वविप्रतिषेधेनेति चोदयिष्यति स न

---

अच् पुढे असतांना वृद्धीच व्हावी, आणि तेथें जें दुसरें काहीं कार्य प्राप्त होईल तें न व्हावें.

असे दुसरें कार्य कोणतें बरें तेथें प्राप्त होत आहे?

पररूप प्राप्त होत आहे. त्यामुळें 'उस्योमाङ्क्ष्वाटः प्रतिषेधः' ( ६।१।९५ वा. १ ) म्ह. आटाहून उस् ओम् व आङ् पुढें असतांना पररूपाचा प्रतिषेध सांगावा असा जो पररूपाचा प्रतिषेध करण्यांत येणार आहे तो करावयास नको.

( सू. ९१ ) येथें धातौ असें कशाकरितां म्हटले आहे ?

प्रगता ऋषभा यस्मात् प्रर्षभं वनम् येथें वृद्धि न व्हावी म्हणून म्हटलें आहे.

(वा. १) उपसर्गादृति धातौ या प्रकृत सूत्रामधील धातुग्रहणासंबंधानें मागें सांगितलेंच आहे.

काय सांगितलें आहे ?

" गत्युपसर्गसंज्ञाः क्रियायोगे यत्क्रियायुक्ताः प्रादयस्तं प्रतीति वचनम्" ( १।४।६० वा. ३ ) म्हणजे ज्या धातूच्या क्रियेशीं योग असतांना प्र वगैरेंना गति संज्ञा किंवा उपसर्ग संज्ञा होतात त्या धातूचेच ते गति किंवा उपसर्ग समजले जातात.[2]

शिवाय, येथें धातुग्रहण केले तरीही प्रगता ऋच्छका यस्मात् प्रर्छकः येथें कां बरें वृद्धि होत नाहीं ? याचे उत्तर ज्या धातूच्या क्रियेशी प्र वगैरेंचा योग असतो त्याच धातूचे ते उपसर्ग म्हटले जातात असें वचन आहे हेंच दिलें पाहिजे.[3]

तर मग धातु ग्रहणाचें हें प्रयोजन समजावें कीं– उपसर्गाहून ऋकारादि धातु पुढें असतांना वृद्धीच व्हावी, दुसरें जें कांहीं कार्य प्राप्त होत असेल तें न व्हावें

वृद्धीवाचून दुसरें कोणतें बरें कार्य प्राप्त होत आहे ?

'इकोऽसवर्णे०' ( ६।१।१२७ ) हा ऱ्हस्व आणि प्रकृतिभाव हीं कार्यें प्राप्त होत आहेत. शिवाय, अशा रीतीनें ह्या वृद्धीनें बाधकाचाही बाध होत असल्यामुळें ऋति ह्रस्वादुपसर्गाद् वृद्धि-

---

१. ( सू. ९१ ) अवर्णान्त उपसर्गाहून ऋकारादि धातु पुढें असतांना पूर्व व पर अचांचे स्थानी वृद्धि होते. उदा०-उपार्च्छति.

२. तेव्हां उपसर्ग हा शब्द पुत्र शिष्य वगैरे शब्दांसारखा संबंधिशब्द असल्यामुळें उपसर्गपणा ज्यामुळें येत असेल असाच ऋकारादि शब्द पुढें असतांना वृद्धि होईल म्हणून प्रर्षभं वनम् येथें दोष येत नाही. तेव्हां धातु-ग्रहण नको.

३ तेव्हां अर्थात् त्या वचनानेंच सर्वत्र काम भागेल म्हणुन धातु-ग्रहण नको.

४. धातौ असा योगविभाग करून स्वतंत्र निराळा वाक्यार्थ करून पुन: वृद्धीचें विधान केलें म्हणजे तें उपसर्गादृति या वृद्धीच्या बाधकाचेंही बाधक होईल.

वक्तव्यो भवति ॥

**छे तुकः संबुद्धिगुणः ॥ २ ॥**

छे तुग्भवतीत्यस्मात्संबुद्धिगुणो भवति विप्रतिषेधेन। छे तुग्भवतीत्यस्यावकाशः। इच्छति गच्छति। संबुद्धिगुणस्यावकाशः। अग्ने वायो। इहोभयं प्राप्नोति। अग्ने च्छत्त्रम् अग्ने छत्त्रम्। वायो च्छत्रम् वायो छत्त्रम्। संबुद्धिगुणो भवति विप्रतिषेधेन॥ स तर्हि विप्रतिषेधो वक्तव्यः।

**न वा बहिरङ्गलक्षणत्वात् ॥ ३ ॥**

न वा वक्तव्यः। किं कारणम्। बहिरङ्गलक्षणत्वात्। बहिरङ्गलक्षणस्तुक्। अन्तरङ्गलक्षणः संबुद्धिगुणः। असिद्धं बहिरङ्गमन्तरङ्गे॥ अन्तरेण विप्रतिषेधमन्तरेणापि चैतां परिभाषां सिद्धम्। कथम्। इदमिह संप्रधार्यम्। संबुद्धिलोपः क्रियतां गुण इति किमत्र कर्तव्यम्। परत्वाद् गुणः। नित्यः संबुद्धिलोपः। कृतेऽपि गुणे प्राप्नोत्यकृतेऽपि। गुणोऽपि नित्यः। कृतेऽपि संबुद्धिलोपे प्राप्नोत्यकृतेऽपि। अनित्यो गुणो न हि कृते संबुद्धिलोपे

---

र्विप्रतिषेधेन ' ( ६।१।१२८ वा. ३ ) असें जें वचन वार्तिककार करणार आहेत तें करावयास नको, हा यांत फायदा आहे.

( वा० २ ) छे च ( ६।१।७३ ) या तुगागमापेक्षां ' ह्रस्वस्य गुणः ' ( ७।३।१०८ ) हा गुण विप्रतिषेधानें पूर्वी होतो. तुक् आगमाला इच्छति यच्छति येथें अवकाश आहे. व संबुद्धि–गुणाला अग्ने व वायो येथें अवकाश आहे. आणि अग्ने छत्रम् अग्ने च्छत्रम् , वायो छत्रम् वायो च्छत्रम् ' येथें ' एङ्ह्रस्वात्० ' यानें संबुद्धि–लोप केल्यानंतर दोहोंची प्राप्ति आली असता विप्रतिषेधानें गुण पूर्वी होतो. अर्थात् ' दीर्घात्पदान्ताद्वा ' याने वैकल्पिक तुक् आगम होतो. तेव्हां तें विप्रतिषेध–वचन करणें जरूर आहे.

( वा. ३ ) विप्रतिषेध–वचन करावयास नको.

काय कारण ?

कारण असें कीं दुसऱ्या पदांतील छकाराची जरूर असल्यामुळें तुक् बहिरंग आहे व एकाच पदाची अपेक्षा असल्यामुळें संबुद्धि–गुण अतरंग आहे. तेव्हां संबुद्धि-गुण हें अतरंग कर्तव्य असतांना बहिरंग तुक् असिद्ध असल्यामुळें संबुद्धि-गुणच होईल.

शिवाय विप्रतिषेध–वचनावांचून आणि अंतरंग परिभाषेवांचूनही हें उदाहरण साधत आहे.

तें कसें ?

येथें हा विचार करावा कीं–अग्निस् छत्रम् असें असता येथे प्रथमतः संबुद्धि-लोप करावा ( ६।१।६९ ), किंवा गुण करावा ?

मग यांत पूर्वी काय बरें करावें ?

पर असल्यामुळे गुण करावा[५].

पण संबुद्धिलोप नित्य आहे. कारण गुण केला अथवा न केला तरीही संबुद्धि–लोप प्राप्त होत असतो.

गुणही नित्य आहे. कारण संबुद्धिलोप केला अथवा न केला तरीही गण प्राप्त होत असतो.

तरी पण गुण अनित्य आहे. संबुद्धिलोप

---

५. गुणाच्या पूर्वी संबुद्धि-लोप झाला तर ऱ्हस्वाच्या पुढें छकार येऊन नित्य तुक् आगमाची प्राप्ति येणार व त्याकरितां वचन करावें लागणार, पण संबुद्धि-लोपच जर अगोदर झाला नाहीं तर नित्य तुक् आगम न होण्याकरितां वचन करण्याची जरूर नाहीं व अंतरंग परिभाषाही येथें घ्यावयास नको.

प्राप्नोति । तावत्येव छेनानन्तर्यं तत्र तुका भवितव्यम् । तस्मात्सुष्ठूच्यते छे तुकः संबुद्धिगुणो न वा बहिरङ्गलक्षणत्वादिति ॥

**संप्रसारणदीर्घत्वण्यल्लोपाभ्यासगुणादयश्च ॥ ४ ॥**

संप्रसारणदीर्घत्वण्यल्लोपाभ्यासगुणादयश्च तुको भवन्ति विप्रतिषेधेन ॥ संप्रसारणदीर्घत्वस्यावकाशः। हूतः जीनः संवीतः शूनः । तुकोऽवकाशः । अग्निचित् सोमसुत्। इहोभयं प्राप्नोति । परिवीषु शकहूषु ॥ णिलोपस्यावकाशः । कारणा हारणा । तुकः स एव । इहोभयं प्राप्नोति । प्रकार्य गतः । प्रहार्य गतः ॥ अल्लोपस्यावकाशः । चिकीर्षिता जिहीर्षिता । तुकः स एव । इहोभयं प्राप्नोति । प्रचिकीर्ष्य गतः । प्रजिहीर्ष्य गतः ॥ अभ्यासगुणादयश्च तुको भवन्ति विप्रतिषेधेन । के पुनरभ्यासगुणादयः । ह्रस्वत्वात्त्वेत्त्वगुणाः । ह्रस्वत्वस्यावकाशः । पपतुः पपुः । तस्थतुः तस्थुः । तुकः स एव । इहोभयं प्राप्नोति । अपचच्छतुः अप-

---

केल्यावर गुण प्राप्त होत नाहीं कारण, लोप होण्याबरोबर छकाराशीं आनंतर्य होत असल्यामुळे तेथें त्याच्याशीं स्पर्धा करणारा तुक् प्राप्त होत[६] आहे. म्हणून तुक् आगमापेक्षां विप्रतिषेध असल्यामुळें परत्वास्तव प्रथमत: गुण होतो असें सांगावें, किंवा तुक् आगम बहिरंग असल्यामुळे अंतरंग संबुद्धि-गुण प्रथम होईल असें तरी म्हटलें पाहिजे, हीं जीं वार्तिककारांचीं वचनें आहेत तींच बरोबर आहेत.

( वा. ४ ) संप्रसारण-दीर्घ, णिलोप, अल्लोप व अभ्यास गुण वगैरे कार्येंही विप्रतिषेध असल्यामुळें तुक् आगमाच्या पूर्वी होतात. हलः ( ६।४।२ ) या संप्रसारण-दीर्घाला हूत: जीनः संवीतः शूनः इत्यादि ठिकाणीं अवकाश आहे. व तुक् आगमाला अग्निचित् सोमसुत् येथें अवकाश आहे. असें असून परिवीषु व शकहूषु येथें दोघांची प्राप्ति[७] येत आहे. तसेंच णिलोपाला ( ६।१५१ ) कारणा हारणा येथें अवकाश आहे. व तुक् आगमाला पूर्वी सांगितलेलाच अवकाश आहे. आणि प्रकार्य[८] गतः प्रहार्य गतः येथें दोघांचीही प्राप्ति येत आहे. त्याप्रमाणेंच अकाराच्या लोपाला चिकीर्षिता जिहीर्षिता येथें अवकाश आहे. व तुक् आगमाला अवकाश पूर्वी दाखविलाच आहे. आणि प्रचिकीर्ष्य गतः प्रजिहीर्ष्य गतः येथें दोहोंचीही प्राप्ति येत आहे. तसेंच अभ्यास गुण वगैरे कार्ये हीं तुगागमापेक्षां विप्रतिषेधानें अगोदर होतात.

अभ्यास-गुण वगैरे कार्ये कोणतीं बरें ?

अभ्यासाला ऱ्हस्व, अत्त्व, व गुण हीं तीं कार्ये होत. अभ्यास-ह्रस्वाला ययतुः ययुः येथें अवकाश आहे. व तुक् आगमाला अवकाश पूर्वी दाखविलाच आहे. आणि अपचच्छतुः अपचच्छुः

---

६. आणि तुक् आगमाचा गुणानें बाध होण्याकरितां विप्रतिषेध किंवा अंतरंग परिभाषा यांपैकीं कांहींच घेतलें नाहीं तर गुणाला मागें सारून तुक् होत असल्यामुळें गुण अनित्य होईल आणि नित्यत्वास्तव संबुद्धिलोप गुणाच्या अगोदर झाला कीं लागलींच नित्य तुक् प्राप्त होतो.

७. मागें ( ६।१।८६ टीप ४ ) पहा. प्रत्ययलक्षणानें ( १।१।६२ ) क्विप् प्रत्यय पुढें असल्यामुळें तुक् आगम ( ६।१।७१ ) प्राप्त होत आहे.

८. कृ व हृ या धातूंहून णि प्रत्यय, पुढें युच् प्रत्यय ( ३।३।१०७ ) आणि टाप् ( ४।१।४ ) हीं कार्यें झालीं आहेत.

९. प्र उपसर्ग पूर्वी असलेल्या कृ धातूहून णि प्रत्यय, पुढें क्त्वा प्रत्यय ( ३।४।२१ ) व त्याला ल्यप् आदेश ( ७।१।३७ ) झाला आहे.

चच्छुः । अत्त्वस्यावकाशः । चक्रतुः चक्रुः । तुकः स एव । इहोभयं प्राप्नोति । अपचच्छृदतुः अपचच्छृदुः । इत्त्वस्यावकाशः । पिपक्षति यियक्षति । तुकः स एव । इहोभयं प्राप्नोति । चिच्छादयिषति चिच्छर्दयिषति । गुणस्यावकाशः । लोलूयते बेभिद्यते । तुकः स एव । इहोभयं प्राप्नोति । चेच्छिद्यते चोच्छुप्यते ॥

**यणादेशादाद्गुणः ॥ ५ ॥**

यणादेशादाद्गुणो भवति विप्रतिषेधेन । यणादेशस्यावकाशः । दध्यत्र मध्वत्र । आद्गुणस्यावकाशः । खट्वेन्द्रः खट्वोदकम् । इहोभयं प्राप्नोति । वृक्षोऽत्र प्लक्षोऽत्र ॥

**इरुरुगुणवृद्धिविधयश्च ॥ ६ ॥**

इरुरुगुणवृद्धिविधयश्च यणादेशाद्भवन्ति विप्रतिषेधेन ॥ इरुरोरवकाशः । आस्तीर्णम् निपूर्ताः पिण्डाः । यणादेशस्यावकाशः । चक्रतुः चक्रुः । इहोभयं प्राप्नोति । दूरे ह्यध्वा जगुरिः । मित्रावरुणौ ततुरिः । किरति गिरति ॥ गुणवृद्ध्योरवकाशः चेता

---

येथें दोहोंची प्राप्ति येत आहे.[१०] उरत् (७।४।६६) या सूत्रानें सांगितलेल्या अत्त्वाला चक्रतुः चक्रुः येथें अवकाश आहे. व तुगागमाला अवकाश पूर्वी दाखविलाच आहे. आणि अपचच्छृदतुः अपचच्छृदुः येथें अभ्यासामध्यें अत्त्व व तुक् या दोहोंची प्राप्ति येत आहे. इत्त्वाला (७।४।७९) पिपक्षति यियक्षति येथें अवकाश आहे. व तुगागमाला अवकाश पूर्वी दाखविलाच आहे आणि चिच्छादयिषति चिच्छर्दयिषति येथें दोहोंची प्राप्ति येत आहे. गुणाला (७।४।८२) लोलूयते बेभिद्यते येथें अवकाश आहे, व तुगागमाला अवकाश पूर्वी दाखविलाच आहे. आणि चेच्छिद्यते चोच्छुप्यते येथें दोहोंची प्राप्ति येत आहे.

(वा. ५) यणादेशापेक्षा गुण विप्रतिषेध असल्यामुळें पूर्वी होतो. यण् आदेशाला दध्यत्र मध्वत्र येथें अवकाश आहे. व आद् गुणः याला खट्वेन्द्रः खट्वोदकम् इत्यादि स्थलीं अवकाश आहे आणि वृक्षोऽत्र[११] प्लक्षोऽत्र येथें दोहोंची प्राप्ति येत आहे.

इर् उर् गुण आणि वृद्धि हे विधी विप्रतिषेधानें यण् आदेशापेक्षां प्रथमतः होतात. इर् व उर् यांना आस्तीर्णम्,[१२] निपूर्ताः पिण्डाः येथें अवकाश आहे. व चक्रतुः चक्रुः येथें यणाला अवकाश आहे. दूरे ह्यध्वा जगुरिः,[१३] मित्रावरुणौ ततुरिः, किरति व गिरति येथें दोहोंचीही प्राप्ति येत आहे. गुण व वृद्धि यांना चेता व गौः येथें अवकाश आहे. व यणाला अवकाश पूर्वी दाखवि

---

१०. छा धातूला द्वित्व झाल्यानंतर छा छा अशा अवस्थेंत 'दीर्घात्' (६।१।७५) यानें तुक् आगम झाला तर अजन्त अभ्यास नसल्यामुळें ऱ्हस्व होणार नाहीं. अभ्यासांपैकीं जो अच् त्याला ऱ्हस्व होतो अशा प्रकारचा वैयधिकरण्यानें अन्वय मनांत न घेता हे दोष दिले आहेत.

११. वृक्ष शब्दाहून प्रथमा एकवचन सुप्रत्यय, रुत्व, पुढें अत्र शब्दातील अकारामुळे 'रु'ला उत्व (६।१।११३) झाल्यावर त्या उकाराला यण् प्राप्त झाला आहे पण मागील अकाराबरोबर गुण एकादेश होत असतो.

१२. आङ् उपसर्गपूर्वक स्तॄ धातूहून क्त प्रत्यय व धातूच्या ऋकाराला इत्व (७।१।१००) रपर होऊन इर् असा आदेश होतो. तसेंच नि उपसर्गपूर्वक पॄ धातूहून क्त प्रत्यय व धातूच्या ऋकाराला उत्व (७।१।१०२) रपर होऊन उर् असा आदेश होतो.

१३. गॄ व तॄ या धातूंहून किप्रत्यय (३।२।१७१) द्वित्व, अभ्यासकार्य व त्यानंतर उत्तर खंडांतील ऋकाराला उत्व (७।१।१०३) रपर झालें आहे.

गौः । यणादेशस्य स एव । इहोभयं प्राप्नोति । चयनम् चायकः । लवनम् लावकः ॥

**भलोपधातुप्रातिपदिकप्रत्ययसमासान्तोदात्तोदात्तनिवृत्तिस्वरा एकादेशाच्च ॥ ७ ॥**

भलोपधातुप्रातिपदिकप्रत्ययसमासान्तोदात्तोदात्तनिवृत्तिस्वरा एकादेशाच्च यणादेशाच्च भवन्ति विप्रतिषेधेन । भलोपस्यावकाशः । गार्ग्यः वात्स्यः । एकादेशयणादेशयोरवकाशः । दधीन्द्रः मधूदकम् । दध्यत्र मध्वत्र । इहोभयं प्राप्नोति । दाक्षी दाक्षायणः । प्लाक्षी प्लाक्षायणः ॥ अचि भलोप एकादेशाद्भवति विप्रतिषेधेन । अचि भलोपस्यावकाशः । दाक्षी दाक्षायणः । प्लाक्षी प्लाक्षायणः । एकादेशस्यावकाशः । दण्डाग्रम् क्षुपाग्रम् । इहोभयं प्राप्नोति । गाङ्गेयः गाङ्गः ॥ धातुस्वरस्यावकाशः । पचति पठति । एकादेशयणादेशयोः स एव । इहोभयं प्राप्नोति । श्र्यर्थम् श्रीषा ॥

---

लाच आहे. पण चयनं, चायकः, लवनं व लावकः, येथें दोहोंची प्राप्ति येत आहे.

( वा. ७ ) भसंज्ञकाला सांगितलेला 'यस्येति च' हा लोप, धातुस्वर, प्रातिपदिकस्वर, प्रत्ययस्वर, समासान्तोदात्त, उदात्तनिवृत्तिस्वर हे विधी विप्रतिषेध असल्यामुळें एकादेशापेक्षां व यणापेक्षां प्रथमतः होतात. भसंज्ञकाच्या लोपाला (६।४।१४८) गार्ग्यः[१४] व वात्स्यः येथे अवकाश आहे. व एकादेश आणि यण् यांना दधीन्द्रः मधूदकम् दध्यत्र व मध्वत्र येथे अवकाश आहे. पण दाक्षी[१५] दाक्षायणः प्लाक्षी व प्लाक्षायणः येथें दोन्ही प्राप्त होतात. तसेंच " अचि भलोप एकादेशाद्भवति विप्रतिषेधेन " म्हणजे अच् पुढे असतांना भसंज्ञकाच्या अकाराचा व इकाराचा जो लोप ( ६।४।१०४ ) सांगितला आहे तो विप्रतिषेधानें एकादेशापेक्षा प्रथम होतो. त्या लोपाला दाक्षी दाक्षायणः येथें स्वतंत्र अवकाश आहे. आणि एकादेशाला दण्डाग्रम् क्षुपाग्रम् येथें अवकाश आहे. पण गाङ्गेयः[१६] गाङ्गः येथें भलोप व एकादेश–वृद्धि हे दोन्ही प्राप्त होतात. धातोः ( १।१।१६२ ) याला पचति व पठति येथें अवकाश आहे. व एकादेश आणि यण् यांना दण्डाग्रम् चक्रतुः वगैरे अवकाश पूर्वी दाखविलाच आहे. पण श्र्यर्थम्[१७] व श्रीषा

---

१४. गर्ग व वत्स या शब्दांहून गोत्रापत्य या अर्थी यञ् ( ४।१।१०५ ) प्रत्यय झाला आहे.

१५. दक्ष शब्दाहून अपत्य या अर्थी इञ् प्रत्यय ( ४।१।९५ ) व त्याच्या पुढे ङीष् ( ४।१।६५ ). येथें सवर्णदीर्घ येत आहे. दाक्षायणः येथें इञ् प्रत्यय केल्यानंतर पुढें युवापत्य या अर्थी फक् प्रत्यय (४।१।१०१ ) झाला आहे. येथे यण् प्राप्त होत आहे.

१६. गङ्गा शब्दाहून ढक् प्रत्यय ( ४।१।१२३ ), त्याला एय् आदेश ( ७।१।२ ) झाल्यानंतर वृद्धि व एकादेश प्राप्त होतात. गाङ्गः येथें गङ्गा शब्दाहून अण् प्रत्यय ( ४।१।११२ ) झाल्यानंतर सवर्णदीर्घ एकादेश प्राप्त होतो.

१७. श्रियै इदम् श्र्यर्थम् येथें श्री शब्दाचा अर्थ शब्दाबरोबर चतुर्थीतत्पुरुष समास ( २।१।३६ ) झाला आहे. श्री शब्दांतील ईकाराला धातुस्वरानें उदात्त झाल्यानंतर यण् झाल्यामुळे पुढील अनुदात्त आकाराला स्वरित ( ८।२।४ ) झाला आहे. ईष् धातूहून क प्रत्यय ( ३।१।१३५ ) व पुढें टाप्; त्यानंतर श्री आणि ईषा या शब्दांचा बहुव्रीहि झाला आहे. येथेही श्री यांतील ईकाराला धातुस्वरानें उदात्त झाल्यानंतर त्याचा पुढील अनुदात्त अकाराबरोबर झालेला सवर्णदीर्घ एकादेश हा विकल्पानें स्वरित ( ८।२।६ ) होतो. दोन्ही ठिकाणीं पूर्वपदाला प्रकृतिस्वरानें ( ६।२।४, ६।२।१ ) उदात्त झाल्यामुळें शेष-निघातानें ( ६।१।१५८ ) उत्तरपदांतील अच् अनुदात्त झाले आहेत.

प्रातिपदिकस्वरस्यावकाशः। आम्रः। एकादेशयणादेशयोः स एव। इहोभयं प्राप्नोति। अग्न्युदकम् वृक्षार्थम्॥ प्रत्ययस्वरस्यावकाशः। चिकीर्षुः औपगवः। एकादेशयणादेशयोः स एव। इहोभयं प्राप्नोति। चिकीर्ष्वर्थम् औपगवार्थम्॥ समासान्तोदात्तस्यावकाशः। राजपुरुषः ब्राह्मणकम्बलः। एकादेशयणादेशयोः स एव। इहोभयं प्राप्नोति। राजवैद्यर्थम् राजवैदीहते॥ उदात्तनिवृत्तिस्वरस्यावकाशः। नदी कुमारी। एकादेशयणादेशयोः स एव। इहोभयं प्राप्नोति। कुमार्यर्थम् कुमारीहते॥

## अल्लोपाल्लोपौ चार्धधातुके॥ ८॥

अल्लोपाल्लोपौ चार्धधातुक एकादेशाद्भवतो विप्रतिषेधेन। अल्लोपस्यावकाशः। चिकीर्षिता जिहीर्षिता। एकादेशस्यावकाशः। पचन्ति पठन्ति। इहोभयं प्राप्नोति। चिकीर्षकः जिहीर्षकः॥ आल्लोपस्यावकाशः। पपिः

---

येथें दोहोंची एकदम प्राप्ति येत आहे. प्रातिपदिकस्वराला आम्रः व शालः येथें अवकाश आहे; व एकादेश आणि यण् यांना अवकाश पूर्वीं दाखविलाच आहे. पण अग्न्युदकम्[18] व वृक्षार्थम् येथें दोहोंचीही प्राप्ति येत आहे. प्रत्ययस्वराला चिकीर्षुः[19] व औपगवः येथें अवकाश आहे; व एकादेश आणि यण् यांना अवकाश पूर्वीं दाखविलाच आहे. पण चिकीर्ष्वर्थम्[20] व औपगवार्थम् येथें दोहोंची एकदम प्राप्ति येत आहे. समासान्तोदात्त स्वराला (६।१।२२३) राजपुरुषः व ब्राह्मणकम्बलः येथे अवकाश आहे; व एकादेश आणि यण् यांना अवकाश पूर्वीं दाखविलाच आहे. पण राजवैद्यर्थम्[21] राजवैदीहते येथें दोहोंची प्राप्ति एकदम येते. उदात्तनिवृत्तिस्वराला (६।१।१६१) नदी कुमारी वगैरे ठिकाणीं अवकाश आहे; व एकादेश आणि यण् यांना अवकाश पूर्वीं दाखविलाच आहे. पण कुमार्यर्थम् कुमारीहते वगैरे ठिकाणीं दोहोंची एकदम प्राप्ति येत आहे.

(वा. ८) आर्धधातुकाच्या निमित्तानें होणारा अल्लोप (अकाराचा लोप) व आल्लोप (आकाराचा लोप) हे विप्रतिषेधानें एकादेशापेक्षां पूर्वीं होतात. अल्लोपाला (६।४।४८) चिकीर्षिता व जिहीर्षिता येथें अवकाश आहे; व एकादेशाला (६।१।९७) पचन्ति व पठन्ति येथें अवकाश आहे; पण चिकीर्षकः व जिहीर्षकः येथें

---

१८. अग्नि शब्दाचा अग्निसदृश असा लक्षणेनें अर्थ आहे. त्याचा उदक शब्दाबरोबर बहुव्रीहि समास झाला आहे. अग्नि शब्दांतील इकाराला प्रतिपादिक-स्वरानें (फिट् सूत्र १।१) उदात्त झाल्यानंतर यण् झाला आहे. म्हणून पुढील उकाराला स्वरित (८।२।४) झाला आहे. तसेंच वृक्षार्थम् येथें वृक्ष शब्दांतील अकाराला प्रतिपादिक-स्वरानें उदात्त झाल्यानंतर सवर्णदीर्घ झाला आहे. म्हणून तो एकादेश विकल्पानें स्वरित (८।२।६) होतो.

१९. चिकीर्षुः येथें उ प्रत्ययाला (३।२।१६८) आणि औपगवः येथें अण् प्रत्ययाला (४।१।९२) उदात्त स्वर (३।१।३) झाला आहे.

२०. चिकीर्ष्वर्थम् येथे चिकीर्षु या उ प्रत्ययाला प्रत्यय-स्वरानें उदात्त झाल्यानंतर यण् झाल्यामुळें त्याच्या पुढील अकाराला स्वरित (८।२।४) होतो. तसेंच औपगवार्थम् येथें अण् प्रत्ययाला प्रत्ययस्वरानें उदात्त झाल्यानंतर सवर्णदीर्घ एकादेश झाल्यामुळें त्या एकादेशाला विकल्पानें स्वरित (८।२।६) होतो.

२१. राजवैदी या षष्ठीतत्पुरुषाला समासान्तोदात्त झाल्यानंतर यण् होतो. तसाच राजवैदीहते येथें सवर्णदीर्घ होतो. यण् व सवर्ण दीर्घ मागाहून झाल्याचा उपयोग पूर्वीप्रमाणें समजावा. ईहते हें क्रियापद सर्वानुदात्त (८।१।२८) आहे.

सोमं ददिर्गाः । एकादेशस्यावकाशः । यान्ति वान्ति । इहोभयं प्राप्नोति । ययतुः ययुः ॥

**इयङुवङ्गुणवृद्धिटित्किन्मित्पूर्वपदविकाराश्च ॥ ९ ॥**

इयङुवङ्गुणवृद्धिटित्किन्मित्पूर्वपदविकाराश्चैकादेशयणादेशाभ्यां भवन्ति विप्रतिषेधेन । इयङुवङोरवकाशः । श्रियौ श्रियः । भ्रुवौ भ्रुवः । एकादेशयणादेशयोः स एव । इहोभयं प्राप्नोति । चिक्षियिव चिक्षियिम । लुलुवतुः लुलुवुः । पुपुवतुः पुपुवुः । गुणवृद्ध्योरवकाशः । चेता गौः । एकादेशयणादेशयोः स एव । इहोभयं प्राप्नोति । साधुचायी सुचायी । नग्नंभावुको ऽध्वर्युः । शयिता शयितुम् ॥ टितोऽवकाशः । अग्नीनाम् इन्दूनाम् । एकादेशयणादेशयोः स एव । इहोभयं प्राप्नोति । वृक्षाणाम् प्लक्षाणाम् ॥ कितोऽवकाशः । साधुदायी सुष्ठुदायी । एकादेशयणादेशयोः स एव । इहोभयं प्राप्नोति । दायकः धायकः ॥ मितोऽवकाशः । त्रपुणी जतुनी । एकादेशयणा-

---

दोहोंची प्राप्ति आली असता अल्लोप एकादेशाचा बाध करतो. तसेंच आल्लोपाला पपिः[२२] व ददिः येथें अवकाश आहे. व एकादेशाला यान्ति व वान्ति येथें अवकाश आहे. पण ययतुः व ययुः येथें दोहोंची प्राप्ति येत आहे.

( वा. ९ ) इयङ्, उवङ्, गुण, वृद्धि, टित्, कित्, मित्, आणि पूर्वपदसंबन्धी विकार हे विप्रतिषेधानें एकादेश व यण् यांपेक्षां पूर्वी होतात. इयङ् व उवङ् यांना श्रियौ, श्रियः, भ्रुवौ व भ्रुवः यांसारख्या ठिकाणीं अवकाश आहे, व एकादेश आणि यण् यांना अवकाश दण्डाग्रम्, चक्रतुः वगैरे ठिकाणीं पूर्वी दाखविलाच आहे. पण [२३] चिक्षियिव, चिक्षियिम, लुलुवतुः, लुलुवुः, पुपुवतुः व पुपुवुः येथें दोहोंची एकदम प्राप्ति येत आहे. गुण व वृद्धि यांना चेता व गौः येथें अवकाश आहे. व एकादेश आणि यण् यांना अवकाश पूर्वी दाखविलाच आहे. पण साधु[२४]चायी, सुचायी, नग्नंभावुकः, शयिता, शयितुम् वगैरे ठिकाणीं दोहोंचीही प्राप्ति येत आहे. टिताला अग्नीनाम् व इन्दूनाम् येथें अवकाश आहे व एकादेश आणि यण् याना अवकाश दण्डाग्रम् चक्रतुः वगैरे ठिकाणीं पूर्वी दाखविलाच आहे. पण वृक्षाणाम् येथें दोघाची प्राप्ति एकदम आली असतां एकादेशापेक्षां पूर्वी टित् जो नुट् आगम (७।१।५४) तो होतो. किताला (७।३।३३) साधुदायी व सुष्ठुदायी येथें अवकाश आहे व एकादेश आणि यण् यांना पूर्वी अवकाश दाखविलाच आहे. पण दायकः व धायकः येथें दोहोंची प्राप्ति एकदम आली असतां सवर्णदीर्घाचा बाध करून युक् होतो. मिताला (७।१।७२, ७३) त्रपुणी व जतुनी येथें अवकाश आहे व एकादेश आणि यण् यांना पूर्वी अवकाश दाखविलाच आहे. पण

---

२२. पा व दा या धातूंहून कि प्रत्यय ( ३।२।१७१ ), द्वित्व वगैरे कार्यें झाली आहेत.

२३. क्षि धातूहून लिट् उत्तमपुरुष-द्विवचन व बहुवचनाचे वस् व मस् प्रत्यय झाले आहेत. येथें सवर्णदीर्घाचा बाध करून इयङ् ( ६।४।७७ ) होतो. लू धातूहून लिट् प्रथमपुरुष द्विवचन व बहुवचनाचे तस् व झि प्रत्यय झाले आहेत. येथें यण् व सवर्णदीर्घ यांचा बाध करून उवङ् होतो.

२४. साधु किंवा सु हें उपपद मागें असतां चि धातूहून णिनि प्रत्यय ( ३।२।७८ ) झाला आहे. येथें वृद्धि ( ७।२।११५ ) आणि सवर्णदीर्घ यांची प्राप्ति येते. नग्नंभावुकः येथें नग्न उपपद असतांना भू धातूहून खुकञ् प्रत्यय झाला आहे. येथेंहीं पूर्वीप्रमाणेंच कार्यें प्राप्त होतात. शयिता येथें गुण ( ७।३।८४ ) व सवर्णदीर्घ प्राप्त होतात. यणाची प्राप्ति सर्वत्र आहेच.

देशयोः स एव । इहोभयं प्राप्नोति । अस्थीनि दधीनि । अतिसखीनि ब्राह्मणकुलानि ॥ पूर्वपदविकाराणामवकाशः । होतापोतारौ । एकादेशयणादेशयोः स एव । इहोभयं प्राप्नोति । नेष्टोद्गातारौ आग्नेन्द्रम ॥

उत्तरपदविकाराश्चेति वक्तव्यम् । उत्तरपदविकाराणामवकाशः । समीपम् दुरीपम् । एकादेशयणादेशयोः स एव । इहोभयं प्राप्नोति । नीपम् वीपम् । प्रेपम् परेपम् ॥

**[ वा सुप्यापिशलेः ॥६।१।९२॥]**

**औतोऽम्शसोः ॥ ६ । १ । ९३ ॥**

**ओतस्तिङि प्रतिषेधः ॥ १ ॥**

ओतस्तिङि प्रतिषेधो वक्तव्यः । अचिनवम् असुनवम् ॥ स तर्हि प्रतिषेधो वक्तव्यः । न वक्तव्यः । गोग्रहणं करिष्यते । आ गोत इति वक्तव्यम् ।

**गोग्रहणे द्योरुपसंख्यानम् ॥ २ ॥**

गोग्रहणे द्योरुपसंख्यानं कर्तव्यम् । द्यां गच्छ ॥

**समासाच्च प्रतिषेधः ॥ ३ ॥**

समासाच्च प्रतिषेधो वक्तव्यः । चित्रगुं पश्य । शबलगुं पश्य ॥ ननु चौत इत्युच्य-

---

अस्थीनि, दधीनि व अतिसखीनि येथें सवर्णदीर्घ व मित् या दोघाचीही प्राप्ति आली असतां परत्वास्तव सवर्णदीर्घाचा बाध करून मित् जो नुम् आगम तो होतो. पूर्वपद–विकाराला (६।३।२५) होतापोतारौ येथें अवकाश आहे. एकादेश व यण् यांना पूर्वी अवकाश दाखविला आहे. पण नेष्टोद्गातारौ आग्नेन्द्रम् येथें दोहोंची प्राप्ति एकदम येत आहे.

"उत्तरपदविकाराश्चेति वक्तव्यम्" म्हणजे उत्तरपदसंबंधी विकारही विप्रतिषेधानें एकादेश व यण् यांपेक्षां प्रथमतः होतात असे सांगावें. उत्तरपदविकाराना (६।३।९७) समीपम् व दुरीपम् येथें अवकाश आहे व एकादेश आणि यण् याना दण्डाग्रम् चक्रतुः वगैरे पूर्वीचाच अवकाश आहे. नीपम्, वीपम्, प्रेपम् व परेपम् येथें मात्र दोहोंची प्राप्ति एकदम येत आहे. येथे एकादेश व यण् याचा बाध करून उत्तरपदविकारच पूर्वी होतात.

(सूत्र ९३ वा. १) ओकारान्ताहून तिङ्संज्ञक अम् पुढें असतांना आकार एकादेशाचा प्रतिषेध सांगावा. उदा०– अचिनवम्, असुनवम्.

तर मग तसा प्रतिषेध सांगितला पाहिजे.

सांगावयास नको. कारण ह्या सूत्रामध्यें ओतः याचे ऐवजीं गो शब्द घातला म्हणजे काम भागेल. म्हणजे 'आ गोतः' असें सूत्र करावें.

(वा. २) ओतः याचे ऐवजीं गोतः असें केलें असतां द्यो शब्दाचेही सूत्रांत उच्चारण करावें लागेल. उदा० द्यां गच्छ.

(वा. ३) शिवाय, गोशब्दान्त समासाहून अम् व शस् प्रत्यय पुढें असतांना तेथें आत्वाचा प्रतिषेध करावा लागेल. उदा० चित्रगुं पश्य, शबलगुं पश्य.

---

१. (सू. ९२) अवर्णान्त उपसर्गाहून ऋकारादि नामधातु पुढें असतांना आपिशलि आचार्यांच्या मतानें विकल्पानें वृद्धि होते; इतरांच्या मतानें होत नाहीं. उदा० प्रार्षभीयति प्रर्षभीयति. ऋषभ शब्दाहून क्यच् प्रत्यय (३।१।८) केला म्हणजे ऋषभीय असा नामधातु (३।१।३२) होतो.

१. (सू. ९३) ओकाराहून अम् किंवा शस् या प्रत्ययांतील अच् पुढें असतांना पूर्व व पर यांचे स्थानीं आकार एकादेश होतो. उदा० गाम्, गाः.

२. चि व सु या स्वादिगणांतील धातूंहून लङ्, उत्तमपुरुष एकवचन मिप्, त्याला अम् आदेश (३।४।१०१), अट् आगम, श्नु प्रत्यय (३।१।७३), व त्याला गुण झाल्यानंतर प्रकृत सूत्रानें आत्व प्राप्त होतें; परंतु तें न होतां अव् आदेश होतो.

मानेऽपि समासात्प्रतिषेधो वक्तव्यः । न वक्तव्यः । ह्रस्वत्वे कृते न भविष्यति । इदमिह संप्रधार्यम् । आत्वं क्रियतां ह्रस्वत्वमिति । किमत्र कर्तव्यम् । परत्वादात्वम् ।

**न वा बहिरङ्गलक्षणत्वात् ॥ ४ ॥**

न वा वक्तव्यः । किं कारणम् । बहिरङ्गलक्षणत्वात् । बहिरङ्गलक्षणमात्वम् । अन्तरङ्गं ह्रस्वत्वम् । असिद्धं बहिरङ्गमन्तरङ्गे ॥ ननु चा गोत इत्युच्यमानेऽपि समासात्प्रतिषधो न वक्तव्यः । कथम् । ह्रस्वत्वे कृते न भविष्यति । स्थानिवद्भावात्प्राप्नोति । ननु चौत इत्युच्यमानेऽपि स्थानिवद्भावात्प्राप्नोति । नेत्याह । अनल्विधौ स्थानिवद्भावः । आ गोत इत्युच्यमानेऽपि न दोषः । प्रतिषिध्यतेऽत्र स्थानिवद्भावः । गोः पूर्वणित्त्वात्वस्वरेषु स्थानिवन्न भवतीति ॥

स एव तर्हि दोषो गोग्रहणे द्योरुपसंख्यानमिति । सूत्रं च भिद्यते ॥

---

पण ओतः असें सूत्रामध्यें असतांनाही समासाहून अम् किंवा शस् पुढें असतांना आत्वाचा प्रतिषेध करावा लागणारच आहे ना ?

ओतः असें सूत्र असतांना आत्वाचा प्रतिषेध करावा लागत नाहीं. कारण ' गोस्त्रियोः० ' ( १।२।४८ ) या सूत्रानें ऱ्हस्व केला असतां ओकार नसल्यामुळें आत्व होणार नाहीं.

पण येथें हा विचार करावा– चित्रगो अम् असें असतां प्रथमतः आत्व करावें किंवा ऱ्हस्व करावा ?

मग यांत काय बरें करावें ?

ऱ्हस्वापेक्षां पर असल्यामुळें आत्व करावें.

( वा. ४ ) समास केला असतांना आत्वाचा प्रतिषेध करावयास नको. कारण आत्व बहिरंग आहे व ऱ्हस्व अंतरंग आहे. तेव्हां ' असिद्धं बहिरङ्गमन्तरङ्गे ' या परिभाषेनें प्रथमतः ऱ्हस्वच होईल.

तर मग ' आ गोतः' असें सूत्र केलें असतांही समासस्थलीं आत्वाचा प्रतिषेध करावा लागणार नाहीं.

तो कसा ?

प्रथमतः ऱ्हस्व केला असतां गो शब्द नाहींसा झाल्यामुळें आत्व होणार नाहीं.

पण स्थानिवद्भावानें गोशब्द समजून आत्व प्राप्त होत आहे.

अहो, पण ओतः असें म्हटलें तरी स्थानिवद्भावामुळें आत्व प्राप्त होणारच ना ?

असें नाहीं. कारण, अनल्–विधि कर्तव्य असतांना स्थानिवद्भाव होतो.

आ गोतः असें सूत्र केलें असतांही चित्रगुं पश्य इत्यादि स्थलीं दोष येत नाहीं. कारण गो शब्दासंबंधानें स्थानिवद्भावाचा निषेध 'गोशब्दासंबंधीं पूर्वरूप, णित्व, आत्व, आणि स्वर हे विधी कर्तव्य असतांना स्थानिवद्भाव होत नाहीं' अशा अर्थाच्या " गोः पूर्वणित्त्वात्वस्वरेषु स्थानिवन्न भवति " ( १।१।५६ वा. २९ ) या वार्तिकानें केलाच आहे.

मग ओतः याचे ऐवजीं आ गोतः असें सूत्र केलें असतां ' गोग्रहणे द्योरुपसंख्यानम् ' हाच दोष समजावा. शिवाय, 'आ गोतः' असें केलें असतां सूत्राचा बदल होणार हाही दोष येतो.

---

३. कारण, आत्वाला बाहेरच्या विभक्तिप्रत्ययाची जरूर आहे.

४. तेव्हां ऱ्हस्व झाल्यानंतर स्थानिवद्भावानें गो शब्द आहे असें म्हणतां येईल. पण ओकार आहे असें मात्र म्हणतां येणार नाहीं. कारण ओकार हा अल् आहे.

यथान्यासमेवास्तु । ननु चोक्तमोतरितङि प्रतिषेध इति ।

**सुबधिकारात्सिद्धम् ॥ ५ ॥**

सुपीति वर्तते । क्व प्रकृतम् । वा सुप्यापिशलेः [ ९२ ] इति ॥ यद्यनुवर्तत इहापि विभाषा प्राप्नोति । सुब्ग्रहणमनुवर्तते वाग्रहणं निवृत्तम् । कथं पुनरेकयोगनिर्दिष्टयोरेकदेशोऽनुवर्तत एकदेशो न ।

**एकयोगे चैकदेशानुवृत्तिरन्यत्रापि ॥ ६ ॥**

एकयोगनिर्दिष्टानामप्येकदेशानुवृत्तिर्भवति । अन्यत्रापि नावश्यमिहैव । क्वान्यत्र । अलुगधिकारः प्रागानङ उत्तरपदाधिकारः प्रागङ्गाधिकारात् ॥ एवमपि

**अम्युपसंख्यानं वृद्धिबलीयस्त्वात् ॥ ७ ॥**

अम्युपसंख्यानं कर्तव्यम् । गां पश्य । किं पुनः कारणं न सिध्यति । वृद्धिबलीयस्त्वात् । परत्वाद्वृद्धिः प्राप्नोति ॥

**न वानवकाशत्वात् ॥ ८ ॥**

न वा वक्तव्यम् । किं कारणम् । अनवकाशत्वात् । अनवकाशमात्वं वृद्धिं बाधि-

---

असें आहे तर आहे तसेंच सूत्र राहूं दे.

पण पहिलेंच सूत्र कायम ठेवलें तर अचिनवम् इत्यादि क्रियापदांचे ठिकाणीं आत्व येतें त्याच्या निषेधादाखल वचन करावें लागतें असें म्हटलें आहे ना ?

( वा. ५ ) मागाहून सुप्–ग्रहणाची अनुवृत्ति येत आहे.

मागें कोठें सुप्–ग्रहण केलें आहे ?

वा सुप्यापिशलेः ( ६।१।९२ ) या मागच्या सूत्रांत केलें आहे.

पण जर तें सुप्–ग्रहण येथें अनुवृत्तीनें आणलें तर त्याच्या बरोबर तेथून 'वा' या पदाचीही येथें अनुवृत्ति येऊं लागेल.

हा दोष येत नाहीं. कारण सुप् शब्दाची अनुवृत्ति येते, वा शब्दाची अनुवृत्ति येत नाहीं.

पण एकाच सूत्रांत निर्दिष्ट असलेल्या दोन पदांपैकीं एकाची अनुवृत्ति येते आणि दुसऱ्याची निवृत्ति होते हें कसें ?

( वा. ६ ) एका सूत्रांत निर्दिष्ट असलेल्यांपैकीं एकाचीच अनुवृत्ति येते असें अन्य ठिकाणींहि दृष्टीस पडतें; येथेंच तेवढी एकदेशाची अनुवृत्ति केली आहे असें नाहीं.

अन्य ठिकाणीं कोठें बरें एकदेशाची अनुवृत्ति दृष्टीस पडते ?

'अलुगुत्तरपदे' ( ६।३।१ ) या सूत्रांतील अलुक् या पदाची अनुवृत्ति 'आनङ् ऋतो द्वन्द्वे०' या सूत्रापर्यंतच आहे व उत्तरपदे याची अनुवृत्ति मात्र पाद संपेपर्यंत आहे.

असें जरी आहे तरी–

( वा. ७ ) ओकारान्ताहून अम् पुढें असतांना आत्व होतें असें स्वतंत्र वचन करावें लागणार आहे. उदा०– गां पश्य.

पण तेथें 'औतोऽम्शसोः' यानेंच कां बरें आत्व होणार नाहीं ?

कारण, वृद्धि ही ज्यास्त प्रबल आहे. आत्वाला मागें सारून परत्वास्तव वृद्धि प्राप्त होत आहे.

( वा. ८ ) गां पश्य येथें आत्व होण्याकरितां मुद्दाम वचन करावयास नको. कारण, आत्व अनवकाश असल्यामुळें पर असाही वृद्धीचा तें बाध करील.

---

५. गोतो णित् ( ७।१।९० ) यानें अम् प्रत्यय णित् समजला जातो म्हणून वृद्धि (७।२।११५) प्राप्त होते.

ध्यते ॥ सावकाशमात्वम् । कोऽवकाशः । द्यां गच्छ ॥

**द्योश्च सर्वनामस्थाने वृद्धिविधिः ॥९॥**

द्योश्च सर्वनामस्थाने वृद्धिर्विधेया । किं प्रयोजनम् ।

**यद् द्याव इन्द्रेति दर्शनात् ॥ १० ॥**

यद् द्याव इन्द्र ते शतं शतं भूमीरुत स्युः । यावता चेदानीं द्योरपि सर्वनामस्थाने वृद्धिरुच्यते ऽनवकाशमात्वं वृद्धिं बाधिष्यते ॥

**एङि पररूपम् ॥ ६ । १ । ९४ ॥**

**पररूपप्रकरणे तुन्वोर्वि निपात उपसंख्यानम् ॥ १ ॥**

पररूपप्रकरणे तु न्वित्येतयोर्वकारादौ निपात उपसंख्यानं कर्तव्यम् । तु वै त्वै । नु वै न्वै । वकारादाविति किमर्थम् । त्वावत् न्वावत् । निपात इति किमर्थम् । तु वानि । नु वानि ॥

**न वा निपातैकत्वात् ॥ २ ॥**

न वा कर्तव्यम् । किं कारणम् । निपातैकत्वात् । एक एवायं निपातः । त्वै न्वै ॥

**एवे चानियोगे ॥ ३ ॥**

---

पण आत्व सावकाश आहे ना ?

त्याला कोठें अवकाश आहे ?

द्यां गच्छ येथें.

( वा. ९ ) द्यो शब्दाला सर्वनामस्थान पुढें असतांना वृद्धीचें विधान केलेंच पाहिजे.

याचें काय प्रयोजन ?

( वा. १० ) ' यद् द्याव इन्द्र ते शतं०' या ठिकाणीं त्याचा उपयोग आहे[६]. आणि अशा रीतीनें जर सर्वनामस्थान पुढें असतांना द्यो शब्दाला वृद्धि सांगितली जात आहे तर आतां आत्व अनवकाश होत असल्यामुळें सहजच तें वृद्धीचा बाध करील[७].

( सू. ९४ वा. १ ) तु आणि नु या शब्दांहून वकारादि निपात पुढें असतांना पूर्व आणि पर याचे स्थानीं पररूप होतें असें वचन करावें. जसें–तु+वै=त्वै[२]. नु+वै=न्वै.

येथें वकारादि असें कशाकरितां म्हटलें आहे ?

त्वावत्[३] व न्वावत् येथें पररूप न व्हावें म्हणून वकारादि असें म्हटलें आहे.

येथें 'निपाते' असें कशाकरितां म्हटलें आहे ?

तु–वानि[४], नु–वानि येथें पररूप न व्हावें म्हणून.

( वा. २ ) तुन्वोर्वि० इत्यादि वचन करावयास नको.

काय कारण ?

कारण असें कीं–त्वै न्वै असें हे अखण्डच निपात आहेत; हा निपात–संघात नव्हे.

---

६. द्यो शब्दाहून प्रथमा–बहुवचन जस् प्रत्यय केला असतां तेथें वृद्धि होऊन द्यावः असें रूप होतें.

७. एकंदरींत वृद्धीचें निराळें विधान करावयास नको.

१. ( सू. ९४ ) अवर्णान्त उपसर्गाहून एकार किंवा ओकार आरंभीं असलेला धातु पुढें असतांना पूर्व व पर अचांचे स्थानीं पररूप होतें. उदा० प्रेजते. येथें प्र+एजते असें असतां पराचें म्हणजे एकाराचें रूप झालें आहे.

२. येथे तु शब्दांतील उकार आणि वै शब्दांतील वकार या दोघांचे स्थानी वकार होऊन त्वै असें होतें.

३. तु आवत् येथें पररूप झालें असतें तर तावत् असें झाले असतें.

४. वा धातूहून लोट् उत्तमपुरुष एकवचन मिप् प्रत्यय होऊन त्याला नि आदेश ( ३।४।८९ ) झाला आहे; तेव्हां हें वकारादि क्रियापद आहे, निपात नव्हे.

एवे चानियोगे पररूपं वक्तव्यम् । इह एव इहेव । अद्येव । अनियोग इति किमर्थम् । इहैव भव मा स्म गाः । अत्रैव त्वमिह वयं सुशेवाः ॥

## शकन्ध्वादिषु च ॥ ४ ॥

शकन्ध्वादिषु च पररूपं वक्तव्यम् । शक अन्धुः शकन्धुः । कुल अटा कुलटा । सीम अन्तः सीमन्तः । केशेष्विति वक्तव्यम् । यो हि सीम्नोऽन्तः सीमान्तः स भवति ॥

## ओत्वोष्ठयोः समासे वा ॥ ५ ॥

ओत्वोष्ठयोः समासे वा पररूपं वक्तव्यम् । स्थूलौतुः स्थूलोतुः । बिम्बौष्ठी बिम्बोष्ठी ॥

## एमनादिषु च्छन्दसि ॥ ६ ॥

एमनादिषु च्छन्दसि पररूपं वक्तव्यम् । अपां त्वेमन्सादयाम्यपां त्वोद्मन्सादयामि ॥

## ओमाङोश्च ॥ ६ । १ । ९५ ॥

किमर्थश्चकारः । एङीत्यनुकृष्यते । किं प्रयोजनम् । इह मा भूत् । अद्य आ ऋश्यात् अद्यार्श्यात् । कदार्श्यात् ॥ नैत-

---

( वा. ३ ) अवर्णाहून अनिश्चयार्थक एव शब्द पुढें असतांना पूर्व व पर यांचे स्थानीं पररूप होतें असें वचन करावें. जसें–इह–एव इहेव. अद्य–एव अद्येव.

अनिश्चयार्थक असें कशाकरितां म्हटलें आहे. ?

'इहैव[5] भव, मा स्म गाः' अशा ठिकाणीं पररूप न व्हावें म्हणून म्हटलें आहे.

( वा. ४ ) शकन्ध्वादि गणातील शब्दांमध्यें पररूप होतें असें वचन करावें. जसें–शक+अन्धुः = शकन्धुः, कुल+ अटा = कुलटा, वगैरे. सीमन्तः येथें पररूप होतें, पण त्याचा केशसंनिवेशविशेष हा अर्थ असतांना असें वचन करावें. जसें–सीम+अन्त=सीमन्तः. त्यामुळें सीमेचा अन्त म्हणजे शेवट असा अर्थ असतांना सीमान्तः असेंच रूप होतें.

( वा. ५ ) समासांत सांपडलेले ओतु व ओष्ठ शब्द पुढें असतांना विकल्पानें पररूप होतें असें वचन करावें. जसें–स्थूलौतुः[6] किंवा स्थूलोतुः. तसेंच बिम्बौष्ठी अथवा बिम्बोष्ठी.

( वा. ६ ) एमन् ओद्मन् वगैरे शब्द पुढें असतांना वेदामध्यें पररूप होतें असें वचन करावें. जसें–अपां त्वेमन्[7] सादयाम्यपां त्वोद्मन् सादयामि.

( सू. ९५ ) येथें चकार घालण्याचें काय प्रयोजन ?

चकारानें एङि पररूपम् येथील एङि या पदाची अनुवृत्ति दाखविली आहे.

त्या अनुवृत्तीचें काय प्रयोजन ?

आ+ऋश्यात् अर्श्यात्. अद्य+अर्श्यात्

---

५. येथेंच आस, दुसरीकडे कोठेंही जाऊं नकोस असा येथें निश्चय दाखविला आहे.

६. स्थूल असा ओतु म्ह. मार्जार असा कर्मधारय समास येथें आहे. बिंबाप्रमाणें ओठ जिचे आहेत असा बहुव्रीहि समास आहे. बिम्ब म्ह. तोंडलीचें फळ.

७. त्वा–एमन् त्वेमन्, त्वा–ओद्मन् त्वोद्मन् असें येथें पररूप झालें आहे.

१. ( सू. ९५ ) अवर्णाहून ओम् किंवा आङ् पुढें असतांना पूर्व व पर अचांचे स्थानी पररूप एकादेश होतो. उदा०– शिवाय ओं नमः शिवायों नमः; शिव एहि शिवेहि. एहि येथें आङ् उपसर्ग व पुढें इहि हें क्रियापद आहे व गुण एकादेश होऊन एहि असें झालें आहे. हा एकार पूर्वान्तवद्भावानें ( ६।१।८५ ) आङ् आहे असें समजून प्रकृत सूत्रानें शिव या शब्दांतील अकाराबरोबर पररूप झालें आहे.

२. ऋश्य म्हणजे मृग–विशेष. ऋश्यात् हें पंचमीचें

दस्ति प्रयोजनम् । अद्यर्श्यादित्येव भवितव्यम् । एवं हि सौनागाः पठन्ति । चोऽनर्थकोऽनधिकारादेङः ॥

## उस्योमाङ्क्ष्वाटः प्रतिषेधः ॥ १ ॥

उसि पररूप ओमाङोश्चाटः प्रतिषेधो वक्तव्यः । औस्रीयत् औढीयत् औंकारीयत् ॥ स तर्हि प्रतिषेधो वक्तव्यः । न वक्तव्यः । उक्तमाटश्च [ ९० ] इत्यत्र चकारस्य प्रयोजनं वृद्धिरेव यथा स्याद्यदन्यत्प्राप्नोति तन्मा भूदिति ॥

## उस्यपदान्तात्[1] ॥ ६ ॥ १ । ९६ ॥

अपदान्तादिति किमर्थम् । का उस्रा कोस्रा ॥ अपदान्तादिति शक्यमकर्तुम् । कस्मान्न भवति का उस्रा कोस्रा । अर्थवद्ग्रहणे नानर्थकस्येति । नैषा परिभाषेह शक्या विज्ञातुम् । इह हि दोषः स्यात् ।

---

अद्याश्यात्. कदा+अर्श्यात् कदार्श्यात्. येथें पररूप अ होऊं नये.

हें प्रयोजन होत नाहीं. कारण अद्य+अर्श्यात् असे असतां ' ओमाङोश्च ' यानें पररूप होऊन अद्यर्श्यात् असेंच रूप व्हावें. कारण सौनाग नांवाच्या वैयाकरणांचें असें म्हणणें आहे कीं— ओमाङोश्च येथें चकार फुकट आहे. येथें एङि या पदाची अनुवृत्ती येतच नाहीं.

( वा. १ ) आट् आगमाहून उस्, ओम् व आङ् हे पुढें असताना पररूपाच्या प्रतिषेधाकरितां वचन करावें. उदाहरणार्थ औस्रीयत्[3] औढीयत् औंकारीयत्.

तर मग तसा पररूपाचा प्रतिषेध अवश्य केलाच पाहिजे.

प्रतिषेध करावयास नको. कारण ' आटश्च ' ( ६।१।९० ) येथें आटाहून अच् पुढें असतांना वृद्धीच व्हावी, आणि तेथें दुसरें जें कांहीं प्राप्त होईल तें न व्हावें याकरितां चकार घातला आहे असें मागें ( पृ. १४० पं. १–२ ) चकाराचें प्रयोजन सांगितलें आहे.

( सू. ९६ ) येथें अपदान्तात् असें कशाकरितां म्हटलें आहे ?

का+उस्रा कोस्रा येथें पररूप न व्हावें म्हणून म्हटलें आहे.

अपदान्तात् हें केलें नाहीं तरी चालेल.

तर मग कोस्रा येथें पररूप कां बरें होत नाहीं ? ' अर्थवानाचें ग्रहण संभवत असतां अनर्थकाचें ग्रहण करूं नये ' ह्या परिभाषेनें कोस्रा येथें पररूप होत नाहीं.

ही परिभाषा येथें म्ह० उस् याविषयीं स्वीकारणें शक्य नाहीं. कारण उस् हा अर्थवान् घेतला तर भिन्द्या+उस् = भिन्द्युः, तसेंच

---

एकवचन आहे. आ-ऋश्यात् येथें आङ् आणि ऋकार यांचा गुण होऊन अर् असा एकादेश झाला आहे. तो अर् हा पूर्वान्तवद्भावानें आङ् समजून प्रकृत सूत्रानें पूर्वरूप झालें तर अद्यर्श्यात् असें होईल. एङि याची अनुवृत्ति आली म्हणजे आङ् पुढें आहे तरी एङ् नाहीं म्हणून पररूप होत नाहीं. तेव्हां सवर्णदीर्घ होऊन अद्यार्श्यात् असें होतें.

३. उस्रा, ओढ, आणि ओंकार या शब्दांहून क्यच् प्रत्यय ( ३।१।८ ), ह्रस्व ( ७।४।३३ ), धातुसंज्ञा ( ३।१।३२ ), पुढें लङ् प्रत्यय, मागें आट् आगम ( ६।४।७२ ), आणि वृद्धि ( ६।१।९० ) ही कार्यें झाली आहेत. वह् धातूहून क्त प्रत्यय संप्रसारण वगैरे होऊन ऊढ असा शब्द होतो. मागें आङ् उपसर्ग लागल्यावर गुण होऊन ओढ असा शब्द झाला आहे.

१. ( सू. ९६ ) अपदान्तीं असलेल्या अवर्णाहून उस् पुढें असतांना पूर्व व पर अचांचे स्थानीं पररूप एकादेश होतो. उदा० भिन्द्युः.

भिन्द्या उस् भिन्द्युः । छिन्द्या उस् छिन्द्युः ॥ एवं तर्हि लक्षणप्रतिपदोक्तयोः प्रतिपदोक्तस्यैवेत्येवं न भविष्यति ॥ उत्तरार्थं तर्ह्यपदान्तग्रहणं कर्तव्यम् । अतो गुणे [ ९७ ] अपदान्ताद्यथा स्यादिति । इह मा भूत् । दण्डाग्रम् क्षुपाग्रमिति ॥

## [ अतो गुणे ॥ ६।१।९७ ॥ ]

## अव्यक्तानुकरणस्यात इतौ ॥ ६।१।९८ ॥

**इतावनेकाज्ग्रहणं श्रदर्थम् ॥ १ ॥**

इतावनेकाज्ग्रहणं कर्तव्यम् । किं प्रयोजनम् । श्रदर्थम् । इह मा भूत् । श्रदिति ॥

## नाम्रेडितस्यान्त्यस्य तु वा ॥ ६।१।९९ ॥

**नित्यमाम्रेडिते डाचि ॥ १ ॥**

नित्यमाम्रेडिते डाचि पररूपं कर्तव्यम् । पटपटायति ॥

**अकारान्तानुकरणाद्वा ॥ २ ॥**

---

छिन्द्या+उस् = छिन्द्युः येथें पररूप होणार नाहीं असा दोष येईल.

तर मग ' लक्षणप्रतिपदोक्तयोः प्रतिपदोक्तस्यैव ग्रहणम् ' म्हणजे 'लाक्षणिक आणि प्रतिपदोक्त या दोघामध्यें प्रतिपदोक्ताचेंच ग्रहण करावें ' या परिभाषेनें प्रतिपदोक्त उस् असेल तेथेंच पररूप होईल, कोस्रा येथील उस् लाक्षणिक असल्यामुळें पररूप होत नाहीं.

तर मग उत्तर सूत्रामध्यें अनुवृत्तीकरितां अपदान्त–ग्रहण केलें पाहिजे. कारण अतो गुणे हें पररूप अपदान्तीं अकार असेल तरच झालें पाहिजे. दण्डाग्रम् क्षुपाग्रम् येथें होतां कामा नये.

(सू. ९८ वा. १) इति शब्द पुढें असतांना जें हें अनुकरणाला पररूप सांगितलें आहे तेथें अनेकाचः असें म्हणावें.

याचें काय प्रयोजन ?

अन् शेवटीं असलेला व एकच स्वर ज्यामध्यें आहे अशा अनुकरणरूप शब्दाहून होऊं नये. उदाहरणार्थ श्रत्-इति श्रदिति येथें न व्हावें.

(सू. ९९ वा. १) डाच् प्रत्यय पुढें असलेलें आम्रेडित पुढें असतांना पूर्व खंडांतील शेवटचा वर्ण आणि आम्रेडितांतील पहिला वर्ण या दोन वर्णांचे स्थानीं नित्य पररूप होतें असें वचन करावें. जसें–पटपटायति.

---

२. कारण, यासुट् हा उस् याचा आगम ( ३।४।१०३ ) असल्यामुळें नुसत्या उस् याला अर्थ नाहीं.

३. भिन्द्युः येथें झेर्जुस् ( ३।४।१०८ ) यानें उस् असा आदेश झाला आहे. तेव्हां तो प्रतिपदोक्त आहे. आणि उस्रा शब्दामधील उस् हा लाक्षणिक आहे. वस् धातूहून रक् प्रत्यय ( उणा. २।१३ ) केल्यानंतर वकाराला संप्रसारणानें ( ६।१।१५ ) उस् असें झालें आहे.

१. (सू ९७) अपदान्तीं असलेल्या ऱ्हस्व अकाराहून गुण पुढें असतांना पूर्व व पर यांचे स्थानीं पररूप एकादेश होतो. उदा०—भवन्ति, पचे.

१. (सू. ९८) ध्वनीच्या अनुकरणांतील जो अत् असा शब्द त्याहून इति शब्दांतील अच् पुढें असतांना पूर्व व पर यांचे स्थानीं पररूप एकादेश होतो. उदा०— पटत्-इति; येथें पटिति असें होतें.

१. (सू. ९९) अनुकरणाला जें पूर्व सूत्रानें पररूप सांगितलें आहे तें आम्रेडिताला ( ८।१।२ ) होत नाहीं. फक्त तेथें शेवटच्या तकाराला मात्र विकल्पानें होतें. उदा०— पटत्पटेति पटत्पटदिति.

२. पटत् या अनुकरणाला डाच् प्रत्यय कर्तव्य असल्यामुळें द्वित्व ( ८।१।१२ वा. ८ ), पुढें डाच् प्रत्यय ( ५।४।५७ ), नंतर तकार व पकार या दोन वर्णांचे स्थानीं प्रकृत वार्तिकानें पकार एकादेश, अत् या टीचा लोप ( ६।४।१४३ ), पुढें क्यष् प्रत्यय ( ३।१।१३ ), धातुसंज्ञा ( ३।१।३२ ) वगैरे कार्यें झालीं आहेत.

अथवाकारान्तमेतदनुकरणम् ॥ भवेत्सिद्धं यदाकारान्तं यदा तु खल्वच्छब्दान्तं तदा न सिध्यति । विचित्रास्तद्धितवृत्तयः । नातस्तद्धित उत्पद्यते ॥

**[ नित्यमाम्रेडिते डाचि ॥ ६।१।१०० ]**

**अकः सवर्णे दीर्घः ॥ ६।१।१०१॥**

**सवर्णदीर्घत्व ऋति ऋवावचनम् ॥१॥**

सवर्णदीर्घत्व ऋति ऋ वा भवतीति वक्तव्यम् । होतृ ऋकारः होतृकारः ।

**लृति लृवावचनम् ॥ २ ॥**

लृति लृ वा भवतीति वक्तव्यम् । होतृ लृकारः होतॢकारः ॥

इति श्रीभगवत्पतञ्जलिविरचिते व्याकरणमहाभाष्ये षष्ठस्याध्यायस्य प्रथमे पादे चतुर्थमाह्निकम् ॥

---

( वा. २ ) अथवा पट असें अकारान्तच अनुकरण समजल्यानें पटपटायति हें साधावें.

अकारान्ताचें अनुकरण मानलें असतां हें साधतें. पण पटत् असें अत् शब्द शेवटीं असलेलें अनुकरण समजलें असतां हें साधत नाहीं.

'विचित्रास्तद्धितवृत्तयः' म्हणजे तद्धितवृत्ती ह्या विचित्र आहेत. तेव्हां पटत् अशा अनुकरणाहून डाच् प्रत्ययच होत नाहीं.

( सू. १०१ वा. १ ) अकाहून सवर्ण अच् पुढें असतांना जो हा दीर्घ सांगितला आहे तेथें अकाहून सवर्ण असा ह्रस्व ऋकार पुढे असतांना पूर्व व पर यांचे स्थानीं विकल्पानें ऋ असा आदेश होतो असें वचन करावें उदा० होतृ ऋकारः, होतृकार:

( वा. २ ) ऱ्हस्व ऋकाराहून ऱ्हस्व लृकार पुढे असतांना पूर्वपरांचें स्थानीं विकल्पानें लृ असा आदेश होतो असें वचन करावें. उदा० होतृ लृकारः, होतॢकारः.

याप्रमाणें श्री भगवान् पतंजलि ऋषींनीं रचिलेल्या व्याकरणमहाभाष्याच्या सहाव्या अध्यायाच्या पहिल्या पादाचें चवथें आह्निक समाप्त झालें.

---

३. तात्पर्य, नित्यमाम्रेडिते डाचि हें वार्तिक नको.

४. तेभ्यः प्रयोगेभ्यः हिताः तद्धिताः–म्हणजे प्रयोग साधून देणारे–असा तद्धित हा शब्द अन्वर्थ आहे. तेव्हां मूळचे प्रामाणिक प्रयोग असतील ते तद्धित प्रत्ययानें साधतां येतात. परंतु त्या तद्धित प्रत्ययानें अनिष्ट प्रयोगाचें आपादन मात्र करावयाचें नाहीं.

१. ( सू. १०० ) नाम्रेडितस्या० या सूत्रावर जें ' नित्यमाम्रेडिते डाचि ' ( वा. १ ) असे वार्तिक आहे, तेंच येथें सूत्रपाठामध्यें आलेले आहे.

१. ( सू. १०१) अकाहून सवर्ण अच् पुढें असतांना पूर्व व परांचे स्थानी दीर्घ एकादेश होतो. उदा०– दैत्यारिः.

अध्याय ६ पाद १ आन्हिक ४ समाप्त.

## प्रथमयोः पूर्वसवर्णः ॥ ६ । १ । १०२ ॥

प्रथमयोरित्युच्यते कयोरिदं प्रथमयोर्ग्रहणं किं विभक्त्योराहोस्वित्प्रत्यययोः । विभक्त्योरित्याह । कथं ज्ञायते । अचीति वर्तते न चाजादी प्रथमौ प्रत्ययौ स्तः । ननु चैवं विज्ञायतेऽजादी यौ प्रथमावजादीनां वा यौ प्रथमाविति । यत्तर्हि तस्माच्छसो नः पुंसि [ १०३ ] इत्यनुक्रान्तं पूर्वसवर्णं प्रतिनिर्दिशति तज्ज्ञापयत्याचार्यो विभक्त्योर्ग्रहणमिति । अथवा सुपीति वर्तते ॥

अथ किमर्थं पूर्वसवर्णदीर्घोऽमि पूर्वत्वं चोच्यते न प्रथमयोः पूर्वसवर्ण इत्येव सिद्धम् । न सिध्यति । प्रथमयोः पूर्वसवर्ण इत्युच्यमाने ऽम्यपि दीर्घः प्राप्नोति । वृक्षम् प्लक्षम् । नैष दोषः । यत्पूर्वस्मिन्योगे दीर्घग्रहणं तदुत्तरत्र निवृत्तम् । एवमपीदमिह पूर्वसवर्णग्रहणं क्रियते तेनाम्यपि पूर्वसवर्णः

---

( सू. १०२ ) येथें प्रथमयोः असें म्हटलें आहे. या प्रथमयोः पदानें काय घ्यावें ? पहिल्या दोन विभक्ती घ्याव्या किंवा पहिले दोन प्रत्यय घ्यावे ?

प्रथमयोः या पदानें पहिल्या दोन विभक्ती म्हणजे प्रथमा आणि द्वितीया या विभक्ती घ्यावयाच्या असें ( सूत्रकार ) सांगतात.

हें कशावरून ठरविलें जातें ?

अशावरून कीं— येथें अचि याची अनुवृत्ति आहे. आणि पहिले दोन प्रत्यय घेतले तर त्यांतील पहिला सु प्रत्यय हा अजादि नाहीं.

पण ' अजादि असे जे पहिले दोन प्रत्यय' असें मी समजतों. किंवा 'अजादि प्रत्ययांमधील जे पहिले दोन प्रत्यय ' असाही अर्थ संभवतो. तेव्हां औ आणि जस् या दोन प्रत्ययाचेच ग्रहण प्राप्त होत आहे.

तर मग ' तस्माच्छसो नः पुंसि ' या पुढील सूत्रामधील तस्मात् या तद् शब्दानें या प्रकृत सूत्रांतील पूर्वसवर्णदीर्घाचा परामर्श आचार्य करीत आहेत. त्यावरून पहिल्या दोन विभक्तींचें ग्रहण ते सुचवितात. अथवा ' वा सुप्यापिशलेः ' येथून सुपि हें पद अनुवृत्तीने येत आहे.[3]

आतां पूर्वसवर्ण दीर्घ आणि 'अमि पूर्वः' हें पूर्वरूप अशीं दोन कार्यें निरनिराळीं कशाकरितां सांगितलीं आहेत. तशीं सांगू नयेत. एका पूर्वसवर्ण दीर्घानेंच काम भागेल.

एक पूर्वसवर्ण दीर्घच सांगितल्यानें काम भागणार नाहीं. कारण वृक्षम् व प्लक्षम् येथें अम् पुढें असतांनाही पूर्वसवर्ण दीर्घ प्राप्त होत आहे.

हा दोष येत नाहीं. कारण— ' अकः सवर्णे दीर्घः ' येथें केलेल्या दीर्घ–ग्रहणाची ' प्रथमयोः पूर्वसवर्णः ' येथें अनुवृत्ति करूं नये.

दीर्घग्रहण निवृत्त झालें तरीही येथें पूर्वसवर्णः असें म्हटलें असल्यामुळें वृक्षम् प्लक्षम् इत्यादि

---

१. ( सू. १०२ ) अकाहून प्रथमा किंवा द्वितीया या प्रत्ययांतील अच् पुढें असतांना पूर्व व पर यांचे स्थानीं पूर्वसवर्ण दीर्घ एकादेश होतो. उदाहरणार्थ— रामाः रामान्, हरी हरीन्.

२. 'तस्माच्छसो नः पुंसि' या सूत्रानें द्वितीया बहुवचन शस् प्रत्ययाच्या सकाराला नकार सांगितला आहे. जर तेथें पहिले दोन प्रत्यय घेतले तर शस् प्रत्यय केला असतां पूर्वसवर्ण दीर्घ संभवतच नाहीं म्हणून त्या सूत्राचा अर्थच जमत नाहीं.

३. त्या ' सुपि ' या शब्दानें सुपाला उद्देशून सांगितलेल्या ( १।४।१०४ ) विभक्ति संज्ञेचे येथें अनुसंधान होतें. म्हणून येथील प्रथमयोः यानें पहिल्या दोन विभक्ती घेतल्या जातात.

प्रसज्येत। वृक्षम् प्लक्षम्। द्विमात्रः प्राप्नोति। नैष दोषः। सवर्णग्रहणं न करिष्यते। यदि सवर्णग्रहणं न क्रियते कुतो व्यवस्था। आन्तर्यतः। यद्येवमग्नी वायू त्रिमात्रः प्राप्नोति वृक्षम् प्लक्षम् द्विमात्रः। तस्मात्सवर्णग्रहणं कर्तव्यं तस्मिंश्च क्रियमाणे दीर्घग्रहणमनुवर्तते तस्मिन्ननुवर्तमाने ऽमि पूर्व इत्यपि वक्तव्यम् ॥ अथ किमर्थं पृथगुच्यते नेहैवोच्येत प्रथमयोः पूर्वसवर्णोऽमि चेति। यदि प्रथमयोः पूर्वसवर्णदीर्घो भवत्यमि चेत्युच्यते तेनाम्यपि दीर्घः प्रसज्येत। वृक्षम् प्लक्षम्। नैष दोषः। दीर्घग्रहणं निवर्तयिष्यते। एवमपि पूर्वसवर्णः प्रसज्येत। सवर्णग्रहणं न करिष्यते। यदि सवर्णग्रहणं न क्रियते पूर्वस्मिन्योगे विप्रतिषिद्धम्। यदि पूर्वो न दीर्घोऽथ दीर्घो न पूर्वः पूर्वो दीर्घश्चेति विप्रतिषिद्धम्। तस्मादुभयमारब्धव्यं पृथक्च वक्तव्यम् ॥

**प्रथमयोरिति योगविभागः सवर्णदीर्घार्थः ॥ १ ॥**

---

स्थलीं अम् पुढे असतांना दोन मात्रांचा पूर्वसवर्ण प्राप्त होत आहेच.

हा दोष येत नाहीं. कारण पूर्वसवर्णः येथील सवर्णग्रहण काढून टाकलें जाईल.

पण जर सवर्णग्रहण काढून टाकलें तर वृक्षम् वगैरे स्थलीं ऱ्हस्वच आणि अग्नी वायू इत्यादि स्थलीं दीर्घच ही व्यवस्था कशी होईल ?

प्रमाणामुळें असलेल्या आन्तर्यानें ही व्यवस्था होईल[५]. पण असें म्हणावें तर वृक्षम् इत्यादि स्थलीं द्विमात्रिक आणि अग्नी वायू इत्यादि स्थलीं त्रिमात्रिक आदेश प्राप्त होतील[६]. एकंदरीत सवर्णग्रहण करणें जरूर आहे. आणि सवर्णग्रहण केलें असतां दीर्घग्रहणाचीही अनुवृत्ति केली म्हणजे 'अमि पूर्वः' हेंही निराळें विधान केलेंच पाहिजे.

आतां 'अमि पूर्वः' हें सूत्र निराळ्या प्रकरणांत कां बरें केलें आहे ? तसें करूं नये. तर 'प्रथमयोः पूर्वसवर्णः' याच्या पुढेंच 'अमि च' असें म्हणावें.

पण जर 'प्रथमयोः पूर्वसवर्णः' असें सांगून त्याच्या पुढे 'अमि च' असें म्हटलें तर वृक्षम् व प्लक्षम् येथें अम् पुढे असतांनाही दीर्घ प्रसक्त होईल.

हा दोष येत नाहीं. कारण–'अमि च' येथें दीर्घग्रहणाची अनुवृत्ति करूं नये.

तरीही पूर्वसवर्णाचें विधान होत असल्यामुळें पूर्वसवर्ण द्विमात्रिक असाच होऊं लागेल.

तर मग पूर्वसवर्णः यांतील सवर्णग्रहणही काढून टाकण्यांत येईल.

पण जर सवर्णग्रहण काढून टाकले तर पूर्वसूत्रांत विरोध येईल. तो असा–'प्रथमयोः पूर्वः' आणि 'अमि च' अशीं सूत्रें आतां झालीं. पूर्वसूत्रामध्यें दीर्घ या पदाची अनुवृत्ति आहे. तेव्हां अग्नी येथें जो पूर्व आहे तो दीर्घ नाहीं; व जो दीर्घ ई ऊ वगैरे आदेश झाला पाहिजे तो पूर्व नाहीं. तेव्हां पूर्व आणि दीर्घ हें म्हणणें परस्पर विरुद्ध होतें. तेव्हां दोन विधानें केलीं पाहिजेत-आणि तीं निरनिराळ्या प्रकरणांत केलीं पाहिजेत असें सिद्ध झालें.

( वा. १ ) येथें 'प्रथमयोः' असा योग-

---

४. तेव्हां अर्थातच वृक्षम् येथें पूर्वीचा ऱ्हस्व असल्यामुळें तोच होईल.

५. वृक्षम् येथें पुढील स्थानी ऱ्हस्व असल्यामुळें ऱ्हस्व आदेश होईल आणि अग्नी व वायू येथें पुढील स्थानी दीर्घ असल्यामुळें दीर्घ आदेश होईल.

६. वृक्षम् येथें दोन स्थानी मिळून दोन मात्रा होतात. अग्नी येथें तशा तऱ्हेनें तीन मात्रा होतात.

प्रथमयोरिति योगविभागः कर्तव्यः। प्रथमयोरकः सवर्णदीर्घो भवति । ततः पूर्वसवर्णः। पूर्वसवर्णदीर्घो भवत्यकः प्रथमयोरिति। किमर्थो योगविभागः। सवर्णदीर्घार्थः। सवर्णदीर्घत्वं यथा स्यात्॥

**एकयोगे हि जस्शसोः पररूपप्रसङ्गः ॥ २ ॥**

एकयोगे हि सति जस्शसोः पररूपं प्रसज्येत। वृक्षाः प्लक्षाः । वृक्षान् प्लक्षान्॥ ननु च पूर्वसवर्णदीर्घत्वं पररूपं बाधिष्यते। नोत्सहते बाधितुम्। किं कारणम्।

**आद्गुणयणादेशयोरपवादा वृद्धिसवर्णदीर्घपूर्वसवर्णादेशास्तेषां पररूपं स्वरसंधिषु ॥ ३ ॥**

आद्गुणयणादेशावुत्सर्गौ। तयोरपवादा वृद्धिसवर्णदीर्घपूर्वसवर्णादेशाः। तेषां सर्वेषां पररूपमपवादः। तत्सर्वबाधकम्। सर्वबाधकत्वात्प्राप्नोति॥ अथ क्रियमाणेऽपि योगविभागे यावता पररूपमपवादः कस्मादेव न बाधते। योगविभागोऽन्यशास्त्रनिवृत्त्यर्थः। योगविभागोऽन्यशास्त्रनिवृत्त्यर्थो विज्ञायते॥

**योगविभागोऽन्यशास्त्रनिवृत्त्यर्थश्चेदम्यतिप्रसङ्गः ॥ ४ ॥**

योगविभागोऽन्यशास्त्रनिवृत्त्यर्थश्चेदम्यतिप्रसङ्गो भवति। वृक्षम् प्लक्षम्। यथैव हि

---

विभाग करावा. अकाहून प्रथमा व द्वितीया या विभक्तींच्या संबंधीं सवर्ण अच् पुढें असतांना दीर्घ होतो असा पहिल्या सूत्राचा अर्थ होईल. त्यानंतर ' पूर्वसवर्णः ' असें दुसरें सूत्र होईल. अकाहून प्रथमा व द्वितीया या विभक्तींच्या संबंधीं अच् पुढें असतांना पूर्वसवर्ण दीर्घ एकादेश होतो असा त्याचा अर्थ होईल.

कशाकरितां बरें हा योगविभाग करावा लागत आहे ?

सवर्णदीर्घ झाला पाहिजे म्हणून. त्यामुळें वृक्षाः प्लक्षाः, वृक्षान् प्लक्षान् इत्यादि स्थलीं सवर्ण दीर्घ होऊं शकतो.

( वा. २ ) ' प्रथमयोः पूर्वसवर्णः ' असें एक सूत्र समजलें असतां वृक्षाः वृक्षान् इत्यादि जस् व शस् प्रत्यय पुढें असलेल्या स्थळीं 'अतो गुणे ' ( ६।१।९७ ) याने पररूप प्रसक्त होईलँ.

पण पूर्वसवर्ण दीर्घ हा पररूपाचा परत्वास्तव बाध करील.

बाध करूं शकणार नाहीं.

काय कारण ?

( वा. ३ ) स्वरसंधीमध्यें आद्गुण व यणादेश हे दोन सामान्य विधी आहेत. त्यांचे वृद्धि, सवर्णदीर्घ, आणि पूर्वसवर्ण हे अपवाद होत. आणि त्या सर्वांचें पररूप अपवाद आहे. तें सर्वांचें बाधक आहे. तेव्हां जस् व शस् हे प्रत्यय केले असतां पूर्वसवर्ण दीर्घाचा बाध करून पररूप प्राप्त होत आहे.

पण असेंच असेल तर योगविभाग केला असतांही हें पररूप अपवाद असल्यामुळें त्यानें सवर्ण दीर्घाचा बाध कां बरें केला जात नाहीं ?

'योगविभागोऽन्यशास्त्रनिवृत्त्यर्थः' म्हणजे योगविभागाचे जोरावर अन्यशास्त्राची म्ह० पररूपाची निवृत्ति करावयाची.

( वा. ४ ) योगविभागाचे जोरावर अन्यशास्त्राची निवृत्ति करावयाची तर वृक्षम् व प्लक्षम् येथें द्वितीया एकवचनामध्यें अतिप्रसंग येत आहे. म्हणजे योगविभागाचे जोरावर पर-

---

७. ' पूर्वसवर्णः ' या पुढील सूत्रानें हरीन् व भानून् येथें पूर्वसवर्ण दीर्घ होईल; पण वृक्ष वगैरे अकारान्त शब्द असतील तेथें त्याचा बाध करून पररूप होईल.

योगविभागः पररूपं बाधत एवममि पूर्वत्वमपि बाधेत ॥

**नकाराभावश्च तस्मादित्यनन्तरनिर्देशात् ॥ ५ ॥**

नत्वस्य चाभावः । वृक्षान् प्लक्षान् । किं कारणम् । तस्मादित्यनन्तरनिर्देशात् । तस्मादित्यनेनानन्तरो योगः प्रतिनिर्दिश्यते । किं पुनः कारणं तस्मादित्यनेनानन्तरो योगः प्रतिनिर्दिश्यते । इह मा भूत् । एतान्गाः पश्य ॥ अस्तु तर्ह्येकयोग एव । ननु चोक्तमेकयोगे हि जश्शसोः पररूपप्रसङ्ग इति । नैष दोषः ।

**इज्ग्रहणं तु ज्ञापकं पररूपाभावस्य ॥ ६ ॥**

यदयं नादिचि [ १०४ ] इतीज्ग्रहणं करोति तज्ज्ञापयत्याचार्यो न जश्शसोः पररूपं भवतीति । कथं कृत्वा ज्ञापकम् । इज्ग्रहणस्यैतत्प्रयोजनमिह मा भूत् । वृक्षाः प्लक्षाः । वृक्षान् प्लक्षान् । यदि च जश्शसोः पररूपं स्यादिज्ग्रहणमनर्थकं स्यात् । पश्यति त्वाचार्यो न जश्शसोः पररूपं भवतीति ततइज्ग्रहणं करोति ॥ नैतदस्ति ज्ञापकम् । उत्तरार्थमेतत्स्यात् । दीर्घाज्जसि च [ १०५ ]

---

रूपाचा जसा बाध केला जातो तसा ' अमि पूर्वः ' या पूर्वरूपाचाही बाध केला जाईल.

( वा. ५ ) शिवाय वृक्षान् व प्लक्षान् येथें पुढील सूत्रानें नत्व होणार नाहीं.

काय कारण ?

कारण असें कीं– ' तस्माच्छसो नः ' या सूत्रानें मागील सूत्राचा निर्देश केला आहे; त्या सूत्रांतील तद् शब्दानें अनंतर अशा मागील सूत्राचा परामर्श केला आहे.

पण तद् शब्दाने अनंतर असा मागील सूत्राचाच परामर्श करण्याचें काय प्रयोजन ?

एतान् गाः पश्य येथें पूर्वसवर्ण दीर्घ नसल्यामुळें नत्व न झालें पाहिजे.

तर मग ' प्रथमयोः पूर्वसवर्णः ' असें एकच सूत्र असूं दे.

पण एक सूत्र असलें तर वृक्षाः प्लक्षाः, वृक्षान् प्लक्षान् वगैरे स्थळीं जस् व शस् प्रत्यय केले असतां पूर्वसवर्णाचा बाध करून पररूप प्रसक्त होत आहे असा दोष पूर्वी दाखविला आहे ना ?

हा दोष येत नाहीं. कारण—

( वा. ६ ) ज्या अर्थी आचार्य पाणिनि ' नादिचि ' ( ६।१।१०४ ) येथें इज्–ग्रहण करीत आहेत त्या अर्थी जस् व शस् हे प्रत्यय केले असतां तेथें पररूप होत नाहीं असें ज्ञापन ते करीत आहेत.

तें इज्–ग्रहण ज्ञापक कसें होतें ?

ज्ञापक असें कीं– नादिचि येथें इज्–ग्रहणाचें प्रयोजन वृक्षाः प्लक्षाः वृक्षान् प्लक्षान् इत्यादि स्थलीं पूर्वसवर्ण दीर्घाचा निषेध न व्हावा हें आहे. पण जर जस् व शस् प्रत्यय केले असतां पररूपानें पूर्वसवर्ण दीर्घाचा बाध झाला तर इज्–ग्रहण व्यर्थ होत आहे. तेव्हां जस् व शस् प्रत्यय केले असतां तेथें पररूप होत नाहीं असें आचार्य खात्रीनें समजत आहेत; आणि म्हणूनच इज्–ग्रहण ते करीत आहेत.

हें ज्ञापक जमत नाहीं. कारण 'दीर्घाज्जसि च' येथें अनुवृत्ति होण्याकरितां इज्–ग्रहण आवश्यक आहे.

---

८. पुल्लिंगी गो शब्दाहून द्वितीया बहुवचन शस् प्रत्यय व आत्व ( ६।१।९३ ) झालें आहे. येथें पूर्वसवर्ण दीर्घ न झाल्यामुळें जसें नत्व होत नाही तसें वृक्षान् येथेही योगविभागानें पररूपाचा बाध करून सवर्णदीर्घ झाला तरी पूर्वसवर्णदीर्घ नसल्यामुळें नत्व होणार नाहीं.

९. निषेध न झाल्यामुळें पूर्वसवर्ण दीर्घ व्हावा.

१०. अनुवृत्ति आल्यामुळें दीर्घाहून इच् पुढें असतांना पूर्वसवर्ण दीर्घाचा निषेध सिद्ध होतो. उदा०– कुमार्यौ.

इचि चेति । यद्युत्तरार्थमेतत्स्यात्तत्रैवायमिज्ग्रहणं कुर्वीत । इहापि तर्हि क्रियमाणं यद्युत्तरार्थं न ज्ञापकं भवति । एवं तर्हि यद्युत्तरार्थमेतत्स्यात्रैवायमिज्ग्रहणं कुर्वीत नापि जस्ग्रहणम् । एतावदयं ब्रूयाद्दीर्घाच्छसि पूर्वसवर्णो भवतीति । तन्नियमार्थं भविष्यति । दीर्घाच्छस्येव नान्यत्रेति । सोऽयमेवं लघीयसा न्यासेन सिद्धे यदिज्ग्रहणं करोति तज्ज्ञापयत्याचार्यो न जस्शसोः पररूपं भवतीति ॥

अथवा पुनरस्तु योगविभागः । ननु चोक्तं योगविभागोऽन्यशास्त्रनिवृत्त्यर्थश्चेदम्यप्रतिप्रसङ्ग इति । नैष दोषः । योगविभागः करिष्यते । अमि । अमि यदुक्तं तन्न भवतीति । ततः पूर्वः पूर्वश्च भवत्यमीति ॥ यदप्युच्यते नकाराभावश्च तस्मादित्यनन्तरनिर्देशादिति कः पुनरर्हति तस्मादित्यनेनानन्तरं योगं प्रतिनिर्देष्टुम् । एवं किल प्रतिनिर्दिश्येत तस्मात्पूर्वसवर्णदीर्घादिति । तच्च न । एवं प्रतिनिर्दिश्यते तस्मा-

---

जर इज्–ग्रहण उत्तर सूत्रांत अनुवृत्ती होण्याकरितां आवश्यक आहे तर उत्तर सूत्रींच इज्–ग्रहण करावें. असें असतां येथें केलें म्हणून तें ज्ञापक होईलच.

आतां येथें करूनही उत्तरार्थ असल्यामुळें ज्ञापक होणार नाहीं असा आग्रह असेल तर जर हें इज्–ग्रहण उत्तरार्थ असतें तर उत्तरसूत्रीं इज्–ग्रहणही केलें नसतें व जस्–ग्रहणहीं केलें नसतें. तर लाघवास्तव ‘ दीर्घाच्छसि ’ एवढेंच सूत्र केलें असतें. दीर्घाहून शस् पुढें असतांना पूर्व सवर्ण दीर्घ होतो असा त्याचा अर्थ होऊन तें सूत्र नियमार्थ झालें असतें व त्याचा अर्थ दीर्घाहून शस् पुढें असतांनाच पूर्वसवर्ण दीर्घ होतो, अन्य ठिकाणीं होत नाहीं असा झाला असता. अशा रीतीनें लघुभूत सूत्रानेंच निर्वाह होत असतां ज्या अर्थी आचार्यांनीं इज्–ग्रहण केलें आहे त्या अर्थी जस् व शस् प्रत्यय केलें असतां पररूप होत नाहीं असें ते आचार्य सुचवीत आहेत.

अथवा प्रथमयोः असा जो योगविभाग पूर्वी केला आहे तोच असू दे.

पण योगविभागाचे जोरावर अन्य शास्त्राची निवृत्ति म्हटली तर जसा पररूपाचा बाध होतो तसा ‘ अमि पूर्वः ’ या पूर्वरूपाचाही बाध होईल व वृक्षम् इत्यादि स्थलीं अमाच्या उदाहरणांमध्येही सवर्णदीर्घाचा प्रसंग येईल असा पूर्वी दोष सांगितला आहे ना?

हा दोष येत नाहीं. कारण ‘अमि पूर्वः’ येथेंही योगविभाग करण्यांत येईल. ‘ अमि ’ एवढेच एक सूत्र होय. अम् पुढें असताना जें कार्य प्राप्त होतें तें होत नाहीं असा त्याचा अर्थ होईल. त्यानंतर ‘पूर्वः’ असें दुसरें सूत्र होय. अम् पुढें असताना पूर्वरूप होतें असा त्याचा अर्थ होईल.

तसेंच आणखी या योगविभाग–पक्षावर जो दोष दिला आहे कीं– वृक्षान् येथें नत्वही होणार नाहीं, कारण ‘तस्माच्छसः०’ येथील तद् शब्दानें अनंतर अशा पूर्व सूत्राचाच परामर्श केला आहे त्यासंबंधानें इतकेंच म्हणावयाचें आहे कीं–तस्मात् या तच्छब्दानें पूर्वसूत्राचा कोण बरें परामर्श करील ? पूर्वसवर्ण दीर्घ या कार्याचाच तस्मात् यानें परामर्श करावयाचा आहे व तो विशेष रूपानें नाहीं; तर सामान्य

---

११. वृक्षम् येथें ‘ प्रथमयोः ’ या योगविभागानें जो सवर्णदीर्घ प्राप्त होतो त्याचाही या योगविभागानें निषेध होतो. नंतर ‘ पूर्वः ’ या पुढील सूत्रानें पूर्वरूप होऊन वृक्षम् हें उदाहरण साधेल.

दृको दीर्घादिति । अथवा तस्मात्प्रथमयोर्दीर्घादिति ॥ अथवा पुनरस्त्वम्येकयोगः । ननु चोक्तं योगविभागोऽन्यशास्त्रनिवृत्त्यर्थश्चेदम्यतिप्रसङ्ग इति । नैष दोषः । मध्येऽपवादाः पूर्वान्विधीन् बाधन्त इत्येवमयं योगविभागः पररूपं बाधिष्यतेऽमि पूर्वत्वं न बाधिष्यते । यद्येतदस्ति मध्येऽपवादाः पुरस्तादपवादा इति नार्थ एकेनापि योगविभागेन । पुरस्तादपवादा अनन्तरान्विधीन् बाधन्ते इत्येवं पररूपं सवर्णदीर्घत्वं बाधिष्यते प्रथमयोः पूर्वसवर्णदीर्घत्वं न बाधिष्यते ॥

अथवा सप्तमे योगविभागः करिष्यते । इदमस्त्यतो दीर्घो यञि सुपि च [ ७.३.१०१;१०२ ] इति । ततो वक्ष्यामि बहुवचने चातो दीर्घो भवति । ततो झल्येत् ।

---

रूपानें अकाला सांगितलेल्या दीर्घाचा परामर्श करावयाचा आहे.[१२] अथवा प्रथमा व द्वितीया पुढे असतांना सांगितलेल्या दीर्घाचा परामर्श करावयाचा आहे.[१३]

किंवा ‘अमि पूर्वः’ असें एकच सूत्र असूं दे.

पण योगविभागाचे जोरावर अन्यशास्त्राची निवृत्ति करावयाची असें म्हटलें तर ‘प्रथमयोः’ हा योगविभाग वृक्षाः इत्यादि स्थलीं ‘अतो गुणे’ या पररूपाची जशी निवृत्ति करतो तशी वृक्षम् इत्यादि स्थलीं ‘अमि पूर्वः’ या पूर्वरूपाचीही निवृत्ति करील असा दोष पूर्वी दाखविला आहे ना ?

हा दोष येत नाहीं. कारण ‘मध्यें पठित असलेले अपवाद हे आपल्यापेक्षां पूर्वी असलेल्या विधींचाच बाध करतात, आपल्यापेक्षां पुढें असलेल्या विधींचा बाध करीत नाहींत’ असा न्याय असल्यामुळें हा ‘प्रथमयोः’ (६।१।१०२) योगविभाग ‘अतो गुणे’ (६।१।९७) या पररूपाचाच बाध करील, ‘अमि पूर्वः’ (६।१।१०७) या पूर्वरूपाचा बाध करणार नाहीं. जर ‘मध्येऽपवादाः०’ हा न्याय घेतला तर त्याच्याच जोडीचा ‘पुरस्तादपवादाः’ हा न्याय घेतला म्हणजे प्रथमयोः हाही योगविभाग करण्याची ही जरूर नाहीं. कारण ‘पूर्वी पठित असलेले अपवाद आपल्या जवळच्या विधींचा बाध करतात दूर असलेल्या विधींचा बाध करीत नाहींत’ या न्यायानें ‘अतो गुणे’ (६।१।९७) हें पररूप ‘अकः सवर्णे’ (६।१।१०१) या दीर्घाचाच बाध करील, पूर्वसवर्ण दीर्घाचा (६।१।१०२) बाध करणार नाहीं.

अथवा सातव्या अध्यायामध्यें योगविभाग करण्यांत येईल. तो असा: ‘अतो दीर्घो यञि’ व ‘सुपि च’ (७।३।१०२) या सूत्रांनंतर ‘बहुवचने’ असा योगविभाग करावयाचा व बहुवचन पुढें असतांना ऱ्हस्व अकारान्त अङ्गाल दीर्घ होतो[१४] असा त्याचा अर्थ करावयाचा त्यानंतर ‘झल्येत्’ असें सूत्र करून झलाि बहुवचन सुप् प्रत्यय पुढें असतांना ऱ्हस

---

१२. म्हणजे अकः सवर्णे दीर्घः, प्रथमयोः, आणि पूर्वसवर्णः, या तिन्हीं सूत्रांनीं सांगितलेल्या दीर्घाचा परामर्श होईल. त्यामध्यें ‘अकः सवर्णे दीर्घः’ या सूत्रानें सांगितलेल्या दीर्घाचा परामर्श करण्याचा कांहींच उपयोग नाहीं हें निराळें.

१३. म्हणजे प्रथमयोः आणि पूर्वसवर्णः या दो सूत्रांनीं सांगितलेल्या दीर्घाचाच परामर्श होईल.

१४. या योगविभागानें वृक्षाः येथें दीर्घ झा असतां ‘अतो गुणे’ या पररूपाची प्राप्तीच येत ना तेव्हां सवर्णदीर्घानें रूप साधतें.

एकारश्च भवति बहुवचने झलीति ॥ इहापि तर्हि प्राप्नोति । वृक्षाणाम् प्लक्षाणाम् । तत्र को दोषः । दीर्घत्वे कृते ह्रस्वाश्रयो नुण्न प्राप्नोति । इदमिह संप्रधार्यम् । दीर्घत्वं क्रियतां नुडिति । किमत्र कर्तव्यम् । परत्वाद्दीर्घत्वम् । नित्यं खल्वपि दीर्घत्वम् । कृतेऽपि नुटि प्राप्नोत्यकृतेऽपि । नित्यत्वात्परत्वाच्च दीर्घत्वे कृते ह्रस्वाश्रयो नुण्न प्राप्नोति । एवं तर्ह्याद्ग्रहणमिहापि प्रकृतमनुवर्तते । क प्रकृतम् । आज्जसेरसुक् [ ७. १. ५० ] इति । तेन कृतेऽपि दीर्घत्वे नुड्भविष्यति । इहापि तर्हि प्राप्नोति कीलालपाम् शुभंयाम् । आतो लोपोऽत्र बाधको भविष्यति । इदमिह संप्रधार्यम् । लोपः क्रियतां नुडिति किमत्र कर्तव्यम् । परत्वान्नुट् । एवं तर्हि ह्रस्वनद्यापो नुडित्यत्रातो धातोः [ ६. ४. १४० ] इत्यातो लोपः संबन्धमनुवर्तिष्यते । इहापि तर्हि

---

अकारान्त अङ्गाला एकार होतो असा त्या सूत्राचा अर्थ करावयाचा.

पण बहुवचने असा योगविभाग केला असतां वृक्षाणाम् व प्लक्षाणाम् येथेंही दीर्घ प्राप्त होत आहे.

तेथें दीर्घ झाला तर काय बरें दोष येईल ?

दीर्घ केला असतां ऱ्हस्व स्वराच्या निमित्तानें होणारा नुडागम ( ७।१।५४ ) होणार नाहीं.

तर मग येथें असा विचार करावा कीं—वृक्ष–आम् असें असतां 'बहुवचने' या योगविभागानें पहिल्यानें दीर्घ करावा किंवा नुट् करावा.

मग यांत काय बरें करावें ?

पर असल्यामुळें दीर्घ प्रथमतः करावा. शिवाय, दीर्घ नित्यही आहे. कारण, नुट् केला अथवा न केला तरी दीर्घ प्राप्त होत आहे. तेव्हां परत्वास्तव व नित्यत्वास्तव प्रथमतः दीर्घ केला असतां ऱ्हस्वामुळें होणारा नुडागम प्राप्त होऊं शकत नाहीं.

असें आहे तर आत् या पदाची अनुवृत्ति 'ऱ्हस्वनद्यापः०' येथें आणावी.

आत् असें पद मागें कोठें बरें आहे ?

आज्जसेरसुक् ( ७।१।५० ) येथें आहे.

तें अनुवृत्त केलें म्हणजे दीर्घ केला तरीही नुट् आगम होईल[15].

तरी पण कीलालपाम् शुभंयाम् इत्यादि ठिकाणींही नुट् होऊं लागेल[16].

तेथें 'आतो धातोः' ( ६।४।१४० ) हा लोप नुडागमाचा बाध करील. येथें असा विचार करावा कीं, कीलालपा–आम् असें असतां प्रथम आकाराचा लोप करावा किंवा नुट् करावा.

मग यांत काय बरें करावें ?

पर असल्यामुळें नुट् आगम होऊं लागेल.

तर मग आतां 'ह्रस्वनद्यापः' येथें लोपपदाशीं संबंध झालेल्या अशा 'आतः धातोः' या पदांची अनुवृत्ति करण्यांत येईल[17].

---

१५. आत् ही अकाराची पंचमी आहे. तेव्हां तो अकार ऱ्हस्व अथवा दीर्घ वाटेल तसा चालेल. ऱ्हस्वग्रहणाचा उपयोग इकार उकार वगैरेंविषयीं आहे.

१६. कीलाल उपपद पूर्वी असलेल्या पा धातूहून किप् प्रत्यय केला म्हणजे कीलालपा असा दीर्घ-आकारान्त शब्द सिद्ध होतो. त्याचें षष्ठीचें बहुवचन कीलालपाम् असें होतें.

१७. तेव्हां नुट् आगम सांगितल्यानंतर तेथेंच 'आकारान्त धातूच्या आकाराचा लोप होतो आम् पुढें असतांना' असा स्वतंत्र निराळा वाक्यार्थ झाला म्हणजे त्यामुळें नुट् आगमाचा बाध करून लोप होईल.

प्राप्नोति । कीलालपानां ब्राह्मणकुलानाम् । नपुंसकस्य नेत्यप्यनुवर्तिष्यते ॥

**तस्माच्छसो नः पुंसि ॥ ६ । १ । १०३ ॥**

किमिदं नत्वं पुंसां बहुत्वे भवत्याहोस्वित्पुंशब्दाद्बहुषु । कश्चात्र विशेषः ।

**नत्वं पुंसां बहुत्वे चेत्पुंशब्दादिष्यते स्त्रियाम् ।**

तन्न सिध्यति । भ्रूकुंसान्पश्येति ॥

**नपुंसके तथैवेष्टं**

तन्न सिध्यति । षण्ढान्पश्य । पण्डकान्पश्येति ॥

**स्त्रीशब्दाच्च प्रसज्यते ॥ १ ॥**

स्त्रीशब्दाच्च प्राप्नोति । चञ्चाः पश्य । वध्रिकाः पश्य । खरकुटीः पश्य ॥ अस्तु तर्हि पुंशब्दाद्बहुषु ।

---

पण तसें म्हटलें तर कीलालपानां ब्राह्मणकुलानाम् येथेंही लोप होऊं लागेल[१८].

तर मग तेथें नपुंसकात् आणि न या दोन पदांची अनुवृत्ति करावी म्हणजे काम भागेल[१९].

( सू. १०३ ) शसाच्या सकाराला होणारें हें नत्व पुरुषांचें बहुत्व असतांना होतें किंवा पुरुषांना दाखविणाऱ्या शब्दाहून बहुत्व या अर्थी शस् प्रत्यय केला असतांना होतें ?

या दोन तऱ्हांमध्यें काय बरें फरक आहे ?

( वा. १ ) पुरुषांचें बहुत्व दाखविणारा शस् प्रत्यय असेल तर नत्व होतें असें घेतलें तर स्त्रिया या अर्थाचा शब्द पुंलिंगी असतांना नत्व इष्ट आहे तें साधणार नाहीं. उदा० भ्रूकुंसान्[२] पश्य.

तसेंच नपुंसक ह्या अर्थाचा शब्द पुल्लिंगी असेल तेथे नत्व इष्ट आहे तेंही साधणार नाहीं. जसें—षण्ढान् पश्य; पण्डकान् पश्य.

तसेंच पुरुषांचें बहुत्व असतांना नत्व होतें असें म्हटलें तर पुरुष या अर्थाला दाखविणारा शब्द स्त्रीलिंगी असला तरीही नत्व होऊं लागले. जसें— चञ्चाः[३] पश्य, वध्रिकाः पश्यः, खरकुटीः पश्य.

तर मग पुरुषांना दाखविणारा शब्द असला म्हणजे त्या शब्दाहून बहुत्व या अर्थाच्या शसाच्या सकाराला नत्व होतें असाच पक्ष असूं दे.

---

१८. ब्राह्मणकुलांचें विशेषण असल्यामुळें येथें कीलालप असा नपुंसकलिंगी शब्द आहे. नपुंसकलिंगी प्रयोग केल्यास ऱ्हस्व ( १।२।४७ ) होऊन कीलालप असा अकारान्त शब्द होतो. त्याहून आम् प्रत्यय केला असतां ' बहुवचने ' या योगविभागानें दीर्घ होऊन नंतर ' ह्रस्वनद्यापो नुट् ' येथील स्वतंत्र वाक्यार्थानें नुट् आगमाचा बाध करून लोप होऊं लागेल.

१९. स्वमोर्नपुंसकात् ( ७।१।२३ ) आणि नेतराच्छन्दसि ( ७।१।२६ ) येथून नपुंसकात् आणि न या पदांची अनुवृत्ति करावी आणि स्वतंत्र वाक्यार्थानें जो लोप सांगितला आहे तो नपुंसक लिंगामध्यें होत नाहीं असा त्याचा शेष जोडला म्हणजे नपुंसक लिंगामध्यें लोप होणार नाहीं.

१. ( सू. १०३ ) पूर्वसवर्णदीर्घाहून पर असा जो शस् प्रत्ययाचा सकार त्याला पुल्लिंगामध्यें नकार आदेश होतो. उदा०-वृक्षान्.

२. पुंसि यांतील पुंम् शब्दाचा पुरुष हा अर्थ घेऊन हा विचार चालू केला आहे. पुरुष हे स्त्रियांचा वेष घेऊन जेव्हां नर्तन करतात तेव्हां त्या स्त्रियांना भ्रूकुंस म्हणतात. येथें स्त्रियांचें बहुत्व आहे. आतां त्या स्त्रिया कृत्रिम आहेत हें निराळें. अकृत्रिम स्त्रियांचें बहुत्व दाखववयाचें असतांनाही फक्त पुल्लिंगी शब्द आहे म्हणून नत्व झाल्याचेंही उदाहरण दारान् पश्य हें आहे.

३. चञ्चा म्हणजे गवताची बाहुली. हा शब्द स्त्रीलिंगी आहे. त्याहून त्यासारखा मनुष्य या अर्थी कन्

**पुंशब्दादिति चेदिष्टं स्थूरापत्यं न सिध्यति ।**

स्थूरान्पश्येति ॥

**कुण्डिन्या अररकायाः**

अपत्यं च न सिध्यति । कुण्डिनान्पश्य । अररकान्पश्य ॥

**पुंस्प्राधान्यात्प्रसिध्यति ॥ २ ॥**

पुंस्प्रधाना एते शब्दास्ततो नत्वं भविष्यति ॥

**पुंस्प्राधान्ये त एव स्युर्ये दोषाः पूर्वचोदिताः ।**

भ्रूकुंसान्पश्य । षण्ढान्पश्य । षण्डकान्पश्य । चञ्चाः पश्य । वध्रिकाः पश्य । खरकुटीः पश्येति ॥ तस्माद्यस्मिन्पक्षेऽल्पीयांसो दोषास्तमास्थाय प्रतिविधेयं दोषेषु ॥

**नत्वं पुंसां बहुत्वे चेत्पुंशब्दादिष्यते स्त्रियाम् ।**
**नपुंसके तथैवेष्टं स्त्रीशब्दाच्च प्रसज्यते ॥ १ ॥**
**पुंशब्दादिति चेदिष्टं स्थूरापत्यं न सिध्यति ।**
**कुण्डिन्या अररकायाः पुंस्प्राधान्या-**

(वा. २) पुरुषांना दाखविणारा शब्द असला म्हणजे नत्व होतें असें असेल तर स्थूरान् पश्य येथें इष्ट असलेलें नत्व साधत नाहीं.

तसेंच कुण्डिन्याः अपत्यानि या अर्थाच्या कुण्डिनान् शब्दामध्यें, तसेंच अररकायाः अपत्यानि या अर्थाच्या अररकान् या शब्दामध्येंही नत्व सिद्ध होणार नाहीं.

स्थूर, कुण्डिन व अररक हे शब्द जरी स्त्रीवाचक आहेत तरी त्या शब्दांपासून मुख्यत्वानें पुरुषांचा बोध होत असल्यामुळें नत्व होईल.

(वा. ३) पुरुषांचा मुख्यत्वानें बोध होतो म्हणून नत्व होतें असें असेल तर त्यामुळेंच भ्रूकुंसान् पश्य, षण्ढान् पश्य, चञ्चाः पश्य, वध्रिकाः पश्य, खरकुटीः पश्य या ठिकाणीं जे दोष पूर्वी दिले ते दोष आताही येत आहेत. तेव्हां ज्या पक्षावर दोष थोडे येत असतील तो पक्ष स्वीकारून त्या दोषांचे निराकरणाबद्दल प्रयत्न करावा.

---

प्रत्यय (५।३।९७) होऊन त्याचा लुप् होतो. (५।३।९८). येथे बाहुलीसारखे पुष्कळ पुरुष असा अर्थ आहे म्हणून नत्व होऊं लागेल. वध्रिका व खरकुटी येथेंही असेंच समजावें.

४. स्थूरा, कुण्डिनी व अररका या नांवांच्या स्त्रिया आहेत. या स्थूरा वगैरे शब्दांहून गोत्रापत्य या अर्थी यञ् प्रत्यय (४।१।१०५) होतो. ती अपत्यें पुष्कळ आहेत असें विवक्षित असतांना त्या यञ् प्रत्ययाचा लुक् (२।४।८४) सांगितला असल्यामुळें कुण्डिनी शब्दाच्या पुढील यञ् प्रत्ययाचा लुक् झाला आहे आणि कुण्डिनी शब्दाला कुण्डिन आदेश (२।४।९०) झाला आहे. स्थूरा व अररका यांतील टाप् प्रत्ययाचा लुक् (१।२।४९) झाल्यानंतर मागील शब्द त्या त्या नांवांच्या स्त्रियांना दाखविणारे आहेत, पुरुषांना दाखविणारे नाहीत; म्हणून नत्व होणार नाहीं. शस् प्रत्यय हा गोत्रापत्य जे पुरुष त्यांचें बहुत्व दाखविणारा आहे म्हणून पहिल्या पक्षीं हाही दोष येत नाहीं

५. पुंसि यातील पुंस् शब्दानें शास्त्रीय पुल्लिंग घेऊन 'पुंस्त्वविशिष्ट अर्थाचा प्रतिपादक जो शब्द त्यांतील पूर्वसवर्ण दीर्घाच्या पुढील शस् प्रत्ययाच्या सकाराला नत्व होतें' असा सूत्राचा अर्थ केला म्हणजे दोष येते नाहीं. भ्रूकुंस, षण्ढ हे शब्दही आपआपला अर्थ पुंस्त्वविशिष्ट अशा रूपानेंच दाखवितात. स्त्रिया व नपुंसक यांवरही शास्त्रीय पुल्लिंग आहेच. कारण सर्वच पदार्थांचें अर्थ पदार्थः असें पुल्लिंग शब्दानें प्रतिपादन करतां येतें. तसेंच स्थूरान्, कुण्डिनान् व अररकान् हींही उदाहरणें या पक्षीं साधतात. फक्त चञ्चाः, वध्रिकाः व खरकुटीः येथेंही नत्व होऊं लागेल असा दोष उरतो तो युक्तवद्भावानें (१।२।५१) दूर करावा.

त्प्रसिध्यति ॥ २ ॥
पुंस्प्राधान्ये त एव स्युर्ये दोषाः पूर्वचोदिताः ।
तस्मादर्थे भवेन्नत्वं वध्रिकादिषु युक्तवत् ॥ ३ ॥

[ [1]नादिचि ॥ ६ । १ । १०४ ॥
[1]दीर्घाज्जसि च ॥ ६ । १ ।१०५॥
[1]वा छन्दसि ॥ ६ । १ । १०६॥]
[1]अमि पूर्वः ॥ ६ । १ । १०७ ॥

वा छन्दसीत्येव । यमीं च यम्यं च । शमीं च शम्यं च । गौरीं च गौर्यं च । किशोरीं च किशोर्यं च ॥

[1]संप्रसारणाच्च ॥ ६ । १ ।१०८ ॥

वा छन्दसीत्येव । मित्रावरुणौ यज्यमानः । मित्रावरुणौ इज्यमानः ॥

संप्रसारणात्परपूर्वत्वे समानाङ्गग्रहणमसमानाङ्गप्रतिषेधार्थम् ॥ १ ॥

संप्रसारणात्परपूर्वत्वे समानाङ्गग्रहणं कर्तव्यम् । किं प्रयोजनम् । असमानाङ्गप्रतिषेधार्थम् । असमानाङ्गस्य मा भूदिति । शकहूर्थम् परिव्यर्थम् ॥

सिद्धमसंप्रसारणात् ॥ २ ॥

सिद्धमेतत् । कथम् । असंप्रसारणात् ।

---

( सू. १०७ ) येथें 'वा छन्दसि' या पूर्वसूत्राची [2]अनुवृत्ति आहे. उदाहरणार्थ–शमीं च शम्यं च; गौरीं च गौर्यं च, किशोरीं च किशोर्यं च.

( सू. १०८ ) येथेंहीं पूर्वीप्रमाणें ' वा छन्दसि ' याचा संबंध करावयाचा आहे. उदाहरणार्थ— मित्रावरुणौ [2]यज्यमानः, मित्रावरुणौ इज्यमानः.

( वा. १ ) संप्रसारणाला जें हें पुढील वर्णाबरोबर सांगितलेलं पूर्वरूप त्याविषयीं [3]समानाङ्ग ग्रहण करावें.

काय प्रयोजन ?

संप्रसारण व त्याच्या पुढील अच् हे दोन्ही वर्ण समान अंगामध्यें सांपडले नसतील तर तेथें संप्रसारण न व्हावें म्हणून. उदा० [4]शकहूर्थम्. परिव्यर्थम्.

( वा. २ ) येथें पूर्वरूपाचा अभाव साधत आहे.

तो कसा ?

---

१. ( सू. १०४ ) अवर्णाहून इच् पुढें असतांना पूर्वसवर्ण दीर्घ होत नाही. उदा०-वृक्षौ.

१. ( सू. १०५ ) दीर्घाहून जस् प्रत्यय किंवा इच् पुढें असतांना पूर्वसवर्णदीर्घ होत नाहीं. उदा०-गौर्यौ गौर्यः.

१. (सू. १०६ ) वेदामध्यें दीर्घाहून जस् प्रत्यय किंवा इच् पुढें असतांना पूर्वसवर्णदीर्घ विकल्पानें होतो. उदा०–मारुतीश्चतस्रः, मारुत्यश्चतस्रः.

१. ( सू. १०७. ) अकाहून अम्-संबंधी अच् पुढें असतांना पूर्व व पर यांचे स्थानीं पूर्वरूप एकादेश होतो. उदा०वृक्षम्, हरिम्.

२. तेव्हां हें पूर्वरूपही वेदामध्यें विकल्पानें होतें असा येथें वाक्यभेदानें अर्थ होतो.

१. ( सू. १०८ ) संप्रसारणाहून अच् पुढें असतांना पूर्व व पर यांचे स्थानीं पूर्वरूप एकादेश होतो. उदा० गृह्णाति.

२. वा छन्दसि याचा वाक्यभेदानें संबंध केला म्हणजे हें पूर्वरूप विकल्पानें होतें. यज्यमानः येथें यकाराला संप्रसारणानें ( ६।१।१५ ) इकार झाल्यानंतर हें पूर्वरूप केलें नाहीं त्यावेळी त्या इकाराला यकार होऊन यज्यमानः असें होतें.

३. संप्रसारणाला निमित्त अशा प्रत्ययामुळें ज्याला अंगसंज्ञा झाली असेल त्याच अंगामध्यें संप्रसारण व त्याच्या पुढील अच् हे दोन्ही असतील तरच पूर्वरूप होतें.

४. शकहू आणि परिवी ह्या शब्दांचा ( ६।१।८६ टी. ४ ) अर्थ शब्दाशीं समास झाला आहे. येथें क्विप् प्रत्ययाच्या निमित्तानें संप्रसारण झालें आहे. त्या क्विप् प्रत्ययामुळें हू आणि वी यांना अंगसंज्ञा झाली आहे. त्या अंगामध्यें अर्थ शब्दांतील अकार नाहीं.

वाक्यस्य संप्रसारणसंज्ञा न वर्णस्य ॥ अथ वर्णस्य संप्रसारणसंज्ञायां दोष एव । वर्णस्य च संप्रसारणसंज्ञायां न दोषः । कथम् । अन्योऽयं संप्रसारणासंप्रसारणयोः स्थान एक आदिश्यते ॥

**कार्यकृतत्वाद्वा ॥ ३ ॥**

अथवा सकृत्कृतं पूर्वत्वमिति कृत्वा पुनर्न भविष्यति । तद्यथा । वसन्ते ब्राह्मणोऽग्नीनादधीतेति सकृदाधाय कृतः शास्त्रार्थ इति कृत्वा पुनःप्रवृत्तिर्न भवति ॥ विषम उपन्यासः । युक्तं यत्तस्यैव पुनःप्रवृत्तिर्न भवति यत्तु तदाश्रयं प्राप्नोति न तच्छक्यं बाधितुम् । तद्यथा । वसन्ते ब्राह्मणो ऽग्निष्टोमादिभिः क्रतुभिर्यजेतेत्यग्न्याधाननिमित्तं वसन्ते वसन्त इज्यते । तस्मात्पूर्वोक्त एव परिहारः सिद्धमसंप्रसारणादिति ॥ यदि तर्हि नेदं संप्रसारणं हूत इति दीर्घत्वं न प्राप्नोति ।

**दीर्घत्वं वचनप्रामाण्यात् ॥ ४ ॥**

अनवकाशं दीर्घत्वं तद्वचनप्रामाण्याद्भविष्यति ॥

---

असा कीं– ऊकार आणि ईकार हे संप्रसारणसंज्ञक नाहींत म्हणून.

त्यांना संप्रसारण संज्ञा कां बरें होत नाहीं ?

'इग्यणः' या वाक्याला संप्रसारणसंज्ञा सांगितली आहे, वर्णाला सांगितली नाहीं म्हणून.[५]

तर मग वर्णसंज्ञा-पक्षीं हा दोषच समजावयाचा काय ?

वर्णाला संप्रसारणसंज्ञा होते या पक्षींही दोष नाहीं.

तो कसा ?

संप्रसारण व असंप्रसारण या दोहोंचे स्थानीं स्वतंत्रच हा एकादेश केला आहे.[६]

( वा. ३ ) अथवा या लक्ष्यामध्यें एकदां पूर्वरूप हें कार्य केलें असल्यामुळें पुन्हां तें होणार नाहीं. जसें– 'वसन्त ऋतूंत ब्राह्मणानें अग्नींचें आधान करावें' असें सांगितलें असतां एकदां आधान केल्यानें शास्त्र संभाळलें जातें तेव्हां पुनः आधान केलें जात नाहीं.

हा दृष्टांत बरोबर नाहीं. कारण अग्निसंस्कारासाठीं हें आधान करावयाचें असतें तें एकदां केल्यानें अग्निसंस्कार झाला, तेव्हां पुनः संस्कार करण्याचें प्रयोजनच उरत नसल्यामुळें पुनः प्रवृत्ति होत नाहीं हे योग्य आहे. पण त्या आधानाच्या निमित्तानें जें कार्य प्राप्त होईल त्याचा बाध होणें शक्य नाहीं. उदा० 'वसन्तामध्यें ब्राह्मणानें अग्निष्टोमादिक क्रतु करावे' असें सांगितलें असतां आधानामुळें प्राप्त होणारें अग्निष्टोमादिक क्रतूंचें अनुष्ठान प्रत्येक वसंतामध्यें केलें जातें. तेव्हां येथें 'सिद्धमसंप्रसारणात्' हा पूर्वी सांगितलेलाच परिहार समजावा.

पण जर पूर्वरूपानें झालेला आदेश संप्रसारण नव्हे तर हूतः या ठिकाणीं त्याला 'हलः' ( ६।४।२ ) यानें दीर्घही होणार नाहीं.

( वा. ४ ) दीर्घाला पूर्वरूपाशिवाय अन्यत्र कोठेंच चारितार्थ्य नसल्यामुळें तो व्यर्थ होत आहे म्हणून त्या जोरावर संप्रसारणाचे ठिकाणीं आहे.[७]

---

५. 'इग्यणः०' (१।१।४५) येथील भाष्य पृ. १११ पं २ पहावें. तेथें वाक्याला संप्रसारण संज्ञा किंवा वर्णाला संप्रसारण संज्ञा हे दोन्ही पक्ष दिले आहेत.

६. ह्वा धातूमधील वकाराला संप्रसारण उकार झाल्यानंतर तो उकार व पुढील आकार या दोघांचे स्थानीं प्रकृत सूत्रानेंच पूर्वी शकहू येथें एकादेश झाला

७. तसेंच येथें जरी संप्रसारणाला एकदां पूर्वरूप केलें तरी त्या पूर्वरूपानें झालेल्या उकाराला दीर्घ ( ६।४।२ ) केल्यानंतर त्याला पुनः पूर्वरूप होईल. कारण शास्त्रप्रक्रियापूर्वक प्रयोग करणाऱ्याला अधिक फळ मिळणार आहे.

## अन्तवत्त्वाद्वा ॥ ५ ॥

अथवा पूर्वस्य कार्यं प्रत्यन्तवद्भवतीति दीर्घत्वं भविष्यति ॥

## आटो वृद्धेरियङ् ॥ ६ ॥

आटो वृद्धिर्भवतीत्येतस्मादियङ् भवति विप्रतिषेधेन । आटो वृद्धिर्भवतीत्यस्यावकाशः । ऐक्षिष्ट ऐहिष्ट । इयङोऽवकाशः । अधीयाते अधीयते । इहोभयं प्राप्नोति । अध्यैयाताम् अध्यैयत । इयङादेशो भवति विप्रतिषेधेन ॥ नैष युक्तो विप्रतिषेधः । अन्तरङ्गाटो वृद्धिः । कान्तरङ्गता । वर्णावाश्रित्याटो वृद्धिरङ्गस्येयङादेशः । एवं तर्हीदमिह संप्रधार्यम् । आट् क्रियतामियङादेश इति किमत्र कर्तव्यम् । परत्वादियङ् । नित्य आडागमः । कृतेऽपीयङि प्राप्नोत्यकृतेऽपि । इयङपि नित्यः । कृतेऽप्याटि प्राप्नोत्यकृतेऽपि । अनित्य इयङ् न हि कृत आटि प्राप्नोति । किं कारणम् । अन्तरङ्गाटो वृद्धिः । यस्य च लक्षणान्तरेण निमित्तं विहन्यते न तदनित्यम् । न चात्राडेवेयङो निमित्तं विहन्त्यवश्यं लक्षणान्तरमाटो वृद्धिः प्रतीक्ष्या । उभयोर्नित्ययोः पर-

---

झालेला वर्ण संप्रसारण समजून त्याला दीर्घ होईल.

( वा. ५ ) अथवा पूर्वरूपानें झालेल्या एकादेशाला पूर्वान्तवद्भावानें ( ६।१।८५ ) संप्रसारण समजून दीर्घ होईल.

( वा. ६ ) ' आटश्च ' या वृद्धीपेक्षां विप्रतिषेध असल्यामुळें इयङ् प्रथमतः होतो. 'आटश्च' या वृद्धीला ऐक्षिष्ट ऐहिष्ट इत्यादि ठिकाणीं अवकाश आहे, व अधीयाते अधीयते येथें इयङाला अवकाश आहे; आणि अध्यैयाताम् अध्यैयत येथें दोहोंची प्राप्ति येत असतां पूर्वी इयङ् होतो.

हा विप्रतिषेध योग्य दिसत नाहीं. कारण ' आटश्च ' ही वृद्धि अंतरंग आहे.

तें अंतरंगत्व कसें ?

असें कीं-वृद्धीला आट् व अच् या दोन वर्णांचाच फक्त आश्रय आहे, व इयङाला अंगाचा आश्रय आहे.

असें आहे तर मग येथें प्रथम हा विचार करावा कीं अगोदर आट् आगम करावा अथवा इयङ् करावा.

मग यापैकीं काय बरें करावें ?

पर असल्यामुळें इयङ् करावा.

पण आट् आगम नित्य आहे. कारण इयङ् केला अथवा न केला तरी आट् प्राप्त होत आहे.

इयङ्ही पण नित्य आहे कारण तोही आट् केला अथवा न केला तरीही प्राप्त होत आहेच.

तरी पण इयङ् अनित्य आहे. कारण आट् केल्यावर तो प्राप्त होत नाहीं.

काय कारण ?

कारण असें कीं–'आटश्च' ह्या अंतरंग वृद्धीनें इयङाचा बाध होत आहे.

पण ज्याच्या निमित्ताचा लक्षणान्तरानें विघात केला जातो तें अनित्य म्हटलें जात नाहीं. आणि येथें आट् हाच कांहीं इयङाच्या निमित्ताचा विघात करीत नाहीं तर त्या कामीं वृद्धिरूपीं लक्षणान्तराची प्रतीक्षा केली पाहिजे. तेव्हां दोघांनाही नित्यत्व असल्यामुळें परत्वास्तव अगोदर इयङ् आदेश होतो.[९]

---

८. तेव्हां जरी वृद्धीनें इयङाचा बाध होणार आहे तरी आट् केल्यानंतर इयङाची प्राप्ति येत नाहीं. कारण आट् आगमानें कांहीं इयङाचें निमित्त नष्ट केलें जात नाहीं. तात्पर्य इयङ्ही नित्य आहे असें सिद्ध होतें.

९. इयङ् आदेश झाल्यानंतर आट् व वृद्धि होऊन अध्यैयाताम् इत्यादि उदाहरणें सिद्ध होतात. म्हणून ' आटो वृद्धेरियङ् ' या वचनाची जरूर नाहीं.

स्वादियङादेशः ॥

**आद्गुणात्सवर्णदीर्घत्वमाङभ्यासयोः ॥ ७ ॥**

आद्गुणात्सवर्णदीर्घत्वं भवति विप्रतिषेधेन । क्व । आङभ्यासयोः । आद्गुणस्यावकाशः । खट्वेन्द्रः खट्वोदकम् । सवर्णदीर्घत्वस्यावकाशः । दण्डाग्रम् क्षुपाग्रम् । इहोभयं प्राप्नोति । अद्य आ ऊढा अद्योढा । कदा आ ऊढा कदोढा । उप इइजतुः उपेजतुः । उप उउपतुः उपोपतुः । सवर्णदीर्घत्वं भवति विप्रतिषेधेन ॥ अभ्यासार्थेन तावन्नार्थः । अस्त्वत्राद्गुणो ऽयवौ च हलादिशेषः पुनराद्गुणो भविष्यति । भवेत्सिद्धम् उपेजतुः उपेजुरिति । इदं तु न सिध्यति उपोपतुः उपोपुरिति । अत्र ह्याद्गुणे कृत ओदन्तो निपात इति प्रगृह्यसंज्ञा प्रगृह्यः प्रकृत्येति प्रगृह्याश्रयः प्रकृतिभावः प्राप्नोति । पदान्तप्रकरणे प्रकृतिभावो न चैष पदान्तः । पदान्तभक्तः पदान्तग्रहणेन ग्राहिष्यते । एवं तर्ह्येतदेवात्र नास्त्योदन्तो निपात इति किं कारणम् । लक्षणप्रतिपदोक्तयोः प्रतिपदोक्तस्यैवेति ॥ इहापि तर्हि अद्योढा कदोढेति भवेद्रूपं सिद्धं स्यात् ।

**स्वरे दोषस्तु ॥ ८ ॥**

स्वरे तु दोषो भवति । अद्योढा एवं स्वरः प्रसज्येत अद्योढा इति चेष्यते ॥

---

( वा. ७ ) ' आद् गुणः ' (६।१।८७) या गुणापेक्षां विप्रतिषेध असल्यामुळें सवर्णदीर्घ ( ६।१।१०१ ) अगोदर होतो.

तो कोठें होतो ?

आङ् किंवा अभ्यास यांचे ठिकाणीं होतो. 'आद् गुणः' याला खट्वा–इन्द्रः खट्वेन्द्रः. खट्वा–उदकम् खट्वोदकम् येथे अवकाश आहे व सवर्णदीर्घाला दण्डाग्रम् क्षुपाग्रम् येथें अवकाश आहे; आणि अद्य–आ–ऊढा अद्योढा, कदा–आ–ऊढा कदोढा, उप–इ–इजतुः उपेजतुः. उप–उ–उपतुः उपोपतुः येथें दोघांचीही प्राप्ति आली असतां परत्वास्तव सवर्णदीर्घ अगोदर होतो.

अभ्यासासंबंधानें विप्रतिषेध मानण्यांत उपयोग नाहीं. उप इ इजतुः येथें प्रथमतः 'आद् गुणः' यानें गुण होवो. गुण केल्यानंतर एकार व ओकार यांना अय् व अव् आदेश होतील. यकार व वकार यांचा 'हलादिः शेषः' (७।४।६०) यानें लोप करून पुनः गुण केला म्हणजे रूप सिद्ध होईल. अशा रीतीनें उपेजतुः उपेजुः हीं रूपें साधतील, परंतु उपोपतुः उपोपुः हीं साधणार नाहींत. येथें गुण केला असतां ओदन्त निपात झाल्यामुळें ' ओत् ' ( १।१।१५ ) यानें प्रगृह्यसंज्ञा होईल व प्रकृतिभाव प्राप्त होईल.

पदान्त–प्रकरणामध्यें प्रकृतिभाव पठित आहे; आणि उपो हें ओकारान्त तर पदान्त नाहीं.

पदान्ताचे स्थानीं झाला असल्यामुळें पूर्वान्तवद्भावानें पदान्त होईल.

असें आहे तर मग आम्ही असें म्हणतों कीं–येथें प्रगृह्यसंज्ञाच मुळीं होत नाहीं. कारण, 'लक्षणप्रतिपदोक्त०' परिभाषेनें प्रतिपदोक्त ओकार घ्यावयाचा असतो आणि उपो येथील ओकार गुण शब्दानें झाला असल्यामुळें लाक्षणिक आहे. तेव्हां अभ्यासाविषयीं सवर्ण दीर्घाच्या विप्रतिषेधाचा उपयोग येत नाहीं.

तर मग आङाविषयींही विप्रतिषेधानें अद्योढा कदोढा हीं रूपें साधतात तरी—

( वा. ८ ) स्वरासंबंधानें दोष येत आहे. तो असा–अद्योढा असा मध्य-स्वरितही होऊं

---

१०. उप हा उपसर्ग निपातसंज्ञक आहे. त्यांतील अकाराचा अभ्यासांतील उकाराबरोबर गुण होऊन ओकार आदेश झाल्यानंतर उपो हा पूर्वान्तवद्भावानें ओकारान्त निपात होतो.

आङि पररूपवचनं चेदानीमनर्थकं स्यात् । नानर्थकम् । ज्ञापकार्थम् । किं ज्ञाप्यम् ॥

**आङि पररूपवचनं तु ज्ञापकमन्तरङ्ग-बलीयस्त्वस्य ॥ ९ ॥**

एतज्ज्ञापयत्याचार्योऽन्तरङ्गं बलीयो भवतीति । किं पुनरिहान्तरङ्गं किं बहिरङ्गं यावता द्वे पदे आश्रित्य सवर्णदीर्घत्वमपि भवत्याद्गुणोऽपि । धातूपसर्गयोर्यत्कार्यं तदन्तरङ्गम् । कुत एतत् । पूर्वमुपसर्गस्य हि धातुना योगो भवति नाद्यशब्देन । किमर्थं तर्ह्यद्यशब्दः प्रयुज्यते । अद्यशब्दस्यापि समुदायेन योगो भवति ॥ किमेतस्य ज्ञापने प्रयोजनम् ।

**प्रयोजनं पूर्वसवर्णपूर्वत्वतहिलोपटेन-ङेर्यङिस्मिन्ङिणलौत्वमन्तरङ्गं बहिरङ्ग-लक्षणाद्वर्णविकारात् ॥ १० ॥**

पूर्वसवर्णः प्रयोजनम् । अग्नी अत्र । वायू अत्र । पूर्वसवर्णश्च प्राप्नोति बहिरङ्ग-

---

लागेल आणि अद्योढा असें मध्योदात्त एकच इष्ट आहे.

शिवाय, आतां विप्रतिषेधानें सवर्णदीर्घ अगोदर झाला तर आङ् पुढें असतांना पररूपाचें विधान केलें आहे तें व्यर्थ होईल.

पररूपाचें विधान व्यर्थ नाहीं. ज्ञापनाकरितां त्याचा उपयोग आहे.

ज्ञापनानें काय बरें समजावयाचें आहे ?

( वा. ९ ) आङ् पुढें असतांना पररूपाचें विधान केलें आहे त्यावरून अंतरंग बलवान् आहे, असें आचार्य ज्ञापन करीत आहेत.

पण येथें कोण अंतरंग व कोण बहिरंग आहे ? कारण, सवर्णदीर्घ व आद्गुण या दोघांनाही दोन पदांची अपेक्षा आहे.

पण त्यांमध्यें धातु व उपसर्ग या दोघांचा आश्रय करून प्रवृत्त होणारें कार्य अंतरंग होय.

हें कशावरून ?

अशावरून कीं— धात्वर्थाशीं उपसर्गार्थाचा संबंध अगोदर होतो तसा अद्य वगैरे शब्दांशीं अगोदर संबंध होत नाहीं.

तर मग अद्य या शब्दाचा प्रयोग तरी कशाकरितां करावयाचा ?

अद्य या शब्दाचा सर्वथा संबंध होत नाहीं असें नाहीं. तर उपसर्गार्थ व धात्वर्थ यांचा संबंध झाल्यानंतर त्या विशिष्ट धात्वर्थाशीं अद्य वगैरे इतर पदाचा संबंध होतो.

अंतरंगाला बलीयस्त्व-ज्ञापन केल्याचें काय प्रयोजन ?

( वा. १० ) पूर्वसवर्ण दीर्घ, पूर्वरूप, त प्रत्ययाचा लोप, हि प्रत्ययाचा लोप, टा प्रत्ययाला इन आदेश, ङे प्रत्ययाला य आदेश, ङि प्रत्ययाला स्मिन् आदेश, ङि प्रत्ययाला औत्व, णलाला औत्व, हे विधी दुसऱ्या पदामुळें प्राप्त होणाऱ्या बहिरंग अशा वर्णविकारापेक्षां अंतरंग असल्यामुळें प्रथमतः होतात. उदा०— अग्नी अत्र, वायू अत्र. येथें अग्नि औ अत्र अशी स्थिति असतांना पूर्वसवर्णदीर्घ ( ६।१।१०२ ) प्राप्त होतो आणि बहिरंग असा आव् आदेश ( ६।१।७८ ) हा

---

११. अद्य यांतील द्य प्रत्ययाच्या ( ५।३।२२ ) स्वरानें ( ३।१।३ ) शेवटचा अकार उदात्त आहे. आ हा प्रकृतिस्वरानें ( ६।२।४९ ) उदात्त आहे. अर्थातच त्या दोघांचे स्थानीं सवर्णदीर्घ हा उदात्तच होईल. नंतर ऊढा यांतील शेषनिघातानें ( ६।१।१५८ ) अनुदात्त अशा ऊकाराबरोबर होणारा गुण एकादेश विकल्पानें स्वरित ( ८।२।६ ) होऊं लागेल. आणि येथें सवर्णदीर्घाच्या पूर्वी गुण झाला म्हणजे जरी तो विकल्पानें स्वरित झाला तरी तो असिद्ध (८।२।१) असल्यामुळें मागून होणारा पररूप ( ६।१।९५ ) एकादेश नित्य उदात्तच ( ८।२।५ ) होतो.

लक्षणश्च वर्णविकार आवादेशः। पूर्वसवर्णदीर्घत्वं भवत्यन्तरङ्गतः। पूर्वसवर्ण ॥ पूर्वत्व। शकन्ध्वर्थम् परिव्यर्थम्। पूर्वत्वं च प्राप्नोति बहिरङ्गलक्षणश्च वर्णविकारः सवर्णदीर्घत्वम्। पूर्वत्वं भवत्यन्तरङ्गतः। पूर्वत्व ॥ तहिलोप। अकार्यत्र अह्यार्यत्र। पचेदम्। तहिलोपौ च प्राप्नुतो बहिरङ्गलक्षणश्च वर्णविकारः सवर्णदीर्घत्वम्। तहिलोपौ भवतोऽन्तरङ्गतः। तहिलोप ॥ टेन। वृक्षेणात्र प्लक्षेणात्र। इनादेशश्च प्राप्नोति बहिरङ्गलक्षणश्च वर्णविकारः सवर्णदीर्घत्वम्। इनादेशो भवत्यन्तरङ्गतः। टेन ॥ ङेर्यः। वृक्षायात्र प्लक्षायात्र। ङेर्यादेशश्च प्राप्नोति बहिरङ्गलक्षणश्च वर्णविकार एङः पदान्तादति [६. १. १०९] इति परपूर्वत्वम्। ङेर्यादेशो भवत्यन्तरङ्गतः। ङेर्य ॥ ङिस्मिन्। यस्मिन्निदम् तस्मिन्निदम्। स्मिन्भावश्च प्राप्नोति बहिरङ्गलक्षणश्च वर्णविकारः सवर्णदीर्घत्वम्। स्मिन्भावो भवत्यन्तरङ्गतः। ङिस्मिन् ॥ ङिणलौत्वम्। अग्नाविदम्। ययावत्र। ङिणलौत्वं प्राप्नोति बहिरङ्गलक्षणश्च वर्णविकारः सवर्णदीर्घत्वम्। औत्वं भवत्यन्तरङ्गतः ॥ नैतानि सन्ति प्रयोजनानि। विप्रतिषेधेनाप्येतानि सिद्धानि ॥ इदं तर्हि प्रयोजनम्। वृक्षा अत्र। प्लक्षा अत्र। पूर्वसवर्णश्च प्राप्नोति बहिरङ्गलक्षणश्च

---

वर्णविकार प्राप्त होतो. त्यांत एकच पदाची अपेक्षा असल्यामुळें अंतरंग असा पूर्वसवर्णदीर्घ होतो. शकन्ध्वर्थम् व परिव्यर्थम् येथें शकन्धु आ अर्थम् असें असतां पूर्वरूप (६।१।१०८) व बहिरंग सवर्णदीर्घ (६।१।१०१) दोन्ही प्राप्त झाले असतां अंतरंग असें पूर्वरूप होतें. अकार्यत्र, अह्यार्यत्र, पचेदम् येथें अकारि त अत्र, पच हि इदम् अशी स्थिति असता क्रमानें तलोप (६।४।१०४) व हिलोप (६।४।१०५) प्राप्त होतात आणि अकार व अकार, तसेंच इकार व इकार यांचा सवर्णदीर्घ हा बहिरंग वर्णविकार प्राप्त होतो; तेथें तलोप आणि हिलोप हे अंतरग असल्यामुळें प्रथमतः होतात. वृक्षेणात्र व प्लक्षेणात्र येथें वृक्ष– आ–अत्र अशी स्थिति असतां टाचें स्थानीं अंतरंग इनादेश (७।१।१२) व सवर्णदीर्घ हा बहिरंग वर्णविकार हे दोनही प्राप्त झाले असतां अंतरंग असा इन आदेश पूर्वी होतो. वृक्षायात्र व प्लक्षायात्र येथें वृक्ष–ए अत्र अशी स्थिति असताना अंतरंग य आदेश (७।१।१३) व बहिरंग वर्णविकार 'एङः पदान्तादति' (६।१।१०९) यानें पूर्वरूप हीं दोनही कार्यें प्राप्त झालीं असतां अंतरंग असा य आदेश पूर्वी होतो. यस्मिन्निदम् तसेच तस्मिन्निदम् येथें य–इ–इदम् अशी स्थिति असतां अंतरंग स्मिन् आदेश (७।१।१५) प्राप्त होतो व बहिरंग वर्णविकार सवर्णदीर्घ प्राप्त होतो. तेथें अंतरंग स्मिन् आदेश पूर्वी होतो. अग्नाविदम् व ययावत्र येथें अग्नि–इ–इदम् व य–या–अ अशी स्थिति असतां 'अच्च घेः' (७।३।११९) आणि 'आत औ णलः' (७।१।३४) यानीं अंतरंग औकार आदेश व बहिरंग वर्णविकार सवर्णदीर्घ हे दोन्ही प्राप्त झाले असतां अंतरंग औकार आदेश प्रथम होतो.

हीं प्रयोजनें संभवत नाहींत. कारण विप्रतिषेध असल्यामुळें परत्वास्तव इष्ट असलेलीं हीं सर्व कार्यें येथें सहजच होत आहेत.

तर मग अन्तरङ्ग–बलीयस्त्वाचें हें प्रयोजन समजावें कीं वृक्षा अत्र व प्लक्षा अत्र येथें वृक्ष–अस्–अत्र असें असतां रुत्व (८।२।६६) केल्यानंतर एकाच पदामध्यें पूर्वसवर्ण दीर्घ प्राप्त होतो व त्याबरोबरच पुढील पदांतील अकारामुळें होणारा 'अतो रोरप्लुता०' (६।१।११३) यानें उत्वरूपी बहिरंग वर्णविकार प्राप्त होतो.

वर्णविकारोऽतो रोरप्लुतादप्लुते [ ६. १. ११३ ] इत्युत्त्वम् । पूर्वसवर्णो भवत्यन्तरङ्गतः । न चावश्यमिदमेव प्रयोजनम् । आद्ये योगे बहूनि प्रयोजनानि सन्ति यदर्थमेषा परिभाषा कर्तव्या । प्रतिविधेयं दोषेषु ॥

**[ एङः पदान्तादति ॥ ६ । १ । १०९ ॥**

**ङसिङसोश्च ॥ ६ । १ । ११० ॥**

**ऋत उत् ॥ ६ । १ । १११ ॥ ]**

**ख्यत्यात्परस्य ॥ ६ । १ । ११२ ॥**

किमिदं ख्यत्यादिति । सखिपत्योर्विकृतग्रहणम् । किं पुनः कारणं सखिपत्योर्विकृतग्रहणं क्रियते न सखिपतिभ्यामित्येवोच्येत । नैवं शक्यम् । गरीयांश्चैव हि निर्देशः स्यात् । इह च प्रसज्येत । अतिसखेरागच्छामि । अतिसखेः स्वम् । इह च न स्यात् । सखीयतेरप्रत्ययः । सख्युः पत्युः । लूनीयतेरप्रत्ययः । लून्युः पून्युः ॥

---

तेथें बहिरंग उत्वापेक्षां अंतरंग पूर्वसवर्णदीर्घ प्रथम होतो.

हेंच एक उदाहरण आहे असें समजूं नये. तर पूर्वपठित शास्त्र असून तें अंतरंगत्वास्तव होतें अशीं उदाहरणें पुष्कळ आहेत[१२]. त्यांकरितां ही परिभाषा स्वीकारावयास पाहिजे. मात्र जेथें परिभाषेनें दोष येतील तेथें ही परिभाषा अनित्य मानून दोषांचें निराकरण करावें.

( सू. ११२ ) ख्यत्यात् हें काय आहे ?

सखि आणि पति या शब्दांतील विकृत स्वरूपाचें तें ग्रहण केलें आहे असें समजावें[२].

पण असा विकृत निर्देश करण्याचें काय कारण ? सखिपतिभ्याम् असें सरळच कां म्हटलें नाहीं ?

तसें सूत्र करणें शक्य नाहीं. कारण, पहिल्या सूत्रन्यासापेक्षां यांत गौरव दोईल. शिवाय, [३]अतिसखेरागच्छति व अतिसखेः स्वम् येथेंही उत्व होऊं लागेल. आणि सखीय या क्यच्–प्रत्ययान्त धातूहून क्विप् प्रत्यय केला असता जो सखी असा दीर्घ ईकारान्त शब्द तयार होतो त्याचें जें सख्युः असें रूप होतें तेथें उत्व होणार नाहीं. तसेंच पती या दीर्घ ईकार शेवटीं असलेल्या शब्दाचें पत्युः असें होतें तेथेंही उत्व होणार नाहीं. तसेंच लूनीय या क्यच्–प्रत्ययान्त धातूहून क्विप् प्रत्यय केला असतां त्या लूनी शब्दाचे लून्युः असें रूप होतें; व पूनी शब्दाचें पून्युः[४] असें होतें. त्या लून्युः व पून्युः या दोन्ही ठिकाणींही उत्व होणार नाहीं.

---

१२. मागें पहा ( १।४।२ वा. ९ ).

१. ( सू. १०९ ) पदाच्या शेवटी असलेल्या एङाहून ऱ्हस्व अकार पुढें असतांना पूर्व व पर यांचे स्थानी पूर्वरूप एकादेश होतो. उदा०–हरे–अव येथें हरेव असें होतें.

१. ( सू. ११० ) एङाहून ङसि किंवा ङस् प्रत्ययांतील ऱ्हस्व अकार पुढें असतांना पूर्व व पर यांचे स्थानीं पूर्वरूप एकादेश होतो. उदा०–हरेः, भानोः.

१. ( सू. १११ ) ऱ्हस्व ऋकाराहून ङसि किंवा ङस् या प्रत्ययांतील ऱ्हस्व अकार पुढें असतांना पूर्व व पर यांचे स्थानीं ऱ्हस्व उकार एकादेश होतो. उदा०–मातुः, पितुः.

१. ( सू. ११२ ) खि व खी तसेंच ति व ती यांतील इकाराला यण् केल्यानंतर त्या ख्य् किंवा त्य् यांच्या पुढील ङसि किंवा ङस् प्रत्ययांतील ऱ्हस्व अकाराला ऱ्हस्व उकार आदेश होतो. उदा० सख्युः, पत्युः.

२. खि व ति शब्दांतील इकाराला यण् झाल्यानंतर जे ख्य् आणि त्य् असे विकृत स्वरूप होतें त्याला उच्चारणार्थ अकार जोडून येथें ख्यत्यात् असें म्हटलें आहे.

३. यस्येति च ( ६।४।१४८ ) या सूत्रावरील टीप २ पहावी.

४. लू व पू या धातूंहून क्त प्रत्यय व त्या प्रत्ययामधील तकाराला नकार (८।२।४४) झाला म्हणजे लून

## अतो रोरप्लुतादप्लुते ॥ ६ । १ । ११३ ॥

किमर्थमप्लुतादप्लुत इत्युच्यते । प्लुतात्परस्य प्लुते वा परतो मा भूदिति । प्लुतात्परस्य । सुस्रोता३ अत्र न्वसि । प्लुते परतः । तिष्ठतु पय आ३ग्निदत्त । अतोऽतीत्युच्यते कः प्रसङ्गः प्लुतात्परस्य प्लुते वा परतः स्यात् । असिद्धः प्लुतस्तस्यासिद्धत्वात्प्राप्नोति । अथाप्लुतादप्लुत इत्युच्यमाने यावतासिद्धः प्लुतः कस्मादेवात्र न प्राप्नोति । अप्लुतभाविनोऽप्लुतभाविनीत्येवमेतद्विज्ञायते ॥ नैतदस्ति प्रयोजनम् । सिद्धः प्लुतः स्वरसंधिषु । कथं ज्ञायते । यदयं प्लुतः प्रकृत्येति प्लुतस्य प्रकृतिभावं शास्ति । सतो

---

( सू. ११३ ) अप्लुतात् अप्लुते असें जें येथें म्हटलें आहे तें कशाकरितां ?

प्लताहून पुढच्या 'रु'ला किंवा प्लुत पुढें असताना मागच्या 'रु'ला उत्व न व्हावें म्हणून म्हटलें आहे. प्लुताच्या पुढील 'रु'चें उदाहरण सुस्रोत ३ अत्र न्वसि[२]. तसेंच प्लुताच्या मागील 'रु'चें उदाहरण तिष्ठतु पय आ३ ग्निदत्त[३].

पण येथें अतः आणि अति असें म्हटलें आहे तेव्हा प्लुताहून पुढें किंवा प्लुत पुढें असतांना उत्वाचा प्रसंगच[४] कसा येणार ?

प्लुत असिद्ध असल्यामुळें प्लुताहून किंवा प्लुत पुढें असतांना तेथें तो ऱ्हस्व अकारच आहे असें समजून उत्व प्राप्त होत आहे.

तर मग जर प्लुत असिद्धच आहे तर अप्लुतात्–अप्लुते असें म्हटलें तरीही कां बरें येथें प्लुत होत नाहीं ?

येथें प्लुत ज्याला होणार आहे तो म्हणजे प्लुताचा स्थानी[५] असा प्लुत शब्दाचा अर्थ आहे.

हें प्रयोजन बरोबर दिसत नाहीं. कारण स्वरसंधीच्या दृष्टीनें प्लत सिद्ध[६] आहे.

पण स्वरसंधीच्या दृष्टीनें प्लुत सिद्ध आहे हें कशावरून ठरविलें जात आहे ?

---

व पून असे शब्द होतात. त्यांहून क्यच् ( ३।१।८ ) व इत्व (७।४।३३) होऊन लूनीय व पूनीय होतात; त्यांहून क्विप्, अकाराचा व यकाराचा लोप होऊन लूनी व पूनी शब्द होतात. क्त प्रत्ययाच्या तकाराला झालेला नकार असिद्ध (८।२।१) असल्यामुळें त्यू व न्यू आहेत असें समजून प्रकृत सूत्रानें उत्व होतें.

१. ( सू. ११३ ) प्लुतभिन्न अशा ऱ्हस्व अकाराच्या पुढे असलेला जो रुत्वानें ( ८।२।६६ ) झालेला रेफ त्याला उकार आदेश होतो प्लुतभिन्न असा ऱ्हस्व अकार पुढें असतांना उदा०–वृक्षोऽत्र.

२. सुस्रोत३ हे सुस्रोतस् शब्दाचें संबोधन आहे. येथें सुस्रोत ह्या शब्दांतील अकाराला प्लुत ( ८।२।८४ ) झाला आहे. त्यामुळें त्याच्या पुढील रुत्वानें झालेल्या रेफाला प्रकृत सूत्रानें उत्व होत नाहीं. तर यत्व ( ८।३।१७ ) होऊन त्या यकाराचा लोप ( ८।३।१९ ) होतो.

३. हें अग्निदत्त शब्दाचें संबोधन आहे. ह्या शब्दांतील पहिल्या अकाराला प्लुत ( ८।२।८६ ) झाला आहे. तेव्हां मागील पयस् शब्दाच्या सकाराला जो रुत्वानें रेफ झाला आहे त्याला उत्व होत नाही.

४ कारण तपरकरणानें ( १।१।७० ) दीर्घ आणि प्लुत यांची व्यावृत्ति होत आहे.

५. पूर्वत्रासिद्धम् ( ८।२।१ ) या शास्त्रानें त्रिपादींतील शास्त्र असिद्ध असल्यासारखें समजावें असें सांगितलें असलें तरी वस्तुतः सिद्ध असल्यामुळें ह्या प्लुताचा स्थानी आहे असें गृहीत धरण्यास कांहींच हरकत नाही. वस्तुतः विचार केला असतां ज्या अर्थी येथें प्लुत शब्द उच्चारला आहे त्या अर्थी येथें पूर्वत्रासिद्धम् याची प्रवृत्तीच होत नाही.

६. तेव्हां तपरकरणानेंच येथें काम भागत आहे. स्वरसंधि या शब्दानें संहिता अधिकारांतील ( ६।१।७२ ) कोणतेंही कार्य घेतलें जातें.

हि कार्यिणः कार्येण भवितव्यम् ॥

**अप्लुतादप्लुतवचनेऽकारहशोः समानपदे प्रतिषेधः ॥ १ ॥**

अप्लुतादप्लुतवचनेऽकारहशोः समानपदे प्रतिषेधो वक्तव्यः । पयो३ट् पयो३द ॥

**न वा बहिरङ्गलक्षणत्वात् ॥ २ ॥**

न वा वक्तव्यः । किं कारणम् । बहिरङ्गलक्षणत्वात् । बहिरङ्गः प्लुतः । अन्तरङ्गमुत्त्वम् । असिद्धं बहिरङ्गमन्तरङ्गे ॥ इहापि तर्हि प्राप्नोति । सुस्रोता३अत्र न्वसि । अन्तरङ्गोऽत्र प्लुतो बहिरङ्गमुत्त्वम् ॥ क पुनरिहान्तरङ्गः प्लुतः क वा बहिरङ्गमुत्त्वमुत्त्वं वान्तरङ्ग प्लुतो वा बहिरङ्गः । वाक्यान्तस्य वाक्यादावन्तरङ्गः प्लुतो बहिरङ्गमुत्त्वम् । समानवाक्ये पदान्तस्य पदादावुत्त्वमन्तरङ्गं बहिरङ्गः प्लुतः ॥ किं पुनः

---

कारण कीं, आचार्य प्लुताला प्रकृतिभावाचें विधान करीत आहेत. आणि प्लुत जर सिद्ध असेल तरच त्याला प्रकृतिभावाचे विधान करणें योग्य[७] होणार आहे.

( वा. १ ) अप्लुताहून आणि अप्लुत पुढें असतांना जें हें 'रु'ला उत्व सांगितले आहे त्याला निमित्त म्हणून जे अकार[८] व हश् धरले आहेत ते ज्या पदांत रु असेल त्याच पदांत असतील तर अप्लुत हा निषेध होत नाहीं असें वचन करावें. जसें—आगच्छ हे पयो३ट्, आगच्छ हे पयो३दं[९].

( वा. २ ) हें वचन करावयास नको.

काय कारण ?

कारण असें कीं प्लुत बहिरंग आहे व उत्व अंतरंग आहे. तेव्हां अंतरंग अशा उत्वाच्या दृष्टीनें बहिरंग प्लुत असिद्धच आहे.

तर मग सुस्रोत ३ अत्र न्वसि येथही अंतरंगत्वास्तव उत्व होऊं लागेल.

येथें प्लुतच अंतरंग आहे आणि उत्व बहिरंग आहे.

पण कोठें बरें प्लुत अंतरंग समजावा व कोठें बरें उत्व बहिरंग समजावें ? तसेंच याच्या उलट उत्व अंतरंग कोठें समजावें व प्लुत बहिरंग कोठें समजावा ?

जेथें दुसऱ्या वाक्याच्या आरंभीं अकार किंवा हश् असतांना पहिल्या वाक्याच्या अन्त्याला प्लुत करावयाचा असेल तेथें दुसऱ्या वाक्याची जरूर नसल्यामुळें प्लुत अंतरंग आहे आणि दुसऱ्या वाक्याची जरूर असल्यामुळें उत्व बहिरंग आहे. आणि एकाच वाक्यामध्यें दुसऱ्या पदाच्या आरंभीं अकार किंवा हश् असतांना मागील पदाच्या अन्त्याला उत्व करावयाचें असेल तेथें उत्व अंतरंग आहे आणि संपूर्ण वाक्याची अपेक्षा असल्यामुळें प्लुत बहिरंग आहे.

---

७. प्रकृतिभावाच्या दृष्टीनें प्लुत असिद्ध असेल तर त्याला उद्देशून प्रकृतिभाव सांगतांच येणार नाहीं. शिवाय, प्लुत असिद्ध असेल तर त्याला संधिकार्याची प्राप्तीही येत नाहीं.

८. अकार ह्या सूत्रांत निमित्त धरला आहे. आणि हश् पुढील सूत्रांत निमित्त धरला आहे.

९. पयस् शब्द उपपद असतांना अट् धातूहून क्विप् प्रत्यय, आणि पयस् शब्दांतील सकाराला रुत्व, प्रकृत सूत्रानें उत्व, गुण व पूर्वरूप अशीं कार्यें होऊन पयोट् असा शब्द होतो. तसेंच पयस् शब्द उपपद असतांना दा धातूहून क प्रत्यय ( ३।२।३ ), सकाराला रुत्व, पुढील सूत्रानें उत्व व गुण ही कार्यें होऊन पयोद असा शब्द होतो. या दोन्ही शब्दांच्या संबोधनामध्यें ओकाराला प्लुत ( ८।२।८४,८६ ) होऊन हे पयो३ट् व हे पयो३द अशी रूपें होतात. येथें अकार हा प्लुताचा स्थानी असल्यामुळें पयो३ट् येथें अप्लुते हा निषेध येतो, आणि पयो३द येथें अप्लुतात् हा निषेध येतो; तो न यावा याकरितां हें वार्तिक केलें आहे.

कारणं बहिरङ्गत्वमुत्त्वे हेतुर्व्यपदिश्यते न पुनरसिद्धत्वमपि । यथैव ह्ययं बहिरङ्ग एवमसिद्धोऽपि । एवं मन्यते । असिद्धः प्लुत आश्रयात्सिद्धो भवति । अथवा यस्यां नाप्राप्तायां परिभाषायामुत्त्वमारभ्यते साश्रयात्सिद्धा स्यात् । कस्यां च नाप्राप्तायाम् । असिद्धपरिभाषायाम् । बहिरङ्गपरिभाषायां पुनः प्राप्तायामप्राप्तायां च ॥

**[ हशि च ॥ ६ । १ । ११४ ॥ ]**

**नान्तःपादमव्यपरे ॥ ६ । १ । ११५ ॥**

कस्यायं प्रतिषेधः । नान्तःपादमिति सर्वप्रतिषेधः । नान्तःपादमिति सर्वस्यायं प्रतिषेधः । कथम् । अचीति वर्तते । अचि यत्प्राप्नोति तस्य प्रतिषेधः ।

**नान्तःपादमिति सर्वप्रतिषेधश्चेदतिप्रसङ्गः ॥ १ ॥**

नान्तःपादमिति सर्वप्रतिषेधश्चेदतिप्रसङ्गो भवति । इहापि प्राप्नोति । अन्वग्निरुषसामग्रमख्यत् । प्रत्यग्निरुषसामग्रमख्यत् ॥ एवं तर्ह्यतीति वर्तते । अकाराश्रयं यत्प्राप्नोति तस्य प्रतिषेधः ।

---

पण पयो३ट् पयो३द, येथें उत्व होतें याविषयीं जसें प्लुताचें बहिरंगत्व हें कारण दाखविलें आहे तसें प्लुताचें असिद्धत्व हें कारण कां बरें दाखविलें नाहीं ? कारण प्लुत हा जसा बहिरंग आहे तसा तो ' पूर्वत्रासिद्धम् ' (८।२।१ ) यानें असिद्धही आहे.

असिद्धत्व न दाखविण्याचें कारण असें मानतो कीं–ज्याअर्थी प्लुत–भिन्न अशा रूपानें येथें प्लुताचा आश्रय केला आहे त्याअर्थी प्लुताला सिद्धत्व समजलें जात आहे. अथवा, जी परिभाषा सर्वच उदाहरणामध्यें येत असतांना तिच्याकडे दुर्लक्ष करून प्लुत–भिन्न असें समजून उत्व सांतितलें जात आहे ती परिभाषा अप्लुतात् या विशेषणाच्या जोरावर येथें दूर सारली जाईल.

येथें सर्व उदाहरणांमध्यें येणारी अशी कोणती बरें परिभाषा आहे ?

' पूर्वत्रासिद्धम् ' ही असिद्ध परिभाषा तशी आहे, आणि बहिरंग परिभाषा तर तशी नाहीं म्हणजे कोठें येते व कोठें येत नाहीं.

( सू. ११५ ) हा निषेध कोणाचा ?

'नान्तःपादमिति सर्वप्रतिषेधः' म्हणजे 'नान्तःपादम् ' हा सर्व कार्यांचा निषेध आहे.

तें कसें ?

येथें अचि हें अनुवृत्त आहे. तेव्हां अच् पुढें असतांना त्या निमित्तानें जें जें संधिकार्य प्राप्त होतें त्याचा त्याचा हा निषेध आहे.

( वा. १ ) ' नान्तःपादम् ' हा अच् पुढें असतांना सर्व कार्यांचा प्रतिषेध म्हटला तर दोष येत आहे. उदा०– अन्वग्निरुषसामग्रमख्यत्, प्रत्यग्निरुषसामग्रमख्यत्.

असें आहे तर अति याची अनुवृत्ति येत आहे. तेव्हां ऱ्हस्व अकारामुळेंच जें कार्य प्राप्त होतें त्याचाच हा निषेध आहे.

---

१ ( ११४ ) प्लुतभिन्न अशा ऱ्हस्व अकाराच्या पुढें असलेला जो रुत्वानें झालेला रेफ त्याला उकार आदेश होतो हश् पुढें असतांना. उदा० वृक्षो दृश्यते.

१. ( सू. ११५ ) पादाच्यामध्यें असलेल्या एङाला संधिकार्य होत नाहीं ऱ्हस्व अकार पुढें असतांना, पण त्या ऱ्हस्व अकाराच्या पुढें वकार किंवा यकार नसावा. उदा०–सुजाते अश्व सूनृते. ह्या सूत्रामध्यें न शब्दाऐवजीं प्रकृत्या असा शब्द सूत्रपाठामध्यें आहे असें मानिलें असतां एङाला प्रकृतिभाव सांगणारें हें सूत्र आहे असें समजावें. प्रकृतिभाव सांगितल्यामुळें संधिकार्य होत नाहीं.

२. येथें अनु या उकाराला यण् होणार नाहीं.

३. यणाला जो येथें अकार निमित्त होत आहे तो अच् म्हणून होत आहे. ऱ्हस्व अकार अशा रूपानें

**अकाराश्रयमिति चेदुत्त्ववचनम् ॥२॥**

अकाराश्रयमिति चेदुत्त्वं वक्तव्यम्। कालो अश्वः। शतधारो अयं मणिः॥

**अयवोः प्रतिषेधश्च ॥ ३ ॥**

अयवोश्च प्रतिषेधो वक्तव्यः। सुजाते अश्वसूनृते। अध्वर्यो अद्रिभिः सुतम्। शुक्रं ते अन्यत्॥ एङ्प्रकरणात्सिद्धम्। एङोऽतीति वर्तते। एङोऽति यत्प्राप्नोति तस्य प्रतिषेधः।

**एङ्प्रकरणात्सिद्धमिति चेदुत्त्वप्रतिषेधः ॥ ४ ॥**

एङ्प्रकरणात्सिद्धमिति चेदुत्त्वस्य प्रतिषेधो वक्तव्यः। अग्नेरत्र। वायोरत्र। अतो रोरप्लुतादप्लुते [ ११३ ] एङश्चेत्युत्त्वं प्राप्नोति॥

**पुनरेङ्ग्रहणात्सिद्धम् ॥ ५ ॥**

पुनरेङ्ग्रहणं कर्तव्यम्॥ तत्तर्हि कर्तव्यम्। न कर्तव्यम्। प्रकृतमनुवर्तते। ननु चोक्तमेङ्प्रकरणात्सिद्धमिति चेदुत्त्वप्रतिषेध इति। नैष दोषः। पदान्ताभिसंबद्धमेङ्ग्रहणमनुवर्तते न चैङः पदान्तात्परो रुरस्ति॥

---

( वा. २ ) अकारामुळें होणाऱ्या कार्याचा 'नान्तःपादम्' हा निषेध आहे असें म्हटलें तर कालो अश्वः' व 'शतधारो अयं मणिः' येथें 'अतो रोरप्लुताद० ' या उत्वाचा प्रतिषेध येत आहे म्हणून उत्वाचें विधान करावें लागेल.

( वा. ३ ) आणि अय् व अव् यांच्या निषेधाकरितां वचन करावें लागेल.[5] उदा०— सुजाते अश्वसूनृते, अध्वर्यो अद्रिभिः सुतम्, शुक्रं ते अन्यत्.

' एङ्प्रकरणात्सिद्धम् ' म्हणजे एङः आणि अति या दोन्ही पदांची अनुवृत्ति आहे. अर्थात् एङाला ऱ्हस्व अकार पुढें असतांना जें कार्य प्राप्त होतें त्याचा प्रतिषेध होतो असा अर्थ असल्यामुळें हें सिद्ध होतें.

( वा. ४ ) एङाची अनुवृत्ति असल्यामुळें अकार पुढें असतांना एङाचे स्थानीं प्राप्त होणारीं जीं कार्यें त्या सर्वांचा प्रतिषेध मानिल्यामुळें कालो अश्वः व अध्वर्यो अद्रिभिः येथें दोष येत नाहीं असें म्हणणें असेल तर उत्वाच्या प्रतिषेधाकरितां वचन करावें लागणार आहे. उदा० अग्नेरत्र, वायोरत्र. येथें ' अतो रोर० ' या मधल्या सूत्रामध्यें एङः ही अनुवृत्ति करावी लागत असल्यामुळें एङाच्या पुढील ' रु ' ला उत्व प्राप्त होत आहे.

( वा. ५ ) प्रकृत सूत्रामध्यें पुनः एङ्ग्रहण करावें अनुवृत्ति आणूं नये म्हणजे सर्व साधेल.

तर मग तसें केलें पाहिजे.

एङ्ग्रहण करावयास नको. कारण मागाहून त्याची अनुवृत्ति येत आहे.

पण मागून अनुवृत्ति आणली तर मध्यें ' अतो रोरप्लुता '० येथें त्याचा संबंध होईल आणि अग्नेरत्र येथें उत्व होऊं लागेल असा दोष दाखविला आहे ना ?

हा दोष येत नाहीं. कारण पदान्तात् यानें संबद्ध अशा एङ्ग्रहणाची अनुवृत्ति येईल. आणि पदान्तीं विद्यमान एङाहून पुढील ' रु '-चे स्थानीं उत्व होतें असा अर्थ होईल. आणि पदाच्या शेवटीं असलेल्या एङाच्या पुढें ' रु ' कोठेंच संभवत नाहीं; त्यामुळें दोष येत नाहीं.

---

तो निमित्त होत नाहीं.

४. कारण, अतो रो० येथें अति अशी अनुवृत्ति आहे म्हणजे ऱ्हस्व अकार अशा रूपानेंच निमित्त धरलें आहे.

५. एचोऽयवायावः या सूत्रामध्यें अचि अशी अनुवृत्ती आहे. तेव्हां ऱ्हस्व अकार अशा रूपानें निमित्त नाहीं म्हणून त्यांचा निषेध प्रकृत सूत्रानें होणार नाहीं

**[ अव्यादवद्यादवक्रमुरव्रतायमवन्त्ववस्युषु च ॥ ६ । १ । ११६ ॥**

**यजुष्युरः ॥ ६ । १ । ११७ ॥**

**आपो जुषाणो वृष्णो वर्षिष्ठेऽम्बेऽम्बालेऽम्बिके पूर्वे ॥६।१।११८॥**

**अङ्ग इत्यादौ च ॥ ६ । १ । ११९ ॥**

**अनुदात्ते च कुधपरे ॥ ६ । १ । १२० ॥**

**अवपथासि च ॥ ६ । १ । १२१ ॥**

**सर्वत्र विभाषा गोः ॥ ६ । १ । १२२ ॥ ]**

**अवङ् स्फोटायनस्य ॥ ६ । १ । १२३ ॥**

**गोरग्वचनं गवाग्रे स्वरसिद्ध्यर्थम् ॥ १ ॥**

गोरग्वक्तव्यः । किं प्रयोजनम् । गवाग्रे स्वरसिद्ध्यर्थम् । गवाग्रे स्वरसिद्धिर्यथा स्यात् । गवाग्रम् ॥

**अवङादेशे हि स्वरे दोषः ॥ २ ॥**

अवङादेशे हि स्वरे दोषः स्यात् । अन्तोदात्तस्यान्तर्यतोऽन्तोदात्त आदेशः प्रस-

---

( सू. १२३ वा. १ ) अवङाचे ऐवजीं गो शब्दाला अक् आगमाचें विधान करावें ?

तें कशाकरिता ?

गवाग्रम् येथें गकाराच्या पुढील अकाराला इष्ट असलेला उदात्त स्वर साधावा म्हणून.[2]

( वा. २ ) येथे अवङ् आदेशाचे विधान केलें तर स्वरासंबंधानें दोष येईल. म्हणजे गो शब्द ' फिषोऽन्त० ' ( फिट् सूत्र १।१ ) यानें अन्तोदात्त असल्यामुळें त्याचे स्थानीं होणारा अवङ् आदेश स्थानीसारखा ( १।१।५० )

---

१. ( सू. ११६ ) अव्यात् अवद्यात् अवक्रमुः अव्रत अयम् अवन्तु आणि अवस्यु हे शब्द पुढें असतांना पादामध्यें असलेल्या एङाला संधिकार्य होत नाहीं. उदा०– वसुभिर्नो अव्यात्

१. ( सू. ११७ ) एङन्त जो उरस् शब्द म्हणजे अर्थात् विकार होऊन उरो अशा स्वरूपांत आलेला जो उरस् शब्द त्याला ऱ्हस्व अकार पुढें असतांना यजुर्वेदामध्यें संधिकार्य होत नाहीं. उदा०– उरो अन्तरिक्षम्.

१. ( ११८ ) यजुर्वेदामध्यें आपो जुषाणो वृष्णो आणि वर्षिष्ठे या शब्दांना संधिकार्य होत नाहीं तसेंच अम्बिके या शब्दाच्या पूर्वी जे अम्बे आणि अम्बाले असे दोन्ही एकत्र असलेले शब्द त्यांना यजुर्वेदामध्यें संधिकार्य होत नाहीं. उदा०–आपो अस्मान् मातरः.

१. ( सू. ११९ ) यजुर्वेदामध्यें अङ्गे शब्दांतील एङ् आणि अङ्गे शब्दांच्या मागील एङ् यांना संधिकार्य होत नाहीं. उदा०प्राणो अङ्गे अङ्गे अदीध्यत्.

१. ( सू. १२० ) यजुर्वेदामध्यें ज्याच्या पुढें कवर्ग किंवा धकार आहे असा अनुदात्त अकार पुढें असतांना मागील एङाला संधिकार्य होत नाहीं. उदा०–

अयं सो अग्निः

१. ( सू. १२१ ) ज्याच्या आरंभी अनुदात्त अकार आहे असा अवपथाः हा शब्द पुढें असतांना त्याच्या मागील एङाला यजुर्वेदामध्यें संधिकार्य होत नाही उदा० रुद्रेभ्यो अवपथाः.

१. ( सू. १२२ ) लोकामध्यें आणि वेदांमध्ये सर्वच ठिकाणीं ऱ्हस्व अकार पुढें असतांना गो शब्दांतील एङाला संधिकार्य विकल्पानें होतें. उदा०– गो अग्रं, गोग्रम.

१. ( सू. १२३ ) स्फोटायन आचार्यांच्या मतीं गो शब्दांतील एङाला अवङ् असा आदेश अच् पुढें असतांना होतो. उदा० गवाग्रम्. इतर आचार्यांच्या मतीं गो अग्रम्, गोग्रम्.

२. अक् आगम केला म्हणजे तो अनुदात्त ( फिट्स् ) होईल. आणि गो शब्द मूळचा अन्तोदात्त असल्यामुळें त्यांतील ओकाराला अव् आदेश उदात्त अकारच होऊन गवाग्रम् हें पद आद्युदात्त होतें.

ज्येत। कथं पुनरयमन्तोदात्तो यदैकाच्। व्यपदेशिवद्भावेन। यथैव तर्हि व्यपदेशिवद्भावेनान्तोदात्त एवमाद्युदात्तोऽपि तत्रान्तर्यत आद्युदात्तस्याद्युदात्त आदेशो भवति। सत्यमेवमेतत्। न त्विदं लक्षणमस्ति प्रातिपदिकस्यादिरुदात्तो भवतीति। इदं पुनरस्ति प्रातिपदिकस्यान्त उदात्तो भवतीति। सोऽसौ लक्षणेनान्तोदात्तस्तत्रान्तर्यतोऽन्तोदात्तस्यान्तोदात्त आदेशः प्रसज्येत॥

यदि पुनर्गमेर्डो विधीयेत। किं कृतं भवति। प्रत्ययाद्युदात्तत्वे कृत आन्तर्यत आद्युदात्तस्याद्युदात्त आदेशो भविष्यति। कथं पुनरयमाद्युदात्तो यदैकाच्। व्यपदेशिवद्भावेन। यथैव तर्हि व्यपदेशिवद्भावेनाद्युदात्त एवमन्तोदात्तोऽपि तत्रान्तर्यतोऽन्तोदात्तस्यान्तोदात्त आदेशः प्रसज्येत। सत्यमेवमेतत्। न त्विदं लक्षणमस्ति प्रत्ययस्यान्त उदात्तो भवतीति। इदं पुनरस्ति प्रत्ययस्यादिरुदात्तो भवतीति। सोऽसौ लक्षणेनाद्युदात्तस्तत्रान्तर्यत आद्युदात्तस्याद्युदात्त आदेशो भविष्यति॥

एतदप्यादेशे नास्त्यादेशस्यादिरुदात्तो

---

म्हणजे अन्तोदात्त करण्याचा प्रसंग येईल.[3]

पण हा गो शब्द अन्तोदात्त कसा बरें म्हणतां येईल ? कारण गो शब्दामध्यें अच् एकच आहे.

जरी गो शब्दामध्यें अच् एकच आहे तरी व्यपदेशिवद्भावानें ( १।१।२१ वा. २ ) तोच अन्त आहे असें समजतां येईल.

तर मग जसा हा गो शब्द व्यपदेशिवद्भावानें अन्तोदात्त म्हटला जात आहे तसा त्याच न्यायानें आद्युदात्तही म्हणतां येत असल्यामुळें त्याचे स्थानीं होणारा अवङ् आदेश स्थानीसारखा आद्युदात्त होईल.

हें खरें आहे. पण प्रातिपदिकाचा आदि उदात्त होतो असें शास्त्र सांगत नाहीं. तर उलट प्रातिपदिकाचा अन्त उदात्त होतो असें शास्त्र ( फिट् सूत्र १।१ ) सांगत आहे. तेव्हां गो शब्द अन्तोदात्त आहे असें शास्त्रानें ठरत असल्यामुळें त्याचे स्थानीं होणारा अवङ् आदेश अन्तोदात्त होऊं लागेल.

आतां जर गम् धातूहून 'गमेर्डोः' (उणा. पाद. २ ) या सूत्रानें डो प्रत्यय करून गो शब्द बनला असे गृहीत धरलें तर—

तर काय होईल ?

असें होईल कीं—प्रत्ययाला सांगितलेला आद्युदात्त स्वर केला असतां त्या आद्युदात्त ओकाराचे स्थानीं होणारा अवङ् आदेश स्थानीसारखा म्हणजे आद्युदात्त होईल[4]

पण या प्रत्ययामध्यें एकच अच् आहे तेव्हां त्याला आद्युदात्त कसें म्हणतां येईल ?

आतां व्यपदेशिवद्भावानें आद्युदात्त म्हणतां येईल तर जसें व्यपदेशिवद्भावानें आद्युदात्त म्हणतां येतें तसें त्याच न्यायानें अन्तोदात्तही म्हणतां येतें. तेव्हां अन्तोदात्ताचे स्थानीं त्याच्या सारखा अन्तोदात्त असा अवङ् आदेश प्रसक्त होईल.

हें खरें आहे. पण प्रत्ययाचा अन्त उदात्त होतो असें शास्त्र सांगत नाहीं. तर उलट प्रत्ययाचा आदि उदात्त होतो असेंच शास्त्र ( ३।१।३ ) सांगत आहे. तेव्हां जर शास्त्रानें आद्युदात्त ठरत आहे तर त्याचे स्थानीं होणारा अवङ् आदेश स्थानीसारखा आद्युदात्तच होईल.

तरी पण हें म्हणणें जुळत नाहीं. कारण[5]

---

३. अवङ् आदेश अन्तोदात्त झाला तर पहिला अकार शेष-निघातानें ( ६।१।१५८ ) अनुदात्त होईल आणि गवाग्रम् असें मध्योदात्त पद होईल.

४. तेव्हां अशा रीतीनें इष्ट स्वर साधत असल्यामुळें अक् आगम सांगावयास नको.

५. तात्पर्य, अवङ् हा आदेश कदाचित् आद्युदात्त होईल आणि कदाचित् अन्तोदात्त होईल. तेव्हां पाक्षिक दोष कायम राहतो.

भवतीति । प्रकृतितोऽनेन स्वरो लभ्यः । प्रकृतिश्चास्य यथैवाद्युदात्तैवमन्तोदात्तापि ॥ एवं तर्ह्याद्युदात्तनिपातनं करिष्यते स निपातनस्वरः प्रकृतिस्वरस्य बाधको भविष्यति । एवमप्युपदेशिवद्भावो वक्तव्यः । यथैव निपातनस्वरः प्रकृतिस्वरस्य बाधक एवं समासस्वरस्यापि । गवास्थि गवाक्षि ॥

## इन्द्रे च ॥ ६ । १ । १२४ ॥

इन्द्रादाविति वक्तव्यम् । इहापि यथा स्यात् । गवेन्द्रयज्ञे वीहीति ॥ तत्तर्हि वक्तव्यम् । न वक्तव्यम् । नैवं विज्ञायत इन्द्रेऽचीति । कथं तर्हि । अचि भवति । कतरस्मिन् । इन्द्रेऽचीति ।

## प्लुतप्रगृह्या अचि नित्यम् ॥ ६ । १ । १२५

नित्यग्रहणं किमर्थम् । विभाषा मा भूदिति । नैतदस्ति प्रयोजनम् । पूर्वस्मिन्नेव योगे विभाषाग्रहणं निवृत्तम् ॥ इदं तर्हि प्रयोजनं प्लुतप्रगृह्याणामचि प्रकृतिभाव एव यथा स्याद्यदन्यत्प्राप्नोति तन्मा भूदिति । किं

---

आदेशाचा आदि उदात्त होतो असें कांहीं शास्त्रानें विधान केलेलें नाहीं. स्थानीकडून आदेशाला स्वराची प्राप्ति होत असते. तेव्हां येथें स्थानी ओकार उदात्त असल्यामुळें तो स्वर आदेशांत घ्यावयाचा. आतां स्थानीकडे पहावें तर त्याला आद्युदात्तही म्हणतां येतें आणि अन्तोदात्तही म्हणतां येतें [५]

असें आहे तर मग येथें अवङ् आदेश आद्युदात्त स्वराचाच उच्चारण्यांत येईल. अर्थात् त्या जोरावर स्थानीकडून एकदां येणाऱ्या अन्तोदात्त स्वराचा बाध केला जाईल.

अशा रीतीनें अवङ् आदेशाला आद्युदात्तत्वाचें निपातन मानलें तरीही हा आद्युदात्त स्वर इतर स्वरांच्या पूर्वी होतो असें विधान करण्यात यावें. नाहीं तर निपातन स्वर जसा स्थानीकडून येणाऱ्या स्वराचा बाधक होतो तसा 'समासस्य' ( ६।१।१२६ ) या स्वराचाही बाधक होईल. उदा० – गवास्थि, गवाक्षि.[६]

( सू. १२४ ) 'इन्द्रादाविति वक्तव्यम्' म्हणजे इन्द्र शब्द आहे आदि ज्याच्या असा शब्द पुढें असतांना अवङ् होतो असें वचन करावें. त्यामुळें गवेन्द्रयज्ञे वीहि येथें इन्द्रयज्ञ शब्द पुढें असतांना अवङ् होईल.

तर मग 'इन्द्रादौ' असें म्हटलें पाहिजे.

तसें म्हणावयास नको. कारण, अजादि इन्द्रशब्द पुढें असतांना असा आम्ही अर्थ करीत नाहीं.

तर मग कसा अर्थ करीत आहां ?

गो शब्दाला अच् पुढें असतांना अवङ् आदेश होतो; तो अच् इन्द्र शब्दांतील असला पाहिजे.

( सू. १२५ ) येथें नित्य ग्रहण केलें आहे तें कशाकरितां ?

विभाषा-ग्रहणाची अनुवृत्ति येथें न यावी म्हणून तें केलें आहे.

पण त्याकरितां नित्य ग्रहण करण्याचें कारण नाहीं. कारण 'इन्द्रे च' या पूर्व सूत्रामध्येंच विभाषा–ग्रहण निवृत्त झालें आहे.

तर मग नित्य-ग्रहणाचें हें प्रयोजन समजावें कीं– अच् पुढें असतांना प्रगृह्याला आणि प्लुताला प्रकृतिभावच व्हावा, तेथें दुसरें जें कांहीं कार्य प्राप्त होतें तें न व्हावें.

पण येथें असें दुसरें कोणतें बरें कार्य प्राप्त

---

६. येथें समासस्य यानें समासाला अन्तोदात्त स्वर इष्ट आहे.

१. ( सू. १२४ ) इन्द्र शब्द पुढें असतांना गो शब्दाला अवङ् आदेश होतो. उदा०–गवेन्द्रः

१. (सू. १२५) प्लुत आणि प्रगृह्य यांना संधिकार्य कधींही होत नाहीं. उदा० कृष्ण३ अत्र, हरी एतौ.

चान्यत्प्राप्नोति । शाकलम् । सिन्नित्यसमासयोः शाकलप्रतिषेधं वक्ष्यति स न वक्तव्यो भवति ॥

अथाज्ग्रहणं किमर्थम् । अचि प्रकृतिभावो यथा स्यात् ।

**प्लुतप्रगृह्येष्वज्ग्रहणमनर्थकमधिकारात्सिद्धम् ॥ १ ॥**

प्लुतप्रगृह्येष्वज्ग्रहणमनर्थकम् । किं कारणम् । अधिकारादेव सिद्धम् । अचीति प्रकृतमनुवर्तते । क प्रकृतम् । इको यणचि [ ६. १. ७७ ] इति ॥

**तत्तु तस्मिन्प्रकृतिभावार्थम् ॥ २ ॥**

तत्तु द्वितीयमज्ग्रहणं कर्तव्यं प्रकृतिभावार्थम् । तस्मिन्नचि पूर्वस्य प्रकृतिभावो यथा स्यात् । इह मा भूत् । जानु उ अस्य रुजति । जानू अस्य रुजति । जान्वस्य रुजतीति ॥

अथ किमर्थं प्लुतस्य प्रकृतिभाव उच्यते । स्वरसंधिर्मा भूदिति । उच्यमानेऽप्येतस्मिन्स्वरसंधिः प्राप्नोति । प्लुते कृते न भविष्यति । असिद्धः प्लुतस्तस्यासिद्धत्वात्प्राप्नोति ।

**प्लुतप्रकृतिभाववचनं तु ज्ञापकमेकादेशात्प्लुतो विप्रतिषेधेनेति ॥ ३ ॥**

यदयं प्लुतः प्रकृत्येति प्रकृतिभावं शास्ति तज्ज्ञापयत्याचार्य एकादेशात्प्लुतो भवति विप्रतिषेधेनेति ॥

**एकादेशात्प्लुतो विप्रतिषेधेनेति चेच्छालेन्द्रेऽतिप्रसङ्गः ॥ ४ ॥**

एकादेशात्प्लुतो विप्रतिषेधेनेति चेच्छालेन्द्रेऽतिप्रसङ्गो भवति । शालायामिन्द्रः शालेन्द्रः ।

---

होत आहे ?

शाकलमतानें, म्हणजे अर्थात् वैकल्पिक, ऱ्हस्व व प्रकृतिभाव ( ६।१।१२७ ) प्राप्त होत आहेत.

आतां येथें अच्-ग्रहण केलें आहे तें कशाकरितां ?

अच् पुढें असतांना प्रकृतिभाव व्हावा म्हणून केलें आहे.

( वा. १ ) ' प्लुतप्रगृह्या० ' येथें केलेलें अज्ग्रहण व्यर्थ होत आहे. कारण प्रकृत असलेलें अज्ग्रहण तेथें अनुवृत्त होत आहे.

तें अजग्रहण मागें कोठें बरें आहे ?

' इको यणचि ' ( ६।१।७७ ) येथें.

(वा.२) 'प्लुतप्रगृह्या० येथें अज्ग्रहण करावयास पाहिजे. कारण जो अच् पुढें असतांना प्रकृतिभाव प्राप्त होत आहे त्याच अचाला मानून प्राप्त झालेल्या संधिकार्याचा त्याने बाध व्हावा म्हणून. त्यामुळें जानु उ-अस्य रुजति, जानू अस्य रुजति, जान्वस्य रुजति येथें उञ् या निपाताचा पूर्व उकाराशीं एकादेश सवर्ण-दीर्घ होतो; त्याचा प्रकृतिभावानें बाध होत नाहीं.

आतां प्लुताला प्रकृतिभाव कशाकरितां सांगितला जात आहे ?

स्वरसंधि न व्हावा म्हणून सांगितला आहे.

प्लुताला प्रकृतिभावाचें विधान केलें तरीही पूर्वीच स्वरसंधि प्राप्त होत आहे.

पण प्लुत केल्यावर स्वरसंधि होणार नाहीं.

तरी पण ' पूर्वत्रासिद्धम् ' यानें प्लुताला असिद्धत्व असल्यामुळे प्लुताचे पूर्वीच स्वरसंधि प्राप्त होत आहे.

(वा.३) ज्याअर्थीं आचार्य हे प्लुताला प्रकृतिभावाचें विधान करीत आहेत त्याअर्थीं विप्रतिषेध असल्यामुळें एकादेशापेक्षां परत्वास्तव पूर्वी प्लुत होतो असें ते ज्ञापन करीत आहेत.

(वा. ४) एकादेशापेक्षां परत्वास्तव प्लुत पूर्वी होईल तर शालायाम् इन्द्रः शालेन्द्रः येथें दोष

**न वा बहिरङ्गलक्षणत्वात् ॥ ५ ॥**

न वातिप्रसङ्गः । किं कारणम् । बहिरङ्गलक्षणत्वात् । बहिरङ्गः प्लुतः । अन्तरङ्ग एकादेशः । असिद्धं बहिरङ्गमन्तरङ्गे ॥

**आङोऽनुनासिकश्छन्दसि ॥ ६ । १ । १२६ ॥**

**आङोऽनर्थकस्य ॥ १ ॥**

आङोऽनर्थकस्येति वक्तव्यम् । इह मा भूत् । इन्द्रो बाहुभ्यामातरत् ॥ तर्त्तर्हि वक्तव्यम् । न वक्तव्यम् । बहुलवचनान्न भविष्यति । आङोऽनुनासिकश्छन्दसि बहुलम् ॥

**इकोऽसवर्णे शाकल्यस्य ह्रस्वश्च ॥ ६ । १ । १२७ ॥**

किमर्थश्चकारः । प्रकृत्येत्येतदनुकृष्यते । किं प्रयोजनम् । स्वरसंधिर्मा भूदिति ॥ नैतदस्ति प्रयोजनम् । ह्रस्ववचनसामर्थ्यान्न भविष्यति ॥ भवेद्दीर्घाणां ह्रस्ववचनसामर्थ्यात्स्वरसंधिर्न स्याद्ध्रस्वानां तु खलु स्वर-

---

येईल[२].

( वा ५ ) हा दोष येत नाहीं.

काय कारण ?

कारण असें कीं येथें प्लुत बहिरंग[३] आहे, आणि गुण अंतरंग आहे. तेव्हां अंतरंग गुण कर्तव्य असताना बहिरंग प्लुत असिद्ध असल्यामुळें पूर्वी गुण होईल.

(सू. १२६ वा.१ ) अनर्थक[२] अशा आङाला अनुनासिक होतो असें वचन करावें. कारण इन्द्रो बाहुभ्यामातरत्[३] येथें अनुनासिक न झाला पाहिजे.

तर मग अनर्थकस्य ' असें म्हणणें ' जरूर आहे.

तसें म्हणावयास नको. कारण सर्व विधी वेदामध्यें बाहुल्येकरून होतात. तेव्हां आँऽतरत् येथें अनुनासिक होणार नाही.

( सू. १२७ ) येथें 'च' शब्द कशाकरितां घातला आहे ?

त्या 'च' शब्दानें 'प्रकृत्या' या शब्दाचा अनुकर्ष करावा म्हणून तो घातला आहे.

प्रकृत्या याचा अनुकर्ष केल्याचें फळ काय? स्वरसंधि न होणें हें प्रयोजन होय.

हें प्रयोजन होत नाहीं, कारण स्वरसंधि होईल तर ह्रस्वाचें विधान व्यर्थ होईल. तेव्हां त्या जोरावरच स्वरसंधि होणार नाहीं.

ज्या ठिकाणीं मूळचा दीर्घ इक् असेल तेथें त्याला ऱ्हस्व होत असल्यामुळें त्याच्या जोरावर स्वरसंधि होणार नाहीं. पण ज्या ठिकाणीं मूळ-

---

२. हे शालेन्द्र या संबोधनाच्या रूपामध्यें 'शाला इन्द्र' अशी स्थिति असतांना गुरोरनृतो० (८।२।८६) यानें शाला शब्दांतील शेवटच्या आकाराला प्राप्त झालेल्या प्लुतानें आद् गुणः या संधिकार्याचा बाध होईल.

३ वाक्याला प्लुत मागितला असल्यामुळें प्लुताला वाक्यांतील इतर पदांची अपेक्षा आहे म्हणून तो बहिरंग आहे. आणि गुणाला इतर पदांची अपेक्षा नसल्यामुळे गुण अंतरंग आहे.

१. ( सू. १२६ ) अच् पुढें असतांना आणि संहिता असतांना वेदामध्यें आङाला अनुनासिक होतो आणि त्याला संधिकार्य होत नाहीं. उदा०— अभ्र आँ अपः.

२. 'ज्याचा प्रयोग व्यर्थ आहे' म्हणजे 'प्रयोग केला नसतांनाहीं तो अर्थ प्रतीत होतो तो' असा येथें अनर्थक शब्दाचा अर्थ समजावा. अभ्र आँ अपः या उदाहरणामध्यें अभ्रे या सप्तमीचा जो अर्थ आहे त्यालाच दाखविणारा आङ् आहे.

३. आ अतरत् येथें आसमंतात् भागीं असा आङ् याचा अर्थ आहे.

१. ( सू.१२७ ) शाकल्य ऋषीच्या मताने पदाच्या शेवटीं असलेल्या इकाला ऱ्हस्व होतो आणि त्याला प्रकृतिभाव होतो असवर्ण अच् पुढे असतांना. उदा०—चक्री याच्या पुढें अत्र शब्द लावला असतां चक्रि अत्र किंवा चक्र्यत्र अशीं मतभेदानें दोन रूपें होतात.

संधिः प्राप्नोति । ह्रस्वानामपि ह्रस्ववचनसामर्थ्यात्स्वरसंधिर्न भविष्यति । न ह्रस्वानां ह्रस्वाः प्राप्नुवन्ति न हि भुक्तवान्पुनर्भुङ्क्ते न च कृतश्मश्रुः पुनः श्मश्रूणि कारयति । ननु च पुनःप्रवृत्तिरपि दृष्टा । भुक्तवानपि पुनर्भुङ्क्ते कृतश्मश्रुश्च पुनः श्मश्रूणि कारयति । सामर्थ्यात्तत्र पुनःप्रवृत्तिर्भवति भोजनविशेषाच्छिल्पिविशेषाद्वा ह्रस्वानां पुनर्ह्रस्ववचने न किंचित्प्रयोजनमस्ति । अकृतकारि खल्वपि शास्त्रमग्निवत् । तद्यथा । अग्निर्यद्दग्धं तद्दहति ॥ ह्रस्वानामपि ह्रस्ववचन एतत्प्रयोजनं स्वरसंधिर्मा भूदिति । कृतकारि खल्वपि शास्त्रं पर्जन्यवत् । तद्यथा । पर्जन्यो यावदूनं पूर्णं च सर्वमभिवर्षति ॥ इदं तर्हि प्रयोजनं प्लुतप्रगृह्या अनुकृष्यन्ते । इकोऽसवर्णे शाकल्यस्य ह्रस्वश्च प्लुतप्रगृह्याश्च प्रकृत्या । नित्यग्रहणस्याप्येतत्प्रयोजनमुक्तम् । अन्यतरच्छक्यमवक्तुम् ॥

## सिन्नित्यसमासयोः शाकलप्रतिषेधः ॥ १ ॥

सिन्नित्यसमासयोः शाकलस्य प्रतिषेधो वक्तव्यः । अयं ते योनिर्ऋत्वियः । प्रजां

---

चाच ऱ्हस्व इक् असेल तेथें स्वरसंधि प्राप्त होणारच.

मूळचा ऱ्हस्व इक् असला तरी तेथेंही ऱ्हस्वविधानाचें जोरावर स्वरसंधि होणार नाहीं.

पण ऱ्हस्व इकाराला ऱ्हस्व प्राप्तच होत नाहीं. कारण भोजन केलेला मनुष्य पुनः भोजन करीत नाहीं. किंवा ज्यानें श्मश्रू करविली आहे तो पुन्हां श्मश्रू करवीत नाहीं.

पण पुनः प्रवृत्तीही दृष्टीस पडते. भोजन केलेलाही पुनः भोजन करतो. आणि श्मश्रू करविलेलाही पुनः श्मश्रू करवितो. तेथें जी पुनः प्रवृत्ति दृष्टीस पडते ती विशेष प्रकारच्या भोजनानें किंवा विशेष प्रकारच्या कारागिराच्या लाभानें विशेष संतोष मिळतो म्हणून होते. आणि येथें तर जे मूळचे ऱ्हस्व आहेत त्यांना पुनः ऱ्हस्व करण्यांत कांहीं एक फायदा नाहीं. अग्नि जसा जाळलेलें जाळीत नाहीं, तसें शास्त्रही जेथें कार्य झालें आहे तेथें कार्याकरितां प्रवृत्त होत नाहीं.

पण येथें ऱ्हस्वालाही पुनः ऱ्हस्व करण्यांत 'त्याला संधि होत नाहीं' हा फायदा आहे. शिवाय शास्त्र सुद्धां पावसाप्रमाणें केलेली गोष्ट पुन्हां करते. पर्जन्य जसा स्थलावर जलावर खडकावर सर्वत्र पडतो तसें शास्त्रही तशा ठिकाणीं प्रवृत्त होण्यास कांहीं हरकत नाहीं.

तर मग 'च' शब्दाचें प्रयोजन 'प्लुतप्रगृह्याः' या पदाचें अनुकर्षण करणें हें समजावें. 'पदाच्या शेवटीं असलेल्या इकाला असवर्ण अच् पुढें असतांना ऱ्हस्व होतो, आणि पदाच्या शेवटीं असलेला इक् प्लुत किंवा प्रगृह्य असेल तर त्याला प्रकृतिभाव होतो' असा चकारानें 'प्लुतप्रगृह्याः' या पदाची अनुवृत्ति केल्यामुळें सूत्राचा अर्थ होतो.

'पण 'प्लुतप्रगृह्या अचि०' (६।१।१२५) येथील नित्यग्रहणाचेंही हेंच प्रयोजन दाखविलें आहे ना ?

तर मग या दोहोंपैकीं एक केलें नाहीं तरी हरकत नाहीं. म्हणजे नित्यग्रहण तरी करावयास नको, किंवा 'प्लुतप्रगृह्याः' याचें अनुकर्षणाकरितां 'च' शब्द तरी घालावयास नको.

(वा. १) सकार ज्याचा इत्संज्ञक आहे असा प्रत्यय पुढें असताना तसेंच नित्य समासामध्ये प्रकृत सूत्रानें सांगितलेला प्रकृतिभाव

---

२. तात्पर्य, येथें प्रकृत्या याची अनुवृत्ति आणली नाहीं तरी काम भागेल. तेव्हां सूत्रामध्यें त्याकरितां 'च' शब्द नको.

विन्दाम ऋत्वियाम् । वैयाकरणः सौवश्वः ॥ नित्यग्रहणेन नार्थः । सित्समासयोः शाकलं न भवतीत्येव । इदमपि सिद्धं भवति । वाप्यामश्वो वाप्यश्वः । नद्यामातिर्नद्यातिः ॥

**ईषा अक्षादिषु च्छन्दसि प्रकृतिभावमात्रम् ॥ २ ॥**

ईषा अक्षादिषु च्छन्दसि प्रकृतिभावमात्रं द्रष्टव्यम् । ईषा अक्षः । का ईमरे पिशङ्गिला । यथा अङ्गदः ॥

**ऋत्यकः ॥ ६ । १ । १२८ ॥**

किमर्थमिदमुच्यते ।

**ऋत्यकः सवर्णार्थम् ॥ १ ॥**

सवर्णार्थोऽयमारम्भः । होतृ ऋश्यः ॥

**अनिगन्तार्थं च ॥ २ ॥**

खट्व ऋश्यः । माल ऋश्यः ॥

**ऋति ह्रस्वादुपसर्गाद् वृद्धिर्विप्रतिषेधेन ॥ ३ ॥**

ऋति ह्रस्वो भवतीत्येतस्मादुपसर्गाद् वृद्धिर्भवति विप्रतिषेधेन । ऋति ह्रस्वो भवतीत्यस्यावकाशः । खट्व ऋश्यः । माल ऋश्यः । उपसर्गाद् वृद्धेरवकाशः । विभाषा ह्रस्वत्वं यदा न ह्रस्वत्वं सोऽवकाशः । ह्रस्वप्रसङ्ग उभयं प्राप्नोति । उपार्ध्नोति प्रार्ध्नोति । उपसर्गाद् वृद्धिर्भवति विप्रति-

---

होत नाहीं असा प्रतिषेध सांगावा. उदा०— अयं ते योनिर्ऋत्वियः प्रजां विन्दाम ऋत्वियाम्, वैयाकरणः, सौवश्वः.

येथे नित्यग्रहण करण्याचा कांहीं उपयोग नाहीं; 'सित् प्रत्यय पुढें असतांना व समासामध्यें प्रकृतिभाव होत नाहीं' असें वचन करावें. त्यामुळें वाप्यामश्वो वाप्यश्वः, नद्यामातिर्नद्यातिः ह्या वैकल्पिक समासांमध्यें प्रकृतिभावाचा प्रतिषेध झाल्यामुळें यण् आदेश सिद्ध होतो.

'ईषा अक्ष' वगैरे शब्दाविषयीं वेदामध्यें केवळ प्रकृतिभाव होतो असें वचन करावें. जसें—ईषा अक्षः; का ईमरे पिशङ्गिला; यथा अङ्गदः.

( सू. १२८) कशाकरितां हें सूत्र आरंभिलें आहे.

( वा. १ ) सवर्ण अच् पुढें असतांना तेथें प्रकृतिभाव होण्याकरितां 'ऋत्यकः' हें सूत्र आरंभिलें आहे. जसें—होतृ ऋश्यः.

( वा. २ ) तसेंच इक्भिन्न अक् असतांना तेथे प्रकृतिभाव होण्यासाठीं प्रकृत सूत्र आरंभिलें आहे. जसें—खट्व ऋश्यः; माल ऋश्यः.

( वा. ३ ) 'ऋत्यकः' ( ६।१।१२८ ) या ऱ्हस्वापेक्षां 'उपसर्गादृति०' ( ६।१।९१ ) ही वृद्धि विप्रतिषेधाने प्रथमतः होते. 'ऋत्यकः' याला खट्व ऋश्यः माल ऋश्यः येथें अवकाश आहे. व 'उपसर्गादृति' या वृद्धीला 'ऋत्यकः' या ऱ्हस्वाचे अभावपक्षीं उपार्च्छति येथें अवकाश आहे. पण 'ऋत्यकः' यानें ऱ्हस्व करण्याचें वेळीं दोहोंची प्राप्ति आली असतां विप्रतिषेधानें वृद्धि होते. उदा० उपार्ध्नोति. प्रार्ध्नोति. येथें 'उपसर्गादृति धातौ' या सूत्रानें सांगितलेली वृद्धि

---

३. ऋतु शब्दाहून घस् प्रत्यय (५।१।१०६) सकाराला इत्संज्ञा, लोप, घकाराला इय् आदेश (७।१।२) आणि यण् अशी कार्यें झालीं आहेत. येथें सिति च (१।४।१६) यानें पदसंज्ञा असल्यामुळें प्रकृत सूत्रानें प्रकृतिभाव प्राप्त होत आहे. व्याकरण शब्दामध्यें वि आणि आ या गतींचा करण शब्दाबरोबर नित्यसमास (२।२।१८) झाला आहे. तसाच स्वश्व या शब्दामध्यें सु या गतीचा अश्व शब्दाबरोबर नित्यसमास झाला आहे. येथेंही प्रकृत सूत्राने प्रकृतिभाव झाला तर यण् होणार नाही.

४. 'केवळ' या शब्दाने ह्या प्रकृतिभावाबरोबर ऱ्हस्वाचे विधान नाही असे समजतें.

१. ( सू १२८ ) शाकल्य ऋषीच्या मतानें पदाच्या शेवटी असलेल्या अकाला ऱ्हस्व होतो आणि त्याला प्रकृतिभाव होतो ऱ्हस्व ऋकार पुढें असतांना. उदा०— खट्वा याच्या पुढें ऋश्य शब्द लावला असतां खट्व ऋश्यः किंवा खट्वर्श्यः अशी मतभेदानें दोन रूपें होतात.

षेधेन । स तर्हि विप्रतिषेधो वक्तव्यः । न वक्तव्यः । उक्तं तत्र धातुग्रहणस्य प्रयोजनमुपसर्गादृति धातौ वृद्धिरेव यथा स्याद्यदन्यत्प्राप्नोति तन्मा भूदिति ॥

**अप्लुतवदुपस्थिते ॥ ६।१।१२९ ॥**

उपस्थित इत्युच्यते किमिदमुपस्थितं नाम । अनार्ष इतिकरणः । सुश्लोका३ इति सुश्लोकेति ॥

अथ वद्वचनं किमर्थम् ।

**वद्वचनं प्लुतकार्यप्रतिषेधार्थम् ॥ १ ॥**

वद्वचनं क्रियते प्लुतकार्यप्रतिषेधार्थम् । प्लुतकार्यं प्रतिषिध्यते त्रिमात्रता न प्रतिषिध्यते । किं चेदानीं त्रिमात्रताया अप्रतिषेध प्रयोजनं यावता प्लुतकार्ये प्रतिषिद्धे स्वरसंधिना भवितव्यम् ।

**प्लुतप्रतिषेधे हि प्रगृह्यप्लुतप्रतिषेधप्रसङ्गोऽन्येन विहितत्वात् ॥ २ ॥**

प्लुतप्रतिषेधे हि सति प्रगृह्यस्यापि प्लुतस्य त्रिमात्रतायाः प्रतिषेधः प्रसज्येत । अग्नी३ इति । वायू३इति । किं चेदानीं तस्या अपि त्रिमात्रताया अप्रतिषेधे प्रयोजनं यावता प्लुतकार्ये प्रतिषिद्धे स्वरसंधिना भवितव्यम् । न भवितव्यम् । किं कारणम् । अन्येन विहितत्वात् । अन्येन हि लक्षणेन प्लुतप्रगृह्यस्य

---

विप्रतिषेधानें होते.

तर मग तें पूर्वविप्रतिषेधवचन अवश्य करावयास पाहिजे.

करावयास नको. कारण 'उपसर्गादृति०' या सूत्रावर ( पृ. ७०।१२ ) उपसर्गाहून ऋकारादि धातु पुढें असतांना वृद्धिच होत, तेथें जें दुसरें कांहीं प्राप्त असेल तें होत नाहीं असें धातुग्रहणाचें प्रयोजन सांगितलें आहे.

( सू. १२९ ) येथे उपस्थिते असें म्हटलें आहे. उपस्थित म्हणजे काय ?

वेदपाठात नसून पदकारानीं जोडलेला इति शब्द हा उपस्थित शब्दाचा अर्थ होय. जसें— सुश्लोक३ इति सुश्लोकेति.

आतां येथें अप्लुतवत् असें वत्—करण केलें आहे तें कशाकरिता ?

( वा. १ ) प्लुतामुळें होणाऱ्या कार्याचाच प्रतिषेध व्हावा आणि प्लुताचा म्ह० त्रिमात्रतेचा प्रतिषेध न व्हावा यासाठीं वत् करण केलें आहे.

पण प्लुतकार्याचा प्रतिषेध केला असतां अर्थात् स्वरसंधि होणारच मग त्रिमात्रता ठेवण्यांत काय फायदा आहे. ?

( वा. २ ) प्लुताचा प्रतिषेध केला असतां प्रगृह्यसंज्ञा असेल तेथेही त्रिमात्रतेचा प्रतिषेध होईल. जसें—अग्नी३ इति वायू३ इति.

पण येथें त्रिमात्रतेचा निषेध न करण्यानें काय होणार आहे ? कारण प्लुतकार्याचा निषेध झाल्यामुळें संधिकार्य होऊन प्लुताचा नाश होणारच.

असें होणार नाहीं.

काय कारण ?

कारण असें कीं प्लुताश्रय प्रकृतिभावाचा निषेध केला तरी येथें प्रगृह्याश्रय प्रकृतिभाव

---

१ ( सू. १२९ ) अवैदिक इति शब्द पुढें असतांना प्लुत हा अप्लुतासारखा समजावा. उदा०— सुश्लोक ३ इति. येथें प्लुत हा अप्लुतासारखा समजल्यामुळें प्रकृतिभाव होत नाहीं आणि गुण होऊन सुश्लोकेति असें होतें.

२ कारण त्या त्रिमात्र अशा अचाचे स्थानीं संधिकार्य झालें म्हणजें त्या तीन मात्रांचें श्रवण होणार नाहींच.

३. अग्नी हें दीर्घ-ईकारान्त द्विवचन असल्यामुळें त्याला प्रगृह्यसंज्ञा ( १।१।११ ) आहे. तेव्हां येथें प्लुतामुळें प्राप्त झालेल्या प्रकृतिभावाचा प्रकृत सूत्रानें बाध केला तरी प्रगृह्य संज्ञेमुळें येथें प्रकृतिभाव होणारच असल्यामुळें संधिकार्य होत नाहीं. तेव्हां येथें प्लुताचें श्रवण होतें.

प्रकृतिभाव उच्यते प्रगृह्यः प्रकृत्येति ॥

**ई३ चाक्रवर्मणस्य ॥ ६ । १ । १३० ॥**

किमर्थमिदमुच्यते ।

**ई३ चाक्रवर्मणस्येत्यनुपस्थितार्थम् ॥ १ ॥**

अनुपस्थितार्थोऽयमारम्भः । चिनु ही३ इदम् चिनु हीदम् । सुनु ही३इदम् सुनु हीदम् ॥ ईकारग्रहणेन नार्थः । अविशेषेण चाक्रवर्मणस्याचार्यस्याप्लुतवद्भवतीत्येव । इदमपि सिद्धं भवति । वशा३इयम् वशेयम् ॥

**दिव उत् ॥ ६ । १ । १३१ ॥**

किमर्थस्तकारः । तपरस्तत्कालस्य [ १. १. ७० ] इति तत्कालो यथा स्यात् ॥ नैतदस्ति प्रयोजनम् । आन्तर्यतोऽर्धमात्रिकस्य व्यञ्जनस्य मात्रिको भविष्यति ॥ न सिध्यति । ऊठि कृत आन्तर्यतो दीर्घस्य दीर्घः प्राप्नोति

**तदर्थं तपरः कृतः ।**

एवमर्थं तपरः क्रियते ॥

**[ एतत्तदोः सुलोपोऽकोरनञ्समासे हलि ॥ ६ । १ । १३२ ॥**

**स्यश्छन्दसि बहुलम् ॥ ६ । १ । १३३ ॥**

**सोऽचि लोपे चेत्पादपूरणम् ॥**

---

होत असल्यामुळे त्रिमात्रतेचें श्रवण होऊं शकतें हें वत्करणाचें फल होय.

( सू. १३० ) हें सूत्र कशाकरितां केलें आहे ?

उपस्थित पुढें नसतां अप्लुतवद्भाव होण्याकरितां हें सूत्र केलें आहे. उदा०—चिनु ही३ इदम्, चिनु हीदम्; सुनु ही३ इदम्, सुनु हीदम्. येथें ई३कार ग्रहण केलें आहे त्याचा उपयोग नाही. चाक्रवर्मण ऋषीच्या मतीं प्लुताला अप्लुतवद्भाव होतो असेंच मोघम सांगावें. त्यामुळें वशा३ इयम्, वशेयम् येथेंही त्याच्या मतानें अप्लुतवद्भाव सिद्ध होतो.

( सू. १३१ ) येथे उत् असें तकार जोडून कशाकरितां उच्चारण केलें आहे ?

'तपरस्तत्कालस्य' ( १।१।७० ) यानें ऱ्हस्व उकाराचेंच ग्रहण व्हावें म्हणून तकार जोडला आहे.

हें प्रयोजन बरोबर दिसत नाहीं. अर्धमात्रिक अशा वकाराचे स्थानीं त्याच्या जवळचा असा एकमात्रिकच उकार होईल.

पण अशा रीतीनें सर्व ठिकाणीं निर्वाह होणार नाहीं. कारण द्युभ्याम् वगैरे ठिकाणीं दिव्भ्याम् अशा स्थितीमध्यें अगोदर ऊठ् ( ६।४।१९ ) केला असतां त्या दीर्घ ऊकाराला प्रकृत सूत्रानें होणारा उकारही त्याच्या सारखा दीर्घच होईल तो न व्हावा आणि ऱ्हस्वच उकार व्हावा म्हणून तपर असें उच्चारण केलें आहे.

---

१. ( सू. १३० ) चाक्रवर्मण ऋषीच्या मतानें प्लुत ईकार हा अप्लुतासारखा समजावा. उदा०— चिनुहि ३ याच्या पुढें इदम् शब्द लावला असतां चिनुहीदम् असें संधिकार्य होतें.

१. ( सू. १३१ ) पदाच्या शेवटीं असलेल्या दिव् शब्दाच्या वकाराला ऱ्हस्व उकार आदेश होतो. उदा० द्युभ्याम्.

१. ( सू. १३२ ) हल् पुढें असतांना एतद् आणि तद् या शब्दांपुढील प्रथमा एकवचन सुप्रत्ययाचा लोप होतो; परंतु त्या शब्दांना अकच् प्रत्यय केलेला नसावा, आणि त्या शब्दांचा नञ्बरोबर समास केलेला नसावा. उदा०— एष ददाति, स ददाति.

१. ( सू. १३३ ) वेदामध्यें त्यद् शब्दापुढील प्रथमा एकवचन सुप्रत्ययाचा बाहुल्येंकरून लोप होतो हल् पुढें असतांना. उदा०— एष स्य वाजी.

१. ( सू. १३४ ) अच् पुढें असतांना तद् शब्दापुढील प्रथमा एकवचन सुप्रत्ययाचा लोप होतो, पण हा लोप केला तरच तेथें संधि होऊन पाद जमतो अशी

६ । १ । १३४ ॥ ]

## सुट् कात्पूर्वः ॥ ६।१।१३५॥

कात्पूर्वग्रहणं किमर्थम् । कात्पूर्वो यथा स्यात् । संस्कर्ता संस्कर्तुम् । नैतदस्ति प्रयोजनम् । सुडित्यादिलिङ्गोऽयं करोतिश्च ककारादिस्तत्रान्तरेण कात्पूर्वग्रहणं कात्पूर्व एव भविष्यति ॥ अत उत्तरं पठति ।

सुटि कात्पूर्ववचनमककारादौ कात्पूर्वार्थम् । सुटि कात्पूर्ववचनं क्रियतेऽककारादौ करोतौ कात्पूर्वो यथा स्यात् । संचस्करतुः संचस्करुः ।।

**सुटि कात्पूर्ववचनमककारादौ कात्पूर्वार्थमिति चेदन्तरेणापि तत्सिद्धम् ॥१॥**

सुटि कात्पूर्ववचनमककारादौ कात्पूर्वार्थमिति चेदन्तरेणापि कात्पूर्वग्रहणं सिद्धम् । कथम् ।

द्विर्वचनात्सुड् विप्रतिषेधेन । द्विर्वचन क्रियतां सुडिति सुड भविष्यति विप्रतिषेधेन । तत्र द्विर्वचनं भवतीत्यस्यावकाशः । बिभिदतुः बिभिदुः । सुटोऽवकाशः । संस्कर्ता संस्कर्तुम् । इहोभयं प्राप्नोति । संचस्करतुः संचस्करुरिति । सुड् भवति विप्रतिषेधेन ॥

**द्विर्वचनात्सुड् विप्रतिषेधेनेति चेद् द्विर्भूते शब्दान्तरभावात्पुनः प्रसङ्गः ॥२॥**

द्विर्वचनात्सुड् विप्रतिषेधेनेति चेद् द्विर्भूते

---

( सू. १३५ ) येथे ककाराहून पूर्वभागीं असें जे म्हटलें आहे तें कशाकरिता ?

सुट् आगम ककाराच्या पूर्वी व्हावा म्हणून म्हटलें आहे. उदा०—संस्कर्ता, संस्कर्तुम्.

हें प्रयोजन बरोबर दिसत नाहीं. कारण, सुट् यामध्यें आद्यावयव होतो अशा अर्थाचे सूचक टकार हें चिन्ह लावलेंच आहे. आणि करोति धातूच्या आरंभीं तर ककारच आहे. तेव्हां कात्पूर्वः असें म्हटल्यावाचूनच ककाराचे मागें सुट् आगम होईल. हें मनांत धरून वार्तिककार म्हणतात—

सुट् आगमाविषयीं ‘ ककाराच्या मागें ’ अशा अर्थाचें ‘कात्पूर्व’ ग्रहण केलें आहे ते जेथें करोति धातु ककारादि नसेल तेथेंही ककाराच्या मागेंच सुट् आगम व्हावा म्हणून केलें आहे. जसें—संचस्करतुः संचस्करुः.

सुट् आगमाविषयीं ‘ कात्पूर्व ’ म्हणजे ककाराच्या मागें असें वचन ककारादि धातू नसेल तेव्हा ककाराच्या मागें ‘ सुट् ’ व्हावा याकरितां करावें असें म्हणाल तर ‘ ककाराच्या मागें ’ असें म्हटल्यावांचूनही सुट् आगम ककाराच्या मागें होईल.

तो कसा ?

द्विर्वचनाच्या पूर्वी सुट् होईल. विप्रतिषेधानें सम्–कृ–अतुस् अशी स्थिति असतां द्विर्वचन व सुट् या दोहोंमध्यें विप्रतिषेधाने प्रथमतःच सुट् आगम होईल. त्यात बिभिदतुः बिभिदुः येथें द्विर्वचनाला अवकाश आहे, व सुट् आगमाला सस्कर्ता संस्कर्तुम् येथे अवकाश आहे. आणि सचस्करतुः सचस्करुः इत्यादि स्थलीं दोहोंची प्राप्ति आली असतां परत्वास्तव पूर्वी सुट् होईल.

( वा. २ ) द्विर्वचनापेक्षां प्रथमतः सुट् झाला तर द्वित्व झाल्यानंतर स्कृस्कृ असा हा निराळ्याच प्रकारचा कृ धातु झाला असल्या-

---

स्थिति असली पाहिजे. उदा०– सेदु राजा क्षयति चर्षणीनाम्. सैष दाशरथी रामः.

१. ( सू. १३५) हें अधिकार सूत्र आहे. पारस्कर ( ६।१।१५७ ) या सूत्रापर्यंत सुट् कात् आणि पूर्वः या पदांचा संबंध प्रत्येक सूत्रामध्यें आहे.

२. कृ धातूहून लिट् प्रत्यय केला आहे. द्वित्वानें चकृ असें झाल्यामुळे त्या चकाराच्या मागे सुट् आगम होईल तो उत्तरखंडातील ककाराच्या मागें झाला पाहिजे.

शब्दान्तरस्याकृतः सुडिति पुनः सुट् स्यात् ॥

**द्विर्भूते शब्दान्तरभावात्पुनःप्रसङ्ग इति चेद् द्विर्वचनम् ॥३॥**

सुटि कृते शब्दान्तरस्याकृतमिति पुनर्द्विर्वचनं प्राप्नोति ॥

**तथा चानवस्था ॥ ४ ॥**

पुनः सुट् पुनर्द्विर्वचनमिति चक्रकमव्यवस्था प्रसज्येत ॥ नास्ति चक्रकप्रसङ्गः । न ह्यव्यवस्थाकारिणा शास्त्रेण भवितव्यम् । शास्त्रतो हि नाम व्यवस्था । तत्र सुटि कृते द्विर्वचनं द्विर्वचनेनावस्थानं भविष्यति ॥

**अड्व्यवाय उपसंख्यानम् ॥ ५ ॥**

अड्व्यवाय उपसंख्यानं कर्तव्यम् । समस्करोत् समस्कार्षीत् ॥

**अभ्यासव्यवाये च ॥ ६ ॥**

अभ्यासव्यवाये चोपसंख्यानं कर्तव्यम् । संचस्करतुः संचस्करुः ॥ किमुच्यतेऽभ्यासव्यवाय इति यदिदानीमेवोक्तं द्विर्वचनात्सुड् विप्रतिषेधेनेति ।

**अविप्रतिषेधो वा बहिरङ्गलक्षणत्वात् ॥ ७ ॥**

अविप्रतिषेधो वा पुनः सुटः । किं कारणम् । बहिरङ्गलक्षणत्वात् । बहिरङ्गलक्षणः सुट् । अन्तरङ्ग द्विर्वचनम् । असिद्धं बहिरङ्गमन्तरङ्गे ॥ एवमर्थमेव तर्हि कात्पूर्वग्रहणं कर्तव्यं कात्पूर्वो यथा स्यात् ॥

क्रियमाणेऽपि वै कात्पूर्वग्रहणेऽत्र न सिध्यति न ह्ययं कात्पूर्वग्रहणेन शक्यो मध्ये प्रवेशयितुम् । किं कारणम् । आदिलि-

---

मुळें त्याला पुनः सुटाचा प्रसंग येत आहे.

( वा. ३ ) तसेंच, सुट् झाल्यानंतरही निराळ्या प्रकारचा धातु होत असल्यामुळें द्विर्वचनही पुनः प्राप्त होत आहे.

(वा. ४) तेव्हां पुनः सुट् पुनः द्विर्वचन पुनः सुट् पुनः द्विर्वचन प्राप्त होत असल्यामुळें चक्राप्रमाणें अनवस्था होऊन सर्व अव्यवस्था होईल.

अशी चक्राप्रमाणें अनवस्था प्रसक्त होत नाहीं. कारण शास्त्र हें अनवस्था करणारें नसून उलट व्यवस्था करणारेंच आहे. तेव्हां परत्वास्तव पूर्वी सुट् केल्यानंतर द्विर्वचन करावयाचें, आणि तेवढ्यानेंच थांबावयाचें; म्हणजे अनवस्था येणार नाहीं.

( वा. ५ ) अट् आगमानें व्यवधान असतांनाहीं सुट् होतो असें वचन करावें. समस्कार्षीत् समस्करोत्.

( वा. ६ ) अभ्यासानें व्यवधान असतांना सुट् होतो असें हीं वचन करावें. जसें—संचस्करतुः संचस्करुः.

पण हें वचन करावयास नको. कारण नुकतेंच पूर्वी सांगितलें आहे कीं— विप्रतिषेध असल्यामुळें द्विर्वचनापेक्षां प्रथमतः सुट् होतो.

(वा. ७) हा विप्रतिषेधच मुळीं बरोबर नाहीं.

काय कारण ?

कारण असें कीं सम् या दुसऱ्या पदाची जरूरी असल्यामुळें सुट् बहिरंग आहे. व द्वित्व अंतरंग आहे. आणि अंतरंग कर्तव्य असतांना बहिरंग असिद्धच समजलें जातें.

तर मग आतां याच कारणाकरितां 'कात्पूर्व-' ग्रहण केलें पाहिजे. संचस्करतुः इत्यादि स्थलीं अंतरंगत्वास्तव पूर्वी द्विर्वचन केलें असतां ककाराच्या पूर्वी सुट् आगम झाला पाहिजे.

पण कात्पूर्व ग्रहण केलें तरी येथें सुट् आगमाचा मध्यें प्रवेश कसा होणार ?

---

३. द्वित्व वगैरे कार्यें झालीं असतां जरी धातूच्या स्वरूपांत थोडासा बदल होतो तरी तो धातु निराळा असें समजतां येत नाहीं. तेव्हां पुनः सुट् आगम किंवा पुनः द्वित्व होत नाहीं.

ङ्गोऽयं क्रियते करोतिश्च ककारादिर्दृष्टश्च पुनरातिदेशिकः करोतिरककारादिः ॥ पाक्षिक एष दोषः । कतरस्मिन्पक्षे । सुड्विधौ द्वैतं भवति । अविशेषेण वा विहितस्य सुटः कात्पूर्वग्रहणं देशप्रक्लृप्त्यर्थं स्याद्विशेषेण वा विधिरिति । द्विर्वचनविधौ चापि द्वैत भवति । स्थाने द्विर्वचनं स्याद्द्विःप्रयोगो वा द्विर्वचनमिति । तद्यदा द्विःप्रयोगो द्विर्वचनमविशेषेण विहितस्य च सुटः कात्पूर्वग्रहणं देशप्रक्लृप्त्यर्थं तदैष दोषः । यदा हि स्थाने द्विर्वचनं तदा यद्येवाविशेषेण विहितस्य सुटः कात्पूर्वग्रहणं देशप्रक्लृप्त्यर्थमथापि विशेषविधिर्न तदा दोषो भवति ॥ द्विःप्रयोगे चापि द्विर्वचने न दोषः । सपरिभ्यामिति

---

कारण आद्यावयव करण्याचें चिन्ह असा टकार या आगमाला जोडलेला दिसतो. आणि करोति धातु तर मूळचा ककारादि आहे. शिवाय द्वित्व व अट् आगम केल्यानंतर जो अतिदेशानें कृ धातु समजला जातो तो ककारादि नाहीं असें दृष्टीस पडत आहे.

सचस्करतुः येथें सुट् आगमाचा मध्यें प्रवेश होणार नाहीं हा दोष पाक्षिक आहे.

कोणत्या पक्षीं तो दोष येतो.

सुट्–विधीविषयीं दोन तऱ्हा आहेत. त्या अशा– कात्पूर्वः हें केवळ व्यवस्थापक, म्हणजे ' संपरिभ्याम्० ' ( ६।१।१३७ ) इत्यादि शास्त्रांनीं सुट् आगमाची प्राप्ति आली असतां तो अट् व अभ्यास यांनीं व्यवधान असलें तरी ककाराच्या पूर्वी करावा अशा रीतीनें त्याचा देश ठरविणें ही एक तऱ्हा. दुसरी तऱ्हा म्हणजे हा स्वतंत्र विधि. तसेंच द्विर्वचनाविषयींही दोन तऱ्हा आहेत. एक स्थानेद्विर्वचन आणि दुसरें द्विःप्रयोगरूप–द्विर्वचन. यांत द्विःप्रयोगरूप-द्विर्वचन ही तऱ्हा घेऊन तिचे जोडीला सुट् आगमाचा प्रदेश ठरविणारें कात्पूर्वग्रहण ही तऱ्हा घेतली असतां हा दोष येत आहे. जेव्हां स्थानेद्विर्वचन ही तऱ्हा घेतली जाईल तेव्हां तिच्या जोडीला सुट् आगमाचा प्रदेश ठरविणारें कात्पूर्वग्रहण ही तऱ्हा घेतली, किंवा कात्पूर्वः हा स्वतंत्र विधि आहे ही तऱ्हा घेतली तरी दोष येत नाहीं.

आता द्विःप्रयोगरूप द्विर्वचन ही तऱ्हा

---

४. तेव्हां टकार हें चिन्ह संभाळून ककाराच्या पूर्वी सुट् आगम संस्कर्ता इत्यादि उदाहरणांमध्यें करता येतो. म्हणून तशा ठिकाणीच सुट् आगम होईल. जेथें कृ धातु ककारादि असत नाहीं तेथें मुळींच सुट् आगम होणार नाहीं. हाच कात्पूर्वः असें म्हणण्याचा उपयोग होईल. द्विःप्रयोगद्विर्वचन हा पक्ष घेतला असतां एक कृ धातु दोनदां उच्चारला जातो. त्यांत पहिला कृ धातु सम् याच्यापुढें असल्यामुळें सुट् आगमाची प्राप्ति येते; परंतु त्यांत ककार नसल्यामुळें कात् पूर्वः यानें व्यवस्था करतां येत नाही. दुसऱ्या कृ मध्य ककार आहे परंतु तो कृ अभ्यासानें व्यवहित असल्यामुळें सुट् आगमाची मुळी प्राप्तीच येत नाहीं. अभ्यासव्यवायेऽपि याचा संबंध कात्पूर्वः याचेकडे आहे. तेव्हां कात्पूर्वः हें जर व्यवस्थापक आहे तर व्यवस्था करतांना व्यवधान खपेल. परंतु सपरिभ्यां करोतौ० याची प्राप्ति आहे असें व्यवधान असतांना म्हणतां येणार नाहीं. तेव्हां अर्थातच व्यवस्था करणारें कात्पूर्वः हें प्रवृत्त होणारच नाहीं. आतां कात्पूर्वः हें व्यवस्थापक नव्हे तर अभ्यासानें व्यवधान असल्यामुळें सुट् आगमाची प्राप्ति नाही म्हणून तेथें स्वतंत्र विधायकच आहे, असें घेतलें म्हणजे मात्र हा दोष येत नाहीं. तसेंच आदेशद्विर्वचन पक्ष घेतला तर कात्पूर्वः हें व्यवस्थापक मानलें तरी दोष येत नाहीं. कारण एका कृ याचे स्थानी कृकृ एवढा आदेश झाल्यामुळें आणि तो सम् याच्या पुढें असल्यामुळें सुट् आगमाची प्राप्ति येते व उत्तरखंडांत ककार असल्यामुळें अभ्यासानें व्यवधान असलें तरी त्या ककाराच्या पूर्वी सुट् आगमाची व्यवस्था करतां येते.

नैषा पञ्चमी । का तर्हि । तृतीया । संपरिभ्यामुपसृष्टस्येति । व्यवहितश्चाप्युपसृष्टो भवति ॥

## उपदेशिवद्वचनं च ॥ ८ ॥

उपदेशिवद्भावश्च वक्तव्यः । किं प्रयोजनम् ।

## लिटि गुणचङि दीर्घप्रतिषेधार्थम् ॥ ९ ॥

लिटि गुणार्थं चङि दीर्घप्रतिषेधार्थम् । लिटि गुणार्थं तावत् । सचस्करतुः संचस्करुः। चङि दीर्घप्रतिषेधार्थं च । समचिस्करत् ॥ लिटि गुणार्थेन तावन्नार्थः । वक्ष्यत्येतत्संयोगादेर्गुणविधाने संयोगोपधग्रहणं कृञर्थमिति । चङि दीर्घप्रतिषेधार्थेनापि नार्थः । पदमितीयं भगवतः कृत्रिमा संज्ञा । युक्तमिह द्रष्टव्यं किमन्तरङ्गं किं बहिरङ्गमिति । धातूपसर्गयोः कार्यं यत्तदन्तरङ्गम् । कुत एतत् । पूर्वं हि धातुरुपसर्गेण युज्यते पश्चात्साधनेनेति । नैतत्सारम् । पूर्वं धातुः साधनेन युज्यते पश्चादुपसर्गेण । साधनं हि क्रियां निर्वर्तयति तामुपसर्गो विशिनष्ट्यभिनिर्वृत्तस्य चार्थस्योपसर्गेण विशेषः

---

घेतली असताही दोष येत नाहीं.

तो कसा ?

संपरिभ्याम् ही पंचमी नव्हे, तर तृतीया आहे. म्हणून सम् व परि यांनीं सबद्ध अशा धातूला सुट् होतो असा अर्थ झाल्यामुळें कृ धातु जरी व्यवहित असला तरी तो उपसर्गाशीं संबद्ध आहेच, म्हणून सुट् होईल.

( वा. ८ ) सुट् आगमाला उपदेशिवद्भावाचें विधान करावें. म्हणजे प्रत्ययोत्पत्ति होण्याचें पूर्वींच सुट् होतो असें वचन करावें.

याचा काय उपयोग ?

( वा. ९ ) लिट् केला असतां गुण व्हावा आणि चङ् केला असतां दीर्घ होऊं नये हा उपयोग होय. उदा०–संचस्करतु: संचस्करुः येथे अगोदर सुट् झाला म्हणून स्कृ हा संयोगादि धातु आहे म्हणून त्याला गुण ( ७।४।१० ) होतो. तसेंच समचिस्करत् येथें अगोदर सुट् झाला म्हणून त्या सयोगाच्या मागील इकाराला गुरुसंज्ञा ( १।४।११ ) झाल्यामुळे दीर्घ ( ७।४।९४ ) होत नाहीं.

त्यापैकीं लिटामध्यें गुण होण्याकरितां तर या उपदेशिवद्वचनाचा उपयोग होत नाहीं. कारण ' संयोगादेर्गुणविधाने सयोगोपधग्रहणं कृञर्थम् ' ( ७।४।१० वा. १ ) असें वार्तिककार पुढें सांगणारच आहेत. तसेंच चङ् केला असतां ' दीर्घो लघो: ' या दीर्घाच्या प्रतिषेधाकरतांही उपदेशिवद्वचनाचा उपयोग येत नाहीं. कारण पद ही संज्ञा भगवान् पाणिनीची केवळ कल्पित आहे. तेव्हां तिकडे दुर्लक्ष करून वस्तुस्थिति पाहूनच कोण अंतरंग आणि कोण बहिरग याचा विचार केला पाहिजे. आणि अशा दृष्टीनें पाहिलें म्हणजे धातु आणि उपसर्ग याचे संबंधीं जें कार्य ते अंतरगच समजलें जाईल ?

हें कशावरून ?

अशावरून कीं– धातु हा प्रथमतः उपसर्गाबरोबर संबंध पावतो, आणि मग कर्ता कर्म वगैरे अर्थांच्या प्रत्ययाशीं त्याचा संबध होतो. पण हा कांहीं सिद्धांत नव्हे. तर प्रथमतः धातु कारकाशींच सबंध पावतो आणि मागून उपसर्गाशीं. कारण कारक हें क्रियेला उत्पन्न करणारें आहे. आणि उपसर्ग हा त्या उत्पन्न झालेल्या क्रियेवरील कांहीं विशेष दाखविणारा आहे. तेव्हां पदार्थ उत्पन्न झाल्यानतरच त्याच्यांतील कांहीं विशेष दाखविणें शक्य होतें.

---

५. सुट् आगमाला सम् परि वगैरे दुसऱ्या पदाची अपेक्षा असल्यामुळें तो बहिरंग आहे, म्हणून त्याच्या पूर्वीं इतर कार्यें होतील अशा समजुतीनें दोष दाखविले आहेत तें बरोबर नाहीं असा अभिप्राय आहे.

शक्यो वक्तुम् । सत्यमेवमेतत् । यस्त्वसौ धातूपसर्गयोरभिसंबन्धस्तमभ्यन्तरं कृत्वा धातुः साधनेन युज्यते । अवश्यं चैतदेवं विज्ञेयम् । यो हि मन्यते पूर्वं धातुः साधनेन युज्यते पश्चादुपसर्गेणेति तस्य आस्यते गुरुणेत्यकर्मक उपास्यते गुरुरिति केन सकर्मकः स्यात् । एवं च कृत्वा सुट् सर्वतोऽन्तरङ्गतरको भवति कात्पूर्वग्रहणं चापि शक्यमकर्तुम् ॥

यदि पुनरयं सुट् कात्पूर्वान्तः क्रियेत ।

**कात्पूर्वान्त इति चेद्रुविधिप्रतिषेधः ॥ १० ॥**

कात्पूर्वान्त इति चेद्रुः कश्चिद्विधेयः कश्चित्प्रतिषेध्यः । संस्कर्ता । समो विधेयः सुटः प्रतिषेध्यः ॥ समस्तावन्न विधेयः । वक्ष्यत्येतत्संपूंकानां सत्वं रुविधौ ह्यनिष्टप्रसङ्ग इति । सुटश्चापि न प्रतिषेध्यः । समः सुटि [ ८. ३. ५. ] इति द्विसकारको

---

ही गोष्ट खरी आहे. पण जो हा उपसर्गाच्या संबंधामुळें अर्थ प्रतीत होतो तो अर्थ अगोदर मनांत घेऊनच त्याचा कारकाशीं संबंध होतो. आणि असें समजणें तर अत्यन्त आवश्यक आहे. कारण ' धातु हा प्रथम कारकाशीं संबंध पावतो आणि मागून उपसर्गार्थाशीं ' असें जो समजतो त्याच्या मतीं आस्यते गुरुणा येथें आस् धातु अकर्मक आणि उपास्यते गुरुः येथें सकर्मक कसा बरें होईल[६]. एकंदरींत सुट् आगम हा सर्वांपेक्षां अंतरंग आहे असें सिद्ध झालें. आणि आतां कात्पूर्वग्रहणही करावयास नको.

आतां जर हा सुट् आगम ककाराहून पूर्वाचा अन्तावयव म्हणजे सुक् असा केला तर—

( वा. १० ) सुक् असा आगम केला तर क्वचित्स्थलीं ' रु ' चें विधान करावें लागेल व क्वचित्स्थलीं त्याचा प्रतिषेध करावा लागेल. उदा०—संस्कर्ता येथें सम् याच्या मकाराला रुत्वाचें विधान केलें पाहिजे. आणि सुक् आगमाच्या सकाराला ' ससजुषो० ' ( ८।२।६६ ) यानें रुत्व प्रसक्त होत आहे त्याचा निषेध करावयास पाहिजे.

सम् याच्या मकाराला रुत्वाचें विधान करावयास नको. कारण ' सम्, पुम्, आणि कान् यांना सत्वाचें विधान करावें, रुत्वाचें विधान केलें असतां अनिष्ट प्रसंग येतो' (८।३।१२ वा. १,२ ) असें वार्तिककार पुढें सांगणारच आहेत. सुक् आगमाच्या सकारालाही रुत्वाचा प्रतिषेध करावयास नको. कारण ' समः स्सुटि ' असा दोन सकारांनीं घटित निर्देश आहे म्हणून सकारादि सुट् पुढें असतां असा अर्थ होतो.[९] अथवा

---

६. उपासना करणें हा जो उपसर्गामुळें आस् धातूचा अर्थ घेतला जातो तो जर पुढें भावी किंवा कर्मणि प्रत्यय करण्याच्या पूर्वी घेतला नाही तर आस् धातु मूळचा अकर्मक नसल्यामुळे कर्मणि प्रयोगच होणार नाही.

७. तेव्हां ज्याच्या अर्थाचा धात्वर्थाशी संबंध सर्वांत अगोदर होतो अशा उपसर्गाच्या निमित्तानें धातूला सांगितलेलें कार्य सर्वांत अंतरंग ठरतें. म्हणून सुट् आगम हा अंतरंगत्वास्तव अगोदरच होईल. तेव्हां संचस्करतुः येथें गुण आणि समचिस्करत् येथें दीर्घाचा अभाव सहजच साधत असल्यामुळें उपदेशिवद्वचन करावयास नको.

८. सुक् आगम सम् याचा अंतावयव झाल्यामुळे समस् एवढें पद होतें. तेव्हां मकार पदान्ती नाहीं आणि सकार पदान्ती येतो. म्हणून समः सुटि येथें सुकि म्हटलें तरी मकाराला रुत्व होणार नाहीं आणि सकाराला होऊं लागेल.

९ पूर्वाचा अन्तावयव सुक् केला असतां येथेंही समःस्सुकि असा निर्देश होतो. सुक् आगमाला सर्वत्र रुत्व प्राप्त होतें म्हणून सकारादि सुक् कोठेंच मिळत नाहीं. तेव्हां अर्थातच सकारादि असें जें म्हटलें आहे त्याच्या जोरावर सुक् आगमाच्या सकाराला रुत्व होत नाहीं अशी कल्पना होईल.

निर्देशः। सुटि सकारादाविति ॥ अथवा परादिः करिष्यते।

**परादाविड्गुणप्रसङ्गः ॥ ११ ॥**

यदि परादिरिड्गुणौ प्राप्नुतः। संस्कृषीष्ट। ऋतश्च संयोगादेः [ ७. २. ४३. ] इतीट् प्राप्नोति। संस्क्रियते। गुणोऽर्तिसंयोगाद्योः [ ७. ४. २९ ] इति गुणः प्राप्नोति ॥ एवं तर्ह्यभक्तः करिष्यते।

**अभक्ते स्वरः ॥ १२ ॥**

यद्यभक्तः स्वरो न सिध्यति। संस्करोति। तिङ्ङतिङः [ ८. १. २८ ] इति निघातो न प्राप्नोति। ननु च सुडेवातिङ्। न सुटः परस्य निघातेन भवितव्यम्। किं कारणम्। नञिवयुक्तमन्यसदृशाधिकरणे तथा ह्यर्थगतिः। नञ्युक्तमिवयुक्तं चान्यस्मिंस्तत्सदृशे कार्यं विज्ञायते तथा ह्यर्थो गम्यते। तद्यथा। अब्राह्मणमानयेत्युक्ते ब्राह्मणसदृशं क्षत्रियमानयति नासौ लोष्टमानीय कृती भवति। एवमिहाप्यतिङिति प्रतिषेधादन्यस्मादतिङस्तिङ्सदृशात्कार्यं विज्ञास्यते। किं चान्यदतिङ् तिङ्सदृशम्। पदम् ॥

**[ [1]अडभ्यासव्यवायेऽपि ॥ ६।१। १३६ ॥**

**[1]संपरिभ्यां करोतौ भूषणे ॥ ६। १। १३७ ॥**

**[1]समवाये च ॥ ६। १। १३८ ॥**

---

पुढच्याचा आद्यावयव म्हणजे सुट् असाच असूं दे.

( वा. ११ ) जर सुट् असा आगम केला तर संस्कृषीष्ट येथे ' ऋतश्च संयोगादेः० ' ( ७।२।४३ ) यानें इट् आगम आणि संस्क्रियते येथें ' गुणोऽर्तिसंयोगाद्योः ' ( ७।४।२९ ) यानें गुण प्राप्त होत आहे.

असें आहे तर मग अभक्त म्हणजे कोणाचाच अवयव नसलेला असा मध्येंच करण्यांत येईल.

( वा. १२ ) जर अभक्त केला तर संस्करोति येथें ' तिङ्ङतिङः ' ( ८।१।२८ ) यानें निघातस्वर साधत नाहीं. कारण अतिङन्त आणि तिङन्त यांमध्यें त्या सकारानें व्यवधान येत आहे.

पण येथें मध्यें केलेला सकार हाच अतिङन्त आहे ना ?

सकार वगैरे कोणी तरी तिङन्तभिन्न चालणार नाहीं ?

काय कारण ?

कारण असें कीं–'नञिवयुक्तमन्यसदृशाधिकरणे तथा ह्यर्थगतिः' असा न्याय आहे. म्हणजे ज्या ठिकाणीं नञ् किंवा इव या शब्दाचा प्रयोग असेल तेथें जें कार्य सांगितलें असेल तें अशाच ठिकाणीं होतें कीं त्या नञाचा किंवा इवाचा ज्याच्याशीं संबंध असेल त्याहून निराळा पण त्यासारखा असा पदार्थ असला पाहिजे. कारण लोकामध्यें तेथें तसाच अर्थ मनांत येतो. जसें– अब्राह्मणमानय असें म्हटलें असतां तेथे ब्राह्मणाहून भिन्न आणि ब्राह्मणासारखा असा दुसरा कोणीतरी क्षत्रिय वगैरे मनुष्यच आणिला जातो, तेथें ढेकूळ वगैरे आणणाऱ्याला शहाणा कोणी म्हणणार नाहीं. त्याप्रमाणेंच येथेंही अतिङ् असें म्हटलें असल्यामुळें तिङन्त नव्हे पण तिङन्तासारखाच जर कोणताही शब्द असेल तरच तेथें तो अनुदात्त होईल.

तिङन्त नव्हे पण तिङन्तासारखा असा कोण समजावा ?

पदसंज्ञक जो शब्द तो तसा समजावा.

---

१. ( सू. १३६ ) मागील सूत्रावरील दोन वार्तिकें ५, ६, मिळून सूत्रपाठामध्यें हें सूत्र आलें आहे.

१. ( सू. १३७ ) सम् किंवा परि या उपसर्गांच्या पुढें भूषण करणें या अर्थाचा कृ धातु आला असतां त्या धातूच्या ककाराच्या पूर्वी सुट् असा आगम होतो. उदा०– संस्कर्ता परिष्कर्ता.

१. ( सू. १३८ ) सम् किंवा परि या उपसर्गांच्या पुढें समुदित करणें या अर्थाचा कृ धातु आला असतां

**उपात्प्रतियत्नवैकृतवाक्याध्याहारेषु ॥ ६ । १ । १३९ ॥**

**किरतौ लवने ॥६ । १ । १४०॥**

**हिंसायां प्रतेश्च ॥६ । १ । १४१ ॥]**

**अपाच्चतुष्पाच्छकुनिष्वालेखने ॥ ६ । १ । १४२ ॥**

**किरतेर्हर्षजीविकाकुलायकरणेषु ॥१॥**

किरतेर्हर्षजीविकाकुलायकरणेष्विति वक्तव्यम् । अपस्किरते वृषभो हृष्टः । अपस्किरते कुक्कुटो भक्षार्थी । अपस्किरते श्वाश्रयार्थी ॥

**[ कुस्तुम्बुरूणि जातिः ॥ ६ । १ । १४३ ॥ ]**

**अपरस्पराः क्रियासातत्ये ॥६।१। १४४॥**

किमिदं सातत्य इति । संततभावः सातत्यम् । यद्येवं सांतत्य इति भवितव्यम् ।

**समो हिततततयोर्वा लोपः ॥ १ ॥**

समो हिततततयोर्वा लोपो वक्तव्यः ।

---

( सू. १४२ वा. १ ) हर्ष, जीविका, व कुलायकरण हे अर्थ गम्यमान असतांना या प्रकृत सूत्रानें सांगितलेला सुट् आगम होतो असें वचन करावें. उदा०-अपस्किरते वृषो हृष्टः म्ह. आनंदानें बैल उकरीत आहे, अपस्किरते कुक्कुटो भक्षार्थी म्ह. काहीं भक्ष्य मिळावें म्हणून कोंबडा उकरीत आहे, अपस्किरते श्वा आश्रयार्थी म्ह. बसावयास ठिकाण करण्याकरितां कुतरा उकरीत आहे.

( सू. १४४ ) येथें सातत्ये असें म्हटलें आहे तो सातत्य शब्द कसा बरें बनला आहे ?

संततस्य भावः सातत्यम्[2].

तर मग सांतत्यम् असें रूप झालें पाहिजे.

( वा. १ ) हित व तत शब्द पुढें असतांना

---

त्या धातूच्या ककाराच्या पूर्वी सुट् आगम होतो. उदा०—तत्र नः संस्कृतम्. येथें समुदितम् असा अर्थ आहे. समुदित करणें म्हणजे एके ठिकाणीं जुळविणें.

१. ( सू. १३९ ) उप या उपसर्गाच्या पुढें कृ धातु आला असतां त्याच्या ककाराच्या पूर्वी सुट् आगम होतो भूषण करणें किंवा समुदित करणें हे अर्थ असतांना, किंवा प्रतियत्न वैकृत व वाक्याध्याहार यांपैकीं कोणताही अर्थ गम्यमान असतांना. उदा० – उपस्करोति प्रतियत्न म्हणजे गुणाचें आधान करणें, वैकृत म्ह. विकृत होणे उपस्कृतं ब्रूते म्हणजे मध्ये वाक्याचा अध्याहार करून बोलतो.

१. ( सू. १४० ) उप या उपसर्गाच्या पुढें तुदादि गणांतील कृ धातु आला असतां त्याच्या ककाराच्या पूर्वी सुट् असा आगम होतो, पण ' वाटेल तिकडे फेकणें ' हा जो धातूचा अर्थ तो तोडणें या क्रियेच्या वेळचा असला पाहिजे. उदा० – उपस्कारं मद्रका लुनन्ति.

१. (सू. १४१) उप किंवा प्रति या उपसर्गांच्या पुढें तुदादि गणांतील कृ धातु आला असतां त्याच्या ककाराच्या पूर्वी सुट् आगम होतो. पण फेकणें हा जो धातूचा अर्थ तो हिंसेसंबंधी असला पाहिजे. उदा०—प्रतिस्कीर्णं ते वृषल भूयात्.

१. ( सू. १४२ ) अप या उपसर्गाच्या पुढें तुदादि गणांतील कृ धातु आला असतां त्याच्या ककाराच्या पूर्वी सुट् आगम होतो, पण पशु किंवा जे पायाने जमीन उकरतात ते असा धातूचा अर्थ असला पाहिजे उदा०—अपस्किरते वृषो हृष्टः, कुक्कुटो भक्षार्थी, श्वा आश्रयार्थी च.

१. ( सू. १४३ ) कु शब्दाच्या पुढें तुम्बुरु शब्द आला असतां मध्यें सुट् आगम होऊन कुस्तुम्बुरु असें निपातन केलें आहे, त्याचा अर्थ मात्र एक प्रकारची जाति असला पाहिजे. कुस्तुम्बुरु म्हणजे कोथिंबीर.

१. ( सू. १४४ ) अपर आणि पर या शब्दांचा समास झाला असतां मध्यें सुट् आगम निपातन केला जातो, क्रियेचें सातत्य म्हणजे एकसारखी क्रिया करतो असा अर्थ असला पाहिजे. उदा०— अपरस्पराः सार्था गच्छन्ति. सगळे मिळून एकसारखे जातात असा अर्थ आहे.

२. संतत शब्दाहून ' तस्य भावः ' या अर्थी ष्यञ् प्रत्यय ( ५।१।१२४ ) झाला आहे.

संहितम् सहितम् । संततम् सततम् ॥

**सम्तुमुनोः कामे ॥ २ ॥**

सम्तुमुनोः कामे लोपो वक्तव्यः । सकामः भोक्तुकामः ॥

मनसि चेति वक्तव्यम् । समनाः भोक्तुमनाः ॥

**अवश्यमः कृत्ये ॥ ३ ॥**

अवश्यमः कृत्ये लोपो वक्तव्यः । अवश्यभाव्यम् ॥

## गोष्पदं सेवितासेवितप्रमाणेषु ॥ ६।१।१४५ ॥

इदमतिबहु क्रियते सेविते असेविते प्रमाण इति । सेवितप्रमाणयोरित्येव सिद्धम् । केनेदानीमसेविते भविष्यति । नञा सेवितप्रतिषेधं विज्ञास्यामः ॥ नैवं शक्यम् । सेवितप्रसङ्ग एव स्यादसेविते न स्यात् । असेवितग्रहणे पुनः क्रियमाणे बहुव्रीहिरयं विज्ञास्यते । अविद्यमानसेवितेऽसेवित इति । तस्मादसेवितग्रहणं कर्तव्यम् ॥

---

सम् शब्दाच्या मकाराचा विकल्पानें लोप होतो असें वचन करावें. उदा० संहितम् सहितम्. संततम् सततम्.

( वा. २ ) काम शब्द पुढें असतांना सम् व तुम् यांच्या मकाराचा लोप होतो, असें वचन करावें. उदा०—सकामः, भोक्तुकामः.

मनस् शब्द पुढें असतांनाही सम् व तुम् यांच्या मकाराचा लोप होतो असें सांगावें उदा० समनाः भोक्तुमनाः.

(वा.३)कृत्य–प्रत्ययान्त पुढें असतांना अवश्यम् शब्दाच्या मकाराचा लोप होतो असें वचन करावें उदा०— अवश्यभाव्यम्.[3]

( सू. १४५ ) सेविते असेविते प्रमाणे असें जें येथें म्हटलें आहे तें विनाकारण फारच अधिक म्हटलें आहे तेथें 'सेवितप्रमाणयोः' एवढ्यानेंच काम भागत आहे.

पण जर असेवितग्रहण केलें नाहीं तर असेवित अर्थ असतां अगोष्पद येथें सुट् कशानें बरें होईल. ?

सेवित या अर्थी तयार केलेल्या 'गोष्पद' शब्दाचा नञाशीं समास केला म्हणजे 'असेवित' या अर्थी 'अगोष्पद' शब्द सिद्ध होईल.

हें शक्य नाहीं. कारण— जेथे सेवनाचा संभव आहे म्हणजे गाईच्या संचाराचा संभव आहे अशाच अर्थी अगोष्पद शब्दाचा प्रयोग होईल.[2] आणि जेथें गाईच्या संचाराचा संभव सुद्धां नाहीं अशा अर्थी अगोष्पद शब्दाचा प्रयोग होणार नाहीं. आतां सूत्रामध्यें असेवित शब्द घातला म्हणजे मात्र तो न सेवितं यस्मिन् असा बहुव्रीहि समास समजला जाईल. त्यामुळें जेथें गाईचा संचार नाहीं असा संचाराचा निषेध केल्यामुळें जेथें मुळींच संचार नाहीं तेथें 'अगोष्पदान्यरण्यानि' हा प्रयोग सिद्ध होतो म्हणून असेवितग्रहण केलें पाहिजे.

---

३. अवश्यम् शब्द मागें असतांना धातूहून ण्यत् प्रत्यय ( ५।१।१२५ ) झाला आहे.

१. (सू. १४५) गो शब्दाच्या पुढें पद शब्द आला असतां मध्यें सुट् आगमाचें निपातन केलें जातें. पण सेवित, असेवित व प्रमाण हा अर्थ गम्यमान असेल तर.

२. हा प्रदेश 'अगोष्पद' आहे म्हणजे गाईनीं संचारलेला नव्हे असें म्हटलें असतां तेथें गाईच्या संचाराचा संभव आहे खरा पण अजून हा तसा दिसत नाही, असा अर्थ मनांत येतो. परंतु ज्या ठिकाणीं गाईचा संचार मुळी संभवत नाही अशा खडतर प्रदेशालाही अगोष्पद असें म्हणतां आलें पाहिजे म्हणून सूत्रामध्यें असेवित शब्द घातला आहे. त्यामध्यें सेव् धातूहून क्त प्रत्यय भावी केला आहे. नंतर त्याचा नञाशीं बहुव्रीहि केला आहे. न सेवनं यस्मिन् प्रदेशे म्ह० ज्या प्रदेशामध्यें गाईचा संचारच होत नाही असा त्याचा अर्थ होतो.

**[आस्पदं प्रतिष्ठायाम् ॥ ६ । १ । १४६ ॥**

**[1]वर्चस्केऽवस्करः ॥ ६ । १ ।१४८॥**

**अपस्करो रथाङ्गम् ॥६।१।१४९॥]**

**[1]विष्किरः शकुनौ वा ॥ ६। १।१५० ॥**

**विष्किरः शकुनौ विकिरो वा ॥१॥**

विष्किरः शकुनौ विकिरो वेति वक्तव्यम्। शकुनौ वेति ह्युच्यमाने शकुनौ वा स्यादन्यत्रापि नित्यम् ॥ तत्तर्हि वक्तव्यम् । न वक्तव्यम् । न वावचनेन शकुनिरभिसंबध्यते । किं तर्हि । निपातनमभिसंबध्यते । विष्किर इत्येतन्निपातनं शकुनौ वा निपात्यत इति ॥

**[1]आश्चर्यमनित्ये ॥६ । १।१४७॥**

**आश्चर्यमद्भुते ॥ १ ॥**

आश्चर्यमद्भुत इति वक्तव्यम् । इहापि यथा स्यात् । आश्चर्यमुच्चता वृक्षस्य । आश्चर्यं नीला द्यौः । आश्चर्यमन्तरिक्षे

---

(सू. १५०) शकुनि हा अर्थ असतां विष्किर किंवा विकिर असा सुट् आगम विकल्पानें होतो असें वचन करावें.[2] 'विष्किरः शकुनौ वा' एवढेंच सूत्र केलें तर वा शब्दाचा शकुनीकडे संबंध होऊन विष्किर शब्द विकल्पानें शकुनि या अर्थाचा वाचक होतो असा अर्थ होईल आणि शकुनिभिन्न अर्थीही विष्किर शब्दाचा प्रयोग नित्य होऊं लागेलै.

तर मग तसें वचन करावयास पाहिजे.

तसें वचन करावयास नको. कारण वा शब्दाचा शकुनि शब्दाकडे संबंध करावयाचा नाहीं, तर निपाताकडे करावयाचा. तेव्हां शकुनि अर्थ असतां विष्किर असें सुट् आगमाचें निपातन विकल्पानें समजावें असा अर्थ होतो.

( सू. १४७ वा. १ ) अद्भुत या अर्थी आश्चर्य हें निपातन केलें जातें असें वचन करावें. कारण आश्चर्यमुच्चता वृक्षस्य, आश्चर्यं नीला द्यौः. आश्चर्यमन्तरिक्षेऽबन्धनानि नक्षत्राणि

---

१. ( सू. १४६ ) 'आ' याच्या पुढें पद शब्द आला असतां तेथें मध्यें सुट् आगमाचें निपातन केले आहे स्थान हा अर्थ गम्यमान असतांना उदा०— आस्पदं स्थानम्.

१. ( सू. १४८ ) अव उपसर्गपूर्वक कॄ धातूहून अप् प्रत्यय ( ३।३।५७ ) केला असतां मध्यें सुट् आगमाचें निपातन केले आहे पण त्या अवस्कर शब्दाचा अर्थ मात्र अन्नाचा मल हा असला पाहिजे.

१. ( सू. १४९ ) अप उपसर्गपूर्वक कॄ धातूहून अप् प्रत्यय केला असतां मध्यें सुट् आगमाचें निपातन केलें आहे, पण त्या अपस्कर शब्दाचा 'रथाचें अंग' हा अर्थ असला पाहिजे.

१. ( सू. १५० ) हल्लींच्या सूत्रपाठामध्यें ह्या सूत्राचा पाठ अपस्करो रथाङ्गम् ( ६।१।१४९ ) या सूत्रानंतर आहे. व तसाच तो येथें दिला आहे. भाष्यकारांनी मात्र 'गोष्पदं०' ( १४५ ) या सूत्रानंतर प्रस्तुत सूत्र १४६ वें म्हणून घेतलें असावें, नंतर 'आश्चर्य०' हें १४७ वें घेऊन 'आस्पदं०', 'वर्चस्के०' व 'अपस्करो०' (१४८–१५०) असा क्रम घेतला असावा. वि उपसर्ग पूर्वक कॄ धातूहून क प्रत्यय ( ३।१।१३५ ) आणि ऋकाराला इत्व ( ७।१।१०० ) रपर करून विकिर असें होतें. तेथें मध्यें सुट् आगमाचें निपातन विकल्पानें केलें आहे, पक्षी हा अर्थ असतांना.

२. 'विष्किरः शकुनौ वा' एवढेंच मूळचें सूत्र आहे. तें गृहीत धरून हें वार्तिक प्रवृत्त झालें आहे.

३. 'विकिरो वा' असें म्हटलें म्हणजे मात्र शकुनि अर्थ असतांनाच विष्कर आणि विकिर असे शब्द निपातन केले जात असल्यामुळे दोष येत नाही.

१. ( सू. १४७ ) आङ्-उपसर्गपूर्वक चर् धातूहून यत् प्रत्यय ( ३।१।१०० वा. १ ) केला असतां तेथें मध्यें सुट् आगमाचें हें निपातन केलें आहे, पण तो अर्थ नेहमीं होणाऱ्यांपैकीं नसावा.

ऽबन्धनानि नक्षत्राणि न पतन्तीति ॥ तर्त्तार्हि वक्तव्यम् । न वक्तव्यम् । अनित्य इत्येव सिद्धम् । इह तावदाश्चर्यमुच्चता वृक्षस्येत्याश्चर्यग्रहणेन न वृक्षोऽभिसंबध्यते । किं तर्हि । उच्चता सा चानित्या । आश्चर्यं नीला द्यौरिति नाश्चर्यग्रहणेन द्यौरभिसंबध्यते । किं तर्हि । नीलता सा चानित्या । आश्चर्यमन्तरिक्षेऽबन्धनानि नक्षत्राणि न पतन्तीति नाश्चर्यग्रहणेन नक्षत्राण्यभिसंबध्यन्ते । किं तर्हि । पतनक्रिया सा चानित्या । तत्रानित्य इत्येव सिद्धम् ॥

[ह्रस्वाच्चन्द्रोत्तरपदे मन्त्रे ॥ ६ । १ । १५१ ॥

प्रतिष्कशश्च कशेः ॥ ६ । १ । १५२ ॥

प्रस्कण्वहरिश्चन्द्रावृषी ॥ ६ । १ । १५३ ॥]

मस्करमस्करिणौ वेणुपरिव्राजकयोः ॥ ६ । १ । १५४ ॥

मस्करिग्रहणं शक्यमकर्तुम् । कथं मस्करी परिव्राजक इति । इतिनैतन्मत्वर्थीयेन सिद्धम् । मस्करोऽस्यास्तीति ॥ न वै

न पतन्ति येथेंही सुट् आगम झाला पाहिजे.

तेव्हां तसें वचन करणें भाग आहे.

तसें वचन करावयास नको. अनित्ये असें म्हटल्यानेंच तेथें सुट् आगम होईल.

तो कसा ?

उच्चता वृक्षस्य येथें आश्चर्याचा वृक्षाशीं संबंध नाहीं, तर उच्चतेशीं आहे. आणि ती उच्चता तर अनित्य म्हणजे अनियत आहे. तसेंच नीला द्यौः येथें आश्चर्याचा आकाशाशीं संबंध नाहीं; तर त्याच्या निळ्या रंगाशीं आहे. आणि तो निळा रंग तर अनित्य आहे. तसेंच आश्चर्यमबन्धनानि नक्षत्राणि न पतन्ति येथें आश्चर्याचा नक्षत्राशीं संबंध नाहीं; तर अपतन क्रियेशीं आहे. आणि ती अपतन क्रिया तर अनित्य आहे. तेव्हां अनित्ये असें म्हटल्यानेंच तेथें आश्चर्य या पदाचा प्रयोग सिद्ध होत आहे.

(सू. १५४) येथें मस्करिन् शब्दाचें ग्रहण केलें नाहीं तरी चालेल.

पण मग संन्यासी या अर्थी मस्करी असा शब्द कसा बरें तयार होईल ?

मस्कर शब्दाहून मत्वर्थी 'अत इनिठनौ' (५।२।११४) यानें इनि प्रत्यय केल्यानें मस्कर म्हणजे वेणुदंड तो ज्याच्यापाशीं आहे असा संन्यासी या अर्थाचा वाचक मस्करिन् शब्द

२. उंच झाड, निळें आकाश, न पडणारी नक्षत्रें हे पदार्थ आश्चर्यकारक आहेत परंतु अनित्य नव्हेत. कारण त्यांचा लवकर नाश होत नाहीं.

३ कारण बऱ्याच वृक्षामध्यें एखादाच वृक्ष उंच असतो.

१ (सू. १५१) मंत्रामध्यें ऱ्हस्वाच्या पुढें असलेल्या उत्तरपद अशा चन्द्र शब्दाला सुट् आगम होतो. उदा०-सुश्चन्द्र दस्म.

१. (सू. १५२) प्रति-उपसर्गपूर्वक कश् धातूहून अच् प्रत्यय (३।१।१३४) केला असतां मध्यें सुट् आगम आणि त्याला षत्व असें निपातन केलें आहे. पुढें चालणारा, बातमी काढणारा किंवा कोणत्याही रीतीनें साहाय्य करणारा अशा मनुष्याला प्रतिष्कश म्हणतात.

१. (सू. १५३) प्रस्कण्व आणि हरिश्चन्द्र ह्या दोन शब्दांमध्यें सुट् आगमाचें निपातन केलें आहे. हे दोन शब्द विशेष प्रकारच्या ऋषींची नांवें आहेत.

१. (सू. १५४) मस्कर आणि मस्करिन् या दोन शब्दांमध्यें ककाराच्या पूर्वी सुट् आगमाचें निपातन केलें आहे. ह्या दोन शब्दांचे अर्थ क्रमानें वेणु आणि संन्यासी हे समजावे.

मस्करो ऽस्यास्तीति मस्करी परिव्राजकः । किं तर्हि । मा कृत कर्माणि मा कृत कर्माणि शान्तिर्वः श्रेयसीत्याहातो मस्करी परिव्राजकः ॥

**[ कास्तीराजस्तुन्दे नगरे ॥ ६ । १ । १५५ ॥**

**[ कारस्करो वृक्षः ॥ ६ । १ । १५६ ॥]**

**पारस्करप्रभृतीनि च संज्ञायाम् ॥ ६ । १ । १५७ ॥**

अविहितलक्षणः सुट् पारस्करप्रभृतिषु द्रष्टव्यः । पारस्करो देशः । कारस्करो वृक्षः । रथस्पा नदी । किष्किन्धा गुहा । किष्कुः ॥ तद्बृहतोः करपत्योश्चोरदेवतयोः सुट् तलोपश्च । तस्करः । बृहस्पतिः ॥ प्रायस्य चित्तिचित्तयोः सुडस्कारो वा । प्रायश्चित्तिः प्रायश्चित्तम् ॥

इति श्रीभगवत्पतञ्जलिविरचिते व्याकरणमहाभाष्ये षष्ठस्याध्यायस्य प्रथमे पादे पञ्चममाह्निकम् ॥

---

तयार होईल.

संन्याशाला मस्करी असें जें नांव दिलें जातें त्याचें कारण ‘ त्याच्या जवळ वेणुदंड असतो ’ यापेक्षां निराळें आहे.

तें कोणतें ?

तें हें कीं अन्तरिन्द्रियाचा निग्रह करून काम्य कर्मांचा परित्याग (मा कृत) हा श्रेयस्कर होय असा उपदेश करणाऱ्या संन्याशाला मस्करी[२] असें म्हटलें जातें.

( सू. १५७ ) ज्या ठिकाणीं सुट् केलेला दृष्टीस पडतो पण तेथें सुट् करावा असें सांगणारें शास्त्र मात्र दृष्टीस पडत नाहीं अशा प्रकारचे शब्द या पारस्करादि गणामध्यें आहेत असें समजावें. उदा०–पारस्करो देशः, कारस्करो[२] वृक्षः, रथस्पा नदी, किष्किधा गुहा, किष्कुः वगैरे. कर आणि पति हे शब्द पुढें असतांना क्रमानें तद् आणि बृहत् या शब्दांच्या अन्त्य तकाराचा लोप होतो व कर व पति या शब्दांना सुट् आगम होतो; पण त्या शब्दांचे अर्थ क्रमानें चोर आणि देवता हे असले पाहिजेत. उदा० तस्करः; बृहस्पतिः.

प्राय शब्दाच्या पुढें असलेल्या चित्ति आणि चित्त या शब्दांना सुट् आगम होतो. किंवा प्राय शब्दाच्या अकाराचे स्थानीं अस् असा आदेश होतो. उदा०– प्रायश्चित्तिः; प्रायश्चित्तम्.

याप्रमाणें श्री भगवान् पतंजलींनीं रचिलेल्या व्याकरणमहाभाष्याच्या सहाव्या अध्यायाच्या पहिल्या पादांतील पाचवें आह्निक समाप्त झालें.

---

२ मा शब्द उपपद असतांना कृ धातूहून इनि प्रत्यय केला असतां तेथें मध्यें सुट् आगम आणि मा याला ऱ्हस्व या निपातनानें होत आहे.

१. ( सू. १५५ ) कास्तीर आणि अजस्तुन्द हीं दोन विशेष नगरांचीं नांवें आहेत. कु शब्दाचा तीर शब्दाबरोबर बहुव्रीहि केला असतां का आदेश झाल्यानंतर सुट् आगम ह्या निपातनामुळे झाला आहे. तसाच अजाप्रमाणें तुन्द आहे स्वरूप ज्याचें असा अज आणि तुन्द या शब्दांचा बहुव्रीहि केला असतां सुट् आगम ह्या निपातनामुळें होतो.

१. ( सू. १५६ ) कारस्कर असें एक प्रकारच्या वृक्षाचें नांव आहे. तेथेंही ह्या निपातनामुळें सुट् आगम होतो.

१. ( सू. १५७ ) पारस्कर वगैरे शब्दांमध्येंही सुट् आगमाचें निपातन केलें जातें; पण ते शब्द कोणाची तरी संज्ञा असले पाहिजेत.

२. ह्या गणामध्यें हा शब्द घेतला असतां पूर्वींचे सूत्र करावयास नको.

**अनुदात्तं पदमेकवर्जम् ॥ ६। १। १५८॥**

किमनुदात्तानि पदानि भवन्त्येकं पदं वर्जयित्वा। नेत्याह। पदे येषामुदात्तप्रसङ्गस्तेऽनुदात्ता भवन्त्येकमचं वर्जयित्वा। स तर्हि तथा निर्देशः कर्तव्यः। अनुदात्ताः पदे अनुदात्ताः पदस्येति वा॥ न कर्तव्यः। अनुदात्तं पदमेकवर्जमित्येव सिद्धम्। कथम्। मतुब्लोपोऽत्र द्रष्टव्यः। तद्यथा। पुष्यका एषां पुष्यकाः। कालका एषां कालका इति। अथवाकारो मत्वर्थीयः। तद्यथा। तुन्दः घाट इति॥

किमर्थं पुनरिदमुच्यते।

**आगमस्य विकारस्य प्रकृतेः प्रत्ययस्य च।**

---

(सू. १५८) एक पद वगळून बाकीचीं पदे अनुदात्त होतात असा या सूत्राचा अर्थ समजावयाचा कीं काय?

तसा अर्थ समजावयाचा नाहीं, तर एका पदामध्यें ज्या अचाला उदात्त किंवा स्वरित प्राप्त असेल तो एक अच् वगळून त्या पदांतील बाकींच्या अचांपैकीं ज्या ठिकाणीं उदात्तश्रवणाचा प्रसंग येईल त्या सर्वांना अनुदात्त होतो असा अर्थ समजावा.

तर मग 'अनुदात्ताः पदे' किंवा 'अनुदात्ताः पदस्य' असा निर्देश करणें जरूर आहे.

जरूर नाहीं. अनुदात्तं पदम् अशा निर्देशानेंच तो अर्थ सिद्ध होत आहे.

तो कसा?

असा कीं–अनुदात्त शब्दाहून षष्ठयर्थी किंवा सप्तम्यर्थी 'तदस्यास्त्यस्मिन्०' (५।२।९४) यानें सांगितलेल्या मतुप् प्रत्ययाचा अर्थ येथें विवक्षित आहे. मतुप् प्रत्यय मात्र केला नाहीं उदा० पुष्पकाःयेषां ते पुष्पकाः; कालकाः येषां ते कालकाः.[४] किंवा अनुदात्त शब्दाहून मत्वर्थी अर्श-आदित्वास्तव अकार प्रत्यय (५।२।१२७) समजावा. जसें– तुन्दः;[५] घाटः.

आतां हें सूत्र कशाकरितां बरें सांगितलें आहे?

(श्लो. १) हें सूत्र नसेल तर एकाच पदामध्यें प्रकृति, प्रत्यय, आगम आणि विकार यांपैकीं अने-

---

१. (सू. १५८) हें परिभाषा-सूत्र आहे. ज्या पदामध्यें एका अचाला सपाद सप्ताध्यायींतील शास्त्रानें उदात्त किंवा स्वरित सांगितला असेल त्या पदामध्यें त्या अचाला सोडून बाकीचे सर्व अच् अनुदात्त होतात.

२. पच् धातूमधील अकार धातुस्वरानें (६।१।१६२) उदात्त झाला आहे. पुढें त्याहून तृच् प्रत्यय केला असतां त्यांतील ऋकार प्रत्ययस्वरानें (३।१।३) उदात्त होतो. तो झाला तरी पूर्वीं धातुस्वरानें झालेला उदात्त तसाच राहूं लागेल. हा प्रसंग टाळण्याकरितां प्रकृत परिभाषेनें त्या अकाराला अनुदात्त सांगितला आहे. स्वरितामधील उदात्तासंबंधानेंही असा प्रसंग येईल तर तोही या प्रकृत परिभाषेनेंच टाळला जातो. उदा०–कार्यदर्शी. कार्य शब्दांतील ण्यत् प्रत्ययांतील अकाराला स्वरित (६।१।१८५) झाला आहे. पुढें 'कार्यं पश्यतीति' ह्या समासांतील शेवटल्या इकाराला उदात्त (६।१।२२३) होतो. त्या वेळीं पूर्वीं केलेला स्वरित राहूं लागेल. त्यांतील उदात्त-श्रवणाचा प्रसंग प्रकृत परिभाषेनें टाळला जातो. तेव्हां त्या स्वरितापैकीं फक्त अनुदात्तच कायम रहातो.

३. कारण पद कांहीं अनुदात्त असत नाहीं. तर त्यांतील अच् अनुदात्त असतात.

४. पुष्पक म्हणजे फुलासारखे ठिपके. ज्या मांजराच्या अंगावर तसे ठिपके आहेत त्या मांजराला पुष्पक म्हणतात. कालक म्हणजे काळसर ठिपके. तसे ठिपके असलेल्या मांजराला कालक म्हणतात

५. तुन्द म्हणजे मोठें पोट. घाट म्हणजे उंच मान. या शब्दांहून मत्वर्थी अच् प्रत्यय केला म्हणजे मोठ्या पोटाच्या मनुष्याला तुन्द असें म्हणतात. तसेंच उंच मानेच्या मनुष्याला घाट असें म्हणतात.

**पृथक्स्वरनिवृत्त्यर्थमेकवर्जं पदस्वरः ॥१॥**

आगमस्य । चतुरनडुहोरामुदात्तः [ ७. १. ९८. ] चत्वारः अनड्वाहः । विकारस्य । अस्थिदधिसक्थ्यक्ष्णामनङुदात्तः [ ७. १. ७५ ] अस्थ्ना दध्ना । प्रकृतेः । गोपायति धूपायति । प्रत्ययस्य च । कर्तव्यम् तैत्तिरीयः । एतेषां पदे युगपत्स्वरः प्राप्नोति । इष्यते चैकस्य स्यादिति तच्चान्तरेण यत्नं न सिध्यतीत्यनुदात्तं पदमेकवर्जम् । एवमर्थमिदमुच्यते ॥ नैतदस्ति प्रयोजनम् ।

**यौगपद्यं तवै सिद्धं**

यदयं तवै चान्तश्च युगपत् [ ६. २. ५१ ] इति सिद्धे यौगपद्ये यौगपद्यं

---

काना शास्त्रानें सांगितल्याप्रमाणें निरनिराळे स्वर प्राप्त होत आहेत त्यांचे निवृत्तीकरिता 'अनुदात्तं पदमेकवर्जम्' हा एकवर्ज-पदस्वर सांगितला आहे. उदा० चत्वारः व अनड्वाहः[६] येथें 'चतुरनडुहोः०' ( ७।१।९८ ) यानें आम् आगम उदात्त झाला आहे. तसेंच अस्थ्ना, दध्ना येथें 'अस्थिदधि०' ( ७।१।७५ ) यानें अनङ् हा विकार उदात्त झाला आहे. गोपायति व धूपायति येथें आय प्रत्ययान्त धातूचा धातुस्वरानें अन्त उदात्त झाला आहे. कर्तव्यम् व तैत्तिरीयः येथें तव्य आणि ईय या प्रत्ययांना प्रत्ययस्वरानें आद्युदात्त झाला आहे. ह्या स्वरांच्या बरोबर त्या पदांमध्यें पूर्वी केलेल्या स्वरांचे श्रवण होऊं लागेल. आणि ह्या प्रत्येक ठिकाणीं एकच उदात्ताचें श्रवण इष्ट आहे. तें तर कांहींतरी यत्न केल्यावांचून साधावयाचें नाहीं. म्हणून हें प्रकृत सूत्र केलें आहे.

हें प्रयोजन नाहीं. कारण—

ज्याअर्थी आचार्य हे 'तवै चान्तश्च युगपत्' ( ६।२।५१ ) या सूत्रानें तवैप्रत्ययान्ताच्या

---

६. चत्वारः येथें चतुर् हा शब्द चत् धातूहून उरन् प्रत्यय ( उणा. ५।५८ ) करून साधला आहे. तेव्हां त्याचा अकार उदात्त ( ६।१।१९७ ) आहे. पुढें जस् प्रत्यय केल्यानंतर आम् आगम झाला तो उदात्त झाला आहे. तेव्हां ते दोन्ही उदात्त कायम राहतील. अनड्वाहः येथें अन् धातूहून असुन् प्रत्यय ( उणा० ४। १८८ ) केला आहे. त्यामुळें अनस् शब्दाचा आदि अकार उदात्त आहे. अनो वहतीति अनड्वान् म्हणजे गाडा ओढणारा बैल. अनस् शब्दपूर्वक वह् धातूहून क्विप् प्रत्यय, सकाराला डकार व वकाराला संप्रसारणानें ( ६।१।१५ ) उकार झाला आहे. तो प्रकृतिस्वरानें उदात्त ( ६।२।१३९ ) झाला आहे. तेव्हां तो उकार आणि पहिला अकार असे दोन्ही उदात्त कायम राहतील. अस्थ्ना येथे अस् धातूहून क्थिन् प्रत्यय ( उणा ३। १५४ ) झाला आहे. तेव्हां आदि अकार उदात्त आहे. दधि शब्दामध्येंही अकार उदात्त ( फिट् सूत्र २।३ ) आहे. तेव्हां तो उदात्त आणि त्या शब्दांच्या इकाराला झालेला अनङ् आदेशाचा अकार उदात्त हे दोन्ही कायम राहतील. गोपायति व धूपायति येथें धातूमधील उकार धातुस्वरानें (६। १।१६२ ) उदात्त आहे. तो उदात्त आणि त्याच्या पुढील अय प्रत्ययाचा आकार उदात्त ( ३।१।३ ) आणि आयप्रत्ययान्त धातूचा शेवटचा धातुस्वरानें झालेला अकार उदात्त हे तिन्ही कायम राहूं लागतील. कर्तव्यम् येथें धातुस्वरानें ऋकार उदात्त आणि प्रत्ययस्वरानें तव्य प्रत्ययाचा अकार उदात्त हे दोन्ही कायम राहतील. तव्यत् प्रत्यय केला तर प्रत्ययाचा स्वरितस्वर ( ६।१।१८५ ) आणि धातुस्वर हे दोन्ही कायम राहतील. तैत्तिरीयः येथें तित्तिरि शब्दांतील मधला इकार उदात्त (फिट् सू. २।२१) आहे. तो आणि पुढील प्रत्ययाचा ( ४।३।१०२ ) ईकार उदात्त असे दोन्ही कायम राहूं लागतील.

शास्ति तज्ज्ञापयत्याचार्यो न युगपत्स्वरो भवतीति ॥ पर्यायस्तर्हि प्राप्नोति ।

**पर्यायो रिक्तशासनात् ।**

यदयं रिक्ते विभाषा [ ६. १. २०८ ] इति सिद्धे पर्याये पर्यायं शास्ति तज्ज्ञापयत्याचार्यो न पर्यायो भवतीति ॥

**उदात्ते ज्ञापकं त्वेतत् ।**

एतदुदात्ते ज्ञापकं स्यात् ।

**स्वरितेन समाविशेत् ॥ २ ॥**

स्वरितेन समावेशः प्राप्नोति ॥ स्वरितेऽप्युदात्तोऽस्ति । तस्मान्नार्थोऽनेन योगेन ॥ आरभ्यमाणेऽप्येतस्मिन्योगे

**अनुदात्ते विप्रतिषेधानुपपत्तिरेकस्मिन्युगपत्संभवात् ॥ १ ॥**

अनुदात्ते विप्रतिषेधो नोपपद्यते । पठिष्यति ह्याचार्यो विप्रतिषेधं जे दीर्घाद्बलच इति स विप्रतिषेधो नोपपद्यते । किं कार-

---

अन्त्याला उदात्त आणि अव्यवहित गतिसंज्ञकाला प्रकृतिस्वरानें आद्युदात्त या दोन उदात्तांचें युगपत्-विधान करीत आहेत त्याअर्थी एका पदामध्यें अनेक उदात्तांचे युगपत् अवस्थान होत नाहीं असें ते सुचवीत आहेत.

जर एकदम होणार नाहींत तर पाळीपाळीनें होतील.

ज्याअर्थी आचार्य हे 'रिक्ते विभाषा' (६।१।२०८) या सूत्रानें रिक्त शब्दाला आदि-उदात्त विकल्पानें सांगत आहेत त्याअर्थी पर्यायही होत नाहीं असें ते सुचवीत आहेत.

उदात्तांचा युगपत् समावेश किंवा पर्याय होत नाहीं याविषयीं हें ज्ञापक आहे. अर्थात्—

स्वरितांचा युगपत् समावेश प्राप्त होत आहे.

पण स्वरितामध्येंही उदात्त असल्यामुळें अर्थात् स्वरितांच्याही समावेशाचा व पर्यायाचा ज्ञापकावरून निरास होत आहे. तात्पर्य, हें सूत्र करण्यांत कांहीं उपयोग नाहीं असें सिद्ध झालें.

(वा. १) आतां स्पष्ट प्रतिपत्तीकरितां ह्या सूत्रानें अनुदात्त सांगितला तरी 'विप्रतिषेध जुळत नाहीं' हा दोष येतो. 'दीर्घकाश०' या स्वरापेक्षा पर असल्यामुळें 'अन्यात्पूर्वम्' यानें स्वर होतो (६। २।८२ वा.१) असा विप्रतिषेध आचार्य सांगणार आहेत तो जुळून येत नाहीं. कारण एका पदामध्यें

---

७ रिच् धातूमधील इकार धातुस्वरानें उदात्त आहे. आणि पुढील क्त प्रत्ययांतील अकार प्रत्ययस्वरानें उदात्त आहे. तेव्हां पाळीपाळीनें एकदां रिक्त शब्द आद्युदात्त होईल व एकदां अन्तोदात्त होईल. तेव्हां 'रिक्ते विभाषा' हें सूत्र व्यर्थ होईल; म्हणून पर्याय होत नाहीं असें अर्थातच त्यावरून सुचविलें जातें.

८ हें परिभाषा-सूत्र आहे असें न घेतां 'हा स्वतंत्र रीतीनें अनुदात्ताचा विधि आहे' असें गृहीत धरून हा दोष देत आहेत. हें अधिकार सूत्र मानलें तर परादिश्छन्दसि० (६।२।१९९) या सूत्रापर्यंत हा अधिकार चालू असल्यामुळें तोपर्यंत प्रत्येक सूत्राशीं याची एकवाक्यता होईल. परिभाषासूत्र मानलें तर उदात्त किंवा स्वरित सांगणाऱ्या सपाद सप्ताध्यायींतील सर्व सूत्रांशीं एकवाक्यता होईल. आता एक वगळून बाकीच्या अचांना यानें अनुदात्त सांगितला आहे तेव्हां ज्या सूत्राशीं एकवाक्यता होईल तेथे त्या सूत्रानें ज्याला स्वर सांगितला असेल तेवढाच फक्त तेथें वगळला जातो. पण हे स्वतंत्र विधायक सूत्र मानलें म्हणजे मात्र ज्याला ज्याला शास्त्रानें उदात्त किंवा स्वरित सांगितला असेल ते सर्वच वगळले जातील. त्यामुळे कर्तव्य शब्दामध्यें कृ धातूंतील ऋकाराला धातुस्वरानें उदात्त सांगितला आहे. आणि तव्य प्रत्ययांतील पहिल्या अकाराला प्रत्ययस्वरानें उदात्त सांगितला आहे. तेव्हां ते दोन्ही वगळले जाऊन फक्त तव्य प्रत्ययांतील शेवटच्या अकाराला यानें अनुदात्त होईल. असा या स्वतंत्रविधिपक्षीं दोष येणारच आहे.

णम् । एकस्मिन्युगपत्संभवात् । असति खलु संभवे विप्रतिषेधो भवत्यस्ति च संभवो यदुभयं स्यात् । कथं संभवो यदानुदात्तं पदमेकवर्जमित्युच्यते । तदिह नास्ति । किं कारणम् । नानेनोदात्तत्वं प्रतिषिध्यते । किं तर्हि । अनुदात्तत्वमनेन क्रियतेऽस्ति च संभवो यदुभयोश्चोदात्तत्वं स्यादन्येषां चानुदात्तत्वम् ॥ यदि पुनरयमधिकारो विज्ञायेत । किं कृतं भवति । अधिकारः प्रतियोगं तस्यानिर्देशार्थ इति योगे योग उपतिष्ठते । जे दीर्घान्तस्यादिरुदात्तो भवति । उपस्थितमिदं भवत्यनुदात्तं पदमेकवर्जमिति । अन्त्यात्पूर्वं बह्वचः [ ६. २. ८३ ] । उपस्थितमिदं भवत्यनुदात्तं पदमेकवर्जमिति । तत्र पूर्वेणास्तु वर्ज्यमानता परेण वेति परेण भविष्यति परत्वात् ॥ नैवं शक्यम् । षाष्ठिक एकः स्वरः संगृहीतः स्याद्येऽन्ये सप्ताध्याय्यां स्वरास्ते न संगृ-

---

उदात्तांचा युगपत् समावेश संभवत आहे. जर एका ठिकाणीं त्या दोन उदात्तांचा समावेश संभवला नसता तर विप्रतिषेध जुळून आला असता आणि येथें तर एके ठिकाणीं दोघांचा समावेश संभवत आहे.

तो कसा ?

'अनुदात्तं पदमेकवर्जम्' असें म्हटलें आहे ना ?

पण स्वतंत्रविधिपक्षीं तसें म्हणतां येत नाहीं.

काय कारण ?

कारण असें कीं– यानें कांहीं इतर उदात्तांचा प्रतिषेध केला असें होत नाहीं तर जेथें कोणीच उदात्त किंवा स्वरित सांगितला नाहीं तेथें फक्त या सूत्रानें अनुदात्त सांगितला जात आहे. आणि तसें आहे म्हणून एका ठिकाणीं एकदम दोहोंनाही उदात्त करण्याचा संभव आहे; व बाकीच्यांना अनुदात्त यानें होईल.

आतां जर हें अधिकार सूत्र समजलें जाईल तर–

मग तसें समजण्यांत काय फायदा आहे ?

प्रत्येक सूत्रामध्यें त्याचा पुनः पुनः उल्लेख करावयास नको. अधिकार म्हटला कीं पुढील प्रत्येक सूत्रांत तो उपस्थित होतो. तेव्हां 'दीर्घकाश०' या सूत्रानें 'ज' शब्द उत्तरपद पुढें असतांना दीर्घ शेवटीं असलेल्या पूर्वपदाचा आदि उदात्त होतो; तेथें हा अधिकार उपस्थित झाल्यामुळें तो एक आदि अच् सोडून बाकीचे सर्व अच् अनुदात्त होतात असा अर्थ होतो. तसेंच– 'अन्त्यात्पूर्वं बह्वचः' या त्याच्या पुढील सूत्रानें 'ज' उत्तरपद पुढें असतांना पूर्वपदामध्यें बहुत अच् असतील तर त्यापैकीं शेवटच्याच्या शेजारचा अच् उदात्त होतो असें सांगितलें असतां तेथेंही हा अधिकार उपस्थित झाल्यामुळे तो एक शेवटच्याच्या शेजारचा अच् सोडून बाकीचे सर्व अच् अनुदात्त होतात असा अर्थ होतो. तेव्हां पूर्वपदामध्यें शेवटीं दीर्घ असेल आणि बहुत अच् असतील अशा आमलकीजः या उदाहरणामध्ये दोन्ही सूत्रांची प्राप्ति आली असतांना पूर्व सूत्राच्या धोरणानें फक्त आदि अच् वगळून बाकीचे सर्व म्हणजे शेवटचा अच् व त्याच्या शेजारचाही अच् यांसुद्धा सर्व अनुदात्त करावे, किंवा पुढील सूत्राच्या धोरणानें फक्त शेवटच्याच्या शेजारचा एक अच् वगळून बाकीचे म्हणजे आदिअचासुद्धां सर्व अच् अनुदात्त करावे असा दोन्ही सूत्रांचा विरोध आला असतां परत्वास्तव पुढील सूत्राच्या धोरणानेंच व्यवस्था होईल.

पण हा अधिकार समजणें शक्य नाहीं. कारण सहाव्या अध्यायामध्यें जे स्वरविधी पठित आहेत त्यांच्या संबंधानें ही व्यवस्था होईल, पण बाकीच्या सपाद सप्ताध्यायीमध्यें जे स्वरविधी पठित आहेत त्यांच्या संबंधानें ही व्यवस्था होणार

हीताः स्युः । समानोदरे शयित ओ चोदात्तः [ ४. ४. १०८ ] । अस्थिदधिसक्थ्यक्ष्णामनङुदात्तः [७. १. ७५] इति ॥

## सिद्धं त्वेकाननुदात्तत्वात् ॥ २ ॥

सिद्धमेतत् । कथम् । एकाननुदात्तत्वात् । एकाननुदात्तं पदं भवतीति वक्तव्यम् । किमिदमेकाननुदात्तत्वादिति । नोदात्तोऽनुदात्तः । नानुदात्तोऽननुदात्तः । एकोऽननुदात्तोऽस्मिंस्तदिदमेकाननुदात्तम् । एकाननुदात्तत्वादिति । सिध्यति । सूत्रं तर्हि भिद्यते ॥ यथान्यासमेवास्तु । ननु चोक्तमनुदात्ते विप्रतिषेधानुपपत्तिरेकस्मिन्युगपत्संभवादिति । नैष दोषः । परिभाषेयम् । किं कृतं भवति । कार्यकालं हि संज्ञापरिभाषम् । यत्र कार्यं तत्रोपस्थितमिदं द्रष्टव्यम् । जे दीर्घान्तस्यादिरुदात्तो भवतीत्युपस्थितमिदं भवत्यनुदात्तं पदमेकवर्जमिति । अन्त्यात्पूर्वं बह्वच इत्युपस्थितमिदं भवत्यनुदात्तं पदमेकवर्जमिति । तत्र पूर्वेणास्तु वर्ज्यमानता परेण वेति परेण भविष्यति परत्वात् ॥ अथवा नेदं पारिभाषिकानुदात्तस्य ग्रहणम् । किं तर्हि । अन्वर्थग्रह-

---

नाहीं. 'समानोदरे शयित ओ चोदात्तः' (४।४।१०८) 'अनङुदात्तः' (७।१।७५) इत्यादि स्वरविधींशीं प्रकृत सूत्राची एकवाक्यता होणार नाहीं.

(वा. २) अष्टाध्यायींतील सर्व स्वरविधींशीं एकपदवर्जस्वराची एकवाक्यता सिद्ध होत आहे.

ती कशी ?

अशी कीं एकाननुदात्तं पदम् असें परिभाषा-सूत्र पठन करावें.

एकाननुदात्तत्वात् याचा काय अर्थ ?

न उदात्तः अनुदात्तः न अनुदात्तः अननुदात्तः एकः अननुदात्तो यस्मिंस्तत् एकाननुदात्तम्. म्हणजे ज्यामध्यें अनुदात्तरहित असा एकच अच् आहे तें. असें सूत्र करण्यानें सर्वत्र सिद्धि होते खरी, पण या करण्यांत पाणिनीच्या मूळ सूत्राचा बदल होत आहे.

तर मग मूळचें आहे तसेंच सूत्र असूं दे.

पण ह्या सूत्राने अनुदात्त सांगितला तर 'जे दीर्घादबह्वचः' हा विप्रतिषेध जुळून येत नाहीं; कारण, एका पदामध्यें अनेक उदात्तांचा समावेश संभवतो असा दोष दिला आहे ना ?

हा दोष येत नाहीं. कारण हें परिभाषा-सूत्र आहे.

असें म्हणण्यांत काय फायदा आहे ?

संज्ञा आणि परिभाषा याविषयीं कार्यकालपक्ष आहे. तेव्हां जेथें कार्य असेल तेथें या परिभाषेची उपस्थिति होते तेव्हां 'ज' शब्द उत्तरपद पुढें असतांना दीर्घ शेवटीं असलेल्या पूर्वपदाच्या आदीला उदात्त होतो असें सांगितलें असतां तेथें 'अनुदात्तं पदमेकवर्जम्' हें उपस्थित होतें. त्यांत 'दीर्घकाश०' या पूर्व सूत्रानें ज्याला उदात्त सांगितला आहे तो अनुदात्त करण्यांत वगळावयाचा किंवा 'अन्त्यात्पूर्वम्०' या पर सूत्रानें ज्याला उदात्त सांगितला आहे तो वगळावयाचा असा विचार प्राप्त झाला असतां विरोध असल्यामुळें पर सूत्रानें विहित असलेला उदात्त वगळावयाचा असें ठरेतें.

अथवा 'नीचैरनुदात्तः' ( १।२।३० ) या

---

९. 'उदात्ताशिवाय इतर स्वराचा नव्हे असा अच् पदामध्यें एकापेक्षां जास्त नसावा' असा हा साधारण नियम या सूत्रानें केला आहे. तेव्हां सपाद सप्ताध्यायींतील स्वर सांगणाऱ्या सर्व सूत्रांना हा लागू होतो.

१०. अधिकारपक्षावर जो दोष दिला होता कीं 'सर्व ठिकाणीं याची उपस्थिति होणार नाहीं' तो दोष परिभाषापक्षीं येत नाहीं.

११ तेव्हां अशा अर्थाचें हें विधिसूत्र मानलें तरी हरकत नाहीं.

णम् । अविद्यमानोदात्तमनुदात्तमिति ॥

**एकवर्जमिति चाप्रसिद्धिः संदेहात् ॥ ३ ॥**

एकवर्जमिति चाप्रसिद्धिः । कुतः । संदेहात् । न ज्ञायते क एको वर्जयितव्य इति ॥

**सिद्धं तु यस्मिन्ननुदात्त उदात्तवचनानर्थक्यं तद्वर्जम् ॥ ४ ॥**

सिद्धमेतत् । कथम् । यस्मिन्ननुदात्त उदात्तवचनमनर्थकं स्यात्स एको वर्जयितव्यः ॥

**प्रकृतिप्रत्यययोः स्वरस्य सावकाशत्वादप्रसिद्धिः ॥ ५ ॥**

प्रकृतिप्रत्यययोः स्वरस्य सावकाशत्वादप्रसिद्धिः स्यात् । प्रकृतिस्वरस्यावकाशो यत्रानुदात्तः प्रत्ययः । पचति पठति । प्रत्ययस्वरस्यावकाशो यत्रानुदात्ता प्रकृतिः । समत्वम् सिमत्वम् । इहोभयं प्राप्नोति । कर्तव्यम् तैत्तिरीयः ॥

विप्रतिषेधात्प्रत्ययस्वरः । विप्रतिषेधात्प्रत्ययस्वरो भविष्यति । नैवम् । विप्रतिषेधे परमित्युच्यते न परः प्रत्ययस्वरः । नैष दोषः । इष्टवाची परशब्दः । विप्रतिषेधे परं यदिष्टं तद्भवतीति ॥

**विप्रतिषेधात्प्रत्ययस्वर इति चेत्काम्यायादिषु चित्करणम् ॥ ६ ॥**

विप्रतिषेधात्प्रत्ययस्वर इति चेत्काम्यायादयश्चितः कर्तव्याः । पुत्रकाम्यति गोपा-

---

पारिभाषिक अनुदात्ताचें या सूत्रांत ग्रहण केलें आहे असें समजूं नये. तर हा अनुदात्त शब्द यौगिक आहे. अविद्यमानः उदात्तः यस्मिन् इति अनुदात्तम् म्हणजे 'ज्यात उदात्त नाहीं असें पद करावें' असा त्याचा अर्थ होय.

( वा. ३ ) संदेह येत असल्यामुळें[१२] कोणता एक वगळावयाचा हे निश्चित कळत नाहीं.

( वा. ४ ) ज्याला अनुदात्त केला असतां उदात्त–विधायक वचन व्यर्थ होईल तो एक वर्ज्य करावा असा निश्चय करणें शक्य आहे.

( वा. ५ ) प्रकृतिस्वर व प्रत्ययस्वर यांना चारितार्थ्य असल्यामुळे त्यांपैकीं कोणता वगळावा हें निश्चित सिद्ध होत नाहीं. प्रकृतिस्वराला पचति पठति येथें अनुदात्त[१३] प्रत्ययस्थलीं अवकाश आहे. आणि प्रत्ययस्वराला समत्वम्[१४] व सिमत्वम् येथें अनुदात्त–प्रकृति स्थलीं अवकाश आहे. आणि कर्तव्यम्[१५] व तैत्तिरीयः येथें प्रकृति व प्रत्यय या दोन्ही स्वरांची प्राप्ति येत आहे. तेव्हा विप्रतिषेध असल्यामुळें परत्वास्तव प्रत्यय–स्वर होईल.

हें म्हणणें शक्य नाहीं. कारण, विप्रतिषेध असतां पर कार्य करावें असें म्हटलें आहे. आणि प्रत्ययस्वर तर पर नाहीं.

हा दोष येत नाहीं. कारण परं कार्यम् येथील पर शब्द इष्टवाचक आहे. विप्रतिषेध असतां जें इष्ट असेल तें कार्य करावें असा अर्थ आहे.

( वा. ६ ) विप्रतिषेध असल्यामुळें प्रत्ययस्वर होतो असें म्हटलें तर काम्य आय वगैरे

---

१२. स्वतंत्रविधिपक्षीं हा संशय येतो. परिभाषापक्ष घेतला असतां ज्या विधीशीं या परिभाषेची एकवाक्यता होईल त्या विधीनें ज्याला स्वर सांगितला असेल तोच एक त्या ठिकाणी वगळावयाचा असा सर्वत्र निश्चय सहजच होतो.

१३ तिप् या पित् प्रत्ययाला अनुदात्त (३।१।४) सांगितला असल्यामुळें येथें प्रत्ययस्वराची (३।१।३) प्राप्ति नाहीं. तेव्हां येथें फक्त प्रकृतीलाच धातोः (६।१।१६२) यानें उदात्त होत आहे.

१४. सम व सिम हे शब्द सर्वानुदात्त (फिट् सूत्र ४।१०) असल्यामुळें येथें प्रकृतीला उदात्त स्वर नाही.

१५. मागील टीप ६ पहा.

यति ऋतीयते ॥ नैष दोषः । प्रकृतिस्वरोऽत्र बाधको भविष्यति ॥

**प्रकृतिस्वरे प्रत्ययस्वराभावः ॥ ७ ॥**

प्रकृतिस्वरे प्रत्ययस्वरस्याभावः । कर्तव्यम् तैत्तिरीयः ॥

**सिद्धं तु प्रकृतिस्वरबलीयस्त्वात्प्रत्ययस्वरभावः ॥ ८ ॥**

सिद्धमेतत् । कथम् । प्रकृतिस्वराद्बलीयस्त्वात्प्रत्ययस्वरस्य भावः सिद्धः । कथम् । प्रकृतिस्वरात्प्रत्ययस्वरो बलीयान्भवति ॥

**सतिशिष्टस्वरबलीयस्त्वं च ॥ ९ ॥**

सति शिष्टस्वरो बलीयान्भवतीति वक्तव्यम् ॥

**तच्चानेकप्रत्ययसमासार्थम् ॥ १० ॥**

तच्चावश्यं सतिशिष्टस्वरबलीयस्त्वं वक्तव्यम् । किं प्रयोजनम् । अनेकप्रत्ययार्थमनेकसमासार्थं च । अनेकप्रत्ययार्थे तावत् । आपगवः । प्रकृतिस्वरमण्स्वरो बाधते । औपगवत्वम् । त्वस्वरोऽण्स्वरं बाधते । औपगवत्वकम् । त्वस्वरं कस्वरो बाधते । अनेकस-

---

प्रत्ययांना इत्संज्ञक चकार जोडला पाहिजे. उदा० पुत्रकाम्यति[16], गोपायति, ऋतीयते.

हा दोष येत नाहीं. कारण येथें प्रकृतिस्वर प्रत्ययस्वराचा बाध करील[17].

( वा. ७ ) प्रकृतिस्वर बाधक होत आहे तर कर्तव्यम् तैत्तिरीयः वगैरे ठिकाणीं प्रत्ययस्वर इष्ट आहे तो होणार नाहीं.

( वा. ८ ) हें सिद्ध होत आहे.

ते कसें ?

कर्तव्यम् व तैत्तिरीयः येथें प्रत्ययस्वराला प्रकृतिस्वरापेक्षां बलिष्ठत्व असल्यामुळें प्रत्ययस्वर होईल. म्हणजे प्रकृतिस्वरापेक्षां प्रत्ययस्वर बलवान् आहे.

( वा. ९ ) सतिशिष्टस्वर[18] बलवान् होय असेंही वचन करावें.

(वा. १०) तें सतिशिष्टस्वरबलीयस्त्व अवश्य सांगावयास पाहिजे.

काय प्रयोजन ?

अनेक प्रत्ययस्थलीं आणि अनेक समासस्थलीं सतिशिष्टस्वरबलीयस्त्वाचा उपयोग होत आहे. उदा०–औपगवः येथें अण् स्वर प्रकृतिस्वराचा बाध करतो[19]. औपगवत्वम् येथें त्वप्रत्ययस्वर अण् स्वराचा बाध करतो. औपगवत्वकम् येथें कप्रत्ययस्वर त्वप्रत्ययस्वराचा बाध करतो. तसेंच राजपुरुषः येथें समासान्तोदात्त स्वर ( ६।१।२२३ ) होतो. राजपुरुष-

---

१६. काम्य (६।१।९) आय (३।१।२८) आणि ईय ( ३।१।२९ ) हे प्रत्यय अनेकाच् आहेत. त्यांपैकी पहिला अच् प्रत्ययस्वरानें उदात्त होऊं लागेल; म्हणून अन्त उदात्त ( ६।१।१६३ ) होण्याकरितां चकार लाविला पाहिजे. काम्यच् असा मूळचाच चकार पाणिनीनें जोडला आहे तरी त्या चकाराचें प्रत्याख्यान ( ३।१।९ वा. १ ) केलें आहे.

१७. काम्य वगैरे प्रत्ययांना जरी प्रत्ययस्वरानें आदि उदात्त झाला तरी पुढें पुत्रकाम्य, गोपाय व ऋतीय या प्रत्ययान्त समुदायाला धातुसंज्ञा ( ३।१।३२) असल्यामुळें धातुस्वरानें ( ६।१।१६२ ) त्याचा अन्त उदात्त होईल.

१८. मागून प्राप्त होणाऱ्या स्वराला सतिशिष्टस्वर म्हणतात. कर्तव्यम् येथें कृ धातूच्या ऋकाराला धातुस्वरानें उदात्त झाला तरी त्यानंतर पुढें केलेल्या प्रत्ययाला प्रत्ययस्वर होतो तो सतिशिष्टस्वर बलवान् असल्यामुळें त्याच्या बरोबर ह्या शेषनिघातानें धातुस्वर निवृत्त होतो.

१९. तेव्हां अणाला प्रत्ययस्वरानें उदात्त झाल्याबरोबर प्रकृत सूत्राच्या साहाय्यानें उपगु या प्रकृतीतील सर्व अच् अनुदात्त होतात.

मासार्थम् । राजपुरुषः राजपुरुषपुत्रः राजपुरुषपुत्रपुरुषः ॥

यदि सतिशिष्टस्वरबलीयस्त्वमुच्यते स्यादिस्वरः सार्वधातुकस्वरं बाधेत । सुनुतः चिनुतः ।

**स्यादिस्वराप्रसङ्गश्च तासेः परस्यानुदात्तवचनात् ॥ ११ ॥**

स्यादिस्वरस्य चाप्रसङ्गः । कुतः । तासेः परस्यानुदात्तवचनात् । यदयं तासेः परस्य लसार्वधातुकस्यानुदात्तत्वं शास्ति तज्ज्ञापयत्याचार्यः सति शिष्टोऽपि विकरणस्वरो लसार्वधातुकस्वरं न बाधत इति ॥

**शास्त्रपरविप्रतिषेधानियमाद्वा शब्दपरविप्रतिषेधात्सिद्धम् ॥ १२ ॥**

अथवा शास्त्रपरविप्रतिषेधे न सर्वमिष्टं संगृहीतं भवतीति कृत्वा शब्दपरविप्रतिषेधो विज्ञास्यते ॥ यदि शब्दपरविप्रतिषेधो भवति काम्यादयश्चितः कर्तव्याः । पुत्रकाम्यति गोपायति ऋतीयते । शब्दपरविप्रतिषेधो नाम भवति यत्रोभयोर्युगपत्प्रसङ्गो न च

---

पुत्रः येथें पहिल्या समासस्वराचा पुढील समासस्वर बाधक होतो. राजपुरुषपुत्रपुरुषः येथें तिसरा समासस्वर दुसऱ्या समासस्वराचा बाध करतो.

जर सतिशिष्टस्वराला प्राबल्य असेल तर मागून होणाऱ्या स्य ( ३।१।३३ ) वगैरे विकरणांचा स्वर सार्वधातुक–प्रत्यय–स्वराचा बाध करील. उदा०–सुनुतः[20], धिनुतः.

( वा. ११ ) स्य वगैरे विकरणांचा स्वर सतिशिष्ट म्हणून कायम रहाणार नाहीं. कारण कर्ता कर्तारौ येथें तास् या विकरण प्रत्ययाहून पुढच्या लसार्वधातुकाला अनुदात्ताचें विधान ( ६।१।१८६ ) ज्या अर्थी आचार्य करीत आहेत त्या अर्थी सतिशिष्ट असाही विकरणस्वर सार्वधातुक स्वराचा बाध करीत नाहीं असें तें सुचवीत आहेत.

( वा. १२ ) दोन कार्यांचा विप्रतिषेध आला असतां शास्त्राचेंच परत्व पहावें असा नियम नसल्यामुळें शब्दाचेंही परत्व पाहतां येईल. आणि त्यामुळ सर्व सिद्ध होईल. अथवा 'विप्रतिषेधे परम्' येथें दोन शास्त्रांचा विप्रतिषेध आला तर त्यांत पर करावें असा शास्त्र–परविप्रतिषेध स्वीकारला असतां सर्व इष्ट स्थलांचा संग्रह होत नसल्यामुळें पुढील शब्दाला होणारें कार्य पर समजून करावें, असा शब्द-परविप्रतिषेध घेण्यांत[21] येईल.

पण जर शब्द-परविप्रतिषेध घेतला तर पुत्रकाम्यति[22] गोपायति ऋतीयते वगैरे ठिकाणीं काम्यादिप्रत्ययान्ताला अन्तोदात्त होण्याकरितां काम्य वगैरे प्रत्ययांना चकार इत्संज्ञक जोडावा लागेल.

शब्द–परविप्रतिषेध घेतला तरी तोही ज्या ठिकाणीं दोन कार्यांची बरोबर प्राप्ति येते तेथें

---

२०. सु धातूहून लटाचे स्थानीं तस् प्रत्यय केल्यानंतर मध्यें होणाऱ्या श्नु या विकरण प्रत्ययाचा( ३।१।७३ ) स्वर सतिशिष्ट असल्यामुळें बलवान् होईल आणि त्यामुळें या शेषनिघातान तस् प्रत्ययांतील अकार अनुदात्त होईल आणि मध्योदात्त पद होऊं लागेल.

२१. तेव्हां सुनुतः येथें तस् हा प्रत्यय श्नु प्रत्ययाच्या पुढें असल्यामुळें त्याचा स्वर परं समजून तो श्नु प्रत्ययाच्या स्वराचा बाध करील.

२२. काम्य आय आणि ईय या प्रत्ययांतील पहिल्या अचाला जो प्रत्ययस्वर प्राप्त झाला त्याचा परत्वामुळेंच बाध करून पुत्रकाम्य गोपाय आणि ऋतीय या ठिकाणीं धातुस्वरानें अन्त उदात्त होतो. पण जर शास्त्र-परविप्रतिषेध न घेतां शब्द–परविप्रतिषेध घेतला तर काम्य आय आणि ईय एवढा एकेकच शब्द असल्यामुळें धातुस्वराला परत्व सांगतां येणार नाहीं. तेव्हां चकार जोडून चितः ( ६।१।१६३ ) या सूत्रानें अन्त उदात्त साधावा लागेल.

काम्यादिषु युगपत्प्रसङ्गः ॥

**विभक्तिस्वरान्नञ्स्वरो बलीयान् ॥१३॥**

विभक्तिस्वरान्नञ्स्वरो बलीयानिति वक्तव्यम् । विभक्तिस्वरस्यावकाशः । तिस्रस्तिष्ठन्ति । नञ्स्वरस्यावकाशः । अब्राह्मणः अवृषलः । इहोभयं प्राप्नोति । अतिस्रः । नञ्स्वरो भवति ॥

**विभक्तिनिमित्तस्वराच्च ॥ १४ ॥**

विभक्तिनिमित्तस्वराच्च नञ्स्वरो बलीयानिति वक्तव्यम् । विभक्तिनिमित्तस्वरस्यावकाशः । चत्वारः अनड्वाहः । नञ्स्वरस्य स एव । इहोभयं प्राप्नोति । अचत्वारः अनड्वाहः ॥

**यच्चोपपदं कृति नञ् ॥ १५ ॥**

यच्चोपपदं कृति नञ्तस्य स्वरो बलीयानिति वक्तव्यम् । अकरणिहं ते वृषल ॥

**सहनिर्दिष्टस्य च ॥ १६ ॥**

सहनिर्दिष्टस्य च नञः स्वरो बलीयानिति वक्तव्यम् । अव्यथी ॥

**कर्षात्वतो घञोऽन्त उदात्तः ॥ ६ । १ । १५९ ॥**

किमर्थं कृषेर्विकृतस्य ग्रहणं क्रियते न

---

घेतला जाईल. आणि काम्य वगैरे प्रत्ययांना तर प्रत्ययस्वर आणि धातुस्वर यांची बरोबर प्राप्ति येत नाहीं.[23]

(वा. १३) विभक्ति–स्वरापेक्षां नञ् या अव्ययाला होणारा स्वर प्रबल होय असें वचन करावें. विभक्ति–स्वराला (६।१।१६६) तिस्रः येथें चारितार्थ्य आहे व 'तत्पुरुषे तुल्यार्थ०' या नञाला होणाऱ्या स्वराला (६।२।२) अब्राह्मणः येथें अवकाश आहे. आणि अतिस्रः येथें दोघांची प्राप्ति आली असतां नञ्-स्वर[24] होतो.

(वा. १४) विभक्तीच्या निमित्तानें झालेल्या कार्याला जो स्वर प्राप्त होतो त्यापेक्षां नञ्स्वर बलवान् होतो असेंही वचन करावें. विभक्तिनिमित्त स्वराला (७।१।९८) चत्वारः व अनड्वाहः येथें अवकाश आहे व नञ्-स्वराला अब्राह्मणः येथें अवकाश आहे आणि अचत्वारः अनड्वाहः येथें दोघांची प्राप्ति आली असता नञ्स्वर होतो.

(वा. १५) ज्या ठिकाणीं नञ् उपपद असतांना कृत् प्रत्यय झाला असेल तेथेंही त्या नञाला होणारा स्वर प्रबल होतो असें वचन करावें उदा०– अकरणिहं[25] ते वृषलः.

(वा. १६) धातूहून कृत् प्रत्यय सांगतांना त्या धातूच्या बरोबर निर्दिष्ट जो नञ् त्याचाही स्वर बलवान् होतो असें वचन करावें उदा०–अव्यथी.[26]

(सू. १५९) कशाकरितां बरें कर्ष असें

---

२३. तात्पर्य, शास्त्र-परविप्रतिषेध घेतला तरी देखील हीं परत्वाचीं उदाहरणें नव्हेतच. येथें धातुस्वर सतिशिष्ट असल्यामुळेंच प्रबल होतो. तेव्हां चकार जोडावयास नको.

२४. हें वचन केलें नाहीं तर विभक्तिस्वर सतिशिष्ट असल्यामुळें तो प्रबळ होईल.

२५. येथें नञ् उपपद असतांना कृ धातूहून अनि प्रत्यय (३।३।११२) झाला आहे. येथें करणि या उत्तरपदाला प्राप्त झालेल्या प्रकृतिस्वराचा (६।२।१३९) बाध करून नञाचा स्वर होतो.

२६ जिदृक्षि० (३।२।१५७) या सूत्रामध्यें अव्यथ असा निर्देश केला आहे नञ पूर्वक व्यथ् धातूहून इन् प्रत्यय होतो असा त्याचा अर्थ आहे.

१. (सू. १५९) भ्वादि गणांतील कृष् धातु आणि ज्या धातूमध्यें दीर्घ आकार आहे असे धातू यांच्या पुढें घञ् प्रत्यय आला असतां त्या घञ्–प्रत्ययान्त शब्दाचा अन्त उदात्त होतो. उदा–० कर्षः, पाकः, हा अन्त उदात्त सांगितला नसता तर घञ् हा ञित् प्रत्यय असल्यामुळें आदि उदात्त (६।१।१९७) झाला असता.

कृषात्वत इत्येवोच्येत । यस्य कृषेर्विकरण एतद्रूपं तस्य यथा स्यात् । इह मा भूत् । हलस्य कर्ष इति ॥

अथ किमर्थं मतुपा निर्देशः क्रियते न कर्षात इत्येवोच्येत । कर्षात इतीयत्युच्यमाने यत्रैवाकारादनन्तरो घञस्ति तत्रैव स्यात् । दायः धायः । इह न स्यात् । पाकः पाठः ॥ न क्वचिदाकारादनन्तरो घञस्ति । इहापि दायः धाय इति युका व्यवधानम् ॥ एवमपि विहितविशेषणमाकारग्रहणं विज्ञायेत । आकाराद्यो विहित इति । मतुब्ग्रहणे पुनः क्रियमाणे न दोषो भवति ॥

## [ उञ्छादीनां च ॥६।१।१६०॥ ]

## अनुदात्तस्य च यत्रोदात्तलोपः ॥ ६ । १ । १६१ ॥

अनुदात्तस्येति किमर्थम् । प्रासङ्गं वहति प्रासङ्ग्यः ।

**उदात्तलोपे स्वरितोदात्तयोरभावादनुदात्तग्रहणानर्थक्यम् ॥ १ ॥**

उदात्तलोपे स्वरितोदात्तयोरभावादनुदात्तग्रहणमनर्थकम् । न हि कश्चिदुदात्त उदात्ते स्वरिते वा लुप्यते सर्वोऽनुदात्त

---

कृष् धातूचे विकृताच ग्रहण केलें आहे ? तसे करू नय तर 'कृषात्वत:' असेंच म्हणावें.

ज्या कृष् धातूला विकरण लागून कर्ष असें रूप बनतें त्या ठिकाणींच हा स्वर झाला पाहिजे आणि हलस्य कर्षः येथें न झाला पाहिजे.

आता आत्वतः हा मतुप् प्रत्यय करून निर्देश केला आहे तो कशाकरिता ? तसा करूं नये. तर कर्षातः असेंच म्हणावें.

कर्षातः असें म्हटलें तर जेथें अकाराच्या पुढें घञ् असेल तेथेंच उदा०- दायः धायः येथें हें सूत्र प्रवृत्त होईल. आणि पाकः पाठः येथें व्यजनानें व्यवधान असल्यामुळें होणार नाहीं.

पण मध्यें व्यवधान नाहीं असा आकाराच्या पुढें घञ् कोठेंच असत नाहीं. कारण, दायः व धायः येथेंही युक् आगमानें व्यवधान आहेच.

तर मग आतः हें विहित-विशेषण होईल. म्हणजे 'आकारान्त धातूहून केलेला जो घञ्' असा अर्थ होईल. आणि मतुप् ग्रहण केलें म्हणजे मात्र आकारवान् धातूच्या पुढें असलेला घञ् असा अर्थ झाल्यामुळें दोष उरत नाहीं.

( सू. १६१ ) येथें अनुदात्तस्य असें कशाकरिता म्हटलें आहे ?

प्रासङ्ग वहति प्रासङ्ग्यः येथे उदात्त न व्हावा म्हणून म्हटले आहे.

( वा. १ ) उदात्ताचा लोप होतो तेथें पुढें स्वरित किंवा उदात्त असतच नाहीं म्हणून येथें अनुदात्त ग्रहण व्यर्थ होत आहे. कारण कोठेंही स्वरित किंवा उदात्त पुढे असतांना उदात्ताचा लोप झालेला दिसत नाहीं. जेथें जेथें उदात्ताचा लोप होतो तेथें तेथें त्याच्या पुढें अनुदात्तच

---

२. तुदादि गणांतील कृष् धातूचें हें रूप आहे. त्याचें कृषति असें रूप होतें, गुण होत नाहीं. म्हणून त्या कृष् धातूचें येथें ग्रहण होत नाहीं.

३. तसा अर्थ झाला असतां दायः व धायः येथेंच प्रकृत सूत्रानें अन्त उदात्त होईल. पाकः व पाठः येथें होणार नाहीं असा दोष येणारच

१. ( सू. १६० ) उञ्छ वगैरे शब्दांचा अन्त उदात्त होतो.

१. ( सू. १६१ ) जो अनुदात्त पुढें असतांना मागील उदात्ताचा लोप होतो त्या अनुदात्ताला उदात्त होतो.

२. प्र आणि आ उपसर्ग पूर्वी असलेल्या सञ्ज् धातूहून कर्मणि घञ् प्रत्यय होऊन सिद्ध झालेला प्रासङ्ग हा शब्द अन्तोदात्त आहे ( ६।२।१४४ ). त्याचें पुढें केलेला यत् प्रत्यय ( ४।४।७६ ) स्वरित ( ६।१।१८५ ) आहे. येथें स्वरित पुढें असतांना मागील उदात्ताचा लोप ( ६।४।१४८ ) झाला आहे.

एव ॥ ननु चायमुदात्तः स्वरिते लुप्यते । प्रासङ्गं वहति प्रासङ्ग्य इति । एषोऽपि निघाते कृते ऽनुदात्त एव लुप्यते । इदमिह संप्रधार्यम् । निघातः क्रियतां लोप इति किमत्र कर्तव्यम् । परत्वाल्लोपः । एवं तर्ह्ययमद्य निघातस्वरः सर्वस्वराणामपवादः। न चापवादविषय उत्सर्गोऽभिनिविशते । पूर्वं ह्यपवादा अभिनिविशन्ते पश्चादुत्सर्गाः । प्रकल्प्य वापवादविषयं तत उत्सर्गा अभिनिविशते । तन्न तावदत्र कदाचित्थादिस्वरो भवत्यपवादं निघातं प्रतीक्षते । तत्र निघातः क्रियतां लोप इति यद्यपि परत्वाल्लोपः सोऽसावविद्यमानोदात्तोऽनुदात्तो लुप्यते ॥

किं पुनरनुदात्तस्यान्त उदात्तो भवत्याहोस्विदादिः । कश्चात्र विशेषः ।

**अन्त इति चेच्छ्नम्क्सयुष्मदस्मदिदंकिंलोपेषु स्वरः ॥ २ ॥**

अन्त इति चेच्छ्नम्क्सयुष्मदस्मदिदंकिंलोपेषु स्वरो न सिध्यति । श्नम् । विन्दाते

---

असतो.

पण प्रासङ्गं वहति प्रासङ्ग्यः येथें स्वरित पुढें असतांना उदात्ताचा लोप झाला आहे ना ?

येथेंही प्रत्ययाला स्वरित करतांना त्याचे बरोबरच शेष-निघातानें ( ६।१।५८ ) मागील अकार अनुदात्त होतो. तेव्हां येथेंही अनुदात्ताचाच लोप होत आहे.

तर मग आतां येथें हा विचार करावा कीं— प्रासङ्ग शब्दांतील शेवटच्या अकाराचा लोप प्रथमतः करावा किंवा निघात करावा.

यांत काय बरें करावें ?

पर असल्यामुळें अगोदर अकाराचा लोप करावा.

तर मग आतां येथें असें समजावें की हा शेषनिघात सर्वच स्वरांचा अपवाद आहे आणि अपवादाच्या विषयात तर उत्सर्ग प्रवृत्त होऊं शकत नाहीं. कारण प्रथमतः अपवाद मनांत येतात व मागाहून उत्सर्ग येतात. तेव्हां अपवादाचा विषय वगळूनच उत्सर्ग प्रवृत्त होतो. म्हणून येथें शेष-निघात ह्या अपवादाचा विषय असल्यामुळें 'थाथघञ्०' (६।२।१४४) यानें अन्त उदात्तच मुळीं प्रवृत्त होणार नाहीं. तर तो अपवाद शेष-निघाताची वाट पहात थांबणारच. अशा स्थितींत अकाराला शेष निघात अगोदर करावा किंवा लोप करावा असा विचार आला असतां जरी पर असल्यामुळें प्रथमतः लोप झाला तरी उदात्त न झालेला असाच तो अकार अनुदात्त लुप्त होत आहे.

पण काय हो येथे हा जो अनुदात्ताला उदात्त सांगितला आहे तो अनुदात्ताच्या अन्त्याला होतो किंवा आदीला[3] होतो ?

या दोन्ही तऱ्हांत काय बरें फरक आहे ?

( वा. २ ) अन्त उदात्त होतो असें म्हटलें तर श्नम्, क्स, युष्मद, अस्मद, इदम् आणि किम् यांतील उदात्ताचा लोप झाला असतां स्वरसिद्धि होत नाहीं. श्नम्[4] प्रत्ययाचें उदाहरण—

---

३. उदात्ताच्या लोपाला कारणीभूत जो अनुदात्त प्रत्यय तो अनेकाच् असेल तर त्या ठिकाणी त्या प्रत्ययाचा अन्त उदात्त होतो किंवा आदि उदात्त होतो असा संशय येतो.

४. विन्दाते व खिन्दाते येथें विद् व खिद् धातूंहून लट् प्रत्यय, प्रथम पुरुष द्विवचन आताम् प्रत्यय, त्याला एत्व (३।४।७९), आणि श्नम् प्रत्यय (३।१।७८) अशीं कार्यें झाली आहेत. त्यांतील अकार प्रत्यय-स्वरानें उदात्त आहे. पुढील प्रत्यय, धातु अनुदात्तेत्संज्ञक असल्यामुळें अनुदात्त ( ६।१।१८६ ) झाला आहे. त्या प्रत्ययाला मानून श्नम् प्रत्ययांतील उदात्त अकाराचा लोप ( ६।४।१११ ) झाला आहे म्हणून प्रकृत सूत्रानें पुढील प्रत्ययाला उदात्त होतो तो प्रत्ययांतील आदि आकाराला झाला पाहिजे तो एकाराला होऊं लागेल.

खिन्दाते । श्नम् । क्स । मा हि धुक्षाताम् । मा हि धुक्षाथाम् । क्स । युष्मदस्मद् । युष्मभ्यम् अस्मभ्यम् । इदंकिंलोपः । इयान् कियान् ॥ अस्तु तर्ह्यादिः ।

**आदिरिति चेदिन्धीत द्वयमित्यन्तः ॥ ३ ॥**

आदिरिति चेदिन्धीत द्वयमित्यन्तोदात्तत्वं न सिध्यति । इन्धीत । द्वयम् त्रयम् ॥

**आदौ सिद्धम् ॥ ४ ॥**

अस्तु तर्ह्यादिरुदात्तो भवतीति ॥ ननु चोक्तमादिरिति चेदिन्धीत द्वयमित्यन्त इति ।

**विदीन्धिखिदिभ्यश्च लसार्वधातुकानुदात्तप्रतिषेधाल्लिङि सिद्धम् ॥ ५ ॥**

---

खिन्दाते खिन्दाते. क्स[५] प्रत्ययाचें उदाहरण मा हि धुक्षाताम् , मा हि धुक्षाथाम् , युष्मद्[६] व अस्मद् शब्दांचें उदाहरण–युष्मभ्यम्, अस्मभ्यम्. इदम्[७] व किम् या शब्दांचें उदाहरण–इयान् , कियान्.

तर मग आतां पुढील अनुदात्त प्रत्ययाचा आदि उदात्त होतो असें असूं दे.

( वा. ३ ) आदि उदात्त होतो असें म्हटलें तर इन्धीत, द्वयम् व त्रयम् येथें अन्तोदात्ताचें विधान केलें पाहिजे.

( वा. ४ ) अनुदात्ताचा आदि उदात्त होतो असेंच असूं दे.

पण आदि उदात्त होतो असें म्हटलें तर इन्धीत व द्वयम् येथें अन्तोदात्ताचें विधान करावें लागेल असें म्हटलें आहे ना ?

---

५. मा हि धुक्षाताम् येथें दुह् धातूहून लुङ्, प्रथम पुरुष द्विवचन आताम् प्रत्यय, मध्यें च्लि प्रत्यय, त्याचें स्थानीं क्स प्रत्यय ( ३।१।४५ ) त्यांतील अकार प्रत्ययस्वरानें उदात्त आहे. पुढील प्रत्यय अनुदात्त ( ६।१।१८६ ) आहे. त्याच्या निमित्तानें क्स प्रत्ययांतील उदात्त अकाराचा लोप ( ७।३।७२ ) झाला आहे म्हणून प्रकृत सूत्रानें पुढील प्रत्ययाला उदात्त होतो तो पहिल्या अकाराला झाला पाहिजे तो पुढील अकाराला होऊं लागेल.

६. युष्मभ्यम् येथें युष् धातूहून मदिक् प्रत्यय ( उणा. १।१३६ ) यांतील अकार प्रत्ययस्वरानें उदात्त आहे. पुढील भ्याम् प्रत्यय अनुदात्त ( ३।१।४ ) आहे. त्याला भ्यम् आदेश (७।१।३० ) झाला आहे. त्याला मानून मागें अद् याचा लोप ( ७।२।९० ) झाला आहे. म्हणून प्रकृत सूत्रानें उदात्त होणार तो प्रत्ययांतील पहिल्या अकाराला इष्ट आहे तो दुसऱ्या अकाराला होऊं लागेल.

७. इयान् येथें इदम् शब्दाच्या पुढील वतुप् प्रत्यय अनुदात्त (३।१।४) आहे . त्यांतील वकाराला घकार (५।२।४०), त्या घकाराला इय् आदेश ( ७।१।२ ), इदम् शब्दाला इश् आदेश (६।३।९०), तो स्थानीप्रमाणें उदात्त (फिट् सू १।१) झाला आहे, त्याचा लोप (६।४।१४८) झाल्यामुळें प्रकृत सूत्रानें पुढील इश् प्रत्ययांतील अकाराला उदात्त इष्ट आहे. तो अकाराला होऊं लागेल. कियान् येथें किम् शब्दाला की आदेश झाला आहे, बाकी सर्व पूर्वीप्रमाणें समजावें.

८. इन्ध् धातूहून लिङ्, त प्रत्यय, सीयुट्, सुट् आगम, सकाराचा लोप ( ७।२।७९ ), श्नम् प्रत्यय, त्यांतील अकार प्रत्ययस्वरानें उदात्त. पुढील नकाराचा लोप ( ६।४।२३ ) अशी कार्यें झालीं आहेत. येथें ईत हा प्रत्यय अनुदात्त ( ६।१।१८६ ) आहे, पण त्यांतील ईकाराला प्रकृत सूत्रानें उदात्त होऊं लागेल, अकाराला उदात्त इष्ट आहे. द्वयम् येथें द्वि शब्दाहून तयप् प्रत्यय ( ५।२।४२ ) अनुदात्त ( ३।१।४ ) झाला आहे. त्याला अय आदेश ( ५।२।४३ ) स्थानीप्रमाणें अनुदात्त आहे. द्वि शब्दांतील उदात्त इकाराचा लोप ( ६।४।१४८ ) झाला आहे. तेथें अय प्रत्ययांतील शेवटच्या अकाराला उदात्त होणें इष्ट आहे तो प्रकृत सूत्रानें पहिल्या अकाराला उदात्त होईल.

विदीन्धिखिदिभ्यश्च लसार्वधातुकानुदात्तत्वं लिङि नेति वक्तव्यम् ॥ लिङ्ग्रहणेन नार्थः । अविशेषेण विदीन्धिखिदिभ्यश्च लसार्वधातुकानुदात्तत्वं नेत्येव । इदमपि सिद्धं भवति । विन्दाते खिन्दाते ॥ अयचि कथम् ।

**अयचि चित्करणात् ॥ ६ ॥**

अयचि चित्करणसामर्थ्यादन्तोदात्तत्वं भविष्यति ॥

**धातोः ॥ ६ । १ । १६२ ॥**

किं धातोरन्त उदात्तो भवत्याहोस्विदादिरिति । कश्चात्र विशेषः ।

**धातोरन्त इति चेदनुदात्तेचबग्रहणम् ॥ १ ॥**

धातोरन्त इति चेदनुदात्तेचबग्रहणं कर्तव्यम् । अभ्यस्तानामादिरनुदात्ते च [ ६. १. १८९; १९० ] इति वक्तव्यम् । बग्रहणं च कर्तव्यम् । बान्तश्च पिबिराद्युदात्तो भवतीति वक्तव्यम् । पिबति ॥

**संश्च नित् ॥ २ ॥**

सश्च नित्कर्तव्यः । किं प्रयोजनम् । चिकीर्षति जिहीर्षति । नितीत्याद्युदात्तत्वं

---

(वा. ५) विदि, इन्धि, व खिदि या धातूंच्या पुढील लसार्वधातुकाला लिङामध्यें अनुदात्त होत नाहीं असें वचन करावें. त्यांत सुद्धां लिङामध्यें असें जे म्हटलें आहे तें म्हणूं नये; तर विन्द् इन्ध आणि खिद् या धातूंच्या पुढील लसार्वधातुकाला अनुदात्त होत नाहीं एवढेंच मोघम म्हणावें. त्यामुळें विदान्त हेंही साधत आहे[९]. अनुदात्त प्रत्ययाचा आदि उदात्त होतो असें म्हटलें तर द्वयम् इत्यादि स्थलीं अयच् प्रत्ययाचा पहिला अकार उदात्त होईल त्याची काय वाट ?

(वा. ६) अयच् यामध्यें इत्संज्ञक चकार जोडला असल्यामुळें अन्तोदात्त ( ६।१।१६३ ) होईल.

(सू. १६२) काय, धातूचा अंत उदात्त होतो अथवा आदि उदात्त होतो ?

या दोहोंत काय बर फरक आहे ?

(वा. १) धातूचा अन्त उदात्त होतो असें म्हटलें तर 'अभ्यस्तानामादिः' याचे पुढें 'अनुदात्ते च' असें सूत्र केलें पाहिजे[२]. तसेंच बग्रहणही करावयास पाहिजे. बशब्दान्त धातु म्हणजे पिब हा अनुदात्त होतो असेंही वचन केलें पाहिजे[३].

(वा. २) सन् प्रत्ययालाही नित्त्व करणें भाग आहे ?

काय प्रयोजन ?

चिकीर्षति जिहीर्षति वगैरे स्थलीं धातुस्वराचा बाध होऊन 'ञ्निति०' ( ६।१।१९७ )

---

९. तेव्हां इन्धीत येथें त हा प्रत्ययस्वरानें उदात्त आहे व सीयुट् या आगमाचा ईकार अनुदात्त झालेला तसाच राहील. तेव्हां सहजच तें पद अन्तोदात्त सिद्ध होत आहे.

१०. तेव्हां प्रकृत सूत्राची प्राप्तीच येत नाहीं. आणि प्रत्यय स्वरानें आकार उदात्त झालेला कायम राहील.

१. (सू. १६२) धातूचा अन्त्य अच् उदात्त होतो.

२. ददाति येथें प्रकृत सूत्रानें दा धातूच्या आकाराला उदात्त करून द्वित्व केलें तर दोन उदात्त होतील. जर अगोदर द्वित्व करून मग प्रकृत सूत्रानें उदात्त करावा तर तो उत्तर खंडाला होऊं लागेल, आणि पूर्व खंडाला इष्ट आहे. तेव्हां 'अनुदात्ते च' असें सूत्र केलें पाहिजे.

३. पिबति येथें गुण ( ७।३।८६ ) न होण्याकरितां पिब असा अकारान्त आदेश ( ७।३।७८ ) मानला म्हणजे प्रकृत सूत्रानें त्या अकाराला उदात्त होईल पण इकाराला उदात्त इष्ट आहे तो होणार नाहीं.

यथा स्यात् ॥ अस्तु तर्ह्यादिः ।

आदावूर्णुप्रत्ययधातुष्वन्तोदात्तत्वम् ॥ ३ ॥

आदावूर्णुप्रत्ययधातुष्वन्तोदात्तत्वं न सिध्यति । ऊर्णोति । ऊर्णु । प्रत्ययधातु । गोपायति धूपायति ऋतीयते ॥

अन्तोदात्तवचनात्सिद्धम् ॥ ४ ॥

अस्तु तर्ह्यन्तोदात्तो भवतीति ॥ ननु चोक्तं धातोरन्त इति चेदनुदात्तेचबग्रहणं कर्तव्यमिति । यत्तावदुच्यते ऽनुदात्तेचग्रहणं कर्तव्यमिति क्रियते न्यास एवाभ्यस्तानामादिरनुदात्ते चेति । बग्रहणं कर्तव्यमिति ।

पिबौ निपातनात् ॥ ५ ॥

पिबावाद्युदात्तनिपातनं क्रियते स निपातनस्वरः प्रकृतिस्वरस्य बाधको भविष्यति ॥ सश्च नित्कर्तव्य इत्यवश्यं सनो विशेषणार्थो नकारः कर्तव्यः । क विशेषणार्थेनार्थः । सन्यङोः [ ६. १. ९ ] इति । सयङोरितीयत्युच्यमाने हंसः वत्सः अत्रापि प्राप्नोति । अर्थवद्ग्रहणे नानर्थकस्येत्येवं न भविष्यति । इहापि तर्हि न प्राप्नोति । जुगुप्सते मीमांसत इति । अर्थवानेषः । न वै कश्चिदर्थ आदिश्यते । यद्यपि कश्चिदर्थो नादिश्यते ऽनिर्दिष्टार्थाः प्रत्ययाः स्वार्थे भवन्तीत्यन्ततः

---

यांनें आद्युदात्त व्हावा म्हणून.

तर मग धातूचा आदि उदात्त होतो हा पक्ष असो.

( वा. ३ ) धातूचा आदि उदात्त होतो असें म्हटलें तर ऊर्णु धातु व प्रत्ययान्त धातू यांना अन्तोदात्त होणार नाहीं. उदा०—ऊर्णोति, गोपायति, धूपायति, ऋतीयते.

( वा. ४ ) तर मग धातूचा अन्त उदात्त होतो हाच पक्ष घ्यावा म्हणजे सर्व सिद्ध होईल.

पण धातूचा अन्त उदान्त होतो हाच पक्ष स्वीकारला असतां ‘ अनुदात्ते च ’ असें सूत्र करावयास पाहिजे, तसेंच बग्रहणही करावयास पाहिजे असें आतांच म्हटलें आहे ना ?

तेथें ‘ अनुदात्ते च ’ असें सूत्र केलें पाहिजे असें काय म्हणतां ? तें केलेंच आहे. आतां बग्रहण केलें पाहिजे असें जें म्हटलें आहे तेथेंही—

(वा. ५) पिबादेशाचे ठिकाणीं आद्युदात्ताचें निपातन केलें आहे. तो निपातन—स्वर ‘धातोः’ या प्रकृति—स्वराचा बाधक होईल. तसेंच सनूही नित् करावा असें जें म्हटलें आहे तेथेंही सन् प्रत्ययामध्यें स्वराकरितां नको असला तरी विशेषणाकरितां नकार घालणें आवश्यक आहे.

विशेषणार्थ नकार घालण्याचा कोठें उपयोग येत आहे ?

‘ सन्यङोः ’ येथें. ‘ सयङोः ’ असें म्हटलें तर हंसः वत्सः येथेंही द्वित्व होऊं लागेल.

हंसः वत्सः येथील शब्द अनर्थक असल्यामुळें अर्थवद्ग्रहण परिभाषेनेंच द्वित्व होणार नाहीं.

पण ती परिभाषा येथें घेतली तर जुगुप्सते मीमांसते येथेंही द्वित्व होणार नाहीं.

येथें द्वित्व होईल. कारण यथील स शब्द अर्थवान् आहे.

पण या स शब्दाला कोणताही अर्थ सांगितलेला नाहीं.

जरी अर्थ सांगितला नाहीं तरी ‘ ज्यांच्या अर्थाचा निर्देश केला नाहीं असे प्रत्यय स्वार्थी

---

४. जर प्रकृत सूत्रानें आदि उदात्त सांगितला तर चिकीर्ष या सन्—प्रत्ययान्त धातूचा आदि उदात्त प्रकृत सूत्रानेंच सिद्ध होत असल्यामुळें त्याकरितां सन् असा नकार लावावयास नको.

स्वार्थे भविष्यति । कश्चास्य स्वार्थः । प्रकृत्यर्थः । इहापि तर्हि प्राप्नोति । हंसः वत्स इति । उणादयोऽव्युत्पन्नानि प्रातिपदिकानि । स एषोऽनन्यार्थो नकारः कर्तव्यः । न कर्तव्यः । क्रियते न्यास एव ॥ अथवा धातोरिति वर्तते । धातोः सशब्दान्तस्य द्वे भवत इति ॥

**चितः ॥ ६ । १ । १६३ ॥**

**चितः सप्रकृतेर्बह्वकजर्थम् ॥ १ ॥**

चितः सप्रकृतेरिति वक्तव्यम् । किं प्रयोजनम् । बह्वकजर्थम् । बह्वर्थमकजर्थं च । बह्वर्थं तावत् । बहुभुक्तम् बहुकृतम् । अकजर्थम् । सर्वकैः विश्वकैः । उच्चकैः नीचकैः ॥ तत्तर्हि वक्तव्यम् । न वक्तव्यम् । मतुब्लोपोऽत्र द्रष्टव्यः । तद्यथा । पुष्यका एषां पुष्यकाः । कालका एषां कालकाः । अथवाकारो मत्वर्थीयः । तद्यथा । तुन्दः घाट इति । पूर्वसूत्रनिर्देशश्च । चित्वान् चित इति ॥

---

होतात असें असल्यामुळें ' स ' हा प्रत्यय स्वार्थी होईल.

याचा स्वार्थ तो कोणता ?

प्रकृतीचा जो अर्थ तोच स्वार्थ होय.

तर मग हंसः वत्सः येथेंही द्वित्व प्राप्त होत आहे.[5]

उणादि प्रातिपदिकें अव्युत्पन्न[6] अशीं असल्यामुळें हंसः आणि वत्सः येथें स शब्दाला अर्थ नाहीं म्हणून द्वित्व होणार नाहीं. तेव्हां आद्युदात्त स्वर होण्याकरिताच केवळ सन् येथें नकार जोडला पाहिजे.

तो नकार नवीन जोडावयास नको. कारण मूळ सूत्रामध्यें जोडलाच आहे.

अथवा येथें ' लिटि धातोः०' येथून धातुग्रहणाची अनुवृत्ति येत आहे. तेव्हां स—शब्दान्त धातूला द्वित्व होतें असा अर्थ होतो म्हणून हसः आणि वत्सः येथें द्वित्व होणार नाहीं.

( सू. १६३ वा. १ ) चित्[1] प्रत्यय आणि त्याची प्रकृति मिळून समुदायाचा अन्त उदात्त होतो असें वचन करावें.

काय प्रयोजन ?

बहुच् व अकच् ह्या प्रत्ययांनीं युक्त अशा समुदायाचा अन्त उदात्त व्हावा म्हणून. बहुच् प्रत्ययाचें उदा०—बहुकृतम् बहुभुक्तम्. अकच् प्रत्ययाचें उदा०—सर्वकैः, उच्चकैः, विश्वकैः, नीचकैः.

तर मग ' चितः सप्रकृतेः ' असें वचन करावयास पाहिजे.

वचन करावयास नको. कारण चितः येथें मतुप् प्रत्ययाचा अर्थ विवक्षित असूनही मतुप् प्रत्यय केला नाहीं असें समजावें. उदा०—पुष्पका:[2] येषां ते पुष्पकाः; कालकाः येषा ते कालकाः-किंवा येथे चित् शब्दाहून मत्वर्थी अर्शआदित्वास्तव अकार प्रत्यय ( ६।२।१२७ ) केला आहे असें समजावें. उदा०तुन्दः घाटः. आतां येथें चित् प्रत्ययाने युक्त जो समुदाय त्या अर्थी चित् असा शब्द करून त्याचा येथें चितः असा जो प्रथमा विभक्तीनें निर्देश केला आहे तो पूर्वाचार्यांच्या[3] पद्धतीला अनुसरून केला आहे. असें समजावें.

---

५. हंस व वत्स येथें हन् आणि वद् या धातूंहून स प्रत्यय ( उणा. ३।६२ ) झाला आहे. तो स्वार्थी असल्यामुळें अर्थवान् आहे.

६. अव्युत्पन्न प्रातिपदिक म्हणजे ज्यामध्यें अमुक धातु आणि अमुक प्रत्यय ही कल्पनाच करावयाची नसते असें प्रातिपदिक.

१. ( सू. १६३ ) चकार इत्संज्ञक प्रत्यय शेवटीं असलेल्या शब्दाचा अन्त्य अच् उदात्त होतो.

२. मागें ( ६।१।१५८ टी. ४,५ ) पहा.

३. पूर्वीचे आचार्यांनीं उद्देश्याचा प्रथमा विभक्तीनेंही निर्देश केलेला आहे.

[ [1]तद्धितस्य ॥ ६ । १ । १६४ ॥
[1]कितः ॥ ६ । १ । १६५ ]

[1]तिसृभ्यो जसः ॥ ६।१।१६६॥

जस इति किमर्थम् । तिसृकाः ॥

**तिसृभ्यो जस्ग्रहणानर्थक्यमन्यत्राभावात् ॥ १ ॥**

तिसृभ्यो जस्ग्रहणमनर्थकम् । किं कारणम् । अन्यत्राभावात् । न ह्यन्यत्तिसृशब्दादन्तोदात्तत्वं प्रयोजयत्यन्यदतो जसः । किं कारणम् । बहुवचनविषय एव तिसृशब्दस्तेनैकवचनद्विवचने न स्तः । शसि भवितव्यमुदात्तयणो हल्पूर्वात् [ ६, १. १७४ ] इति । अन्याः सर्वा हलादयो विभक्तयस्तत्र षट्त्रिचतुर्भ्यो हलादिर्झल्युपोत्तमम् [ ६. १. १७९; १८० ] इत्यनेन स्वरेण भवितव्यम् । तत्रान्तरेण जसो ग्रहणं जस एव भविष्यति ॥ ननु चेदानीमेवोदाहृतं तिसृकेति । नित्स्वरोऽत्र बाधको भविष्यति ॥ नाप्राप्तेऽन्यस्वरे तिसृस्वर आरभ्यते स यथैवानुदात्तौ सुप्पितौ [३. १. ४] इत्येतं स्वरं बाधत एवं नित्स्वरमपि बाधेत । नैष दोषः । येन नाप्राप्ते तस्य बाधनं भवति न चाप्राप्तेऽनुदात्तौ

---

( सू. १६६ ) येथें जसः असें जें म्हटलें आहे तें कशाकरितां ?

तिसृ[2]काः येथें कन् प्रत्ययाला उदात्त न व्हावा म्हणून जसः असें म्हटलें आहे.

( वा. १ ) तिसृभ्यो जसः येथें जस्-ग्रहण केलें आहे तें व्यर्थ होत आहे. कारण जसाहून अन्य विभक्तींना या सूत्राचा उपयोग नाहीं.

काय कारण ?

कारण असें कीं–तिसृ शब्द नित्य बहुवचनान्त असल्यामुळें त्याला एकवचन किंवा द्विवचन प्रत्यय लागत नाहीं. शस् विभक्तीला 'उदात्तयणो०' (६।१।१७४) यानच काम भागत आहे. आणि तृतीयेच्या पुढील सर्व विभक्ती हलादि असल्यामुळें 'षट्त्रिचतुर्भ्यो०' ( ६।१।१७९ ) यानेंच तेथें निर्वाह होत आहे. तेव्हां अर्थात् जस्-ग्रहण केल्यावांचूनही जसालाच हा स्वर होईल.

पण नुकतेंच तिसृकाः असें प्रत्युदाहरण दिलें आहे ना ?

तिसृकाः येथें नित्स्वर ( ६।१।१९७ ) प्रकृत स्वराचा बाध करील.

पण इतर स्वर नाप्राप्त असतां या तिसृस्वराचा आरंभ केला आहे तेव्हां तो जसा 'अनुदात्तौ सुप्पितौ' ( ३।१।४ ) याचा बाध करतो तसा नित्स्वराचाही बाध करील.

हा दोष येत नाहीं. कारण ज्याची नाप्राप्ति आहे त्याचाच बाध केला जातो. आणि 'अनुदात्तौ सुप्पितौ' हा अनुदात्त स्वर प्राप्त नसतांना हा तिसृस्वर होतो असें कोठेंही नाहीं. आणि नित्स्वरमात्र या तिसृस्वराच्या उदाहरणा-

---

१. (सू. १६४) चकार-इत्संज्ञक जो तद्धित प्रत्यय तो शेवटीं असलेल्या शब्दाचा अन्त्य अच् उदात्त होतो. उदा०कौञ्जायनाः. येथें च्फञ् प्रत्यय ( ४।१।९८ ) झालेला आहे. तो ञित् असल्यामुळें आद्युदात्त ( ६।१।१९७ ) होईल; तो न व्हावा म्हणून हें मुद्दाम सूत्र केलें आहे.

१. ( सू. १६५ ) ककार-इत्संज्ञक तद्धित प्रत्यय शेवटीं असलेल्या शब्दाचा अन्त्य अच् उदात्त होतो. उदा० नाडायनः.

१. ( सू. १६६ ) तिसृ याच्या पुढील जस् प्रत्ययाचा अन्त उदात्त होतो. उदा०. तिस्रः.

२. स्त्रीलिंगी त्रि शब्दाहून कन् प्रत्यय व त्रि शब्दाला तिसृ आदेश ( ७।२।९९ वा. १ ) झाला आहे.

३. तिसृकाः येथेंही पुढील टाप् प्रत्ययाबरोबर एकादेश झाल्यानंतर 'अनुदात्तौ सुप्पितौ' याची प्राप्ति आहेच.

सुप्पितावित्येतस्मिंस्तिसृस्वर आरभ्यते नित्स्वरे पुनः प्राप्ते चाप्राप्ते च । अथवा मध्येऽपवादाः पूर्वान्विधीन्बाधन्त इत्येवं तिसृस्वरोऽनुदात्तौ सुप्पिताविति स्वरं बाधिष्यते नित्स्वरं न बाधिष्यते ॥

उपसमस्तार्थमेके जसो ग्रहणमिच्छन्ति । अतितिस्रौ अतितिस्रः ॥

## चतुरः शसि ॥ ६ । १ । १६७ ॥

शसि स्त्रियां प्रतिषेधो वक्तव्यः । चतस्रः पश्य ।

### चतुरः शसि स्त्रियामप्रतिषेध आद्युदात्तनिपातनात् ॥ १ ॥

चतुरः शसि स्त्रियामप्रतिषेधः । अनर्थकः प्रतिषेधोऽप्रतिषेधः । शसि स्वरः कस्मान्न भवति । आद्युदात्तनिपातनात् । आद्युदात्तनिपातनं करिष्यते स निपातनस्वरः शसि स्वरस्य बाधको भविष्यति ॥ एवमप्युपदेशिवद्भावो वक्तव्यः । यथैव हि निपातनस्वरः शसि स्वरं बाधत एवं विभक्तिस्वरमपि बाधेत । चतसृणामिति ॥

### विभक्तिस्वरभावश्च हलादिग्रहणात् ॥ २ ॥

विभक्तिस्वरस्य च भावः सिद्धः । कुतः । हलादिग्रहणात् । यदयं षट्त्रिचतुर्भ्यो

---

मध्यें कोठें प्राप्त असतो व कोठें अप्राप्त असतो. अथवा ‘ मध्यें पठित असलेले अपवाद आपल्यापेक्षां पूर्वींच्या विधीचा बाध करतात, आपल्यापेक्षा पुढील विधींचा बाध करीत नाहींत ’ अशी परिभाषा असल्यामुळें हा तिसृस्वर अनुदात्ताचा बाध करील आणि नित्स्वराचा बाध करणार नाहीं.

तिस्रः अतिक्रान्तौ अतितिस्रौ येथें समासामध्यें तिसृ शब्दाच्या पुढें द्विवचन विभक्ति येत असल्यामुळें तेथें त्या विभक्तीला उदात्त न होण्याकरितां जस् ग्रहण पाहिजे असें कोणी म्हणतात.

( सू. १६७ ) शस् पुढें असतांना स्त्रीलिंगी चतुर् शब्दाला अन्तोदात्त होत नाहीं, असें वचन करावें. उदा०— चतस्रः पश्य.

( वा. १) शस् पुढें असतांना स्त्रीलिंगी चतुर् शब्दाला अन्तोदात्ताचा जो हा प्रतिषेध केला आहे तो अप्रतिषेधच होय. अप्रतिषेध म्हणजे हा प्रतिषेध करावयास नको.

पण मग चतस्रः पश्य येथें हा स्वर ( म्हणजे अन्तोदात्त ) कां बरें होत नाहीं ?

चतसृ ( ७।२।९९ ) आदेशाचे ठिकाणीं आद्युदात्ताचें निपातन केले आहे म्हणून होत नाहीं. कारण तो निपातन–स्वर ह्या प्रकृत शसिस्वराचा बाध करील.

तरी पण हा निपातन–स्वर उपदेशींच होतो असें म्हटलें पाहिजे. नाहीं तर हा निपातन स्वर शस् स्वराचा जसा बाध करतो त्याप्रमाणें चतसृणाम् येथें ‘ षट्त्रि० ’ ( ६।१।१७९ ) या विभक्तिस्वराचाही बाध करील.

( वा. २. ) चतुर्णाम् येथें विभक्तिस्वराचें अस्तित्व कायम राहील.

कशावरून ?

‘षट्त्रि०’ या सूत्रामध्यें हलादिग्रहण केलें आहे यावरून. ज्याअर्थीं हे आचार्य ‘ षट्त्रिचतुर्भ्यः ’ होत आहे.

---

१. ( सू. १६७ ) चतुर् शब्दाचा अन्त स्वर उदात्त होतो शस् प्रत्यय पुढें असतांना.

२. येथें चतुर् शब्दाला चतसृ आदेश ( ७।२।९९ ) झाल्यानंतर स्थानिवद्भावानें ( १।१।५६ ) तो चतुर् शब्द आहे असें समजून प्रकृत सूत्रानें अन्तोदात्त प्राप्त

३. चतसृ आदेश करतांनाच तो निपातन-स्वरासहित करावयाचा असल्यामुळें मागाहून येणारा ‘ षट्त्रि०’ हा विभक्ति–स्वर सनिशिष्ट झाल्यामुळें प्रबल होतो.

हलादिः [ ६. १. १७९ ] इति हलादिग्रहणं करोति तज्ज्ञापयत्याचार्यो न निपातनस्वरो विभक्तिस्वरं बाधत इति । कथं कृत्वा ज्ञापकम् ।

**आद्युदात्तनिपातने हि हलादिग्रहणानर्थक्यम् ॥ ३ ॥**

आद्युदात्तनिपातने हि सति हलादिग्रहणमनर्थकं स्यात् । न ह्यन्यद्धलादिग्रहणं प्रयोजयत्यन्यदतश्चतसृशब्दात् ॥ षट्संज्ञास्तावन्न प्रयोजयन्ति । किं कारणम् । बहुवचनविषयत्वात् । तेन द्विवचनैकवचने न स्तः । जश्शसी चात्र लुप्येते । अन्याः सर्वा हलादयो विभक्तयः ॥ त्रिशब्दश्चापि न प्रयोजयति । किं कारणम् । बहुवचनविषयत्वात् । तेन द्विवचनैकवचने न स्तः । असर्वनामस्थानमिति वचनाज्जसि न भविष्यति । शसि भवितव्यमेकादेश उदात्तेनोदात्तः [ ८. २. ५ ] इति । अन्याः सर्वा हलादयो विभक्तयः ॥ तिसृशब्दश्चापि न प्रयोजयति । किं कारणम् । बहुवचनविषयत्वात् ॥ तेन द्विवचनैकवचने न स्तः । असर्वनामस्थानमिति वचनाज्जसि न भवितव्यम् । शसि भवितव्यमुदात्तयणो हल्पूर्वात् [ ६. १. १७४ ] इति । अन्याः सर्वा हलादयो विभक्तयः । चतुःशब्दश्चापि न प्रयोजयति । किं कारणम् । बहु-

---

येथें हलादिग्रहण करीत आहेत त्याअर्थी निपातन–स्वर विभक्तिस्वराचा बाध करीत नाहीं असें ते सुचवीत आहेत.

हें कसें बरें ज्ञापक जमतें ?

( वा. ३ ) चतसृ आदेशाला आद्युदात्त निपातन केलें तर ' षट्त्रिचतुर्भ्यः'० येथें हलादिग्रहण व्यर्थ होत आहे. कारण ह्या चतसृ शब्दावाचून इतर शब्दाविषयीं हलादिग्रहणाचा उपयोग येत नाहीं. असें पहा कीं—षट्संज्ञक शब्दाविषयीं हलादिग्रहणाचा उपयोग नाहीं. कारण षट्संज्ञक शब्द नित्य बहुवचनान्त असल्यामुळें त्याहून एकवचन किंवा द्विवचन प्रत्यय होत नाहीं. जस् किंवा शस् यांचा षट्संज्ञकाहून लुकच ( ७।१।२२ ) सांगितला आहे. उरलेल्या सर्व विभक्ती हलादीच आहेत. तेव्हां हलादिग्रहण करून काय कर्तव्य आहे ?

तसेंच त्रि शब्दाविषयींही हलादि ग्रहणाचा उपयोग सांगता येणें शक्य नाहीं. कारण त्रि शब्द नित्य बहुवचनान्त असल्यामुळें त्याहून एकवचनाचें किंवा द्विवचनाचें नांव काढावयास नको. ' षट्त्रि० ' येथें असर्वनामस्थानम् अशी अनुवृत्ति असल्यामुळें अर्थातच जस् सुटतो. शसा विषयीं म्हणाल तर त्रिशब्द अन्तोदात्त असल्यामुळें त्रीन् येथें शसाला 'एकादेश उदात्तेनोदात्तः' (८।२।५) यानें उदात्त होणारच आहे. यांवाचून उरलेल्या विभक्ती सर्व हलादीच आहेत; तेथें हलादिग्रहणाचा उपयोग काय बरें सांगतां येईल ?

त्रि शब्दाप्रमाणें तिसृ शब्दाविषयींही हलादिग्रहण उपयोगीं पडत नाहीं. कारण हा तिसृ शब्द बहुवचनान्त असल्यामुळें याहून एकवचन आणि द्विवचन प्रत्यय होत नाहींत. असर्वनामस्थानपदाची अनुवृत्ति येत असल्यामुळें जस् प्रत्ययाची व्यावृत्ति होतच आहे. शसाविषयीं म्हणाल तर तिसृ शब्दाला ' अचि र ऋतः ' यानें रेफ आदेश केला असतां ' उदात्तयणो हल्पूर्वात् ' ( ६।१।१७४ ) यानें शसाला उदात्त होणारच आहे. बाकी उरलेल्या सर्व विभक्ती हलादि आहेत. तेथें हलादिग्रहणाचा उपयोग होणें शक्य नाहीं.

तसेंच चतुर् शब्दाविषयींही हलादिग्रहणाचा उपयोग सांगतां येणें शक्य नाहीं. कारण चतुर् शब्द नित्य बहुवचनान्त असल्यामुळें

वचनविषयत्वात् । तेन द्विवचनैकवचने न स्तः । असर्वनामस्थानमिति वचनाज्जसि न भवितव्यम् । शसि भवितव्यं चतुरः शसीति । अन्याः सर्वा हलादयो विभक्तयः ॥ तत्र चतसृशब्दादेकस्माच्छस् असर्वनामस्थानमजादिर्विभक्तिरस्ति । यदि चात्र निपातनस्वरः स्याद्धलादिग्रहणमनर्थकं स्यात् ॥

नैव वा पुनरत्र शसि स्वरः प्राप्नोति । किं कारणम् । यणादेशे कृते शसः पूर्व उदात्तभावी नास्तीति कृत्वा । अवशिष्टस्य तर्हि प्राप्नोति । ऋकारेण व्यवहितत्वान्न भविष्यति । यणादेशे कृते नास्ति व्यवधानम् । स्थानिवद्भावाद्व्यवधानमेव । प्रतिषिध्यतेऽत्र स्थानिवद्भावः स्वरविधिं प्रति न स्थानिवद्भवतीति । नैषोऽस्ति प्रतिषेधः । उक्तमेतत्प्रतिषेधे स्वरदीर्घयलोपेषु लोपाजादेशो न स्थानिवदिति ॥

## सावेकाचस्तृतीयादिर्विभक्तिः ॥ ६ । १ । १६८ ॥

साविति किमिदं प्रथमैकवचनस्य ग्रहणमाहोस्वित्सप्तमीबहुवचनस्य । कुतः

---

त्याहून एकवचन किंवा द्विवचन प्रत्यय करणें शक्य नाहीं. असर्वनामस्थान पदाच्या अनुवृत्तीनें जसाची व्यावृत्ति होतच आहे. शस् प्रत्यय केला असतां ' चतुरः शसि ' या प्रकृत सूत्रानें चतुर् शब्दाला अन्तोदात्त होणारच आहे. बाकीच्या उरलेल्या सर्व विभक्ती हलादीच आहेत. तेव्हां फक्त एक चतसृ शब्दाहून अजादि सर्वनामस्थान असा शस् प्रत्यय तेवढा दिसत आहे. त्याच्या व्यावृत्तीकरिता हलादिग्रहणाचा उपयोग सांगावयाचा. पण तेथेंही जर निपातन स्वर त्याचा बाधक होईल तर हलादिग्रहण व्यर्थ म्हणजे अनर्थक होईल.

अथवा चतस्रः पश्य येथें ऋकाराला शसिस्वर प्राप्तच होत नाहीं. कारण परत्वास्तव स्वरापेक्षां अगोदर ' अचि र ऋतः ' ( ७।२।१०० ) यानें रेफ आदेश केला असतां उदात्त ज्याला होईल असा ऋकारच मुळीं अस्तित्वांत रहात नाहीं.

तर मग अवशिष्टाला म्हणजे मागील अकाराला स्वर प्राप्त होत आहे.

ऋकारानें व्यवधान असल्यामुळे होणार नाहीं.

पण रेफ आदेश केला असतां ऋकारानें व्यवधान नाहीं.

पूर्वाला विधि कर्तव्य असतांना ' अचः परस्मिन्० ' ( १।१।५७ ) यानें स्थानिवद्भाव झाल्यामुळें व्यवधान होत आहेच.

पण स्वरविधि कर्तव्य असतांना ' न पदान्त० ' ( १।१।५८ ) यानें स्थानिवद्भावाचा निषेध केला आहे ना ?

हा निषेध येथें प्रवृत्त होत नाहीं. कारण ' स्वर, दीर्घ, आणि यलोप हे कर्तव्य असतांना लोपरूपी अजादेशालाच स्थानिवद्भावाचा निषेध होतो' असें मागें ( १।१।५८ वा. १ ) सांगितलेंच आहे.

( सू. १६८ ) येथें सौ असें म्हटलें आहे. तें काय प्रथमा एकवचनाचें ग्रहण समजावयाचें

---

४. तेव्हां अर्थातच ज्ञापक जमतें म्हणून निपातनस्वरासंबधानें उपदेशिवद्भाव सांगावयास नको. आणि निपातन-स्वरानें प्रकृत सूत्रानें सांगितलेल्या स्वराचा बाध होत असल्यामुळें ' शसि स्त्रियां प्रतिषेधः ' हें वार्तिक करावयास नको.

५. येथून ' शसि स्त्रियां प्रतिषेधः ' या वार्तिकाचें निरनिराळ्या तऱ्हेनें भाष्यकार खंडन करीत आहेत.

१. ( सू. १६८ ) सप्तमी बहुवचन सु प्रत्यय पुढें असतांना कांहीं शब्दांचें एकाच् स्वरूप जें दृष्टीस पडतें तशा स्वरूपाच्या त्या शब्दांच्या पुढील तृतीयादिविभक्ति-प्रत्यय उदात्त होतात. उदा० वाचा वाग्भ्याम्.

संदेहः । समानो निर्देशः । सप्तमीबहुवचनस्य ग्रहणम् । कथं ज्ञायते । यदयं न गोश्वन्साववर्णेति गोशुनोः प्रतिषेधं शास्ति । कथं कृत्वा ज्ञापकम् । यदि प्रथमैकवचनस्य ग्रहणं स्याद्गोशुनोः प्रतिषेधवचनमनर्थकं स्यात् । ननु चार्थसिद्धिरेवैषा । अनुगृहीताः स्मो यैरस्माभिः प्रथमैकवचनमास्थाय गोशुनोः प्रतिषेधो न वक्तव्यो भवति । भवेत्प्रतिषेधो न वक्तव्यो दोषास्तु भवन्ति । तत्र को दोषः । स्विना खिना । अन्तोदात्तत्वं न प्राप्नोति । स्विन्खिनौ न स्तः । उक्तमेतदेकाक्षरात्कृतो जातेः सप्तम्यां च न तौ स्मृतौ स्ववान् खवानित्येव भवितव्यम् । इह तर्हि याद्भ्याम् याद्भिरिति न

---

अथवा सप्तमी बहुवचनाचें समजावयाचें ?

असा संशय येण्याचें काय कारण ?

कारण असें कीं सूत्रामध्यें सौ असें जें म्हटलें आहे तें रूप दोहोंचें सारखेंच होत आहे.

सौ हें येथें सप्तमी बहुवचनाचें ग्रहण केलें आहे.

हें कशावरून समजतें ?

अशावरून कीं— ज्याअर्थी आचार्य हे ' न गोश्वन्० ' ( ६।१।१८२ ) या सूत्रानें गो आणि श्वन् या शब्दांच्या पुढील तृतीयादि विभक्तीला उदात्ताचा निषेध करीत आहेत त्याअर्थी सौ हें सप्तमी बहुवचनाचें ग्रहण केलें आहे असें ते ज्ञापन करीत आहेत.

हें ज्ञापक कसें बरें जमतें ?

जर सौ हे प्रथमैकवचनाचें ग्रहण असेल तर तेथें प्रकृत सूत्राची प्राप्तीच येत नसल्यामुळें[2] त्याचे निषेधाकरितां केलेलें गो आणि श्वन् शब्दांचें ग्रहण नकोसें होत आहे.

पण ह्या तुमचे म्हणण्यांत इष्ट अर्थचें[3] सिद्ध होत आहे. तेव्हां हा आमच्यावर एक प्रकारचा अनुग्रहच होत आहे कीं— ' सौ हा प्रथमैकवचनाचा निर्देश असेल तर त्याच्या प्रतिषेधाकरितां केलेले गो व श्वन् शब्दांचें ग्रहण नकोसें होईल ' असें बोलणें. नकोसें होईल तर करूंच नये आणि गोश्वन् शब्दाचें ग्रहण केलेंच नसतें, पण या पक्षावर दोष येत आहे ना ?

कोठें बरें दोष येत आहे. ?

स्विना[4] आणि खिना येथें प्रकृत सूत्रानें तृतीया विभक्तीला उदात्त होत असतो तो होणार नाहीं.

पण स्विन् व खिन् हे शब्दच मुळीं सिद्ध होत नाहींत. कारण एकाक्षर शब्द वकृदन्त जातिवाचक शब्द यांहून तसेंच सप्तम्यर्थी इन् व ठन् हे प्रत्यय होत नाहींत असें ( ५।२।११५ वा. ) सांगितलें आहे. तेव्हां स्ववान् तसेंच खवान् असेंच रूप व्हावें.

तर मग याद्भ्याम्[5] याद्भिः येथें प्रकृत

---

२. प्रथमा एकवचनामध्यें गो शब्दाचें गौः असें वृद्धि केलेलें एकाच् रूप दिसतें. तसेच श्वन् शब्दाचे श्वा असें दीर्घ केलेलें रूप दिसतें. तसें रूप तृतीयादि विभक्तींमध्यें नसल्यामुळें तेथें प्रकृत सूत्राची प्राप्तीच येणार नाहीं.

३. गवा व शुना येथें प्रकृत सूत्रानें विभक्ति स्वर नकोच.

४. स्व आणि ख या शब्दांहून मत्वर्थी इनि प्रत्यय ( ५।२।११५ ) केला असतां स्विन् आणि खिन् असे शब्द होतात. त्यांचें तृतीया एकवचनाचें रूप स्विना तसेंच खिना असें होतें. प्रथमा एकवचनामध्यें स्वी तसेंच खी असें दीर्घ केलेलें जें एकाच् रूप तें तृतीया एकवचनामध्यें नसल्यामुळे प्रकृत सूत्रानें तृतीयादि विभक्तीला उदात्त होणार नाहीं.

५. 'या' ह्या धातूहून लट् प्रत्ययाला शतृ आदेश होऊन यात् असा शब्द सिद्ध होतो. यान् यान्तौ यान्तः असा तो चालतो. ह्या शब्दाचें प्रथमा एकवचनामध्यें नुम् आगम झालेलें यान् असें जें एकाच्-रूप तें तृतीयेमध्यें नसल्यामुळें प्रकृत सूत्रानें विभक्तीला उदात्त होणार नाहीं.

सिध्यति । तस्मात्सप्तमीबहुवचनस्य ग्रहणम् ॥

**सावेकाच उदात्तत्वे त्वन्मदोः प्रतिषेधः ॥ १ ॥**

सावेकाच उदात्तत्वे त्वन्मदोः प्रतिषेधो वक्तव्यः । त्वया मया ॥

**सिद्धं तु यस्मात्तृतीयादिस्तस्याभावात्सौ ॥ २ ॥**

सिद्धमेतत् । कथम् । यस्मादत्र तृतीयादिर्विभक्तिर्न तत्सावस्ति ॥ यद्यप्येतत्सौ नास्ति प्रकृतिस्त्वस्य सावस्ति ।

**प्रकृतेश्चानेकाच्त्वात् ॥ ३ ॥**

यद्यपि तस्य प्रकृतिरस्ति सावनेकाच्तु सा भवति ॥

**[१]अन्तोदात्तादुत्तरपदादन्यतरस्यामनित्यसमासे ॥ ६ । १ । १६९ ॥**

उत्तरपदग्रहणं किमर्थम् । यथैकाज्ग्रहणमुत्तरपदविशेषणं विज्ञायेत । एकाच उत्तरपदादिति । अथाक्रियमाण उत्तरपदग्रहणे कस्यैकाज्ग्रहणं विशेषणं स्यात् । समासविशेषणम् । अस्ति चेदानीं कश्चिदेकाचसमासो यदर्थो विधिः स्यात् । अस्तीत्याह । शुन ऊर्क् श्वोर्क् । श्वोर्जा श्वोर्जे इति ॥

**[ [१]अञ्चेश्छन्दस्यसर्वनामस्थानम् ॥ ६ । १ । १७० ॥ ]**

**[१]ऊडिदंपदाद्यप्पुम्रैद्युभ्यः ॥ ६ । १ । १७१ ॥**

---

सूत्रानें उदात्त होणार नाहीं. सबब येथें सप्तमी बहुवचनाचेंच ग्रहण करणें भाग आहे.

(वा. १) 'सावेकाचः०' यानें सांगितलेल्या उदात्ताविषयीं त्वत् व मत् या शब्दांपुढील तृतीयादि विभक्तीला उदात्त होत नाहीं असें वचन करावें. उदा० त्वया, मया.

( वा. २ ) त्वया व मया येथें तृतीया विभक्तीला उदात्त न होणें हें साधत आहे.

ते कसें ?

असें कीं–त्वय् व मय् या ज्या शब्दांहून तृतीयादि विभक्ति येथें दिसत तें शब्दच मुळीं सप्तमी बहुवचन सु पुढें असतांना दिसत नाहींत.

पण जरी त्वय् व मय् असे शब्द दिसत नाहींत तरी त्यांची प्रकृति जी युष्मद् व अस्मद् ती दिसत आहे ना ?

( वा. ३ ) जरी सु पुढें असतांना त्यांची प्रकृति दिसते तथापि ती प्रकृति एकाच् नाहीं.

( सू. १६९ ) येथें उत्तरपदात् असें कशाकरितां म्हटलें आहे ?

मागून अनुवृत्तीनें आलेलें एकाचः हें पद 'एकाच् जें उत्तरपद' असें उत्तरपदाचेंच विशेषण झालें पाहिजे म्हणून म्हटलें आहे.

पण येथें उत्तरपद-ग्रहण नसेल तर एकाचः हें कोणाचें बरें विशेषण होईल ?

समासाचें विशेषण होईल.

पण एकाच् असा समास एखादा तरी आहे काय कीं जो एकाच् समास प्रकृत सूत्राचें उदाहरण म्हणून दाखवितां येईल ?

होय, आहे. उदा०–'शुनः ऊर्क्' या विग्रहाचा श्वोर्ज् हा समास आहे व त्याचीं श्वोर्जा श्वोर्जे इत्यादि रूपें होतात.

---

१ ( सू. १६९ ) नित्य-समासाशिवाय इतर समासांतील जें अन्तोदात्त आणि एकाच् उत्तरपद त्याच्या पुढील तृतीयादि विभक्तीला विकल्पानें उदात्त होतो. उदा० परमवाचा.

१. ( सू. १७० ) अञ्च् धातु शेवटीं असलेले जे शब्द त्यांच्या पुढील सर्वनामस्थानभिन्न विभक्तीला वेदामध्यें उदात्त होतो.

१. ( सू. १७१ ) ऊठ्, इदम्, पद्, दत्, नस्, मास्, हृत्, निश्, अप्, पुम्, रै आणि द्यु यांच्या पुढील सर्वनामस्थानभिन्न विभक्तीला उदात्त होतो.

पदादिषु निशन्तानि प्रयोजयन्ति । अन्यानि पदादीन्युदात्तनिवृत्तिस्वरेण सिद्धानि ॥

ऊठ्युपधाग्रहणमन्त्यप्रतिषेधार्थम् ॥ १ ॥

ऊठ्युपधाग्रहणं कर्तव्यम् । किं प्रयोजनम् । अन्त्यप्रतिषेधार्थम् । अन्त्यस्य मा भूत् । अक्षद्युवा अक्षद्युवे ॥

अष्टनो दीर्घात् ॥ ६।१।१७२ ॥

दीर्घग्रहणं किमर्थम् । अष्टसु प्रक्रमेषु ब्राह्मण आदधीत । दीर्घादिति शक्यमकर्तुम् । कस्मान्न भवति अष्टसु प्रक्रमेषु ब्राह्मण आदधीतेति । षट्स्वरोऽत्र बाधको भविष्यति । नाप्राप्ते षट्स्वरे ऽष्टनः स्वर आरभ्यते स यथैव दीर्घाद्बाधत एवं ह्रस्वादपि बाधेत । न दीर्घात्षट्स्वरः प्राप्नोति । किं कारणम् । आत्वे कृते षट्संज्ञाभावात् ॥ अत उत्तरं पठति ।

---

( सू. १७१ ) ‘पद्दन्नोमास्०’ ( ६।१।६३ ) या सूत्रांतील पद् शब्दापासून निश् शब्दापर्यंत सहाच शब्द येथें पदादि या शब्दानें घ्यावयाचे आहेत. तथा सूत्रातील बाकीच्या शब्दाविषयीं ‘अनुदात्तस्य च०’ (६।१।१६१) या सूत्रानेंच विभक्तीला उदात्त साधत आहे.

( वा. १ ) ऊठा–विषयीं उपधा[2]–ग्रहण करावें.

त्याचा काय उपयोग ?

शेवटीं असलेल्या ऊठाहून पुढील विभक्तीला उदात्त होऊं नये हा उपयोग आहे. उदा०–अक्षद्युवा अक्षद्युवे.

( सू. १७२ ) येथें दीर्घात् असें कशाकरितां म्हटलें आहे ?

‘अष्टसु[2] प्रक्रमेषु ब्राह्मण आदधीत’ याकरितां.

येथें दीर्घ–ग्रहण न केलें तरी चालेल.

पण मग अष्टसु प्रक्रमेषु येथें उदात्त कां बरें होत नाहीं ?

येथें पर असल्यामुळें ‘झल्युपोत्तमम्’ (६.१।१८० ) हा षट्स्वर ह्या अष्टन् स्वराचा बाध करील.

पण षट्स्वर नाप्राप्त असतांना आरंभिलेला अष्टन् स्वर जसा दीर्घान्ताहून षट् स्वराचा बाध करतो त्याप्रमाणें ऱ्हस्वान्त अष्टन् शब्दाहूनही षट्स्वराचा बाध करील.

असें नाहीं. दीर्घान्त अष्टन् शब्द असेल तेथें मुळीं षट्स्वराची प्राप्तीच येत नाहीं.

काय कारण ?

कारण असें कीं–आत्व केलें असतां षट्संज्ञाच[3] नाहीं.

हें मनात घेऊन वार्तिककार म्हणतात—

---

२. अन्त्य वर्णाच्या जवळ असलेल्या मागील वर्णाला उपधा ( १।१।६५ ) म्हणतात. तसा उपधाभूत ऊठ् प्रष्ठौहः येथें आहे. प्रष्ठवाह् शब्दाहून शस् प्रत्यय केला असतां वकाराला ऊठ् ( ६।४।१३२ ) व वृद्धि ( ६।१।८९ ) होऊन प्रष्ठौहः असें रूप होतें. येथें हकार शेवटीं आहे व त्याच्या मागें शेजारींच ऊठ् आहे. अक्षद्यु शब्दामध्यें अक्षपूर्वक दिव् धातूहून क्विप् प्रत्यय करून दिव् धातूच्या शेवटच्या वकाराला ऊठ् ( ६।१।१९ ) झाल्यामुळें तो ऊठ अक्षद्यू शब्दाच्या शेवटीं येतो, उपधेला असत नाहीं म्हणून तेथें प्रकृत सूत्रानें पुढील प्रत्ययाला उदात्त होत नाही

१. ( सू. १७२ ) दीर्घान्त म्हणजे आत्व केलेला जो अष्टन् शब्द त्याच्या पुढील सर्वनामस्थानभिन्न विभक्तीला उदात्त होतो. उदा० अष्टाभिः.

२. अष्टसु येथें नकाराचा लोप ( ८।२।७ ) झाला आहे आत्व झालें नाहीं म्हणून येथें सु प्रत्ययाला उदात्त होत नाहीं.

३. कारण, नकारान्ताला षट् संज्ञा सांगितली आहे ( १।१।२४ ).

**अष्टनो दीर्घग्रहणं षट्संज्ञाज्ञापकमाकारान्तस्य नुडर्थम् ॥ १ ॥**

अष्टनो दीर्घग्रहणं क्रियते ज्ञापकार्थम् । किं ज्ञाप्यम् । एतज्ज्ञापयत्याचार्यो भवत्यात्वे कृते षट्संज्ञेति । किमेतस्य ज्ञापने प्रयोजनम् । आकारान्तस्य नुडर्थम् । आकारान्तस्य नुट् सिद्धो भवति । अष्टानामिति ॥ ननु च नित्यमात्वम् । एतदेव ज्ञापयति विभाषात्वमिति यदयं दीर्घग्रहणं करोति । इतरथा ह्यष्टन इत्येव ब्रूयात् ॥

**शतुरनुमो नद्यजादी ॥ ६ । १ । १७३ ॥**

**नद्यजाद्युदात्तत्वे बृहन्महतोरुपसंख्यानम् ॥ १ ॥**

नद्यजाद्युदात्तत्वे बृहन्महतोरुपसंख्यानं कर्तव्यम् । बृहती महती । बृहता महता ॥

**उदात्तयणो हल्पूर्वात् ॥ ६ । १ । १७४ ॥**

हल्पूर्वादिति किमर्थम् । अग्नये वायवे ।

**उदात्तयणि हल्ग्रहणं नकारान्तार्थम् ॥ १ ॥**

उदात्तयणि हल्ग्रहणं कर्तव्यम् । किं

---

( वा. १ ) अष्टनो दीर्घात् येथील दीर्घ ग्रहण ज्ञापनाकरितां केलें आहे.

तें ज्ञाप्य कोणतें ?

आत्व केलें असतांही षट्संज्ञा होते असें आचार्य ज्ञापन करीत आहेत.

असें ज्ञापन करण्याचा काय उपयोग ?

अष्टानाम् येथे आकारान्ताला षट्संज्ञा असल्यामुळें नुट् आगम ( ७।१।५५ ) सिद्ध होतो.

तरी पण आत्व हें नित्य आहे ना ?

असें म्हणणें असेल तर मग पुनः व्यर्थ होत असलेलें हें दीर्घ ग्रहणच 'विकल्पानें आत्व होतें' असें ज्ञापन करीत आहे. कारण आचार्यांनीं येथें दीर्घ ग्रहण केलें आहे. तसें नसतें तर आचार्यांनीं 'अष्टनः' एवढेच सूत्र केलें असतें.

( सू. १७३ वा. १ ) नदी व अजादि विभक्ति यांना सांगितलेला जो हा उदात्त त्याविषयीं बृहत् व महत् यांचें उपसंख्यान करावें. उदा०— बृहती महती; बृहता महता.

( सू. १७४ ) येथें हल्पूर्वात् असें कशाकरतां म्हटलें आहे.

अग्नये, वायवे.

( वा. १ ) उदात्तयणः याचें ऐवजीं उदात्त-

---

४. तात्पर्य, अष्टाभिः येथेही षट् संज्ञा असल्यामुळें अष्टभिः व अष्टाभिः या दोन्ही ठिकाणी प्राप्त झालेल्या षट्-स्वराचा बाध करून प्रकृत सूत्राने विभक्ति उदात्त होऊं लागेल. याकरितां दीर्घात् असें येथें म्हटलें पाहिजे.

५. तेव्हां अष्टभिः असें रूपच मुळी होत नसल्यामुळें तेथें या सूत्राची प्रवृत्ति होऊं नये म्हणून केलेलें दीर्घ-ग्रहण फिरून व्यर्थच होत आहे.

१. ( सू. १७३ ) नुम् आगम न झालेला जो शतृ प्रत्यय तो शेवटी असलेल्या अशा अन्तोदात्त शब्दाच्या पुढील जो नदी किंवा सर्वनामस्थानभिन्न अजादि प्रत्यय त्याला उदात्त होतो. उदा० तुदती. येथें ङीप् प्रत्यय (४।१।६) हा नदीसंज्ञक (१।४।३) आहे.

२. येथे बृहत् आणि महत् या शब्दांच्या पुढील ङीप् प्रत्ययाला आणि तृतीया एकवचन टा प्रत्ययाला उदात्त झाला आहे.

१. ( सू. १७४ ) ज्याच्या पूर्वी हल् आहे असा आणि उदात्ताचे स्थानी झालेला जो यण् त्याच्या पुढील जे नदी आणि सर्वनामस्थानभिन्न अजादि प्रत्यय त्यांना उदात्त होतो. उदा० कर्त्री, कर्त्रा.

२. अग्नि शब्द फिट्-स्वरानें ( फिट् सूत्र १।१ ) अन्तोदात्त आहे. त्या उदात्त इकाराला गुण ( ७।३।१११ ) व अय् आदेश झाले आहेत. तेव्हां येथें यकार हा एकटाच उदात्ताचे स्थानी झालेला नाहीं तरी पण अय् या आदेशामध्यें तो सांपडला असल्यामुळें उदात्ताचे स्थानीं झालेला आहे असे येथें गृहीत धरलें आहे. वायवे येथेंही असेंच समजावें.

प्रयोजनम् । नकारान्तार्थम् । नकारान्तादपि यथा स्यात् । वाक्पत्नी चित्पत्नी ॥

**हल्पूर्वग्रहणानर्थक्यं च समुदायादेशत्वात् ॥ २ ॥**

हल्पूर्वग्रहणं चानर्थकम् । किं कारणम् । समुदायादेशत्वात् । समुदायोऽत्रादेशः ॥

**स्वरितत्वे चावचनात् ॥ ३ ॥**

स्वरितत्वे च हल्पूर्वग्रहणस्यावचनान्मन्यामहे हल्पूर्वग्रहणमनर्थकमिति ॥

यत्तावदुच्यत उदात्तयणि हल्ग्रहणं नकारान्तार्थमिति क्रियते न्यास एव । द्विनकारको निर्देशः । उदात्तयणो हल्पूर्वान्नोङ्धात्वोरिति ॥ यदप्युच्यते हल्पूर्वग्रहणानर्थक्यं च समुदायादेशत्वादित्ययमस्ति केवल आदेशः । बहुतितवा ॥

## [ नोङ्धात्वोः ॥ ६ । १ । १७५ ]

---

हलः असें म्हणावें.

काय प्रयोजन ?

नकारान्ताच्या पुढील ङीप् प्रत्ययाला उदात्त झाला पाहिजे. उदा० वाक्पत्नी[3] चित्पत्नी.

( वा. २ ) हल्पूर्वग्रहण व्यर्थ होत आहे.

काय कारण ?

कारण असें कीं—उदात्ताचे स्थानीं अय् तसाच अव् असा समुदाय आदेश झाला आहे.

( वा. ३ ) ‘ उदात्तस्वरितयोर्यणः० ’ ( ८।२।४ ) या सूत्रामध्यें उदात्तस्थानीं झालेल्या यणाहून पुढील अनुदात्ताचे स्थानीं सांगितलेल्या स्वरिताविषयीं अग्नये इत्यादि स्थलीं स्वरिताचें निवारण होण्याकरितां जसें हल्पूर्वग्रहण केलें नाहीं, त्याप्रमाणें ‘ उदात्तयणो हल्पूर्वात् ’ येथेंही हल्पूर्वग्रहण करावयास नको.

आतां ‘ उदात्तयणः याचे ऐवजीं उदात्तहलः असें करावें; कारण, नकारान्ताहूनही विभक्त्युदात्त व्हावा ’ असें जें म्हटलें आहे त्यावर उत्तर—सूत्रामध्यें नकाराचा निर्देश केलाच आहे. ‘ उदात्तयणो हल्पूर्वान्नोङ्धात्वोः[5] ’ अशा संहितापाठपक्षीं नकारद्वयघटित निर्देश केला आहे. आणखीही ‘ अय् अथवा अव् असा समुदाय आदेश झाला असल्यामुळें अग्नये इत्यादि स्थलीं विभक्त्युदात्ताचें निवारण करण्याकरितां हल्पूर्वग्रहण करावयास नको ’— असें जें म्हटलें आहे त्यावर उत्तर—उदात्तस्थानीं झालेला केवल यण् असून तो हल्पूर्वक नाहीं असें उदाहरण मिळतें. उदा० बहुतितवा[6] बहुतितवे.

---

३. वाक्पति शब्दांतील इकार समासस्वरान ( ६।१।२२३ ) उदात्त आहे. स्त्रीत्वविवक्षा असतांना त्या उदात्त इकाराला नकार आदेश ( ४।१।३४ ) झाला आहे व पुढें ङीप् प्रत्यय ( ४।१।५ ) झाला आहे.

४. तेव्हां जसें बिसम् याला द्वित्वानें ( ८।१।४ ) बिसंबिसम् एवढा आदेश झाला आहे व त्यांत जरी सकार सापडला आहे तरी तो आदेशरूप नव्हे म्हणून षत्व ( ८।३।५९ ) होत नाहीं तसेंच येथें अय् यांतील यकार हा इकाराचा आदेश समजला जाणार नाहीं.

५. हल्पूर्वात् न् न ऊङ् धात्वोः अशीं पदें आहेत. न् हें पद लुप्तपञ्चम्यन्त आहे. उदात्ताचा यणाप्रमाणें त्या नकाराशींही संबंध आहे.

६. तितउ म्ह० चाळण. बहुत आहेत चाळणी जिच्या अशा अर्थी बहु आणि तितउ या शब्दांचा बहुव्रीहि होऊन शेवटचा उकार उदात्त (६।२।१७५) झाला आहे. पुढें तृतीया एकवचन टा प्रत्यय केला असतां त्या उदात्त उकाराला यणानें ( ६।१।७७ ) फक्त वकार झाला आहे. त्याच्या मागें अकार आहे हल् नाहीं; म्हणून प्रकृत सूत्रानें उदात्त होत नाहीं; स्वरित ( ८।२।४ ) मात्र होतोच. कारण तेथें हल्पूर्वात् असें म्हटलें नाहीं.

१. ( सू. १७५ ) ऊङ् प्रत्ययाचे स्थानीं झालेला किंवा धातूमधील इकाराचे स्थानीं झालेला जो यण्

## ह्रस्वनुड्भ्यां मतुप् ॥ ६ । १ । १७६ ॥

### मतुबुदात्तत्वे रेग्रहणम् ॥ १ ॥

मतुबुदात्तत्वे रेग्रहणं कर्तव्यम् । आ रेवानेतु नो विशः ॥

### त्रिप्रतिषेधश्च ॥ २ ॥

त्रिप्रतिषेधश्च वक्तव्यः । त्रिवतीर्याज्यानुवाक्या भवन्ति ॥

## नामन्यतरस्याम् ॥ ६।१।१७७ ॥

इह कस्मान्न भवति । किशोरीणाम् कुमारीणाम् । ह्रस्वादिति वर्तते । इहापि तर्हि न प्राप्नोति । अग्नीनाम् वायूनाम् । किं कारणम् । दीर्घत्वे कृते ह्रस्वाभावात् । इदमिह संप्रधार्यम् । दीर्घत्वं क्रियतां स्वर इति किमत्र कर्तव्यम् । परत्वाद्दीर्घत्वम् ॥ एवं तर्हि

### नाम्स्वरे मतौह्रस्वग्रहणम् ॥ १ ॥

नाम्स्वरे मतौह्रस्वग्रहणं कर्तव्यम् । मतौ ह्रस्वान्तादिति ॥ तत्तर्हि वक्तव्यम् । न वक्तव्यम् । आहायं ह्रस्वान्तादिति न च नामि पुढें नाम् नाहीं.

---

( सू. १७६ वा. १ ) रे शब्दापुढील मतुप् उदात्त होतो असें वचन करावें. जसें—आ रेवानेतु नो विशः.

( वा. २ ) त्रि शब्दापुढील मतुप् प्रत्ययाला उदात्त होत नाहीं असें वचन करावें. उदा० त्रिवतीर्याज्यानुवाक्या भवन्ति.

( सू. १७७ ) कुमारीणाम् किशोरीणाम् येथें प्रकृत सूत्रानें नाम् याला उदात्त स्वर कां बरें होत नाहीं ?

ह्रस्व ग्रहणाची अनुवृत्ति येत आहे म्हणून होत नाहीं.

तर मग अग्नीनाम् वायूनाम् येथेंही नाम् याला उदात्त स्वर होणार नाहीं.

काय कारण ?

कारण असें कीं दीर्घ केला असतां ऱ्हस्वाहून पुढें नाम् नाहीं.

तर मग आतां असा विचार उत्पन्न होतो कीं प्रथमतः दीर्घ करावा किंवा प्रकृत सूत्रानें उदात्त स्वर करावा.

मग यात काय बरें पूर्वी करावें ?

पर असल्यामुळें दीर्घ पूर्वी करावा.

असें आहे तर मग—

( वा. १ ) ' मतौ ऱ्हस्वात् ' असें येथें म्हणावें. म्हणजे मतुप् पुढें असतांना जो ऱ्हस्वान्त असतो त्याच्या पुढील नाम् प्रत्ययाला उदात्त होतो असा अर्थ होईल.

* तर मग तसें वचन करावयास पाहिजे.

तसें वचन करावयास नको. कारण ऱ्हस्वान्ताच्या पुढील नाम् उदात्त होतो असें हे आचार्य येथें म्हणत आहेत; पण नाम् पुढें अस-

---

त्याच्या पुढील प्रत्ययाला पूर्व सूत्रानें प्राप्त झालेला उदात्त होत नाहीं. उदा०—ब्रह्मबन्ध्वा सकृल्ल्वा.

१. ( सू. १७६ ) ऱ्हस्व शेवटीं असलेला जो अन्तोदात्त शब्द किंवा नुट् आगम त्यांच्या पुढील मतुप् प्रत्यय उदात्त होतो. उदा०-अग्निमान् अक्षण्वता.

२. रयि शब्दाहून मतुप् प्रत्यय केला आहे. येथें रयि शब्दांतील यकाराला संप्रसारण ( ६।१।३७ वा. ६ ) व पुढील इकाराबरोबर पूर्वरूप ( ६।१।१०८ ) आणि मागील अकाराबरोबर गुण होऊन 'रे' असें रूप झालें आहे.

३. त्रिशब्दाहून मतुप् प्रत्यय, त्याच्या मकाराला वकार ( ८।२।१५ ), पुढें ङीप् ( ४।१।६ ), त्याच्या पुढें प्रथमा बहुवचन जस् प्रत्यय आणि पूर्वसवर्ण दीर्घ ( ६।१।१०६ ) अशीं कार्यें झालीं आहेत.

१. ( सू. १७७ ) मतुप् प्रत्यय पुढें असतांना जो ऱ्हस्व कायम राहतो तो शेवटीं असलेल्या अन्तोदात्त प्रातिपदिकाच्या पुढील षष्ठी-बहुवचनाचा नाम् प्रत्यय विकल्पानें उदात्त होतो. उदा०—अग्नीनाम्.

ह्रस्वान्तोऽस्ति तत्र भूतपूर्वगतिर्विज्ञास्यते। ह्रस्वान्तं यद् भूतपूर्वमिति ॥ सांप्रतिकाभावे भूतपूर्वगतिर्विज्ञायते ऽयं चास्ति सांप्रतिकः। तिसृणाम् चतसृणामिति। नैतदस्ति। षट्त्रिचतुर्भ्यो हलादिः [ ६. १. १७९ ] इत्यनेनात्र स्वरेण भवितव्यम्। तस्मिन्नित्ये प्राप्त इयं विभाषारभ्यते । एवं तर्हि योगविभागः करिष्यते। षट्त्रिचतुर्भ्यो नामुदात्तो भवति। ततो हलादिः । हलादिश्च विभक्तिरुदात्ता भवति षट्त्रिचतुर्भ्य इति॥ इदं तर्हि। त्वं नृणां नृपते जायसे शुचिः। ननु चात्रापि नृ चान्यतरस्याम् [ ६. १. १८४ ] इत्येष स्वरो बाधको भविष्यति। न सिध्यति । किं कारणम्। झल्ग्रहणं तत्रानुवर्तते । किं पुनः कारणं झल्ग्रहणं तत्रानुवर्तते। इह मा भून् । त्रा त्रे। उदात्तयणो हल्पूर्वात् [ ६. १. १७४ ] इत्येष स्वरोऽत्र बाधको भविष्यति । इदं

---

तांना मागें ऱ्हस्वान्त अशी स्थिति कोठेंच नाहीं, तेव्हां भूत-पूर्व जें ऱ्हस्वान्त अशी भूतपूर्वगति समजली जाईल.

पण प्रकृत सूत्रानें स्वर करतांना नाम्च्या मागें ऱ्हस्वान्त न मिळेल तर तशी भूतपूर्वगति घेतली जाईल; आणि येथें पहावें तर तिसृणाम् व चतसृणाम् येथें नाम्च्या मागें ह्रस्वान्त आहे.

हें प्रकृत सूत्राचें उदाहरण होत नाहीं. कारण येथें ' षट्त्रिचतुर्भ्यो० ' यानें नाम् प्रत्ययाला उदात्त नित्य झाला पाहिजे.

पण त्यानें नित्य प्राप्त असतां प्रकृत सूत्रानें विकल्प होईल याची काय वाट ?

असें आहे तर मग योगविभाग करण्यांत येईल. तो असा– ' षट्त्रिचतुर्भ्यः ' एवढेंच प्रथम सूत्र : षट्संज्ञकशब्द, त्रिशब्द, आणि चतुर् शब्द यांच्या पुढील नाम् प्रत्यय उदात्त होतो हा त्याचा अर्थ. त्याचें पुढें ' हलादिः ' हें दुसरें सूत्र : षट्संज्ञक वगैरे शब्दांच्या पुढील हलादि विभक्तीही उदात्त होते असा त्याचा अर्थ.

तरी पण " त्वं नृणां नृपते जायसे शुचिः " ( ऋ. सं. २.१.१ ) येथें नाम्च्या मागें नृ हें ऱ्हस्वान्त दिसत आहे.

पण येथेंही ' नृ चान्यतरस्याम् ' ( ६।१। १८४ ) हा स्वर बाधक होईल.

हें म्हणणें बरोबर नाहीं. कारण ' नृ चान्यतरस्याम् ' येथें झल्ग्रहणाची अनुवृत्ति येत आहे.

पण तेथें झल्ग्रहणाची अनुवृत्ति कशाकरितां बरें करावी लागत आहे ?

त्रा त्रे येथें उदात्त विकल्पानें न व्हावा म्हणून करावी लागते.

पण येथें प्रकृत सूत्राचा पूर्वविप्रतिषेधानें बाध करून ' उदात्तयणो० ' यानें स्वर होईल.

तर मग नरि येथें ' नृ चान्यतर० ' यानें उदात्त विकल्पानें न होण्याकरितां तेथें झल्ग्रहणाची अनुवृत्ति करावी लागते.

पण नृणाम् या एकाच उदाहरणाकरितां

---

२. तेव्हां अग्नीनाम् येथें परत्वास्तव दीर्घ अगोदर केला तरी पूर्वी हा शब्द ऱ्हस्वान्त होता तो गृहीत धरून दीर्घ झाल्यानंतर सुद्धां प्रकृत सूत्रानें स्वर होईल.

३. तेव्हां या प्रथम सूत्रानें तिसृणाम् येथें नित्य उदात्त होत असल्यामुळें तिसृणाम् हें प्रकृत सूत्राचें उदाहरण होत नाहीं. कारण ह्या विकल्पाचा बाध होण्याकरितांच मुद्दाम योगविभाग केला आहे.

४. नृ शब्दाबद्दल विशेष रूपानें प्रतिपादन केलें असल्यामुळे त्यानेच येथें उदात्ताचा विकल्प सिद्ध होईल.

५. तेव्हां नृणाम् येथें ' नृ चान्यत० ' याची प्राप्ति येत नसल्यामुळें प्रकृत सूत्राला ऱ्हस्वान्त उदाहरण मिळतें. म्हणून भूतपूर्व गति घेण्याला प्रमाण नाहीं असें ठरतें.

तर्हि । नरि ॥ नैकमुदाहरणं ह्रस्वग्रहणं प्रयोजयति । यद्येतावत्प्रयोजनं स्यान्नामित्येव ब्रूयात् । तत्र वचनाद् भूतपूर्वगतिर्विज्ञास्यते । ह्रस्वान्तं यद् भूतपूर्वमिति ॥

अथवा नैवं विज्ञायते नाम्स्वरे मतौ-ह्रस्वग्रहणं कर्तव्यमिति । कथं तर्हि । नाम्स्वरे मतौ ह्रस्वादिति वर्तत इति ॥

[ ङ्याश्छन्दसि बहुलम् ॥ ६ । १ । १७८ ॥

[ षट्त्रिचतुर्भ्यो हलादिः ॥ ६ । १ । १७९ ॥

झल्युपोत्तमम् ॥ ६ । १ । १८० ॥

विभाषा भाषायाम् ॥ ६ । १ । १८१ ॥ ]

न गोश्वन्साववर्णराडङ्क्रुङ्कृद्भ्यः ॥ ६ । १ । १८२ ॥

साविति किमिदं प्रथमैकवचनस्य ग्रहणमाहोस्वित्सप्तमीबहुवचनस्य । कुतः संदेहः । समानो निर्देशः । पुरस्तादेष निर्णयः सप्तमीबहुवचनस्य ग्रहणमिति ।

---

' नामन्यतरस्याम् ' येथें ऱ्हस्व ग्रहणाची अनुवृत्ति करणें बरें दिसत नाहीं. जर ऱ्हस्व ग्रहणाच्या अनुवृत्तीचें नृणाम् हें एकच उदाहरण असेल तर ' नृ चान्यतरस्याम् ' याचें पुढें ' नाम् ' एवढेंच म्हटल्यानें काम भागतेंच. असें असतां—नाही ' नामन्यतरस्याम् ' असें जें सूत्र केलें आहे त्यावरून येथें भूतपूर्वगति घेतां येते ; म्हणजे दीर्घ करण्याचें पूर्वी ऱ्हस्वान्त होतें तें गृहीत धरून अग्नीनाम् येथें दीर्घ झाल्यानंतरही प्रकृत सूत्राची प्रवृत्ति होते[६].

अथवा ' मतौ ह्रस्वात् ' असें या सूत्रांत म्हणावें असा वार्तिककारांचा अभिप्राय समजूं नये. तर ' नामन्यतरस्याम् ' येथें मतौ ह्रस्वात् या पदांची अनुवृत्ति आणावी असा समजावा.

( सू. १८२ ) येथें सौ हें प्रथमा एकवचनाचें ग्रहण केलें आहे किंवा सप्तमी बहुवचनाचें ग्रहण केले आहे ?

पण असा संशय येण्याचें कारण काय ?

प्रथमा एकवचन सु शब्द व सप्तमी बहुवचन सु शब्द यांच्या सप्तम्यन्ताचें सौ असें सारखेंच रूप होतें म्हणून संशय येतो.

पण पूर्वी ( ६।१।१६८ ) येथें असाच संशय घेऊन सौ हें सप्तमी बहुवचनाचें ग्रहण आहे असा निर्णय केला आहे. त्याप्रमाणें येथेंही

---

६. तात्पर्य, भूतपूर्वगतीनें काम भागत असल्यामुळें वार्तिककारांनीं जें ' ह्या सूत्रामध्यें मतौ ऱ्हस्वात् असें म्हणावें ' असें सांगितलें आहे तें बरोबर नाहीं.

७. अनुवृत्त आलेलें मतुप् हें पद सप्तम्यन्त कल्पून त्याचा ऱ्हस्वाकडे संबंध केला म्हणजे सर्व साधेल.

१. ( सू. १७८ ) वेदामध्यें ङी-प्रत्ययान्ताच्या पुढील नाम् प्रत्ययाला बाहुल्येकरून उदात्त होतो.

१. ( सू. १७९ ) षट्-संज्ञक शब्द, त्रि शब्द, आणि चतुर् शब्द यांच्या पुढील हलादि विभक्ति उदात्त होते. उदा० - षण्णाम्, षड्भिः.

१. ( सू. १८० ) षट्-संज्ञक शब्द, त्रि शब्द, आणि चतुर् शब्द यांच्या पुढें झलादि विभक्ति आली असतां त्या पदांमध्यें कमींत कमी तीन अच् असतील तर त्यांतील शेवटच्या अचाच्या मागील अच् वेदामध्यें उदात्त होतो. उदा० पञ्चभिः.

१. ( सू. १८१ ) पूर्व सूत्रानें सांगितलेला उदात्त भाषेमध्यें विकल्पानें होतो. उदा० पञ्चभिः : पञ्चभिः,

१. ( सू. १८२ ) गो शब्द, श्वन् शब्द, प्रथमा एकवचन सु प्रत्यय पुढें असतांना अवर्णान्त असलेले शब्द आणि राज्, अञ्च्, क्रुञ्च्, व कृत् हे क्विप्-प्रत्ययान्त शब्द यांच्या पुढील प्रत्ययाला ' सावेकाच० ' ( ६।१।१६८ ) इत्यादि सूत्रांनीं सांगितलेले स्वर होत नाहींत.

इहापि तदेव भवितुमर्हति ॥ यदि सप्तमीबहुवचनस्य ग्रहणं ताभ्यां ब्राह्मणाभ्याम् याभ्यां ब्राह्मणाभ्याम् अत्र न प्राप्नोति। विधिरप्यत्र न सिध्यति । किं कारणम् । न ह्येतद्भवति यत्सौ रूपम् । इह तर्हि तेभ्यो ब्राह्मणेभ्यः येभ्यो ब्राह्मणेभ्यः विधिश्च सिद्धो भवति प्रतिषेधस्तु न प्राप्नोति ॥ अस्ति पुनः किंचित्सप्तमीबहुवचनस्य ग्रहणे सतीष्टं संगृहीतं भवत्याहोस्विद्दोषान्तमेव। अस्तीत्याह । इह याभ्यो ब्राह्मणीभ्यः ताभ्यो ब्राह्मणीभ्य इति विधिश्च सिद्धो भवति प्रतिषेधश्च ॥ अस्तु तर्हि प्रथमैकवचनस्य ग्रहणम् । यदि प्रथमैकवचनस्य ग्रहणं तेनेति स्वरः पुंसि न सिध्यति । न चावश्यं पुंस्येव स्त्रियां पुंसि नपुंसके च । तेन ब्राह्मणेन । तया ब्राह्मण्या । तेन कुण्डेनेति । सप्तमीबहुवचनस्यापि ग्रहण एष दोषः । तस्मादुभाभ्यामेव प्रतिषेधे यत्तदोश्च ग्रहणं कर्तव्यम् । न गोश्वन्साववर्णराडङ्कुङ्कृद्भ्यो यत्तदोश्चेति ॥

[ दिवो झल् ॥ ६ । १ । १८३ ॥
नृ चान्यतरस्याम् ॥ ६ । १ । १८४ ॥ ]

---

सप्तमी बहुवचनाचेंच ग्रहण होईल.

जर सौ हें सप्तमी बहुवचनाचें ग्रहण समजलें तर ताभ्यां ब्राह्मणाभ्याम् याभ्यां ब्राह्मणाभ्याम् येथें निषेध प्राप्त होत नाहीं.

पण येथें ' सावेकाचः० ' याने उदात्ताची प्राप्तीही येत नाहीं. कारण, तेषु या सप्तमी बहुवचनामध्यें ' ते ' असें जें एकाच् रूप दृष्टीस पडते तें ताभ्याम् येथें नाहीं.

तर मग येभ्यो ब्राह्मणेभ्यः, तेभ्यो ब्राह्मणेभ्यः हीं उदाहरणें घ्या– येथें विधि प्राप्त होत आहे. पण सप्तमी बहुवचनामध्यें अवर्णान्त नसल्यामुळें निषेध मात्र प्राप्त होत नाहीं असा दोष येतो.

पण, काय हो येथें सप्तमी बहुवचनाचें ग्रहण समजलें असतां कांहीं तरी इष्ट स्थळांचा संग्रह होत आहे किंवा फक्त दोषांतच पर्यवसान होत आहे ?

इष्ट स्थळांचा संग्रह होत आहे असें म्हणतो– याभ्यो ब्राह्मणीभ्यः ताभ्यो ब्राह्मणीभ्यः येथें विधीही प्राप्त होत आहे आणि प्रतिषेधही सिद्ध होत आहे.

तर मग येथें सौ हें प्रथमैकवचनाचेंच ग्रहण असूं दे.

पण प्रथमैकवचनाचे ग्रहण समजलें तर पुल्लिंगामध्यें तेन येथे निषेध येत नाहीं. केवळ पुल्लिंगामध्येंच प्रतिषेध येत नाहीं असें नव्हे तर स्त्रीलिंग नपुंसकलिंग यांमध्येंही प्रतिषेध येऊं शकत नाहीं. उदा०– तेन ब्राह्मणेन, तया ब्राह्मण्या, तेन कुण्डेन.

पण सौ हें सप्तमी बहुवचनाचें ग्रहण आहे या पक्षींही हे दोष येत आहेतच. तेव्हां दोन्ही पक्षीं दोष येत असल्यामुळें दोघांनींही ' न गोश्वन् ' येथें यत् व तत् शब्दांचें ग्रहण करावयास पाहिजे. जसें–न गोश्वन्सांववर्णराडङ्कुङ्कृद्भ्यो यत्तदोश्च.

२. कारण, तेषु येथें सप्तमी बहुवचन सु प्रत्यय पुढें असतांना अवर्णान्त शब्दस्वरूप नाहीं. ताभ्यां हें पुल्लिंगाचें रूप आहे हें समजण्याकरितां पुढें ब्राह्मणाभ्याम् हें पद ठेवलें आहे.

३. यासु येथें जसें एकाच् रूप आहे तसेंच याभ्यः येथें आहे आणि यासु येथें जसें अवर्णान्त शब्दस्वरूप विभक्तीचे मागें आहे तसेंच याभ्यः येथें आहे.

४. येभ्यः इत्यादि ठिकाणीं आलेला दोष जाण्याकरितां.

५. कारण सः या प्रथमा एकवचनामध्यें जसें अवर्णान्त रूप स हें आहे तसें येथे नाहीं.

१. (सू. १८३) दिव् शब्दाच्या पुढील झलादि विभक्ति उदात्त होत नाहीं. उदा०–द्युभ्याम्.

१. ( सू. १८४ ) नृ शब्दाच्या पुढील झलादि विभक्ति विकल्पानें उदात्त होत नाहीं. उदा०-नृभ्याम् नृभ्याम्.

## [1]तित्स्वरितम् ॥ ६ । १ । १८५ ॥

### तिति प्रत्ययग्रहणम् ॥ १ ॥

तिति प्रत्ययग्रहणं कर्तव्यम् । इह मा भूत् । ऋत इद्धातोः [ ७. १. १०० ] किरति गिरति ॥ तर्त्तर्हि वक्तव्यम् । न वक्तव्यम् । नैष तकारः । कस्तर्हि । दकारः । यदि दकार आन्तर्यतो दीर्घस्य दीर्घः प्राप्नोति । भाव्यमानेन सवर्णानां ग्रहणं नेत्येवं न भविष्यति ॥ यदि भाव्यमानेन सवर्णानां ग्रहणं नेत्युच्यतेऽदसोऽसेर्दादु दो मः [ ८. २. ८० ] अमूभ्यामित्यत्र न प्राप्नोति । एवं तर्ह्याचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयति भवत्युकारेण भाव्यमानेन सवर्णानां ग्रहणमिति यदयं दिव उत् [ ६. १. १३१ ] इत्युकारं तपरं करोति ॥ एवमर्थमेव तर्हि प्रत्ययग्रहणं कर्तव्यमत्र मा भूदिति । नैष तकारः । कस्तर्हि । दकारः । यदि दकारो न ज्ञापकं भवति । एवं तर्हि तपरस्तत्कालस्य [ १. १. ७० ] इति दकारोऽपि चर्त्वभूतो निर्दिश्यते । यद्येवं चर्त्वस्यासिद्धत्वाद्धशि

---

( सू. १८५ वा. १ ) ह्या सूत्रामध्यें प्रत्यय शब्दाचें ग्रहण करावें. कारण ' ऋत इद्धातोः ' (७।१।१००) यानें सांगितलेला जो इत् आदेश त्याला किरति गिरति येथें स्वरित न झाला पाहिजे.

तर मग प्रत्ययग्रहण करावयास पाहिजे.

करावयास नको. कारण किरति इत्यादि स्थलीं ऋत इद्धातोः यानें जो आदेश होत आहे त्यामध्यें तकार नाहीं; तेथें इद् असा दकार आहे.

पण जर इद् असा दकार असेल तर किरति इत्यादि स्थलीं आन्तर्यामुळें दीर्घ ॠकाराला दीर्घ ईकार आदेश होऊं लागेल.

' विधीयमानानें सवर्णांचें ग्रहण करावयाचें नाहीं ' अशी परिभाषा असल्यामुळें किरति इत्यादि स्थलीं दीर्घ होणार नाहीं.

पण जर विधीयमानानें सवर्णांचें ग्रहण केलें जाणार नाहीं तर अमूभ्याम् इत्यादि स्थलीं 'अदसोऽसेर्दादु दो मः ' यानें दीर्घ ऊकार आदेश होणार नाहीं.

असें आहे तर मग ज्याअर्थी हे आचार्य 'दिव उत्' ( ६।१।१३१ ) येथें उकाराच्या पुढें तकार लावीत आहेत त्याअर्थी विधीयमान अशाही उकारानें सवर्णांचें ग्रहण केलें जातें असें ते सुचवीत आहेत[3].

तर मग ' दिव उत् ' यानें केलेल्या उकाराला स्वरित न व्हावा म्हणून ' तितिप्रत्ययग्रहणम् ' हें वचन केलें पाहिजे.

येथेंही उत् असा उकाराच्या पुढें तकार लावला नाहीं तर उद् असा उकाराच्या पुढें दकार लावला आहे.

पण जर उकाराच्या पुढें दकार असेल तर तो ज्ञापक होणार नाहीं.

तर मग ' तपरस्तत्कालस्य ' येथें चर्त्वानें दकाराचाही प्रश्लेष करावयाचा. म्हणजे 'तपरस्तत्कालस्य ' असें दकाराला चर्त्वानें तकार करून तकारद्वयघटित सूत्र समजावें.

---

१. ( सू. १८५ ) तकार इत्संज्ञक ज्याला आहे अशा प्रत्ययाला स्वरित होतो. उदा०– कार्यम् .

२. इत् असा तकार मानला म्हणजे ' तपरस्तत्कालस्य ' ( १।१।७० ) या सूत्रानें दीर्घाचें ग्रहण होत नाहीं.

३. नाहीं तर ' विधीयमानानें सवर्णांचें ग्रहण होत नाहीं ' या परिभाषेनेंच काम भागत असल्यामुळें तपरकरण व्यर्थ होणार आहे.

४. तेव्हां 'दिव उद्' असा दकार मानला तरी तेथें तपरसूत्र प्रवृत्त होत असल्यामुळें ज्ञापक जमेल.

च [ ६. १. ११४ ] इत्युत्त्वं प्राप्नोति । सौत्रो निर्देशः । अथवासंहितया निर्देशः करिष्यते । अणुदित्सवर्णस्य चाप्रत्ययः त्तपरस्तत्कालस्येति ॥

## तास्यनुदात्तेन्ङिददुपदेशाल्लसार्वधातुकमनुदात्तमह्न्विङोः ॥ ६ । १ । १८६ ॥

अदुपदेशादिति कथमिदं विज्ञायते । अकारो य उपदेश इति । आहोस्विदकारान्तं यदुपदेश इति । किं चातः । यदि विज्ञायतेऽकारो य उपदेश इति हतः हथ इत्यत्रापि प्राप्नोति । अथ विज्ञायते ऽकारान्तं यदुपदेश इति न दोषो भवति । ननु चाकारान्तं यदुपदेश इत्यपि विज्ञायमानेऽत्रापि प्राप्नोति । एतदपि हि व्यपदेशिवद्भावेनाकारान्तं भवत्युपदेशे । अर्थवता व्यपदेशिवद्भावः । यदि तर्ह्यकारान्तं यदुपदेश इति विज्ञायते मा हि धुक्षाताम् मा हि

---

जर चर्त्वानें दकारही निर्दिष्ट आहे तर मग उत्व प्राप्त होत असल्यामुळें[5] संहितापाठपक्षीं 'अणुदित्सवर्णस्य चाप्रत्ययो त्तपरस्तत्कालस्य' असा संधि होऊं लागेल.

सौत्रत्वास्तव तसा संधि होत नाहीं. किंवा संहितेची अविवक्षा करून प्रत्येक सूत्राचा निरनिराळा पाठ समजावा. तो असा—अणुदित्सवर्णस्य चाप्रत्ययः त्तपरस्तत्कालस्य.

( सू. १८६ ) अदुपदेशात् याचा अर्थ उपदेशीं जो अकार असा आहे किंवा उपदेशीं जें अकारान्त असा आहे ?

मग या दोहोंमध्यें काय बरें फरक आहे ?

जर उपदेशीं जो अकार असा अर्थ समजला तर हतः हथः येथेंही ल-सार्वधातुकाला अनुदात्त होऊं लागेल[2]. आतां उपदेशीं जें अकारान्त असा अर्थ समजला तर मात्र हा दोष येत नाहीं.

पण उपदेशीं जें अकारान्त असा पक्ष घेतला तरीही हतःइत्यादि स्थळीं प्रकृत सूत्रानें अनुदात्त प्राप्त होत आहेच. कारण हतः येथे हन् धातूमधील जो अकार तोच व्यपदेशिवद्भावानें अकारान्त म्हणतां येतो.

वर्ण अर्थवान् असेल तरच त्या ठिकाणीं व्यपदेशिवद्भाव होत असतो.

आता जर उपदेशीं अकारान्त असा अर्थ समजला तर 'मा हि धुक्षाताम्', 'मा हि धुक्षाथाम्' येथेंही ल-सार्वधातुकाला अनुदात्त प्राप्त होत आहे[4].

येथें आताम् अथवा आथाम् या सार्वधातु-

---

५. दकार झश् असल्यामुळें मागील 'रू'ला उत्व ( ६।१।११४ ) होईल.

१. (सू. १८६) तास् प्रत्यय (३।१।३३ अनुदात्तेत्संज्ञक धातु, ह्नुङ् व इङ् हे सोडून बाकीचे ङकारइत्संज्ञक धातू आणि उपदेशी ऱ्हस्व अकारान्त शब्दस्वरूप यांच्या पुढील लकाराला झालेला सार्वधातुक प्रत्यय ( ३।४।११३ ) अनुदात्त होतो. उदा०—कर्ता.

२. आचार्यांनीं धातुपाठामध्यें जो धातूचा उपदेश केला आहे तेथें हन् एवढ्याचा उपदेश करण्याविषयीं आचार्यांचें तात्पर्य आहे. तरी पण त्यामध्यें त्या वेळींच ऱ्हस्व अकार असल्यामुळें हा उपदेशीं अकार आहे.

३. जसें तुदतः व पचतः येथें श (३।१।७७) व शप् ( ६।१।६८ ) या प्रत्ययांचा नुसता अकार आहे पण त्याला व्यपदेशिवद्भावानें अकारान्त म्हणतां येतें तसें.

४. येथें दुह् धातूहून लुङ्, आताम् प्रत्यय, च्लि प्रत्ययाला क्स आदेश ( ३।१।४५ ) व त्याच्या अकाराचा लोप (७।३।७२) हीं कार्यें झाली आहेत. उपदेशीं अकार असा अर्थ घेतला असतां येथें लोप झाल्यानंतर अकारच नसल्यामुळें प्रकृत सूत्रानें अनुदात्त होत नाहीं. उपदेशीं अकारान्त असा अर्थ घेतला तर मात्र येथें अनुदात्त होऊं लागेल. कारण अकाराचा लोप झाल्यानंतर जरी नुसता सकारच प्रत्ययापैकीं उरला असला तरी तो प्रत्यय उपदेशीं अकारान्त आहे.

मुक्षाथाम् अत्रापि प्राप्नोति । अस्तु । अनुदात्तत्वे कृते लोप उदात्तनिवृत्तिस्वरेण सिद्धम् । न सिध्यति । इदमिह संप्रधार्यम् । अनुदात्तत्वं क्रियतां लोप इति । किमत्र कर्तव्यम् । परत्वाल्लोपः । एवं तर्हीदमद्य लसार्वधातुकानुदात्तत्वं प्रत्ययस्वरस्यापवादः । न चापवादविषय उत्सर्गोऽभिनिविशते । पूर्वं ह्यपवादा अभिनिविशन्ते पश्चादुत्सर्गाः । प्रकल्प्य वापवादविषयं तत उत्सर्गोऽभिनिविशते । तन्न तावदत्र कदाचित्प्रत्ययस्वरो भवत्यपवादं लसार्वधातुकानुदात्तत्वं प्रतीक्षते । तत्रानुदात्तत्वं क्रियतां लोप इति किमत्र कर्तव्यम् । परत्वाल्लोपः । यद्यपि परत्वाल्लोपः सोऽसावविद्यमानोदात्तेऽनुदात्त उदात्तो लुप्यते ॥

## तास्यादिभ्योऽनुदात्तत्वे सप्तमीनिर्देशोऽभ्यस्तसिजर्थः ॥ १ ॥

तास्यादिभ्यो ऽनुदात्तत्वे सप्तमीनिर्देशः कर्तव्यः । लसार्वधातुक इति वक्तव्यम् । किं प्रयोजनम् । अभ्यस्तसिजर्थः । अभ्यस्तानामादिरुदात्तो भवति लसार्वधातुके । सिजन्तस्यादिरुदात्तो भवति लसार्वधातुके । लसार्वधातुकमित्युच्यमाने तस्यैवाद्युदात्तत्वं स्यात् ॥ यदि सप्तमीनिर्देशः क्रियते तास्या-

---

क प्रत्ययाला अनुदात्त होऊं दे. लोपाच्या अगोदर अनुदात्त करून नंतर 'कसस्याचि' यानें अकाराचा लोप केला असतां उदात्तनिवृत्तिस्वरानें (६।१।१६१) इष्ट स्वर साधेल.

तसें साधत नाहीं. कारण येथें असा विचार उत्पन्न होतो कीं प्रथमत: अनुदात्त करावा किंवा लोप करावा ?

मग यांत काय बरें अगोदर करावें ?

पर असल्यामुळें लोप अगोदर करावा.

तर मग आतां येथें असें समजावें कीं हा लसार्वधातुकानुदात्त स्वर प्रत्यय-स्वराचा अपवाद आहे; आणि अपवादाच्या विषयांत तर उत्सर्ग प्रवृत्त होऊं शकत नाहीं. कारण, प्रथमतः अपवाद मनांत उपस्थित होतात आणि मागून उत्सर्ग उपस्थित होतात. तेव्हां 'अपवाद-विषय वगळूनच उत्सर्ग प्रवृत्त होतो'. म्हणून अनुदात्त अशा ह्या अपवादाचा विषय असल्यामुळें येथें प्रत्ययाद्युदात्तस्वर मुळीं प्रवृत्तच होत नाहीं; तर अपवाद अशा ह्या ल-सार्वधातुकानुदात्त स्वराची वाट पहात तो थांबतच राहतो. अशा स्थितींत हा अनुदात्त अगोदर करावा किंवा लोप करावा असा विचार उत्पन्न झाला असतां जरी पर असल्यामुळें प्रथमतः लोप झाला तरी तो उदात्त न झालेला असाच प्रत्यय पुढें असतांना झाल्यामुळें तशा दृष्टीनें तो अनुदात्त पुढें असतांनाच उदात्ताचा लोप होत आहे.[५]

(वा. १) तासि वगैरेंच्या पुढील ल-सार्वधातुकाला हा जो अनुदात्त सांगितला आहे तेथें 'लसार्वधातुके' असा सप्तमीनिर्देश करण्यांत यावा.

कशाकरितां ?

अशाकरितां कीं— लसार्वधातुक पुढें असतांना अभ्यस्ताचा ( ६।१।१८९ ) व सिजन्ताचा ( ६।१।१८७ ) आदि उदात्त व्हावा म्हणून. जर येथें लसार्वधातुकम् असें म्हटलें तर तशीच पुढें अनुवृत्ति होत असल्यामुळें सिच् आणि अभ्यस्त यांच्या पुढील लसार्वधातुकाचा आदि उदात्त होईल.

पण पुढील सूत्राकरितां येथें जर सप्तमीनिर्देश केला तर लसार्वधातुक पुढें असतांना तासि

---

५. तेव्हां अर्थातच उदात्तनिवृत्ति-स्वरानें ( ६।१।१६१ ) काम भागेल.

दीनामेवानुदात्तत्वं प्राप्नोति । नैष दोषः । तास्यादिभ्य इत्येषा पञ्चमी लसार्वधातुक इति सप्तम्याः षष्ठीं प्रकल्पयिष्यति तस्मादित्युत्तरस्य [ १. १. ६७ ] इति ॥

**चित्स्वरात्तास्यादिभ्योऽनुदात्तत्वं विप्रतिषेधेन ॥ २ ॥**

चित्स्वरात्तास्यादिभ्योऽनुदात्तत्वं भवति विप्रतिषेधेन । चित्स्वरस्यावकाशः । चलनः चोपनः । तास्यादिभ्योऽनुदात्तत्वस्यावकाशः । आस्ते शेते । इहोभयं प्राप्नोति । आसीनः शयानः । तास्यादिभ्योऽनुदात्तत्वं भवति विप्रतिषेधेन ॥ नैष युक्तो विप्रतिषेधः । किं कारणम् । द्विकार्ययोगो हि विप्रतिषेधो न चात्रैको द्विकार्ययुक्तः । आदेरनुदात्तत्वमन्तस्योदात्तत्वम् । नावश्यं द्विकार्ययोग एव विप्रतिषेधः । किं तर्हि । असंभवोऽपि । ननु चात्राप्यस्ति संभवः । आदेरनुदात्तत्वमन्तस्य चोदात्तत्वमिति । अस्ति च संभवो यदुभयं स्यात् । नैषोऽस्ति संभवः । कथम् । वक्ष्यत्येतत्स्वरविधौ संघातः कार्यी भवतीति ॥

**मुकश्चोपसंख्यानम् ॥ ३ ॥**

मुकश्चोपसंख्यानं कर्तव्यम् । पचमानः यजमानः । मुका व्यवहितत्वाददुपदेशाल्ल-

---

वगैरेंनाच अनुदात्त स्वर होऊं लागेल.

हा दोष येत नाहीं. कारण तास्यादिभ्यः ही पंचमी लसार्वधातुके या सप्तमीच्या ऐवजीं 'तस्मादित्युत्तरस्य' या परिभाषेच्या जोरावर षष्ठीची कल्पना करील.

(वा. २) तासि वगैरेंच्या पुढील ल-सार्वधातुक प्रत्ययाला जो प्रकृत सूत्रानें अनुदात्त सांगितला आहे तो चित्स्वरापेक्षां विप्रतिषेधानें परत्वास्तव होतो. 'चितः' ( ६।१।१६३ ) या स्वराला चलनः[६] चोपनः येथें अवकाश आहे. तासि वगैरेंच्या पुढील लसार्वधातुकानुदात्ताला आस्ते[७] शेते येथें अवकाश आहे. आणि आसीनः[८] शयानः येथें दोहोंची प्राप्ति आली असतां विरोध असल्यामुळें परत्वास्तव लसार्वधातुकानुदात्तस्वर होतो.

हा विप्रतिषेध बरोबर दिसत नाहीं. कारण विरुद्ध अशा दोन कार्यांचा एकाला संबंध येणें हा विप्रतिषेध होय. आणि प्रकृत उदाहरणामध्यें तर एकाला दोन कार्यांचा संबंध पोंचत नाहीं. कारण, 'आन' यांतील पहिल्या आकाराला अनुदात्त आणि शेवटल्या अकाराला उदात्त असा निरनिराळ्या व्यक्तींना कार्यांचा संबंध आहे.

एकाला दोन कार्यांचा संबंध येणें म्हणजेच विप्रतिषेध असा कांहीं नियम नाहीं. तर एकदम दोन कार्यांचा संभव नसणें यालाही विप्रतिषेध म्हणतात.

पण प्रकृत स्थलीं आदीला अनुदात्त व अन्त्याला उदात्त येत असल्यामुळें एकदम दोन कार्यें होण्याचा संभव आहे. आणि असा संभव असल्यामुळें दोन्हींही कार्यें येथें होतील.

हा युगपत्–संभव संभवत नाहीं. कारण 'स्वरविधीविषयीं ज्याला स्वर सांगितला तो वर्णसंघात त्या स्वराचा कार्यी होय' असें पुढें ( ६।१।१९२ पृ. २३१ पं. १४ ) सांगणार आहे.

( वा. ३ ) मुक् आगमाच्या पुढील लसार्वधातुकाला अनुदात्त होतो असें वचन करावें. उदा०--पचमानः यजमानः. येथें मुक् आगमानें

---

६. चल् धातूहून युच् प्रत्यय ( ३।२।१४८ ) झाला आहे.

७. आस् धातु अनुदात्तेत्संज्ञक आहे; आणि शीङ् हा धातु ङित् आहे.

८. येथें आस् आणि शी या धातूंच्या पुढें लटाचें स्थानीं शानच् प्रत्यय ( ३।२।१२४ ) झाला आहे.

सार्वधातुकमनुदात्तं भवतीत्यनुदात्तत्वं न प्राप्नोति । ननु चायं मुगदुपदेशभक्तो ऽदुपदेशग्रहणेन ग्राहिष्यते । न सिध्यति । अङ्गस्य मुगुच्यते विकरणान्तं चाङ्गं सोऽसौ संघातभक्तो ऽशक्यो मुगदुपदेशग्रहणेन ग्रहीतुम् ॥ अथायमद्भक्तः स्याद् गृह्येतायमदुपदेशग्रहणेन । बाढं गृह्येत । अद्भक्तस्तर्हि भविष्यति । तत्कथम् । वक्ष्यत्येतस्य परिहारम् ॥

**इतश्चोपसंख्यानम् ॥ ४ ॥**

इतश्चोपसंख्यानं कर्तव्यम् । इद्भिश्च व्यवहितत्वादनुदात्तत्वं न प्राप्नोति । पचतः पठतः ॥

**इतश्चानेकान्तत्वात् ॥ ५ ॥**

अनेकान्ता अनुबन्धाः ॥ यद्यनेकान्ता अनुबन्धा अदिप्रभृतिजुहोत्यादिभ्यः प्रतिषेधो वक्तव्यः । अत्तः जुहुत इति । अदुपदेशादित्यनुदात्तत्वं प्राप्नोति ।

**तत्रादिप्रभृतिजुहोत्यादिभ्योऽप्रतिषेधः स्थान्यादेशाभावात् ॥ ६ ॥**

---

( ७।२।८२ ) व्यवधान असल्यामुळें अदुपदेशांच्या पुढील ल-सार्वधातुकाला सांगितलेला अनुदात्त स्वर प्राप्त होत नाहीं.

पण उपदेशीं जो अकार त्याचा हा मुक् आगम अवयव असल्यामुळें अम् एवढा अकारच समजला जाईल.

अशा रीतीनें येथें इष्टसिद्धि होत नाहीं. कारण अंगाला मुक् आगम सांगितला आहे. आणि तें अंग पच यज यांसारखें विकरण-प्रत्ययान्त आहे. तेव्हां हा मुक् आगम समुदायाचा अवयव बनला आहे. त्यामुळें अकारानें याचें ग्रहण होणें शक्य नाहीं.

पण काय हो हा मुक् आगम जर अकाराचाच अवयव झाला असता तर अकारानें याचें ग्रहण झालें असतें काय ?

होय. खासच झालें असतें.

ठीक आहे. तर मग हा मुक् आगम अकाराचाच अवयव होईल.

तो कसा ?

या आक्षेपाचा परिहार पुढें ( ७।२।८२ ) सांगण्यांत येईल.

( वा. ४ ) इत्संज्ञकाच्या पुढीलही लसार्वधातुकाला अनुदात्त होतो असें वचन करावें. कारण इत्संज्ञकांनीं व्यवधान असल्यामुळें ल-सार्वधातुकाला अनुदात्त प्राप्त होत नाहीं. उदा० पचतः पठतः.

( वा. ५ ) इत्संज्ञक वर्ण हे अवयवें नव्हेत.

जर अनुबंध हे अवयव नव्हेत तर अद् वगैरे धातू आणि हु वगैरे धातू यांच्या पुढील ल-सार्वधातुकाला अनुदात्त सांगितला पाहिजे. उदा० अत्तः जुहुतः. येथें शप् हा उपदेशीं अकारान्त असल्यामुळें अनुदात्त प्राप्त होत आहे.

---

९. येथें शप् प्रत्ययाचा अकार हा व्यपदेशिवद्भावानें अकारान्त आहे. परंतु त्याचा उपदेश पाहिला तर शप् ( ३।१।६८ ) असा पकारान्त आहे; अकारान्त नाहीं.

१०. कर्तरि शप् या सूत्रामध्यें अ एवढयाच प्रत्ययाचा उपदेश आहे. शकार व पकार हे फक्त त्याच्या जवळ आहेत. तेव्हां शप् हा उपदेशीं अकारान्त आहे असें सिद्ध होतें.

११. जनें पचावः येथें शपाला दीर्घ झाला तरी शप् हा उपदेशीं ऱ्हस्व-अकारान्त आहे म्हणून पुढील वस् प्रत्ययाला अनुदात्त होतो. तसेंच अत्तः येथें अद् धातूच्या पुढील शपाचा लुक् ( २।४।७२ ) झाला तरी व जुहुतः येथें शपाचा श्लु ( २।४।७५ ) झाला तरी उपदेशीं शप् ऱ्हस्व-अकारान्त आहे म्हणून पुढील प्रत्ययाला अनुदात्त होऊं लागेल.

तत्रादिप्रभृतिभ्यो जुहोत्यादिभ्यो ऽप्रतिषेधः । अनर्थकः प्रतिषेधो ऽप्रतिषेधः । अनुदात्तत्वं कस्मान्न भवति । स्थान्यादेशाभावात् । नैवात्र स्थानिनं नैवादेशं पश्यामः ॥

**अनुदात्तङिद्ग्रहणाद्वा ॥ ७ ॥**

अथवा यदयमनुदात्तङिद्ग्रहणं करोति तज्ज्ञापयत्याचार्यो न लुप्तविकरणेभ्यो ऽनुदात्तत्वं भवतीति ॥ नैतदस्ति ज्ञापकम् । अमर्थमेतत्स्यात् । विन्दाते खिन्दाते । यत्तर्हि ङिद्ग्रहणं करोति न हि श्नम्विकरणो ङिदस्ति ॥

ङितोऽनुदात्तत्वे विकरणेभ्यः प्रतिषेधो वक्तव्यः । चिनुतः सुनुतः । लुनीतः पुनीतः । ङित इत्यनुदात्तत्वं प्राप्नोति ।

**ङितोऽनुदात्तत्वे विकरणेभ्योऽप्रतिषेधः सर्वस्योपदेशविशेषणत्वात् ॥ ८ ॥**

ङितोऽनुदात्तत्वे विकरणेभ्योऽप्रतिषेधः ।

---

( वा. ६ ) अदिप्रभृतींहून किंवा जुहोत्यादिकांहून लसार्वधातुकाला अनुदात्ताचा प्रतिषेध केला पाहिजे असें जें म्हटलें आहे तें निष्फळ आहे.

मग अत्तः वगैरे स्थलीं अनुदात्त कां बरें होत नाहीं ?

तेथें स्थानी तर अस्तित्वांत नाहींच, पण आदेश देखील दृष्टीं पडण्यासारखा नाहीं.[12]

( वा. ७ ) अथवा ज्याअर्थी हे आचार्य अनुदात्तेत् व ङित् यांचें ग्रहण करीत आहेत त्याअर्थी ज्यांच्या विकरणाचा लुक् किंवा श्लु होतो अशा धातूंच्या पुढील लसार्वधातुकाला अनुदात्त होत नाहीं असें ते सुचवीत आहेत.[13]

हें ज्ञापक संभवत नाहीं, कारण श्नम् विकरण होत असेल तेथें लसार्वधातुकाला अनुदात्त होण्याकरितां अनुदात्तेत् व ङित् हे शब्द चरितार्थ होत आहेत. उदा०–विन्दाते,[14] खिन्दाते.

तर मग ङित् ग्रहण केलें आहे तें ज्ञापक होईल. कारण रुधादि गणांतील धातूंहून श्नम् विकरण होतो. पण त्या गणांत ङित् धातूच नाहींत.

ङितोऽनुदात्तत्वे विकरणेभ्यः प्रतिषेधो वक्तव्यः म्हणजे ङकारेत्संज्ञकाहून पुढच्या ल-सार्वधातुक प्रत्ययाला जो हा अनुदात्त सांगितला आहे तो विकरण ङित् झाल्यास करूं नये असा प्रतिषेध करावा. उदा०–चिनुतः लुनीतः. येथें श्नु व श्ना यांना ङित्व ( १।२।४ ) असल्यामुळें त्यांच्या पुढील तस् प्रत्ययाला अनुदात्त प्राप्त होत आहे.

(वा. ८) ङिताहून पुढच्याला सांगितलेला अनुदात्त विकरणाहून पुढच्याला होत नाहीं असा

---

१२. शपाचा लुक् झाल्यानंतर 'उपदेशीं ऱ्हस्व अकारान्त' असें येथें कोणाला समजावयाचें कीं ज्याच्या पुढील प्रत्ययाला अनुदात्त होईल ? येथें तसें कांहींच तुम्हाला दाखवितां येत नाहीं. भावरूपी आदेश असता तर तो उपदेशीं ऱ्हस्व-अकारान्त आहे असें समजून त्याच्या पुढील ल-सार्वधातुक प्रत्ययाला अनुदात्त झाला असता.

१३. कारण, अनुदात्तेत्संज्ञक आणि ङकारेत्संज्ञक धातूंच्या पुढील ल-सार्वधातुक प्रत्ययाला अनुदात्त झाल्याचीं उदाहरणें अदादि गणांतील आणि जुहोत्यादि गणांतील धातूंचींच संभवतात. इतर गणांतील धातु घेतला तर मध्यें विकरण-प्रत्ययानें व्यवधान येतें. तेव्हां तेथें जर उपदेशीं अकारान्त शप् प्रत्यय घेऊन पुढील प्रत्ययाला अनुदात्त होईल तर अर्थातच अनुदात्तेत् आणि ङित् हे सूत्रांतील शब्द व्यर्थ होतील.

१४. विद् व खिद् हे धातू रुधादि गणांत आहेत. यांना श्नम् प्रत्यय विकरण ( ३।१।७८ ) सांगितला आहे. तो धातूच्या पुढें न होतां धातूमधील अचाच्या पुढें होतो. विद् व खिद् हे धातू अनुदात्तेत्संज्ञक आहेत.

अनर्थकः प्रतिषेधोऽप्रतिषेधः । अनुदात्तत्वं कस्मान्न भवति । सर्वस्योपदेशविशेषणत्वात् । सर्वमुपदेशग्रहणेन विशेषयिष्यामः । उपदेशेऽनुदात्तेतः । उपदेशे ङितः । उपदेशेऽकारान्तादिति ॥

## आदिः सिचोऽन्यतरस्याम् ॥ ६ । १ । १८७ ॥

**सिच आद्युदात्तत्वेऽनिटः पित उपसंख्यानम् ॥ १ ॥**

सिच आद्युदात्तत्वे ऽनिटः पित उपसंख्यानं कर्तव्यम् । मा हि कार्षम् । मा हि कार्षम् । अनिट इति किमर्थम् । मा हि लाविषम् ॥

## स्वपादिर्हिंसामच्यनिटि ॥ ६ । १ । १८८ ॥

**स्वपादीनां वावचनादभ्यस्तस्वरो विप्रतिषेधेन ॥ १ ॥**

स्वपादीनां वावचनादभ्यस्तस्वरो भवति विप्रतिषेधेन । स्वपादीनां वावचनस्यावकाशः । स्वपन्ति श्वसन्ति । अभ्यस्तस्वरस्या-

---

प्रतिषेध केला तो अनर्थक आहे.

तर चिनुतः वगैरे स्थलीं पुढील प्रत्ययाला अनुदात्त कां बरें होत नाहीं ?

अनुदात्तेत् ङित् व अकार या सर्वांना ' उपदेशे '[१५] हें विशेषण द्यावयाचें. तें असें--उपदेशीं जो अनुदात्तेत् त्याहून, उपदेशीं जो ङित् त्याहून, आणि उपदेशीं जें अकारान्त त्याहून.

( सू. १८७ वा. १ ) सिच्-प्रत्ययान्ताला जो हा आद्युदात्त सांगितला आहे त्याच्या उदाहरणामध्यें सिचाला इट् आगम न होतां जर त्याच्या पुढें पित् प्रत्यय असेल तर त्याला एकदां अनुदात्त होतो असें वचन करावें. उदा०– मा हि कार्षम्[२], मा हि कार्षम्.

येथें अनिटः असें कशाकरितां म्हटलें आहे ?

मा हि लाविषम् येथें सिचाला इट् आगम झाला असल्यामुळें पुढील पित् प्रत्ययाला उदात्त न झाला पाहिजे याकरितां.

( सू. १८८ वा. १ ) स्वपादिकांना सांगितलेला जो वैकल्पिक आद्युदात्त त्यापेक्षां विप्रतिषेध असल्यामुळें परत्वास्तव ' अभ्यस्तानामादिः ' (६।१।१८९) हा स्वर होतो. ' स्वपादि० ' या वैकल्पिक वचनाला स्वपन्ति श्वसन्ति येथें अव-

---

१५. श्नु व श्ना या प्रत्ययांना उपदेशामध्यें ङकार लावलेला नाहीं. पण ते प्रत्यय अतिदेशानें (१।२।४) ङित् समजले जातात.

१. ( सू. १८७ ) सिच्-प्रत्ययान्ताचा आदि विकल्पानें उदात्त होतो ल-सार्वधातुक पुढें असतांना.

२. कृ धातूहून लुङ्, उत्तमपुरुष एकवचन मिप्, व त्याला अम् आदेश ( ३।४।१०१ ) झाला आहे; च्लि, त्याला सिच् आणि ऋकाराला वृद्धि (७।२।१) अशीं कार्यें झालीं आहेत. त्या वृद्धीनें झालेल्या आकाराला प्रकृत सूत्रानें उदात्त झाला आहे; आणि तो जेव्हां होत नाहीं त्या वेळीं ह्या वार्तिकानें अम् प्रत्ययाला उदात्त झाला आहे; मात्र ह्याचा योग असल्यामुळें अट् आगम होत नाहीं (६।४।७४). नाहीं तर अट् आगम उदात्त (६।४।७१) होत असल्यामुळें बाकीचे सर्व अच् शेषनिघातानें अनुदात्त झाले असते. तेव्हां प्रकृत सूत्राचें व अट् आगम लागल्यास अकार्षम् हें वार्तिकाचें उदाहरण संभवणार नाहीं. हि हें अव्यय लाविलें असल्यामुळें क्रियापदाला निघात ( ८।१।२८ ) झाला नाहीं. ( ८।१।३४ ) निघात झाला असता तरीहि उदाहरण संभवलें नसतें.

१. ( सू. १८८ ) अदादि गणांतील स्वप् धातूपासून पुढील धातू आणि हिंस् धातु यांचा आदि अच् विकल्पानें उदात्त होतो, इट् आगम न झालेला अजादि लसार्वधातुक प्रत्यय पुढें असतांना. उदा०-स्वपन्ति.

वकाशः । ददति दधति । इहोभयं प्राप्नोति । जाग्रति । अभ्यस्तस्वरो भवति विप्रतिषेधेन ॥

[ अभ्यस्तानामादिः ॥ ६ । १ । १८९ ॥ ]

अनुदात्ते च ॥ ६ । १ । १९० ॥

अनुदात्ते चेति बहुव्रीहिनिर्देशो लोपयणादेशार्थः ॥ १ ॥

अनुदात्ते चेति बहुव्रीहिनिर्देशः कर्तव्यः । अविद्यमानोदात्तेऽनुदात्त इति वक्तव्यम् । किं प्रयोजनम् । लोपयणादेशार्थम् । लोपयणादेशयोः कृतयोराद्युदात्तत्वं यथा स्यात् । मा हि स्म दधात् । दधात्यत्र ॥

सर्वस्य सुपि ॥ ६ । १ । १९१ ॥

सर्वस्वरोऽनकच्कस्य ॥ १ ॥

सर्वस्वरोऽनकच्कस्येति वक्तव्यम् । इह मा भूत् । सर्वके ॥

भीह्रीभृहुमदजनधनदरिद्राजागरां प्रत्ययात्पूर्वं पिति ॥ ६ । १ । १९२ ॥

भ्यादिग्रहणं किमर्थम् । इह मा भूत् । ददाति ॥ नैतदस्ति प्रयोजनम् । अभ्यस्तस्वरो ऽत्र बाधको भविष्यति ॥ अन्तत उभयं स्यात् । अनवकाशाः खल्वपि विधयो बाधका भवन्ति सावकाशश्चाभ्यस्तस्वरः ।

---

काश आहे; व अभ्यस्तस्वराला ददति दधति येथें अवकाश आहे. पण जाग्रति[2] येथें दोहोंची प्राप्ति आली असतां विप्रतिषेधानें अभ्यस्तस्वर होतो.

(सू. १९० वा. १) 'अनुदात्ते' हा अविद्यमानः उदात्तः यत्र, म्हणजे नाहीं उदात्त ज्यामध्यें असा बहुव्रीहि-निर्देश केला आहे असें सांगावें.

काय कारण ?

कारण असें कीं—लोप व यणादेश केले असतां आद्युदात्त व्हावा म्हणून. उदा०—मा हि स्म दधात्[2]; दधात्यत्र.

( सू. १९१ वा. १ ) सुप् प्रत्यय पुढें असतांना ' सर्व ' या शब्दाला सांगितलेला हा आद्युदात्त स्वर अकच्रहित अशा 'सर्व' शब्दाला होतो असें वचन करावें. कारण, अकच्सहित 'सर्व' शब्दाला आद्युदात्त न व्हावा. उदा०-सर्वके.

( सू. १९२ ) येथें जें भी, ह्री वगैरे नऊ धातूंचें ग्रहण केलें आहे तें कशाकरितां ?

ददाति येथें पित् प्रत्ययाहून पूर्वीला उदात्त न व्हावा म्हणून तें केलें आहे.

हें प्रयोजन नाहीं. कारण येथें अभ्यस्त स्वर बाधक होईल.

पण वास्तविक विचार केला तर पर्यायानें दोन्ही होतील. शिवाय जे विधी अनवकाश असतात ते बाधक होतात. आणि अभ्यस्त स्वर

---

२. तेव्हां जाग्रति येथें नित्य आद्युदात्त होतो. येथे अभ्यस्तसंज्ञा ( ६।१।६ ) जागृ धातूला आहे.

१. ( सू. १८९ ) इट् आगम न झालेला अजादि लसार्वधातुक प्रत्यय पुढें असतांना अभ्यस्ताचा आदि उदात्त होतो. उदा०—ददति.

१. ( सू. १९० ) ज्यामध्यें उदात्त नाहीं असा ल-सार्वधातुक प्रत्यय पुढें असतांना अभ्यस्ताचा आदि उदात्त होतो. उदा० ददाति. अनुदात्त शब्दाचा अर्थ 'ज्यामध्यें उदात्त नाहीं' असा केला आहे, त्यामुळें ददात्यत्र येथें यण् झाल्यानंतर त्या सार्वधातुक प्रत्ययामध्यें अनुदात्त इकार नसतांनाही प्रकृत सूत्राची प्रवृत्ति होते.

२. धा धातूहून लङ्, प्रथमपुरुष एकवचन तिप्, व त्यांतील इकाराचा लोप (३।४।१००) हीं कार्यें झाली आहेत. इकार हा अच् अनुदात्त आहे; परंतु त्याचा लोप झाल्यानंतर नुसत्या तकाराला अनुदात्त म्हणतां येत नाहीं. तसेंच यण् झाल्यानंतर त्य् या संयोगाला अनुदात्त म्हणतां येत नाहीं. बहुव्रीहि घेतला म्हणजे मात्र त्या अर्थानें तसें म्हणतां येतें.

१. ( सू. १९१ ) सुप् प्रत्यय पुढें असतांना सर्व शब्दाला आदि उदात्त असा स्वर होतो. उदा० सर्वः.

१. ( सू. १९२ ) भी, ह्री, भृ, हु, मद्, जन्, धन्, दरिद्रा, आणि जागृ या अभ्यस्तसंज्ञक धातूंच्या पुढें पित् लसार्वधातुक प्रत्यय आला असतां त्या प्रत्ययाच्या पूर्वीचा वर्ण उदात्त होतो. उदा०- बिभेति.

कोऽवकाशः । मिमीते ॥

अथ प्रत्ययग्रहणं किमर्थम् । प्रत्ययात्पूर्वस्योदात्तत्वं यथा स्यादाटः पूर्वस्य मा भूदिति । बिभयानि ॥ न चैवास्ति विशेषः प्रत्ययाद्वा पूर्वस्योदात्तत्वे सत्याटो वा । अपि च पिद्भक्तः पिद्ग्रहणेन ग्राहिष्यते ॥ इदं तर्हि प्रयोजनं प्रत्ययात्पूर्वस्योदात्तत्वं यथा स्यादाट एव मा भूदिति ॥ एतदपि नास्ति प्रयोजनम् । पिद्भक्तः पिद्ग्रहणेन ग्राहिष्यते ॥ एवं तर्हि सिद्धे सति यत्प्रत्ययग्रहणं करोति तज्ज्ञापयत्याचार्यः स्वरविधौ संघातः कार्यो भवतीति । किमेतस्य ज्ञापने प्रयोजनम् । चित्स्वरात्तास्यादिभ्योऽनुदात्तत्वं विप्रतिषेधेनेत्युक्तं तदुपपन्नं भवति ॥

---

तर सावकाश आहे.

कोणता अवकाश त्याला आहे ?

मिमीते[२] हा अवकाश होय.

आतां येथें प्रत्ययग्रहण कशाकरितां बरें केलें आहे ?

प्रत्ययाहून पूर्वीच्याला उदात्त व्हावा व आट् आगमाहून पूर्वीच्याला न व्हावा म्हणून प्रत्यय शब्द घातला आहे. उदा०—बिभयानि.[३]

पण येथें प्रत्ययाहून पूर्वाला उदात्त झाला काय, आणि आट् आगमाहून पूर्वाला झाला काय, यांत कांहीं विशेष नाहीं.[४] शिवाय पित् प्रत्ययाचा अवयव झालेला आट् आगम पित् प्रत्ययामध्येंच समाविष्ट होईल.[५]

तर मग प्रत्ययाहून पूर्वालाच उदात्त व्हावा आणि आटाला न व्हावा हें प्रत्ययग्रहणाचें प्रयोजन समजावें.

हेंही प्रयोजन नाहीं. कारण पित् प्रत्ययाचा अवयव झालेला आट् आगम पित् प्रत्ययामध्येंच समाविष्ट होईल.[६]

तेव्हां प्रत्यय ग्रहणावांचून सर्व काम भागत असतां ज्याअर्थी आचार्य प्रत्यय ग्रहण करीत आहेत त्याअर्थी ' स्वरविधीविषयीं संघात कार्यी असतो ' असें ते ज्ञापन करीत आहेत.[७]

या ज्ञापनाचा काय बरें उपयोग ?

' तास्यनुदात्तेत्० ' हा स्वर विप्रतिषेधानें चित्स्वरापेक्षां पूर्वी होतो असें जें मागें ( ६।१।१८६ वा. २ ) सांगितलें आहे तेथील विप्रतिषेध हा ह्या ज्ञापनामुळें जमतो हा ह्या ज्ञापनाचा उपयोग होय.

---

२. येथें त हा प्रत्यय पित् नसल्यामुळें प्रकृत सूत्राची प्राप्ति येत नाहीं.

३. आट् आगमाला स्वतंत्र पित्त्व सांगितलें असल्यामुळें त्या पित् अशा आट् आगमाहून पूर्वीच्याला ( उदात्त ) होईल असें येथें म्हटलें आहे.

४. कारण, बिभयानि येथें जो आटाहून पूर्वी आहे तोच प्रत्ययाहून पूर्वी आहे. आट् हा प्रत्ययाचा अवयव होत असल्यामुळें येथें आनि एवढा प्रत्यय होत आहे.

५. तेव्हां पित् या शब्दानें नुसता आट् आगम घेतला तोही बरोबर नाहीं. आडुत्तमस्य ( ३।४।९२ ) यानें पित्त्व प्रत्ययालाच सांगितलें आहे; आट् आगमाला सांगितलें नाहीं.

६. तेव्हां अर्थातच आट् आगम हा पिताच्या पूर्वी आहे असें म्हणतां येणार नाहीं.

७. हें ज्ञापन घेतलें म्हणजे प्रकृत सूत्रांतील पूर्व शब्दानें बिभ हा समुदाय घेतला जाईल आणि त्यांतील दोन अचांना पर्यायानें उदात्त होऊं लागेल. याकरितां येथें सूत्रांत प्रत्ययग्रहण केलें पाहिजे. तें केलें म्हणजे 'प्रत्ययग्रहण करणें ' या अधिक प्रयत्नामुळें पूर्व शब्दानें प्रत्ययाच्या पूर्वीचा एकच अच् घ्यावयाचा असें होईल व त्यामुळें कांहीं दोष येणार नाहीं.

अथ पूर्वग्रहणं किमर्थं न तस्मिन्निति निर्दिष्टे पूर्वस्य [ १. १. ६६ ] इति पूर्वस्यैव भविष्यति। एवं तर्हि सिद्धे सति यत्पूर्वग्रहणं करोति तज्ज्ञापयत्याचार्यः स्वरविधौ सप्तम्यस्तदन्तसप्तम्यो भवन्तीति। किमेतस्य ज्ञापने प्रयोजनम्। उपोत्तमं रिति [ ६. १. २१७ ] रिदन्तस्य। चङ्यन्यतरस्याम् [ २१८ ] चङन्तस्य ॥ यद्येतज्ज्ञाप्यते चतुरः शसि [ १६७ ] इति शसन्तस्यापि प्राप्नोति। शस्ग्रहणसामर्थ्यान्न भविष्यति। इतरथा हि तत्रैवायं ब्रूयादूडिदंपदाद्यप्पुम्रैद्युभ्यश्चतुर्भ्यश्चेति ॥

अथ पिद्ग्रहणं किमर्थम्। इह मा भूत्। जाग्रति ॥ नैतदस्ति प्रयोजनम्। भवत्येवात्र पूर्वेण ॥ इदं तर्हि प्रयोजनम्। दरिद्रति ॥ आकारेण व्यवहितत्वान्न भविष्यति। लोपे कृते नास्ति व्यवधानम्। स्थानिवद्भावाद्व्यवधानमेव। प्रति-

---

आतां प्रस्तुत सूत्रांत पूर्वग्रहण केलें आहे तें कशाकरितां? तें करावयास नको. पिति हा सप्तमी-निर्देश असल्यामुळें 'तस्मिन्निति०' या परिभाषेनें स्वर हा पूर्वालाच होईल. अशा रीतीनें पूर्वाला स्वर सिद्ध असतां ज्या अर्थी आचार्य पूर्वग्रहण करीत आहेत त्या अर्थी स्वरशास्त्रांतील सप्तमी ही तदन्त सप्तमी जाणावी असें ते ज्ञापन करीत आहेत[८].

या ज्ञापनाचें काय फल?

'उपोत्तमं रिति' (६।१।२१७) येथें रिदन्तांतील उपोत्तम उदात्त होतो. तसेंच चङ्यन्यतरस्याम् (६।१।२१८) येथें चङन्तस्य असा अर्थ होऊन त्याच्या उपोत्तमाला उदात्त होतो.

पण जर हें ज्ञापन केलें तर 'चतुरः शसि' (६।१।१६७) येथेंही शसन्ताला स्वर प्राप्त होऊं लागेल[९].

पण तेथें शस्ग्रहणाच्या सामर्थ्यास्तव शसि ही सप्तमी तदन्त-सप्तमी होत नाहीं. झाली असती तर ऊडिदंपदाद्यप्पुम्रैद्युभ्यश्चतुर्भ्यः असा 'ऊडिदंपदा०' (६।१।१७१) या सूत्रामध्येंच चतुर् शब्द आचार्यांनीं घातला असता[१०].

आतां या प्रकृत सूत्रांत पित् ग्रहण केलें आहे तें कशाकरितां?

जाग्रति येथें प्रत्ययाहून पूर्व अशाला म्हणजे आकाराला उदात्त न व्हावा म्हणून तें केलें आहे.

हें प्रयोजन नाहीं. कारण येथें 'अभ्यस्तानामादिः' (६।१।१८९) यानें आकाराला उदात्त होत आहेच.

तर मग दरिद्रति[११] हे प्रयोजन समजावें.

पण येथें आकारानें व्यवधान असल्यामुळें उदात्त होणार नाहीं.

पण, 'श्नाभ्यस्तयो०' (६।४।११२) यानें आकाराचा लोप झाल्यानंतर व्यवधान रहात नाहीं.

---

८. हें ज्ञापन केलें म्हणजे मात्र येथें पित्-प्रत्ययान्त असा अर्थ होईल. आणि त्या पित्प्रत्ययान्तामध्यें पर्यायानें सर्वांना उदात्त होईल. याकरितां पूर्वग्रहण केलें पाहिजे.

९. तेव्हां चतुरः येथें उकाराला उदात्त न होतां शस् प्रत्ययाच्या अकाराला उदात्त होऊं लागेल.

१०. ऊडिदंपदा० या सूत्रामध्यें चतुर् शब्द घातला तर 'शसाशिवाय इतर सर्वनामस्थान-भिन्न प्रत्ययाला उदात्त होईल' असा दोष येथें येत नाहीं. चतुर् शब्द नित्य बहुवचनान्त आहे; आणि तृतीयेपासून बहुवचन प्रत्यय सर्व हलादि आहेत. तेव्हां येथें षट्त्रिचतुर्भ्यो० (६।१।१७९) यानें प्रत्ययाला उदात्त होतच आहे.

११. येथें प्रत्ययाहून पूर्व अशा इकाराला उदात्त होऊं लागेल.

षिध्यतेऽत्र स्थानिवद्भावः स्वरविधिं प्रति न स्थानिवद्भवतीति ॥

[ लिति ॥ ६।१।१९३ ॥

आदिर्णमुल्यन्यतरस्याम् ॥ ६। १।१९४ ]

अचः कर्तृयकि ॥ ६।१।१९५ ॥

यकि रपर उपसंख्यानम् ॥ १ ॥

यकि रपर उपसंख्यानं कर्तव्यम्। स्तीर्यते स्वयमेव ॥

उपदेशवचनात्सिद्धम् ॥ २ ॥

उपदेश इति वक्तव्यम् ॥

उपदेशवचने जनादीनाम् ॥ ३ ॥

उपदेशवचने जनादीनां स्वरो न सिध्यति। जायते स्वयमेव। जायते स्वयमेव ॥

योगविभागात्सिद्धम् ॥ ४ ॥

योगविभागः करिष्यते। अजन्तानां कर्तृयकि वादिरुदात्तो भवति। चीयते स्वयमेव। चीयते स्वयमेव। जायते स्वयमेव। जायते स्वयमेव। तत उपदेशे। उपदेशे चाजन्तानां कर्तृयकि वादिरुदात्तो भवति। स्तीर्यते स्वयमेव स्तीर्यते स्वयमेव ॥

तत्तर्ह्युपदेशग्रहणं कर्तव्यं न ह्यन्तरेणो-

---

पण स्थानिवद्भावानें व्यवधान राहणारच ना ? 'न पदान्तद्विर्वचन०' यानें स्वरविधि कर्तव्य असतांना स्थानिवद्भावाचा निषेध केला असल्यामुळें व्यवधान नाहीं.

( सू. १९५ वा. १ ) यक् पुढें असतांना अजन्त धातूला सांगितलेला हा स्वर रपर आदेश केल्यानंतरही होतो असें वचन करावें. उदा० स्तीर्यते स्वयमेव.

( वा. २ ) या सूत्रामध्यें उपदेशे असें म्हटलें म्हणजे येथें स्वर सिद्ध होत आहे.

( वा. ३ ) उपदेशीं अजन्त असें म्हटलें तर जन् वगैरे धातूंना हा स्वर साधत नाहीं. उदा०— जायते स्वयमेव.

(वा. ४) तर मग योगविभाग करण्यांत येईल. तो असा–' अचः कर्तृयकि ' असें सूत्र आहे. त्याचा अर्थ कर्तृ-यक् पुढें असतांना अजन्त धातूंना विकल्पानें आद्युदात्त होतो. त्यामुळें चीयते स्वयमेव, जायते स्वयमेव वगैरे ठिकाणीं विकल्पानें हा स्वर होतो. त्याचे पुढें– ' उपदेशे ' असें दुसरें सूत्र समजावें. उपदेशकालीं अजन्त असणाऱ्या धातूंना कर्तृयक् पुढें असतांना विकल्पानें आद्युदात्त होतो. त्यामुळें स्तीर्यते स्वयमेव येथेंही विकल्पानें स्वर होतो.

तर मग तें उपदेशग्रहण करावयास पाहिजे. कारण, तें उपदेशग्रहण केलें नाहीं तर योगविभाग कसा तो दाखवितां येणार नाहीं.

---

१. ( सू. १९३ ) लकार ज्याचा इत्संज्ञक आहे असा प्रत्यय पुढें असतांना प्रत्ययाच्या पूर्वीचा अच् उदात्त होतो. उदा०–चिकीर्षकः.

१. (सू. १९४) णमुल् प्रत्यय पुढें असतांना णमुल्प्रत्ययान्ताचा आदि उदात्त विकल्पानें होतो. उदा०— लोलूयं लोलूयम्.

१. ( सू. १९५ ) कर्तरि प्रयोगामध्यें यक् प्रत्यय पुढें असतांना उपदेशीं अजन्त धातूंना आदि उदात्त विकल्पानें होतो. उदा०— लूयते केदारः स्वयमेव. हा कर्मकर्तरि प्रयोग आहे. कर्मवद्भावानें ( ३।१।८७ ) यक् प्रत्यय झाला आहे.

२. स्तॄ धातूला इत्व (७।१।१००) रपर केल्यानंतर धातु अजन्त रहात नाहीं म्हणून हें वार्तिक केलें आहे.

३. जन् हा धातु उपदेशीं अजन्त नाहीं; नकारान्त आहे. नकाराला आत्व ( ६।४।४३ ) झाल्यानंतर तो अजन्त होतो.

पदेशग्रहणं योगाङ्गं जायते । न कर्तव्यम् । प्रकृतमनुवर्तते । क्व प्रकृतम् । तास्यनुदात्तेन्ङिददुपदेशाल्लसार्वधातुकमनुदात्तमह्न्विङोः [ ६. १. १८६ ] इति । ननु चोक्तमुपदेशवचने जनादीनां स्वरो न सिध्यतीति । नैष दोषः । नैवं विज्ञायत उपदेशवचने जनादीनां स्वरो न सिध्यतीति । कथं तर्हि । जनादीनामप्यात्त्व उपदेशवचनं कर्तव्यमिति । तत्तर्हि तत्रोपदेशग्रहणं कर्तव्यम् । न कर्तव्यम् । प्रकृतमनुवर्तते । क्व प्रकृतम् । अनुदात्तोपदेशवनतितनोत्यादीनामनुनासिकलोपो झलि क्ङिति [ ६. ४. ३७ ] इति ॥

**थलि च सेटीडन्तो वा ॥ ६ । १ । १९६ ॥**

सेड्ग्रहणं किमर्थं न थलीडन्तो वेत्युच्येत । इडन्तो वेत्युच्यमान इहापि प्रसज्येत । पपक्थ । नैतदस्ति प्रयोजनम् । अच इति वर्तते । इदं तर्हि प्रयोजनम् । ययाथेति ॥

**[ ञ्नित्यादिर्नित्यम् ॥ ६ । १ । १९७ ॥**

---

उपदेशग्रहण करावयास नको. मागून अनुवृत्तीनें तें येत आहे.

मागें कोठें बरें उपदेश-ग्रहण केलें आहे ?

'तास्यनुदात्तेन्ङिददुपदेशात्० ' ( ६।१।१८६ ) येथें उपदेश हा शब्द आहे.

पण उपदेशग्रहण असेल तर जन् वगैरे धातूंना स्वर साधत नाहीं, असें म्हटलें आहे ना ?

हा दोष येत नाहीं. कारण ' उपदेशवचने जनादीनाम् ' या वार्तिकानें उपदेशग्रहण असेल तर जन् वगैरे धातूंना स्वर साधत नाहीं, असा दोष दाखविला आहे असें समजूं नये. तर जन् वगैरे धातूंना उपदेशकालीं आत्व होतें असें त्या वार्तिकानें सांगितलें आहे.

तर मग त्या जन् वगैरे धातूंना आत्व सांगणाऱ्या शास्त्रामध्यें उपदेशग्रहण केलें पाहिजे.

तेथेंही उपदेशग्रहण करावयास नको. कारण मागून तें अनुवृत्तीनें येत आहे.

मागें कोठें बरें उपदेशग्रहण केलें आहे ?

'अनुदात्तोपदेशवनतितनोत्यादीनामनुनासिकलोपो झलि क्ङिति' (६।४।३७) येथें केलें आहे.

( सू. १९६ ) येथें थलाला सेट् असें विशेषण दिलें आहे तें कशाकरितां ? तें देऊं नये. 'थलीडन्तो वा' एवढेंच म्हणावें.

तसें म्हटलें तर पपक्थ येथेंही हा स्वर होऊं लागेल.

हें प्रयोजन नाहीं. कारण पूर्व सूत्रांतून अचः याची अनुवृत्ति आणून अजन्त धातूंना हा स्वर सांगावा.

तर मग ययाथ हें सेट् ग्रहणाचें प्रयोजन आहे.

---

४. तेव्हां जायते येथें उपदेशीं आत्व झाल्यानंतर यक् प्रत्यय झाल्यामुळें यक् प्रत्ययाच्या उपदेशीं धातु हा अजन्त असल्यामुळें स्वरही साधेल.

१. ( सू. १९६ ) थल् प्रत्ययाला इट् आगम झाला असतां त्या क्रियापदामध्यें इट् आगम, अन्त, आणि आदि या तिघांना पाळीपाळीनें उदात्त होतो व तोही विकल्पानें होतो म्हणजे एकदां तिघांनाही होत नाहीं. तेव्हां त्या वेळीं लुलविथ येथें उत्तर खंडांतील अकाराला लिति (६।१।१९३) यानें उदात्त होतो. एकंदरींत लुलविथ येथें चारी अचांना पाळीपाळीनें उदात्त होऊन चार रूपें होतात.

१. ( सू. १९७ ) ञकार किंवा नकार इत्संज्ञक असलेला जो प्रत्यय तदन्त समुदायाचा आदि उदात्त होतो. उदा०- गार्ग्यः.

**आमन्त्रितस्य च ॥ ६।१।१९८ ॥**

**पथिमथोः सर्वनामस्थाने ॥ ६ । १ । १९९ ॥**

**अन्तश्च तवै युगपत् ॥ ६ । १ । २०० ॥**

**क्षयो निवासे ॥ ६ । १ । २०१ ॥**

**जयः करणम् ॥ ६ । १ । २०२ ॥**

**वृषादीनां च ॥ ६ । १ । २०३ ॥ ]**

**संज्ञायामुपमानम् ॥ ६।१।२०४ ॥**

किमर्थमिदमुच्यते न ञ्नित्यादिर्नित्यम् [ ६. १. १९७ ] इत्येव सिद्धम् । ञ्नितीत्युच्यते न चात्र ञ्नितं पश्यामः । प्रत्ययलक्षणेन । न लुमता तस्मिन्निति प्रत्ययलक्षणप्रतिषेधः । अङ्गाधिकारोक्तस्य स प्रतिषेधो न लुमताङ्गस्य [ १. १. ६३ ] इति ॥ अत उत्तरं पठति ।

**उपमानस्याद्युदात्तवचनं ज्ञापकमनुबन्धलक्षणे स्वरे प्रत्ययलक्षणप्रतिषेधस्य ॥ १ ॥**

उपमानस्याद्युदात्तवचनं ज्ञापकार्थं क्रियते । किं ज्ञाप्यम् । एतज्ज्ञापयत्याचार्योऽनुबन्धलक्षणे स्वरे प्रत्ययलक्षणं न भव-

---

(सू. २०४) हें सूत्र कशाकरितां केलें आहे ? तें करूं नये. चञ्चा येथें 'ञ्नित्यादिर्नित्यम्' ( ६।१।१९७ ) यानेंच इष्ट स्वर साधत आहे.

पण तेथें ञ्निति असें म्हटलें आहे. आणि येथें तर ञित् किंवा नित् दृष्टीस पडत नाहीं.

प्रत्ययलक्षणानें कन् हा येथें नित् प्रत्यय मानतां येईल.

'न लुमता तस्मिन्' (१।१।६३) यानें प्रत्ययलक्षणाचा प्रतिषेध सांगितला आहे.

'न लुमताऽङ्गस्य' असें तें सूत्र आहे. म्हणून अंगाधिकारांतील कार्य कर्तव्य असतांना तो निषेध येतो. तेव्हां येथें प्रत्ययलक्षणानें काम भागेल. हें मनांत येऊन वार्तिककार म्हणतात—

(वा.१) हें जें प्रकृत सूत्रानें उपमानाला आद्युदात्त-वचन केलें आहे तें ज्ञापनाकरितां केलें आहे.

काय ज्ञापन करावयाचें ?

अनुबंधाच्या निमित्तानें स्वर कर्तव्य असतांना प्रत्ययलक्षण होत नाहीं असें आचार्य ज्ञापन करीत[2] आहेत.

---

१. ( सू. १९८ ) आमन्त्रिताचा ( २।३।४८ ) आदि उदात्त होतो. उदा०—हे देवदत्त.

१. ( सू. १९९ ) पथिन् आणि मथिन् या शब्दांचा आदि उदात्त होतो सर्वनामस्थान प्रत्यय पुढें असतांना. उदा०—पन्थाः.

१. ( सू. २०० ) तवै-प्रत्ययान्त शब्दाचा अन्त आणि आदि असे दोन्हीं अच् एकदम उदात्त होतात. उदा०—कर्तवै.

१. ( सू. २०१ ) निवास या अर्थाचा जो क्षय शब्द त्याचा आदि उदात्त होतो. उदा०— क्षियन्ति निवसन्ति अस्मिन्निति क्षयः.

१. ( सू. २०२ ) करणीं अच् प्रत्यय ( ३।३।५६ ) करून साधलेला जो जय शब्द त्याचा आदि उदात्त होतो. उदा०—जयति अनेनेति जयः.

१. ( सू. २०३ ) वृषादि गणांतील शब्दांचा आदि उदात्त होतो. उदा०—वृषः, जनः, ज्वरः.

१. ( सू. २०४ ) उपमानवाचक शब्द उपमेयाची संज्ञा असेल तर त्याचा आदि अच् उदात्त होतो. उदा०—चञ्चेव मनुष्यः चञ्चा. चञ्चा म्हणजे गवताची बाहुली. तिच्यासारखा मनुष्य या अर्थी कन् प्रत्यय ( ५।३।९७ ) व त्याचा लुप् ( ५।३।९८ ) झाला आहे. चञ्चा ही तशा मनुष्याची संज्ञा आहे.

२. हें ज्ञापन घेतलें म्हणजे चञ्चा येथें प्रत्ययलक्षण होत नसल्यामुळें नित्स्वरानें सिद्धि होत नाहीं. म्हणून प्रकृत सूत्र केलें पाहिजे.

तीति । किमेतस्य ज्ञापने प्रयोजनम् । गर्गाः वत्साः । विदाः उर्वाः । उष्ट्रग्रीवा वामरज्जुः । ञ्नितीत्याद्युदात्तत्वं न भवति । इह च अत्रय इति तद्धितस्य कितः [ ६. १. १४६-१६५ ] इत्यन्तोदात्तत्वं न भवति । यद्यनुबन्धलक्षण इत्युच्यते पथिप्रियः मथिप्रिय इति पथिमथोः सर्वनामस्थाने [ १९९ ] इत्याद्युदात्तत्वं प्राप्नोति । एवं तर्ह्याचार्यो ज्ञापयति स्वरे प्रत्ययलक्षणं न भवतीति ॥ एवमपि सर्पिरागच्छ सप्तागच्छतेत्यामन्त्रितस्य च [ १९८ ] इत्याद्युदात्तत्वं न प्राप्नोति । इह च मा हि दाताम् मा हि धाताम् आदिः सिचोऽन्यतरस्याम् । [ १८७ ] इत्येष स्वरो न प्राप्नोति । एवं तर्हि ज्ञापयत्याचार्यः सप्तमीनिर्दिष्टे स्वरे प्रत्ययलक्षणं न भवतीति ॥

---

असें ज्ञापन केल्याचा काय उपयोग ?

गर्गाः[3] वत्साः बिदाः ऊर्वाः उष्ट्रग्रीवा वामरज्जुः येथें प्रत्ययलक्षणानें ञ्नित्स्वर प्राप्त होतो; पण ज्ञापकानें प्रत्ययलक्षणाचा प्रतिषेध सुचविल्यामुळें तो होत नाहीं. तसेंच अत्रेरपत्यानि अत्रयः[4] येथें 'तद्धितस्य' व 'कितः' ( ६।१। १६४,१६५ ) या सूत्रांनीं अन्तोदात्त होत नाहीं.

आतां या ज्ञापकामध्यें अनुबंधाच्या निमित्तानें असें जें म्हटलें आहे त्यामुळें पथिप्रियः, मथिप्रियः येथें ' पथिमथोः सर्वनामस्थाने ' ( ६।१।१९९ ) यानें आद्युदात्त स्वर प्राप्त होत आहे[5].

तर मग स्वर कर्तव्य असतांना प्रत्ययलक्षण होत नाहीं असें मोघमच आचार्य ज्ञापन करीत आहेत असें समजावें.

असें ज्ञापन केलें तरीही सर्पिरागच्छ सप्तागच्छत येथें 'आमन्त्रितस्य च' ( ६।१।१९८ ) यानें आद्युदात्त प्राप्त होत नाहीं[6].

तसेंच 'मा हि दाताम्', 'मा हि धाताम्' येथें 'आदिः सिचोऽन्यतरस्याम्' ( ६।१।१८७ ) हा स्वर प्राप्त होत नाहीं[7].

तर मग आतां सप्तमीनिर्देशानें सांगितलेला स्वर कर्तव्य असतांना प्रत्ययलक्षण होत नाहीं असें तें ज्ञापक समजावें.

तरीही सर्वस्तोमः सर्वपृष्ठः येथें ' सर्वस्य

---

३. गर्ग व वत्स या शब्दांहून यञ् प्रत्यय ( ४। १।१०५ ) होऊन त्याचा लुक् ( २।४।६४ ) झाला आहे. तसाच बिद व उर्व या शब्दांपुढील अञ् प्रत्ययाचा ( ४।१।१०४ ) लुक् झाला आहे. उष्ट्रग्रीवा येथें कन् प्रत्ययाचा ( ५।३।९६ ) लुप् ( ५।३।९९ ) झाला आहे. वामरज्जुः येथें देवपथादिभ्यश्च ( ५।३। १०० ) यानें लुप् झाला आहे; उष्ट्रग्रीवा येथेंही ह्या सूत्रानें लुप् होईल.

४. येथें ढक् ( ४।१।१२२ ) प्रत्ययाचा लुक् ( २।४।६५ ) झाला आहे.

५. हा स्वर अनुबन्धलक्षण नव्हे. कारण इत्संज्ञक कोणताही वर्ण या स्वराला निमित्त धरला नाहीं. तेव्हां येथें प्रत्ययलक्षणाचा निषेध होणार नाहीं. तेव्हां पन्थाः प्रियो यस्य पथिप्रियः येथें प्रत्ययलक्षणानें सर्वनामस्थान प्रत्यय पथिन् शब्दाच्या पुढें आहे.

६. सर्पिस् शब्दापुढील संबोधन सु प्रत्ययाचा लुक् ( ७।१।२३ ) झाला आहे. तसाच सप्तन् शब्दापुढील संबोधन जस् प्रत्ययाचा लुक् ( ७।१।२२ ) झाला आहे. ज्ञापनामध्यें ' अनुबन्धलक्षणे ' असें म्हटलें नाहीं तर येथें प्रत्ययलक्षणाचा निषेध होईल व सर्वनामस्थान प्रत्यय पुढें नसल्यामुळें आमन्त्रितस्य च याची प्रवृत्ति होणार नाहीं.

७. ' मा हि दाताम् ' येथें सिच् प्रत्ययाचा लुक् ( २।४।७७ ) झाला आहे. त्याला प्रत्ययलक्षण या ज्ञापनामुळें होणार नाहीं.

एवमपि सर्वस्तोमः सर्वपृष्ठः सर्वस्य सुपि [१९१] इत्याद्युदात्तत्वं न प्राप्नोति ॥ अस्तु तर्ह्यनुबन्धलक्षण इत्येव । कथं पथिप्रियः मथिप्रियः । वक्तव्यमेवैतत्पथिमथोः सर्वनामस्थाने लुकि लुमता लुप्ते प्रत्ययलक्षणं न भवतीति ॥

## निष्ठा च द्व्यजनात् ॥ ६ । १ । २०५ ॥

### निष्ठायां यञि दीर्घत्वे प्रतिषेधः ॥१॥

निष्ठायां यञि दीर्घत्वे प्रतिषेधो वक्तव्यः । दत्ताभ्याम् गुप्ताभ्याम् ॥

### न वा बहिरङ्गलक्षणत्वात् ॥ २ ॥

न वा वक्तव्यम् । किं कारणम् । बहिरङ्गलक्षणत्वात् । बहिरङ्गोऽत्र दीर्घः । अन्तरङ्गः स्वरः । असिद्धं बहिरङ्गमन्तरङ्गे ॥

अन्तरेण प्रतिषेधमन्तरेण चैतां परिभाषां सिद्धम् । कथम् । नैवं विज्ञायते न चेदाकारान्ता निष्ठेति । कथं तर्हि । न चेदाकारात्परा निष्ठेति । यद्येवं निर्देशश्चैव नोपपद्यते न ह्येषा आकारात्परा पञ्चमी युक्ता । इह च प्राप्नोति । आप्तः राद्ध इति ॥ एवं तर्हि न चेदवर्णात्परा निष्ठेति । भवेन्निर्देश

---

सुपि' हा स्वर होत असतो तो होणार नाहीं.

तर आतां 'अनुबन्धलक्षणे स्वरे०' असें प्रथमतः केलेलेंच ज्ञापक कायम करावें.

पण पथिप्रियः मथिप्रियः येथें प्रत्ययलक्षणानें पथिमथिस्वर प्रसक्त होतो त्याची काय वाट ?

'पथिमथोः सर्वनामस्थाने लुकि लुमता लुप्ते प्रत्ययलक्षणं न भवति' म्हणजे पथिन् व मथिन् शब्दांहून सर्वनामस्थान प्रत्ययाचा लुक् झाला असतां स्वर कर्तव्य असतांना प्रत्ययलक्षण होत नाहीं असें वचन केलें पाहिजे.

(सू. २०५ वा. १) दत्ताभ्याम् गुप्ताभ्याम् येथें यञादि प्रत्ययामुळें दीर्घ (७।३।१०२) केला असतां अनात् हा प्रतिषेध येतो. म्हणून त्या प्रतिषेधाच्या प्रतिषेधाकरितां वचन करावें.

(वा. २) प्रतिषेधाकरितां वचन करावयास नको. कारण, येथें दीर्घ हा बहिरंग आहे व स्वर अंतरंग आहे. तेव्हां 'असिद्धं बहिरङ्गमन्तरङ्गे' या परिभाषेनें दीर्घ असिद्ध असल्यामुळें स्वर होईल.

आतां हें प्रतिषेधवचन केल्यावांचून व अंतरंग परिभाषाही घेतल्यावांचून हें उदाहरण साधत आहे.

तें कसें ?

निष्ठान्ताला आद्युदात्त होतो पण 'तो निष्ठा प्रत्यय आकारान्त नसेल तर' असा 'अनात्' या पदाचा अर्थ समजला जात नाहीं. तर 'तो निष्ठा प्रत्यय आकाराहून पर नसेल तर' असा अर्थ समजला जात आहे.

अनात् याचा असा अर्थ असेल तर अनात् हा निर्देश जुळत नाहीं. कारण, आत् अशी दीर्घ आकाराची पंचमी होत नाहीं. शिवाय, आप्तः राद्धः येथें निष्ठा प्रत्यय आकाराहून पर नसल्यामुळें अनात् हा निषेध येणार नाहीं आणि आदि उदात्त होऊं लागेल.

तर मग अनात् याचा अवर्णाहून पर निष्ठा नसेल तर असा अर्थ समजला जाईल.

तसा अर्थ समजला तर अनात् हा पंचमी-

---

१. (सू. २०५) निष्ठा-प्रत्ययान्त जो दोन अच् असलेला संज्ञा-शब्द त्याचा आदि उदात्त होतो; पण तो आदि आकार नसला पाहिजे. उदा०—दत्तः गुप्तः.

२. निष्ठा-प्रत्ययान्त शब्द आकारान्त नसावा असा 'अनात्' याचा अर्थ गृहीत धरून हें वार्तिक प्रवृत्त झालें आहे.

३. कारण, त्याला पुढील 'भ्याम्' प्रत्ययाची जरूर आहे.

४. अनातः असें सूत्रामध्यें म्हटलें असतें तरतसा अर्थ झाला असता.

उपपन्न इह तु प्राप्नोति आप्तः राद्ध इति इह च न प्राप्नोति यतः रत इति ॥ एवं तर्हि विहितविशेषणमकारग्रहणम् । न चेदकारान्ताद्विहिता निष्ठेति । एवमपि दत्तः अत्र न प्राप्नोति इह च प्राप्नोति आप्तः राद्ध इति ॥ एवं तर्हि कार्यिविशेषणमाकारग्रहणम् । न चेदाकारः कार्यी भवति ॥ एवमपि अद्याष्टः कदाष्टः अत्र न प्राप्नोति । तस्मात्सुष्ठूच्यते निष्ठायां यञि दीर्घत्वे प्रतिषेधो न वा बहिरङ्गलक्षणत्वादिति ॥

[ शुष्कधृष्टौ ॥६।१।२०६ ॥ ]

आशितः कर्ता ॥ ६ । १ । २०७ ॥

किं निपात्यते ।

**आशिते कर्तरि निपातनमुपधादीर्घत्वमाद्युदात्तत्वं च ॥ १ ॥**

आशित इति क्तः कर्तरि निपात्यते । आशितवानाशितः । उपधादीर्घत्वमाद्युदात्तत्वं च निपात्यते ॥ आद्युदात्तत्वमनिपात्यम् । अधिकारात्सिद्धम् । उपधादीर्घत्वमनिपात्यम् । आङ्पूर्वस्य प्रयोगः । यद्येवमवग्रहः

---

निर्देश जुळेल. पण आत्तः राद्धः येथील दोष कायम राहणारच. शिवाय, यतः रतः येथें आदि उदात्त होणार नाहीं असा दोष येत आहे.

तर मग अनात् हें विहित-विशेषण आहे. म्हणजे निष्ठा प्रत्यय अवर्णान्ताहून केलेला नसेल तर असा अर्थ समजावा.

तरीही दत्तः येथें दा या अवर्णान्ताहून निष्ठा प्रत्यय केलेला असल्यामुळें आदि उदात्त होणार नाहीं; आणि आप्तः, व राद्धः येथें होऊं लागेल.

तर मग अनात् हें कार्यीचें विशेषण समजावें. तें असें—तो आदि अच् आकार नसेल तर.

तरीही अद्याष्टः[६] कदाष्टः येथें आदि उदात्त होणार नाहीं. एकंदरींत 'निष्ठायां यञि दीर्घत्वे प्रतिषेधः' याचें खंडन म्हणून जें वार्तिककारांनीं 'न वा बहिरङ्गलक्षणत्वात्' असें म्हटलें आहे तें बरोबरच आहे.

( सू. २०७ ) आशितः येथें काय निपातन केलें आहे ?

( वा. १ ) कर्तरि क्त प्रत्ययाचें आशित शब्दामध्यें निपातन केलें आहे. आशितः याचा आशितवान् असा अर्थ आहे. तसेंच उपधादीर्घ व आद्युदात्त स्वर यांचेंही निपातन केलें आहे.

आद्युदात्त स्वराचें निपातन करावयास नको. कारण आद्युदात्त स्वराचें प्रकरणच चालूं असल्यामुळें या सूत्रानें आद्युदात्ताचें विधान होईलच. तसेंच उपधादीर्घाचेंही निपातन करावयास नको. कारण आङ् उपसर्ग मागें लावला म्हणजे सवर्णदीर्घानें आशित असें होईल.

---

५. ज्या आदि अचाला उदात्त होतो त्याचें.

६. अश् धातु भोजनार्थक आहे. अश् धातूहून क्त प्रत्यय करून अष्ट शब्द होतो. अष्ट म्हणजे भुक्त. अष्ट शब्दाच्या मागें अद्य किंवा कदा हे शब्द लावून सवर्णदीर्घ केला म्हणजे अद्याष्टः कदाष्टः अशीं रूपें होतात. येथें दीर्घ आकार आदि असल्यामुळें आदि उदात्त होणार नाहीं.

७. अद्याष्टः येथील दोष बहिरंग परिभाषेनेंच घालवावा लागतो म्हणून.

१. ( सू. २०६ ) शुष्क आणि धृष्ट हे संज्ञाशब्द नसले तरी त्यांचा आदि अच् उदात्त होतो.

१. ( सू. २०७ ) कर्तृवाचक आशित शब्दाचा आदि अच् उदात्त होतो. आङ्पूर्वक अश् धातूहून कर्तरि क्त प्रत्यय करून आशित शब्द साधला आहे; भुक्तवान् असा त्याचा अर्थ आहे. कर्मांची अविवक्षा करून अकर्मक समजून कर्तरि क्त प्रत्यय ( ३।४।७२ ) केला आहे.

प्राप्नोति । न लक्षणेन पदकारा अनुवर्त्याः। पदकारैर्नाम लक्षणमनुवर्त्यम् । यथालक्षणं पदं कर्तव्यम् ॥

**रिक्ते विभाषा ॥ ६ । १ । २०८ ॥**

**[ जुष्टार्पिते च च्छन्दसि ॥ ६ । १ । २०९ ॥**

**नित्यं मन्त्रे ॥ ६ । १ । २१० ॥**

**युष्मदस्मदोर्ङसि ॥ ६।१।२११ ॥**

**ङयि च ॥ ६ । १ । २१२ ॥**

**यतोऽनावः ॥ २ । १ । २१३ ॥**

**ईडवन्दवृशंसदुहां ण्यतः ॥ ६ । १ । २१४ ॥ ]**

**विभाषा वेण्विन्धानयोः ॥ ६ । १ । २१५ ॥**

किमियं प्राप्ते विभाषाहोस्विदप्राप्ते । कथं च प्राप्ते कथं वाप्राप्ते । यदि संज्ञायामुपमानं निष्ठा च द्व्यजनात् [ ६. १. २०४; २०५ ] इति नित्ये प्राप्त आरम्भस्ततः प्राप्तेऽन्यत्र वाप्राप्ते ।

**वेणुरिक्तयोरप्राप्ते ॥ १ ॥**

वेणुरिक्तयोरप्राप्ते विभाषा प्राप्ते नित्यो विधिः । वेणुरिव वेणुः । रिक्तो नाम

---

तर मग आशितः येथें पदपाठकालीं आशित इति आ अशितः असा अवग्रह प्राप्त होतें आहे.[2]

शास्त्र हें पदकारांना अनुसरून असत नाहीं. उलट पदकारांनींच शास्त्राला अनुसरून वागलें पाहिजे. तेव्हां त्यांनीं शास्त्राला अनुसरूनच पदच्छेद दाखविला पाहिजे.

( सू. २१५ ) ह्या दोन सूत्रांमध्यें प्राप्तविभाषा आहे किंवा अप्राप्तविभाषा आहे ?

प्राप्तविभाषा कशी होत आहे आणि कशी बरें अप्राप्तविभाषा होत आहे ?

जर रिक्त आणि वेणु हे संज्ञा-शब्द घेतले तर रिक्त शब्दाला 'निष्ठा च द्व्यजनात्' ( ६।१।२०५ ) यानें नित्य आद्युदात्त प्राप्त झाला असतां आणि वेणु शब्दाला ' संज्ञायामुपमानम् ' ( ६।१।२०४ ) यानें नित्य आद्युदात्त प्राप्त झाला असतां तेथें ह्या सूत्रांनीं आदि उदात्त विकल्पानें होतो असें मानलें तर प्राप्तविभाषा होते. आणि रिक्त व वेणु हे जेथें संज्ञा शब्द नव्हेत अशा ठिकाणीं अप्राप्तविभाषा होत आहे.

( वा. १ ) वेणु आणि रिक्त या शब्दांना येथें आदि उदात्त विकल्पानें सांगितला आहे; ही अप्राप्तविभाषाच समजावी. हे संज्ञा-शब्द असल्यास त्यांना पूर्वविप्रतिषेधानें नित्य आद्यु-

---

२. आङ् उपसर्ग न लावतां निपातनानें उपधादीर्घ मानला म्हणजे आशित यांत दोन पदें नसल्यामुळें अवग्रह होत नाहीं.

१. ( सू. २०८ ) रिक्त शब्दाला आदि उदात्त विकल्पानें होतो.

१. ( सू. २०९ ) वेदामध्यें जुष्ट आणि अर्पित या दोन शब्दांचा आदि स्वर विकल्पानें उदात्त होतो.

१. ( सू. २१० ) मन्त्रामध्यें जुष्ट आणि अर्पित या दोन शब्दांचा आदि नित्य उदात्त होतो.

१. (सू. २११) युष्मत् आणि अस्मत् या दोन शब्दांचा आदि स्वर ङस् प्रत्यय पुढें असतांना उदात्त होतो.

१. ( सू. २१२ ) युष्मद् आणि अस्मद् या दोन शब्दांना ङे प्रत्यय पुढें असतांना आदि उदात्त स्वर होतो.

१. ( सू. २१३ ) यत्-प्रत्ययान्त जो दोन अच् असलेला शब्द त्याला आदि उदात्त स्वर होतो, पण तो यत् प्रत्यय नौ शब्दाहून केलेला नसावा. उदा०— चेयम्.

१. (सू. २१४) ईड् वन्द् वृ शंस् आणि दुह् या धातूंहून ण्यत् प्रत्यय केला असतां त्या ण्यत्-प्रत्ययान्त शब्दाचा आदि अच् उदात्त होतो. उदा०—ईड्यम्.

१. ( सू. २१५ ) वेणु आणि इन्धान या दोन शब्दांना विकल्पानें आदि उदात्त स्वर होतो.

कश्चित् ॥

[त्यागरागहासकुहश्वठक्रथानाम् ॥ ६ । १ । २१६ ॥]

उपोत्तमं रिति ॥ ६ । १ । २१७ ॥

उपोत्तमग्रहणं किमर्थं न रिति पूर्वमित्येवोच्येत । तत्रायमप्यर्थो मतोः पूर्वमात्संज्ञायां स्त्रियाम् । [ २१९ ] इत्यत्र पूर्वग्रहणं न कर्तव्यं भवति ॥ एवं तर्ह्युपोत्तमग्रहणमुत्तरार्थम् । चङ्यन्यतरस्याम् [ २१८ ] उपोत्तममित्येव । इह मा भूत् । मा हि स्म दधत् ॥

[ चङ्यन्यतरस्याम् ॥ ६ । १ । २१८ ॥

मतोः पूर्वमात्संज्ञायां स्त्रियाम् ॥ ६ । १ । २१९ ॥ ]

अन्तोऽवत्याः ॥ ६ । १ । २२० ॥

ईवत्याः ॥ ६ । १ । २२१ ॥

किमर्थमिदमुच्यते न वत्या इत्येवो-

---

दात्त होतो असें समजावें. उदा० वेणूसारखा वेणु, आणि रिक्त या नांवाचा कोणीतरी मनुष्य या अर्थी हे दोन्ही शब्द आद्युदात्त असतात.

(सू. २१७ ) येथें उपोत्तमग्रहण कशाकरितां केलें आहे ? तें करू नये. 'रिति पूर्वम्' असेंच सूत्र करावें. यांत 'मतोः पूर्वमात्०' ( ६।१।२१९ ) येथें पूर्वग्रहण करावें लागत नाहीं हाही फायदा आहे. तर मग उत्तरसूत्रामध्यें अनुवृत्तीकरितां उपोत्तमग्रहण येथें केलें आहे असें समजावें. उदा० 'चङ्यन्यतरस्याम्' ह्या पुढील सूत्रामध्यें उपोत्तम शब्दाची अनुवृत्ति आहे म्हणून मा हि स्म दधत् येथें उदात्त होत नाहीं.

( सू. २२१ ) अवती आणि ईवती या दोन शब्दांचें जें येथें निरनिराळें ग्रहण केलें तसें करूं नये. तर त्या दोहोंबद्दल 'वत्याः' असेंच म्हणावें.

---

१. ( सू. २१६ ) त्याग राग हास कुह श्वठ आणि क्रथ या शब्दांना विकल्पानें आदि उदात्त स्वर होतो.

१. ( सू. २१७ ) रित्-प्रत्ययान्त शब्दामध्यें कमींत कमी तीन अच् असतील तर त्यांतील शेवटच्या अचाला उदात्त होतो. उदा०-करणीयम्. येथें ईकार उदात्त झाला आहे.

२. 'रेफ आहे इत्संज्ञक ज्याच्या जवळ' अशा अर्थानें रित् या शब्दानें अनीयर् वगैरे प्रत्ययांतील शेवटचा अच् अकार घेतां येतो. त्याहून पूर्वीच्याला उदात्त सांगितला म्हणचे अर्थात् तो उपोत्तमालाच होईल.

३. कमींत कमी तीन अच् असतील तर त्यांतील शेवटच्याला उत्तम म्हणतां येतें आणि त्या उत्तमाच्या मागील अचाला उपोत्तम म्हणतां येतें. दधत् येथें दोनच अच् असल्यामुळें उपोत्तम असें म्हणतां येत नाहीं म्हणून पुढील सूत्रानें तेथें उदात्त होत नाही. दधत् येथें धा धातूच्या पुढील च्लि प्रत्ययाचे स्थानीं चङ् ( ३।१।४९ ) झाला आहे.

१. ( सू. २१८ ) चङ्प्रत्ययान्त शब्दस्वरूपांतील उपोत्तम अचाला विकल्पानें उदात्त होतो. उदा०-मा हि चीकरताम्.

१. ( सू. २१९ ) मतुप् प्रत्ययाच्या पूर्वीचा आकार उदात्त होतो; पण तो मतुप्-प्रत्ययान्त शब्द स्त्रीलिंगी कोणाची तरी संज्ञा असला पाहिजे. उदा०-उदुम्बरावती.

१. ( सू. २२० ) अवती शब्द शेवटीं असलेला जो स्त्रीलिंगी संज्ञा-शब्द त्याचा अन्त उदात्त होतो. उदा०-अजिरवती.

१. ( सू. २२१ ) ईवती शब्द शेवटीं असलेला जो स्त्रीलिंगी संज्ञा-शब्द त्याचा अंत उदात्त होतो. उदा०-अहीवती.

च्येत । वत्या इतीयत्युच्यमाने राजवती अत्रापि प्रसज्येत । अथावत्या इत्युच्यमाने कस्मादेवात्र न भवति । असिद्धो नलोपस्तस्यासिद्धत्वान्नैषोऽवतीशब्दः । कस्तर्हि । अन्वतीशब्दः ॥ यथैव तर्हि नलोपस्यासिद्धत्वान्नावतीशब्द एवं वत्वस्याप्यसिद्धत्वान्नावतीशब्दः । आश्रयात्सिद्धत्वं स्यात् ॥

चौ[1] ॥ ६ । १ । २२२ ॥

चोरतद्धिते ॥ १ ॥

चुस्वरोऽतद्धित इति वक्तव्यम् । इह मा भूत् । दाधीचः माधूच इति ॥ तर्त्तर्हि वक्तव्यम् । न वक्तव्यम् । प्रत्ययस्वरोऽत्र बाधको भविष्यति ॥ स्थानान्तरप्राप्तश्चुस्वरः । प्रत्ययस्वरस्यापवादोऽनुदात्तौ सुप्पितौ [ ३. १. ४ ] इति । अनुदात्तौ सुप्पितावित्यस्योदात्तनिवृत्तिस्वरः । उदात्तनिवृत्तिस्वरस्य चुस्वरः । स यथैवोदात्तनिवृत्तिस्वरं बाधत एवं प्रत्ययस्वरमपि

---

पण वती शब्दाचें ग्रहण केलें असतां राजवती येथेंही अन्तोवत्याः हा स्वर होऊं लागेल.

आतां अवती शब्दाचें ग्रहण केलें असतां येथें कां बरें हा स्वर होत नाहीं ?

त्रैपादिक नलोप हा असिद्ध असल्यामुळें या सूत्राच्या दृष्टीनें हा अवती शब्दच नव्हे.

तर मग कोणता बरें शब्द आहे ?

हा अन्वती शब्द आहे.

पण नलोप असिद्ध असल्यामुळें जसा हा अवती शब्द होत नाहीं तसा मतुपाच्या मकाराला झालेला वकार असिद्ध असल्यामुळें हा अवती शब्दही होत नाहीं.[2]

सूत्रामध्यें अवती तसेंच ईवती असें वकारयुक्त उच्चारण केलें असल्यामुळें वकार सिद्धच समजला जातो.[3]

( सू. २२२ वा. १ ) हा जो चु पुढें असतांना पूर्वाला अन्तोदात्त सांगितला आहे तो तद्धित प्रत्यय पुढें केला असतां होत नाहीं असें वचन करावें. उदा० दाधीचः[2], माधूचः. येथें हा चुस्वर न व्हावा.

तर मग तें वचन केलें पाहिजे.

वचन करावयास नको. कारण दाधीचः माधूचः येथें अण् प्रत्ययाचा स्वर ( ३।१।३ ) चु स्वराचा बाध करून होईल.

पण कांहीं विशेष ठिकाणीं प्राप्त होणारा चुस्वर हा प्रत्यय–स्वराचा अपवाद आहे. प्रत्यय स्वराचा ' अनुदात्तौ सुप्पितौ ' ( ३।१।४ ) हा अपवाद आहे; त्या ' अनुदात्तौ सुप्पितौ ' याचा उदात्तनिवृत्तिस्वर (६।१।१६१) अपवाद आहे आणि त्या उदात्तनिवृत्तिस्वराचा हा चुस्वर अपवाद आहे. तेव्हां हा चुस्वर उदात्तनिवृत्तिस्वराचा जसा बाध करतो तसा प्रत्ययस्वराचाही बाध करील.[3]

---

२. हा मतीशब्द आहे. तेव्हां ' वत्याः ' असें एकच सूत्र केलें असतां राजवती येथें दोष येत नाहीं.

३. कारण वत्व असिद्ध मानलें तर या सूत्रांना कोठें उदाहरणच मिळणार नाहीं. तात्पर्य, सूत्रसामर्थ्यास्तव वत्व सिद्ध मानावें लागतें.

१. ( सू. २२२ ) अञ्चु या धातूंतील चु या भागाचें येथें अनुकरण करून पुढें सप्तमी चौ अशी केली आहे. उकार इत्संज्ञकच आहे, व ञकार हा मूळचा नकार आहे; त्याला अनुस्वार व परसवर्ण होऊन ञकार झाला आहे. तेव्हां ज्या ठिकाणीं अञ्च् धातूंतील अकार व नकार लुप्त होऊन फक्त चकारच राहिला असेल तेथें तो पुढें असतांना पूर्वीच्या शब्दाला अन्त उदात्त होतो. उदा०-दधीचः, दधीचा.

२. येथें दध्यच् शब्दाहून तस्येदम् (४।३।१२०) यानें अण् हा तद्धित प्रत्यय झाला आहे.

३. उदात्तनिवृत्तिस्वर हा प्रत्ययस्वर कायम ठेवणारा आहे. तेव्हां अर्थातच ह्या चुस्वरानें उदात्तनिवृत्तिस्वराचा बाध झाला कीं प्रत्ययस्वराचा बाध होतोच. तेव्हां ' अतद्धिते ' हें वार्तिक केलें पाहिजे.

बाधेत ॥ नात्रोदात्तनिवृत्तिस्वरः प्राप्नोति । किं कारणम् । न गोश्वन्साववर्ण [ ६. १. १८२ ] इति प्रतिषेधात् । नैष उदात्तनिवृत्तिस्वरस्य प्रतिषेधः । कस्य तर्हि । तृतीयादिस्वरस्य ॥ यत्र तर्हि तृतीयादिस्वरो नास्ति । दधीचः पश्येति ॥ एवं तर्हि न तृतीयादिलक्षणस्य प्रतिषेधं शिष्मः । किं तर्हि । येन केनचिल्लक्षणेन प्राप्तस्य विभक्तिस्वरस्य प्रतिषेधम् । यदि विभक्तिस्वरस्य प्रतिषेधो वृक्षवान् प्लक्षवान् अत्र न प्राप्नोति । मतुब्ग्रहणमपि प्रकृतमनुवर्तते । क्व प्रकृतम् । ह्रस्वनुड्भ्यां मतुप् [ १७६ ] इति । यदि तदनुवर्तते वेतस्वानित्यत्र प्राप्नोति । मतुब्ग्रहणमनुवर्तते ड्मतुप् चैषः । यदि तर्हि मतुब्ग्रहणे ड्मतुपो ग्रहणं न भवति वेतस्वानित्यत्र वत्वं न प्राप्नोति । सामान्यग्रहणं वत्व इह पुनर्विशिष्टस्य ग्रहणम् ॥ यत्र तर्हि विभक्तिर्नास्ति । दधी-

---

पण या चुस्वराविषयीं उदात्तनिवृत्तिस्वराची प्राप्तीच येत नाहीं. कारण, ' न गोश्वन्साववर्ण० ' ( ६।१।१८२ ) यानें त्याचा प्रतिषेध केला आहे.

'न गोश्वन्० ' हें सूत्र उदात्तनिवृत्तिस्वराचा निषेध करीत नाहीं, तर तें कोणत्याही सूत्रानें प्राप्त झालेल्या तृतीयादिविभक्तिस्वराचा निषेध करतें. शिवाय, जेथें तृतीयादिस्वर प्राप्त होत नाहीं, म्हणजे दधीचः पश्य येथें, तेथें चुस्वरच उदात्तनिवृत्तिस्वराचा बाध करतो.

असें आहे तर मग ' न गोश्वन्०' हा कोणत्याही सूत्रानें आलेल्या तृतीयादिविभक्तिस्वराचा निषेध आहे असें आम्ही म्हणत नाहीं. तर कोणत्याही सूत्रानें प्राप्त झालेल्या विभक्तिस्वराचा निषेध आहे असें म्हणतों.

जर ' न गोश्वन्० ' हा विभक्तिस्वराचा निषेध असेल तर वृक्षवान् प्लक्षवान् येथें मतुप् हा विभक्ति-प्रत्यय नसल्यामुळें 'न गोश्वन्०' या निषेधाची प्रवृत्ति होणार नाहीं; आणि ' ह्रस्वनुड्भ्यां मतुप् ' यानें मतुपाला उदात्त होऊं लागेल.

पण मतुप्स्वराचा निषेध होण्याकरितां ' न गोश्वन्०' येथें मतुप्ग्रहणाचीही मागून अनुवृत्ति येत आहे.

मागें कोठें बरें मतुप्ग्रहण आहे ?

ह्रस्वनुड्भ्यां मतुप् ( ६।१।१७६ ) येथें.

तर मग वेतस्वान् येथेंही उदात्तनिवृत्तिस्वराचा 'न गोश्वन्०' यानें निषेध होऊं लागेल.

पण तेथें मतुप् ग्रहणाची अनुवृत्ति आहे आणि वेतस्वान् येथें तर ड्मतुप् प्रत्यय ( ४।२।८७ ) केला आहे; मतुप् केला नाहीं.

जर मतुप्-ग्रहणानें ड्मतुपाचें ग्रहण होणार नाहीं, तर वेतस्वान् येथें वत्व प्राप्त होत नाहीं.

पण वत्वविधीचे ठिकाणीं मतोः असें सामान्य म्हटलें आहे तेव्हां येथें त्या मतुशब्दानें मतुप् आणि ड्मतुप् या दोघांचेंही ग्रहण होतें. आणि प्रकृत स्थलीं मतुप् असें अनुबंधविशिष्टाचें ग्रहण केलें असल्यामुळें ड्मतुपाचें ग्रहण[५] होत नाहीं. म्हणून वेतस्वान् येथें ' न गोश्वन्० ' हा निषेध लागू पडत नाहीं.

तर मग जेथें विभक्ति नाहीं असें दधीची हें उदाहरण[६] घ्यावें. शिवाय ' न गोश्वन्० ' हा

---

४. तेव्हां दधीचा येथें उदात्तनिवृत्तिस्वराचा चुस्वरानेंच बाध केला पाहिजे.

५. कारण, एकाच अनुबंधाचें उच्चारण केलें असतां तेथें तेवढाच अनुबंध ज्या प्रत्ययामध्यें आहे अशाचें ग्रहण संभवत असतांना ज्याला ज्यास्त अनुबंध आहेत त्याचें ग्रहण करूं नये अशी परिभाषा आहे.

६. तेव्हां येथें उदात्तनिवृत्तिस्वराचा चुस्वरानेंच बाध होतो असें म्हटलें पाहिजे. तेव्हां हा चुस्वर प्रत्ययस्वराचाही बाधक होणार. म्हणून 'अतद्धिते' हें वार्तिक केलें पाहिजे.

चीति ॥ यदि पुनरयमुदात्तनिवृत्तिस्वरस्यापि प्रतिषेधो विज्ञायेत । नैवं शक्यम् । इहापि प्रसज्येत । कुमारीति ॥ सति शिष्टः खल्वपि चुस्वरः । कथम् । चावित्युच्यते । यत्रास्यैतद्रूपम् । अजादावसर्वनामस्थानेऽभिनिर्वृत्ते ऽकारलोपे नकारलोपे च ॥ तस्मात्सुष्ठूच्यते चोरतद्धित इति ॥

**समासस्य ॥ ६ । १ । २२३ ॥**

**समासान्तोदात्तत्वे व्यञ्जनान्तेषूपसंख्यानम् ॥ १ ॥**

समासान्तोदात्तत्वे व्यञ्जनान्तेषूपसंख्यानं कर्तव्यम् । राजदृषत् ब्राह्मणसमित् ॥

**हल्स्वरप्राप्तौ वा व्यञ्जनमविद्यमानवत् ॥ २ ॥**

अथवा हल्स्वरप्राप्तौ व्यञ्जनमविद्यमानवद्भवतीत्येषा परिभाषा कर्तव्या ॥ किमर्थमिदमुभयमुच्यते न हल्स्वरप्राप्तावविद्यमानवदित्येवोच्येत स्वरप्राप्तौ व्यञ्जनमविद्यमानवदिति वा । द्विर्बद्धं सुबद्धं भव-

---

निषेध सामान्यतः उदात्त-निवृत्तिस्वराचा समजणें शक्य नाहीं. कारण कुमारी येथेही ङीप् प्रत्ययाला जो उदात्त निवृत्ति स्वर होतो त्याचा निषेध होईल. शिवाय, चुस्वर हा प्रत्यय-स्वरापेक्षां सतिशिष्ट आहे.

तो कसा ?

चौ असें म्हटलें आहे. म्हणजे अञ्च् धातूचें 'चु' असें रूप बनलें असतां हा स्वर येणारा आहे.

तें ' चु ' असें स्वरूप केव्हां बनतें ?

यकारादि किंवा अजादि असर्वनामस्थान प्रत्यय पुढें असतांना नकारलोप झालेल्या अञ्च् धातूच्या अकाराचा लोप झाला असतां ' चु ' असें रूप बनतें. तेव्हां सतिशिष्ट चुस्वर बलवान् असल्यामुळें प्रत्ययस्वराचा बाध करील. सबब ' चोरतद्धिते ' हें वचन आवश्यक आहे.

( सू. २२३ वा. १ ) समासाला सांगितलेला जो हा अंतोदात्त त्याविषयीं व्यंजनान्त समासांचें ठिकाणीं अन्तोदात्ताचें उपसंख्यान करावें. उदा०- राजदृषत्, ब्राह्मणसमित्.

( वा. २ ) किंवा हलाला म्ह. व्यंजनाला स्वर प्रसक्त झाला असतां तें व्यंजन नसल्यासारखें समजावें, अशी परिभाषा पठन करावी.

पण या परिभाषेमध्यें हल्-ग्रहण व व्यंजन-ग्रहण या दोघांचें ग्रहण करण्याचें काय कारण ? तसें करूं नये. तर ' हल्स्वरप्राप्तावविद्यमानवत् ' किंवा ' स्वरप्राप्तौ व्यंजनमविद्यमानवत् ' असें म्हणावें.

द्विर्बद्धं सुबद्धं भवति ' या न्यायाला अनुसरून तसें म्हटलें आहे.

---

७. तेव्हां अण् हा तद्धित प्रत्यय केला त्याच वेळी प्रत्ययस्वर होणार आहे आणि त्या प्रत्ययामुळें भ संज्ञा ( १।४।१८ ) झाल्यानंतर आणि अकाराचा लोप ( ६।४।१३८ ) झाल्यानंतर हा चुस्वर होणार आहे.

१. ( सू. २२३ ) समासाचा अन्त उदात्त होतो. उदा०-राजपुरुषः.

२. व्यञ्जनान्त समास असेल तेथें शेवटचें व्यंजन एक असेल किंवा अनेक असतील ती सोडून त्यांच्या मागील अचाला उदात्त होतो असें या वार्तिकाचें तात्पर्य आहे.

३. जसें एखाद्या गाठोड्याला दोन ठिकाणीं गांठी दिल्या म्हणजे तें बळकट बांधलें जातें तसें या परिभाषेमध्यें हल् आणि व्यंजन असे दोनही शब्द घातल्यामुळें परिभाषेचा अर्थ दृढ होतो व कांहीं शंका उरत नाहीं. नाहीं तर ' हलाला स्वर प्राप्त झाला असतां नसल्यासारखा समजावा ' एवढेंच म्हटलें तर ' कोण नसल्यासारखा समजावा ' अशी शंका येते. तसेंच ' स्वर प्राप्त झाला असतां व्यंजन नसल्यासारखें समजावें ' एवढेंच म्हटलें तर ' कोणाला स्वर प्राप्त झाला असतां' अशी शंका येते. आतां या शंकांचें विचार करून जें निराकरण करावयाचें त्यापेक्षां मुळीं शंका येऊंच नये अशा तऱ्हेनें बोलणें चांगलें.

तीति ॥ यदि हल्स्वरप्राप्तौ व्यञ्जनमविद्यमानवद्भवतीत्युच्यते दधि उदात्तादनुदात्तस्य स्वरितः [ ८. ४. ६६ ] इति स्वरितत्वं न प्राप्नोति । उदात्ताच्च स्वरितविधौ व्यञ्जनमविद्यमानवद्भवतीत्येषा परिभाषा कर्तव्या ॥

कान्येतस्याः परिभाषायाः प्रयोजनानि ।

**प्रयोजनं लिदाद्युदात्तान्तोदात्तविधयः ॥ ३ ॥**

लिति प्रत्ययात्पूर्वमुदात्तं भवतीतीहैव स्यात् भौरिकिविधम् भौलिकिविधम् । चिकीर्षकः जिहीर्षक इत्यत्र न स्यात् ॥ ञ्नित्यादिर्नित्यम् [ ६. १. १९७ ] इतीहैव स्यात् अहिचुम्बकायनिः आग्निवेश्यः । गार्ग्यः कृतिरित्यत्र न स्यात् ॥ धातोरन्त उदात्तो भवतीतीहैव स्यात् ऊर्णोति । पचतीत्यत्र न स्यात् ॥

इदं तावदयुक्तं यदुच्यते हल्स्वरप्राप्तौ व्यञ्जनमविद्यमानवद्भवतीति । कथं हि हलो नाम स्वरप्राप्तिः स्यात् । तत्रापि ब्रुवतो-

---

जर हलाला स्वराची प्राप्ती आली असेल तरच व्यंजन अस्तित्वांत नाहीं असें समजलें तर दधि येथें ' उदात्तादनुदात्तस्य स्वरितः ' ( ८।४।६६ ) हा स्वर प्राप्त होऊं शकत नाहीं.[4]

' उदात्ताच्च स्वरितविधौ व्यञ्जनमविद्यमानवत् ' म्हणजे 'उदात्ताहून पुढच्याला स्वरित कर्तव्य असतांना व्यंजन नसल्यासारखें समजावें ' अशी परिभाषा करावी.

आतां ' हल्स्वरप्राप्तौ ' या परिभाषेचीं उदाहरणें कोणती ?

( वा. ३ ) लित्स्वरविधि, आद्युदात्तविधि व अन्तोदात्तविधि हीं या परिभाषेचीं प्रयोजनें होत. उदा० लिति (६ । १ १९२ ) यानें प्रत्याच्या पूर्वीच्याला सांगितलेला उदात्त भौरिकिविधम् इत्यादि ठिकाणींच[5] होईल, आणि चिकीर्षकः जिहीर्षकः येथें होणार नाहीं. तसेंच ' ञ्नित्यादिर्नित्यम् ' (६ । १ । १९७ ) हा आद्युदात्त अहिचुम्बकायनिः आग्निवेश्यः येथेंच[6] होईल आणि गार्ग्यः कृतिः येथें होणार नाहीं. तसाच ' धातोः ' हा अन्तोदात्तस्वर ऊर्णोति येथेंच होईल आणि पचति येथें होणार नाहीं.

आतां येथें हलाला स्वर प्राप्त झाला असतां असें जें म्हटलें आहे तें अयुक्त वाटतें. कारण, उदात्त वगैरे हे अचांचे धर्म असल्यामुळें हलाला उदात्तादिकांची प्राप्ती कशी बरें येईल ! शिवाय हल्स्वरप्राप्तौ० ही परिभाषा स्वीकारली

---

४. कारण, येथें उदात्त अशा अकाराहून पुढील अनुदात्त इकाराला स्वरित करावयाचा आहे; तो धकारानें व्यवधान येत असल्यामुळें होणार नाहीं. हलाला स्वर प्राप्त झाला नसल्यामुळें येथें धकाराला अविद्यमानवद्भाव होणार नाहीं.

५. भौरिकि शब्दाहून विधल् प्रत्यय (४।२।५४) केला आहे. येथें विधल् या लित् प्रत्ययाच्या पूर्वी अव्यवहित इकार आहे म्हणून स्वर होईल. चिकीर्ष या सन्-प्रत्ययान्त धातूहून ण्वुल् प्रत्यय (३।१।१३३) त्याला अक आदेश व मागील अकाराचा लोप ( ६।४। ४८ ) हीं कार्यें झाल्यानंतर लिति या सूत्रानें ईकाराला उदात्त होतो तो होणार नाहीं. कारण रेफ आणि षकार यांनी व्यवधान येत आहे.

६. अहिचुम्बक शब्दाहून फिञ् प्रत्यय ( ४।१। १६० ) केला आहे आणि अग्निवेश शब्दाहून यञ् प्रत्यय ( ४।१।१०५ ) केला आहे. येथें ञित्-प्रत्ययान्त शब्दस्वरूपाच्या आरंभीं अच् असल्यामुळें त्याला उदात्त होईल. आणि गार्ग्य या ञित्-प्रत्ययान्ताच्या आरंभीं आणि कृति या क्तिन्-प्रत्ययान्ताच्या आरंभीं गकार व ककार असल्यामुळें उदात्त होणार नाहीं.

दात्ताच्च स्वरितविधाविति वक्तव्यम् । तथानुदात्तादेरन्तोदात्ताच्च यदुच्यते तद्व्यञ्जनादेर्व्यञ्जनान्ताच्च न प्राप्नोति ॥ यदि पुनः स्वरविधौ व्यञ्जनमविद्यमानवद्भवतीत्युच्येत । अथ स्वरविधौ व्यञ्जनमविद्यमानवद्भवतीत्युच्यमाने ऽनुदात्तादेरन्तोदात्ताच्च यदुच्यते तत्किं सिद्धं भवति व्यञ्जनादेर्व्यञ्जनान्ताच्च । बाढं सिद्धम् । कथम् । स्वरविधिरिति सर्वविभक्त्यन्तः समासः । स्वरेण विधिः स्वरविधिः स्वरस्य विधिः स्वरविधिरिति । नैवं शक्यम् । इह हि दोषः स्यात् । उदश्वित्वान्घोषः विद्युत्वान्बलाहक इति ह्रस्वनुड्भ्यां मतुप् [ ६. १. १७६ ] इत्येष स्वरः प्रसज्येत ॥

अस्तु तर्हि हल्स्वरप्राप्तौ व्यञ्जनमविद्यमानवद्भवतीति । ननु चोक्तं कथं हि हलो नाम स्वरप्राप्तिः स्यादिति । उच्चैरुदात्तः [ १. २. २९ ] इत्यत्र षष्ठीनिर्दिष्टमज्ग्रहणं निवृत्तं तस्मिन्निवृत्ते हलोऽपि स्वरप्राप्तिर्भवति ॥ यदप्युच्यत उदात्ताच्च स्वरित-

---

तरी तेवढ्यानें भागत नाहीं म्हणून ‘उदात्ताच्च स्वरितविधौ’ हें वचन करावें लागतेंच. तसेंच अनुदात्तादि शब्दाहून आणि अन्तोदात्त शब्दाहून जें कार्य सांगितलें आहे तें कार्य व्यंजनादि किंवा व्यंजनान्त अशा शब्दाहून प्राप्त होत नाहीं.

आतां जर ‘हल्स्वरप्राप्तौ०’ याच्या ऐवजी ‘स्वरविधौ व्यंजनमविद्यमानवत्’ ही परिभाषा घेतली तर —

तर काय, ‘स्वरविधि कर्तव्य असतांना व्यंजन नसल्यासारखें समजावें’ अशी परिभाषा घेतली म्हणजे अनुदात्तादि शब्दाहून व अंतोदात्त शब्दाहून सांगितलेलें कार्य व्यंजनादि किंवा व्यंजनान्ताहून सिद्ध होतें काय?

होय. खात्रीनें सिद्ध होत आहे.

तें कसें?

असें कीं– स्वरविधि येथें स्वर शब्दाचा विधि शब्दाशीं समास अनेक विभक्तींचे अर्थ मनांत घेऊन केला आहे.[९] उदा०—स्वरेण विधिः स्वरविधिः, स्वरस्य विधिः स्वरविधिः.

पण स्वरविधौ याचा असा अर्थ समजणें शक्य नाहीं. कारण उदश्वित्वान् घोषः तसेंच विद्युत्वान् बलाहकः येथें तकाराला अविद्यमानवद्भाव झाल्यामुळें ‘ह्रस्वनुड्भ्याम्०’ (६।१।१७६) यानें मतुपाला उदात्त होऊं लागेल असा दोष येतो.

तर मग ‘हल्स्वरप्राप्तौ०’ अशीच परिभाषा असूं दे.

पण उदात्त वगैरे हे अचांचे धर्म असल्यामुळें हलाला उदात्तादिकांची प्राप्ति कशी बरें येईल असें म्हटलें आहे ना?

उच्चैरुदात्तः (१।२।२९) व नीचैरनुदात्तः (१।२।३०) या सूत्रांमध्यें षष्ठ्यन्त अच्-ग्रहणाची अनुवृत्ति येत नाहीं. तेव्हां हलांचे स्थानींही उदात्त वगैरे स्वर होतील. आतां दधि

---

७. अनुदात्त आरंभीं असलेल्या शब्दाहून अञ् प्रत्यय (४।२।४४) सांगितला आहे. तसाच उदात्त शेवटीं असलेल्या शब्दाहून ठञ् प्रत्यय (४।३।६७) सांगितला आहे.

८. अनुदात्तादि शब्दाहून अञ् प्रत्यय सांगितला आहे आणि अन्तोदात्त शब्दाहून ठञ् प्रत्यय सांगितला आहे. हे स्वरविधी नव्हेत. तेव्हां हे कर्तव्य असतांना व्यंजनाला अविद्यमानवद्भाव होणार नाहीं या अभिप्रायानें हा आक्षेप घेतला आहे.

९. तेव्हां ज्या ठिकाणीं स्वराचा संबंध निमित्त उद्देश्य किंवा विधेय यांपैकीं कोणत्याही रूपानें होत असेल त्याला स्वरविधि म्हणतां येतें. म्हणून ‘अनुदात्तादेरञ्’ हाही स्वरविधि होत असल्यामुळें तो कर्तव्य असतांना व्यंजनाला अविद्यमानवद्भाव होईल.

विधाविति वक्तव्यमिति न वक्तव्यम् । नेदं पारिभाषिकस्यानुदात्तस्य ग्रहणम् । किं तर्हि । अन्वर्थग्रहणम् । अविद्यमानोदात्तमनुदात्तं तस्य स्वरित इति ॥ यदप्युच्यतेऽनुदात्तादेरन्तोदात्ताच्च यदुच्यते तद्व्यञ्जनादेर्व्यञ्जनान्ताच्च न प्राप्नोतीत्याचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयति सिद्धं तद्भवति व्यञ्जनादेर्व्यञ्जनान्ताच्चेति यदयं नोत्तरपदेऽनुदात्तादावित्युक्त्वा पृथिवीरुद्रपूषमन्थिष्विति प्रतिषेधं शास्ति ॥ सा तर्ह्येषा परिभाषा कर्तव्या । न कर्तव्या । आचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयति भवत्येषा परिभाषेति यदयं यतोऽनावः [ ६. १. २१३ ] इति नावः प्रतिषेधं शास्ति ॥

इति श्रीभगवत्पतञ्जलिविरचिते व्याकरणमहाभाष्ये षष्ठस्याध्यायस्य प्रथमे पादे षष्ठमाह्निकम् ॥ पादश्च समाप्तः ॥

---

येथें स्वरित स्वर ( ८।४।६६ ) होण्याकरितां उदात्ताहून अनुदात्ताला स्वरित स्वर कर्तव्य असतां व्यंजन अविद्यमान समजावें, अशी परिभाषा केली पाहिजे असें जें म्हटले आहे तें म्हणावयास नको. कारण ' उदात्तादनुदात्तस्य० ' येथें अनुदात्त-ग्रहण केलें आहे तें ' नीचैरनुदात्तः ' यानें ठरविलेल्या अनुदात्ताचें ग्रहण नव्हे तर ' अविद्यमान आहे उदात्त ज्यामध्यें तें अनुदात्त ' असें अन्वर्थ अनुदात्ताचें ग्रहण आहे. तेव्हां उदात्ताच्या पुढें असलेल्या तशा अनुदात्ताला स्वरित होतो.[१०]

आतां अनुदात्तादि शब्दाहून आणि अन्तोदात्त शब्दाहून सांगितलेलें कार्य व्यंजनादि किंवा व्यंजनान्त अशा शब्दाहून प्राप्त होत नाहीं असें जें म्हटलें आहे त्यावर उत्तर :– आचार्यांची प्रवृतीच ज्ञापन करीत आहे कीं–ज्या अर्थी हे आचार्य ' नोत्तरपदेऽनुदात्तादौ० ' ( ६।२। १४२ ) असें म्हणून त्याच सूत्रामध्यें ' अपृथिवीरुद्रपूषमन्थिषु ' हा प्रतिषेध करीत आहेत त्या अर्थी ' स्वराला उद्देशून सांगितलेला विधि कर्तव्य असतांना व्यंजन अविद्यमान समजावें '. तेव्हां अनुदात्तादि शब्दाहून सांगितलेलें कार्य व्यंजनादि शब्दाहून होईल; तसेंच अन्तोदात्त शब्दाहून सांगितलेलें कार्य व्यंजनान्त शब्दाहून होईल.

तरी पण राजदृषत् वगैरे स्थलीं 'समासस्य' या प्रकृत सूत्रानें हलाला स्वरप्राप्ति आली असतां ' हल्स्वरप्राप्तौ० ' ही परिभाषा करावी लागणारच आहे ना ?

ती ही परिभाषा अपूर्व करावयास नको. कारण, ही परिभाषा आहे असें आचार्यांची प्रवृतीच ज्ञापन करीत आहे. कारण हे आचार्य ' यतोऽनावः ' ( ६।१।२१३ ) यानें द्व्यच्क-प्रत्ययान्ताच्या आदीला उदात्त सांगून नाव्य शब्दाला तो स्वर न व्हावा म्हणून अनावः असा त्याच सूत्रामध्यें प्रतिषेध करीत आहेत.

याप्रमाणें श्रीभगवान् पतंजलींनीं रचिलेल्या व्याकरणमहाभाष्यांतील सहाव्या अध्यायाच्या पहिल्या पादांतील सहावें आह्निक समाप्त झालें व पादही समाप्त झाला.

---

१०. तेव्हां दधि येथें धि एवढा भाग अनुदात्त पदानें घेतां येतो. तो उदात्त अकाराच्या पुढें अव्यवहित असल्यामुळें त्याला स्वरित होईल व स्वरित होईल तो इकारालाच होईल. कारण उदात्त वगैरे हे अचाचेच धर्म आहेत.

अध्याय ६ पाद १ आह्निक ६ समाप्त; पादही समाप्त.

**बहुव्रीहौ प्रकृत्या पूर्वपदम् ॥ ६। २ । १ ॥**[1]

किमर्थमिदमुच्यते ।

**बहुव्रीहिस्वरं शास्ति समासान्तविधेः सुकृत् ।**

सुकृदाचार्यः समासान्तोदात्तत्वे प्राप्ते बहुव्रीहिस्वरमपवादं शास्ति ॥ नैतदस्ति प्रयोजनम् ।

**नञ्सुभ्यां नियमार्थं तु**

नञ्सुभ्याम् [ ६. २. १७२ ] इत्येतन्नियमार्थं भविष्यति । नञ्सुभ्यामेव बहुव्रीहेरन्त उदात्तो भवति नान्यस्येति ॥ एवमपि कुत एतत्पूर्वपदप्रकृतिस्वरत्वं भविष्यति न पुनः परस्येति ।

**परस्य शितिशासनात् ॥ १ ॥**

शितेर्नित्याबह्वच् [ १३८ ] इत्येतन्नियमार्थं भविष्यति । शितेरेव नान्यत इति ॥ यत्तावदुच्यते नञ्सुभ्यां नियमार्थमिति

**क्षेपे विधिर्नञोऽसिद्धः**

उदराश्वेषुषु क्षेपे [ १०७–१०८ ] इत्ये-

---

(सू. १ ) हें पूर्वपदप्रकृतिस्वराचें विधान कशाकरितां केलें आहे ?

(श्लो. १ ) समासाला अन्तोदात्त स्वर प्राप्त झाला असतां त्याचा अपवाद म्हणून बहुव्रीहि समासामध्यें पूर्वपदप्रकृतिस्वराचें विधान आचार्य करीत आहेत.

हें प्रयोजन होऊं शकत नाहीं.

नञ्सुभ्याम् ( ६।२।१७२ ) या सूत्रानें बहुव्रीहि समासामध्यें नञ् व सु यांच्या पुढील उत्तरपदाला अन्तोदात्त सांगितला आहे. तेथें समासस्य ( ६।१।२२३ ) यानेंच इष्टसिद्धि होत असल्यामुळें हें सूत्र नियमार्थ होतें—तो नियम असा कीं बहुव्रीहीमध्यें जर उत्तरपदाच्या अन्ताला उदात्त करणें असेल तर नञ् व सु यांच्याहून पुढच्याच उत्तरपदाला करावा.

पण हा नियम घेतला तरी पूर्वपदालाच प्रकृतिस्वर होईल व उत्तरपदाला होणार नाहीं हें कशावरून ?

शितेर्नित्याबह्वज्बहुव्रीहावभसत् ( ६।२।१६८ ) यानें शिति शब्दाच्या पुढील उत्तरपदाला शितिपादः येथें प्रकृतिस्वर सांगितला आहे. तें सूत्र नियमार्थ होईल. तो नियम असा कीं बहुव्रीहीमध्यें उत्तरपदाला जर प्रकृतिस्वर होत असेल तर शिति शब्दाहून परालाच तो होतो, एरवीं होत नाहीं.

आता नञ्सुभ्याम् हें सूत्र नियमार्थ होईल असें जें म्हटलें आहे त्यावर उत्तर—

(श्लो. २) अनुदरः येथें निन्दा गम्यमान असतांना नञ् व सु यांच्या पुढील उत्तरपदाला अन्तोदात्तस्वराचा तो विधि होईल. तेथें अन्तोदात्त सिद्ध होत नाहीं. कारण तेथें 'उदराश्वेषुषु' व 'क्षेपे' ( ६।२।१०७,१०८ ) या सूत्रांनीं समासान्तोदात्ताचा बाध करून पूर्वपदान्तोदात्त प्राप्त झाला आहे. त्याच्या बाधनासाठीं 'नञ्-

---

१. ( सू. १ ) बहुव्रीहीमध्यें पूर्वपदाला प्रकृतिस्वर होतो म्हणजे पूर्वपदाचा मूळचा जो स्वर असेल तोच कायम राहतो. आणि उत्तरपदाला शेष-निघातानें ( ६।१।१५८ ) सर्वानुदात्त होतो. हें सूत्र नसतें तर पूर्व सूत्रानें समासाचा अन्त उदात्त झाला असता. त्याचाच फक्त निषेध केला असता तर दोन्ही पदांचे मूळचे स्वर कायम राहिले असते. ते न रहावे व फक्त पूर्वपदाचेच स्वर कायम रहावे याकरितां हें सूत्र केलें आहे. ज्या ठिकाणीं पूर्वपदामध्यें कोठेंही उदात्त किंवा स्वरित मूळचा असेल त्या ठिकाणीं समास केल्यानंतरही तो पूर्वपदाचाच स्वर कायम राहतो. पूर्वपदामध्यें उदात्त किंवा स्वरित नसेल तर त्या ठिकाणीं हें सूत्र प्रवृत्त होत नाहीं. तेथें पूर्व सूत्रानें अन्त उदात्तच होतो.

बस्मिन्प्राप्ते तत एतदुच्यते ॥ यदप्युच्यते परस्य शितिशासनादिति

परस्य नियमो भवेत् ।

परस्यैष नियमः स्यात् । शितेर्नित्याबह्वजेव नान्यदिति ॥

यदि पूर्वपदप्रकृतिस्वरत्वं समासान्तोदात्तत्वं बाधते चप्रियः वाप्रियः अत्रापि बाधेत ।

अन्तश्च वाप्रिये सिद्धः

अन्तोदात्तत्वं च वाप्रिये सिद्धम् । कुतः ।

संभवात्

असति खल्वपि संभवे बाधनं भवत्यस्ति च संभवो यदुभयं स्यात् ॥ सत्यपि संभवे बाधनं भवति । तद्यथा । दधि ब्राह्मणेभ्यो दीयतां तक्रं कौण्डिन्यायेति सत्यपि संभवे दधिदानस्य तक्रदानं निवर्तकं भवति । एवमिहापि सत्यपि संभवे पूर्वपदप्रकृतिस्वरत्वं समासान्तोदात्तत्वं बाधिष्यते ॥ एवं तर्हि

प्रकृताद्विधेः ॥ २ ॥

बहुव्रीहौ प्रकृत्या पूर्वपदं प्रकृतिस्वरं

---

सुभ्याम् ' हें सूत्र उपयोगीं पडेल.

तसेंच, शिति शब्दाच्या पुढील उत्तरपदाला प्रकृतिस्वराचें अनुशासन केलें असल्यानें उत्तरपदाला प्रकृतिस्वराची निवृत्ति होईल असें जें म्हटलें आहे त्यावर उत्तर—

फक्त शिति शब्दापुढील उत्तरपदासंबंधानें तो नियम होईल म्हणजे शिति शब्दाहून उत्तरपदाला जर प्रकृतिस्वर होत असेल तर नेहमीं बहुच्क नव्हे अशाच उत्तरपदाला तो होतो असा नियम होईल[३].

आतां जर पूर्वपदप्रकृतिस्वर समासान्तोदात्त स्वराचा बाध करीत आहे तर चप्रियः[४] तसेंच वाप्रियः येथेंही बाध करील.

चप्रियः तसेंच वाप्रियः येथें समासाचा अन्तोदात्त साधत आहे.

तो कसा ? तो असा कीं— अपवादाबरोबर जर उत्सर्गाचा संभव नसता तर अपवादानें उत्सर्गाचा बाध केला असता. पण येथें अपवाद आणि उत्सर्ग या दोघांचाही समावेश होण्याचा संभव आहे[५].

उत्सर्ग आणि अपवाद यांचा समावेश होण्याचा संभव असला तरीही अपवाद उत्सर्गाचा बाध करूं शकतो. उदा०—ब्राह्मणांना दहीं द्यावें आणि कौंडिन्य नांवाच्या ब्राह्मणाला ताक द्यावें असें सांगितलें असतां अपवाद अशा तक्रदानाबरोबर दधिदानाचा संभव आहे तरीही तक्रदानानें दधिदानाचा बाध होतो. त्याप्रमाणें येथेंही अपवादाबरोबर उत्सर्गाचा संभव आहे तरी पूर्वपदप्रकृतिस्वर हा समासान्तोदात्तस्वराचा बाध करील.

असें आहे तर— ?

विशेष स्वराचें प्रकरण चालू असल्यामुळें

---

२. तेव्हां 'नञ्सुभ्याम्' हें सूत्र व्यर्थ होत नसल्यामुळें नियमार्थ म्हणतां येत नाहीं.

३. तात्पर्य, नञ्सुभ्याम् हें सूत्र व्यर्थच होत नाहीं. 'शितेर्नित्या०' हें सूत्र नियमार्थ म्हणतां आलें तरी आपल्याला पाहिजे तसाच तो नियम करावा याविषयीं प्रमाण नाहीं. म्हणून प्रकृत सूत्र केलें पाहिजे असें सिद्ध होतें.

४. च शब्दाचा तसेंच वा शब्दाचा प्रिय शब्दाबरोबर बहुव्रीहि केला आहे. च आणि वा हीं अव्ययें अनुदात्त आहेत. येथें समासाचा अन्त उदात्त इष्ट आहे.

५. येथें पूर्वपदामध्यें जर उदात्त किंवा स्वरित असता तर प्रकृत सूत्रानें तो कायम ठेवला की त्याच्याबरोबर शेषनिघात प्राप्त होऊन समासाच्या अन्ताला उदात्त करतां आला नसता. पण तसें नसल्यामुळें पूर्वपदाला प्रकृत सूत्रानें प्रकृतिस्वरही करतां येतो आणि समासाच्या अन्ताला उदात्तही करतां येतो.

भवतीति। किं च प्रकृतम्। उदात्त इति च वर्तते॥ एवमपि कार्यप्रियः हार्यप्रियः अत्र न प्राप्नोति। स्वरितेऽप्युदात्तोऽस्ति। अथवा स्वरितग्रहणमपि प्रकृतमनुवर्तते। क्व प्रकृतम्। तित्स्वरितम् [ ६. १. १८५ ] इति॥

**बहुव्रीहावृते सिद्धम्**

अन्तरेण बहुव्रीहिग्रहणं सिद्धम्। तत्पुरुषे कस्मान्न भवति। तत्पुरुषे तुल्यार्थतृतीयासप्तम्युपमानाव्ययद्वितीयाकृत्याः [ ६. २. २ ] इत्येतन्नियमार्थं भविष्यति। द्विगौ तर्हि कस्मान्न भवति। इगन्ते द्विगावित्येतन्नियमार्थं भविष्यति। द्वन्द्वे तर्हि प्राप्नोति। राजन्यबहुवचनद्वन्द्वेऽन्धकवृष्णिषु [ ३४ ] इत्येतन्नियमार्थं भविष्यति। अव्ययीभावे तर्हि प्राप्नोति। परिप्रत्युपापा वर्ज्यमानाहोरात्रावयवेषु [ ३३ ] इत्येतन्नियमार्थं भविष्यति॥ एवमपि कुत एतदेवं नियमो भविष्यत्येतेषामेव तत्पुरुषादिष्विति न पुनरेवं

---

त्याचेंच ह्या प्रकृतिस्वरानें विधान केलें आहे म्हणून दोष येत नाहीं.

कोणत्या बरें स्वराचें प्रकरण चालू आहे ?

उदात्ताचें प्रकरण चालू आहे.

पण पूर्वपदांतील उदात्त स्वर प्रकृतीनें राहतो असें म्हटलें तर कार्यप्रियः[६] तसेंच हार्यप्रियः येथें पूर्वपदामध्यें स्वरित असल्यामुळें तो प्रकृतिस्वरानें कायम राहणार नाहीं.

स्वरितामध्येंही उदात्त आहेच. किंवा उदात्ताप्रमाणें स्वरिताचीही येथें अनुवृत्ति आणतां येईल.

पण स्वरितग्रहण मागें कोठें बरें आहे ?

'तित्स्वरितम्' ( ६।१।१९५ ) येथें आहे.

( श्लो. ३ ) येथें बहुव्रीहिग्रहण केलें नाहीं तरी त्यावांचूनही बहुव्रीहीमध्येंच पूर्वपदप्रकृतिस्वर ठरत आहे.

पण बहुव्रीहिग्रहण नसेल तर तत्पुरुषामध्यें पूर्वपदप्रकृतिस्वर कां बरें होत नाहीं ?

'तत्पुरुषे तुल्यार्थतृतीयासप्तम्युपमानाव्ययद्वितीयाकृत्याः' हें पुढील सूत्र नियमार्थ होईल[७].

तर मग द्विगु समासामध्यें पूर्वपदप्रकृतिस्वर कां बरें होत नाहीं ?

'इगन्तकालकपालभगालशरावेषु द्विगौ' ( ६।२।२९ ) हें सूत्र नियमार्थ होईल[८].

तर मग द्वंद्वामध्यें पूर्वपदप्रकृतिस्वर प्राप्त होत आहे.

'राजन्यबहुवचनद्वन्द्वेऽन्धकवृष्णिषु' ( ६।२। ३४ ) हें सूत्र नियमार्थ होईल[९].

तर मग अव्ययीभावामध्यें पूर्वपदप्रकृतिस्वर प्राप्त होतो.

'परिप्रत्युपापा वर्ज्यमानाहोरात्रावयवेषु' ( ६।२।३३ ) हें सूत्र नियमार्थ होईल[१०].

पण तत्पुरुष वगैरे समासांमध्यें त्या त्या शब्दांनाच प्रकृतिस्वर होतो असाच नियम

---

६. 'कार्य' ह्या पूर्वपदामध्यें कृ धातूहून ण्यत् प्रत्यय ( ३।१।१२४ ) व त्याला स्वरित (६।१।१८५) आणि मागील अकाराला शेषनिघातानें अनुदात्त अशीं कार्यें झाली आहेत. येथें कार्य या पूर्व पदामध्यें उदात्त स्वर नसल्यामुळें प्रकृत सूत्र प्रवृत्त होणार नाहीं.

७. तत्पुरुषामध्यें जर पूर्वपदाला प्रकृतिस्वर होईल तर इगन्त वगैरे उत्तरपदें पुढें असतांनाच होईल असा नियम समजावा.

८. द्विगु समासामध्यें जर पूर्वपदाला प्रकृतिस्वर होईल तर इगन्त वगैरे उत्तरपदें पुढें असतांनाच होईल असा नियम समजावा.

९. द्वंद्वामध्यें जर पूर्वपदाला प्रकृतिस्वर होईल तर बहुवचनान्त राजन्यवाचक शब्दाच्याच द्वंद्वामध्यें होईल असा नियम समजावा.

१०. अव्ययीभाव समासामध्यें जर पूर्वपदाला प्रकृतिस्वर होईल तर परि, प्रति, उप आणि अप यांनाच होईल असा नियम समजावा.

नियमः स्यादेतेषां तत्पुरुषादिष्वेवेति ।

**इष्टतश्चावधारणम् ।**

इष्टतश्चावधारणं भविष्यति ॥ एतेषां तर्हि बहुव्रीहेश्च पर्यायः प्राप्नोति ।

**द्विपाद्दिष्टेर्वितस्तेश्च**

**पर्यायो न प्रकल्पते ॥ ३ ॥**

यदयं द्वित्रिभ्यां पाद्दन्मूर्धसु बहुव्रीहौ [ १९७ ] दिष्टिवितस्त्योश्च [ ३१ ] इति सिद्धे पर्यायं शास्ति तज्ज्ञापयत्याचार्यो न पर्यायो भवतीति ॥

**उदात्ते ज्ञापकं त्वेतत्**

उदात्त एतज्ज्ञापकं स्यात् ।

**स्वरितेन समाविशेत् ॥**

स्वरितेन समावेशः प्राप्नोति ॥ स्वरितेऽ-

---

कशावरून घेतां येईल ? त्या त्या शब्दांना जर प्रकृतिस्वर होईल तर तत्पुरुष वगैरे समासांमध्येंच होतो असा नियम कां होणार नाहीं[11] ?

जेथें पूर्वपदप्रकृतिस्वर इष्ट आहे तेथेंच 'प्रकृत्या पूर्वपदम्' या शास्त्राची प्रवृत्ति होणें उचित होय. तेव्हां इष्ट असेल तसाच नियम घेतां येईल.

आतां तुल्यार्थ वगैरे पूर्वपदें असलेला असा तत्पुरुष, इगन्त वगैरे उत्तरपदें असलेल्या अशा द्विगु वगैरे समासांना आणि कोणत्याही शब्दांच्या बहुव्रीहीला पूर्व सूत्रानें सांगितलेला अन्तोदात्त आणि 'प्रकृत्या पूर्वपदम्' या प्रकृतसूत्रानें सांगितलेला प्रकृतिस्वर यांचा पर्याय प्राप्त होत आहे.

अशा रीतीनें जर पर्याय होत असेल तर 'द्वित्रिभ्यां पाद्दन्मूर्धसु बहुव्रीहौ' (६।२।१९७) आणि 'दिष्टिवितस्त्योश्च' (६।२।३१) हीं दोन सूत्रें पर्याय होण्याकरितां केलेलीं व्यर्थ होतील[12]. असें असूनही ज्या अर्थी आचार्य तीं सूत्रें करीत आहेत त्या अर्थी पूर्वपदप्रकृतिस्वर आणि समासान्तोदात्तस्वर यांचा पर्याय होत[13] नाहीं असें ते सुचवीत आहेत.

(श्लो. ४) उदात्ताविषयीं हें ज्ञापक होईल. तर मग स्वरिताबरोबर समासान्तोदात्ताचा समावेश होईल[14].

---

११. तत्पुरुषामध्यें तुल्यार्थक वगैरे पूर्वपदांनाच प्रकृतिस्वर होतो असा नियम आहे. तत्पुरुषामध्यें तुल्यार्थ वगैरे पूर्वपदांना प्रकृतिस्वरच होतो असा नियम नसल्यामुळें पूर्व सूत्रानें तेथें समासाला अन्त उदात्तही एकदां होऊं लागेल. याप्रमाणें इगन्त वगैरे उत्तरपद असलेल्या द्विगु समास वगैरेंविषयीं समजावें. तसेंच, प्रकृत सूत्रामध्यें बहुव्रीहिग्रहण नसेल तर समासाला अन्त उदात्त सांगणारें पूर्वसूत्र आणि पूर्वपदप्रकृतिस्वर सांगणारें हें सूत्र या दोहोंची सर्वत्र सारखीच प्राप्ति येत असल्यामुळें सर्वत्र बहुव्रीहींमध्यें पर्याय होऊं लागेल.

१२. द्वित्रिभ्याम्० या सूत्रानें द्विपात् वगैरे कांहीं बहुव्रीहि समासांना अन्त उदात्त विकल्पानें सांगितला आहे. जेव्हां अन्त उदात्त होत नाहीं तेव्हां प्रकृत सूत्रानें पूर्वपदप्रकृतिस्वर होतो. तेव्हां अर्थातच पर्याय सिद्ध होतो. तसेंच 'दिष्टिवितस्त्योश्च' या सूत्रानें पञ्चदिष्टि वगैरे कांहीं द्विगुसमासांमध्यें पूर्वपदप्रकृतिस्वर विकल्पानें सांगितला आहे. जेव्हां तो प्रकृतिस्वर होत नाहीं तेव्हां पूर्वसूत्रानें अन्त उदात्त होतो; तेव्हां तेथेही पर्याय सिद्ध होतो.

१३. तर फक्त प्रकृतिस्वरच नित्य होतो. असें ज्ञापक केलें म्हणजे मात्र विकल्प होण्याकरितां 'द्वित्रिभ्याम्०' आणि 'दिष्टिवितस्त्योश्च' हीं सूत्रें अवश्य केलीं पाहिजेत.

१४. प्रकृतिस्वर सांगणाऱ्या प्रकृत सूत्रामध्यें उदात्ताची अनुवृत्ति आहे. तेव्हां कार्यप्रियः या उदाहरणामध्यें प्रकृतिस्वराची प्राप्ति नाहीं (टीप ६ पहा.) तेव्हां 'प्रकृतिस्वरच नित्य होतो' हें ज्ञापन येथें लागू होत नसल्यामुळें स्वरित आणि अन्तोदात्त यांचा समावेश होऊं लागेल.

ष्युदात्तोऽस्ति ॥

बहुव्रीहिस्वरं शास्ति
समासान्तविधेः सुकृत् ।
नञ्सुभ्यां नियमार्थं तु
परस्य शितिशासनात् ॥ १ ॥
क्षेपे विधिर्नञोऽसिद्धः
परस्य नियमो भवेत् ।
अन्तश्च वाप्रिये सिद्धः
संभवात्प्रकृताद्विधेः ॥ २ ॥
बहुव्रीहावृते सिद्धमिष्टतश्चावधारणम् ।
द्विपाद्दिष्टेर्वितस्तेश्च
पर्यायो न प्रकल्पते ॥ ३ ॥
उदात्ते ज्ञापकं त्वेत-
त्स्वरितेन समाविशेत् ॥

**तत्पुरुषे तुल्यार्थतृतीयासप्तम्युपमानाव्ययद्वितीयाकृत्याः ॥ ६ । २ । २ ॥**

**तत्पुरुषे विभक्तिप्रकृतिस्वरत्वे कर्मधारये प्रतिषेधः ॥ १ ॥**

तत्पुरुषे विभक्तिप्रकृतिस्वरत्वे कर्मधारये प्रतिषेधो वक्तव्यः । परमं कारकं परमकारकम् । परमेण कारकेण परमकारकेण । परमे कारके परमकारके ॥

**सिद्धं तु लक्षणप्रतिपदोक्तयोः प्रतिपदोक्तस्यैव ग्रहणात् ॥ २ ॥**

सिद्धमेतत् । कथम् । लक्षणप्रतिपदोक्तयोः प्रतिपदोक्तस्यैवेति प्रतिपदं यो द्वितीयातृतीयासप्तमीसमासस्तस्य ग्रहणं लक्षणोक्तश्चायम् ॥

अव्यये परिगणनं कर्तव्यम् ।

---

पण स्वरितामध्येंहीं उदात्त आहेच.

( सू. २ वा. १ ) तत्पुरुष समासामध्यें तृतीयान्त सप्तम्यन्त आणि द्वितीयान्त पूर्वपदाला सांगितलेला हा जो प्रकृतिस्वर तो कर्मधारय समासामध्यें होत नाहीं असें वचन करावें. उदा० परमं कारकं परमकारकम्; परमेण कारकेण परमकारकेण; परमे कारके परमकारके.

( वा. २ ) वचन केल्यावांचूनच हें सिद्ध होत आहे.

तें कसें ?

तत्पुरुष समासामध्यें द्वितीयान्त पूर्वपदाला प्रकृतिस्वर होतो असें म्हटलें असल्यामुळें 'लाक्षणिक आणि प्रतिपदोक्त यांमध्यें प्रतिपदोक्ताचेंच ग्रहण करावयाचें' या परिभाषेच्या साहाय्यानें द्वितीया तृतीया वगैरे शब्द उच्चारून सांगितलेल्या अशाच तत्पुरुषाचें येथें ग्रहण होतें. परमं कारकम् येथील विशेषण समास हा लाक्षणिक आहे.

अव्ययाविषयीं परिगणन करावें.

---

१. ( सू. २ ) तुल्यार्थक, तृतीयान्त, सप्तम्यन्त, उपमानवाचक, अव्यय, द्वितीयान्त, आणि कृत्-प्रत्ययान्त हे शब्द उत्तरपद असतील तर त्यांना तत्पुरुष समासामध्यें प्रकृतिस्वर होतो.

२. 'कर्मधारयसमासाहून पुढें जी विभक्ति करावयाची असेल तीच विभक्ति त्यांतील प्रत्येक पदाला लावून कर्मधारय समास करावयाचा' असा एक पक्ष आहे. यालाच 'परिनिष्ठित विभक्तीशीं समास होतो' असें म्हणतात. तेव्हां येथें परमकारकं जानीहि अशी द्वितीया जर पुढें करावयाची असेल तर 'परम अम् कारक अम्' अशी दोन्ही शब्दांना द्वितीया विभक्ति लावून कर्मधारय समास केला म्हणजे द्वितीयान्त पूर्वपद आहे म्हणून प्रकृत सूत्रानें प्रकृतिस्वर प्राप्त होतो. कर्मधारयाला तत्पुरुष संज्ञा आहेच.

३. द्वितीया श्रितातीत० ( २।१।२४ ) तृतीया तत्कृता० ( २।१।३० ) सप्तमी शौण्डैः ( २।१।४० ) इत्यादि सूत्रांनी सांगितलेला तत्पुरुष प्रतिपदोक्त होय.

**अव्यये नञ्कुनिपातानाम् ॥ ३ ॥**

अव्यये नञ्कुनिपातानामिति वक्तव्यम् । नञ् । अब्राह्मणः अवृषलः । नञ् । कु । कुब्राह्मणः कुवृषलः । कु । निपात । निष्कौशाम्बिः निर्वाराणसिः । क मा भूत् । स्नात्वाकालकः पीत्वास्थिरकः ॥

**क्त्वायां वा प्रतिषेधः ॥ ४ ॥**

क्त्वायां वा प्रतिषेधो वक्तव्यः । स्नात्वाकालकः पीत्वास्थिरकः ॥ उभयं न वक्तव्यम् ।

**निपातनात्सिद्धम् ॥ ५ ॥**

निपातनादेतत्सिद्धम् । किं निपातनम् । अवश्यमत्र समासार्थं ल्यबभावार्थं च निपातनं कर्तव्यं तेनैव यत्नेन स्वरो भविष्यति ॥

**[ वर्णो वर्णेष्वनेते ॥ ६ । २ । ३ ॥**

**गाधलवणयोः प्रमाणे ॥ ६ । २ । ४ ॥**

**दायाद्यं दायादे ॥ ६ । २ । ५ ॥**

**प्रतिबन्धि चिरकृच्छ्रयोः ॥ ६ । २ । ६ ॥**

**पदेऽपदेशे ॥ ६ । २ । ७ ॥**

**निवाते वातत्राणे ॥ ६ । २ । ८ ॥**

---

( वा. ३ ) तत्पुरुषामध्यें अव्यय पूर्वपदाला सांगितलेला प्रकृतिस्वर नञ्, कु, व निपात यांनाच होतो. उदा० अब्राह्मणः, अवृषलः; कुब्राह्मणः, कुवृषलः; निष्कौशाम्बिः, निर्वाराणसिः. असें परिगणन केल्यामुळें स्नात्वाकालकः व पीत्वास्थिरकः येथें अव्ययपूर्वपदप्रकृतिस्वर होत नाहीं.

( वा. ४ ) किंवा क्त्वाप्रत्ययान्त अव्ययाला पूर्वपदप्रकृतिस्वर होत नाहीं असें वचन करावें. उदा० स्नात्वाकालकः पीत्वास्थिरकः.

दोन्हीही वचनें करावयास नकोत.

( वा. ५ ) कारण, हें निपातनानें सिद्ध होत आहे.

तें निपातन कोणतें ?

स्नात्वाकालकः पीत्वास्थिरकः इत्यादि शब्दांचें निपातन समास होण्याकरितां व समास केल्यानंतर क्त्वाचे स्थानीं ल्यबादेश ( ७।१।३७ ) न होण्याकरतां अवश्य केलें पाहिजे. तेव्हां त्या निपातनानेंच अव्ययपूर्वपदप्रकृतिस्वरही होणार नाहीं.

---

४. क्त्वा-प्रत्ययान्ताचा अन्वय नेहमीं क्रियेशींच असतो ( ३।४।२१ ). तेव्हां उत्तरपदामध्यें क्रियावाचक शब्द नसल्यास त्याच्याबरोबर क्त्वा-प्रत्ययान्त पूर्वपदाचा समास होणार नाहीं.

५. मयूरव्यंसकादि गणामध्यें ( २।१।७२ ) ह्या शब्दांचें निपातन करावयाचें. तेथें अन्तोदात्त असेंच निपातन करावें.

१. ( सू. ३ ) तत्पुरुष समासामध्यें एन शब्दाशिवाय वर्णवाचक उत्तरपद पुढें असतांना वर्णवाचक पूर्वपदाला प्रकृतिस्वर होतो. उदा० कृष्णसारङ्गः.

१. ( सू. ४ ) तत्पुरुष समासामध्यें गाध व लवण हे शब्द उत्तरपद पुढें असतांना पूर्वपदाला प्रकृतिस्वर होतो, पण त्या तत्पुरुषापासून प्रमाणाचा बोध होत असला पाहिजे. उदा०-शम्बगाधमुदकम्; गोलवणम्.

१. ( सू. ५ ) तत्पुरुष समासामध्यें दायाद शब्द उत्तरपद पुढें असतांना दायाद्यवाचक पूर्वपदाला प्रकृतिस्वर होतो. उदा०-धनदायादः.

१. ( सू. ६ ) तत्पुरुष समासामध्यें चिर व कृच्छ्र हे शब्द उत्तरपद पुढें असतांना प्रतिबन्धिवाचक पूर्वपदाला प्रकृतिस्वर होतो. उदा०-गमनचिरम्.

१. (सू. ७) तत्पुरुष समासामध्यें पद शब्द उत्तरपद पुढें असतांना पूर्वपदाला प्रकृतिस्वर होतो, कपट हा अर्थ गम्यमान असतांना. उदा०-मूत्रपदेन प्रस्थितः.

१. ( सू. ८ ) तत्पुरुष समासामध्यें निवात शब्द उत्तरपद पुढें असतांना पूर्वपदाला प्रकृतिस्वर होतो, वातत्राण हा अर्थ गम्यमान असतांना. उदा०-कुटीनिवातम्.

**शारदेऽनार्तवे ॥ ६ । २ । ९ ॥**

**अध्वर्युकषाययोर्जातौ ॥ ६ । २ । १० ॥ ]**

**सदृशप्रतिरूपयोः सादृश्ये ॥ ६ । २ । ११ ॥**

**सदृशग्रहणमनर्थकम् तृतीयासमासवचनात् ॥ १ ॥**

सदृशग्रहणमनर्थकम् । किं कारणम् । तृतीयासमासवचनात् । सदृशशब्देन तृतीयासमास उच्यते तत्र तृतीयापूर्वपदं प्रकृतिस्वरं भवतीत्येव सिद्धम् ॥ षष्ठ्यर्थं तर्हीदं वक्तव्यम् । पितुः सदृशः पितृसदृश इति ।

**षष्ठ्यर्थमिति चेत्तृतीयासमासवचनानर्थक्यम् ॥ २ ॥**

षष्ठ्यर्थमिति चेत्तृतीयासमासवचनमनर्थकं स्यात् । किं कारणम् । इहास्माभिस्त्रैशब्द्यं साध्यम् । पित्रा सदृशः पितुः सदृशः पितृसदृश इति । तत्र द्वयोः शब्दयोः समानार्थयोरेकेन विग्रहोऽपरेण समासो भविष्यत्यविरविकन्यायेन । तद्यथा । अवेर्मांसमिति विगृह्य अविकशब्दादुत्पत्तिर्भवति आविक-

(सू. ११ वा. १) येथें सदृश शब्दाचें जें ग्रहण केलें आहे तें निष्फल होत आहे.

काय कारण ?

कारण असें कीं 'पूर्वसदृश०' (२।१।३१) यानें सदृश शब्दाशीं तृतीयातत्पुरुष सांगितला आहे. तेव्हां 'तत्पुरुषे तुल्यार्थ०' (६।२।२) यानेंच पूर्वपदप्रकृतिस्वर होत आहे.

तर सदृश शब्दाचा योग असतांना 'तुल्यार्थै०' (२।३।७२) यानें षष्ठीही सांगितली आहे. तेव्हां षष्ठीसमास केला असतां तेथें पूर्वपदप्रकृतिस्वर होण्याकरितां येथें सदृशग्रहण केलें आहे. उदा० पितुः सदृशः पितृसदृशः.

(वा० २) षष्ठीसमासाकरितां सदृशग्रहण केलें पाहिजे असें म्हटलें तर 'पूर्वसदृश०' ह्यानें जो तृतीयातत्पुरुष सांगितला आहे तोच व्यर्थ होत आहे.

काय कारण ?

कारण असें कीं—तृतीयासमास व षष्ठीसमास हे दोन्ही वैकल्पिक असल्यामुळें दोन्ही समासांचें पितृसदृशः हें एक रूप आणि त्या दोन समासांचीं दोन विग्रहवाक्यें पित्रा सदृशः व पितुः सदृशः हीं दोन मिळून तीन रूपें येथें साधावयाचीं आहेत; व तीं तृतीयासमासावांचूनही साधतात. तीं अशीं—समानार्थक दोन शब्दांपैकीं 'पित्रा सदृशः' या एका शब्दानें विग्रहच दाखवावयाचा आणि 'पितुः सदृशः' या एका शब्दानें वृत्तीही करावयाची. अविरविकन्यायाप्रमाणें हें होय. तो न्याय असा—अवि आणि अविक असे समानार्थक दोन शब्द आहेत. त्या दोन्ही शब्दांहूनही विकार या अर्थी वृत्ति प्राप्त होते. तेथें अवि या एका शब्दानें फक्त विग्रहच दाखवावयाचा, व अविक या एका शब्दाशीं वृत्ति करावयाची. अवेर्मांसम् असा विग्रह दाखवून आविकम् अशी वृत्ति अविक शब्दाहून

१. (सू. ९) शरद् ऋतूमध्यें होणारा पदार्थ या अर्थाशिवाय इतर अर्थाचा वाचक शारद शब्द उत्तरपद पुढें असतांना पूर्वपदाला तत्पुरुष समासामध्यें प्रकृतिस्वर होतो. उदा०-रज्जुशारदमुदकम्. येथें शारद शब्दाचा नवीन असा अर्थ आहे. दोरीनें नुकतेंच काढलेलें ताजें पाणी असा अर्थ आहे.

१. (सू. १०) जातिवाचक तत्पुरुष समासामध्यें अध्वर्यु व कषाय हे शब्द उत्तरपद पुढें असतांना पूर्वपदाला प्रकृतिस्वर होतो. उदा०-सर्पिर्मण्डकषायम्.

१. (सू. ११) सादृश्यवाचक तत्पुरुष समासामध्यें सदृश व प्रतिरूप हें शब्द उत्तरपद पुढें असतांना पूर्वपदाला प्रकृतिस्वर होतो. उदा०- पितृसदृशः, पितृप्रतिरूपः.

मिति । एवं पितुः सदृश इति विगृह्य पितृसदृश इति भविष्यति पित्रा सदृश इति विगृह्य वाक्यमेव ॥ अवश्यं तृतीयासमासो वक्तव्यो यत्र षष्ठ्यर्थो नास्ति तदर्थम् । भोजनसदृशः अध्ययनसदृश इति ॥ यदि तर्हि तस्य निबन्धनमस्ति तदेव वक्तव्यमिदं न वक्तव्यम् । इदमप्यवश्यं वक्तव्यं यत्र षष्ठी श्रूयते तदर्थम् । दास्याःसदृशः वृषल्याःसदृश इति ॥

[ द्विगौ प्रमाणे ॥ ६ । २ । १२ ॥
गन्तव्यपण्यं वाणिजे ॥ ६ । २ । १३ ॥
मात्रोपज्ञोपक्रमच्छाये नपुंसके ॥ ६ । २ । १४ ॥
सुखप्रिययोर्हिते ॥ ६ । २ । १५ ॥
प्रीतौ च ॥ ६ । २ । १६ ॥
स्वं स्वामिनि ॥ ६ । २ । १७ ॥
पत्यावैश्वर्ये ॥ ६ । २ । १८ ॥

प्रत्यय करून होते. तसेंच प्रकृतस्थलीं पितुः सदृशः असा षष्ठ्यन्ताशीं विग्रह करून पितृसदृशः अशी वृत्ति होईल. व पित्रा सदृशः असा तृतीयान्ताशीं विग्रह केला तर तेथें तसें वाक्यच राहील.

पण तृतीयासमासही जेथें षष्ठ्यर्थ नाहीं तेथें समास होण्याकरितां अवश्य सांगितलाच पाहिजे. उदा०–भोजनसदृशः; अध्ययनसदृशः.

आतां जर हें असें तृतीयातत्पुरुष सांगण्याचें कारण दिसत आहे तर तोच सांगावा, येथें सदृशग्रहण करावयास नको.

ज्या ठिकाणीं समास केला असतांही लुक् न होतां षष्ठी कायम राहते त्याकरितां येथेंही सदृशग्रहण अवश्य केलेंच पाहिजे. उदा० दास्याःसदृशः, वृषल्याःसदृशः.

२. भोजनानें सारखा, अध्ययनानें सारखा असा अर्थ आहे.

३ ' पितृसदृश हा षष्ठीतत्पुरुष केला असतां तेथें प्रकृतिस्वर होण्याकरितां येथें सदृश–ग्रहण केलें पाहिजे' अशी शंका घेऊं नये. कारण, अविर्विकन्यायानें पितुः सदृशः असें फक्त वाक्यच तेथें राहतें; समास होतच नाहीं. पितृसदृशः हा प्रयोग तृतीया तत्पुरुषानेंच साधावयाचा आहे.

४. दास्याःसदृशः असा अलुक् समासानें ( ६। ३।२१ ) सिद्ध होणारा प्रयोग तृतीया तत्पुरुषानें साधत नाहीं. तेव्हां येथें प्रकृतिस्वर होण्याकरितां प्रकृत सूत्रामध्यें सदृश-ग्रहण केलें पाहिजे.

१. ( सू. १२ ) प्रमाण दाखविणाऱ्या तत्पुरुष समासाध्यें द्विगु उत्तरपद पुढें असतांना पूर्वपदाला प्रकृतिस्वर होतो. उदा०– प्राच्यसप्तसमः.

१. ( सू. १३. ) तत्पुरुष समासामध्यें वाणिज शब्द उत्तरपद पुढें असतांना गन्तव्य किंवा पण्य या अर्थाच्या पूर्वपदाला प्रकृतिस्वर होतो. उदा०–मद्रवाणिजः; गोवाणिजः.

१. ( सू. १४ ) नपुंसकलिंगी तत्पुरुष समासामध्यें मात्र, उपज्ञ, उपक्रम आणि छाय हे शब्द उत्तरपद पुढें असतांना पूर्वपदाला प्रकृतिस्वर होतो. उदा०– भिक्षामात्रम्. पाणिन्युपज्ञम्.

१. ( सू. १५. ) हितवाचक तत्पुरुष समासामध्यें सुख व प्रिय हे शब्द उत्तरपद पुढें असतांना पूर्वपदाला प्रकृतिस्वर होतो. उदा०– गमनसुखम्; गमनप्रियम्.

१. ( सू. १६ ) प्रीति गम्यमान असतांना व सुख व प्रिय हे शब्द उत्तरपद पुढे असतांना तत्पुरुष समासामध्यें पूर्वपदाला प्रकृतिस्वर होतो. उदा०–ब्राह्मणसुखं पायसम्. छात्रप्रियोऽनध्यायः.

१. ( सू. १७ ) तत्पुरुष समासामध्यें स्वामिन् शब्द उत्तरपद पुढें असतांना पूर्वपदाला प्रकृतिस्वर होतो. उदा०– गोस्वामी.

१. ( सू. १८ ) ऐश्वर्य गम्यमान असतांना व पतिशब्द उत्तरपद पुढें असतांना तत्पुरुष समासामध्यें पूर्वपदाला प्रकृतिस्वर होतो. उदा०–गृहपतिः.

न भूवाक्चिद्दिधिषु ॥ ६ । २ । १९ ॥

वा भुवनम् ॥ ६ । २ । २० ॥

आशङ्काबाधनेदीयःसु संभावने ॥ ६ । २ । २१ ॥

पूर्वे भूतपूर्वे ॥ ६ । २ । २२ ॥

सविधसनीडसमर्यादसवेशसदेशेषु सामीप्ये ॥ ६ । २ । २३ ॥

विस्पष्टादीनि गुणवचनेषु ॥ ६ । २ । २४ ॥

श्रज्यावमकन्पापवत्सु भावे कर्मधारये ॥ ६ । २ । २५ ॥

कुमारश्च ॥ ६ । २ । २६ ॥

आदिः प्रत्येनसि ॥ ६ । २ । २७ ॥

पूगेष्वन्यतरस्याम् ॥ ६ । २ । २८ ॥ ]

इगन्तकालकपालभगालशरावेषु द्विगौ ॥ ६ । २ । २९ ॥

इगन्तप्रकृतिस्वरत्वे यण्गुणयोरुपसंख्यानम् ॥ १ ॥

इगन्तप्रकृतिस्वरत्वे यण्गुणयोरुपसंख्यानं कर्तव्यम् । पञ्चारत्न्यः दशारत्न्यः । पञ्चार-

---

(सू. २९ वा. १) द्विगु समासामध्यें इगन्त उत्तरपद पुढें असतांना सांगितलेला हा जो पूर्वपदप्रकृतिस्वर तो इकाला यण् व गुण झाले असतांही होतो असें वचन करावें. उदा०–पञ्चारत्न्यः, दशारत्न्यः; पञ्चारत्नयः, दशारत्नयः. येथें पञ्चारत्नि शब्दाहून जस् प्रत्यय केल्यानंतर

---

१. (सू. १९) भू, वाक्, चित्, आणि दिधिषू या पूर्वपदांना पूर्वसूत्रानें प्रकृतिस्वर होत नाहीं. उदा० भूपतिः.

१. (सू. २०) भुवन या पूर्वपदाला 'पत्यावैश्वर्ये' (६।२।१८) यानें प्राप्त झालेला प्रकृतिस्वर विकल्पानें होतो. उदा०–भुवनपतिः.

१. (सू. २१) तत्पुरुष समासामध्यें आशङ्का, आबाध, आणि नेदीयस् हे शब्द उत्तरपद पुढें असतांना व संभावन अर्थ गम्यमान असतांना पूर्वपदाला प्रकृतिस्वर होतो उदा०– गमनाशङ्कं वर्तते.

१. (सू. २२) तत्पुरुष समासामध्यें भूतपूर्व या अर्थाचा पूर्व शब्द उत्तरपद पुढें असतांना पूर्वपदाला प्रकृतिस्वर होतो उदा०– आढ्यो भूतपूर्वः आढ्यपूर्वः.

१. (सू. २३) सविध, सनीड, समर्याद, सवेश आणि सदेश हे सामीप्यार्थक शब्द उत्तरपद पुढें असतांना पूर्वपदाला प्रकृतिस्वर होतो. उदा०–मद्रसविधम्.

१. (सू. २४) विस्पष्ट, विचित्र, व्यक्त, संपन्न, पण्डित, कुशल, चपल आणि निपुण या पूर्वपदांना गुणवाचक उत्तरपद पुढें असतांना व तत्पुरुष समासामध्यें प्रकृतिस्वर होतो उदा०–विस्पष्टकटुकम्.

१. (सू. २५) श्र, ज्य, अवम, कन्, आणि पाप हे शब्द ज्यामध्यें आहेत असें उत्तरपद पुढें असतांना भाववाचक पूर्वपदाला कर्मधारय समासामध्यें. प्रकृतिस्वर होतो. उदा०–गमनश्रेष्ठम्.

१. (सू. २६) कर्मधारय समासामध्यें पूर्वपद अशा कुमार शब्दाला प्रकृतिस्वर होतो. कुमारश्रमणा.

१. (सू. २७) कर्मधारय समासामध्यें प्रत्येनस् शब्द उत्तरपद पुढें असतांना कुमार या पूर्वपदाचा आदि उदात्त होतो. उदा०–कुमारप्रत्येनाः.

१ (सू. २८) कर्मधारय समासामध्यें संघातदर्शक उत्तरपद पुढें असतांना कुमार या पूर्वपदाचा आदि उदात्त विकल्पानें होतो. उदा०–कुमारचातकाः.

१. (सू. २९) द्विगु समासामध्यें इगन्त, कालवाचक, कपाल, भगाल आणि शराव हे शब्द उत्तरपद पुढें असतांना पूर्वपदाला प्रकृतिस्वर होतो. उदा०–पञ्चारत्निः.

२. पांच अरत्नी प्रमाण ज्याचें असें काष्ठ वगैरे या अर्थी तद्धितार्थी द्विगु (२।१।५१) समास करून पुढें मात्रच् (५।२।३७) प्रत्ययाचा लोप (५।२।३७ वा.) झाला आहे.

त्नयः दशारत्नयः । यण्गुणयोः कृतयोरिगन्ते द्विगावित्येष स्वरो न प्राप्नोति ॥

**न वा बहिरङ्गलक्षणत्वात् ॥ २ ॥**

न वा बक्तव्यम् । किं कारणम् । बहिरङ्गलक्षणत्वात् । बहिरङ्गौ यण्गुणौ । अन्तरङ्गः स्वरः । असिद्धं बहिरङ्गमन्तरङ्गे ॥

**[ [1]बह्वन्यतरस्याम् ॥ ६ । २ । ३० ॥**

**[1]दिष्टिवितस्त्योश्च ॥ ६।२।३१ ॥**

**[1]सप्तमी सिद्धशुष्कपक्वबन्धेष्वकालात् ॥ ६ । २ । ३२ ॥ ]**

**[1]परिप्रत्युपापा वर्ज्यमानाहोरात्रावयवेषु ॥ ६ । २ । ३३ ॥**

**परिप्रत्युपापेभ्यो वनं समासे विप्रतिषेधेन ॥ १ ॥**

परिप्रत्युपापेभ्यो वनं समासे [ ६. २. १७८ ] इत्येतद्भवति विप्रतिषेधेन । परिप्रत्युपापा वर्ज्यमानाहोरात्रावयवेष्वित्यस्यावकाशः । परित्रिगर्तम् परिसौवीरम् । वनं समास इत्यस्यावकाशः । प्रवणे यष्टव्यम् । इहोभयं प्राप्नोति । परिवनम् अपवनम् । वनं समास इत्येतद्भवति विप्रतिषेधेन ॥

**न वा वनस्यान्तोदात्तवचनं तदपवादनिवृत्त्यर्थम् ॥ २ ॥**

न वार्थो विप्रतिषेधेन । किं कारणम् । वनस्यान्तोदात्तवचनं तदपवादनिवृत्त्यर्थम् ।

---

इकाराला यण् व गुण ( ७।३।१०९ वा. १ ) केले असतां उत्तरपदाच्या शेवटीं इक् नसल्यामुळें प्रकृत सूत्रानें प्रकृतिस्वर होणार नाहीं.

( वा. २ ) अथवा तसें वचन करावयास नको.

काय कारण ?

कारण असें कीं समासाच्या पुढें जस् प्रत्यय केल्यानंतर प्राप्त होणारे यण् व गुण बहिरंग आहेत आणि स्वर अंतरंग आहे. तेव्हां अंतरंग कर्तव्य असतांना बहिरंगाला असिद्धत्व असल्यामुळें सहजच स्वर होईल.

(सू. ३३ वा. १) 'परिप्रत्युपापा०' या प्रकृतिस्वरापेक्षां विप्रतिषेधानें परत्वास्तव 'वनं समासे' हा अन्तोदात्त होतो. परिप्रत्युपापा० या स्वराला परित्रिगर्तं वृष्टः येथें अवकाश आहे. आणि 'वनं समासे' याला प्रवणे यष्टव्यम् येथें अवकाश आहे. व परिवनम् तसेंच अपवनम् येथें दोहोंची प्राप्ति आली असतां विप्रतिषेधानें 'वनं समासे' हा स्वर होतो.

( वा. २ ) अथवा हा विप्रतिषेध मानण्यांत फायदा नाहीं ?

काय कारण ?

कारण असें कीं समासामध्यें उपसर्गाहून पर उत्तरपदभूत वन शब्दाला 'समासस्य' (६।१।२२३) या सामान्य शास्त्रानेंच अन्तोदात्त सिद्ध होत असतां पुनः अन्तोदात्त विधान कर-

---

१ ( सू. ३० ) पूर्वपद अशा बहु शब्दाला पूर्वसूत्रानें प्राप्त झालेला प्रकृतिस्वर विकल्पानें होतो. उदा०—बहुरत्निः.

१. ( सू. ३१ ) द्विगु समासामध्यें दिष्टि व वितस्ति हे शब्द पुढें असतांना पूर्वपदाला प्रकृतिस्वर विकल्पानें होतो. उदा०—पञ्चदिष्टिः; पञ्चवितस्तिः.

१. ( सू. ३२ ) तत्पुरुष समासामध्यें सिद्ध, शुष्क, पक्व आणि बन्ध हे शब्द उत्तरपद पुढें असतांना सप्तम्यन्त पूर्वपदाला प्रकृतिस्वर होतो, परंतु तो सप्तमीप्रत्यय कालवाचक शब्दाच्या पुढें केलेला नसला पाहिजे. उदा०-सांकाश्यसिद्धः.

१. ( सू ३३ ) तत्पुरुष समासामध्यें परि, प्रति, उप, आणि अप या पूर्वपदांना प्रकृतिस्वर होतो, वर्ज्यमानवाचक किंवा दिवसाच्या अथवा रात्रीच्या अवयवाचा वाचक असा शब्द उत्तरपद पुढें असतांना. उदा०—परित्रिगर्तं वृष्टो देवः, प्रतिपूर्वाह्णम्, प्रतिपूर्वरात्रम्.

सिद्धमत्रान्तोदात्तत्वमुत्सर्गेणैव । तस्य पुनर्वचन एतत्प्रयोजनं ये ऽन्ये तदपवादाः प्राप्नुवन्ति तद्बाधनार्थम् । स यथैव तदपवादमव्ययस्वरं बाधत एवमिदमपि बाधिष्यते ॥

[ राजन्यबहुवचनद्वंद्वेऽन्धकवृष्णिषु ॥ ६ । २ । ३४ ॥
संख्या ॥ ६ । २ । ३५ ॥ ]

**आचार्योपसर्जनश्चान्तेवासी ॥ ६ । २ । ३६ ॥**

आचार्योपसर्जनेऽनेकस्यापि पूर्वपदत्वात्संदेहः ॥ १ ॥

आचार्योपसर्जनेऽनेकस्यापि पूर्वपदत्वात्संदेहो भवति । आपिशलपाणिनीयव्याडीयगौतमीयाः । एकं पदं वर्जयित्वा सर्वाणि पूर्वपदानि तत्र न ज्ञायते कस्य पूर्वपदस्य प्रकृतिस्वरत्वेन भवितव्यमिति ॥

लोकविज्ञानात्सिद्धम् ॥ २ ॥

तद्यथा । लोकेऽमीषां ब्राह्मणानां पूर्वमानयेति यः सर्वपूर्वः स आनीयते । एवमिहापि यत्सर्वपूर्वपदं तस्य प्रकृतिस्वरत्वं भविष्यति ॥

[ कार्तकौजपादयश्च ॥ ६ । २ । ३७ ॥ ]

---

ण्याचा असा हेतु आहे कीं त्या सामान्य शास्त्राचे अपवाद असे जे विधि त्यांचा बाध व्हावा. तेव्हां 'वनं समासे' हा अपवाद जसा त्या सामान्य शास्त्राचा अपवाद अशा अव्ययपूर्वपदप्रकृतिस्वराचा बाध करतो तसा 'परिप्रत्युपापा०' या प्रकृतिस्वराचाही बाध करील.

(सू. ३६ वा. १) आचार्य हा शब्द ज्यांमध्यें विशेषण आहे अशीं पूर्वपदें द्वंद्वामध्यें अनेक संभवत असल्यामुळें त्यांपैकीं कोणत्या पूर्वपदाला प्रकृतिस्वर करावयाचा याबद्दल संशय येतो. उदा० आपिशलपाणिनीयव्याडीयगौतमीयाः. येथें शेवटलें एक पद सोडून बाकीचीं सर्वच पदें आपआपल्या पुढील पदाच्या मानानें पूर्वपदें आहेत. तेथें कोणत्या पूर्वपदाला प्रकृतिस्वर करावयाचा तें कळत नाहीं.

(वा. २) चार शिष्ट लोकांचा जो समज त्यावरूनच सर्वांमध्यें जें पूर्वपद त्याला स्वर करावयाचा हें सिद्ध होत आहे. उदा०– या ब्राह्मणांमधील पूर्वी असलेला ब्राह्मण घेऊन ये असें सांगितलें असतां तेथें सर्वांमध्यें जो पूर्व तोच आणिला जातो. तसें येथेंही सर्वांमध्यें जें पहिलें पद त्याच पूर्वपदाला प्रकृतिस्वर होईल.

---

१. (सू. ३४) अन्धक किंवा वृष्णि यांपैकीं जे अभिषिक्त वंशांतील क्षत्रिय राजे तद्वाचक अशा बहुवचनान्त शब्दांच्या द्वंद्वामध्यें पूर्वपदाला प्रकृतिस्वर होतो. उदा०–श्वाफल्कचैत्रकाः, शिनिवासुदेवाः.

१. (सू. ३५) द्वंद्वामध्यें संख्यावाचक पूर्वपदाला प्रकृतिस्वर होतो. उदा०–एकादश; द्वादश.

१. (सू. ३६) जे शब्द आचार्यवाचक शब्द विशेषण लागून त्याच्या अन्तेवासींचे वाचक होतात अशा शब्दांच्या द्वंद्वामध्यें पूर्वपदाला प्रकृतिस्वर होतो. उदा० पाणिनीयरौढीयाः. पाणिनि आचार्यांनें सांगितलेल्या शास्त्राचें अध्ययन करणारे असे जे त्याच्या शिष्यपरंपरेंतील लोक त्यांना पाणिनीय हा शब्द लागतो. पाणिनि शब्दाहून प्रोक्तार्थी छ प्रत्यय (४।३।११४) करून पुढें अध्ययन करणारे या अर्थी केलेल्या अण् प्रत्ययाचा (४।२।५९) लुक् (४।२।६४) झाला आहे. रौढीयाः येथें रौढि हा आचार्य आहे.

१. (सू. ३७) कार्तकौजप वगैरे द्वंद्वांमध्यें पूर्वपदाला प्रकृतिस्वर होतो. उदा०– कार्तकौजपौ. कृत आणि कुजप या शब्दांहून तद्धित अण् प्रत्यय (४।३।१२०) करून पुढें त्यांचा द्वंद्व केला आहे.

**महान् व्रीह्यपराह्णगृष्टीष्वासजाबालभारभारतहैलिहिलरौरवप्रवृद्धेषु ॥ ६ । २ । ३८ ॥**

किमर्थं महतः प्रवृद्धशब्द उत्तरपदे पूर्वपदप्रकृतिस्वरत्वमुच्यते न कर्मधारयेऽनिष्ठा [ ६. २. ४६ ] इत्येव सिद्धम् । न सिध्यति । किं कारणम् । श्रेण्यादिसमास इत्येवं तत् । इह मा भूत् । महानिरष्टो दक्षिणा दीयते ॥

**[ क्षुल्लकश्च वैश्वदेवे ॥ ६।२।३९ ॥**

**उष्ट्रः सादिवाम्योः ॥ ६।२।४० ॥**

**गौः सादसादिसारथिषु ॥ ६ । २ । ४१ ॥ ]**

**कुरुगार्हपतरिक्तगुर्वसूतजरत्यश्लीलदृढरूपा पारेवडवा तैतिलकद्रूः पण्यकम्बलो दासीभाराणां च ॥ ६ । २ । ४२ ॥**

**कुरुवृज्योर्गार्हपते ॥ १ ॥**

कुरुवृज्योर्गार्हपत इति वक्तव्यम् । कुरुगार्हपतम् वृजिगार्हपतम् ।

कुरुगार्हपतरिक्तगुर्वसूतजरत्यश्लीलदृढरूपापारेवडवातैतिलकद्रूःपण्यकम्बलोदासीभारादीनामिति वक्तव्यम् । इहापि यथा स्यात् । देवहूतिः देवनीतिः वसुनीतिः

---

( सू. ३८ ) प्रवृद्ध शब्द उत्तरपद पुढे असतांना महत् शब्दाला जो येथें पूर्वपदप्रकृतिस्वर सांगितला आहे त्याचें काय कारण? तो सांगूं नये. 'कर्मधारयेऽनिष्ठा' ( ६।२।४६ ) यानेंच काम भागेल.

काम भागणार नाहीं.

काय कारण?

कारण असें कीं– 'कर्मधारयेऽनिष्ठा' हें सूत्र 'श्रेण्यादयः कृतादिभिः' ( २।१।५९ ) यानें जो कृत वगैरे क्त–प्रत्ययान्तांबरोबर प्रतिपदोक्त कर्मधारय सांगितला आहे तेथेंच प्रवृत्त होतें.

पण असें गृहीत धरण्याचा कोणता बरें हेतु असावा?

हेतु हा कीं–'महानिरष्टो दक्षिणा दीयते' येथें 'कर्मधारयेऽनिष्ठा' यानें पूर्वपदप्रकृतिस्वर होऊं नये.

( सू. ४२ वा. १ ) 'कुरु व वृजि यांना पूर्वपदप्रकृतिस्वर होतो गार्हपत शब्द उत्तरपद पुढें असतांना' असें वचन करावें. उदा०– कुरुगार्हपतम्, वृजिगार्हपतम्. 'कुरुगार्हपतरिक्तगुर्वसूतजरत्यश्लीलदृढरूपा पारेवडवा तैतिलकद्रूः पण्यकम्बलो दासीभारादीनाम्' असें आदि शब्द शेवटीं घालून सूत्र करावें. कारण, देवहूतिः देवनीतिः वसुनीतिः ओषधिः चन्द्रमाः येथेंही पूर्वपद-

---

१. ( सू. ३८ ) व्रीहि, अपराह्ण, गृष्टि, इष्वास, जाबाल, भार, भारत, हैलिहिल, रौरव आणि प्रवृद्ध हे शब्द उत्तरपद पुढें असतांना पूर्वपद महत् शब्दाला समासामध्यें प्रकृतिस्वर होतो उदा०–महाव्रीहिः.

२. येथें 'सन्महत्०' ( २।१।६१ ) यानें कर्मधारय समास केला आहे.

१. ( सू. ३९ ) क्षुल्लक व महत् या पूर्वपदांना प्रकृतिस्वर होतो, वैश्वदेव शब्द उत्तरपद पुढें असतांना. उदा०–क्षुल्लकवैश्वदेवम् महावैश्वदेवम्.

१. ( सू. ४० ) उष्ट्र या पूर्वपदाला प्रकृतिस्वर होतो सादिन् व वामी हे शब्द उत्तरपद पुढें असतांना. उष्ट्रसादी, उष्ट्रवामी.

१. ( सू. ४१ ) गो या पूर्वपदाला प्रकृतिस्वर होतो साद, सादि व सारथि हे शब्द उत्तरपद पुढें असतांना. उदा०–गोसादः, गोसादिः, गोसारथिः.

१. ( सू. ४२ ) कुरुगार्हपत, रिक्तगुरु, असूतजरती, अश्लीलदृढरूपा, पारेवडवा, तैतिलकद्रू व पण्यकम्बल या सामासिक शब्दांमध्यें आणि दासीभार वगैरे शब्दांमध्यें पूर्वपदाला प्रकृतिस्वर होतो.

ओषधिः चन्द्रमाः ॥ तत्तर्हि वक्तव्यम् । न वक्तव्यम् । योगविभागः करिष्यते । कुरुगार्हपतरिक्तगुर्वसूतजरत्यश्लीलदृढरूपा पारेवडवा तैतिलकद्रूः पण्यकम्बल इति । ततो दासीभाराणां चेति । तत्र बहुवचननिर्देशाद्दासीभारादीनामिति विज्ञास्यते ॥

पण्यकम्बलः संज्ञायाम् ॥ २ ॥

पण्यकम्बलः संज्ञायामिति वक्तव्यम् । यो हि पणितव्यः कम्बलः पण्यकम्बल एवासौ भवति ॥

अपर आह । पण्यकम्बल एव यथा स्यात् । क मा भूत् । पण्यगवः पण्यहस्ती ॥

[ चतुर्थी तदर्थे ॥ ६ । २ । ४३ ॥

अर्थे ॥ ६ । २ । ४४ ॥

क्ते च ॥ ६ । २ । ४५ ॥

कर्मधारयेऽनिष्ठा ॥ ६।२।४६ ॥ ]

अहीने द्वितीया ॥ ६ । २ । ४७ ॥

अहीन इति किमर्थम् । कान्तारातीतः

---

प्रकृतिस्वर झाला पाहिजे.

तर मग तसें म्हटलें पाहिजे.

तसें म्हणावयास नको. कारण योगविभाग करतां येईल. तो असा–'कुरुगार्हपतरिक्तगुर्वसूतजरत्यश्लीलदृढरूपापारेवडवातैतिलकद्रूःपण्यकम्बलः' असें एक सूत्र होईल; आणि 'दासीभाराणां च' हें दुसरें सूत्र होईल. असा योगविभाग केला असतां दासीभार हा एकच सामासिक शब्द असल्यामुळें तेथें बहुवचन अनुपपन्न होतें म्हणून दासीभारादिक असा अर्थ होईल[२].

(वा. २) पण्यकम्बल[३] हा जर संज्ञा–शब्द असेल तरच तेथें पूर्वपदप्रकृतिस्वर होतो असें वचन करावें. ज्याची पण्यकम्बल ही संज्ञा नाहीं म्हणजे जो बाजारी कांबळा नव्हे तो विकण्याला योग्य आहे एवढ्याच दृष्टीनें त्याला जर पण्यकम्बल म्हटलें असेल तर तेथें पण्यकम्बलः असा समासान्तोदात्त स्वरच होतो.

येथें अन्य कोणी एक वैयाकरण असें म्हणतो कीं– 'तत्पुरुषसमासामध्यें पण्य शब्दाला जर पूर्वपदप्रकृतिस्वर होत असेल तर पण्यकम्बलः येथेंच तो होतो' असा नियम येथें आहे. त्यामुळें पण्यगवः तसेंच पण्यहस्ती येथें प्रकृतिस्वर (६।२।२) होत नाहीं.

(सू. ४७) येथें 'अहीने' असें कशाकरितां

---

२. एकच सूत्र असेल तर कुरुगार्हपत, या शब्दापासून दासीभार शब्दापर्यंत द्वंद्व आहे म्हणून बहुवचन झालें, व तैतिलकद्रूः आणि पण्यकम्बलः येथें प्रथमाप्रत्ययाचा लुक् सौत्रत्वास्तव झाला नाही अशी कल्पना होण्याचा संभव आहे.

३. ठराविक लांबीरुंदीचा आणि ठराविक किंमतीचा जो बाजारी कांबळा त्याला पण्यकम्बल अशी संज्ञा आहे. पण्यशब्द कृत्यप्रत्ययान्त असल्यामुळें प्रकृतिस्वर (६।२।२) सिद्ध आहे. तो स्वर संज्ञा असतांनाच होतो अन्यत्र होत नाहीं असें नियमार्थ हें वचन आहे.

१. (सू. ४३) समासामध्यें चतुर्थ्यन्त पूर्वपदाला प्रकृतिस्वर होतो, त्या पूर्वपदाचा अर्थ जी वस्तू तिच्याकरितां जो पदार्थ तद्वाचक उत्तरपद पुढें असतांना. उदा०–यूपाय दारु यूपदारु (यज्ञस्तंभाकरितां उपयोगीं पडणारें लांकूड).

१. (सू. ४४) समासामध्यें चतुर्थ्यन्त पूर्वपदाला प्रकृतिस्वर होतो, अर्थ शब्द उत्तरपद पुढें असतांना. उदा०–मात्रे इदम् मात्रर्थम्.

१. (सू. ४५) समासामध्यें चतुर्थ्यन्त पूर्वपदाला प्रकृतिस्वर होतो, क्तप्रत्ययान्त उत्तरपद पुढें असतांना. उदा०–गवे हितं गोहितम्.

१. (सू. ४६) कर्मधारय समासामध्यें निष्ठाप्रत्ययान्ताशिवाय जें पूर्वपद त्याला प्रकृतिस्वर होतो, क्त-प्रत्ययान्त उत्तरपद पुढें असतांना. उदा०–श्रेणिकृता.

१. (सू. ४७) अहीनवाचक समासामध्यें क्तप्रत्ययान्त उत्तरपद पुढें असतांना द्वितीयान्त पूर्वपदाला प्रकृतिस्वर होतो. उदा०–कष्टं श्रितः कष्टश्रितः. कष्टाचा

योजनातीतः ॥

**अहीने द्वितीयानुपसर्गे ॥ १ ॥**

अहीने द्वितीयानुपसर्ग इति वक्तव्यम् । इह मा भूत् । सुखप्राप्तः दुःखप्राप्तः ॥ तत्तर्हि वक्तव्यम् । यद्यप्येतदुच्यते ऽथवैतर्ह्यहीनग्रहणं न करिष्यते । इहापि कान्तारातीतः योजनातीत इत्यनुपसर्ग इत्येव सिद्धम् ॥

**[ तृतीया कर्मणि ॥ ६ । २ । ४८ ॥ ]**

**गतिरनन्तरः ॥ ६ । २ । ४९ ॥**

अनन्तर इति किमर्थम् । इह मा भूत् । अभ्युद्धृतम् उपसमाहृतम् ।

**गतेरनन्तरग्रहणमनर्थकं गतिर्गतावनुदात्तवचनात् ॥ १ ॥**

गतेरनन्तरग्रहणमनर्थकम् । किं कारणम् । गतिर्गतावनुदात्तवचनात् । गतौ परतो गतेरनुदात्तत्वमुच्यते तद् बाधकं भविष्यति ॥

**तत्र यस्याप्रकृतिस्वरत्वं तस्मादन्तोदात्तप्रसङ्गः ॥ २ ॥**

तत्र यस्य गतेरप्रकृतिस्वरत्वं तस्मादन्तोदात्तत्वं प्राप्नोति । अन्तस्थाथघञ्क्ताजबित्रकाणाम् [ ६. २. १४३; १४४ ] इति ॥

---

म्हटलें आहे ?

कान्तारमतीतः कान्तारातीतः येथें प्रकृतिस्वर होऊं नये म्हणून म्हटलें आहे.[२]

(वा. १) ' अहीनवाचक समासामध्यें उपसर्गरहित क्तान्त उत्तरपद असतांना द्वितीयान्त पूर्वपदाला प्रकृतिस्वर होतो ' असें वचन करावें. कारण, सुखप्राप्तः तसेंच दुःखप्राप्तः येथें प्रकृतिस्वर न झाला पाहिजे.

तर मग अनुपसर्गे असें म्हटलें पाहिजे.

जरी अनुपसर्गे असें म्हटलें तरी ज्यास्त म्हटल्यासारखें होत नाहीं. कारण अहीने असें म्हणावयास नको. कान्तारातीतः इत्यादि स्थलीं अनुपसर्गे असें म्हटल्यानेंच पूर्वपदप्रकृतिस्वराची व्यावृत्ति होत आहे.

(सू. ४९) येथें अनन्तरः असें कशाकरितां म्हटलें आहे ?

अभ्युद्धृतम् आणि उपसमाहृतम् येथें व्यवहित अशा अभि आणि उप या गतिसंज्ञकांना पूर्वपदप्रकृतिस्वर न व्हावा म्हणून म्हटलें आहे.

(वा. १) गतिरनन्तरः येथें गतीला अनन्तर असें विशेषण दिलें आहे तें व्यर्थ होत आहे. कारण 'गतिर्गतौ' (८।१।७०) या सूत्रानें गति पुढें असतांना गतीला अनुदात्तस्वर सांगितला आहे तो परत्वास्तव 'गतिरनन्तरः' या स्वराचा बाध करील.

(वा. २) 'गतिर्गतौ' यानें 'गतिरनन्तरः' याचा बाध झाल्यामुळें अभि शब्दाला हा प्रकृतिस्वर होत नाहीं; पण त्याहून पुढील उद्धृत शब्दाला 'थाथघञ्०' (६।२।१४४) यानें अन्तोदात्त प्राप्त होत आहे.

---

आश्रय केला आहे म्हणजे कष्ट सोडले नाहींत असा. अहीन म्हणजे न सोडलेलें. कान्तारातीतः येथें कान्ताराच्या पलीकडे गेलेला असा अर्थ असल्यामुळें हा प्रकृतिस्वर होत नाहीं. कारण कान्तार म्हणजे कठीण मार्ग तो सोडला असा अर्थ येथें गम्यमान होतो.

२. तेव्हां कान्तारातीतः येथें अन्त उदात्तच ( ६। २।१४४ ) होतो.

१. ( सू. ४८ ) कर्मवाचक क्त-प्रत्ययान्त उत्तरपद पुढें असतांना तृतीयान्त पूर्वपदाला प्रकृतिस्वर होतो. उदा०—वज्रेण हतः वज्रहतः.

१. ( सू. ४९ ) कर्मवाचक क्त-प्रत्ययान्त उत्तरपद पुढें असतांना धातूच्या जवळच्या गतिसंज्ञक पूर्वपदाला प्रकृतिस्वर होतो. उदा०—प्रकृतम्. 'थाथघञ्०' ( ६।२। १४४) या अन्तोदात्ताचा अपवाद हा प्रकृतिस्वर आहे.

२. कारण, ' कृत् प्रत्ययाचें ग्रहण केलें असेल तेथें कृत्–प्रत्ययान्त म्हणून जो समुदाय घेतला जातो

**प्रकृतिस्वरवचनाद्व्यनन्तोदात्तत्वम् ॥ ३ ॥**

प्रकृतिस्वरवचनसामर्थ्याद्ध्यन्तोदात्तत्वं न भविष्यति। यदि स्यात्प्रकृतिस्वरवचनमिदानीं किमर्थं स्यात्॥

**प्रकृतिस्वरवचनं किमर्थमिति चेदेकगत्यर्थम् ॥ ४ ॥**

प्रकृतिस्वरवचनं किमर्थमिति चेदेकगत्यर्थम्। यत्रैको गतिस्तदर्थमेतत्स्यात्। प्रकृतम् प्रहृतम् ॥ एवमर्थमेव तर्ह्यनन्तरग्रहणं कर्तव्यमत्र यथा स्यात्॥

क्रियमाणेऽपि वा अनन्तरग्रहणेऽत्र न सिध्यति। किं कारणम्। गतिरनन्तरः पूर्वपदं प्रकृतिस्वरं भवतीत्युच्यते यश्चात्र गतिरनन्तरो नासौ पूर्वपदं यश्च पूर्वपदं नासावनन्तरः॥ अपूर्वपदार्थं तर्हीदं वक्तव्यम्। अपूर्वपदस्यापि गतेः प्रकृतिस्वरत्वं यथा स्यात्॥

**अपूर्वपदार्थमिति चेत्कारकेऽतिप्रसङ्गः ॥ ५ ॥**

अपूर्वपदार्थमिति चेत्कारकेऽतिप्रसङ्गो भवति। आगतः दूरादागतः स यथैव गति-

---

(वा. ३) उद्धृत या पहिल्या समासामध्यें उद् याला जो प्रकृत सूत्रानें प्रकृतिस्वर केला आहे तो व्यर्थ होईल म्हणून त्याच्या जोरावर अन्तोदात्त होणार नाहीं. जर अन्तोदात्त होईल तर प्रकृतिस्वर सांगितलेला व्यर्थ होईल.

(वा. ४) प्रकृतिस्वरविधान व्यर्थ होत नाहीं. कारण, जेथें एकच गतिसंज्ञक आहे तेथें प्रकृतिस्वर चरितार्थ आहे. उदा०— प्रकृतम्[३], प्रहृतम्.

तर याचकरितां अनन्तरग्रहण येथें करावें लागत आहे.

अनन्तरग्रहण केलें असतांही अभ्युद्धृतः येथें गतिस्वर साधत नाहीं.

काय कारण?

कारण असें कीं 'धातूच्या जवळ असलेल्या गतिसंज्ञक पूर्वपदाला प्रकृतिस्वर होतो' असें येथें म्हटलें आहे. आणि अभ्युद्धृतः येथें तर धातूच्या जवळचा जो उत् हा गतिसंज्ञक शब्द तो दुसऱ्या समासामध्यें पूर्वपद नाहीं व जो अभि हा पूर्वपद आहे तो धातूच्या जवळ नाहीं.

तर मग जो अनन्तर म्हणजे धातूच्या जवळ आहे तो पूर्वपद नसला तरी त्याला प्रकृतिस्वर होण्याकरितां अनन्तर-ग्रहण केलें पाहिजे.

(वा. ५) पूर्वपद नव्हे अशाही गतीला प्रकृतिस्वर होण्याकरितां अनन्तरग्रहण केलें आहे असें म्हटलें तर कारकाचे ठिकाणीं अतिप्रसंग येतो. उदा०— आगतः दूरादागतः येथें गतिसंज्ञकाच्या पुढील पूर्वपद नसलेल्याही उत्

---

त्यामध्यें धातूच्या मागील गति आणि कारक यांचा समावेश होतो' अशी 'कृद्ग्रहणे गतिकारकपूर्वस्यापि ग्रहणम्' परिभाषा आहे. म्हणून उद्धृत एवढ्या समुदायाला क्त-प्रत्ययान्त म्हणतां येतें.

३. असेंच उद्धृतम् येथेंही पुनः अभि याच्याशीं समास केला नाहीं म्हणजे तेथेंही ह्या प्रकृतिस्वराला चारितार्थ्य आहे. तेव्हां जर अभि हा उपसर्ग लावला तर त्याचा समास झाल्यानंतर उद्धृत हें उत्तरपद धरून अन्त उदान्त प्राप्त होतो हा दोष येणारच.

४. उद्धृत या पहिल्या समासामध्यें उत् याला प्रकृत सूत्रानें केलेला प्रकृतिस्वर हाच मागून अभि याच्याशी समास केला तरी टिकावा याकरितां.

५. गतिः याचा वाक्यार्थ करून अनन्तरः याचा वाक्यार्थ निराळा करावयाचा. त्यामध्यें पूर्वपदाचा संबंध करावयाचा नाहीं. तेव्हां अभि याच्याशीं समास केल्यानंतरही उत् याला दुसऱ्या वाक्यार्थानें प्राप्त झालेला प्रकृतिस्वर अन्तोदात्ताचा बाध करील.

पूर्वपदस्य भवत्येवं कारकपूर्वपदस्यापि प्राप्नोति ॥

## सिद्धं तु गतेरन्तोदात्ताप्रसङ्गात् ॥ ६ ॥

सिद्धमेतत् । कथम् । यत्तदन्तस्थाथघञ्क्ताजबित्रकाणामिति तद्गतेर्न प्रसञ्जयितव्यम् । किं कृतं भवति । कृत्स्वरापवादोऽयं भवति । तत्र गतिरनन्तर इत्यस्यावकाशः । प्रकृतम् प्रहृतम् । अन्तस्थाथघञ्क्ताजबित्रकाणामित्यस्यावकाशः । दूराद्गतः दूराद्यातः । इहोभयं प्राप्नोति । आगतः दूरादागतः । अन्तस्थाथघञ्क्ताजबित्रकाणामित्येतद्भवति विप्रतिषेधेन ॥ अवश्यं गतेस्तत्प्रसञ्जयितव्यं भेदः प्रभेद इत्येवमर्थम् ॥ एवं तर्हि योगविभागः करिष्यते । अन्तस्थाथघञजबित्रकाणाम् । ततः क्तः क्तान्तमुत्तरपदमन्तोदात्तं भवति । अत्र कारकोपपदग्रहणमनुवर्तते गतिग्रहणं निवृत्तम् ॥ अथवोपरिष्टाद्योगविभागः करिष्यते । इदमस्ति सूपमानात्क्तः संज्ञायामनाचितादीनां प्रवृद्धादीनां च

---

याला अभ्युद्धृतः येथें जसा गतिस्वर होतो तसा येथें दूरात् या कारकाच्या पुढील पूर्वपद नसलेल्या 'आ' या गतीला गतिस्वर प्राप्त होत आहे.

( वा. ६ ) हें सिद्ध होत आहे.

तें कसें ?

असें कीं–अन्त उदात्त सांगणारें 'थाथघञ्०' हें सूत्र गतीच्या संबंधानें घेऊं नये.

असें केलें म्हणजे काय होईल ?

हा गतिस्वर कृत्स्वराचाच (६।२।१३९) अपवाद होईल; थाथादिस्वराचा होणार नाहीं. 'गतिरनन्तरः' याला प्रकृतम् तसेंच प्रहृतम् येथें अवकाश आहे, व थाथादिस्वराला दूराद्गतः दूराद्यातः येथें अवकाश आहे; पण दूरादागतः येथें दोघांची प्राप्ति आली असतां विप्रतिषेधानें परत्वास्तव थाथादिस्वर होतो.

पण थाथादिसूत्रामध्यें गतीचा संबंध केलाच पाहिजे. कारण प्रभेदः येथें 'गतिकारकोप०' या उत्तरपद–प्रकृतिस्वराचा बाध करून थाथघञ्० यानें अन्त उदात्त झाला पाहिजे.

असें आहे तर योगविभाग करण्यांत येईल. तो असा– 'अन्तः' या सूत्राच्या पुढें 'थाथघञज-बित्रकाणाम्' एवढेंच एक सूत्र करावें. पुढें 'क्तः' असें दुसरें सूत्र करावें; त्यानें फक्त क्तप्रत्ययान्त उत्तरपदाला अन्तोदात्त सांगितला जाईल. तेथें कारकोपपदग्रहण अनुवृत्तीनें येतें, गतिग्रहण अनुवृत्तीनें येत नाहीं. किंवा पुढें योगविभाग करण्यांत येईल. 'सूपमानात् क्तः,' 'संज्ञायामनाचितादी-

---

६. 'थाथघञ्०' ( ६।२।१४४ ) या सूत्रामध्यें गतिकारकोपपदात् अशी जी अनुवृत्ति येत आहे ती तशी आणूं नये; तर त्यांतील कारकोपपदात् एवढीच आणावी. म्हणजे गतीच्या पुढील क्त-प्रत्ययान्ताला त्या अन्त उदात्ताची प्राप्तीच येणार नाहीं.

७. येथें प्र या गतीच्या पुढें भेद हें घञन्त उत्तरपद आहे. म्हणून 'थाथघञ्० ' यानें अन्त उदात्त होतो. याकरिता तेथें गतिग्रहणाची अनुवृत्ति केलीच पाहिजे. ती केली म्हणजे प्रकृतम् येथेंही त्या अन्तोदात्ताची प्राप्ति येते म्हणून अनवकाश असा हा प्रकृतिस्वर त्या अन्त उदात्ताचा अपवाद ठरतो. तेव्हां दूरादागतः येथें अनन्तरः यानें दूरात् याच्याशीं समास केल्यानंतर आ या गतीला प्रकृतिस्वर होऊं लागेल हा दोष येतो.

८. तेव्हां प्रकृतम् येथें प्रस्तुत सूत्राला चारितार्थ्य असल्यामुळें प्रस्तुत सूत्र हें क्तः या सूत्राचा अपवाद होत नाहीं. म्हणून दूरादागतः येथें परत्वास्तव गतिस्वराचा बाध करून क्तः यानें अन्तोदात्त होईल.

[ ६. २. १४५-१४७ ] इति । ततो वक्ष्यामि कारकात् । कारकाच्च क्तान्तमुत्तरपदमन्तोदात्तं भवति । ततो दत्तश्रुतयोरेवाशिषि कारकादिति ॥ एवं च कृत्वा नार्थोऽनन्तरग्रहणेन ॥ कथमभ्युद्धृतम् । उद् हरतिक्रियां विशिनष्टि । उदा विशिष्टामभिर्विशिनष्टि । तत्र गतिरनन्तर इति च प्राप्नोति गतिर्गतौ [ ८. १. ७० ] इति च ।

नाम्,' 'प्रवृद्धादीनां च' ( ६।२।१४५–१४७ ) असा मूळचा सूत्रक्रम आहे. त्याच्या पुढें 'कारकात्' एवढेंच एक सूत्र करावें. कारकाहून पुढील क्तान्त उत्तरपद अन्तोदात्त[९] होतें असा त्याचा अर्थ होईल. त्याच्या पुढें 'दत्तश्रुतयोरेवाऽऽशिषि' असें दुसरें सूत्र करावें. तेथें कारकात् हें अनुवृत्तीनें येईल.

आतां जर कारकात् हें निराळें सूत्र केलें तर अनन्तर-ग्रहण करावयास नको[१०].

मग अभ्युद्धृतम् येथे उद् हा उपसर्ग हरति या क्रियेवरील कांहीं विशेष दाखवितो, आणि त्या विशेषानें युक्त अशा हरतिक्रियेवरील दुसरा कांहीं विशेष अभि हा उपसर्ग दाखवितो. तेव्हां उद्धृतः असा एक समास झाल्यावर अभि शब्दाशीं दुसरा समास होतो. तेथें अभि याला हा प्रस्तुत सूत्रानें गतिस्वर व गतिर्गतौ ( ८।१।७० ) यानें निघात अशीं दोन कार्यें प्राप्त होत आहेत. गतिस्वराला प्रकृतम्

९. दूरादागतः येथें गतिस्वराचा बाध करून अन्त उदात्त व्हावा म्हणून हें पृथक् सूत्र केलें आहे.

१०. येथे अनन्तरग्रहणाचा उपयोग दोन रीतींनीं संभवतो. अनन्तरगतीला झालेला प्रकृतिस्वर कायम ठेवणें ही एक रीत, आणि दुसरी अनन्तर नसलेल्या गतीला प्रकृतिस्वर होऊं न देणें ही. त्यांपैकीं पहिल्या तऱ्हेच्या उपयोगाकरितां अनन्तरग्रहण करावयास नको. कारण उद्धृत या पहिल्या समासामध्यें उत् याला प्रकृतसूत्रानें झालेला जो प्रकृतिस्वर तो अभि याच्याशीं समास झाल्यानंतर उद्धृत या उत्तरपदाला कृत्स्वरानें ( ६।२।१३९ ) प्रकृतिस्वर झाला म्हणजे टिकेल. फक्त त्या कृत्स्वराचा बाधक थाथघञ्० यानें सांगितलेला अन्तोदात्त तेथें न आला पाहिजे. तें काम 'कारकात्' या योगविभागानें नियम केला म्हणजे होईल; तेथें गतिग्रहणाची अनुवृत्ति करावयाची. तेव्हां कोणत्याही पूर्वपदाच्या पुढील सगतिक क्त-प्रत्ययान्ताला जर 'थाथघञ्०' यानें अन्तोदात्त होईल तर कारकाहून पर असेल तरच होईल असा नियम होतो. म्हणून अभ्युद्धृत येथें उद्धृत हें सगतिक क्त-प्रत्ययान्त कारकाहून पुढें नसल्यामुळें त्याला थाथघञ्० यानें अन्तोदात्त होणार नाहीं. तेव्हां त्याकरितां अनन्तरग्रहण नको. आतां अनन्तर-ग्रहणाचा दुसऱ्या तऱ्हेचा उपयोग म्हणजे जो गतिसंज्ञक शब्द अनन्तर नाहीं अशा अभि याला प्रकृतिस्वर होऊं न देणें. परंतु तेथें व्यवधान असल्यामुळें प्राप्तीच येत नाहीं. तेव्हां अनन्तर-ग्रहण हें व्यर्थ होतें. म्हणून त्यावरून ' कृद्ग्रहणे० ' ( मागील टीप २ पहा ) ही परिभाषा ज्ञापित होते. ह्या दोन तऱ्हेच्या उपयोगापैकीं पहिल्या उपयोगामध्यें अनन्तरः याचा निराळा वाक्यार्थ वाक्यभेदानें करावा लागतो. आणि त्याशिवाय या अनन्तर-ग्रहणाच्या सामर्थ्यास्तव मागील समासामध्यें प्राप्त झालेल्या अन्तोदात्ताचा बाध करणें असें फार गौरव आहे. दुसऱ्या तऱ्हेच्या उपयोगामध्यें वाक्यभेद नाहीं. फक्त त्याच्या सामर्थ्यास्तव कृद्ग्रहणे० ही परिभाषा ज्ञापन करणें एवढेंच गौरव आहे. आता येथें अभि आणि उत् या दोन उपसर्गांचा एकदम हरति या क्रियेशीं संबंध करून युगपत्-वृत्ति केली तर तेथें अभि हें पूर्वपद आणि हृत हें उत्तरपद या दोहोंमध्यें उत् यानें व्यवधान येत असल्यामुळें हा गतिस्वर, कृत्स्वर आणि थाथघञ्० हा स्वर यांपैकीं कोणाचीहि प्राप्ति येत नाहीं असें समजावें.

गतिरनन्तर इत्यस्यावकाशः । प्रकृतम् प्रहृतम् । गतिर्गतावित्यस्यावकाशः । अभ्युद्धरति उपसमादधाति । इहोभयं प्राप्नोति । अभ्युद्धृतम् उपसमाहृतम् । गतिर्गतावित्येतद्भवति विप्रतिषेधेन ॥

एवं तर्हि सिद्धे सति यदनन्तरग्रहणं करोति तज्ज्ञापयत्याचार्यो भवत्येषा परिभाषा कृद्ग्रहणे गतिकारकपूर्वस्यापीति । किमेतस्य ज्ञापने प्रयोजनम् । अवतप्तेनकुलस्थितं त एतत् । उदकेविशीर्णं त एतत् । सगतिकेन सनकुलेन समासः सिद्धो भवति ॥

## तादौ च निति कृत्यतौ ॥ ६ । २ । ५० ॥

कृद्ग्रहणं किमर्थम् । यथा तकारादिग्रहणं कृद्विशेषणं विज्ञायेत । तकारादौ निति कृतीति । अथाक्रियमाणे कृद्ग्रहणे कस्य तकारादिग्रहणं विशेषणं स्यात् । उत्तरपदविशेषणम् । तत्र को दोषः । इहैव स्यात् । प्रतरिता प्रतरितुम् । इह न स्यात् । प्रकर्ता प्रकर्तुम् ॥

### तादौ निति कृद्ग्रहणानर्थक्यम् ॥१॥

तादौ निति कृद्ग्रहणमनर्थकम् । क्रियमाणेऽपि कृद्ग्रहणेऽनिष्टं शक्यं विज्ञातुम् । तकारादावुत्तरपदे निति कृतीति । अक्रियमाणे चेष्टम् । नित्यस्तकारादिस्तदन्त उत्तर-

---

व प्रहृतम् येथे अवकाश आहे. आणि निघाताला अभ्युद्धरति व उपसमादधाति येथें अवकाश आहे. परंतु अभ्युद्धृतम् व उपसमाहृतम् येथें दोघांची प्राप्ति आली असतां विप्रतिषेधानें परत्वास्तव निघात होतो.

तर मग अशा रीतीनें अनन्तरग्रहणावांचूनच काम साधत असतां ज्या अर्थी आचार्य अनन्तर-ग्रहण करीत आहेत त्या अर्थी 'कृद्ग्रहणे गतिकारकपूर्वस्यापि ग्रहणम्' अशी परिभाषा ते सुचवीत आहेत.

आतां ही परिभाषा सुचाविल्याचें काय फल?

'अवतप्तेनकुलस्थितं त एतत्' तसेंच 'उदकेविशीर्णं त एतत्' येथें नकुल या कारकासहित नकुलस्थित हें तसेंच वि या गतीसहित विशीर्ण हें क्त-प्रत्ययान्त समजल्यामुळें त्याच्या बरोबर अवतप्ते आणि उदके या सप्तम्यन्तांचा समास[११] ( २।१।४७ ) सिद्ध होतो.

( सू. ५० ) येथें कृति असें कशाकरितां म्हटलें आहे ?

तकारादि हें कृताचेंच विशेषण व्हावें म्हणून म्हटलें आहे.

आतां कृद्ग्रहण केलें नाहीं तर तकारादि हें कोणाचें बरें विशेषण होईल ?

उत्तरपदाचें विशेषण होईल.

मग तसें झालें असतां कोणता दोष येईल ?

प्रतरिता व प्रतरितुम् येथेंच हें सूत्र प्रवृत्त होईल. आणि प्रकर्ता व प्रकर्तुम् येथें प्रवृत्त होणार नाहीं.

(वा.१.) तादौ च निति० या सूत्रामध्यें कृद्ग्रहण केलें आहे तें अनर्थक होत आहे. कारण कृद्ग्रहण केलें असतांनाही अनिष्ट होणें शक्य आहे. तें असें कीं, नकार इत्संज्ञक असलेल्या कृत्-प्रत्ययान्त उत्तरपदाला तकारादि हें विशेषण लावतां येतें. आणि कृद्ग्रहण केलें नसतांही इष्ट होणें शक्य आहे. तें असें कीं तकारादि हें विशेषण निति याचें केलें म्हणजे तकारादि जो

---

११. येथें अलुक् समास आहे. येथें सप्तमीचा अलुक् ( ६।३।१४ ) झाला आहे.

१. ( सू. ५० ) तकारादि आणि नकारेत्संज्ञक असा जो तु या प्रत्ययाशिवाय कृत् प्रत्यय तदन्त उत्तरपद पुढें असतांना गतिसंज्ञक पूर्वपदाला प्रकृतिस्वर होतो. उदा० प्रकर्ता. येथें तृन् प्रत्यय केला आहे.

पद इति । यावता क्रियमाणेऽप्यनिष्टं विज्ञायते ऽक्रियमाणे चेष्टमक्रियमाण एवेष्टं विज्ञास्यामः ॥

**कृदुपदेशे वा ताद्यर्थमिडर्थम् ॥ २ ॥**

कृदुपदेशे तर्हि ताद्यर्थमिडर्थं कृद्ग्रहणं कर्तव्यम् । कृदुपदेशे यस्तकारादिरित्येवं यथा विज्ञायेत । किं प्रयोजनम् । इडर्थम् । इडादावपि सिद्धं भवति । प्रलविता प्रलवितुम् ॥

**[ तवै चान्तश्च युगपत् ॥ ६ । २ । ५१ ॥ ]**

**अनिगन्तोऽञ्चतौ वप्रत्यये ॥ ६ । २ । ५२ ॥**

**अनिगन्तप्रकृतिस्वरत्वे यणादेशे प्रकृतिस्वरभावप्रसङ्गः ॥ १ ॥**

अनिगन्तप्रकृतिस्वरत्वे यणादेशे प्रकृतिस्वरभावः प्राप्नोति । प्रत्यङ् प्रत्यञ्चौ प्रत्यञ्चः ॥ अनिगन्तवचनमिदानीं किमर्थं स्यात् ।

**अनिगन्तवचनं किमर्थमिति चेदयणादिष्टार्थम् ॥ २ ॥**

अयणादिष्टार्थमेतत्स्यात् । यदा यणादेशो न । कदा च यणादेशो न । यदा शाकलम् ।

---

नित् तदन्त उत्तरपद असा अर्थ झाल्यामुळे इष्ट साधत आहे. तेव्हां कृद्ग्रहण केलें असतांनाही अनिष्टाचा संभव आहे व केलें नसतांनाही इष्टाचा संभव आहे तेव्हां कृद्ग्रहण न करतांच इष्ट साधून घ्यावें हें बरें.

( वा. २ ) तर मग उपदेशीं तकारादि जो कृत् प्रत्यय असा अर्थ होण्याकरितां कृद्ग्रहण केलें आहे.

तें कशाकरितां ?

इट् आगमाकरितां. म्हणजे तकारादि कृत्-प्रत्ययाला इट् आगम झाला असतांही हें सूत्र प्रवृत्त होतें. उदा० प्रलविता, प्रलवितुम्.

( सू. ५२ वा. १ ) इगन्तभिन्न गतीला सांगितलेला जो हा प्रकृतिस्वर तो यणादेश झाला असतांना गति अनिगन्त होत असल्यामुळें त्या ठिकाणीं प्रकृतिस्वराचा प्रसंग येत आहे. उदा०–प्रत्यङ् प्रत्यञ्चौ प्रत्यञ्चः.

पण येथें जर प्रकृतिस्वर होईल तर अनिगन्त असें जें म्हटलें आहे तें व्यर्थ होईल.

( वा. २ ) 'यणादेश झालेल्या इगन्ताला जर अनिगन्त समजून स्वर होईल तर अनिगन्तग्रहण व्यर्थ होतें' असें म्हटलें; पण तें व्यर्थ होत नाहीं. कारण जेव्हां प्रत्यङ् वगैरे ठिकाणीं यणादेश होत नाहीं तेव्हां या स्वराच्या अप्रवृत्तीकरितां अनिगन्तग्रहण चरितार्थ आहे.

पण यणादेश केव्हां होत नाहीं ?

जेव्हां 'इकोऽसवर्णे०' ( ६।१।१२७ ) हा प्रकृतिभाव होत असेल तेव्हां.

---

१. ( सू. ५१ ) तवै-प्रत्ययान्त उत्तरपद पुढें असतांना गतिसंज्ञक पूर्वपदाला प्रकृतिस्वर होतो. आणि त्याच्या बरोबरच तवै प्रत्ययाचा अन्त उदात्त होतो. उदा० अन्वेतवै. येथें इण् धातूहून तुमुन् प्रत्ययाच्या अर्थी तवै प्रत्यय ( ३।४।९ ) केला आहे. कृत्स्वराचा हा अपवाद आहे.

१. ( सू. ५२ ) क्विप् क्विन् विच् व विट् या प्रत्ययांतील इत्संज्ञक वर्ण जाऊन फक्त वकार उरतो म्हणून त्या प्रत्ययांना 'व' प्रत्यय म्हणतात. त्या वकाराचाही मागून लोप ( ६।१।६७ ) होऊन कांहीच उरत नाहीं. म्हणून अविद्यमान प्रत्यय अशा अर्थानें अप्रत्यय असेंही म्हणतात. व–प्रत्ययान्त अञ्च् धातु उत्तरपद पुढें असतांना इगन्तभिन्न गतिसंज्ञक शब्दाला प्रकृतिस्वर होतो. उ० प्राङ्.

२. तेव्हां त्याच्या सामर्थ्यास्तव भूतपूर्व गति घ्यावी म्हणजे यण् करण्याचे पूर्वी हा शब्द इगन्त होता तो गृहीत धरून यण् केल्यानंतरही निषेध होईल.

उक्तं वा ॥ ३ ॥

किमुक्तम् । समासे शाकलं न भवतीति ॥ यत्र तर्ह्यञ्चतेरकारो लुप्यते । प्रतीचः प्रतीचा । चुस्वरस्तत्र बाधको भविष्यति । अयमेवेष्यते । वक्ष्यति ह्येतच्चोरनिगन्तोऽञ्चतौ वप्रत्यय इति ॥ यत्तर्हि न्यध्योः प्रकृतिस्वरं शास्ति । एष हि यणादिष्टार्थ आरम्भः । एतदप्ययणादिष्टार्थमेव स्यात् । यदा यणादेशो न । कदा च यणादेशो न । यदा शाकलम् । उक्तं वा । किमुक्तम् । समासे शाकलं न भवतीति । यत्र तर्ह्यञ्चतेरकारो लुप्यते । अधीचः अधीचा । चुस्वरस्तत्र बाधको भविष्यति । अयमेवेष्यते । वक्ष्यति ह्येतच्चोरनिगन्तोऽञ्चतौ वप्र-

(वा. ३) अथवा यासंबंधानें सांगितलेंच आहे.

तें काय सांगितलें आहे ?

समासामध्यें प्रकृतिभाव प्रवृत्त होत नाहीं असें (६।१।१२७ वा. १) सांगितलें आहे. तर मग जेथें अञ्च् धातूचा अकार लुप्त होतो अशा प्रतीचः प्रतीचा या ठिकाणीं यणादेश नसल्यामुळें तेथें स्वराच्या अप्रवृत्तीकरितां अनिगन्तग्रहण चरितार्थ होत आहे.

पण तेथें चुस्वर (६।१।२२२) हा बाधक होईल.

हें म्हणणें बरोबर नाहीं. कारण तशा ठिकाणींही हा प्रकृतिस्वरच इष्ट आहे. येथेंच पुढें 'चोरनिगन्तोऽञ्चतौ वप्रत्यये' असें वार्तिककार म्हणत आहेत[3].

तर मग 'न्यधी च' या पुढील सूत्रानें नि व अधि यांना प्रकृतिस्वर सांगितला आहे तो घ्यावा.

तो यणादेश झालेल्या नि व अधि यांच्याकरितां सांगितला आहे.

पण 'न्यधी च' हेंही सूत्र जेव्हां यणादेश होत नाहीं तेव्हां तेथें प्रकृतिस्वराकरितां अवश्य केलेंच पाहिजे[4].

यणादेश केव्हां होत नाहीं ?

जेव्हां 'इकोऽसवर्णे०' हा प्रकृतिभाव होतो तेव्हां.

अथवा 'उक्तं वा' या प्रकृत वार्तिकाचा अर्थ पुढें दिल्याप्रमाणें होईल :

यासंबंधानें सांगितलेंच आहे.

तें काय बरें सागितले आहे ?

समासामध्यें प्रकृतिभाव प्रवृत्त होत नाहीं असें पूर्वी सांगितलें आहे.

तर मग जेथें अञ्चतीच्या अकाराचा लोप होतो तेथें—म्हणजे अधीचः व अधीचा येथें—प्रकृत सूत्र प्रवृत्त होत नाहीं म्हणून प्रकृतिस्वराकरितां तें सूत्र चरितार्थ होत आहे.

पण तेथें चुस्वर बाधक होईल.

हें म्हणणें बरोबर नाहीं. कारण, दधीचः येथें विप्रतिषेधानें चुस्वराचा बाध करून हा प्रकृतिस्वरच होणें इष्ट आहे. येथेंच पुढें 'चोरनिगन्तोऽञ्चतौ वप्रत्यये' असा विप्रतिषेध वार्तिं-

३. तेव्हां त्या वार्तिकाप्रमाणें प्राचः येथें जसा हा प्रकृतिस्वर चु–स्वराचा बाध करतो तसा प्रतीचः येथेंही बाध करून प्रकृतिस्वर होईल. याकरितां अनिगन्त असें म्हटलें पाहिजे. तेव्हां भूतपूर्व गति घेण्याला कांहीं प्रमाण नाहीं.

४. तेव्हां अर्थातच तें सूत्र भूतपूर्व गतीविषयीं प्रमाण घेतां येईल. नाहीं तर यण् झाल्यानंतर अनिगन्त असल्यामुळें पूर्वसूत्रानेंच सिद्धि होऊन तें व्यर्थ होणार आहे.

५. तेव्हां भूतपूर्व गति घेतली नाहीं तरी त्या सूत्राचा उपयोग आहे.

त्यय इति ॥ यत्तर्हि नेरेव प्रकृतिस्वरं शास्ति । एष हि यणादिष्टार्थ आरम्भः । एतदप्ययणादिष्टार्थमेव स्यात् । कथम् । अकृते यणादेशे पूर्वपदप्रकृतिस्वरत्वे कृत उदात्तस्वरितयोर्यणः स्वरितोऽनुदात्तस्य [ ८. २. ४ ] इत्येष स्वरः सिद्धो भवति । न्यङ् ॥ तस्मात्सुष्ठूच्यतेऽनिगन्तप्रकृतिस्वरत्वे यणादेशे प्रकृतिस्वरभावप्रसङ्ग इति ॥

## चोरनिगन्तोऽञ्चतौ वप्रत्यये ॥ ४ ॥

चुस्वरादनिगन्तोऽञ्चतौ वप्रत्यय इत्येष स्वरो भवति विप्रतिषेधेन । चुस्वरस्यावकाशः । दधीचः पश्य । दधीचा दधीचे । अनिगन्तोऽञ्चतौ वप्रत्यय इत्यस्यावकाशः । पराङ् पराञ्चौ पराञ्चः । इहोभयं प्राप्नोति । अवाचा अवाचे । अनिगन्तोऽञ्चतौ वप्रत्यय इत्येतद्भवति विप्रतिषेधेन ॥

## न वा चुस्वरस्य पूर्वपदप्रकृतिस्वरभाविनि प्रतिषेधादितरथा हि सर्वापवादः ॥ ५ ॥

न वैतद्विप्रतिषेधेनापि सिध्यति । कथं तर्हि सिध्यति । चुस्वरस्य पूर्वपदप्रकृतिस्वरभाविनि प्रतिषेधात् । चुस्वरः पूर्वपदप्रकृतिस्वरभाविनः प्रतिषेध्यः । इतरथा हि सर्वापवादश्चुस्वरः । अक्रियमाणे हि प्रति-

---

ककार सांगत आहेत.

तर मग जो पुढील सूत्रानें नि शब्दाला[६] प्रकृतिस्वर सांगितला आहे तो घ्या. तो यण् आदेश होतो अशा ठिकाणीं प्रकृतिस्वर होण्याकरितांच सांगितला आहे.

तरी पण तेथेंही जोंपर्यंत यणादेश झाला नाहीं तोंपर्यंतच प्रकृतिस्वर होण्याकरितां तो उपयोगीं पडत आहे.

तो कसा ?

'न्यङ्' येथें नि अञ्च् या स्थितींत यण् आदेशाच्या पूर्वी प्रकृतिस्वरानें उदात्त झालेल्या इकाराला यण् झाला म्हणजे त्याच्या पुढील अनुदात्त अकाराला 'उदात्तस्वरितयो: ०' (८।२।४१) यानें स्वरित सिद्ध होतो तेव्हां अनिगन्त गतिसंज्ञकाला सांगितलेला जो हा प्रकृतिस्वर तो यणादेश केला असतां प्रत्यङ् इत्यादि स्थलीं प्रसक्त होत आहे असें जें म्हटलें आहे तें बरोबरच आहे.

(वा. ४) चौ या सूत्रानें सांगितलेल्या स्वरापेक्षां विप्रतिषेधानें 'अनिगन्तो०' हा स्वर अगोदर होतो. चुस्वराला दधीचः पश्य येथें अवकाश आहे. व 'अनिगन्तो०' या प्रकृतिस्वराला पराङ् पराञ्चौ पराञ्चः येथें अवकाश आहे. पण अवाचा अवाचे येथें दोघांची प्राप्ति येत आहे. त्यांत विप्रतिषेधानें 'अनिगन्तो०' हाच स्वर होतो.

(वा. ५) अथवा पूर्वपद–प्रकृतिस्वर इष्ट आहे अशा 'अवाचा' 'अवाचे' इत्यादि स्थलीं विप्रतिषेधानें[७] काम साधत नाहीं.

तर मग कशानें साधेल ?

चुस्वर न केला तर. जेथें पूर्वपदप्रकृतिस्वर इष्ट आहे अशा ठिकाणीं चुस्वराचा निषेध करावा म्हणजे साधेल. जर चुस्वराचा निषेध केला नाहीं तर हा चुस्वर सर्वांचा अपवाद[८]

---

६. अधीचः व अधीचा येथें चु–स्वरानें अधि याला अन्तोदात्त होईल तेव्हां त्याचा बाध करून प्रकृतिस्वरानें आद्युदात्त होतो असा उपयोग नीचः नीचा येथें नि शब्दाविषयीं सांगतां येत नाहीं. कारण नि हा एकाच् असल्यामुळें चुस्वर आणि प्रकृतिस्वर यांत फरक नाहीं.

७. तात्पर्य, यण् केल्यानंतर अनिगन्त शब्द झाला तरी हा प्रकृतिस्वर होत नाहीं असा निषेध सांगितला पाहिजे.

८. तेव्हां विप्रतिषेधापेक्षां अपवाद प्रबल असल्यामुळें चुस्वर होऊं लागेल.

षेधे सर्वापवादोऽयं चुस्वरः । कथम् । प्रत्ययस्वरस्यापवादोऽनुदात्तौ सुप्पितौ [ ३. १. ४] इति । अनुदात्तौ सुप्पितावित्यस्योदात्तनिवृत्तिस्वरः । उदात्तनिवृत्तिस्वरस्य चुस्वरः । स यथैवोदात्तनिवृत्तिस्वरं बाधत एवमनिगन्तस्वरमपि बाधेत ॥ यदि तावत्संख्यातः साम्यमयमपि चतुर्थः । समासान्तोदात्तत्वस्यापवादोऽव्ययस्वरः । अव्ययस्वरस्य कृत्स्वरः । कृत्स्वरस्यायम् । उभयोश्चतुर्थयोर्युक्तो विप्रतिषेधः ॥ सति शिष्टस्तर्हि चुस्वरः । कथम् । चावित्युच्यते । यत्रास्यैतद्रूपम् । अजादावसर्वनामस्थाने ऽमिनिवृत्तेऽकारलोपे नकारलोपे च । तस्मात्सुष्ठूच्यते न वा चुस्वरस्य पूर्वपदप्रकृतिस्वरभाविनि प्रतिषेधादितरथा हि सर्वापवाद इति ॥

---

होईल.

तो कसा ?

प्रत्ययस्वराचा ( ३।१।३ ) 'अनुदात्तौ सुप्पितौ' ( ३।१।४ ) हा अपवाद आहे. 'अनुदात्तौ सुप्पितौ' याचा उदात्त–निवृत्तिस्वर ( ६।१।१६१ ) अपवाद आहे, आणि त्या उदात्त–निवृत्तिस्वराचा चुस्वर अपवाद आहे. तेव्हां तो चुस्वर जसा उदात्त–निवृत्तिस्वराचा बाध करीत आहे तसा 'अनिगन्तो०' या प्रकृतिस्वराचाही बाध करील.[९]

आतां उदात्तनिवृत्तिस्वर आणि हा प्रकृतिस्वर या दोघांमध्यें साम्य तरी काय आहे ?[१०]

जर संख्येनें साम्य म्हणाल तर नाहीं. कारण हा प्रकृतिस्वरही चवथाच होत आहे. तो असा कीं – प्रथमतः 'समासान्तोदात्त' ( ६।१।२२३ ) आला, त्याचा बाध करून 'तत्पुरुषे०' (६।२।२) यानें अव्ययपूर्वपद–प्रकृतिस्वर आला, त्याचा बाध करून 'गतिकारको०' ( ६।२।१३९ ) यानें कृदुत्तरपद–प्रकृतिस्वर आला व त्याचा बाधक 'अनिगन्तो०' हा प्रकृतिस्वर येत आहे. तेव्हां अशा रीतीनें चवथ्या चवथ्या स्वरांचा विप्रतिषेध येणें रास्तच आहे.

तर मग चुस्वर सतिशिष्ट[११] होत असल्यामुळें तो प्रबल होय.

त्या चुस्वराला सतिशिष्टत्व कसें ?

'चौ' असें तेथें म्हटलें आहे. तेव्हां अञ्चु धातूचें 'चु' असें रूप बनल्यानंतर त्या स्वराची प्राप्ति येणार आहे.

अञ्चु धातूचें 'चु' असें रूप केव्हां बनेल ?

सर्वनामस्थानभिन्न यजादि प्रत्यय केल्यानंतर अकार व नकार यांचा लोप झाला म्हणजे तसें रूप बनतें.[१२] तेव्हां पूर्वपदप्रकृतिस्वर इष्ट असेल अशा ठिकाणीं चुस्वराचा निषेध करावा, नाहीं तर चुस्वर सर्वापवाद होईल असें म्हटलें आहे तें बरोबरच आहे.

---

९. प्रत्ययस्वर पहिला, अनुदात्तौ सुप्पितौ हा दुसरा, उदात्तनिवृत्तिस्वर तिसरा व त्याचा बाधक चवथा चुस्वर होतो. तसेंच, समासान्तोदात्त पहिला, कृत्स्वर दुसरा, आणि हा पूर्वपदप्रकृतिस्वर तिसरा. तेव्हां अर्थातच तिसऱ्या उदात्तनिवृत्ति–स्वराप्रमाणें ह्या तिसऱ्या प्रकृतिस्वराचा चवथ्या चुस्वरानें बाध होणार आहे.

१०. कीं ज्या साम्यामुळें त्याच्या सारखा ह्याचाही चुस्वरानें बाध होईल असें म्हणतां येईल.

११. दोघांची प्राप्ति एकदम येत नसल्यामुळें विप्रतिषेध घेणें रास्त नाहीं.

१२. अञ्चु धातूचा उकार हा इत्संज्ञक असल्यामुळें त्याचा अगोदरच लोप ( १।३।९ ) झाला आहे. तेव्हां अञ्चु धातूपैकीं फक्त चकार उरला म्हणजे चुस्वर प्रवृत्त होतो.

## विभक्तीषत्स्वरात्कृत्स्वरः ॥ ६ ॥

विभक्तिस्वरादीषत्स्वराच्च कृत्स्वरो भवति विप्रतिषेधेन । विभक्तिस्वरस्यावकाशः । अक्षशौण्डः स्त्रीशौण्डः । कृत्स्वरस्यावकाशः । इध्मप्रव्रश्चनः । इहोभयं प्राप्नोति । पूर्वाह्णेस्फोटकाः अपराह्णेस्फोटकाः । कृत्स्वरो भवति विप्रतिषेधेन ॥ ईषत्स्वरस्यावकाशः । ईषत्कडारः ईषत्पिङ्गलः । कृत्स्वरस्य स एव । इहोभयं प्राप्नोति । ईषद्भेदः । कृत्स्वरो भवति विप्रतिषेधेन ॥

## चित्स्वराद्धारिस्वरः ॥ ७ ॥

चित्स्वराद्धारिस्वरो भवति विप्रतिषेधेन । चित्स्वरस्यावकाशः । चलनः चोपनः । हारिस्वरस्यावकाशः । याज्ञिकाश्वः वैयाकरणहस्ती । इहोभयं प्राप्नोति । पितृगवः मातृगवः । हारिस्वरो भवति विप्रतिषेधेन ॥

## कृत्स्वराच्च ॥ ८ ॥

कृत्स्वराच्च हारिस्वरो भवति विप्रतिषेधेन । कृत्स्वरस्यावकाशः । इध्मप्रव्रश्चनः । हारिस्वरस्य स एव । इहोभयं प्राप्नोति । अक्षहृतः वाडवहार्यः । हारिस्वरो भवति विप्रतिषेधेन ॥

## न वा हरणप्रतिषेधो ज्ञापकः कृत्स्वराबाधकत्वस्य ॥ ९ ॥

न वार्थो विप्रतिषेधेन । किं कारणम् । हरणप्रतिषेधो ज्ञापकः कृत्स्वराबाधकत्वस्य । यदयमहरण इति प्रतिषेधं शास्ति तज्ज्ञापयत्याचार्यो न कृत्स्वरो हारिस्वरं बाधत इति ॥

---

( वा. ६ ) विभक्तिस्वर ( ६।२।२ ) आणि ईषत् शब्दाला सांगितलेला स्वर (६।२।५४) या दोन्ही स्वरांपेक्षां विप्रतिषेधानें परत्वास्तव कृत्स्वर होतो. विभक्तिस्वराला अक्षशौण्डः व स्त्रीशौण्डः येथें अवकाश आहे, व कृत्स्वराला इध्मप्रव्रश्चनः व पलाशशातनः येथें अवकाश आहे, पण पूर्वाह्णेस्फोटकाः व अपराह्णेस्फोटकाः येथे दोघांची प्राप्ति आली असतां विरोध असल्यामुळे पर जो कृत्स्वर तो होतो. तसेंच ईषत्स्वराला ईषत्कडारः व ईषत्पिङ्गलः येथें अवकाश आहे व कृत्स्वराला अवकाश आतां दाखविलाच आहे. पण ईषद्भेदः येथें दोघांची प्राप्ति येते; तेव्हां तेथें परत्वास्तव कृत्स्वर होतो.

( वा. ७ ) चित्स्वरा– ( ६।१।१६३ ) पेक्षां हारिस्वर ( ६।२।६५ ) विप्रतिषेधानें परत्वास्तव होतो. चित्स्वराला चलनः व चोपनः येथें अवकाश आहे व हारिस्वराला याज्ञिकाश्वः व वैयाकरणहस्ती येथें अवकाश आहे. पण पितृगवः तसेंच मातृगवः येथें दोघांची प्राप्ति आली असतांना परत्वास्तव हारिस्वर होतो.

( वा. ८ ) कृत्स्वरापेक्षांही पूर्वविप्रतिषेधानें हारिस्वर होतो. उदा०– कृत्स्वराला इध्मप्रव्रश्चनः येथे अवकाश आहे व हारिस्वराला याज्ञिकाश्वः येथें अवकाश आहे. पण अक्षहृतः तसेंच वाडवहार्यः येथें दोघांची प्राप्ति आली असतांना पूर्वविप्रतिषेधानें 'सप्तमीहारिणौ०' हा हारिस्वर होतो.

( वा. ९ ) अथवा पूर्वविप्रतिषेध सांगण्याचें कारण नाहीं. कारण ज्याअर्थी हे आचार्य 'अहरणे' हा हरणशब्दाचा प्रतिषेध करीत आहेत त्याअर्थी कृत्स्वर हा हारिस्वराचा बाध करीत नाहीं असें तें सुचवीत आहेत.[13]

---

१३. नाहीं तर, वाडवहरणम् येथें कृत्-स्वरानें परत्वास्तव हारिस्वराचा बाध होत असल्यामुळे अहरणे हा त्या सूत्रांतील शब्द व्यर्थ होत आहे. हरण शब्दामध्यें हृ धातूहून ल्युट् प्रत्यय ( ३।३।११७ ) केला आहे. तेव्हां तो कृत्प्रत्ययान्त शब्द आहे.

नैतदरित ज्ञापकम् । अनो भावकर्मवचनः [ ६. २. १५० ] इत्येतस्मिन्प्राप्ते तत एतदुच्यते ॥ यद्येवं साधीयो ज्ञापकम् । कृत्स्वरस्यापवादोऽनो भावकर्मवचन इति । बाधकं किलायं बाधते किं पुनस्तम् ॥

युक्तस्वरश्च ॥ १० ॥

युक्तस्वरश्च कृत्स्वराद्भवति विप्रतिषेधेन । युक्तस्वरस्यावकाशः । गोबल्लवः अश्वबल्लवः । कृत्स्वरस्य स एव । इहोभयं प्राप्नोति । गोसंख्यः पशुसंख्यः अश्वसंख्यः । युक्तस्वरो भवति । विप्रतिषेधेन ॥

[ न्यधी च ॥६।२।५३ ॥

ईषदन्यतरस्याम् ॥६।२।५४ ॥

हिरण्यपरिमाणं धने ॥६।२।५५॥

प्रथमोऽचिरोपसंपत्तौ ॥६।२।५६॥

कतरकतमौ कर्मधारये ॥६।२।५७ ॥

आर्यो ब्राह्मणकुमारयोः ॥६।२।५८ ॥

---

हरणप्रतिषेध ज्ञापक होऊं शकत नाहीं. कारण, वाडवहरणम् येथें कृत्स्वराचा अपवाद 'अनो भावकर्म०' ( ६।२।१५० ) हा अन्तोदात्त प्राप्त झाल्यानंतर त्याचा बाध करून हारिस्वर होईल म्हणून 'अहरणे' असें त्या सूत्रांत म्हटलें आहे.

मग असेंच जर आहे तर हें ज्ञापक फारच चांगलें जमणार आहे. कारण, कृत्स्वराचा बाधक जो 'अनो भावकर्म०' हा स्वर त्याचा बाध हा हारिस्वर करतो असें जर 'अहरणे' यावरून सूचित होतें तर कृत्स्वराचाही हा हारिस्वर बाध करतो हें सहजच सिद्ध होणार आहे.

( वा. १० ) 'युक्ते च' ( ६।२।६६ ) या सूत्रानें सांगितलेला स्वर हा कृत्स्वरापेक्षां पूर्वप्रतिषेधानें होतो. युक्तस्वराला गोबल्लवः व अश्वबल्लवः येथें अवकाश आहे व कृत्स्वराला पलाशशातनः येथें अवकाश आहे. पण गोसंख्यः[१४] पशुसंख्यः व अश्वसंख्यः येथें दोघांची प्राप्ति आली असतां पूर्वविप्रतिषेधानें युक्त-स्वर होतो.

---

१४. येथें समि ख्यः ( ३।२।७ ) यानें क प्रत्यय झाला आहे. येथें 'थाथघञ्०' ( ६।२।१४४ ) यानें उत्तरपदाला अन्तोदात्तही आला आहे त्याचाही पूर्वविप्रतिषेधानें युक्तस्वर बाध करतो.

१. ( सू. ५३ ) व-प्रत्ययान्त अञ्च् धातु उत्तरपद पुढें असतांना नि आणि अधि या गतिसंज्ञक शब्दांना प्रकृतिस्वर होतो. उदा०-न्यङ्, अध्यङ्.

१. ( सू. ५४ ) समासामध्यें पूर्वपद अशा ईषत् या शब्दाला प्रकृतिस्वर विकल्पानें होतो. उदा०-ईषत्कडारः.

१. ( सू. ५५ ) समासामध्यें धनशब्द उत्तरपद पुढें असतांना सुवर्णपरिमाणवाचक पदाला विकल्पानें प्रकृतिस्वर होतो. उदा०-द्विसुवर्णधनम्. दोन सुवर्णाइतकी ज्याची मालमत्ता आहे असा या शब्दाचा अर्थ आहे. सुवर्ण म्हणजे एकप्रकारचें सोन्याचें परिमाण आहे. पांच गुंजा म्ह. एक मासा, सोळा मासे म्ह. एक अक्ष किंवा सुवर्ण हें येथें परिमाण आहे. या परिमाणालाच पूर्वी तोळा समजत असत.

१. ( सू. ५६ ) कोणत्याही गोष्टीचा नवीनपणा दाखवावयाचा असेल तर समासामध्यें पूर्वपद अशा प्रथम शब्दाला विकल्पानें प्रकृतिस्वर होतो उदा०-प्रथमवैयाकरणः. व्याकरणशास्त्राकडे नवीनच प्रवृत्त झालेला असा अर्थ आहे.

१. ( सू. ५७ ) कर्मधारय समासामध्यें कतर आणि कतम या पूर्वपदांना विकल्पानें प्रकृतिस्वर होतो. उदा०-कतरकठः, कतमकलापः.

१. ( सू. ५८ ) कर्मधारय समासामध्यें आर्य या पूर्वपदाला विकल्पानें प्रकृतिस्वर होतो, ब्राह्मण किंवा कुमार हे शब्द उत्तरपद पुढें असतांना. उदा०-आर्यब्राह्मणः आर्यकुमारः.

राजा च ॥ ६।२।५९ ॥
षष्ठी प्रत्येनसि ॥ ६।२।६० ॥
क्ते नित्यार्थे ॥६।२।६१ ॥
ग्रामः शिल्पिनि ॥ ६।२।६२ ॥
राजा च प्रशंसायाम् ॥६।२।६३॥
आदिरुदात्तः ॥६।२।६४ ॥
सप्तमीहारिणौ धर्म्येऽहरणे ॥ ६।२।६५ ॥
युक्ते च ॥ ६।२।६६ ॥
विभाषाऽध्यक्षे ॥ ६।२।६७ ॥
पापं च शिल्पिनि ॥ ६।२।६८ ॥
गोत्रान्तेवासिमाणवब्राह्मणेषु क्षेपे ॥ ६।२।६९ ॥
अङ्गानि मैरेये ॥ ६।२।७० ॥

---

१. ( सू. ५९ ) कर्मधारय समासामध्यें राजन् या पूर्वपदाला विकल्पानें प्रकृतिस्वर होतो ब्राह्मण किंवा कुमार हे शब्द उत्तरपद पुढें असतांना उदा०-राजब्राह्मणः राजकुमारः.

१. ( सू. ६० ) षष्ठीतत्पुरुष समासामध्यें पूर्वपद अशा राजशब्दाला विकल्पानें प्रकृतिस्वर होतो, प्रत्येनस् शब्द उत्तरपद पुढें असतांना. उदा०-राज्ञः प्रत्येनाः राजप्रत्येनाः.

१. ( सू. ६१ ) क्त-प्रत्ययान्त उत्तरपद असतांना पूर्वपदाला विकल्पानें प्रकृतिस्वर होतो समासापासून अर्थाचें नित्यत्व गम्यमान असतांना. उदा० नित्यप्रहसितः; सततप्रहसितः

१. ( सू. ६२ ) शिल्पिवाचक उत्तरपद पुढें असतांना पूर्वपद असलेल्या ग्राम शब्दाला विकल्पानें प्रकृतिस्वर होतो. उदा० ग्रामनापितः.

१. ( सू. ६३ ) शिल्पिवाचक उत्तरपद पुढें असतांना आणि प्रशंसा गम्यमान असतांना पूर्वपद अशा राजन् शब्दाला विकल्पानें प्रकृतिस्वर होतो. उदा० राजनापितः.

१. ( सू. ६४ ) हें अधिकारसूत्र आहे. ह्याच्या पुढें अन्तः ( ६।२।९२ ) या सूत्रापर्यंत प्रत्येक सूत्रामध्यें आदिः आणि उदात्तः ह्या पदांचा संबंध होतो.

१. ( सू. ६५ ) सप्तम्यन्त किंवा हारिवाचक अशा पूर्वपदाचा आदि उदात्त होतो हरण शब्दाशिवाय धर्म्यवाचक उत्तरपद पुढें असतांना. आचारप्राप्त देय पदार्थाला धर्म्य म्हणतात. या पदार्थाचा प्रतिग्रह करणाऱ्याला हारिन् म्हणतात. कन्यादान वगैरेंच्या वेळीं हुंडा वगैरे रूपांनीं दिल्या जाणाऱ्या पदार्थाला हरण अशी संज्ञा आहे. उदा०मुकुटेकार्षापणम्; याज्ञिकाश्वः; वैयाकरणहस्ती. कांहीं विशेष गोष्टीचें चिन्ह म्हणून मुकुटावर लावण्याकरितां रुपयासारखा जो पदार्थ दिला जातो तशा पदाची मुकुटेकार्षापण ही संज्ञा आहे. याज्ञिकाला बक्षीस म्हणून घोडा दिला जात असे, तसाच वैयाकरणाला हत्ती दिला जात असे. कांहीं देशामध्यें पूर्वी या तऱ्हेचा आचार होता.

१. ( सू. ६६ ) युक्तवाचक समासामध्यें पूर्वपदाचा आदि उदात्त होतो. कोणत्याही कर्तव्य गोष्टीविषयीं तत्पर अशा मनुष्याला युक्त असें म्हणतात. उदा०- गोबल्लवः.

१. ( सू. ६७ ) समासामध्यें अध्यक्ष शब्द उत्तरपद पुढें असताना पूर्वपदाला विकल्पानें आद्युदात्त होतो. उदा०-गवाध्यक्षः.

१. ( सू. ६८ ) समासामध्यें शिल्पिवाचक उत्तरपद पुढें असतांना पूर्वपद अशा पाप शब्दाचा आदि विकल्पानें उदात्त होतो. उदा०-पापनापितः.

१. ( सू. ६९ ) अपत्य-प्रत्ययान्त शब्द, अन्तेवासिवाचकशब्द, माणव शब्द व ब्राह्मण शब्द यांपैकीं कोणताही शब्द उत्तरपद पुढें असतांना पूर्वपदाचा आदि उदात्त होतो, समासापासून निंदा गम्यमान असतांना. उदा०- भार्यासौश्रुतः, कुमारीदाक्षः. बायकोच्या अधीन असलेला सुश्रुताचा पुत्र, आणि कुमारीकरितां व्याकरणाध्ययन करणारा असे क्रमानें अर्थ आहेत.

१. ( सू ७० ) विशेष प्रकारच्या मद्याला मैरेय म्हणतात. मैरेय शब्द उत्तरपद पुढें असतांना त्या मैरेयाकरितां जे पदार्थ लागतात तद्वाचक पूर्वपदाचा आदि उदात्त होतो. उदा०-गुडमैरेयः.

भक्ताख्यास्तदर्थेषु ॥ ६।२।७१ ॥
गोबिडालसिंहसैन्धवेषूपमाने ॥ ६ । २ । ७२ ॥
अके जीविकार्थे ॥ ६ । २ । ७३ ॥
प्राचां क्रीडायाम् ॥ ६ । २ । ७४ ॥
अणि नियुक्ते ॥ ६ । २ । ७५ ॥
शिल्पिनि चाकृञः ॥ ६।२।७६ ॥
संज्ञायां च ॥ ६ । २ । ७७ ॥
गोतन्तियवं पाले ॥ ६।२।७८ ॥
णिनि ॥ ६ । २ । ७९ ॥]
उपमानं शब्दार्थप्रकृतावेव ॥ ६ । २ । ८० ॥

उपमानग्रहणं किमर्थम् । शब्दार्थप्रकृतावेवेतीयत्युच्यमाने पूर्वेणातिप्रसक्तमिति कृत्वा नियमोऽयं विज्ञायेत । तत्र को दोषः । इह न स्यात् । पुष्पहारी फलहारी । उपमानग्रहणे पुनः क्रियमाणे न दोषो भवति ॥ अथ शब्दार्थग्रहणं किम-

(सू. ८० ) येथें उपमानग्रहण कशाकरितां केलें आहे?

उपमानग्रहण न करतां ' शब्दार्थप्रकृतावेव ' एवढेंच सूत्र केलें तर ' पूर्वसूत्रानें सर्वत्र प्राप्त झालेला आदि उदात्त हा शब्दार्थक धातु असेल तरच होतो ' असा नियम होईल.

मग तसा नियम झाला तर दोष कोणता? दोष असा कीं पुष्पहारी फलहारी वगैरे स्थलीं ' णिनि ' या पूर्वसूत्राची प्रवृत्ति होणार नाहीं; आणि उपमान ग्रहण केलें म्हणजे मात्र हा दोष येत नाहीं.

आतां शब्दार्थग्रहण कशाकरितां केलें आहे?

---

१. ( सू. ७१ ) अन्नवाचक पूर्वपदाचा आदि उदात्त होतो, त्या अन्नाकरितां जे पदार्थ लागतात तद्वाचक उत्तरपद पुढें असतांना. उदा०–भिक्षाकंसः. भिक्षान्नाचें पात्र असा अर्थ आहे.

१. ( सू. ७२ ) गो, बिडाल, सिंह आणि सैन्धव हे उपमानवाचक शब्द उत्तरपद पुढे असतांना पूर्वपदाचा आदि उदात्त होतो. उदा०-धान्यगवः. बैलाच्या आकाराचा धान्याचा ढीग असा अर्थ आहे.

१. ( सू. ७३ ) जीविकार्थवाचक समासामध्यें अकप्रत्ययान्त उत्तरपद पुढें असतांना पूर्वपदाचा आदि उदात्त होतो. उदा०–दन्तलेखकः.

१. ( सू. ७४ ) पूर्वेकडील देशांमध्यें ज्या क्रीडा आहेत तद्वाचक समासामध्यें अकप्रत्ययान्त उत्तरपद पुढें असतांना पूर्वपदाचा आदि उदात्त होतो. उदा०–उद्दालकपुष्पभञ्जिका.

१. ( सू. ७५ ) नियुक्तवाचक समासामध्यें अण्प्रत्ययान्त उत्तरपद पुढें असतांना पूर्वपदाचा आदि उदात्त होतो. उदा०–छत्रधारः ( ३।२।१ ). कांहीं विशेष कामावर नेमलेल्या मनुष्याला नियुक्त म्हणतात.

१. ( सू. ७६ ) शिल्पिवाचक समासामध्यें अण्प्रत्ययान्त उत्तरपद पुढें असतांना पूर्वपदाचा आदि उदात्त होतो, परंतु तो अण् प्रत्यय कृ धातूहून केलेला नसेल तर. उदा०–तन्तुवायः ( ३।२।२ ).

१. ( सू. ७७ ) कृ धातूहून न केलेला असा जो अण् प्रत्यय तदन्त उत्तरपद पुढें असतांना पूर्वपदाचा आदि उदात्त होतो, परंतु तो सामासिक शब्द कोणाची तरी संज्ञा म्हणून असला पाहिजे. उदा०–तन्तुवायः कीटः.

१. ( सू. ७८ ) गो, तन्ति आणि यव या पूर्वपदांचा आदि उदात्त होतो पाल शब्द उत्तरपद पुढें असतांना. उदा०–गोपालः.

१. ( सू. ७९ ) णिन्–प्रत्ययान्त उत्तरपद पुढें असतांना पूर्वपदाचा आदि उदात्त होतो. उदा०–फलहारी.

१. ( सू. ८० ) णिन्–प्रत्ययान्त उत्तरपद पुढें असतांना उपमानवाचक पूर्वपदाचा जर पूर्वसूत्रानें आदि उदात्त कर्तव्य असेल तर त्या णिन् प्रत्ययाची प्रकृति म्हणून असलेला जो धातु तो शब्द करणें या अर्थाचा असेल तरच करावा. उदा०–उष्ट्रक्रोशी.

र्थम् । उपमानं प्रकृतावेवेतीयत्युच्यमान इहापि प्रसज्येत । वृकवञ्ची वृकप्रेक्षी । शब्दार्थग्रहणे पुनः क्रियमाणे न दोषो भवति ॥ अथ प्रकृतिग्रहणं किमर्थम् । शब्दार्थप्रकृतिरेव यो नित्यं तत्र यथा स्यात् । इह मा भूत् । कोकिलाभिव्याहारी गर्दभोच्चारी ॥ अथैवकारः किमर्थः । नियमार्थः । नैतदस्ति प्रयोजनम् । सिद्धे विधिरारभ्यमाणोऽन्तरेणैवकारं नियमार्थो भविष्यति । इष्टतोऽवधारणार्थस्तर्हि । यथैवं विज्ञायेत । उपमानं शब्दार्थप्रकृतावेवेति । मैवं विज्ञायि । उपमानमेव शब्दार्थप्रकृताविति । शब्दार्थप्रकृतौ ह्युपमानं चानुपमानं चाद्युदात्तमिष्यते । साध्वध्यायी विलम्बिताध्यायी ॥

## [ युक्तारोह्यादयश्च ॥ ६ । २ । ८१ ॥ ]

## [1]दीर्घकाशतुषभ्राष्ट्रवटं जे ॥ ६ । २ । ८२ ॥

जे दीर्घाद्बह्वचः ॥ १ ॥

जे दीर्घान्तस्यादिरुदात्तो भवतीत्येतस्मादन्त्यात्पूर्वं बह्वचः [ ८३ ] इत्येतद्भवति विप्रतिषेधेन । जे दीर्घान्तस्यादिरुदात्तो

'उपमानं प्रकृतावेव' एवढेंच म्हटलें तर वृके[2]वञ्ची व वृकप्रेक्षी येथें पूर्वसूत्रानें आदि उदात्त होऊं लागेल. आणि शब्दार्थग्रहण केलें म्हणजे मात्र हा दोष येत नाहीं.

आतां प्रकृतिग्रहण कशाकरितां केलें आहे ?

जो धातु नेहमीं शब्दार्थकच आहे तशाच धातूहून णिनि प्रत्यय केला असतां आदि उदात्त झाला पाहिजे; कोकिलाभिव्या[3]हारी तसेंच गर्दभोच्चारी येथें न झाला पाहिजे.

आतां एव शब्द कशाकरितां घातला आहे ?

नियमाकरितां घातला आहे.

हे प्रयोजन नाहीं.

कारण, अन्य सूत्रानें सिद्ध होत असलेल्या गोष्टीचें पुनः विधान केलें तर तें सूत्र एव शब्द प्रत्यक्ष घातल्यावांचूनच नियामक होतें.

तर मग इष्ट नियम होण्याकरितां एव शब्द घातला आहे. म्हणजे 'उपमानवाची पूर्वपदाला णिनि–प्रत्ययान्त उत्तरपद पुढें असतांना आद्युदात्त करणें झाल्यास शब्दार्थक धातूहून णिनिप्रत्यय केला असेल तरच तो करावा' असा नियम समजला जावा. आणि 'शब्दार्थक धातूहून केलेला जो णिनि प्रत्यय तदन्त उत्तरपद पुढें असतांना पूर्वपदाला आद्युदात्त करणें झाल्यास उपमानवाचक अशाच पूर्वपदाला करावा' असा नियम न समजला जावा. असें झाल्यामुळें शब्दार्थक धातूहून णिनि प्रत्यय केला असतां मागील पूर्वपद उपमान असलें तरी किंवा उपमान नसलें तरी तेथें आद्युदात्त होणें इष्ट आहे तें साधतें. उदा० साधुरिवाधीते साध्वध्यायी; विलम्बेनाधीते विलम्बाध्यायी.

( सू. ८२ वा. १ ) 'ज' हें उत्तरपद पुढें असतांना दीर्घान्त पूर्वपदाला सांगितलेल्या या

२. वृकाप्रमाणें फसविणारा, वृकाप्रमाणें पाहणारा असा अर्थ आहे. येथें या नियमामुळें पूर्वसूत्रानें आदि उदात्त होत नसतो तो होऊं लागेल.

३. हृ धातूच्या मागें जेव्हां वि आणि आ हे उपसर्ग लावावे तेव्हांच त्याचा शब्द करणें हा अर्थ दिसतो. तसेंच चर् धातूला उद् हा उपसर्ग लावला तरच उच्चार करणें हा अर्थ दिसतो; एरवीं दिसत नाहीं.

१. ( सू. ८१ ) युक्तारोहिन् वगैरे सामासिक शब्दांचा आदि उदात्त होतो. उदा०– युक्तारोही.

१. ( सू. ८२ ) दीर्घ वर्ण शेवटी असलेल्या पूर्वपदाचा तसेंच काश, तुष, भ्राष्ट्र व वट या पूर्वपदांचा 'ज' हे उत्तरपद पुढें असतांना आदि उदात्त होतो. उदा०–कुटीजः.

भवतीत्यस्यावकाशः । कुटीजः शमीजः । अन्त्यात्पूर्वं बह्वच इत्यस्यावकाशः । उपसरजः मन्दुरजः । इहोभयं प्राप्नोति । आमलकीजः वलभीजः । अन्त्यात्पूर्वं बह्वच इत्येतद्भवति विप्रतिषेधेन ॥

[ अन्त्यात्पूर्वं बह्वचः ॥ ६ । २ । ८३ ॥

ग्रामेऽनिवसन्तः ॥ ६ ।२।८४ ॥

घोषादिषु च ॥ ६ । २ । ८५ ॥

छात्र्यादयः शालायाम् ॥ ६ । २ । ८६ ॥

प्रस्थेऽवृद्धमकर्क्यादीनाम् ॥ ६ । २ । ८७ ॥

मालादीनां च ॥ ६ । २ । ८८ ]

अमहन्नवं नगरेऽनुदीचाम् ॥ ६ । २ । ८९ ]

अर्मे चावर्णं द्व्यच्त्र्यच् ॥ ६ । २ । ९० ॥ ]

न भूताधिकसंजीवमद्राश्मकज्जलम् ॥ ६ । २ । ९१ ॥

आद्युदात्तप्रकरणे दिवोदासादीनां छन्दस्युपसंख्यानम् ॥ १ ॥

आद्युदात्तप्रकरणे दिवोदासादीनां छन्द-

---

आद्युदात्तापेक्षां विप्रतिषेधानें 'अन्त्यात्पूर्वम्०' ( ६।२।८३ ) हा स्वर होतो. उदा० ज--शब्दरूप उत्तरपद पुढें असतांना दीर्घान्ताला सांगितलेल्या या आद्युदात्ताला शमीजः व कुटीजः येथें अवकाश आहे; आणि 'अन्त्यात्पूर्वम्०' याला उपसरजः व मन्दुरजः येथें अवकाश आहे. पण आमलकीजः व वलभीजः येथें दोघांची एकदम प्राप्ति आली असता विप्रतिषेधानें परत्वास्तव 'अन्त्यात्पूर्व०' हा स्वर होतो.

( सू. ९१ वा. १ ) दिवोदास इत्यादि गण-

---

१. ( सू. ८३ ) कमीत कमी तीन अच् ज्यामध्यें आहेत अशा पूर्वपदांतील शेवटल्या अचाच्या मागील अच् उदात्त होतो 'ज' शब्द उत्तरपद पुढे असताना. उदा०– उपसरजः.

१. ( सू. ८४ ) ग्राम शब्द उत्तरपद पुढे असतांना पूर्वपदाचा आदि उदात्त होतो. पण तें पूर्वपद त्या ग्रामामध्यें राहणाऱ्या लोकांचें दर्शक नसावें. उदा०– मल्लग्रामः. येथें ग्राम शब्दाचा समुदाय असा अर्थ आहे.

१. ( सू. ८५ ) घोष वगैरे शब्द उत्तरपद पुढें असतांना पूर्वपदाचा आदि उदात्त होतो. उदा०– दाक्षिघोषः.

१. ( सू. ८६ ) शाला शब्द उत्तरपद पुढे असतांना छात्रि वगैरे पूर्वपदांचा आदि उदात्त होतो. उदा०–छात्रिशाला.

१. ( सू. ८७ ) जो शब्द कर्की वगैरे गणांत नाही आणि ज्याला वृद्धसंज्ञा नाहीं ( १।१।७३ ) अशा पूर्वपदाचा आदि उदात्त होतो प्रस्थ शब्द उत्तरपद पुढे असतांना. उदा०–इन्द्रप्रस्थः.

१. ( सू. ८८ ) माला वगैरे शब्द पूर्वपद असतांना त्यांचा आदि उदात्त होतो प्रस्थ शब्द उत्तरपद पुढें असतांना. उदा०–मालाप्रस्थः.

१. ( सू. ८९ ) महत् आणि नव हे दोन शब्द वगळून बाकीच्या पूर्वपदशब्दांचा आदि उदात्त होतो नगर शब्द उत्तरपद पुढे असतांना; परंतु तें नगर उत्तर दिशेकडील लोकांचें नसावें. उदा०–सुह्मनगरम्.

१. ( सू. ९० ) दोन किंवा तीन अच् ज्यामध्यें आहेत अशा अवर्णान्त पूर्वपदाचा आदि उदात्त होतो अर्मशब्द उत्तरपद पुढें असतांना. उदा०–दत्तार्मम्, कुक्कुटार्मम्.

१. ( सू. ९१ ) भूत, अधिक, संजीव, मद्र, अश्मन्, आणि कज्जल या पूर्वपदांचा अर्म शब्द उत्तरपद पुढें असतांना आदि उदात्त होत नाहीं. उदा०– भूतार्मम्.

स्युपसंख्यानं कर्तव्यम् । दिवोदासाय गायत वध्र्यश्वाय दाशुषे ॥

## अन्तः ॥ ६ । २ । ९२ ॥

## सर्वं गुणकात्स्न्र्ये ॥ ६।२।९३ ॥

सर्वग्रहणं किमर्थम् । गुणकात्स्न्र्ये इतीयत्युच्यमान इहापि प्रसज्येत । परमशुक्लः परमकृष्ण इति । सर्वग्रहणे पुनः क्रियमाणे न दोषो भवति ॥ अथ गुणग्रहणं किमर्थम् । सर्वं कात्स्न्र्ये इतीयत्युच्यमान इहापि प्रसज्येत । सर्वसौवर्णः सर्वराजत इति । गुणग्रहणे पुनः क्रियमाणे न दोषो भवति ॥ अथ कात्स्न्र्यग्रहणं किमर्थम् । सर्वं गुण इतीयत्युच्यमान इहापि प्रसज्येत । सर्वेषां श्वेतः सर्वश्वेत इति । कथं चात्र समासः । षष्ठी सुबन्तेन समस्यत इति । गुणेन नेति प्रतिषेधः प्राप्नोति । एवं तर्हि

**गुणात्तरेण समासस्तरलोपश्च ।**

गुणात्तरेण समासस्तरलोपश्च वक्तव्यः । सर्वेषां श्वेततरः सर्वश्वेतः ॥

## [ संज्ञायां गिरिनिकाययोः ॥ ६ । २ । ९४ ॥

## कुमार्यां वयसि ॥ ६ । २ । ९५॥

## उदकेऽकेवले ॥ ६ । २ । ९६ ॥

---

पठित शब्दांना वेदामध्यें आद्युदात्त होतो असें वचन करावें. उदा० दिवोदासाय गायत वध्र्यश्वाय दाशुषे.

(सू. ९३ ) येथें सर्वग्रहण कशाकरितां केलें आहे ?

'गुणकात्स्न्र्ये' एवढेंच म्हटलें तर परमशुक्लः व परमकृष्णः येथेंही अन्त उदात्त होईल. आणि सर्वग्रहण केलें म्हणजे मात्र हा दोष येत नाहीं.

आतां गुणग्रहण कशाकरितां केलें आहे ?

'सर्वं कात्स्न्र्ये' एवढेंच म्हटलें तर सर्वसौवर्णः तसेंच सर्वराजतः येथेंही अन्त उदात्त होईल. आणि गुणग्रहण केलें म्हणजे मात्र हा दोष येत नाहीं.

आता 'कात्स्न्र्ये'--ग्रहण कशाकरिता केलें आहे ?

'सर्वं गुणे' एवढेंच म्हटले तर सर्वेषां श्वेतः सर्वश्वेतः येथेंही अन्त उदात्त होईल.

पण अगोदर सर्वश्वेतः येथें समास कशानें बरें करावा ?

'षष्ठी' ( २।२।८ ) या सूत्रानें करावा.

पण त्याचा 'पूरणगुण०' (२।२।११) यानें निषेध प्राप्त होत आहे ना ?

तर मग 'गुणात्तरेण समासस्तरलोपश्च' म्हणजे गुणवाचकाहून केलेला जो तर प्रत्यय तदन्ताशीं पूर्वपदाचा समास होतो आणि त्या तर प्रत्ययाचा लोप होतो असें वचन करावें. जसें– सर्वेषां श्वेततरः सर्वश्वेतः.

---

१. (सू. ९२ ) हें अधिकार सूत्र आहे. पुढील सूत्रापासून उत्तरपदादिः ( ६।२।१११ ) या सूत्रापर्यंत प्रत्येक सूत्रामध्ये 'अन्तः' या पदाचा संबंध होतो.

१. (सू.९३ ) पूर्वपद अशा सर्व या शब्दाचा अन्त उदात्त होतो, परंतु त्या सर्व शब्दानें कोणत्याही गुणाची पूर्तता दाखविली असली पाहिजे. उदा०–सर्वश्वेतः. सगळा पांढरा असा अर्थ आहे.

१. ( सू. ९४ ) गिरि आणि निकाय हे शब्द उत्तरपद पुढे असतांना पूर्वपदाचा अन्त उदात्त होतो. परंतु तो सामासिक शब्द कोणाची तरी संज्ञा म्हणून असला पाहिजे. उदा०–अञ्जनागिरिः; शापिण्डिनिकायः.

१. ( सू. ९५ ) कुमारी शब्द उत्तरपद पुढें असतांना आणि वय गम्यमान असतांना पूर्वपदाचा अन्त उदात्त होतो. उदा०–वृद्धकुमारी.

१. ( सू. ९६ ) उदक शब्द उत्तरपद पुढं अस-

**द्विगौ क्रतौ ॥ ६ । २ । ९७ ॥**

**सभायां नपुंसके ॥ ६ । २ । ९८ ॥**

**पुरे प्राचाम् ॥ ६ । २ । ९९ ॥**

**अरिष्टगौडपूर्वे च ॥ ६ । २ । १०० ॥**

**न हास्तिनफलकमार्देयाः ॥ ६ । २ । १०१ ॥**

**कुसूलकूपकुम्भशालं बिले ॥ ६ । २ । १०२ ॥**

**दिक्शब्दा ग्रामजनपदाख्यानचानराटेषु ॥ ६ । २ । १०३ ॥**

**आचार्योपसर्जनश्चान्तेवासिनि ॥ ६ । २ । १०४ ॥**

**उत्तरपदवृद्धौ सर्वं च ॥ ६ । २ । १०५ ॥**

अयुक्तोऽयं निर्देशो न ह्युत्तरपदं नाम वृद्धिरस्ति । कथं तर्हि निर्देशः कर्तव्यः । वृद्धिमत्युत्तरपद इति ॥ स तर्हि तथा निर्देशः कर्तव्यः । न कर्तव्यः । नैवं विज्ञायत उत्तरपदं वृद्धिरुत्तरपदवृद्धिः उत्तरपद-

(सू. १०५) उत्तरपदवृद्धौ हा निर्देश बरोबर दिसत नाहीं. कारण आ, ऐ व औ यांना 'वृद्धि' म्हणतात. तेवढेंच उत्तरपद कोठेंतरी आहे काय ?

तर मग कसा निर्देश केला पाहिजे ?

'वृद्धिमत्युत्तरपदे' असा; असें केलें म्हणजे 'वृद्धि ज्यांत आहे असें उत्तरपद पुढें असतांना' असा अर्थ होईल.

तर मग तसा निर्देश करणें जरूर आहे.

तसा निर्देश करावयास नको. कारण, उत्तरपदं च सा वृद्धिश्च असा कर्मधारयसमास येथें समजावयाचा नाहीं.

---

तांना पूर्वपदाचा अन्त उदात्त होतो. परंतु कशानें तरी मिश्रित उदक असा अर्थ त्या समासापासून गम्यमान होत असला पाहिजे. उदा०-गुडोदकम्.

१. (सू. ९७) क्रतुवाचक समासामध्यें द्विगु उत्तरपद पुढें असतांना पूर्वपदाचा अन्त उदात्त होतो. उदा०- गर्गत्रिरात्रः.

१. (सू. ९८) नपुंसकलिंगी समासामध्यें सभा शब्द उत्तरपद पुढें असतांना पूर्वपदाचा अन्त उदात्त होतो. उदा०-गोपालसभम्.

१. (सू. ९९) पुरशब्द उत्तरपद पुढें असतांना पूर्वपदाचा अन्त उदात्त होतो, परंतु पूर्वेकडील देशांतील तें पुर असलें पाहिजे. उदा०-काञ्चीपुरम्.

१. (सू. १००) अरिष्ट किंवा गौड हे शब्द आरंभीं असलेल्या समासामध्यें पुरशब्द उत्तरपद पुढें असतांना पूर्वपदाचा अन्त उदात्त होतो. अरिष्टपुरम्, अरिष्टश्रितपुरम्.

१. (सू. १०१) पुरशब्द उत्तरपद पुढें असतांना हास्तिन, फलक आणि मार्देय या पूर्वपदांचा अन्त उदात्त होत नाहीं. उदा०-हास्तिनपुरम्.

१. (सू. १०२) बिलशब्द उत्तरपद पुढे असतांना कुसूल, कूप, कुम्भ आणि शाला या पूर्वपदांचा अन्त उदात्त होतो. उदा०-कुसूलबिलम्.

१. (सू. १०३) ग्राम, जनपद आणि आख्यान यांचे वाचक शब्द आणि चानराट शब्द उत्तरपद पुढें असतांना दिग्वाचक पूर्वपदाचा अन्त उदात्त होतो. उदा०-पूर्वेषुकामशमी.

१. (सू. १०४) जो शब्द आचार्य विशेषण लागून त्यांच्या अन्तेवासींचा वाचक होतो असा शब्द उत्तरपद पुढें असतांना दिग्वाचक पूर्वपदाचा अन्त उदात्त होतो. उदा०-पूर्वपाणिनीयाः (मागे सूत्र ३६ टीप पाहणें).

१. (सू. १०५) उत्तरपदस्य (७।३।१०) या अधिकारामध्यें सांगितलेली वृद्धि ज्यामध्यें झालेली आहे असें उत्तरपद पुढें असतांना सर्व शब्दाचा आणि दिग्वाचक शब्दाचा अन्त उदात्त होतो. उदा०-सर्वपाञ्चालकः.

वृद्धाविति । कथं तर्हि । उत्तरपदस्य वृद्धिरस्मिन्सोऽयमुत्तरपदवृद्धिः उत्तरपदवृद्धाविति ॥

## बहुव्रीहौ विश्वं संज्ञायाम् ॥ ६ । २ । १०६ ॥

### बहुव्रीहौ विश्वस्यान्तोदात्तात्संज्ञायां मित्राजिनयोरन्तः ॥ १ ॥

बहुव्रीहौ विश्वस्यान्तोदात्तात्संज्ञायां मित्राजिनयोरन्त इत्येतद्भवति विप्रतिषेधेन । बहुव्रीहौ विश्वं संज्ञायामित्यस्यावकाशः । विश्वदेवः विश्वयशाः । संज्ञायां मित्राजिनयोरन्त इत्यस्यावकाशः । कुलमित्रम् । कुलाजिनम् । इहोभयं प्राप्नोति । विश्वमित्रः विश्वाजिनः । संज्ञायां मित्राजिनयोरन्त इत्येतद्भवति विप्रतिषेधेन ॥

### अन्तोदात्तप्रकरणे मरुद्वृधादीनां छन्दस्युपसंख्यानम् ॥ २ ॥

अन्तोदात्तप्रकरणे मरुद्वृधादीनां छन्दस्युपसंख्यानं कर्तव्यम् । मरुद्वृधः सुवया उपतस्थे ॥

## उदराश्वेषुषु ॥ ६ । २ । १०७ ॥

## क्षेपे ॥ ६ । २ । १०८ ॥

### उदारादिभ्यो नञ्सुभ्याम् ॥ १ ॥

उदाराश्वेषुषु क्षेप इत्येतस्मान्नञ्सुभ्याम् [ १७२ ] इत्येतद्भवति विप्रतिषेधेन । उदराश्वेषुषु क्षेप इत्यस्यावकाशः । कुण्डोदरः घटोदरः । नञ्सुभ्यामित्यस्यावकाशः । अयवः अतिलः अमाषः । सुवयः सुतिलः

---

तर मग कोणता समास समजावयाचा ?

उत्तरपदस्य वृद्धिर्यस्मिन् स उत्तरपदवृद्धिः असा बहुव्रीहि[२] समजावयाचा.

( सू. १०६ वा. १ ) बहुव्रीहीमध्यें विश्व शब्दाला सांगितलेला जो हा अन्तोदात्त त्यापेक्षां विप्रतिषेधानें ‘ संज्ञायां मित्राजिनयोः ’ ( ६।२।१६५ ) हा स्वर होतो. उदा०— ‘बहुव्रीहौ विश्वं०’ याला विश्वदेवः व विश्वयशाः येथें अवकाश आहे. आणि ‘ संज्ञायां मित्रा० ’ याला कुलमित्रम् व कुलाजिनम् येथें अवकाश आहे. पण, विश्वामित्रः व विश्वाजिनः येथें दोघांची प्राप्ति आली असतां विप्रतिषेधानें परत्वास्तव ‘संज्ञायां मित्रा०’ हा स्वर होतो.

( वा. २ ) मरुद्वृधादि गणांतील शब्दांना वेदामध्यें अन्तोदात्तस्वर होतो असें वचन करावें. उदा०—मरुद्वृधः सुवया उपतस्थे.

( सू. १०७–८ वा. १ ) उदराश्वेषुषु व क्षेपे ह्या सूत्रांनीं सांगितलेल्या स्वरापेक्षा विप्रतिषेधानें नञ्सुभ्याम् ( ६।२।१७२ ) हा स्वर पूर्वी होतो. ‘उदराश्वेषुषु क्षेपे’ याला कुण्डोदरः तसेंच घटोदरः येथें अवकाश आहे. व ‘ नञ्सुभ्याम् ’ याला अयवः अतिलः अमाषः सुयवः सुतिलः सुमाषः

---

२. बहुव्रीहि केला म्हणजे ‘ वृद्धि झालेलें उत्तरपद पुढे असतांना ’ असा अर्थ होईल.

१. ( सू. १०६ ) बहुव्रीहि समासामध्यें पूर्वपद विश्व शब्दाचा अन्त उदात्त होतो. तो सामासिक शब्द कोणाची तरी संज्ञा म्हणून असला पाहिजे. उदा०— विश्वदेवः.

१. ( सू. १०७ ) बहुव्रीहि समासामध्यें उदर, अश्व, आणि इषु हे शब्द उत्तरपद पुढें असतांना पूर्वपदाचा अन्त उदात्त होतो. तो सामासिक शब्द कोणाची तरी संज्ञा असला पाहिजे. उदा०— वृकोदरः, हर्यश्वः, महेषुः.

१. ( सू. १०८ ) बहुव्रीहि समासामध्ये उदर, अश्व आणि इषु हे शब्द उत्तरपद पुढें असताना पूर्वपदाचा अन्त उदात्त होतो निंदा गम्यमान असतांना. उदा० - कुण्डोदरः.

सुमाषः । इहोभयं प्राप्नोति । अनुदरः सूदरः । नञ्सुभ्यामित्येतद्भवति विप्रतिषेधेन ॥

**[ नदी बन्धुनि ॥ ६ । २ । १०९ ॥**

**निष्ठोपसर्गपूर्वमन्यतरस्याम् ॥ ६ । २ । ११० ।**

**उत्तरपदादिः ॥ ६ । २ । १११ ॥**

**कर्णो वर्णलक्षणात् ॥ ६ । २ । ११२ ॥**

**संज्ञौपम्ययोश्च ॥ ६।२।११३ ॥**

**कण्ठपृष्ठग्रीवाजङ्घं च ॥ ६ । २ । ११४ ॥**

**शृङ्गमवस्थायां च ॥ ६।२।११५ ॥**

**नञो जरमरमित्रमृताः ॥ ६ । २ । ११६ ॥ ]**

**सोर्मनसी अलोमोषसी ॥ ६ । २ । ११७ ॥**

**सोर्मनसोः कपि ॥ १ ॥**

सोर्मनसी अलोमोषसी इत्येतस्मात्कपि पूर्वम् [ १७६ ] इत्येतद्भवति विप्रतिषेधेन । सोर्मनसी अलोमोषसी इत्यस्यावकाशः । सुशर्माणमधि नावं रुहेयम् । सुशर्मासि सुप्रतिष्ठानः । सुस्रोताः सुपयाः सुशिराः । कपि पूर्वस्यावकाशः । अयवकः । इहोभयं

---

येथें अवकाश आहे. पण अनुदरः तसेंच सूदरः येथें दोघांची प्राप्ति आली असतां विरोध असल्यामुळे परत्वास्तव नञ्सुभ्याम् हा स्वर होतो.

(सू. ११७ वा. १) सोर्मनसी० याने सांगितलेल्या या स्वरापेक्षां विप्रतिषेधानें 'कपि पूर्वम्' ( ६।२।१७३ ) हा स्वर होतो. उदा०– 'सोर्मनसी०' याला सुशर्माणमधि नावं रुहेयम्, सुशर्मासि सुप्रतिष्ठानः, सुस्रोताः सुपयाः सुशिराः येथें अवकाश आहे. व 'कपि पूर्वम्' याला अय-

---

१. ( सू. १०९ ) बहुव्रीहि समासामध्ये बन्धु शब्द उत्तरपद पुढें असतांना नदीसंज्ञक पूर्वपदाचा अन्त उदात्त होतो. उदा०-गार्गीबन्धुः.

१. ( सू. ११० ) उपसर्ग पूर्वी असलेलें जें निष्ठाप्रत्ययान्त पूर्वपद त्याचा अंत बहुव्रीहि समासामध्ये विकल्पानें उदात्त होतो, उदा०– प्रधौतमुखः, प्रक्षालितपादः.

१. ( सू. १११ ) हें अधिकार सूत्र आहे. यांतील पदांपैकीं उत्तरपदाचा संबंध हा पाद संपेपर्यंत आहे. आणि आदिपदाचा संबंध 'प्रकृत्या०' ( ६।२।१३७ ) या सूत्रापर्यंत आहे.

१. ( सू. ११२ ) बहुव्रीहि समासामध्ये वर्णवाचक आणि लक्षणवाचक शब्दाच्या पुढील उत्तरपद जो कर्ण शब्द त्याचा आदि उदात्त होतो. उदा०– शुक्लकर्णः, शङ्कुकर्णः. बैलाच्या कानावर शंकूसारखें चिन्ह ओळखण्याकरितां करीत असत.

१. ( सू. ११३ ) संज्ञा किंवा उपमा गम्यमान असतांना बहुव्रीहीमध्ये उत्तरपद कर्ण शब्दाचा आदि उदात्त होतो. उदा०– मणिकर्णः, गोकर्णः.

१. ( सू. ११४ ) संज्ञा किंवा उपमा गम्यमान असतांना बहुव्रीहीमध्ये कण्ठ, पृष्ठ, ग्रीवा आणि जङ्घा ह्या उत्तरपदांचा आदि उदात्त होतो. उदा०– शितिकण्ठः, खरकण्ठः.

१. ( सू. ११५ ) संज्ञा उपमा किंवा कांहीं विशेष अवस्था गम्यमान असतांना बहुव्रीहीमध्यें उत्तरपद शृङ्ग शब्दाचा आदि उदात्त होतो. उदा-ऋष्यशृङ्गः, गोशृङ्गः, मेषशृङ्गः.

१. ( सू. ११६ ) बहुव्रीहीमध्यें नञाच्या पुढील जर, मर, मित्र आणि मृत ह्या उत्तरपद शब्दांचा आदि उदात्त होतो. उदा०-अजरः अमरः.

१. ( सू. ११७ ) बहुव्रीहीमध्यें सु शब्दाच्या पुढील जें मन् किंवा अस् शेवटीं असलेलें उत्तरपद त्याचा आदि उदात्त होतो. उदा०-सुकर्मा, सुयशाः,

प्राप्नोति । सुशर्मकः सुस्रोतस्कः । कपि पूर्वमित्येतद्भवति विप्रतिषेधेन ॥

**[ क्रत्वादयश्च ॥ ६ । २ । ११८ ॥**

**आद्युदात्तं द्व्यच् छन्दसि ॥ ६ । २ । ११९ ॥**

**वीरवीर्यौ च ॥ ६ । २ । १२० ॥ ]**

**कूलतीरतूलमूलशालाक्षसममव्ययीभावे ॥ ६ । २ । १२१ ॥**

**पर्यादिभ्यः कूलादीनामाद्युदात्तत्वम् ॥ १ ॥**

पर्यादिभ्यः कूलादीनामाद्युदात्तत्वं भवति विप्रतिषेधेन । परिप्रत्युपापा वर्ज्यमानाहोरात्रावयवेष्वित्यस्यावकाशः । परित्रिगर्तम् परिसौवीरम् । कूलादीनामाद्युदात्तत्वस्यावकाशः । अतिकूलम् अनुकूलम् । इहोभयं प्राप्नोति । परिकूलम् । कूलादीनामाद्युदात्तत्वं भवति विप्रतिषेधेन ॥

**[ कंसमन्थशूर्पपाय्यकाण्डं द्विगौ ॥ ६ । २ । १२२ ॥**

**तत्पुरुषे शालायां नपुंसके ॥ ६ । २ । १२३ ॥**

**कन्था च ॥ ६ । २ । १२४ ॥**

**आदिश्चिहणादीनाम् ॥ ६ । २ । १२५ ॥ ]**

**चेलखेटकटुककाण्डं गर्हायाम् ॥ ६ । २ । १२६ ॥**

---

वकः व अतिलकः येथें अवकाश आहे. पण सुशर्मकः व सुस्रोतस्कः येथें दोघांची प्राप्ति आली असतांना विरोधानें परत्वास्तव 'कपि पूर्वम्' हा स्वर होतो.

( सू. १२१ वा. १ ) परि प्रति उप आणि अप यांना सांगितलेला जो स्वर ( ६।२।३३ ) त्यापेक्षां विप्रतिषेधानें 'कूलतीर०' यानें सांगितलेला हा स्वर पूर्वी होतो. उदा० 'परिप्रत्युपापा०' या स्वराला परित्रिगर्तम् व परिसौवीरम् येथें अवकाश आहे. व 'कूलतीर०' या आद्युदात्ताला अनुकूलम् व अतिकूलम् येथें अवकाश आहे. पण परिकूलम् व प्रतिकूलम् येथें दोघांची प्राप्ति आली असतां विरोधानें परत्वास्तव 'कूलतीर०' हा आद्युदात्त स्वर होतो.

---

१. ( सू. ११८ ) बहुव्रीहीमध्यें सुशब्दाच्या पुढील जे क्रतु वगैरे शब्द त्यांचा आदि उदात्त होतो. उदा०-सुक्रतुः.

१. ( सू. ११९ ) दोन अच् असलेला असा जो मूळचा आद्युदात्त शब्द तो बहुव्रीहीमध्यें सु शब्दाच्या पुढें असेल तर तो वेदामध्ये आद्युदात्तच कायम राहतो. उदा०-स्वश्वाः, सुरथाः.

१. ( सू. १२० ) बहुव्रीहीमध्यें सु शब्दाच्या पुढील वीर आणि वीर्य या शब्दांना वेदामध्यें आद्युदात्त होतो. उदा०-सुवीरेण, सुवीर्यस्य.

१. ( सू. १२१ ) कूल, तीर, तूल, मूल, शाला, अक्ष आणि सम या उत्तरपदांचा अव्ययीभाव समासामध्यें आदि उदात्त होतो. उदा०-परिकूलम्.

१. ( सू. १२२ ) द्विगु समासामध्यें कंस, मन्थ, शूर्प, पाय्य आणि काण्ड या उत्तरपदांचा आदि उदात्त होतो. उदा०-द्विकंसः.

१. ( सू. १२३ ) शाला शब्द शेवटी असलेल्या नपुंसकलिंगी तत्पुरुष समासामध्ये उत्तरपदाचा आदि उदात्त होतो. उदा०-ब्राह्मणशालम्.

१. ( सू. १२४ ) नपुंसकलिंगी तत्पुरुष समासामध्यें उत्तरपद कन्था शब्दाचा आदि उदात्त होतो. उदा०-सौशमिकन्थम्.

१. ( सू. १२५ ) कन्था शब्द शेवटी असलेल्या नपुंसकलिंगी तत्पुरुष समासामध्यें चिहण वगैरे शब्द पूर्वपद असले तर त्यांचा आदि उदात्त होतो. उदा०-चिहणकन्थम्.

१. ( सू १२६ ) तत्पुरुष समासामध्ये चेल, खेट, कटुक आणि काण्ड या उत्तरपदाचा आदि उदात्त

**[ चीरमुपमानम् ॥ ६।२।१२७ ॥**
**पललसूपशाकं मिश्रे ॥ ६ । २ । ॥१२८**
**कूलसूदस्थलकर्षाः संज्ञायाम् ॥ ६ । २ १२९॥ ]**
**अकर्मधारये राज्यम् ॥ ६ । २ । १३० ॥**

**चेलराज्यादिभ्योऽव्ययम् ॥ १ ॥**

चेलराज्यादिस्वरादव्ययस्वरो भवति विप्रतिषेधेन । चेलराज्यादिस्वरस्यावकाशः । भार्याचेलम् । पुत्रचेलम् । ब्राह्मणराज्यम् । अव्ययस्वरस्यावकाशः । निष्कौशाम्बिः निर्वाराणसिः । इहोभयं प्राप्नोति । कुचेलम् । कुराज्यम् । अव्ययस्वरो भवति विप्रतिषेधेन ॥ स तर्हि पूर्वविप्रतिषेधो वक्तव्यः । न वक्तव्यः । इष्टवाची परशब्दः । विप्रतिषेधे परं यदिष्टं तद्भवतीति ॥

**[ वर्ग्यादयश्च । ६ । २ । १३१ ॥**
**पुत्रः पुंभ्यः ॥ ६ । २ । १३२ ॥**
**नाऽऽचार्यराजर्त्विक्संयुक्तज्ञात्याख्येभ्यः ॥ ६ । २ । १३३ ॥**
**चूर्णादीन्यप्राणिषष्ठ्याः ॥ ६ ।**

---

(सू. १३० वा. १) 'चेलखेट०' व 'अकर्मधारये राज्यम्' या शास्त्रांनीं सांगितलेल्या स्वरापेक्षां पूर्वविप्रतिषेधानें 'तत्पुरुषे०' (६।२।२) हा अव्यय–पूर्वपद–प्रकृतिस्वर होतो. चेलराज्यादि स्वराला भार्या चेलमिव भार्याचेलम्, तसेंच पुत्रचेलम् व तसेंच ब्राह्मणस्य राज्यं ब्राह्मणराज्यम् येथें अवकाश आहे. व अव्ययस्वराला निष्कौशाम्बिः व निर्वाराणसिः येथें अवकाश आहे. पण कुचेलम् कुराज्यम् येथें दोघांची प्राप्ति आली असतां विरोधानें पूर्वपठित अव्यय–स्वर होतो.

तर मग तसें पूर्वविप्रतिषेधाकरितां वचन केलें पाहिजे.

वचन करावयास नको. कारण 'विप्रतिषेधे परम्०' (१।४।२) येथील पर शब्द इष्ट अशा अर्थाचा आहे. तेव्हां विप्रतिषेध असतां जें कार्य इष्ट असेल तें करावें.

---

होतो निन्दा गम्यमान असतांना. उदा०–पुत्रः चेलमिव पुत्रचेलम्. चेलाच्या उपमेनें येथे निन्दा गम्यमान होत आहे.

१. (सू. १२७) तत्पुरुष समासामध्यें उत्तरपद अशा उपमानवाचक चीर शब्दाचा आदि उदात्त होतो. उदा०—वस्त्रं चीरमिव वस्त्रचीरम्.

१. (सू. १२८) मिश्रित हा अर्थ गम्यमान असतांना तत्पुरुष समासामध्यें पलल, सूप आणि शाक या उत्तरपदांचा आदि उदात्त होतो. उदा०—गुडपललम्.

१. (सू. १२९) तत्पुरुष समासामध्यें कूल, सूद, स्थल आणि कर्ष या उत्तरपदांचा आदि उदात्त होतो पण तो सामासिक शब्द कोणाची तरी संज्ञा असला पाहिजे. उदा०–दाक्षिकूलम्.

१. (सू. १३०) कर्मधारयाशिवाय इतर तत्पुरुषामध्यें राज्य या उत्तरपदाचा आदि उदात्त होतो. उदा०–ब्राह्मणराज्यम्.

१. (सू. १३१) कर्मधारयाशिवाय इतर तत्पुरुषामध्यें उत्तरपद अशा वर्ग्य वगैरे शब्दांचा आदि उदात्त होतो. उदा०– वासुदेववर्ग्यः, अर्जुनपक्ष्यः,

१. (सू. १३२) तत्पुरुष समासामध्यें पुरुषवाचक शब्दापुढील उत्तरपद अशा पुत्र शब्दाचा आदि उदात्त होतो. उदा०– कौनटिपुत्रः.

१. (सू. १३३) आचार्य, राजा, ऋत्विक्, संयुक्त आणि ज्ञाति यांचे वाचक जे शब्द त्यांच्या पुढील पुत्र शब्दाचा पूर्वसूत्रानें आदि उदात्त होत नाहीं. उदा०-आचार्यपुत्रः.

१. (सू. १३४) तत्पुरुष समासामध्यें प्राणिवाचक शब्दाशिवाय इतर षष्ठ्यन्त शब्दाच्या पुढील चूर्ण वगैरे उत्तरपदांचा आदि उदात्त होतो.

२। १३४ ॥

षट्[1] च काण्डादीनि ॥ ६ । २ । १३५ ॥ ]

कुण्डं[1] वनम् ॥ ६ । २ । १३६ ॥

कुण्डाद्युदात्तत्वे तत्समुदायग्रहणम् ॥ १ ॥

कुण्डाद्युदात्तत्वे तत्समुदायग्रहणं कर्तव्यम् । वनसमुदायवाची[2] चेत्स कुण्डशब्दो भवतीति वक्तव्यम् । इह मा भूत् । मृत्कुण्डम् ॥

[ प्रकृत्या[1] भगालम् । ६ । २ । १३७ ॥

शितेर्नित्याबह्वज्[1] बहुव्रीहावभसत् ॥ ६ । २ । १३८ ॥ ]

इति श्रीभगवत्पतञ्जलिविरचिते व्याकरणमहाभाष्ये षष्ठस्याध्यायस्य द्वितीये पादे प्रथममाह्निकम् ॥

---

( सू. १३६ वा. १ ) तत्पुरुषामध्यें उत्तरपद अशा कुण्ड शब्दाला सांगितलेला जो हा आद्युदात्त त्याविषयीं तत्समुदायाचें ग्रहण करावें. कारण मृदः कुण्डं मृत्कुण्डम् येथें हा स्वर न झाला पाहिजे.

याप्रमाणें श्री भगवान् पतंजलींनीं रचिलेल्या व्याकरणमहाभाष्यांतील सहाव्या अध्यायाच्या दुसऱ्या पादांतील पहिलें आह्निक समाप्त झालें.

---

१. ( सू. १३५ ) तत्पुरुष समासामध्यें प्राणिवाचक शब्दाशिवाय इतर षष्ठ्यन्त शब्दाच्या पुढील उत्तरपद अशा काण्ड, चीर, पलल, सूप, शाक आणि कूच या सहा शब्दांचा आदि उदात्त होतो. उदा०–दर्भकाण्डम्.

१. ( सू. १३६ ) तत्पुरुष समासामध्ये उत्तरपद अशा वनवाचक कुण्ड शब्दाचा आदि उदात्त होतो. उदा०– दर्भकुण्डम्. वन हा शब्द येथें समुदाय या अर्थाचा आहे.

२. वन शब्दाचा समुदाय असाही अर्थ आहे. तोच अर्थ कुण्ड शब्दाचा असला पाहिजे.

१. ( सू. १३७ ) तत्पुरुष समासामध्यें भगालवाचक उत्तरपदाला प्रकृतिस्वर होतो. उदा०–कुम्भीभगालम्. भगाल हा शब्द मध्योदात्त ( फिट्सूत्र २।१९ ) आहे.

१. ( सू. १३८ ) ज्या शब्दामध्यें नेहमीं तिहींपेक्षां कमीच अच् असतात असें जें शितिशब्दाच्या पुढील भसत् शब्दाशिवाय उत्तरपद त्याला बहुव्रीहि समासामध्यें प्रकृतिस्वर होतो. उदा०–शितिपादः शितिककुत् येथे हा स्वर होत नाही. कारण ककुद शब्दांतील अकाराचा लोप करण्याचे पूर्वी त्यामध्यें तीन अच् आहेत.

---

## गतिकारकोपपदात्कृत् ॥ ६ । २ । १३९ ॥

गतिकारकोपपदादिति किमर्थम् । इह मा भूत् । परमं कारकं परमकारकम् ॥ गतिकारकोपपदादित्युच्यमाने ऽप्यत्र प्राप्नोति । एतदपि हि कारकम् ॥ इदं तर्हि । देवदत्तस्य कारकं देवदत्तकारकम् ॥ इदं चाप्युदाहरणं परमं कारकं परमकारकमिति । ननु चोक्तं गतिकारकोपपदादित्युच्यमानेऽप्यत्र प्राप्नोत्येतदपि हि कारकमिति । नैतत्कारकं कारकविशेषणमेतत् । यावद् ब्रूयात्प्रकृष्टं कारकं शोभनं कारकमिति तावदेतत्परमं कारकमिति ॥

अथ कृद्ग्रहणं किमर्थम् । इह मा भूत् । निष्कौशाम्बिः निर्वाराणसिः ॥ अत उत्तरं पठति ।

### गत्यादिभ्यः प्रकृतिस्वरत्वे कृद्ग्रहणानर्थक्यमन्यस्योत्तरपदस्याभावात् ॥ १ ॥

गत्यादिभ्यः प्रकृतिस्वरत्वे कृद्ग्रहणमनर्थकम् । किं कारणम् । अन्यस्योत्तरपदस्याभावात् । न ह्यन्यद्गत्यादिभ्य उत्तरपदमस्त्यन्यदतः कृतः । किं कारणम् । धातोर्हि द्वये प्रत्यया विधीयन्ते तिङः कृतश्च । तत्र

---

( सू. १३९ ) गतिकारकोपपदात् असें येथें कशाकरितां म्हटलें आहे ?

परमं च तत्कारकं च परमकारकम् येथें हा कृदुत्तरपद प्रकृतिस्वर न झाला पाहिजे म्हणून म्हटलें आहे.

पण गतिकारकोपपदात् असें म्हटलें तरीही परमकारकम् येथें कृत्स्वर प्राप्त होत आहेच. कारण, परम शब्दही येथें कारक आहेच.

तर मग देवदत्तस्य कारकं देवदत्तकारकम् हें उदाहरण घ्यावें.

परमं कारकं परमकारकम् हेंही उदाहरण येथें घेण्यासारखें आहे. पण 'गतिकारकोपपदात्' असें म्हटलें तरीही येथें कृत्स्वर प्राप्त होत आहे. कारण, परम शब्दही येथें कारक आहेच असें म्हटलें आहे ना ?

असें म्हटलें आहे खरें. पण परम हें येथें कारक नव्हे. तर कारकाचें तें विशेषण आहे. प्रकृष्टं कारकम् तसेंच शोभनं कारकम् असें म्हटलें असतां जो अर्थ भासतो त्याच अर्थाचें परमं कारकम् हें आहे.

आतां येथें कृत् असें कशाकरितां म्हटलें आहे ?

निष्कौशाम्बिः निर्वाराणसिः इत्यादि ठिकाणीं हा उत्तरपद–प्रकृतिस्वर न व्हावा म्हणून म्हटलें आहे.

हें सर्व मनांत घेऊन वार्तिककार म्हणतात–

( वा. १ ) गति, कारक, व उपपद यांहून उत्तरपदाला सांगितलेला हा जो प्रकृतिस्वर आहे तेथें कृद्ग्रहण केलें आहे तें अनर्थक होत आहे.

काय कारण ?

कारण असें कीं गत्यादिकाहून पुढील उत्तरपद कृदन्तावांचून दुसरें मुळींच असूं शकत नाहीं. याचें कारण असें कीं–धातूहून कृत् आणि

---

१. ( सू. १३९ ) तत्पुरुष समासामध्यें गति, कारक आणि उपपद यांच्या पुढील कृत्–प्रत्ययान्त उत्तरपदाला प्रकृतिस्वर होतो. उदा०–प्रकारकः.

२. येथें देवदत्तस्य हें गति कारक किंवा उपपद यांपैकीं कांहींच नसल्यामुळें त्याच्या पुढील कारक या शब्दाला प्रकृतिस्वर होत नाहीं.

३. येथें कारक शब्दानें कारके ( १।४।२३ ) या अधिकारांतील जें पंचमी वगैरे विभक्तींनीं दाखविलें जाणारें अपादान वगैरे कारक तेंच घ्यावयाचें आहे.

कृता सह समासो भवति तिङा च न भवति । तत्रान्तरेण कृद्ग्रहणं कृत एव भविष्यति ॥ ननु चेदानीमेवोदाहृतं निष्कौशाम्बिः निर्वाराणसिरिति । यत्क्रियायुक्तास्तं प्रति गत्युपसर्गसंज्ञे भवतो न च निसः कौशाम्बीशब्दं प्रति क्रियायोगः ॥

**कृत्प्रकृतौ वा गतित्वादधिकार्थं कृद्ग्रहणम् ॥ २ ॥**

कृत्प्रकृतौ तर्हि गतित्वादधिकार्थं कृद्ग्रहणं कर्तव्यम् । कृत्प्रकृतिर्धातुः । धातुं च प्रति क्रियायोगः । तत्र यत्क्रियायुक्तास्तं प्रतीतीहैव स्यात् प्रणीः उन्नीः इह न स्यात् प्रणायकः उन्नायकः । एतदपि नास्ति प्रयोजनम् । यत्क्रियायुक्ता इति नैवं विज्ञायते यस्य क्रिया यत्क्रिया यत्क्रियायुक्तास्तं प्रति गत्युपसर्गसंज्ञे भवत इति । कथं तर्हि । या क्रिया यत्क्रिया यत्क्रियायुक्तास्तं प्रति गत्युपसर्गसंज्ञे भवत इति । न च कश्चित्केवलः शब्दोऽस्ति यस्तस्यार्थस्य वाचकः स्यात् । केवलस्तस्यार्थस्य वाचको नास्तीति

---

तिङ् असे दोन प्रकारचेच प्रत्यय सांगितले आहेत. त्यांत कृदन्ताशींच समास होतो; व तिङन्ताशीं समासच होत नाहीं. तेव्हां उत्तरपदाला सांगितलेला हा प्रकृतिस्वर कृद्ग्रहण केल्यावांचून अर्थात् कृदन्तालाच होईल.

पण गत्यादिकांच्या पुढें कृदन्तभिन्न उत्तरपदाचीं निष्कौशाम्बिः निर्वाराणसिः इत्यादि उदाहरणें आतांच दाखविलीं आहेत ना ?

ज्या क्रियेनें प्र वगैरे उपसर्ग युक्त असतात त्या क्रियेपुरतेच ते गत्युपसर्गसंज्ञक होतात; आणि प्रकृत स्थलीं तर निस् या गतिसंज्ञक शब्दाला कौशाम्बी या उत्तरपदामुळें क्रियेचा योग नाहीं.

( वा. २ ) तर मग कृत् प्रत्ययाच्या फक्त प्रकृतीमुळेंच गतिसंज्ञा होत असल्यामुळें उत्तरपदामध्यें त्या प्रकृतीपेक्षां अधिक कृत् प्रत्यय असतांना त्याच्या संग्रहाकरितां कृद्ग्रहण केले पाहिजे. कृताची प्रकृति म्हणजे फक्त धातु; आणि त्यामुळेंच प्र वगैरेंचा क्रियेशीं योग होत असतो. तेव्हां ज्या धातूच्या क्रियेशीं प्र वगैरे युक्त असतील त्या धातूमुळेंच त्यांना गति व उपसर्ग या संज्ञा होतात. म्हणून फक्त धातूच उत्तरपद जेथें असेल अशा प्रणीः उन्नीः इत्यादि ठिकाणींच हा प्रकृतिस्वर होईल. प्रणायकः उन्नायकः इत्यादि ठिकाणीं होणार नाहीं.

हेंही कृद्ग्रहणाचें प्रयोजन नाहीं. कारण— यत्क्रियायुक्ताः० याचा ' यस्य क्रिया यत्क्रिया ' असा षष्ठीतत्पुरुष समास करून ' ज्या धातूच्या क्रियेनें युक्त असलेले जे प्रादि उपसर्ग ते त्याच धातूचे गति होतात ' असा अर्थ नाहीं.

तर मग कसा अर्थ आहे ?

या चासौ क्रिया च यत्क्रिया तया युक्ताः म्हणजे ' ज्या क्रियेनें प्रादिक युक्त होतात त्याच क्रियेचे ते गति व उपसर्ग होतात ' असा अर्थ आहे. आणि असा कांहीं शब्द दिसत नाहीं कीं जो फक्त क्रियेचाच वाचक आहे. तेव्हां अर्थासिद्ध होतें.

---

४. तर, निष्क्रान्तः कौशाम्ब्याः निष्कौशाम्बिः असा क्रान्त या अध्याहृत क्रियेचा योग आहे. येथें गति, कारक व उपपद यांच्या पुढील उत्तरपदाला प्रकृतिस्वर होतो असें म्हटलें असल्यामुळें प्रत्यासत्तिन्यायानें अर्थातच पूर्वपदाला गति, कारक व उपपद या संज्ञा उत्तरपदाच्या संबंधामुळेंच झाल्या असल्या पाहिजेत असे

५. तात्पर्य, उत्तरपदामध्यें कृत् प्रत्यय अधिक असतांनाही प्रकृतिस्वर होण्याकरितां कृत्ग्रहण केले पाहिजे.

६. उपसर्ग हे क्रियेचे आहेत धातूचे नव्हेत. ' यत्क्रियायुक्ताः०' येथें षष्ठीतत्पुरुष घेतला तर ते

कृत्वा कृदधिकस्य भविष्यति । ननु चायं तस्यैवार्थस्य वाचकः प्रणीरिति । एषोऽपि हि कर्तृविशिष्टस्य ॥ अयं तर्हि तस्यैवार्थस्य वाचकः । प्रभवनमिति । तस्मात्कृद्ग्रहणं कर्तव्यम् ॥ यदि कृद्ग्रहणं क्रियत आमन्ते स्वरो न प्राप्नोति । प्रपचतितराम् प्रजल्पतितराम् । असति पुनः कृद्ग्रहणे क्रियाप्रधानमाख्यातं तस्यातिशये तरबुत्पद्यते तरबन्तात्स्वार्थ आम् तत्र यत्क्रियायुक्ता इति भवत्येव संघातं प्रति क्रियायोगः । न च कश्चित्केवलः शब्दोऽस्ति यस्तस्यार्थस्य वाचकः स्यात्केवलस्तस्यार्थस्य वाचको नास्तीति कृत्वाधिकस्य भविष्यति । ननु चायं तस्यैवार्थस्य वाचकः प्रभवन-

---

तच उदाहरण मिळण्याकरितां कृत्प्रत्यय ज्यास्त असला तरी तेथें हा प्रकृतिस्वर होईल.

पण क्रियेचा वाचक धातु उत्तरपद असा प्रणीः व उन्नीः येथें दृष्टीस पडत आहे ना ?

तेथेंही तो 'नी' धातु फक्त क्रियेचा वाचक नाहीं. तर त्या क्रियेचा कर्ता एवढ्या अर्थाचा वाचक आहे.

तर मग 'प्रभवनम्' येथें भावीं ल्युट् प्रत्यय केला असल्यामुळें केवळ क्रियेचा वाचक धातु उत्तरपद होत आहे. तेव्हां उत्तरपदामध्यें धातूपेक्षां कृत् प्रत्यय ज्यास्त असला तरी तेथें प्रकृतिस्वर होण्यासाठीं कृद्ग्रहण केलें पाहिजे.

पण जर कृद्ग्रहण केलें तर प्रपचतितराम् प्रपचतितमाम् प्रजल्पतितमाम् इत्यादि आमन्तस्थलीं हा प्रकृतिस्वर होणार नाहीं. आणि कृद्ग्रहण न केलें तर तिङन्ताला क्रिया–प्राधान्य असल्यामुळें त्या क्रियेचा अतिशय दाखविणारा तिङन्ताहून तरप् उत्पन्न होतो, व त्या तरबन्ताहून स्वार्थीं आम् प्रत्यय होतो. तेव्हां पचतितराम् एवढा समुदाय क्रियावाचक आहे असें म्हणतां येतें; आणि यत्क्रियायुक्ताः या न्यायानें पचतितराम् या संघाताच्या क्रियेशीं प्र याचा योग असल्यामुळें त्याचा तो गति आहे असेंही म्हणतां येतें.

आंतां असा क्रियावाचक उत्तरपदशब्द कोठेंही दिसत नाहीं कीं जो फक्त क्रियेचाच वाचक आहे. तेव्हां अर्थातच उदाहरण मिळण्याकरितां कृत्प्रत्यय ज्यास्त असला तरी तो वाचक होईल

पण क्रियेचा वाचक केवळ धातु प्रभवनम्

---

धातूचे गति व उपसर्ग समजले जाऊन धातूच उत्तरपद पाहिजे असा प्रत्यासत्तीनें अर्थ होईल. आणि प्रणीः येथेंच हा स्वर होईल, प्रणायकः येथें होणार नाही असा दोष येण्याचा संभव आहे. पण कर्मधारय समास घेतला म्हणजे गति व उपसर्ग हे क्रियेचे समजले जाऊन क्रियाच उत्तरपद असलें पाहिजे असा प्रत्यासत्तीनें अर्थ होईल. पण क्रिया ही शब्दाचा अर्थ असल्यामुळें ती उत्तरपद असण्याचा मुळींच संभव नाहीं. म्हणून क्रियावाचक असलें पाहिजे असें म्हणावें तर नुसत्या क्रियेचें वाचक असें उत्तरपद दृष्टीस पडत नाहीं.

७. कर्ता अर्थ अधिक आहे एवढेंच नव्हे, तर तेथें कर्ता हा अर्थ मुख्य आहे. तेव्हां तेथें नी या उत्तरपदाला कर्तृवाचक म्हणतां येईल क्रियावाचक असें म्हणतां येणार नाहीं.

८. येथें पचति इत्यादि तिङन्तांहून अतिशय या अर्थीं तरप् प्रत्यय ( ५।३।५७ ) व त्याहून पुढें आम् प्रत्यय ( ५।४।११ ) केला आहे. येथें कृत् प्रत्यय मुळीच नाहीं आणि समास ( २।२।१८ ) तर झाला आहे.

९. कृत् ग्रहण नसले तरी प्रपचतितराम् येथें हा प्रकृतिस्वर होणार नाहीं. कारण पचतितराम् हें उत्तरपद नुसत्या क्रियेचें वाचक नाहीं. त्यांतील तिप् प्रत्ययापासून एकत्वसंख्या, वर्तमानकाल, आणि कर्ता यांचा बोध होत आहे. ही शंका येथून भाष्यकार दूर करीत आहेत.

मिति । एषोऽपि द्रव्यविशिष्टस्य । कथम् । कृदभिहितो भावो द्रव्यवद्भवति क्रियावदपि ॥

**[ उभे वनस्पत्यादिषु युगपत् ॥ ६ । २ । १४० ॥**

**देवताद्वंद्वे च ॥ ६ । २ । १४१ ॥**

**नोत्तरपदेऽनुदात्तादावपृथिवीरुद्रपूषमन्थिषु ॥ ६ । २ । १४२ ॥ ]**

**अन्तः ॥ ६ । २ । १४३ ॥**

किं समासस्यान्त उदात्तो भवत्याहोस्विदुत्तरपदस्य । कुतः संदेहः । उभयं प्रकृतं तत्रान्यतरच्छक्यं विशेषयितुम् । कश्चात्र विशेषः ।

**अन्तोदात्तत्वं समासस्येति चेत्कप्युपसंख्यानम् ॥ १ ॥**

अन्तोदात्तत्वं समासस्येति चेत्कप्युपसंख्यानं कर्तव्यम् । इदमेतत्तद्भ्यः प्रथमपूरणयोः क्रियागणने कपि चेति वक्तव्यम् । इहापि यथा स्यात् । इदंप्रथमकाः ॥ अस्तु तर्ह्युत्तरपदस्य ।

**उत्तरपदान्तोदात्तत्वे नञ्सुभ्यां समासान्तोदात्तत्वम् ॥ २ ॥**

---

येथें दृष्टीस पडत आहे ना ? येथेंही धातु द्रव्यविशिष्ट अशाच क्रियेचा वाचक झाला आहे. कारण कृत् प्रत्ययानें अभिहित झालेला भाव म्हणजे धात्वर्थ द्रव्याप्रमाणें प्रतीत[10] होतो व क्रियेप्रमाणेंही प्रतीत[11] होतो.

( सू. १४३ ) येथें समासाचा अन्त उदात्त होतो किंवा उत्तरपदाचा अन्त उदात्त होतो यांपैकीं काय समजावें ?

पण येथें असा संशय काय म्हणून येतो ?

समास व उत्तरपद हे दोन्हीही शब्द मागून चालू आहेत; तेव्हां त्यांपैकीं कोणाचाही अन्त येथें घेतां येईल.

पण या दोन प्रकारांत काय बरें फरक आहे ?

( वा. १ ) समासाचा अन्त उदात्त होतो असें म्हटलें तर 'इदमेतत्तद्भ्यः प्रथमपूरणयोः क्रियागणने' ( ६।२।१६२ ) या सूत्रामध्यें 'कप्' प्रत्यय पुढें असतांना त्याच्या पूर्वीच्या शब्दाचा अन्त उदात्त होतो असें वचन करावें लागणार आहे. इदं प्रथमं गमनं येषां ते इदंप्रथमकाः.

तर मग उत्तरपदाचा अन्त उदात्त होतो असाच अर्थ होऊं दे.

( वा. २ ) उत्तरपदाचा अन्त उदात्त होतो

---

१० म्हणूनच पाकः व यागः या भाव-प्रत्ययान्त शब्दांमध्यें पुल्लिंग, व एकत्व यांचा संबंध होतो.

११. म्हणूनच भोक्तुं पाकः येथें पाकः हें क्रियावाचक उपपद आहे असें समजून तुमुन् प्रत्यय ( ३।३।१० ) सिद्ध होतो

१. ( सू. १४० ) वनस्पति वगैरे सामासिक शब्दांमध्यें पूर्वपद आणि उत्तरपद या दोघांनाही एकदम प्रकृतिस्वर होतो. उदा०-वनस्पति॑ः.

१ ( सू. १४१ ) देवतावाचक शब्दांच्या द्वंद्वामध्यें पूर्वपद आणि उत्तरपद या दोघांनाही एकदम प्रकृतिस्वर होतो. उदा०-इन्द्रासोमौ॑.

१. ( सू. १४२ ) देवतावाचक शब्दांच्या द्वंद्वामध्यें जर उत्तरपद पृथिवी, रुद्र, पूषन्, आणि मन्थिन् यांशिवाय अनुदात्तादि असेल तर तेथें पूर्वसूत्रानें दोघांना प्रकृतिस्वर होत नाहीं. उदा०-इन्द्राग्नी.

१. ( सू. १४३ ) हें अधिकार सूत्र आहे. पुढील सूत्रामध्यें अन्तः या पदाचा संबंध होतो.

२. इदंप्रथमः याप्रमाणें इदंप्रथमकाः येथेंही प्रथम शब्दांतील शेवटच्या अकारालाच उदात्त झाला पाहिजे. समासान्त कप् प्रत्यय ( ५।४।१५४ ) समासाचा अवयव असल्यामुळें त्याच्या अकाराला उदात्त होऊं लागेल.

उत्तरपदान्तोदात्तत्वे नञ्सुभ्यां समासान्तोदात्तत्वं वक्तव्यम् । अनृचः बह्वृचः । अपर आह । उत्तरपदान्तोदात्तत्वे नञ्सुभ्यः समासान्तोदात्तत्वं वक्तव्यम् । अज्ञकः अस्वकः । कपि पूर्वम् [ ६. २. १७३ ] इत्यस्यापवादो ह्रस्वान्तेऽन्त्यात्पूर्वम् [ १७४ ] इति । तत्र ह्रस्वान्तेऽन्त्यात्पूर्वं उदात्तभावी नास्तीति कृत्वोत्सर्गेणैवान्तोदात्तत्वं प्राप्नोति ॥

**न वा कपि पूर्ववचनं ज्ञापकमुत्तरपदानन्तोदात्तत्वस्य ॥ ३ ॥**

न वैषः दोषः । किं कारणम् । यदयं कपि पूर्वमित्याह तज्ज्ञापयत्याचार्यो नोत्तरपदस्यान्त उदात्तो भवतीति ॥ एवमपि कुत एतत्समासस्यान्त उदात्तो भवतीति ।

**प्रकरणाच्च समासान्तोदात्तत्वम् ॥ ४ ॥**

प्रकृतं समासग्रहणमनुवर्तते । क प्रकृ-

---

असें म्हटलें तर नञ् व सु यांहून पर जें उत्तरपद तदन्त समासाचा अन्त उदात्त होतो असें वचन करावें लागणार आहे. उदा० अनृचः[३] बह्वृचः.

अन्य कोणी वैयाकरण म्हणतो कीं उत्तरपदाचा अन्त उदात्त होतो असें म्हटलें तर नञ् व सु यांहून पुढें असलेलें जें उत्तरपद तदन्त समासाला अन्तोदात्त होतो असें वचन करावें लागणार. उदा० न ज्ञो यस्य अज्ञकः[४]. 'कपि पूर्वम्' (६।५।१०३) यानें कप् प्रत्ययाहून पूर्वाला उदात्त प्राप्त होत आहे असें समजूं नये. कारण 'ह्रस्वान्तेऽन्त्यात्पूर्वम्' हा त्याचा अपवाद आहे. आतां त्या अपवाद शास्त्रानें येथे उदात्त मात्र होत नाहीं[५]. कारण ह्रस्वान्त जें ज्ञ हें उत्तरपद त्यामध्यें एकच अच् असल्यामुळें अन्त्याच्या पूर्वी उदात्त होण्यासारखा कोणी वर्णच नाहीं[६]. तेव्हां तेथें नञ्सुभ्याम् या सामान्य शास्त्रानें अन्त उदात्त प्राप्त होतो.

( वा. ३ ) हे दोष येत नाहींत.

काय कारण ?

कारण असें कीं ज्या अर्थी हे आचार्य 'कपि पूर्वम्' ( ३।२।१७३ ) यानें नञ् व सु यांहून पर व कप् प्रत्ययाहून पूर्व अशा पदाला अन्तोदात्ताचें विधान करीत आहेत[७] त्या अर्थी उत्तरपदाला अन्तोदात्त होत नाहीं असें ते सुचवीत आहेत.

या ज्ञापकामुळें उत्तरपदाला अन्तोदात्त झाला नाहीं तरी तो समासालाच होतो हें कशावरून ?

(वा. ४) समासाचें प्रकरण चालूं असल्यामुळें समासाला होईल.

---

३. येथे समासान्त अ प्रत्यय ( ५।४।७४ ) झाला आहे. व त्यालाच 'नञ्सुभ्याम्' ( ६।२।१७२ ) याने उदात्त झाला पाहिजे. बह्वृचः 'येथेंही बहोर्नञ्वत्०' ( ६।२।१७५ ) यानें त्यालाच उदात्त होणें इष्ट आहे.

४. येथें समासान्त कप् प्रत्यय झाला आहे. त्या प्रत्ययाच्या अकारालाच 'नञ्सुभ्याम्' याने उदात्त झाला पाहिजे.

५. तर फक्त 'कपि पूर्वम्' याचा बाध करणें एवढेंच येथे 'ह्रस्वान्ते०' या अपवादाचें कर्तव्य आहे असें समजावें.

६. तरी पण त्यानें 'कपि पूर्वम्' याचा बाध होतोच. कारण ह्रस्वान्त उत्तरपद असतांना अंत्याहून पूर्वी ( उदात्तभावी ) असल्यास त्यालाच उदात्त करावा, पण ह्रस्वान्त उत्तरपद असतांना कोठेही कप् प्रत्ययाहून पूर्वींच्याला उदात्त होत नाहीं असा तेथें वाक्यभेदानें नियम केला आहे.

७. उत्तरपदाचा अन्त उदात्त होईल तर नञ्सुभ्याम् यानेंच सिद्ध होत असल्यामुळें 'कपि पूर्वम्' हें व्यर्थ होणार आहे.

तम् । चौ समासस्य [ ६. १. २२२; २२३ ] इति ॥ ननु चोक्तमन्तोदात्तत्वं समासस्येति चेत्कप्युपसंख्यानमिति । नैष दोषः । उत्तरपदग्रहणमपि प्रकृतमनुवर्तते । क प्रकृतम् । उत्तरपदादिः [ ६. २. १११ ] इति । तत्रैवमभिसंबन्धः करिष्यते । नञ्सुभ्यां समासस्यान्त उदात्तो भवति । इदमेतत्तद्भ्यः प्रथमपूरणयोः क्रियागणन उत्तरपदस्येति ॥

[ थाथघञ्क्ताजबित्रकाणाम् ॥ ६।२।१४४ ॥

सूपमानात् क्तः ॥ ६।२।१४५॥

संज्ञायामनाचितादीनाम् ॥ ६ । २।१४६ ॥

प्रवृद्धादीनां च ॥ ६।२।१४७ ॥ ]

कारकाद्दत्तश्रुतयोरेवाशिषि ॥६। २ । १४८ ॥

कारकाद्दत्तश्रुतयोरनाशिषि प्रतिषेधः ॥ १ ॥

कारकाद्दत्तश्रुतयोरनाशिषि प्रतिषेधो वक्तव्यः । अनाहूतो नदति देवदत्तः ॥

सिद्धं तूभयनियमात् ॥ २ ॥

सिद्धमेतत् । कथम् । उभयनियमात् ।

---

मागें समासग्रहण कोठें बरें आहे ?

'चौ' 'समासस्य' ( ६।१।२२३ ) येथें आहे.

पण समासाचा अन्त उदात्त होतो असें म्हटलें तर कप् पुढें असतांना पूर्वाला अन्तोदात्ताचें विधान करावें लागणार आहे असा दोष आतांच दाखविला आहे ना ?

हा दोष येत नाहीं. कारण, उत्तरपदग्रहणही मागून अनुवृत्तीनें येत आहे.

मागें उत्तरपदग्रहण कोठें बरें आहे ?

उत्तरपदादिः ( ६।२।१११ ) येथें आहे. तेव्हां समासग्रहण व उत्तरपदग्रहण हीं दोन्हीही अनुवृत्तीनें येत आहेत. त्यांत 'नञ्सुभ्याम्' (६।२।१७२ ) येथें नञ् व सु यांहून पुढील जें उत्तरपद तदन्त समासाला अन्तोदात्त होतो असा संबंध करावा. आणि इदमेतत्तद्भ्यः० ( ६।२।१६२ ) येथें इदम् वगैरे शब्दांहून पर असें जें समासांतील प्रथम वगैरे उत्तरपद त्याचा अन्त उदात्त होतो असा संबंध करावा.

( सू. १४८ वा. १ ) आशीर्वाद गम्यमान नसतांना कारकाहून पर दत्त व श्रुत यांना अन्तोदात्ताच्या प्रतिषेधाकरितां वचन करावें. उदा०— अनाहूतो नदति देवदत्तः.

( वा. २ ) नदति देवदत्तः येथें प्रतिषेध-

---

१. ( सू. १४४ ) गति, कारक आणि उपपद यांच्या पुढील जें थ, अथ, घञ्, क्त अच्, अप्, इत्र, आणि क हे प्रत्यय शेवटी असलेलें उत्तरपद त्याचा अन्त उदात्त होतो. उदा० सुनीथः. येथें उणादि प्रत्यय ( उणा. पा. २ सू. १५९ ) थ झाला आहे.

१. ( सू. १४५ ) सु आणि उपमानवाचक शब्द यांहून पर असलेल्या क्त-प्रत्ययान्त उत्तरपदाचा अन्त उदात्त होतो उदा०—सुकृतम्, सिंहविनर्दितम्.

१. ( सू. १४६ ) गति, कारक आणि उत्तरपद यांच्या पुढें असलेलें जें आचित वगैरे शब्दांशिवाय उत्तरपद त्याचा अन्त उदात्त होतो पण तो सामासिक शब्द कोणाची तरी संज्ञा असला पाहिजे. उदा०— संभृतः रामायणः.

१. ( सू. १४७ ) प्रवृद्ध वगैरे शब्दांतील जें क्त-प्रत्ययान्त उत्तरपद त्याचा अन्त उदात्त होतो. उदा०— प्रवृद्धं यानम्.

१. ( सू. १४८ ) संज्ञा असतांना आणि आशीर्वाद अर्थ गम्यमान असतांना कारकाच्या पुढील क्त-प्रत्ययान्त उत्तरपदाला जर अन्त उदात्त प्राप्त झाला तर तो फक्त दत्त किंवा श्रुत या दोन शब्दांनाच करावा. उदा०— देवा एनं देयासुर्देवदत्तः, विष्णुरेनं श्रूयात् विष्णुश्रुतः.

उभयतो नियम आश्रयिष्यते । कारकाद्दत्तश्रुतयोरेवाशिषि । आशिष्येव कारकाद्दत्तश्रुतयोः ॥

**[ इत्थंभूतेन कृतमिति च ॥ ६ । २ । १४९ ॥**

**अनो भावकर्मवचनः ॥ ६ । २ । १५० ॥**

**मन्क्तिन्व्याख्यानशयनासनस्थानयाजकादिक्रीताः ॥ ६ । २ । १५१ ॥**

**सप्तम्याः पुण्यम् ॥ ६।२।१५२ ॥**

**ऊनार्थकलहं तृतीयायाः ६ । २ । १५३ ॥**

**मिश्रं चानुपसर्गमसंधौ ॥ ६ । २ । १५४ ॥**

**नञो गुणप्रतिषेधे संपाद्यर्हहितालमर्थास्तद्धिताः ॥ ६ । २ । १५५ ॥**

---

वचन केल्यावांचून अन्तोदात्ताचा (६।२।१४६) निषेध साधत आहे.

तो कसा ?

हा दोन प्रकारचा नियम आहे. तो असा 'संज्ञा आणि आशीर्वाद हे अर्थ असतांना कारकाच्या पुढील फक्त दत्त व श्रुत यांनाच अन्तोदात्त होतो' हा एक. आणि दुसरा नियम असा कीं– 'संज्ञा असताना कारकाच्या पुढील दत्त व श्रुत या शब्दांना फक्त आशीर्वाद अर्थ असेल तरच अन्तोदात्त होतो.'[२]

२. नदति देवदत्तः येथें देवदत्त ही एका विशेष शंखाची संज्ञा आहे. येथें आशीर्वाद गम्यमान नसल्यामुळें ह्या दुसऱ्या नियमानें अन्त उदात्त (६।२।१४६) होत नाहीं. येथें पूर्वपदप्रकृतिस्वरच (६।२।४८) होतो.

१. ( सू. १४९ ) अमुक एक विशेष अवस्थेंतील मनुष्यानें हें केलें असा अर्थ गम्यमान असतांना समासांतील क्त–प्रत्ययान्त उत्तरपदाचा अन्त उदात्त होतो. उदा०–सुप्तप्रलपितम्.

१. ( सू. १५० ) कारकाच्या पुढील जें भाववाचक किंवा कर्मवाचक अन–प्रत्ययान्त उत्तरपद त्याचा अन्त उदात्त होतो. उदा०–ओदनभोजनं सुखम् , राजभोजनाः शालयः.

१. ( सू, १५१ ) समासांतील उत्तरपद असे जे मन्प्रत्ययान्त शब्द, क्तिन्प्रत्ययान्त शब्द, व्याख्यान, शयन, आसन व स्थान हे शब्द तसेच याजकादि गणांतील शब्द आणि क्रीत शब्द यांचा अन्त उदात्त होतो. उदा०–रथवर्त्म.

१. (सू. १५२) सप्तम्यन्ताच्या पुढील उत्तरपद पुण्य शब्दाचा अन्त उदात्त होतो. उदा०–अध्ययने पुण्यम् अध्ययनपुण्यम्.

१. (सू. १५३) तृतीयान्ताच्या पुढील उत्तरपद जे ऊन या अर्थाचे शब्द आणि कलह शब्द त्यांचा अन्त उदात्त होतो. उदा०–माषोनम्, माषविकलम्, वाक्कलहः.

१. ( सू. १५४ ) तृतीयान्ताच्या पुढील उपसर्ग नसलेल्या केवल मिश्र शब्दाचा अन्त उदात्त होतो परंतु संधि अर्थ गम्यमान नसला पाहिजे. उदा०–गुडमिश्राः. कांहीं एकादा ठराव करण्यांत इतराबरोबर मिसळणें याला संधि म्हणतात. ब्राह्मणमिश्रः राजा येथें संधि गम्यमान असल्यामुळें अन्त उदात्त होत नाहीं.

१. ( सू. १५५ ) संपादी, अर्ह, हित, आणि अलम् या अर्थांचे जे तद्धितप्रत्यय तदन्त असें जें नञाच्या पुढील उत्तरपद त्याचा अन्त उदात्त होतो, पण तो नञ् क्रमानें विशेष शोभा देणें, योग्यता, हितकारकत्व, आणि समर्थ या अर्थांचा निषेध दाखविणारा असला पाहिजे. उदा०–अकार्णवेष्टकिकं मुखम्. अच्छैदिकोऽयं वेतसः, अवत्सीयोऽयम्, असांतपिकोऽयम्. येथें संपादि या अर्थी ठक् प्रत्यय ( ५।१।९९ ), तदर्हति या अर्थी ठक् प्रत्यय ( ५।१।६४ ) तस्मै हितम् या अर्थी छ प्रत्यय ( ५।१।५ ) आणि प्रभवति या अर्थी ठञ् प्रत्यय ( ५।१।१०१ ) असे प्रत्यय झाले आहेत.

यतोऽनावः ॥ ६ । २ । १५६ ॥

अच्कावशक्तौ ॥ ६ । २ । १५७ ॥

आक्रोशे च ॥ ६ । २ । १५८ ॥

संज्ञायाम् ॥ ६ । २ । १५९ ॥

कृत्योकेष्णुच्चार्वादयश्च ॥ ६ । २ । १६० ॥

विभाषा तृन्नन्नतीक्ष्णशुचिषु ॥ ६ । २ । १६१ ॥

बहुव्रीहाविदमेतत्तद्भ्यः प्रथमपूरणयोः क्रियागणने । ६ । २ । १६२ ॥

संख्यायाः स्तनः ॥ ६ । २ । १६३ ॥

विभाषा छन्दसि ॥ ६ । २ । १६४ ॥ ]

संज्ञायां मित्राजिनयोः ॥ ६ । २ । १६५ ॥

ऋषिप्रतिषेधो मित्रे ॥ १ ॥

ऋषिप्रतिषेधो मित्रे वक्तव्यः । विश्वामित्र ऋषिः ॥

---

(सू. १६५ वा. १) मित्र शब्द जर ऋषीचा दर्शक असेल तर त्या उत्तरपद मित्र शब्दाला अन्तोदात्त होत नाहीं असें प्रतिषेधाकरितां वचन करावें. उदा०—विश्व मित्रं यस्य विश्वामित्रः ऋषिः.

---

१. ( सू. १५६ ) तादर्थ्य या अर्थी न केलेले जे य आणि यत् हे तद्धित प्रत्यय ते अन्ती असलेले जें नञाच्या पुढील उत्तरपद त्याचा अन्त उदात्त होतो, पण तो नञ् त्या तद्धितप्रत्ययाच्या अर्थाचा निषेध दाखविणारा असला पाहिजे. उदा० पाशानां समूहः पाश्या ( ४।२।४९ ) न पाश्या अपाश्या. दन्तेपु भवं दन्त्यम् ( ४।३।५५ ) न दन्त्यम् अदन्त्यम्.

१. ( सू. १५७ ) अच् आणि क हे प्रत्यय शेवटीं असलेलें जे नञाच्या पुढील उत्तरपद त्याचा अन्त उदात्त होतो, अशक्ति हा अर्थ गम्यमान असतांना. उदा०— न पचः (३।१।१३४ ) अपचः. न विलिखः ( ३।१।१३५ ) अविलिखः.

१. ( सू. १५८ ) अच् आणि क हे प्रत्यय शेवटीं असलेले जें नञाच्या पुढील उत्तरपद त्याचा अन्त उदात्त होतो, निन्दा गम्यमान असतांना. उदा० अपचः अयं जाल्मः , अविलिखः अयं जाल्मः.

१. ( सू. १५९ ) संज्ञा असतांना आणि निन्दा गम्यमान असतांना नञाच्या पुढील उत्तरपदाचा अन्त उदात्त होतो. उदा०— अदेवदत्तः.

१. ( सू. १६० ) कृत्य प्रत्यय उक प्रत्यय आणि इष्णुच् प्रत्यय हे प्रत्यय शेवटीं असलेले किंवा चार्वादि गणांत असलेले जे नञाच्या पुढील शब्द त्यांचा अन्त उदात्त होतो. उदा०— अकर्तव्यम्.

१. ( सू. १६१ ) नञाच्या पुढें असलेले असे जे तृन्-प्रत्ययान्त किंवा अन्न तीक्ष्ण आणि शुचि हे शब्द त्यांचा अन्त विकल्पेंकरून उदात्त होतो. उदा०— अकर्ता; अनन्नम् ; अतीक्ष्णम्; अशुचिः.

१. ( सू. १६२ ) बहुव्रीहि समासामध्यें इदम् एतद् आणि तद् या शब्दांच्या पुढील जो प्रथम हा शब्द किंवा पूरणप्रत्ययान्त शब्द त्याचा अन्त उदात्त होतो; परंतु तेथें कोणत्याही क्रियेची गणना असली पाहिजे. उदा०— इदं प्रथमं ( गमनं भोजनं वा ) यस्य सः इदंप्रथमः, इदंद्वितीयः. येथें तीय हा पूरणप्रत्यय ( ५।२।५४ ) झाला आहे.

१. ( सू. १६३ ) बहुव्रीहि समासामध्यें संख्यावाचक शब्दापुढील स्तन शब्दाचा अन्त उदात्त होतो. उदा०— द्विस्तना.

१. ( सू. १६४ ) पूर्वसूत्रानें सांगितलेला अन्त उदात्त वेदामध्यें विकल्पानें होतो.

१. ( सू. १६५ ) बहुव्रीहि समासामध्यें मित्र व अजिन हे उत्तरपद असलेल्या शब्दांचा अन्त उदात्त होतो, परंतु तो सामासिक शब्द कोणाची तरी संज्ञा असला पाहिजे. उदा०—देवमित्रः, वृकाजिनः.

२. येथें पूर्वपदाचा अन्त उदात्त (६।२।१०६) होतो.

[ [1]व्यवायिनोऽन्तरम् ॥ ६ । २ । १६६ ॥

[1]मुखं स्वाङ्गम् ॥ ६ । २ । १६७ ॥

[1]नाव्ययदिक्शब्दगोमहत्स्थूलमुष्टिपृथुवत्सेभ्यः ॥ ६।२।१६८ ॥

[1]निष्ठोपमानादन्यतरस्याम् ॥ ६ । २ । १६९ ॥

[1]जातिकालसुखादिभ्योऽनाच्छादनात् क्तोऽकृतमितप्रतिपन्नाः ॥ ६ । २ । १७० ॥

[1]वा जाते ॥ ६ । २ । १७१ ॥

[1]नञ्सुभ्याम् ॥ ६ । २ । १७२ ॥

[1]कपि पूर्वम् ॥ ६ । २ । १७३ ॥

[1]ह्रस्वान्तेऽन्त्यात्पूर्वम् ॥ ६ । २ । १७४ ॥ ]

[1]बहोर्नञ्वदुत्तरपदभूम्नि ॥ ६ । २ । १७५ ॥

किमर्थं बहोर्नञ्वदतिदेशः क्रियते न नञ्सुबहुभ्य इत्येवोच्येत । नैवं शक्यम् । उत्तरपदभूम्नीति वक्ष्यति तद्बहोरेव यथा स्यान्नञ्सुभ्यां मा भूदिति । नैतदस्ति प्रयोजनम् । एकयोगेऽपि सति यस्योत्तरपदभू-

---

( सू. १७५ ) बहु हा शब्द नञासारखा समजावा असा अतिदेश कशाकरितां केला आहे ? तसा करूं नये. तर 'नञ्सुबहुभ्यः' ( ६।२।१७२ ) असेंच सूत्र करावें.

तसें करणें शक्य नाहीं. कारण उत्तरपदभूम्नि याचा संबंध बहु शब्दाकडेच झाला पाहिजे; नञ् व सु या शब्दांकडे न झाला पाहिजे.

हें प्रयोजन नाहीं. कारण नञ्सुबहुभ्यः असें

---

१. ( सू. १६६ ) ज्या वस्तूनें व्यवधान होतें अशा वस्तूच्या वाचक शब्दाच्या पुढील अन्तर शब्दाचा अन्त बहुव्रीहीमध्यें उदात्त होतो. उदा०–वस्त्रमन्तरं ( व्यवधायकं ) यस्य स वस्त्रान्तरः.

१. ( सू. १६७ ) बहुव्रीहि समासामध्यें स्वाङ्गवाचक मुख शब्द उत्तरपद असतांना त्याचा अन्त उदात्त होतो. उदा०–गौरमुखः.

१. ( सू. १६८ ) अव्यय, दिक्शब्द, तसेंच गो, महत्, स्थूल, मुष्टि, पृथु आणि वत्स हे शब्द यांपैकीं कोणत्याही शब्दाच्या पुढील मुख शब्दाचा पूर्वसूत्रानें अन्त उदात्त होत नाहीं. उदा०–उच्चैर्मुखः.

१. (सू. १६९) निष्ठा-प्रत्ययान्त आणि उपमानवाचक अशा पूर्वपदाच्या पुढील स्वाङ्गवाचक मुख शब्दाचा बहुव्रीहीमध्यें अन्त उदात्त विकल्पानें होतो. प्रक्षालितमुखः, प्रक्षालितमुखः ( ६।२।११० ) प्रक्षालितमुखः ( ६।२।४९ ) तसेंच सिंहमुखः.

१. ( सू. १७० ) आच्छादनाशिवाय जातिवाचक शब्द, कालवाचक शब्द, सुखादि गणांतील शब्द यांच्या पुढील जें कृत मित आणि प्रतिपन्न या तीन शब्दांशिवाय क्त-प्रत्ययान्त उत्तरपद त्याचा बहुव्रीहीमध्यें अन्त उदात्त होतो. उदा०– सारङ्गजग्धः, वस्त्रच्छन्नः, कुण्डकृतः हीं प्रत्युदाहरणें होत.

१. ( सू. १७१ ) जात शब्दाला पूर्वसूत्रानें प्राप्त झालेला जो अन्त उदात्त तो विकल्पानें होतो. उदा०–दन्तजातः.

१. ( सू. १७२ ) बहुव्रीहीमध्यें नञ् आणि सु यांच्या पुढील जें उत्तरपद तदन्त बहुव्रीहि समासाचा अन्त उदात्त होतो. उदा०– अव्रीहिः; सुव्रीहिः.

१. ( सू. १७३ ) समासान्त क प्रत्यय केला असेल तेथें पूर्वसूत्रानें प्राप्त झालेला अन्त उदात्त कप् या प्रत्ययाच्या पूर्वीच्या वर्णाला होतो. उदा०–अकुमारीकः.

१ ( सू. १७४ ) उत्तरपद जर ह्रस्वान्त असेल तर तेथें पूर्वसूत्र प्रवृत्त होत नाहीं. आणि त्या ह्रस्वान्त उत्तरपदामध्यें जर त्या ह्रस्वाच्या पूर्वीं वर्ण असेल तर त्याला उदात्त होतो.–अज्ञकः, अव्रीहिकः.

१ ( सू. १७५ ) उत्तरपदार्थाचें बहुत्व दाखविणारा जो पूर्वपद बहु हा शब्द तो नञासारखा समजावा. उदा०–बहुयवो देशः, बहुकुमारीकः, बहुयवकः.

मारित तस्य भविष्यति । कस्य चास्ति । बहोरेव ॥ इदं तर्हि प्रयोजनम् । न गुणादयो ऽवयवाः [ १७६ ] इति वक्ष्यति तद्बहोरेव यथा स्यान्नञ्सुभ्यां मा भूदिति । एतदपि नास्ति प्रयोजनम् । एकयोगेऽपि सति यस्य गुणादयोऽवयवाः सन्ति तस्य भविष्यति । कस्य च सन्ति । बहोरेव ॥ अत उत्तरं पठति ।

**बहोर्नञ्वदुत्तरपदाद्युदात्तार्थम् ॥ १ ॥**

बहोर्नञ्वदतिदेशः क्रियत उत्तरपदाद्युदात्तार्थम् । उत्तरपदस्याद्युदात्तत्वं यथा स्यात् । विदेशस्थमपि यन्नञः कार्यं तदपि बहोर्यथा स्यात् । नञो जरमरमित्रमृताः [ ६. २. ११६ ] अजरः अमरः । बहुजरः बहुमित्रः ।

**[ न गुणादयोऽवयवाः ६ ॥ २ । १७६ ॥ ]**

**उपसर्गात्स्वाङ्गं ध्रुवमपर्शु ॥ ६ । २ १७७ ॥**

**उपसर्गात्स्वाङ्गं ध्रुवं मुखस्यान्तोदात्तत्वात् ॥ १ ॥**

मुखस्यान्तोदात्तत्वादुपसर्गात्स्वाङ्गं ध्रुव-

---

एक सूत्र असलें तरी ज्याला उत्तर पदार्थाचें बहुत्व दाखविण्याची योग्यता आहे त्याच्याकडेच उत्तरपदभूम्नि याचा संबंध[२] होईल.

ती योग्यता कोणाला आहे ?

बहु शब्दालाच आहे.

तर मग हें प्रयोजन समजावें कीं–'न गुणादयोऽवयवाः' असा जो पुढें प्रतिषेध आहे तो बहु शब्दासंबंधानेंच लागू पडावा आणि नञ् व सु याच्या संबंधानें लागू पडूं नये.

हेंही प्रयोजन नाहीं. कारण ' नञ्सुबहुभ्यः ' असें एकच सूत्र असलें तरी ज्याचा संबंध अवयव अशा गुण वगैरेंकडे होतो त्याहून पर अशालाच निषेध होईल.

तसा संबंध कोणाचा होतो ?

बहु शब्दाचाच होतो.

हें सर्व मनांत आणून वार्तिककार म्हणतात.

( वा. १ ) ' बहु शब्दाहून पराला स्वर कर्तव्य असतांना बहु शब्द नञासारखा समजावा' असा जो हा स्वतंत्र अतिदेश केला आहे तो उत्तरपदाचा आदि उदात्त होण्याकरितां सांगितला आहे. म्हणजे आद्युदात्त प्रकरणामध्यें 'नञो जरमरमित्रमृताः' ( ६।२।११६ ) या सूत्रानें जो नञाच्या पुढील उत्तरपदाचा आदि उदात्त सांगितला आहे तो आद्युदात्त बहु शब्दाहून पर अशाही त्या उत्तरपदांना झाला पाहिजे. तेव्हां जसा तो अजरः अमरः येथे होतो तसा बहुजरः बहुमित्रः येथेंही होतो.

(सू. १७७ वा. १ ) मुख शब्दाला 'मुखं स्वाङ्गम्' ( ६।२।१६७ ) यानें सांगितलेला जो अन्तोदात्त स्वर त्यापेक्षा विप्रतिषेधानें ' उपस-

---

२. उत्तरपदार्थाचें बहुत्व दाखविणें अशा स्वरूपाचा संबंध. ' न गुणादयो० ' या सूत्रामध्यें उत्तरपदभूम्नि या पदाची अनुवृत्ति करावी म्हणजे हाच संबंध तेथें घेतां येतो.

३. नञ्सुभ्याम् ( ६।२।१७२ ) येथें बहु हा शब्द न घालतां अतिदेशसूत्र निराळें केलें आहे. म्हणून त्याचा उपयोग अन्यत्रही होतो.

१ ( सू. १७६ ) बहुव्रीहीमध्ये बहु या शब्दाच्या पुढें अवयववाचक असे गुणादि गणांतील शब्द असतील तर तो बहु शब्द नञासारखा समजूं नये. उदा०–बहुगुणा रज्जुः, बह्वक्षरं पदम्.

१ ( सू. १७७ ) बहुव्रीहीमध्यें उपसर्गाच्या पुढें असलेलें जें पर्शु शब्दाशिवाय ध्रुवस्वाङ्गवाचक उत्तरपद त्याचा अन्त उदात्त होतो उदा०–प्रोदरः. एकाद्या स्वांगाची एक प्रकारची कायमची स्थिति जेथें दाखविली असेल तेथें त्या स्वांगाला ध्रुव म्हणतात.

मित्येतद्भवति विप्रतिषेधेन । मुखान्तोदात्तत्वस्यावकाशः । दीर्घमुखः श्लक्ष्णमुखः । उपसर्गात्स्वाङ्गमित्यस्यावकाशः । प्रस्फिक् प्रोदरः । इहोभयं प्राप्नोति । प्रमुखः । उपसर्गात्स्वाङ्गमित्येतद्भवति विप्रतिषेधेन ॥ कः पुनरत्र विशेषस्तेन वा सत्यनेन वा । सापवादकः स विधिरयं पुनर्निरपवादकः । अव्ययात्तस्य प्रतिषेधोऽपवादः ॥

**[ [1]वनं समासे ॥ ६ । २ । १७८ ॥**

**[1]अन्तः ॥ ६ । २ । १७९ ॥**

**[1]अन्तश्च । ६ ॥ २ । १८० ॥**

**[1]न निविभ्याम् ॥ ६ । २ । १८१ ॥**

**[1]परेरभितो भावि मण्डलम् ॥ ६ । २ । १८२ ॥**

**[1]प्रादस्वाङ्गं संज्ञायाम् ॥ ६ । २ । १८३ ॥**

**[1]निरुदकादीनि च ॥ ६ । २ । १८४ ॥ ]**

**[1]अभेर्मुखम् ॥ ६ । २ । १८५ ॥**

**[1]अपाच्च ॥ ६ । २ १८६ ॥**

---

र्गात्स्वाङ्गम्० ' हा स्वर अगोदर होतो. उदा० ' मुखं स्वाङ्गम् ' याला गौरमुखः श्लक्ष्णमुखः येथें अवकाश आहे व '.उपसर्गात्स्वाङ्गम्० ' याला प्रोदरः प्रस्फिक् येथें अवकाश आहे. पण प्रमुखः येथें दोघांची प्राप्ति आली असतां विप्रतिषेधानें परत्वास्तव उपसर्गात्स्वाङ्गम्० हा [2]स्वर होतो.

पण प्रमुखः येथें मुखं स्वाङ्गम् यानें अन्तोदात्त स्वर झाला काय आणि ' उपसर्गात्स्वाङ्गम्० ' यानें अन्तोदात्त स्वर झाला काय त्यांत विशेष काय आहे !

मुखं स्वाङ्गम् हा विधि सापवाद आहे व प्रकृत विधि निरपवाद आहे. अव्ययाच्या पुढील मुख शब्दाला 'मुखं स्वाङ्गम्' याचा 'नाव्ययदिक्शब्द०' ( ६।२।१६८ ) यानें जो निषेध केला आहे तोच त्याचा अपवाद होय.

---

२. तेव्हां प्रमुखः येथें प्र हें अव्यय जरी आहे तरी प्रकृत सूत्रानें तेथें अन्त उदात्त होतो.

१ ( सू. १७८ ) कोणत्याही समासामध्यें उपसर्गाच्या पुढील वन शब्दाचा अन्त उदात्त होतो. उदा०–प्रवणे यष्टव्यम्.

१ ( सू. १७९ ) अन्तर् या शब्दाच्या पुढील वन शब्दाचा अन्त समासामध्यें उदात्त होतो. उदा०–अन्तर्वणो देशः.

१. ( सू. १८० ) समासामध्यें उपसर्गाच्या पुढील अन्तर् शब्दाचा अन्त उदात्त होतो. उदा०–प्रान्तः, पर्यन्तः.

१. ( सू. १८१ ) नि आणि वि यांच्या पुढील अन्तर् शब्दाचा पूर्व सूत्रानें अन्त उदात्त होत नाहीं. उदा०–न्यन्तः, व्यन्तः.

१ ( सू. १८२ ) ज्या पदार्थाचें अस्तित्व दोन्ही बाजूला आहे त्या पदार्थाचा वाचक शब्द आणि मण्डल शब्द हे जर समासामध्यें परि याच्या पुढें असतील तर त्यांचा अन्त उदात्त होतो. उदा०–परिकूलम्. हा अव्ययीभावसमास आहे. परितः कूलं यस्य असा बहुव्रीहि सुद्धां येथें घेतां येतो.

१ ( सू. १८३ ) स्वाङ्गवाचक नव्हे असें जें प्र या शब्दापुढील उत्तरपद त्याचा अन्त उदात्त होतो, तो सामासिक शब्द कोणाची तरी संज्ञा असला पाहिजे. उदा०–प्रकोष्ठम् .

१ ( सू. १८४ ) निरुदक वगैरे शब्दांचा अन्त उदात्त होतो. उदा०–निरुदकम्; निरुपलम्; निरुलपम्.

१ ( सू. १८५ ) समासामध्यें अभीच्या पुढील मुख शब्दाचा अन्त उदात्त होतो. उदा०–अभिमुखा शाला.

१ (सू. १८६ ) समासामध्यें अप शब्दाच्या पुढील मुख शब्दाचा अन्त उदात्त होतो उदा०–अपमुखः.

किमर्थमिदमुच्यते नोपसर्गात्स्वाङ्गं ध्रुवमित्येव सिद्धम् ।

**अभेर्मुखमपाच्चाध्रुवार्थम् ॥ १ ॥**

अध्रुवार्थोऽयमारम्भः ॥

**अबहुव्रीह्यर्थं वा ॥ २ ॥**

अथवा बहुव्रीहेरिति वर्तते बहुव्रीह्यर्थोऽयमारम्भः ॥

**स्फिगपूतवीणाञ्जोऽध्वकुक्षिसीरनामनाम च ॥ ६ । २ । १८७ ॥**

स्फिगपूतग्रहणं किमर्थं नोपसर्गात्स्वाङ्गं ध्रुवमित्येव सिद्धम् ।

**स्फिगपूतग्रहणं च ॥ १ ॥**

किम् । अध्रुवार्थमबहुव्रीह्यर्थमित्येव वा ॥

**[ अधेरुपरिस्थम् ॥ ६।२।१८८ ॥**

**अनोरप्रधानकनीयसी ॥ ६ । २ । १८९ ॥**

**पुरुषश्चान्वादिष्टः ॥ ६ । २ । १९० ॥ ]**

**अतेरकृत्पदे ॥ ६ । २ । १९१ ॥**

**अतेर्धातुलोपे ॥ १ ॥**

अतेर्धातुलोप इति वक्तव्यम् । अकृत्पदे

---

( सू. १८६ ) अभि व अप यांच्या पुढील मुख शब्दाला हा जो अन्तोदात्त सांगितला आहे तो कशाकरितां ? तो सांगावयास नको. कारण 'उपसर्गात्स्वाङ्गम्०' यानेंच तो सिद्ध होईल.

( वा १ ) मुखाचें ध्रुवत्व जेथें दाखवावयाचें नसेल तेथें अन्तोदात्त होण्याकरितां हें सूत्रद्वय आरंभिलें आहे.

( वा. २ ) अथवा उपसर्गात्स्वाङ्गम् येथें बहुव्रीहि–ग्रहणाची अनुवृत्ति असल्यामुळें तद्भिन्न समासस्थलींही अन्तोदात्ताकरितां हें सूत्रद्वय आरंभिलें आहे.

(सू. १८७) येथें स्फिग व पूत या शब्दांचें ग्रहण कशाकरिता केलें आहे? तें करावयास नको. 'उपसर्गात्स्वाङ्गम्०' यानेंच सिद्ध होत आहे.

( वा. १ ) स्फिग व पूत यांचें ग्रहण केलें आहे तें ध्रुवत्व नसतांनाही व बहुव्रीहि समास नसतांनाही अन्तोदात्त होण्याकरितां केलें आहे.

( सू. १९१ वा. १ ) अतेरकृत्पदे याचे ऐवजीं 'अतेर्धातुलोपे' असें सूत्र करावें. म्हणजे धातुलोप झाला असतां अति शब्दाच्या पुढील उत्तरपदाला अन्तोदात्त होईल. अकृत्पदे असें

---

१ ( सू. १८७ ) समासामध्यें उत्तरपद असे जे स्फिग, पूत, वीणा, अञ्जस्, अध्वन् व कुक्षि हे शब्द तसेच सीरवाचक शब्द आणि नामन् शब्द यांचा अन्त उदात्त होतो. उदा०–अपस्फिगम्. कटीच्या खालच्या भागाला स्फिग म्हणतात. सीर म्हणजे नांगर.

१ ( सू. १८८ ) ज्या पदार्थाची ऊर्ध्वस्थिति दाखवावयाची असेल त्या पदार्थाचा वाचक जो शब्द तो जर समासामध्यें अधि याच्या पुढें असेल तर त्याचा अन्त उदात्त होतो. उदा०–अधिदन्तः. अध्यारूढो दन्तः असा अर्थ आहे.

१ ( सू. १८९ ) अनु याच्या पुढील अप्रधानवाचक शब्द आणि कनीयस् शब्द यांचा अन्त उदात्त होतो उदा०– अनुज्येष्ठः. येथें अनुगतो ज्येष्ठम् असा विग्रह आहे. पूर्वपदार्थाला प्राधान्य असल्यामुळें ज्येष्ठ हें येथें अप्रधान आहे. अनुगतः कनीयान् अनुकनीयान्. येथें कनीयस् शब्द अप्रधानवाचक नाहीं.

१ ( सू. १९० ) अनु याच्या पुढील अन्वादिष्टवाचक जो पुरुष शब्द त्याचा अन्त उदात्त होतो. उदा०–अन्वादिष्टः पुरुषः अनुपुरुषः. वेळेवर सांगितला न जाता जो मागाहून सांगितला जातो त्याला अन्वादिष्ट म्हणतात.

१ ( सू. १९१ ) अति याच्या पुढील जो कृत्–प्रत्ययान्त–भिन्न शब्द आणि पद हा शब्द त्यांचा अन्त उदात्त होतो, उदा०– अत्यङ्कुशः नागः, अतिपदा शक्करी.

२–अत्यङ्कुशः येथें अङ्कुशमतिक्रान्तः असा अर्थ

इति ह्युच्यमान इह च प्रसज्येत शोभनो गार्ग्योऽतिगार्ग्यः इह च न स्यात् अतिकारकः अतिपदा शकरी ॥

[ नेरनिधाने ॥ ६ । २ । १९२ ॥

प्रतेरंश्वादयस्तत्पुरुषे ॥ ६ । २ । १९३ ॥

उपाद् द्व्यजजिनमगौरादयः ॥ ६ । २ । १९४ ॥

सोरवक्षेपणे ॥ ६ । २ । १९५ ॥

विभाषोत्पुच्छे ॥ ६।२।१९६ ॥ ]

द्वित्रिभ्यां पाद्दन्मूर्धसु बहुव्रीहौ ॥ ६ । २ । १९७ ॥

किमिदं द्वित्रिभ्यां मूर्धन्यकारान्तग्रहणमाहोस्विन्नकारान्तग्रहणम् । कश्चात्र विशेषः ।

**द्वित्रिभ्यां मूर्धन्यकारान्तग्रहणं चेन्नकारान्तस्योपसंख्यानम् ॥ १ ॥**

द्वित्रिभ्यां मूर्धन्यकारान्तग्रहणं चेन्नकारान्तस्योपसंख्यानं कर्तव्यम् । द्विमूर्धा त्रिमूर्धा ॥ अस्तु तर्हि नकारान्तग्रहणम् ।

**नकारान्तेऽकारान्तस्य ॥ २ ॥**

नकारान्ते ऽकारान्तस्योपसंख्यानं कर्तव्यम् । द्विमूर्धः त्रिमूर्धः ॥

---

म्हटलें तर शोभनो गार्ग्यः व अतिगार्ग्यः येथेंही होईल; आणि कारकमतिक्रान्तः अतिकारकः येथें होणार नाहीं.

( सू. १९७ ) द्वि आणि त्रि यांच्या पुढील मूर्धन् शब्दाला जो हा अन्तोदात्त सांगितला आहे तेथें अकारान्त अशा मूर्धशब्दाचें ग्रहण केलें आहे किंवा नकारान्त जो मूर्धन् शब्द त्याचें ग्रहण केलें आहे ?

या दोहोंमध्यें काय बरें फरक आहे ?

( वा. १ ) समासान्त ( ५।४।११५ ) केलेल्या अशा अकारान्त मूर्ध शब्दाचें येथें ग्रहण केलें असेल तर नकारान्त मूर्धन् शब्दाला अन्तोदात्त होण्याकरितां वचन करावें लागेल. उदा० द्विमूर्धा, त्रिमूर्धा.

तर मग नकारान्त मूर्धन् शब्दाचें येथें ग्रहण केलें आहे असे घ्यावें.

( वा. २ ) नकारान्त मूर्धन् शब्दाला अन्तोदात्त करावयाचा असें गृहीत धरलें तर समासान्त केलेल्या अशा अकारान्त मूर्ध शब्दाला अन्तोदात्त होण्याकरितां वचन करावें लागेल. जसें–द्विमूर्धः त्रिमूर्धः.

---

आहे. क्रान्त शब्दाचा प्रयोग केला नाहीं हाच येथें क्रम् धातूचा लोप होय.

१ ( सू. १९२ ) नि शब्दाच्या पुढील उत्तरपदाचा अन्त उदात्त होतो. परंतु तेथे गुप्तपणा हा अर्थ प्रतीत होत नसला पाहिजे. उदा०– निमूलम् , न्यक्षम् .

१ ( सू. १९३ ) तत्पुरुष समासामध्यें प्रति याच्या पुढील जे अंशु वगैरे शब्द त्यांचा अन्त उदात्त होतो उदा०–प्रत्यंशुः.

१ ( सू. १९४ ) तत्पुरुषसमासामध्यें उप याच्या पुढील जो दोन अच् असलेला शब्द किंवा अजिन शब्द त्याचा अन्त उदात्त होतो. पण तो शब्द गौरादिगणांतील नसला पाहिजे. उदा०– उपदेवः, उपाजिनम्.

१ ( सू. १९५ ) तत्पुरुष समासामध्यें सु याच्या पुढील उत्तरपदाचा अन्त उदात्त होतो निन्दा गम्यमान असतांना. उदा०-इह खलु भवान् सुप्रत्यवसितः. जेव्हां मात्सर्यानें हें भाषण केलें जातें तेव्हां निन्दा गम्यमान होते.

१ ( सू. १९६ ) उत्पुच्छ या तत्पुरुष समासामध्यें अन्त उदात्त विकल्पानें होतो.

१ ( सू. १९७ ) बहुव्रीहि समासामध्यें द्वि किंवा त्रि या शब्दांच्या पुढील जे पाद् दत् आणि मूर्धन् हे शब्द त्यांचा अन्त उदात्त होतो. उदा०-द्विपात्; द्विदन्; द्विमूर्धा.

## उदात्तलोपात्सिद्धम् ॥ ३ ॥

अस्तु तर्हि नकारान्तग्रहणम् ॥ अन्तोदात्तत्वे कृते लोप उदात्तनिवृत्तिस्वरेण सिद्धम् ॥ इदमिह संप्रधार्यम् । अन्तोदात्तत्वं क्रियतां लोप इति किमत्र कर्तव्यम् । परत्वाल्लोपः ॥ एवं तर्हीदमिह संप्रधार्यम् । अन्तोदात्तत्वं क्रियतां समासान्त इति किमत्र कर्तव्यम् । परत्वादन्तोदात्तत्वम् । नित्यः समासान्तः। कृतेऽप्यन्तोदात्तत्वे प्राप्नोत्यकृतेऽपि । अन्तोदात्तत्वमपि नित्यम् । अनित्यमन्तोदात्तत्वं न हि कृते समासान्ते प्राप्नोति । परत्वाल्लोपेन भवितव्यम् ॥ यस्य च लक्षणान्तरेण निमित्तं विहन्यते न तद्नित्यम् । न च समासान्त एवान्तोदात्तत्वस्य निमित्तं विहन्ति । अवश्यं लक्षणान्तरं लोपः प्रतीक्ष्यः । उभयोर्नित्ययोः परत्वादन्तोदात्तत्वम् । अन्तोदात्तत्वे कृते समासान्तष्टिलोपष्टिलोपे कृत उदात्तनिवृत्ति-

---

( वा. ३ ) नकारान्त मूर्धन् शब्दाचेंच येथें ग्रहण असूं दे. द्विमूर्धन् अ अशा स्थितींत नकारान्ताला प्रकृत सूत्रानें अन्त उदात्त केल्यानंतर[2] त्या अन् याचा लोप ( ६।४।१४४ ) झाला म्हणजे उदात्तनिवृत्तिस्वरानें ( ६।१।१६१ ) द्विमूर्ध हा अकारान्त शब्द अन्तोदात्त सिद्ध होईल.

पण येथें असा विचार करावा कीं– द्विमूर्धन् अ असें असतां प्रकृत सूत्रानें अन्तोदात्त करावा किंवा ' नस्तद्धिते ' (६।४।१४४ ) यानें टिलोप करावा ?

मग यांत काय बरें प्रथम करावें ?

पर असल्यामुळें प्रथम लोप करावा.

तर मग त्याच्याही पूर्वी निराळाच विचार उत्पन्न होतो कीं समास केल्याबरोबर प्रकृत सूत्रानें प्रथम अन्तोदात्त करावा किंवा प्रथम समासान्त–प्रत्यय ( ५।४।११५ ) करावा ?

मग यांत काय बरें करावें ?

पर असल्यामुळें प्रथम अन्तोदात्त करावा.

पण अन्तोदात्त केला तरी अथवा न केला तरी समासान्त स्वर प्राप्त होत असल्यामुळें समासान्त प्रत्यय नित्य आहे ना ?

अन्तोदात्त स्वरही पण तसाच नित्य आहे. कारण समासान्त केला किंवा न केला तरीही तो प्राप्त होत आहे.

तरी पण अन्तोदात्त स्वर अनित्य होत आहे. कारण समासान्त केला असतां तो प्राप्त होत नाहीं. अन्तोदात्तापेक्षां परत्वास्तव टिलोप प्राप्त होतो, आणि तेथें परत्वास्तव लोप होतोच.

पण लोप झाला तरी अन्तोदात्त स्वराला समासान्तापेक्षां कांहीं अनित्यत्व येऊं शकत नाहीं. कारण, ज्याच्या निमित्ताचा विघात इतर शास्त्रानें होतो तें अनित्य समजूं नये.

येथें कांहीं एकट्या समासान्तानेंच अन्तोदात्तस्वराच्या निमित्ताचा विघात होत नाहीं. तर त्या समासान्ताला अन्तोदात्ताच्या निमित्ताचा विघात करण्याविषयीं टिलोपाकडे पाहावें लागतें. एकंदरींत येथेंही नित्यत्व असल्यामुळें परत्वास्तव प्रथमतः अन्तोदात्त स्वर होईल, तो केल्यावर मग समासान्त होईल, आणि मग टिलोप होईल. टिलोप केल्यावर उदात्त–निवृत्ति–स्वरानें[4] समासान्ताला उदात्त स्वर साधत आहे.

---

२ तसेंच त्या उदात्ताच्या बरोबर शेषनिघातानें (६।१।१५८) पुढील प्रत्ययाला अनुदात्त झाल्यानंतर.

३ तेव्हां उदात्तनिवृत्तिस्वराची प्राप्ति येत नसल्यामुळें द्विमूर्ध हा अकारान्त शब्द अन्तोदात्त साधत नाहीं.

४ समासान्तप्रत्यय समासाचा अवयव असल्यामुळें ' आगम अनुदात्त होतात ' म्हणून तो अनुदात्त आहे. किंवा येथें प्रत्ययस्वर हा उत्सर्ग होत नाहीं. कारण येथें अपवादाचा विषय आहे; आणि उदात्त-

स्वरेण सिद्धम् ॥

युक्तं पुनरिदं विचारयितुम् । नन्वनेनासंदिग्धेन नकारान्तस्य ग्रहणेन भवितव्यं यावता मूर्धस्वित्युच्यते । यदि ह्यकारान्तस्य ग्रहणं स्यान्मूर्धेष्विति ब्रूयात् । सैषा समासान्तार्था विचारणा । एवं तर्हि ज्ञापयत्याचार्यो विभाषा समासान्तो भवतीति ॥

**[ सक्थं चाक्रान्तात् ॥ ६ । २ । १९८ ॥ ]**

**परादिश्छन्दसि बहुलम् ॥ ६ । २ । १९९ ॥**

अत्यल्पमिदमुच्यते ।

परादिश्च परान्तश्च पूर्वान्तश्चापि दृश्यते ।
पूर्वादयश्च दृश्यन्ते व्यत्ययो बहुलं स्मृतः ॥

**अन्तोदात्तप्रकरणे त्रिचक्रादीनां छन्दस्युपसंख्यानम् ॥ १ ॥**

अन्तोदात्तप्रकरणे त्रिचक्रादीनां छन्दस्युपसंख्यानं कर्तव्यम् । त्रिचक्रेण त्रिबन्धुरेण त्रिवृता रथेन ॥

इति श्रीभगवत्पतञ्जलिविरचिते व्याकरणमहाभाष्ये षष्ठस्याध्यायस्य द्वितीये पादे द्वितीयमाह्निकम् ॥ पादश्च समाप्तः ॥

---

पण येथें अगोदर असा विचार करणें योग्य होत आहे कीं जर येथें मूर्धसु असें म्हटलें आहे तर निःसंशय हें नकारान्त मूर्धन् शब्दाचेंच ग्रहण ठरत आहे. जर अकारान्ताचें ग्रहण असतें तर मूर्धसु असें न म्हणतां मूर्धेषु असें म्हटलें असतें.

तर हा सर्व विचार समासान्ताबद्दल केला आहे असें समजावें.

असेच असेल तर येथें नकारान्ताचा निर्देश करण्यानें आचार्य असें सुचवीत आहेत कीं समासान्त विकल्पानें होतो.

( सू. १९९ ) वेदामध्यें उत्तरपदाचा आदि उदात्त होतो हें विधान अगदींच अपुरें आहे.

( श्लो. १ ) उत्तरपदाचा आदि, उत्तरपदाचा अन्त, पूर्वपदाचा अन्त, व पूर्वपदाचा आदि असा उदात्त कोणत्याही सूत्रानें प्राप्त न झालेला वेदामध्यें दृष्टीस पडत आहे. हा सर्व स्वरव्यत्यय बहुलग्रहणानें घडून येत आहे.

( वा. १ ) त्रिचक्रादि शब्दांना वेदामध्यें अन्तोदात्त होतो असें वचन करावें. उदा० त्रिचक्रेण त्रिबन्धुरेण त्रिवृता रथेन.

याप्रमाणें श्रीभगवान् पतंजलींनीं रचिलेल्या व्याकरण महाभाष्याच्या सहाव्या अध्यायाच्या दुसऱ्या पादाचें दुसरें आन्हिक समाप्त झालें. दुसरा पादही समाप्त झाला.

---

निवृत्तिस्वरामध्यें अनुदात्त हा शब्द 'न उदात्तः यस्मिन्' अशा अर्थाचा यौगिक आहे; पारिभाषिक अर्थाचा नव्हे. तेव्हां प्रकृत सूत्रामध्यें नकारान्त मूर्धन् शब्दाचेंच ग्रहण आहे असें सिद्ध होतें.

५ कारण येथें समासान्त ( ५।४।११५ ) नित्य प्राप्त होत आहे. तेव्हां 'समासान्त न झाला तरी तेथें स्वर होण्याकरितां येथें नकारान्ताचें ग्रहण केलें आहे असें म्हणतां येत नाहीं.

१ ( सू. १९८ ) क्रान्त या शब्दाशिवाय इतर जें पूर्वपद त्याच्या पुढील सक्थ याचा अन्त उदात्त विकल्पानें होतो. उदा०–गौरसक्थः. सक्थि शब्दाच्या इकाराचा लोप ( ६।४।१४८ ) समासान्त षच् प्रत्यया–( ५।४।११२ ) मुळें झाल्यानंतर सक्थ असें होतें.

१ ( सू. १९९ ) उत्तरपदाला अन्तोदात्त वगैरे इतर स्वर प्राप्त झाले असतां वेदामध्यें कांहीं ठिकाणीं बाहुल्येकरून उत्तरपदाचा आदि उदात्त होतो. सक्थ याचाच या सूत्रानें आदि उदात्त होतो असें येथें एक मत आहे. उदा०–अञ्जिसक्थमालभेत.

## [1]अलुगुत्तरपदे ॥ ६ । ३ । १ ॥

आ कुतोऽयमधिकारः । अलुगधिकारः प्रागानङः । उत्तरपदाधिकारः प्रागङ्गाधिकारात् ॥

कानि पुनरुत्तरपदाधिकारस्य प्रयोजनानि ।

**उत्तरपदाधिकारस्य प्रयोजनं स्तोकादिभ्योऽलुगानङिकोह्रस्वनलोपाः ॥ १ ॥**

पञ्चम्याः स्तोकादिभ्यः [ ६.३.२ ] । स्तोकान्मुक्तः अल्पान्मुक्तः । उत्तरपद इति किमर्थम् । निष्क्रान्तः स्तोकान्निःस्तोकः ॥ आनङिकोह्रस्वनलोपाः प्रयोजनम् । आनङ् । होतापोतारौ । उत्तरपद इति किमर्थम् । होतापोतृभ्याम् ॥ इको ह्रस्वो ऽङ्यो गालवस्य [ ६१ ] प्रयोजनम् । ग्रामणिकुलम् । सेनानिकुलम् । उत्तरपद इति किमर्थम् । ग्रामणीः सेनानीः ॥ नलोपः प्रयोजनम् । नलोपो नञः [ ७३ ] । अब्राह्मणः अवृषलः । उत्तरपद इति किमर्थम् । परमन । नैषो ऽस्ति प्रयोगः । इदं तर्हि । नतरांगम-

---

( सू. १ ) हा अधिकार कोठपर्यंत अनुवृत्त होत आहे ?

अलुक् हा अधिकार ' आनङ् ऋतो द्वन्द्वे ' ( ६।३।२५ ) या आनङ्विधायक सूत्रापर्यंत आहे; व उत्तरपदे हा अधिकार अङ्गस्य ( ६।४।१ ) या अधिकाराच्या पूर्वी म्हणजे चालू पाद संपेपर्यंत आहे.

आतां या उत्तरपदाधिकाराची प्रयोजनें कोणतीं ?

( वा. १ ) स्तोकादिकांहून पंचमीचा अलुक्, आनङ्, इको ह्रस्वो० हा ऱ्हस्व, आणि नलोप हीं उत्तरपदाधिकाराचीं प्रयोजनें होत. उदा० स्तोकान्मुक्तः अल्पान्मुक्तः कतिपयान्मुक्तः. या उदाहरणांमध्यें ' पञ्चम्याः स्तोकादिभ्यः ' ( ६।३।२ ) या सूत्रानें पंचमीचा अलुक् झाला आहे.

पण सूत्रांत उत्तरपदे असें म्हणण्याचें प्रयोजन काय ?

निष्क्रान्तः स्तोकान्निःस्तोकः येथें उत्तरपद पुढें नसल्यामुळें स्तोक वगैरे शब्दांहून पुढील पंचमीचा अलुक् होत नाहीं.

होतापोतारौ हे उत्तरपद पुढें असतांना आनङ् झाल्याचे उदाहरण होय.

आनङ्विषयीं उत्तरपदे असें म्हणण्याचे प्रयोजन काय ?

होतापोतृभ्याम् येथें पोतृ शब्दाला आनङ् होत नाहीं ?

ग्रामणिकुलम् व सेनानिकुलम् हीं उत्तरपद पुढें असतांना ' इको ह्रस्वो० ' ( ६।३।६१ ) यानें ह्रस्व झाल्याचीं उदाहरणें होत.

या ह्रस्वाविषयीं उत्तरपदे असें म्हणण्याचें प्रयोजन काय ?

ग्रामणीः व सेनानीः येथें उत्तरपदाला ह्रस्व होत नाहीं.

अब्राह्मणः व अवृषभः हीं उत्तरपद पुढें असतांना नञाच्या नकाराचा लोप ( ६।३।७३ ) झाल्याचीं उदाहरणें होत.

या नलोपाविषयीं उत्तरपदे असें म्हणण्याचें प्रयोजन काय ?

परमन.[2]

---

१ ( सू. १ ) हें अधिकारसूत्र आहे. सूत्रांतील पदांपैकी अलुक् या पदाचा संबंध 'विभाषा स्वसृपत्योः' ( ६।३।२४ ) या सूत्रापर्यंत आहे. आणि उत्तरपदे याचा संबंध हा पाद संपेपर्यंत आहे.

२. परम शब्दाचा नञाबरोबर समास केला आहे. येथें नञाच्या पुढें उत्तरपद नसल्यामुळे नकाराचा लोप होत नाहीं.

नम् ॥

एकवच्चालुग्भवतीति वक्तव्यम् । किं प्रयोजनम् । स्तोकाभ्यां मुक्तः स्तोकेभ्यो मुक्त इति विगृह्य स्तोकान्मुक्त इत्येव यथा स्यात् ।

**एकवद्वचनमनर्थम् ॥ २ ॥**

एकवद्भावश्चानर्थकः ॥ द्विबह्वोरलुकस्मान्न भवति ।

**द्विबहुष्वसमासः ॥ ३ ॥**

द्विवचनबहुवचनान्तानामसमासः ॥ किं वक्तव्यमेतत् । न हि । कथमनुच्यमानं गंस्यते ।

**उक्तं वा ॥ ४ ॥**

किमुक्तम् । अनभिधानादिति ॥ तच्चावश्यमनभिधानमाश्रयितव्यम् ।

**एकवद्वचने हि गोषुचरे ऽतिप्रसङ्गः ॥ ५ ॥**

एकवद्वचने हि गोषुचरे ऽतिप्रसङ्गः स्यात् । गोषुचरः ।

**वर्षाभ्यश्च जे ॥ ६ ॥**

वर्षाभ्यश्च जेऽतिप्रसङ्गो भवति । वर्षासुजः ॥

**अपो योनियन्मतिषु च ॥ ७ ॥**

अपो योनियन्मतिषु चोपसंख्यानं कर्तव्यम् ॥

---

पण हा प्रयोगच लोकांत रूढ नाहीं.

तर मग नतरांगमनम्[३] हें प्रयोजन समजावें.

अलुक् झाल्यानंतर त्या प्रत्ययाचा अर्थ जी संख्या ती एकत्व संख्येसारखी समजावी.

याचें काय प्रयोजन ?

स्तोकाभ्यां मुक्तः किंवा स्तोकेभ्यो मुक्तः असा विग्रह असला तरी तेथ स्तोकान्मुक्तः असेंच झालें पाहिजे.

( वा. २ ) एकवद्भावाचें विधान अनर्थक होत आहे.

मग द्वित्व किंवा बहुत्व असतांना अलुक् कां बरें होत नाहीं ?

( वा. ३ ) द्वित्व किंवा बहुत्वाची विवक्षा असेल तर तेथें समासच मुळीं होत नाहीं.

असें अपूर्व वचन करावयाचें कीं काय ?

नाहीं.

मग द्विबहुवचनान्ताचा समास होत नाहीं हें कशावरून बरें समजावें ?

( वा. ४ ) याविषयीं सांगितलेंच आहे.

तें काय सांगितलें आहे ?

अनभिधानात् ( ३।२।१ वा. ५ ) असें सांगितलें आहे.

आणि तें अनभिधान अवश्य स्वीकारलेंच पाहिजे. नाहीं तर –

( वा. ५ ) एकवद्भावाचा अतिदेश मानला असतां 'गोषुचरः'[५] येथें गविचरः असें करण्याचा प्रसंग येईल. तसेंच –

( वा. ६ ) वर्षाशब्दाहून 'ज' शब्द पुढें असतां वर्षासुजः[६] येथें एकवद्भाव झाला असतां वर्षायांजः असें होऊं लागेल.

( वा. ७ ) योनि, यत् व मति हे शब्द पुढें असतांना अप् शब्दाहून पुढील सप्तमीचा जो

---

३. येथें नञाच्या पुढें तरप् प्रत्यय करून पुढें आम् प्रत्यय ( ५।४।११ ) केला आहे.

४. सामासिक शब्दामध्यें एकत्व हीच विशेषणाची संख्या सामान्यतः प्रतीत होते. जर तेथे द्वित्व किंवा बहुत्व विवक्षित असेल तर द्वि बहु वगैरे शब्दच उच्चारावे लागतात. उदा०--द्वैमातुरः; त्रिप्रवराः.

५. येथे सप्तमी-बहुवचन-प्रत्ययाचा अलुक् ( ६।३।१४ ) झाला आहे. उदक या अर्थाचा गो शब्द नित्यबहुवचनान्त आहे.

६. वर्षा शब्दापुढील सुप्रत्ययाचा अलुक् ( ६।३।१५ ) झाला आहे.

**जे चरे च ॥ ८ ॥**

जे चरे चातिप्रसङ्गो भवति । योनि । अप्सुयोनिः । यत् । अप्सव्यम् । मति । अप्सुमतिः । अप्सुजः । अप्सुचरो गह्वरेष्ठाः ॥

**[1]पञ्चम्याः स्तोकादिभ्यः ॥ ६ । ३ । २ ॥**

**पञ्चमीप्रकरणे ब्राह्मणाच्छंसिन उपसंख्यानं ॥ १ ॥**

पञ्चमीप्रकरणे ब्राह्मणाच्छंसिन उपसंख्यानं कर्तव्यम् । ब्राह्मणाच्छंसी ॥

**अन्यार्थे च ॥ २ ॥**

अन्यार्थे चषा पञ्चमी द्रष्टव्या । ब्राह्मणानि शंसति ब्राह्मणाच्छंसी ॥ अथवा युक्त एवात्र पञ्चम्यर्थः । ब्राह्मणेभ्यो गृहीत्वा गृहीत्वाहृत्याहृत्य शंसतीति ब्राह्मणाच्छंसी ॥

**[1]ओजःसहोम्भस्तमसस्तृतीयायाः ॥ ६ । ३ । ३ ॥**

**अञ्जस उपसंख्यानम् ॥ १ ॥**

अञ्जस उपसंख्यानं कर्तव्यम् । अञ्जसाकृतम् ॥

**पुंसानुजो जनुषान्धो विकृताक्ष इति च ॥ २ ॥**

पुंसानुजो जनुषान्धो विकृताक्ष इति चोपसंख्यानं कर्तव्यम् । पुंसानुजः । जनुषान्धो विकृताक्षः ॥

---

अलुक् होतो तेथही एकवचन होऊं लागेल. उदा०— अप्सुँयोनिः, अप्सव्यः, अप्सुमतिः.

( वा. ८ ) ज व चर हे शब्द पुढें असतानाही जो सप्तमीचा अलुक् होतो तेथेंही एकवचन होऊं लागेल. उदा०— अप्सुजः, अप्सुचरः.

( सू. २ वा. १ ) पंचमीच्या अलुक् प्रकरणामध्यें ब्राह्मणाच्छंसिन् हा शब्द घालावा. उदा०— ब्राह्मणाच्छंसी.

( वा. २ ) ब्राह्मणाच्छंसी या शब्दांतील पंचमी इतर विभक्तीच्या म्ह. द्वितीयेच्या अर्थी आहे असें समजावें. उदा०— ब्राह्मणानि शंसति ब्राह्मणाच्छंसी. किंवा येथे पंचमी आहे तीही योग्यच आहे. कारण ब्राह्मण नावाच्या ग्रंथातून घेऊन कथन करतो असा ब्राह्मणाच्छंसी याचा अर्थ आहे.

( सू. ३ वा. १ ) अञ्जस् शब्दाच्या पुढील तृतीयेचा लुक् होत नाहीं असें वचन करावें. उदा०— अञ्जसाकृतम्.

( वा. २ ) या तीन समासामध्यें तृतीयेचा लुक् होत नाहीं असेही वचन करावें. उदा०— पुंसानुजः[2], जनुषान्धः, विकृताक्षः.

---

७. उदकामध्यें आहे उत्पत्ति ज्याची या अर्थाचा व्यधिकरणबहुव्रीहि समास येथें आहे. अप्सव्यः येथें अप्सु या सप्तम्यन्ताहून यत् प्रत्यय ( ४।४।९८ ) झाला आहे.

१. ( सू. २ ) स्तोक अन्तिक व दूर या अर्थाचे शब्द आणि कृच्छ्र शब्द याच्या पुढील पंचमीचा समासामध्यें उत्तरपद पुढें असतांना लुक् होत नाहीं. उदा०-स्तोकान्मुक्तः.

२. येथें ' काढून घेऊन सांगणें ' असा असा शंस् धातूचा अर्थ आहे. जसें०-बलाहकात् विद्योतते विद्युत् येथें द्युत् धातूचा अर्थ बाहेर निघून चमकणें असा आहे व बलाहक म्ह० मेघ हा त्या बाहेर निघण्याचे अपादानकारक आहे तसेच येथें समजावें.

१. ( सू. ३ ) ओजस् सहस् अम्भस् आणि तमस् या शब्दांच्या पुढील तृतीयेचा उत्तरपद पुढें असतांना लुक् होत नाहीं. उदा०ओजसाकृतम्.

२. मुलाच्या पाठीवर झालेला जो मुलगा त्याला पुंसानुज म्हणतात. जनुषान्ध म्हणजे जन्मान्ध होय. विकृत म्हणजे एक प्रकारचा विकार, त्यानें बनलेला डोळा असा विकृताक्ष शब्दाचा अर्थ आहे.

**[ मनसः संज्ञायाम् ॥ ६ । ३ । ४ ॥ ]**

**[1]आज्ञायिनि च ॥ ६ । ३ । ५ ॥**

**आत्मनश्च पूरणे ॥ १ ॥**

आत्मनश्च पूरण उपसंख्यानं कर्तव्यम् । आत्मनापञ्चमः आत्मनादशमः ॥

**अन्यार्थे च ॥ २ ॥**

अन्यार्थे चैषा तृतीया द्रष्टव्या । आत्मा पञ्चमोऽस्यात्मनापञ्चमः ॥ अथवा युक्त एवात्र तृतीयार्थः । आत्मना कृतं तत्तस्य येनासौ पञ्चमः ॥ कथं

जनार्दनस्त्वात्मचतुर्थ एव ।

बहुव्रीहिरयम् । आत्मा चतुर्थोऽस्येति ॥

**[ [1]आत्मनश्च पूरणे ॥ ६ ।३ । ६ ॥ ]**

**[1]वैयाकरणाख्यायां चतुर्थ्याः ॥ ६ । ३ । ७ ॥**

**[1]परस्य च ॥ ६ । ३ । ८ ॥**

**आत्मनेभाषपरस्मैभाषयोरुपसंख्यानम् ॥ १ ॥**

आत्मनेभाषपरस्मैभाषयोरुपसंख्यानं कर्तव्यम् । आत्मनेभाषः परस्मैभाषः ॥ तत्कथं कर्तव्यम् । यदि व्याकरणे भवा वैयाकरणी वैयाकरण्याख्या वैयाकरणाख्या

---

( सू. ५ वा. १ ) पूरण प्रत्ययान्त उत्तरपद पुढें असतांना आत्मन् शब्दाच्या पुढील तृतीयेचा लुक् होत नाहीं असें वचन करावें. उदा०– आत्मनापञ्चमः, आत्मनादशमः.

( वा. २ ) आत्मनापञ्चमः वगैरे शब्दांतील तृतीया ही अन्यविभक्तीच्या म्ह. प्रथमेच्या अर्थीं आहे असें समजावें. तेव्हां आपणच आहे पांचवा ज्याचा तो आत्मनापञ्चम होय. असेंच आत्मनादशमः येथें समजावें. किंवा येथें तृतीयार्थही योग्यच आहे. कारण आपणच ज्याला पांचवेपणा आणिलेला आहे असा आत्मनापञ्चमः याचा अर्थ आहे.

तर मग जनार्दनस्त्वात्मचतुर्थः येथें तृतीयेचा लुक् कसा ?

आत्मा चतुर्थोऽस्य असा हा बहुव्रीहि आहे.[2]

( सू. ८ वा. १ ) आत्मनेभाष व परस्मैभाष या शब्दांमध्यें चतुर्थीचा लुक् होत नाहीं असें वचन करावें. उदा०–आत्मनेभाषः, परस्मैभाषः.

हें वचन कसें बरें करावें लागत आहे ?

जर व्याकरणे भवा वैयाकरणी, सा चासौ आख्या च वैयाकरणाख्या तस्याम्. म्हणजे व्याकरण शास्त्रानें सांगितलेली संज्ञा असा वैयाकरणाख्यायाम् याचा अर्थ गृहीत धरला तर हें वचन केले पाहिजे.[2]

---

१ ( सू. ४ ) उत्तरपद पुढें असतांना मनस् शब्दाच्या पुढील तृतीयेचा लुक् होत नाही. परंतु तो सामासिक शब्द कोणाची तरी संज्ञा असला पाहिजे. उदा०-मनसादत्ता.

१ ( सू. ५ ) आज्ञायिन् शब्द उत्तरपद पुढें असतांना मनस् या शब्दाच्या पुढील तृतीयेचा लुक् होत नाहीं. उदा०-मनसाज्ञायी.

२. आणि हा लुकाचा निषेध तत्पुरुषामध्येंच होत आहे.

१. ( सू. ६ ) हें पूर्वसूत्रावरील वार्तिक १ येथे सूत्रपाठामध्यें आलेलें आहे

१. ( सू ७ ) वैयाकरण लोकांनीं वापरलेल्या संज्ञाशब्दामध्यें आत्मन् शब्दाच्या पुढील चतुर्थीचा लुक् होत नाहीं. उदा० आत्मनेपदम् ; आत्मनेभाषः.

१ ( सू. ८ ) वैयाकरण लोकांनीं वापरलेल्या संज्ञाशब्दामध्यें पर शब्दाच्या पुढील चतुर्थीचा लुक् होत नाहीं. उदा०-परस्मैपदम् , परस्मैभाषः.

२. कारण आत्मनेभाष व परस्मैभाष ह्या संज्ञा कोणत्याही सूत्रानें सांगितलेल्या नाहीत.

वैयाकरणाख्यायामिति । अथ हि वैयाकरणानामाख्या वैयाकरणाख्या नार्थ उपसंख्यानेन ॥ यद्यपि व्याकरणे भवा वैयाकरणी वैयाकरण्याख्या वैयाकरणाख्यैवमपि नार्थ उपसंख्यानेन । वचनाद्भविष्यति । अस्ति वचने प्रयोजनम् । किम् । आत्मनेपदम् परस्मैपदमिति । निपातनादेतत्सिद्धम् । किं निपातनम् । अनुदात्तङित आत्मनेपदम् [ १. ३. १२ ] शेषात्कर्तरि परस्मैपदम् [ १. ३. ७८ ] इति ॥

**हलदन्तात्सप्तम्याः संज्ञायाम् ॥ ६ । ३ । ९ ॥**

**हृद्द्युभ्यां ङेरुपसंख्यानम् ॥ १ ॥**

हृद्द्युभ्यां ङेरुपसंख्यानं कर्तव्यम् । हृदिस्पृक् दिविस्पृक् ॥

**अन्यार्थे च ॥ २ ॥**

अन्यार्थे चैषा सप्तमी द्रष्टव्या । हृदयं स्पृशतीति हृदिस्पृक् । दिवं स्पृशतीति दिविस्पृक् ॥

**हलदन्ताधिकारे गोरुपसंख्यानम् ॥ ३ ॥**

हलदन्ताधिकारे गोरुपसंख्यानं कर्तव्यम् । गविष्ठिरः ॥ न कर्तव्यम् । लुकोऽवादेशो विप्रतिषेधेन । लुक् क्रियतामवादेश इत्यवादेशो भविष्यति विप्रतिषेधेन । अवादेशे कृते हलदन्तादित्येव सिद्धम् ॥

**लुकोऽवादेशो विप्रतिषेधेनेति चेद् भूमिपाशेऽतिप्रसङ्गः ॥ ४ ॥**

---

आतां वैयाकरणानाम् आख्या तस्याम् म्हणजे वैयाकरणांनीं वापरलेली संज्ञा असा अर्थ वैयाकरणाख्यायाम् याचा गृहीत धरला तर हें वचन करावें लागत नाहीं.

आतां व्याकरण शास्त्रामध्यें सांगितलेली संज्ञा असा अर्थ घेतला तरीही वचन करण्याची जरूर नाहीं. कारण 'वैयाकरणाख्यायां चतुर्थ्याः' या सूत्राला आत्मनेभाष व परस्मैभाष या शब्दांशिवाय दुसरें उदाहरण नसल्यामुळें आपोआपच तेथें सूत्र प्रवृत्त होईल.[१]

पण आत्मनेपद व परस्मैपद हे शब्द या सूत्राला उदाहरण मिळतात ना ?

हें सूत्र नसलें तरी 'अनुदात्तङित आत्मनेपदम्' ( १।३।१२ ) 'शेषात्कर्तरि परस्मैपदम्' ( १।३।७८ ) या निपातनांवरूनच तेथें अलुक् साधेल.

( सू. ९ वा. १ ) हृत् व दिव् या शब्दाच्या पुढील सप्तमी एकवचनाचा लुक् होत नाहीं असें वचन करावे. उदा०–हृदिस्पृक् दिविस्पृक्.

( वा. २ ) पूर्वोक्त स्थलीं द्वितीयार्थी सप्तमी समजावी. उदा०–हृदयं स्पृशतीति हृदिस्पृक्, दिवं स्पृशतीति दिविस्पृक्.

( वा. ३ ) हलन्ताहून व ऱ्हस्व अकारान्ताहून जो हा सप्तमीच्या लुकाचा निषेध केला आहे त्या प्रकरणामध्यें गो शब्दाचें ग्रहण करावें. उदा.--गविष्ठिरः.

तसें वचन करावयास नको. कारण गो–इ–स्थिर असें असतांना लुक् (२।४।७१) प्राप्त होतो व अवादेश–( ६।१।७८ ) ही प्राप्त होतो. तेथें विप्रतिषेधानें परत्वास्तव प्रथमतः अव् आदेश केला असतां 'हलदन्तात्०' यानेंच लुकाचा निषेध सिद्ध होत आहे.

---

१. कारण, आत्मनेपदी धातूला आत्मनेभाष असें आणि परस्मैपदी धातूला परस्मैभाष असें वैयाकरण लोक म्हणत असतात.

१ ( सू. ९ ) संज्ञाशब्दामध्यें उत्तरपद पुढें असताना हलन्त किंवा ऱ्हस्वअकारान्त शब्दाच्या पुढील सप्तमीचा लुक् होत नाहीं. उदा०-युधिष्ठिरः, त्वचिसारः, अरण्येतिलकाः.

लुकोऽवादेशो विप्रतिषेधेनेति चेद् भूमिपाशे ऽतिप्रसङ्गो भवति । भूम्यां पाशो भूमिपाशः ॥

**अकोऽत इति वा संध्यक्षरार्थम् ॥५॥**

एवं तर्ह्यविशेषेण सप्तम्या अलुकमुक्त्वाकोऽत इति वक्ष्यामि । तन्नियमार्थं भविष्यति । अकोऽत एव भवति नान्यत इति । तेन संध्यक्षराणां सिद्धं भवति । सिध्यति । सूत्रं तर्हि भिद्यते ॥ यथान्यासमेवास्तु । ननु चोक्तं हलदन्ताधिकारे गोरुपसंख्यानमिति । नैष दोषः । निपातनादेतत्सिद्धम् । किं निपातनम् । गविष्ठिरशब्दो बिदादिषु पठ्यते । असकृत्खल्वपि निपातनं क्रियते । गवियुधिभ्यां स्थिरः [ ८. ३. ९५ ] इति ॥

## कारनाम्नि च प्राचां हलादौ ॥ ६ । ३ । १० ॥

किमियं प्राप्ते विभाषाहोस्विदप्राप्ते । कथं च प्राप्ते कथं वाप्राप्ते । यदि संज्ञायामिति वर्तते ततः प्राप्ते । अथ निवृत्तं ततोऽप्राप्ते । कश्चात्र विशेषः ।

---

( वा. ४ ) लुकापेक्षां परत्वास्तव अव् आदेश होतो असें म्हटलें तर भूम्यां पाशो भूमिपाशः येथें दोष[२] येतो.

(वा. ५) तर मग सप्तम्याः संज्ञायाम् एवढेंच सामान्य सूत्र करून सप्तमीचा अलुक् होतो असें मोघम सांगावें. नंतर 'अकोऽतः' असें दुसरें सूत्र करावें. तें सूत्र नियमार्थ होईल. तो नियम असा– अगन्ताहून जर सप्तमीचा अलुक् होत असेल तर ह्रस्व अकारान्ताहूनच होतो. त्यामुळें गो शब्दासारख्या संध्यक्षर शेवटीं असलेल्या शब्दाच्या पुढील सप्तमीचा अलुक् पूर्वसूत्रानेंच साधेल.

अशा रीतीनें साधेल हें खरें, पण सूत्रांत बदल होत आहे ना ?

तर मग मूळचें आहे तसेंच सूत्र असूं दे. पण गो शब्दाहून सप्तमीचा अलुक् होतो असें वचन करावें लागतें असें पूर्वी म्हटलें आहे ना ?

हा दोष येत नाहीं. कारण निपातनावरून हें सिद्ध होत आहे.

तें निपातन कोणतें ?

बिदादि गणामध्यें गविष्ठिर शब्दाचा पाठ केला आहे[३]; आणखी पुनः 'गवियुधिभ्यां स्थिरः' ( ८।३।९५ ) या सूत्रामध्यें 'गवि' असें सप्तम्यन्त उच्चारिलें आहे. त्यावरूनही हें सिद्ध होईल.

(सू. १०) काय ही प्राप्तविभाषा समजावयाची किंवा अप्राप्तविभाषा ?

ही प्राप्तविभाषा कशी होते आणि अप्राप्तविभाषा कशी होते ?

जर पूर्वसूत्रांतून संज्ञाग्रहणाची अनुवृत्ति येत असेल तर ही प्राप्तविभाषा होते. आणि अनुवृत्ति येत नसेल तर अप्राप्तविभाषा होते.

पण या दोहोंत काय बरें फरक आहे ?

---

२. भूमि-इ पाश या स्थितींत लुकपेक्षां परत्वास्तव भूमि शब्दांतील इकाराला यण् ( ६।१।७७ ) होईल. आणि नतर हलन्त झाल्यामुळें सप्तमीचा लुक् होणार नाहीं.

३ तेव्हां त्यावरून गविष्ठिर शब्दामध्यें सप्तमीचा लुक् होत नाही असें सूचित होतें.

१ ( सू १० ) प्रजाजनापासून राजे लोक जो कर घेतात त्यालाच कार म्हणतात. हे कर अनेक प्रकारचे आहेत व त्यांचीं अनेक नांवें आहेत. त्या कर या अर्थाच्या संज्ञाशब्दामध्यें हलादि उत्तर पदाच्या मागील सप्तमीचा लुक् होत नाहीं. परंतु ती संज्ञा पूर्वदेशामधील असली पाहिजे. उदा०–सूपेशाणः. पूर्वदेशांतील जी संज्ञा नव्हे त्या संज्ञाशब्दामध्यें सप्तमीचा लुक् होणारच. उदा०– यूथपशुः. एकंदरींत येथें फलित विकल्प होतो.

**कारनाम्नि वावचनार्थं चेदजादावतिप्रसङ्गः ॥ १ ॥**

कारनाम्नि वावचनार्थं चेदजादावतिप्रसङ्गो भवति । इहापि प्राप्नोति । अविकट उरणो दातव्योऽविकटोरणः ॥ अस्तु तर्ह्यप्राप्ते ।

**अप्राप्ते समासविधानम् ॥ २ ॥**

यद्यप्राप्ते समासो विधेयः । प्राप्ते पुनः सति संज्ञायाम् [ २.१.४४ ] इत्येव समासः सिद्धः ॥ नैष दोषः । एतदेव ज्ञापयति भवत्यत्र समास इति यदयं कारनाम्नि सप्तम्या अलुकं शास्ति । यद्यपि तावज्ज्ञापकात्समासः स्यात्स्वरस्तु न सिध्यति । यद्धि तत्सप्तमीपूर्वपदं प्रकृतिस्वरं भवतीति लक्षणप्रतिपदोक्तयोः प्रतिपदोक्तस्यैवेत्येवं तत् । नैवात्रानेन स्वरेण भवितव्यम् । किं तर्हि । सप्तमीहारिणौ धर्म्येऽहरणे [ ६.२.६५ ] इत्यनेनात्र स्वरेण भवितव्यम् ॥ किं च भोः संज्ञा अपि वै क्रियन्ते न लोकः संज्ञासु प्रमाणम् । लोके च कारनाम संज्ञा । ननु

---

( वा. १ ) कार या अर्थाच्या संज्ञाशब्दामध्यें देशभेदानें विकल्प होण्याकरितां हें सूत्र असेल तर अजादि उत्तरपद असेल तेथें दोष यतो. उदा० अविकटे उरणो दातव्यः. अविकटोरणः.

तर मग ही अप्राप्तविभाषाच[3] असो.

पण जर अप्राप्तविभाषा म्हटली तर स्तूपेशाणः व अविकटोरणः येथें सप्तमीसमासाचें विधान करावयास पाहिज. आणि प्राप्तविभाषा म्हटली तर मात्र 'संज्ञायाम्' यानेंच समास साधत आहे.

हा दोष येत नाहीं. कारण ज्या अर्थीं हे आचार्य समासामध्यें प्रकृत सूत्रानें सप्तमीचा अलुक् सांगत आहेत त्या अर्थीं समास होतो असें ते सुचवीत आहेत.

आता जरी ज्ञापकावरून समास साधत आहे तरी तसा समास केला तर इष्ट स्वर साधत नाहीं. कारण 'तत्पुरुषे तुल्यार्थतृतीयासप्तमी०' (६।२।२) यानें सांगितलेला जो सप्तम्यन्ताला पूर्वपदप्रकृतिस्वर तो 'लक्षणप्रतिपदोक्त०' या परिभाषेनें सप्तमी शब्द उच्चारून सांगितलेला जो प्रतिपदोक्त सप्तमीतत्पुरुष तेथेंच होत असतो.

पण या ठिकाणीं जरी प्रतिपदोक्त समास झाला तरी 'तत्पुरुषे तुल्यार्थ०' हा सप्तमीपूर्वपदप्रकृतिस्वर होत नसतोच. तर 'सप्तमीहारिणौ०' (६।२।६५) हा पूर्वपदाला आद्युदात्तस्वरच येथें होतो. शिवाय, हा संज्ञा-शब्द आहे असें ठरविणें हें काम शास्त्राचें म्हणून जें तूं समजतोस त्याविषयीं लोकव्यवहार प्रमाणभूत समजावयाचा नाहीं असें कसें होईल ? आणि लोकामध्यें तर स्तूपेशाणः अविकटोरणः इत्यादि शब्द कराच्या संज्ञा समजल्या जातात.[4]

---

२ अविकट म्हणजे मेंढ्याचा समुदाय (५।२।२ वा. ३) त्यांतील उरण म्हणजे मेंढरूं. पूर्वदेशामध्यें एक विशेष प्रकारच्या कराचें 'अविकटोरण' असें नांव आहे. येथें पूर्वसूत्रानें अलुक् होऊं लागेल. उत्तरदेशामध्येंही हें कराचे नांव प्रचारांत आहे.

३ कर या अर्थाच्या संज्ञाशब्दामध्यें पूर्वसूत्रानें पूर्वविप्रतिषेधानें नित्य अलुक् होतो असें गृहीत धरलें आहे. आणि प्रकृत सूत्राचीं जीं उदाहरणें (स्तूपेशाणः इत्यादि) आणि यूथपशुः अविकटोरणः इत्यादि प्रत्युदाहरणें ते सर्व संज्ञाशब्द नव्हेत असें गृहीत धरलें आहे. परंतु तसें गृहीत धरलें तर तेथें संज्ञा नसल्यामुळें तत्पुरुष (२।१।४४) समास होणार नाहीं.

४ तेव्हा अर्थातच प्रकृत सूत्राच्या उदाहरणांमध्यें पूर्वसूत्रानें अलुक् नित्य प्राप्त असल्यामुळें तेथें देशभेदानें विकल्प होण्याकरिता हें सूत्र आहे. म्हणजे प्राप्तविभाषाही आहे असें सिद्ध झालें.

चोक्तं कारनाम्नि वावचनार्थं चेदजादावतिप्रसङ्ग इति । नैष दोषः ।

**योगविभागात्सिद्धम् ॥ ३ ॥**

योगविभागः करिष्यते । कारनाम्नि च प्राचाम् । ततो हलादौ । हलादौ च कारनाम्नि सप्तम्या अलुग्भवति । इदमिदानीं किमर्थम् । नियमार्थम् । हलादावेव कारनाम्नि नान्यत्र । क मा भूत् । अविकट उरणो दातव्योऽविकटोरणः ॥

**[१]मध्याद् गुरौ ॥ ६ । ३ । ११ ॥**

**गुरावन्ताच्च ॥ १ ॥**

गुरावन्ताच्चेति वक्तव्यम् । अन्तेगुरुः ॥

**[ [१]अमूर्धमस्तकात्स्वाङ्गादकामे ॥ ६ । ३ । १२ ॥ ]**

**[१]बन्धे च विभाषा ॥ ६ ।३। १३॥**

स्वाङ्गग्रहणमनुवर्तत उताहो न । किं चातः । यद्यनुवर्तते सिद्धं हस्तेबन्धः हस्तबन्धः चक्रेबन्धः चक्रबन्ध इति न सिध्यति । अथ निवृत्तं सिद्धं चक्रेबन्धः चक्रबन्धः हस्तेबन्धः हस्तबन्ध इति न सिध्यति । किं

---

पण कारनामस्थलीं विकल्पाकरितां हें सूत्र आहे असें म्हटलें तर अविकटोरणः येथें दोष येतो असें पूर्वी म्हटलें आहे ना ?

हा दोष येत नाहीं. कारण—

( वा. ३ ) योगविभाग करण्यांत येईल. तो असा– 'कारनाम्नि च प्राचाम्' हें एक सूत्र होईल व दुसरें 'हलादौ' हें सूत्र होईल. हलादि-उत्तरपद पुढें असतांना कराच्या नांवामध्यें सप्तमीचा अलुक् होतो असा त्या दुसऱ्या सूत्राचा अर्थ होईल.

तेथे पूर्वसूत्रानेंच सिद्धि होत असता हे सूत्र कशाकरितां ?

हें सूत्र नियमार्थ आहे. तो नियम असा–कारनामस्थलीं जर अलुक् करणें असेल तर हलादि असाच कारनामस्थलीं करावा, अन्यत्र करूं नये.

तें अन्य ठिकाण कोणतें ?

अविकटे उरणो दातव्यः अविकटोरणः.

( सू. ११ वा. १ ) गुरुशब्द उत्तरपद पुढें असतांना अन्त शब्दाच्या पुढील सप्तमीचा अलुक् होतो असें वचन करावें. जसें—अन्तेगुरुः.

(सू. १३) येथें पूर्व सूत्रांतून स्वाङ्गग्रहणाची अनुवृत्ति आहे किंवा नाहीं ?

मग या दोहोंत फरक काय ?

जर स्वाङ्गग्रहण अनुवृत्त असेल तर हस्ते बन्धः हस्तबन्ध हें साधत आहे. पण चक्रे बन्धः चक्रबन्धः हें साधत न[२]ाहीं. आता स्वाङ्गग्रहण निवृत्त असेल तर चक्रे बन्धः चक्रबन्धः हें साधतें. पण हस्ते बन्धः हस्तबन्धः हें साधत न[३]ाहीं.

काय कारण ?

---

१ (सू. ११ ) गुरु शब्द उत्तरपद पुढें असतांना मध्य शब्दाच्या पुढील सप्तमीचा लुक् होत नाही. उदा०–मध्येगुरुः.

१ (सू. १२ ) मूर्धन् आणि मस्तक यांशिवाय इतर पूर्वपदाच्या पुढील सप्तमीचा लुक् होत नाहीं, कामशब्दाशिवाय उत्तरपद पुढें असतांना. उदा०–कण्ठे कालोऽस्य कण्ठेकालः.

१ ( सू. १३ ) बन्धशब्द उत्तरपद पुढें असतांना हलन्त किंवा ऱ्हस्व अकारान्त पूर्वपदाच्या पुढील सप्तमीचा अलुक् विकल्पानें होतो. उदा०–हस्तेबन्धः हस्तबन्धः; चक्रेबन्धः चक्रबन्धः.

२ कारण येथें बन्ध् धातूपासून साधित असें नाम पुढें असल्यामुळें अलुकाचा नित्य निषेध ( ३।३।१९ ) होऊं लागेल, विकल्प होणार नाहीं. विकल्पाला चारितार्थ्य हस्तेबन्धः हस्तबन्धः येथें त्या निषेधाचा बाध करून मिळतें.

३ हा विकल्प आणि पुढील (६।३।१९) निषेध यांच्या विषयविभागाकरितां अशी कल्पना होईल कीं

कारणम् । नेन्सिद्धबध्नातिषु [ ६.३.१९ ] इति प्रतिषेधः प्राप्नोति ॥ नैष दोषः । सर्वत्रैवात्रोत्तरपदाधिकारे तत्पुरुषे कृति बहुलम् [ १४ ] इति प्राप्ते नेन्सिद्धबध्नातिष्विति प्रतिषेध उच्यते । तस्मिन्नित्ये प्राप्त इयं विभाषारभ्यते ॥ एवमपि न ज्ञायते कस्मिन्विषये विभाषा कस्मिन्प्रतिषेध इति । घञन्तस्येदं बन्धशब्दस्य ग्रहणं प्रतिषेधे पुनर्धातुग्रहणम् । घञन्ते विभाषान्यत्र प्रतिषेधः॥

**तत्पुरुषे कृति बहुलम् ॥ ६ । ३ । १४ ॥**

**तत्पुरुषे कृति बहुलमकर्मधारये ॥१॥**

तत्पुरुषे कृति बहुलमित्यत्राकर्मधारय इति वक्तव्यम् । इह मा भूत् । परमे कारके परमकारक इति ॥ तत्तर्हि वक्तव्यम् । न वक्तव्यम् । बहुलवचनान्न भविष्यति ॥

अथ किमर्थं लुगलुगनुक्रमणं क्रियते न तत्पुरुषे कृति बहुलमित्येव सिद्धम् ।

**लुगलुगनुक्रमणं बहुलवचनस्याकृत्स्नत्वात् ॥ २ ॥**

लुगलुगनुक्रमणं क्रियतेऽकृत्स्नं बहुलवचनमिति ॥ यद्यकृत्स्नं यदनेन कृतमकृतं तत् । एवं तर्हि न ब्रूमोऽकृत्स्नमिति ।

---

कारण असें कीं– तेथें 'नेन्सिद्धबध्नातिषु च' ( ६।३।१९ ) हा निषेध प्राप्त होत आहे.

हा दोष येत नाहीं. कारण चक्रबन्धनम् इत्यादि सर्व स्थलीं बन्धधातुसाधित उत्तरपद पुढें असतांना 'तत्पुरुषे०' या पुढील सूत्रानें अलुक् प्राप्त होत असतां 'नेन्सिद्धबध्नाति०" हा निषेध आरंभिला आहे; व तो निषेध अवश्य प्राप्त असतां ही विभाषा आरंभिली आहे.

तरी पण हा निषेध कोठें आणि विकल्प कोठें हें समजलें जात नाहीं. प्रकृत सूत्रामध्यें घञन्त असा बन्ध शब्द उच्चारला आहे. आणि 'नेन्सिद्ध०' या निषेधसूत्रामध्यें केवळ बध्नाति धातु उच्चारला आहे. तेव्हां घञन्त स्थलीं विभाषा व अन्य ठिकाणीं निषेध होतो.

( सू. १४ वा. १ ) तत्पुरुषे कृति० या सूत्रामध्यें अकर्मधारये असें म्हणावें म्हणजे कर्मधारयभिन्न तत्पुरुषामध्यें अलुक् होतो असें सांगावें. कारण, परमे कारके परमकारके येथें अलुक् न झाला पाहिजे.

तर मग अकर्मधारये असें सूत्रांत म्हटलें पाहिजे.

तसें म्हणावयास नको. कारण, क्वचित् अप्रवृत्ति असाही बहुलवचनाचा अर्थ असल्यामुळें तेथें अलुक् होणार नाहीं.

आतां समासामध्यें लुक् व अलुक् यांचें विधान कशाकरितां केलें आहे ? तें करावयास नको. कारण ' तत्पुरुषे कृति बहुलम् ' या बहुलग्रहणानेंच तें साधत आहे.

( वा. २ ) बहुलग्रहणामध्यें आम्हांला इष्ट असलेलें सर्व कार्य करण्याची सक्ती नसल्यामुळें लुक् आणि अलुक् या दोहोंचेंही विधान केलें आहे.

पण बहुलग्रहण जर अपरिपूर्ण असेल तर या सूत्रानें केलेलें कार्यही न केल्यासारखें होईल.

बहुलग्रहण अपरिपूर्ण आहे असें आम्ही

---

स्वाङ्गवाचक पूर्वपद असेल तर तेथें पूर्वसूत्रानें नित्य अलुक् आणि प्रकृतसूत्रानें विकल्पानें अलुक् प्राप्त झाला असतां तेथें दोघांचाही बाध करून निषेध होऊं लागेल आणि स्वाङ्ग नसेल तेथें विकल्प होईल.

४ तेव्हां अर्थातच या प्रकृत विकल्पानें हस्तेबन्धः हस्तबन्धः येथेंही निषेधाचा बाध होऊन इष्ट साधेल.

१ ( सू. १४ ) तत्पुरुष समासामध्यें कृत्-प्रत्ययान्त उत्तरपद पुढें असतांना सप्तमीचा अलुक् बाहुल्येकरून होतो. उदा०–स्तम्बेरमः. बहुलग्रहणामुळें कुरुचरः येथें लुकच होतो.

कृत्स्नं च कारकं च साधकं च निर्वर्तकं च । यदनेन कृतं सुकृतं तत् । किमर्थं तर्हि लुगलुगनुक्रमणं क्रियते । उदाहरणभूयस्त्वात् । ते वै खल्वपि विधयः सुपरिगृहीता भवन्ति येषां लक्षणं प्रपञ्चश्च । केवलं लक्षणं केवलः प्रपञ्चो वा न तथा कारकं भवति ॥ अवश्यं खल्वप्यस्माभिरिदं वक्तव्यं बहुलम् अन्यतरस्याम् उभयथा एकेषामिति । सर्ववेदपारिषदं हीदं शास्त्रम् । तत्र नैकः पन्थाः शक्य आस्थातुम् ॥

[ [1]प्रावृट्शरत्कालदिवां जे ॥ ६ । ३ । १५ ॥
[1]विभाषा वर्षक्षरशरवरात् ॥ ६ । ३ । १६ ॥
[1]घकालतनेषु कालनाम्नः ॥ ६ । ३ । १७ ॥
[1]शयवासवासिष्वकालात् ॥ ६ । ३ । १८ ॥
[1]नेन्सिद्धबध्नातिषु च ॥ ६ । ३ । १९ ॥

म्हणत नाहीं. तर तें पूर्ण आहे, कारक आहे, साधक आहे, व निर्वर्तकही आहे असें म्हणतो. त्यामुळें त्यानें जें कार्य केलें जातें तें भरपूर केल्यासारखें होतें.

तर मग लुक् व अलुक् या दोघांचें विधान कशाकरितां केलें आहे ?

उदाहरणें पुष्कळशीं आहेत म्हणून. कारण, तेच विधी खुलासेवार कळले जातात कीं ज्यांचें मोघम लक्षण सांगून पुनः तपशील सांगितला जातो. आणि ज्यांचें केवळ मोघम लक्षणच सांगितलें जातें किंवा तपशीलच सांगितला जातो ते विधी तितके खुलासेवार कळत नाहींत. शिवाय, आम्हाला बहुलम्, अन्यतरस्याम्, उभयथा, एकेषाम्, असें मोघम सांगितलेंच पाहिजे. कारण, निरनिराळ्या वेदांचें अध्ययन करणारे जे लोक त्या सर्वांकरितां हें व्याकरणशास्त्र आहे. तेथें एकाच मार्गाचें अवलंबन करणें शक्य नाहीं.

२ तेव्हां मनुष्याला त्या उदाहरणांचें बरोबर आकलन होणें कठीण आहे.

३ प्रत्येक वेदाचीं शाखाभेदानें प्रातिशाख्यें निरनिराळीं आहेत. तथापि, वेदाध्ययन करणाऱ्या सर्व शाखांच्या लोकांना साधारण उपयोगीं पडणारें असें हे व्याकरणशास्त्रच आहे. तेव्हां तेथें सामान्य नियमानें काम भागणार नाहीं व अनंत वेद असल्यामुळें प्रत्येक शब्दाचें व्याकरण करणें अशक्य आहे. तेव्हां बऱ्याच उदाहरणांना लागू पडणारे असे सामान्य नियम सांगून त्यांत एकेषाम्, बहुलम्, अशा पदांनीं थोडी सवड ठेवणें हाच मार्ग दिसतो व पाणिनि आचार्यांनीं याच मार्गाचें अवलंबन केलें आहे.

१ ( सू. १५ ) प्रावृष्, शरद्, काल आणि दिव् या शब्दांच्या पुढील सप्तमीचा लुक् होत नाहीं 'ज' शब्द उत्तरपद पुढें असतांना. उदा०— प्रावृषिजः.

१ ( सू. १६ ) वर्ष, क्षर, शर आणि वर या शब्दांच्या पुढील सप्तमीचा लुक् विकल्पानें होतो 'ज' शब्द उत्तरपद पुढें असतांना. उदा०— वर्षेजः, वर्षजः.

१ ( सू. १७ ) घसंज्ञक प्रत्यय ( १।१।२२ ) काल शब्द आणि तन प्रत्यय ( ४।३।२३ ) पुढें असतांना कालवाचक शब्दांच्या पुढील सप्तमीचा लुक् विकल्पानें होतो. उदा०— पूर्वाह्णेतरे, पूर्वाह्णतरे.

१ ( सू. १८ ) शय, वास आणि वासिन् हे शब्द उत्तरपद पुढें असतांना कालवाचकापेक्षां निराळ्या शब्दाच्या पुढील सप्तमीचा लुक् विकल्पानें होतो. उदा०— खेशयः, खशयः.

१ ( सू. १९ ) इन्-प्रत्ययान्त शब्द, सिद्ध हा शब्द आणि बन्ध् धातूपासून साधिलेले शब्द हे पुढें असतांना सप्तमीचा अलुक् होत नाहीं. उदा०—स्थण्डिलशायी.

**[स्थे च भाषायाम् ॥ ६ । ३ । २० ॥ ]**

**षष्ठ्या आक्रोशे ॥ ६ । ३ । २१ ॥**

**षष्ठीप्रकरणे वाग्दिक्पश्यद्भ्यो युक्तिदण्डहरेषूपसंख्यानम् ॥ १ ॥**

षष्ठीप्रकरणे वाग्दिक्पश्यद्भ्यो युक्तिदण्डहरेषूपसंख्यानं कर्तव्यम् । वाचोयुक्तिः दिशोदण्डः पश्यतोहरः ॥

**आमुष्यायणामुष्यपुत्रिकेत्युपसंख्यानम् ॥ २ ॥**

आमुष्यायणामुष्यपुत्रिकेत्युपसंख्यानं कर्तव्यम् । आमुष्यायणः आमुष्यपुत्रिका ॥ आमुष्यकुलिकेति च वक्तव्यम् । आमुष्यकुलिका ॥

**देवानांप्रिय इति च ॥ ३ ॥**

देवानांप्रिय इति चोपसंख्यानं कर्तव्यम् । देवानांप्रियः ॥

**शेपपुच्छलाङ्गूलेषु शुनः संज्ञायाम् ॥ ४ ॥**

शेपपुच्छलाङ्गूलेषु शुनः संज्ञायामुपसंख्यानं कर्तव्यम् । शुनःशेपः शुनःपुच्छः शुनोलाङ्गूलः ॥

**दिवश्च दासे ॥ ५ ॥**

दिवश्च दास उपसंख्यानं कर्तव्यम् । दिवोदासाय गायत ॥

**[ पुत्रेऽन्यतरस्याम् ॥ ६ । ३ । २२ ॥ ]**

**ऋतो विद्यायोनिसंबन्धेभ्यः ॥ ६ । ३ । २३ ॥**

**विद्यायोनिसंबन्धेभ्यस्तत्पूर्वपदोत्तरपदग्रहणम् ॥ १ ॥**

---

(सू. २१ वा. १) षष्ठीच्या या अलुक् प्रकरणामध्यें वाच् दिश् आणि पश्यत् या शब्दांहून क्रमानें युक्ति, दण्ड व हर हे शब्द उत्तरपद पुढें असतांना षष्ठीचा अलुक् होतो असें वचन करावें. उदा० वाचोयुक्तिः, दिशोदण्डः, पश्यतोहरः.

(वा. २) आमुष्यायण आणि आमुष्यपुत्रिका या शब्दांमध्यें षष्ठीचा अलुक् होतो असें वचन करावें. उदा०— अमुष्यापत्यम् आमुष्यायणः, अमुष्य पुत्रस्य भावः आमुष्यपुत्रिका.

आमुष्यकुलिका याही शब्दामध्यें षष्ठीचा अलुक् होतो. उदा० आमुष्यकुलिका.

(वा. ३) देवानांप्रियः या शब्दामध्येंही षष्ठीचा अलुक् होतो असें वचन करावें. उदा०— देवानांप्रियः.

(वा. ४) शेप, पुच्छ आणि लाङ्गूल हे शब्द उत्तरपद पुढें असतांना श्वन् शब्दाच्या पुढील षष्ठीचा संज्ञा अर्थ असतांना अलुक् होतो असें वचन करावें. शुनःशेपः, शुनःपुच्छः, शुनोलाङ्गूलः.

(वा. ५) दास शब्द उत्तरपद पुढें असतांना दिव् शब्दाच्या पुढील षष्ठीचा अलुक् होतो असें वचन करावें. उदा०— दिवोदासाय गायत.

---

१ (सू. २०) स्थ शब्द उत्तरपद पुढें असतांना लौकिक प्रयोगामध्यें सप्तमीचा अलुक् होत नाही. उदा०— समस्थः.

१ (सू. २१) उत्तरपद पुढें असतांना आणि निन्दा गम्यमान असतांना षष्ठीचा अलुक् होतो. उदा०— चोरस्यकुलम्.

१ (सू. २२) पुत्र शब्द उत्तरपद पुढें असतांना आणि निन्दा गम्यमान असतांना षष्ठीचा अलुक् विकल्पानें होतो. उदा०— दास्याःपुत्रः, दासीपुत्रः.

१ (सू. २३) विद्यासंबन्धदर्शक किंवा योनिसंबन्धदर्शक जें ऱ्हस्व-ऋकारान्त पूर्वपद त्याच्यापुढील षष्ठीचा अलुक् होतो. उदा०— होतुरन्तेवासी, होतुःपुत्रः; पितुरन्तेवासी, पितुःपुत्रः.

विद्यायोनिसंबन्धेभ्यस्तत्पूर्वपदोत्तरपदग्रहणं कर्तव्यम् । विद्यासंबन्धेभ्यो विद्यासंबन्धेषु यथा स्यात् । योनिसंबन्धेभ्यो योनिसंबन्धेषु यथा स्यात् । व्यतिकरो मा भूत् ॥ अथैषां व्यतिकरेण भवितव्यम् । बाढं भवितव्यम् । होतुःपुत्रः पितुरन्तेवासी ॥

[ विभाषा स्वसृपत्योः ॥ ६ । ३ । २४ ॥ ]

आनङृतो द्वन्द्वे ॥ ६ । ३ । २५ ॥

क्वायं नकारः श्रूयते । न क्वचिच्छ्रूयते लोपोऽस्य भवति नलोपः प्रातिपदिकान्तस्य [ ८. २. ७ ] इति । यदि न श्रूयते किमर्थमुच्चार्यते । रपरत्वं मा भूदिति ॥ क्रियमाणेऽपि वै नकारे रपरत्वं प्राप्नोति । किं कारणम् । नलोपे कृत एषो ऽपि ह्युः स्थाने ऽणिशिष्यते । नैष दोषः । उः स्थाने ऽण्प्रसज्यमान एव रपरो भवतीत्युच्यते न चायमुः स्थाने ऽणेव शिष्यते । किं तर्हि । अण्चानण्च ॥

कथं पुनरिदं विज्ञायते । ऋकारान्तानां

---

( सू. २३ वा. १ ) येथें पूर्वपद आणि उत्तरपद हे दोन्ही शब्द विद्यासंबंधदर्शक किंवा योनिसंबंधदर्शक असले पाहिजेत असें वचन करावें. कारण विद्यासंबंधवाचकाहून विद्यासंबंधवाचक पुढें असतांना, तसेंच योनिसंबंधवाचकाहून योनिसंबंधवाचक पुढें असतांना अलुक् व्हावा; एक पद विद्यासंबंधवाचक आणि एक पद योनिसंबंधवाचक असें मिश्रण असतांना न व्हावा.

तर मग आतां तसें मिश्रण असलें तर तेथें अलुक् होऊं नये काय ?

नाहीं. अवश्य व्हावा. उदा० होतुःपुत्रः पितुरन्तेवासी.[2]

( सू. २५ ) आनङ् यांतील नकाराचें कोठें बरें श्रवण होतें ?

कोठेंहीं श्रवण होत नाहीं. कारण, 'नलोपः प्रातिपदिकान्तस्य०' ( ८।२।७ ) यानें त्या नकाराचा लोप होतो.

पण जर कोठेंच श्रवण होत नाहीं, तर मग हा नकार लाविला तरी कशाला ?

अनङ् हा रपर ( १।१।५१ ) होऊं नये म्हणून लाविला आहे.

पण नकार लाविला असतांही रपरत्व प्राप्त होत आहेच.

काय कारण ?

कारण असें कीं नलोप केला असतां हा आनङ्ही ऋकाराच्या स्थानीं अण् होत आहे.

हा दोष येत नाहीं. कारण 'ऋकाराचें स्थानीं जो अण् तो प्रसंगावस्थेंतच रपर होतो' असें सांगितलें आहे; आणि हा तर ऋकाराचे स्थानीं केवळ अणच सांगितला नाहीं; तर अण् व अनण् असा आन् हा समुदाय सांगितला आहे.

आतां येथें ऋकारान्तांच्या द्वंद्वामध्यें आनङ् होतो असें समजावयाचें किंवा द्वंद्वामध्यें

---

२ या वार्तिकाचा उपयोग फक्त 'ज्या ठिकाणी विद्यासंबंधदर्शक आणि योनिसंबंधर्शक या दोहोंशिवाय तिसऱ्या प्रकारचा शब्द असेल तेथें अलुक् होत नाहीं' हा होय. उदा०- होतृधनम्; पितृगृहम्.

१. ( सू. २४ ) विद्यासंबंधदर्शक किंवा योनिसंबंधदर्शक असें जें ऱ्हस्वऋकारान्त पूर्वपद त्याच्या पुढील षष्ठीचा अलुक् विकल्पानें होतो स्वसृ किंवा पति हे शब्द उत्तरपद पुढें असतांना. उदा०- मातुःष्वसा मातुःस्वसा ( ८।३।८५ ) मातृष्वसा.

१. (सू. २५) विद्यासंबंधदर्शक किंवा योनिसंबंधदर्शक जें ऱ्हस्वऋकारान्त पूर्वपद त्यांतील शेवटच्या ऋकाराला आनङ् असा आदेश होतो द्वंद्व समासामध्यें उत्तरपद पुढें असतांना. उदा०- होतापोतारौ; मातापितरौ.

यो द्वन्द्वः । आहोस्विद् द्वन्द्व ऋकारस्येति । कश्चात्र विशेषः ।

**ऋकारान्तानां द्वन्द्वे पुत्र उपसंख्यानम् ॥ १ ॥**

ऋकारान्तानां द्वन्द्वे पुत्र उपसंख्यानं कर्तव्यम् । पितापुत्रौ । ॥

**कार्यी चानिर्दिष्टः ॥ २ ॥**

कार्यी चानिर्दिष्टो भवति । ऋकारान्तानां द्वन्द्वे न ज्ञायते कस्यानङ्भवितव्यमिति ॥ अस्तु तर्हि द्वन्द्व ऋकारस्येति ।

**अविशेषेण पितृपितामहादिष्वतिप्रसङ्गः ॥ ३ ॥**

अविशेषेण पितृपितामहादिष्वतिप्रसङ्गो भवति । पितृपितामहाविति ॥ अस्तु तर्ह्यृकारान्तानां यो द्वन्द्व इति । ननु चोक्तमृकारान्तानां द्वन्द्वे पुत्र उपसंख्यानमिति । नैष दोषः । पुत्रग्रहणमपि प्रकृतमनुवर्तते । क्व प्रकृतम् । पुत्रेऽन्यतरस्याम् [ २२ ] इति । यदि तदनुवर्तते विभाषा स्वसृपत्योः [२४] पुत्रे चेति पुत्रेऽपि विभाषा प्राप्नोति । नैष दोषः । संबन्धमनुवर्तिष्यते । षष्ठ्या आक्रोशे [२१] पुत्रेऽन्यतरस्याम् [२२] षष्ठ्या आक्रोशे । ऋतो विद्यायोनिसंबन्धेभ्यः [२३] पुत्रेऽन्यतरस्यां षष्ठ्या आक्रोशे । विभाषा स्वसृपत्योः [ २४ ] पुत्रेऽन्यतरस्यां षष्ठ्या आक्रोशे । आनङृतो द्वन्द्वे । पुत्र-

---

ऋकारान्ताला आनङ् होतो असें समजावयाचें ?

यांत काय बरें फरक होतो ?

( वा. १ ) ऋकारान्तांच्या द्वंद्वामध्यें असें गृहीत धरलें तर पितापुत्रौ येथें पुत्र शब्द पुढें असतांना आनङाचें विधान करावें लागेल.

( वा. २ ) आणि यांत उद्देश्याचा निर्देश केला नाहीं असें होतें. कारण ऋकारान्तांच्या द्वंद्वामध्यें कोणाला आनङ् करावयाचा तें कळत नाहीं.

तर मग ‘ द्वंद्वामध्यें ऋकारान्ताला आनङ् होतो ’ हाच पक्ष असो.

( वा. ३ ) अमुक प्रकारचा द्वंद्व पाहिजे असा विशेष न ठेवतां द्वंद्वामध्यें असें मोघमच म्हटलें तर पितृपितामहौ, मातृमातामहौ इत्यादिस्थलीं आनङ् होऊं लागेल.

तर मग ‘ ऋकारान्तांच्या द्वंद्वामध्यें ’ हाच पक्ष असो.

पण ऋकारान्तांच्या द्वंद्वामध्यें आनङ् होतो असें म्हटलें तर पितापुत्रौ येथें आनङाचा विधि स्वतंत्र करावा लागेल असा दोष पूर्वी दिला आहे ना ?

हा दोष येत नाहीं. कारण, मागून पुत्रग्रहणाचीही अनुवृत्ति येत आहे. त्यामुळें पुत्र शब्द पुढे असतांना स्वतंत्रच आनङाचें विधान होत आहे.

मागें कोठें बरें पुत्र शब्द आहे ?

‘ पुत्रेऽन्यतरस्याम् ’ ( ६।३।२२ ) येथें आहे.

जर तें पुत्र पद अनुवृत्त होत आहे तर ‘विभाषा स्वसृपत्योः ’ ( ६।३।२४ ) या मधल्या सूत्रामध्यें त्याचा संबंध अवश्य होणार असल्यामुळें पुत्र शब्द पुढें असतांही विकल्पानें अलुक् प्राप्त होतो.

हा दोष येत नाहीं. कारण संबद्ध अशा पुत्रग्रहणाची अनुवृत्ति केली जात आहे. ती अशी— ‘ पुत्रेऽन्यतरस्याम् ’ येथें ‘ षष्ठ्या आक्रोशे ’ याची अनुवृत्ति आहे; व पुढेंही ‘ ऋतो विद्यायोनि० ’ येथें ‘पुत्रेऽन्यतरस्याम्’ व ‘षष्ठ्या आक्रोशे’ हें स्वतंत्र रीतीनें संबद्ध झालेलें सूत्रद्वय अनुवृत्त होतें. त्याचे पुढें ‘ विभाषा स्वसृपत्योः ’ येथेंही ‘ पुत्रेऽन्यतरस्याम् षष्ठ्या आक्रोशे ’ असें संबद्ध सूत्रद्वय अनुवृत्त आहे. त्याच्या पुढें आनङ् ऋतो द्वन्द्वे येथें फक्त पुत्रग्रहण अनुवृत्त होतें,

ग्रहणमनुवर्तते षष्ठ्या आक्रोश इति निवृत्तम् ॥ यदप्युच्यते कार्यी चानिर्दिष्ट इति कार्यी च निर्दिष्टः । कथम् । उत्तरपद इति वर्तते । ङिच्चायं क्रियते । सोऽन्तरेणापि कार्यिनिर्देशमृकारस्यैव भविष्यति ॥ पुत्रे तर्हि कार्य्यनिर्दिष्टः । पुत्रे च कार्यी निर्दिष्टः । कथम् । ऋकारग्रहणमपि प्रकृतमनुववर्तते । क्व प्रकृतम् । ऋतो विद्यायोनिसंबन्धेभ्य इति । तद्वै पञ्चमीनिर्दिष्टं षष्ठीनिर्दिष्टेन चेहार्थः । पुत्र इत्येषा सप्तम्यृत इति पञ्चम्याः षष्ठीं प्रकल्पयिष्यति तस्मिन्निति निर्दिष्टे पूर्वस्य [ १.१.६६ ] इति ॥

## देवताद्वन्द्वे च ॥ ६ । ३ । २६ ॥

### देवताद्वन्द्व उभयत्र वायोः प्रतिषेधः ॥ १ ॥

देवताद्वन्द्व उभयत्र वायोः प्रतिषेधो वक्तव्यः । वाय्वग्नी अग्निवायू ॥

### ब्रह्मप्रजापत्यादीनां च ॥ २ ॥

ब्रह्मप्रजापत्यादीनां च प्रतिषेधो वक्तव्यः । ब्रह्मप्रजापती शिववैश्रवणौ स्कन्दविशाखौ ॥ तत्तर्हि वक्तव्यम् । न वक्तव्यम् । द्वन्द्व इति वर्तमाने पुनर्द्वन्द्वग्रहणस्यैतत्प्रयोजनं लोकवेदयोर्यो द्वन्द्वस्तत्र यथा स्यात् । कश्च लोकवेदयोर्द्वन्द्वः । वेदे ये

---

आणि षष्ठ्या आक्रोशे हें निवृत्त होतें.

आता 'ऋकारान्तांचा द्वंद्व' या पक्षीं उद्देश्याचा उल्लेख होत नाहीं असें जें म्हटलें आहे त्यावर उत्तर– उद्देश्यही निर्दिष्ट होत आहे.

तें कसें ?

उत्तरपदे हें अनुवृत्त आहे व आनङ् हा ङित् केला आहे. तेव्हां उद्देश्याचा निर्देश नसला तरीही ऋकारान्तालाच आनङ् होईल.

तरी पण पुत्र शब्द पुढें असतांना स्वतंत्र सांगितलेल्या आनङाचें उद्देश्य निर्दिष्ट नाहीं.

तेथेंही उद्देश्य निर्दिष्ट होत आहे.

तें कसें ?

मागून ऋकारग्रहणही अनुवृत्त होत आहे.

तें मागें कोठेंसे आहे ?

'ऋतो विद्यायोनि०' येथें आहे.

तें तर तेथें पञ्चमी विभक्ती लावून उच्चारिलें आहे. आणि येथें तर षष्ठी विभक्ति लाविलेलें असें जरूर आहे.

पुत्रे ही सप्तमी 'तस्मिन्निति०' (१।१।६६) या परिभाषेच्या साहाय्यानें ऋतः या पंचमीच्या ऐवजीं षष्ठीची कल्पना करील.

( सू. २६ वा. १ ) देवतावाचकांच्या द्वंद्वामध्यें वायुशब्द पूर्वपद असो किंवा उत्तरपद असो तेथें आनङ् होत नाहीं असें वचन करावें. जसें– अग्निवायू, वाय्वग्नी.

( वा. २ ) ब्रह्मप्रजापती वगैरे जे देवतावाचकांचे द्वंद्व समास तेथेंही आनङ् होत नाहीं असें वचन करावें. उदा०– ब्रह्मप्रजापती; शिववैश्रवणौ; स्कन्दविशाखौ.

तर मग तें प्रतिषेधवचन करावयास पाहिजे.

करावयास नको. कारण, पूर्वसूत्रांतून द्वंद्वग्रहणाची अनुवृत्ति येत असतांना पुनः येथें द्वंद्वग्रहण करण्याचें असें प्रयोजन आहे कीं– जो देवतावाचकांचा द्वंद्व लोकामध्यें आणि वेदामध्येंही प्रसिद्ध आहे तेथेंच आनङ् व्हावा.

कोणता देवतावाचकांचा द्वंद्व लोक आणि वेद या दोन्ही ठिकाणीं प्रसिद्ध आहे ?

---

२– उत्तरपद पुढें असतांना असें म्हटलें असल्यामुळें त्याच्या मागील पदालाच होईल; व तो ङित् असल्यामुळें ( १।१।५३ ) त्या पदाच्या शेवटच्या वर्णाला म्हणजे ऋकारालाच होईल.

१. ( सू. २६ ) देवतावाचक शब्दांच्या द्वंद्व समासामध्यें उत्तरपद पुढें असतांना मागील पदाच्या शेवटच्या वर्णाला आनङ् होतो. उदा०– इन्द्रावरुणौ.

सहनिर्वापनिर्दिष्टा न चैते वेदे सहनिर्वापनिर्दिष्टाः ॥

**[ [1]ईदग्नेः सोमवरुणयोः ॥ ६ । ३ । २७ ॥ ]**

**[1]इद् वृद्धौ ॥ ६ । ३ । २८ ॥**

**इद्वृद्धौ विष्णोः प्रतिषेधः ॥ १ ॥**

इद्वृद्धौ विष्णोः प्रतिषेधो वक्तव्यः । आग्नावैष्णवं चरुं निर्वपेत् ॥

**[ [1]दिवो द्यावा ॥ ६ । ३ । २९ ॥**

**[1]दिवसश्च पृथिव्याम् ॥ ६ । ३ । ३० ॥**

**[1]उषासोषसः ॥ ६ । ३ । ३१ ॥ ]**

**[1]मातरपितरावुदीचाम् ॥ ६ । ३ । ३२ ॥**

**[1]पितरामातरा च च्छन्दसि ॥ ६ । ३ । ३३ ॥**

किं निपात्यते । पूर्वपदोत्तरपदयोर्ऋकारस्यारारौ निपात्येते । मातरपितरौ भोजयतः । मातरपितरावानय । आ मा गन्तां पितरामातरा चा मा सोमो अमृतत्वाय गम्यात् ॥

इति श्रीभगवत्पतञ्जलिविरचिते व्याकरणमहाभाष्ये षष्ठस्याध्यायस्य तृतीये पादे प्रथममाह्निकम् ॥

---

वेदामध्यें ज्या देवतांना दोघांना मिळून एकदम हविर्भाग दिला जातो त्या देवतावाचकांचा द्वंद्व लोकामध्यें आणि वेदामध्येंही प्रसिद्ध आहे असें समजावें.

( सू. २८ वा. १) 'इद् वृद्धौ' या सूत्रामध्यें विष्णु शब्दाचा प्रतिषेध करावा. म्हणजे विष्णु हा शब्द पुढें असतांना इत् आदेश होत नाहीं असें वचन करावें. उदा०— आग्नावैष्णवं चरुं निर्वपेत्.

( सू. ३२,३३ ) येथें कशाचें निपातन केलें आहे ?

मातृ व पितृ या दोन शब्दांच्या द्वंद्वामध्यें पूर्वपदातील ऋकाराचे स्थानीं अर् या आदेशाचें निपातन केलें आहे. आणि वेदामध्यें पितृशब्दाला पूर्वनिपात करून त्यांतील ऋकाराचे स्थानीं अरा या आदेशाचें निपातन केलें आहे. उदा०— मातरपितरौ भोजय. आ मा गन्ता पितरामातरा चामा सोमो अमृतत्वाय गम्यात्.

याप्रमाणें श्रीभगवान् पतंजलि मुनींनीं रचिलेल्या व्याकरण महाभाष्याच्या सहाव्या अध्यायाच्या तिसऱ्या पादांतील पहिलें आह्निक समाप्त झालें.

---

१. (सू. २७) देवतावाचक शब्दांच्या द्वंद्व समासामध्यें सोम किंवा वरुण हे शब्द उत्तरपद पुढे असतांना मागील अग्नि शब्दाच्या शेवटच्या इकाराला दीर्घ इकार होतो. उदा०— अग्नीषोमौ; अग्नीवरुणौ.

१. ( सू. २८ ) उत्तरपदामध्यें आदिवृद्धि ( ७। २।११७ ) झाली असेल तर मागील अग्नि शब्दाच्या इकाराला पूर्वसूत्रानें दीर्घ ईकार न करता ऱ्हस्व इकारच कायम ठेवावा. उदा०— आग्निवारुणी.

१. ( सू. २९ ) देवतावाचक शब्दांच्या द्वंद्व समासामध्यें पृथिवी शब्द उत्तरपद पुढें असतांना मागील दिव् शब्दाला द्यावा असा आदेश होतो. उदा०— द्यावाक्षामा.

१. ( सू. ३० ) देवतावाचक शब्दांच्या द्वंद्व समासामध्यें पृथिवी शब्द उत्तरपद पुढें असतांना मागील दिव् शब्दाला दिवस् असा आदेश होतो किंवा द्यावा असाही आदेश होतो. उदा०— दिवस्पृथिव्यौ, द्यावापृथिव्यौ.

१. ( सू. ३१ ) देवतावाचक शब्दांच्या द्वंद्व समासामध्यें उत्तरपद पुढें असतांना उषस् शब्दाला 'उषासा' असा आदेश होतो. उदा०— उषासानक्ता.

१. ( सू. ३२ ) उत्तरेकडील आचार्यांच्या मतानें मातृ व पितृ या शब्दांच्या द्वंद्व समासामध्यें मातृशब्दांतील ऋकाराला अरङ् असा आदेश होतो. उदा०— मातरपितरौ. इतर आचार्यांच्या मतानें मातापितरौ असें होतें.

१. ( सू. ३३ ) वेदामध्यें 'पितरामातरा' असें निपातन केलें जातें. उदा०— आ मा गन्तां पितरा मातरा च.

## स्त्रियाः पुंवद्भाषितपुंस्कादनूङ्समानाधिकरणे स्त्रियामपूरणीप्रियादिषु ॥ ६ । ३ । ३४ ॥

भाषितपुंस्कादिति कथमिदं विज्ञायते। समानायामाकृतौ यद्भाषितपुंस्कमाहोस्वित्क्वचिद्यद्भाषितपुंस्कमिति । किं चातः । यदि विज्ञायते समानायामाकृतौ यद्भाषितपुंस्कमिति गर्भिभार्यः प्रजातभार्यः प्रसूतभार्य इत्यत्र न प्राप्नोति । अथ विज्ञायते क्वचिद्यद्भाषितपुंस्कमिति द्रोणीभार्यः कुटीभार्यः पात्रीभार्यः अत्रापि प्राप्नोति ॥ अस्तु समानायामाकृतौ यद्भाषितपुंस्कमिति । कथं गर्भिभार्यः प्रजातभार्यः प्रसूतभार्य इति । कर्तव्योऽत्र यत्नः ॥

अथ किमर्थमूङः पृथक्प्रतिषेध उच्यते न यत्रैवान्यः प्रतिषेधस्तत्रैवायमुच्येत । न कोपधायाः [३७] इत्युक्त्वा तत ऊङश्चेत्युच्येत । तत्रायमप्यर्थो द्विः प्रतिषेधो न

---

( सू. ३४ ) 'भाषितपुंस्कात्' याचा कसा अर्थ समजावा ?

'अर्थ सारखा असतांना जो शब्द भाषितपुंस्क' असा, किंवा 'कोणत्याही अर्थी जो शब्द भाषितपुंस्क' असा ?

मग आतां तुझें काय म्हणणे आहे ?

अर्थ सारखा असतांना जो शब्द भाषितपुंस्क असा अर्थ समजला तर गर्भिभार्यः, प्रजातभार्यः, प्रसूतभार्यः येथें पुंवद्भाव होऊं शकत नाहीं. आतां कोणत्याही अर्थी भाषितपुंस्क असा अर्थ समजला तर द्रोणीभार्यः कुटीभार्यः पात्रीभार्यः येथेंही पुंवद्भाव होऊं लागेल.

तर मग 'सारखा अर्थ असतांना जो शब्द भाषितपुंस्क' हा पक्ष असो.

तर मग गर्भिभार्यः, प्रजातभार्यः, प्रसूतभार्यः इत्यादि उदाहरणें कशीं साधतील ? त्यांविषयी यत्न केला पाहिजे.

आतां अनूङ् हा ऊङाचा प्रतिषेध येथें निराळा कशाकरितां केला आहे ? जेथें दुसरा प्रतिषेध केला आहे त्या प्रदेशींच हाही प्रतिषेध सांगितला जावा. म्हणजे 'न कोपधायाः' ( ६।३।३७ ) असें सांगून त्याचें पुढें 'ऊङश्च' असें म्हणावें. असें करण्यांत दोन वेळ न शब्द उच्चारावयास नको हाही फायदा होत आहे.

---

१. ( सू. ३४ ) जो शब्द ज्या अर्थी स्त्रीलिंगी चालतो तो शब्द त्याच अर्थी पुल्लिंगी चालत असेल तर त्या स्त्रीलिंगी शब्दाचें जर ऊङ् हा स्त्रीलिंगी प्रत्यय केला नसेल तर पुल्लिंगी शब्दासारखें रूप होतें, समानाधिकरण स्त्रीलिंगी उत्तरपद पुढें असतांना; परंतु तें उत्तरपद पूरण-( ५।२।४८ ) प्रत्ययान्त नसावें आणि प्रियादि गणांतील नसावें. उदा०— दर्शनीया भार्या यस्य दर्शनीयभार्यः येथें दर्शनीया या स्त्रीलिंगी शब्दाचे दर्शनीय असें पुल्लिंगासारखें रूप झालें आहे. जी दर्शनीय तीच भार्या असल्यामुळें येथें पूर्वपद आणि उत्तरपद यांचें सामानाधिकरण्य आहे. 'कंठामध्यें आहे काळा रंग ज्याच्या' अशा अर्थी कण्ठेकालः या व्यधिकरण बहुव्रीहीमध्यें कंठ आणि काळा रंग हे पदार्थ निरनिराळे असल्यामुळें पूर्वपद व उत्तरपद यांचें सामानाधिकरण्य नाहीं. जर काल या शब्दाचा अर्थ 'काळ्या रंगाचा' इतका घेतला तर कालकण्ठः असा समानाधिकरण बहुव्रीहि होतो.

२. कारण गर्भिणी, प्रसूता व प्रजाता हे स्त्रीलिंगी शब्द ज्या अर्थानें स्त्रियांना लावतां येतात त्याच अर्थानें गर्भिन्, प्रसूत व प्रजात असे पुंलिंगी शब्द त्यांना लागत नाहींत.

३. द्रोण शब्द एक प्रकारचें माप या अर्थी पुल्लिंगी आहे. त्या मापासारखी एखादी ठेंगणी स्त्री या अर्थी स्त्रीलिंगी आहे.

४. गर्भिणी स्त्री, गर्भी स्त्रीसमाजः असा एकाच अर्थानें दोन्ही लिंगी तो शब्द चालतो अशीं उदाहरणें दाखवावी.

वक्तव्यो भवति ॥ नैवं शक्यम् । पठिष्यति ह्याचार्यः पुंवत्कर्मधारये प्रतिषिद्धार्थमिति । स पुंवद्भावो यथेह भवति कारिका वृन्दारिका कारकवृन्दारिकेत्येवमिहापि स्यात् ब्रह्मबन्धूर्वृन्दारिका ब्रह्मबन्धूवृन्दारिकेति । अथ पृथक्प्रतिषेधे ऽप्युच्यमाने यावता स प्रतिषिद्धार्थ आरम्भः कस्मादेवात्र न भवति । पृथक्प्रतिषेधवचनसामर्थ्यात् । अथवानूङिति तत्रानुवर्तिष्यते । अथवा नायं प्रसज्यप्रतिषेधः । किं तर्हि । पर्युदासोऽयं यदन्यदूङ इति स च प्रतिषिद्धार्थ आरम्भः ॥

किं पुनरिदं पुंवद्भावे स्त्रीग्रहणं प्रत्ययग्रहणमाहोस्वित्स्त्रीशब्दग्रहणमाहोस्वित् स्त्र्यर्थग्रहणम् । कश्चात्र विशेषः ।

**पुंवद्भावे स्त्रीग्रहणं प्रत्ययग्रहणं चेत्तत्र पुंवदित्युत्तरपदे तत्प्रतिषेधविज्ञानम् ॥१॥**

पुंवद्भावे स्त्रीग्रहणं प्रत्ययग्रहणं चेत्तत्र पुंवदित्युत्तरपदे तत्प्रतिषेधो विज्ञायेत । कस्य । स्त्रीप्रत्ययस्य प्रतिषेधः ॥ किमुच्यते स्त्रीप्रत्ययस्य प्रतिषेध इति न पुनरन्यदपि किंचित्पुंसः प्रतिपदं कार्यमुच्यते यत्समानाधिकरण उत्तरपदे भाषितपुंस्कस्यातिदिश्येत । अनारम्भात्पुंसि । न हि किंचित्पुंसः प्रतिपदं कार्यमुच्यते यत्समाना-

---

तसें करणें शक्य नाहीं. कारण, 'पुंवत्कर्मधारय०' हें सूत्र 'न कोपधायाः' इत्यादि निषेधाविषयीं पुंवद्भाव होण्याकरितां केलें आहे (६।३।४२ वा.१) असें आचार्य सांगणार आहेत. तेव्हां कारिका चासौ वृन्दारिका च कारकवृन्दारिका येथें जसा निषेधाचा बाध करून पुंवद्भाव होतो तसा ब्रह्मबन्धूश्चासौ वृन्दारिका च ब्रह्मबन्धूवृन्दारिका येथेंही होऊं लागेल.

आतां अनूङ् असा येथेंच पृथक् प्रतिषेध केला तरीही ज्या अर्थी 'पुवत्कर्मधारय०' हें सूत्र निषेधाचा बाध करण्याकरिताच आरंभिलें आहे त्या अर्थी ब्रह्मबन्धूवृन्दारिका येथेंही अनूङ् ह्या प्रकृत निषेधाचा बाध करून तें कां बरें प्रवृत्त होत नाहीं ?

अनूङ् असा येथेंच निराळा प्रतिषेध केला आहे. त्या जोरावर प्रवृत्त होत नाहीं. किंवा अनूङ् याची 'पुंवत्कर्मधारय०' येथें अनुवृत्ति करण्यांत येईल. अथवा अनूङ् हा प्रसज्यप्रतिषेध नव्हे[६]; तर ऊङाहून अन्य तें अनूङ् असा पर्युदास होय. आणि 'पुंवत्कर्मधारय०' हा पुंवद्भाव तर प्रतिषेधाकरितां आरंभिला आहे.

आतां येथें स्त्रीग्रहणानें स्त्रीप्रत्ययांचें ग्रहण करावयाचें किंवा स्त्रीलिंगी शब्दांचें अथवा स्त्रीलिंगी अर्थाचें ?

या तीन प्रकारांत काय बरें फरक आहे ?

(वा. १) पुंवद्भाव सांगणाऱ्या या शास्त्रामध्ये केलेल्या स्त्रीग्रहणानें स्त्रीप्रत्ययांचें ग्रहण होत असेल तर पुंवत् शब्दानें उत्तरपद पुढें असतांना त्याचा निषेध समजला जाईल.

त्याचा म्हणजे कोणाचा ?

त्याचा म्हणजे स्त्रीप्रत्ययाचा.

स्त्रीप्रत्ययाला पुंवद्भाव होतो या म्हणण्यानें स्त्रीप्रत्ययाचाच निषेध होईल असें कसें म्हणता ?

पुंलिंगामध्यें असें प्रतिपदोक्त सांगितलेलें एखादें कार्य नाहींच काय कीं जें येथें समानाधिकरण उत्तरपद पुढें असतांना स्त्रीप्रत्यायाला या अतिदेशानें केलें जाईल ?

'अनारम्भात्पुंसि' म्हणजे साक्षात् पुंलिं-

---

५. 'न कोपधायाः' (६।३।३६) हें निषेध-प्रकरण 'पुंवत्कर्मधारय०' (६।३।४२) याला जवळ असल्यामुळें त्याच निषेधाचा तें बाध करील; येथील (६।३।३४) निषेधाचा तें बाध करणार नाहीं.

६. म्हणजे, ऊङ्-प्रत्ययान्ताला पुंवद्भाव होत नाहीं असा हा निषेध नव्हेच. तर ऊङाशिवाय इतर ठिकाणीं पुंवद्भावाचा विधि आहे.

धिकरण उत्तरपदे भाषितपुंस्कस्यातिदिश्येत। तत्र किमन्यच्छक्यं विज्ञातुमन्यदतः स्त्रीप्रत्ययप्रतिषेधात् ॥ कथं पुनः पुंवदित्यनेन स्त्रीप्रत्ययस्य प्रतिषेधः शक्यो विज्ञातुम्। वतिनिर्देशोऽयं कामचारश्च वतिनिर्देशे वाक्यशेषं समर्थयितुम्। तद्यथा। उशीनरवन्मद्रेषु यवाः। सन्ति न सन्तीति। मातृवदस्याः कलाः। सन्ति न सन्तीति। एवमिहापि पुंवद्भवति पुंवन्न भवतीत्येवं वाक्यशेषं समर्थयिष्यामहे। यथा पुंसः स्त्रीप्रत्ययो न भवत्येवं समानाधिकरण उत्तरपदे भाषितपुंस्कस्य न भवतीति ॥

**प्रातिपदिकस्य च प्रत्यापत्तिः ॥ २ ॥**

प्रातिपदिकस्य च प्रत्यापत्तिर्वक्तव्या। एनी भार्यास्य एतभार्यः। श्येतभार्यः। पुंवद्भावेन किं क्रियते। स्त्रीप्रत्ययस्य निवृत्तिः। अर्थोऽनिवृत्तः स्त्रीत्वं तस्यानिवृत्तत्वात्केन नशब्दो न श्रूयेत। स्त्रियामित्युच्यमानः प्राप्नोति ॥

**स्थानिवत्प्रसङ्गश्च ॥ ३ ॥**

स्थानिवद्भावश्च प्राप्नोति। पट्वी भार्यास्य पटुभार्यः। मृदुभार्यः। पुंवद्भावेन

---

गामध्यें सांगितलेलें असें कांहीं एक कार्य दृष्टीस पडत नाहीं कीं ज्याचा येथें भाषितपुंस्कशब्दाच्या पुढील स्त्रीप्रत्ययाला अतिदेश करतां येईल. तेव्हां पुंवत् यानें स्त्रीप्रत्ययाच्या प्रतिषेधाखेरीज दुसरें काय समजणें शक्य आहे ? अर्थात् कांहींही नाहीं.

हें सर्व खरें. पण पुंवत् या विधीपासून स्त्रीप्रत्ययाचा प्रतिषेधच असा अर्थ कसा बरें मनांत येईल ?

असा येईल की पुंवत् हा 'वति' प्रत्ययानें निर्देश केला आहे; आणि वतिनिर्देशस्थलीं तें वाक्य पुरें करण्याकरितां वाटेल तसा शेष लावतां येतो. उदाहरणार्थ– ' उशीनरवत् मद्रेषु यवाः ' असें म्हटलें असतां आहेत किंवा नाहींत यांपैकीं इच्छेस येईल तसा शेष लावतां येतो. अथवा ' मातृवत् अस्याः कलाः' असें म्हटलें असतां तेथें जर आईला कला माहीत असतील तर मुलीलाही माहीत आहेत असा अर्थ मनात येतो; आणि आईला जर कांहींच माहीत नसतील तर मुलगीही तशीच अडाणी आहे असा अर्थ मनांत येतो. तसें येथेंही पुंवत् असें म्हटलें असतां ' न भवति ' हा शेष लावून वाक्य पुरें करण्यांत येईल. उदा०– जसा पुल्लिंगी शब्दाहून स्त्रीप्रत्यय होत नाहीं तसा समानाधिकरण उत्तरपद पुढें असतांना भाषितपुंस्काहूनही होत नाही.

( वा. २ ) प्रातिपदिकाला पूर्वस्वरूपाची प्राप्ति होते असें सांगावें. उदा०—एनी भार्या यस्य एतभार्यः. श्येनी भार्या यस्य श्येतभार्यः.

मग पुंवद्भावानें काय केलें आहे ?

पुंवद्भावानें स्त्रीप्रत्ययाची निवृति केली म्हणून कांहीं स्त्रीत्व या अर्थाची निवृत्ति होत नाहीं. आणि जर स्त्रीत्वाचीच निवृत्ति झाली नाहीं तर मग नकारही कां बरें कायम राहणार नाहीं ? कारण, तो स्त्रीत्व हा अर्थ असतांना सांगितला ( ४।१।३९ ) आहे.

( वा. ३ ) स्थानिवद्भावही प्राप्त होत आहे. उदाहरणार्थ पट्वी भार्या यस्य पटुभार्यः.

मग पुंवद्भावानें काय केलें आहे ?

---

७. उशीनर देशामध्यें ज्या प्रकारचे यव असतील तसेच मद्रदेशामध्यें आहेत. किंवा उशीनर देशामध्यें मुळींच नसतील तर तसे मद्रदेशांतही नाहींत. असा दोन प्रकारचा या वाक्याचा अर्थ होतो.

८. येथें पुंवद्भावानें ङीप् प्रत्यय निवृत्त झाला असतां ' एन ' या प्रातिपदिकाचें पूर्वीचें स्वरूप ' एत ' हें प्राप्त होतें. तसेंच श्येन याला श्येत असें रूप प्राप्त होतें.

किं क्रियते । स्त्रीप्रत्ययस्य निवृत्तिः । तस्य स्थानिवद्भावाद्यणादेशः प्राप्नोति ॥ किमर्थमिदमुभयमुच्यते न प्रातिपदिकस्य च प्रत्यापत्तिरित्येव स्थानिवद्भावोऽपि चोदितः स्यात् । पुरस्तादिदमाचार्येण दृष्टं स्थानिवत्प्रसङ्गश्चेति तत्पठितम् । तत उत्तरकालमिदं दृष्टं प्रातिपदिकस्य च प्रत्यापत्तिरिति तदपि पठितम् । न चेदानीमाचार्याः सूत्राणि कृत्वा निवर्तयन्ति ॥

## वतण्ड्यादिषु पुंवद्वचनम् ॥ ४ ॥

वतण्ड्यादिषु पुंवद्भावो वक्तव्यः । के पुनर्वतण्ड्यादयः । लुगलुगस्त्रीविषयद्विस्त्रीप्रत्ययाः । लुक् । गार्ग्यो वृन्दारिकाः गर्गवृन्दारिकाः । पुंवद्भावेन किं क्रियते । स्त्रीप्रत्ययस्य निवृत्तिः । अर्थोऽनिवृत्तः स्त्रीत्वं तस्यानिवृत्तत्वात्केन यशब्दो न श्रूयेत । अस्त्रियामिति हि लुगुच्यते । लुक् ॥ अलुक् । वतण्डी वृन्दारिका वातण्ड्यवृन्दा-

---

स्त्रीप्रत्ययाची निवृत्ति केली आहे.

पुंवद्भावानें स्त्रीप्रत्ययाची निवृत्ति केली तरी तिला स्थानिवद्भाव (१।१।५७) केल्यानें यण् आदेश प्राप्त होत आहे.

पण प्रत्यापत्तिवचन आणि स्थानिवद्भावप्रसंग हे दोन दोष निरनिराळे येथें कशाकरितां दाखविले आहेत ? प्रत्यापत्ति सांगण्यानेंच स्थानिवद्भावप्रसंग सांगितलासा होत नाहीं काय ?

आचार्यांनीं प्रथमतः स्थानिवद्भावप्रसंग पाहिला[९] व तो लिहून टेवला. आणि मागून प्रत्यापत्ति पाहिली गेली म्हणून तीही लिहून ठेवली. आणि आचार्य तर अशा स्थितींत एकदां बोललेलें परत घेत नाहींत.

( वा. ४ ) वातण्डी वगैरे शब्दांविषयीं 'पुल्लिंगी अर्थासारखा ' असा अतिदेश करावा.

ते वातण्डी वगैरे शब्द कोणते ?

लुक्, अलुक्, अस्त्रीविषय आणि द्विःस्त्रीप्रत्यय हे वातण्डी वगैरे शब्द होत. उदा०— गार्ग्यश्च ताः वृन्दारिकाश्च गर्गवृन्दारिकाः.[१०]

मग येथें पुंवद्भावानें काय केलें आहे ?

स्त्रीप्रत्ययाची निवृत्ति केली आहे.

पुंवद्भावानें स्त्रीप्रत्ययाची निवृत्ति केली म्हणून कांहीं स्त्रीत्व या अर्थाची निवृत्ति होत नाहीं. आणि जर स्त्रीत्वाची निवृत्ति झाली नाहीं तर मग यञ् प्रत्यय कां बरें कायम राहाणार नाहीं ? कारण, लुक् हा स्त्रीत्व नसतांना सांगितला आहे.

अलुकाचें उदाहरण—वतण्डी चासौ वृन्दारिका च वातण्ड्यवृन्दारिका.[११]

---

९. कारण, तो दोष असल्यामुळें आचार्य वार्तिककारांची नजर त्याचेकडे अगोदर गेली, म्हणून तो दोष म्हणून नमूद करून ठेविला. नंतर प्रकृतिप्रत्यापत्ति हें दोषाचें समाधान असल्यामुळें तें कसें करावें तें मागून लक्षांत आलें. तेंही त्यांनीं नमूद केलें. समाधान हें मागून लक्षात आलें तरी त्यांनी तें समाधान असल्यामुळें पूर्वीच नमूद केलें.

१०. गर्ग शब्दाहून गोत्रापत्य या अर्थीं यञ् प्रत्यय ( ४।१।१०५ ) सांगितला आहे. त्याचा बहुत्व अर्थीं लुक् सांगितला आहे. पण स्त्रीत्व अर्थ असतांना तो लुक् होत नाहीं ( २।४।६४ ) असें सांगितलें आहे. गर्गस्य गोत्रापत्यानि पुमांसः या अर्थीं गर्गाः व गर्गस्य गोत्रापत्यानि स्त्रियः या अर्थीं गार्ग्यः अशी रूपें होतात. गार्ग्यश्च ताः वृन्दारिकाश्च असा समास केला असतां पुंवद्भावानें यञ् प्रत्ययाचा लुक् होऊन गर्गवृन्दारिकाः असें रूप होतें. जर शब्दाला म्हणजे स्त्रीप्रत्ययाला शब्दाचा म्हणजे त्याच्या अभावाचा अतिदेश केला तर स्त्रीत्व अर्थ कायम राहत असल्यामुळें यञ् प्रत्ययाचा लुक् होणार नाहीं.

११. वतण्ड शब्दाहून गोत्रापत्य या अर्थीं यञ् प्रत्यय ( ४।१।१०८ ) सांगितला आहे. व त्याचा लुक् ( ४।१।१०९ ) स्त्रीत्व अर्थ असतांना सांगितला आहे.

रिका । पुंवद्भावेन किं क्रियते । स्त्रीप्रत्ययस्य निवृत्तिः । अर्थोऽनिवृत्तः स्त्रीत्वं तस्यानिवृत्तत्वाल्लुक्स्त्रियां वतण्डादिति यकारस्य लुक्प्राप्नोति ॥ यदि पुनरीकार एव लुगुच्येत । तदीकारग्रहणं कर्तव्यम् । न कर्तव्यम् । क्रियते न्यास एव । प्रश्लिष्टनिर्देशोऽयम् । स्त्री ई स्त्री स्त्रियामिति ॥ ईकारविधौ वा अप्रत्ययकस्य पाठः क्रियते । वतण्डेति । शार्ङ्गरवादौ सप्रत्ययकस्य पाठः करिष्यते । स च सप्रत्ययकस्य पाठा कर्तव्यः । अन्तरङ्गत्वाच्च लुक्प्राप्नोति । अलुक् ॥ अस्त्रीविषय । कौण्डीवृसी वृन्दारिका कौण्डीवृस्यवृन्दारिका । पुंवद्भावेन किं क्रियते । स्त्रीप्रत्ययस्य निवृत्तिः । अर्थोऽनिवृत्तः स्त्रीत्वं तस्यानिवृत्तत्वात्त्वेन यशब्दः श्रूयेत । अस्त्रियामिति हि ञ्यो विधीयते । अस्त्रीविषय ॥ द्विःस्त्रीप्रत्यय । गार्ग्यायणी वृन्दारिका गार्ग्यवृन्दारिका अत्र पुंवद्भावो

---

मग येथें पुंवद्भावानें काय केलें आहे ?

स्त्रीप्रत्ययाची निवृत्ति केली आहे.

पुंवद्भावानें स्त्रीप्रत्ययाची निवृत्ति केली म्हणून कांहीं स्त्रीत्व या अर्थाची निवृत्ति होत नाहीं. आणि जर स्त्रीत्वाची निवृत्ति झाली नाहीं तर मग स्त्रीत्व अर्थ असतांना सांगितलेला यञ् प्रत्ययाचा लुक् प्राप्त होत आहे.

आतां हा लुक् ईकार पुढें असतांनांच[१२] होतो असें म्हटले तर मात्र हें सिद्ध होईल.

पण 'लुक् स्त्रियाम्' येथें ईकारग्रहण करावयास पाहिजे.

करावयास नको. मूळ सूत्रामध्यें केलेंच आहे. कारण, स्त्री+ई=स्त्री तस्यां स्त्रियाम् असा 'लुक् स्त्रियाम्' येथे स्त्रियाम् हा प्रश्लिष्ट निर्देश केला आहे.

पण 'शार्ङ्गरवाद्यञो ङीन्' (४।१।७३) या ईकार म्हणजे ङीन् प्रत्यय सांगणाऱ्या शास्त्रानें वतण्ड याहूनच ईकार होणार आहे. कारण, त्या गणामध्यें वतण्ड शब्द पठित आहे.[१३] त्या शार्ङ्गरवादि गणामध्यें यञ् प्रत्ययासकट वातण्डय असाच पाठ करण्यांत येईल. आणि त्या शार्ङ्गरवादि गणामध्यें प्रत्ययासकट वातण्डय असा पाठ केलाच पाहिजे. नाहीं तर अंतरंग असल्यामुळें पुंवद्भावाच्या अगोदरच लुक् होऊं लागेल.

अस्त्रीविषयाचें[१४] उदाहरण— कौण्डीवृसी चासौ वृन्दारिका च कौण्डीवृस्यवृन्दारिका.

मग येथें पुंवद्भावानें काय केलें आहे ?

स्त्रीप्रत्ययाची निवृत्ति केली आहे.

पुंवद्भावाने स्त्रीप्रत्ययाची निवृत्ति केली म्हणून कांहीं स्त्रीत्व या अर्थाची निवृत्ति होत नाहीं. आणि जर स्त्रीत्व या अर्थाची निवृत्ति झाली नाहीं तर मग तेथें ञ्य प्रत्यय कसा बरें होईल? कारण, अस्त्रियाम् असें म्हणून ञ्य प्रत्यय सांगितला आहे (५।३।११३).

द्विःस्त्रीप्रत्ययाचें उदाहरण— गार्ग्यायणी[१५] चासौ वृन्दारिका च गार्ग्यवृन्दारिका. येथें पुंवद्भाव प्राप्त होत नाहीं.

---

१२. पुंवद्भावानें स्त्रीप्रत्ययाची निवृत्ति झाल्यामुळें ईकार पुढें नाहीं. म्हणून लुक् होत नाहीं.

१३. तेव्हां यञ् प्रत्ययाच्या लुकाच्या पूर्वी वातण्ड्य याहून ङीन् प्रत्ययच होत नसल्यामुळे प्रश्लिष्टनिर्देश करून ईकार पुढें असतांना असा अर्थ केला तर लुकच होणार नाहीं.

१४. कौण्डीवृस शब्दाहून स्वार्थीं ञ्य प्रत्यय होतो. ( ५।३।१३ ) तो स्त्रीत्व अर्थ असतांना होत नाहीं.

१५. गर्ग शब्दाहून 'गोत्रापत्य स्त्री' या अर्थी यञ् प्रत्यय ( ४।१।१०५ ), पुढें ष्फ हा स्त्रीप्रत्यय ( ४।१।१७ ) आणि त्याच्या पुढें दुसरा ङीष् हा स्त्रीप्रत्यय ( ४।१।४१ ) अशीं कार्यें झालीं आहेत.

न प्राप्नोति । किं कारणम् । भाषितपुंस्काद्नूङः समानाधिकरण उत्तरपदे पुंवद्भावो भवतीत्युच्यते यश्चात्र भाषितपुंस्कादनूङ् नासावुत्तरपदे यश्चोत्तरपदे नासौ भाषितपुंस्कात्परोऽनूङिति ॥

अस्तु तर्हि स्त्रीशब्दग्रहणम् ।

**स्त्रीशब्दस्य पुंशब्दातिदेश इति चेत्सर्वप्रसङ्गोऽविशेषात् ॥ ५ ॥**

स्त्रीशब्दस्य पुंशब्दातिदेश इति चेत्सर्वस्य स्त्रीशब्दस्य पुंशब्दातिदेशः प्राप्नोति। अस्यापि प्राप्नोति । अङ्गारका नाम शकुनयः । तेषां कालिकाः स्त्रियः । कालिकावृन्दारिकाः । अङ्गारकवृन्दारिकाः प्राप्नुवन्ति । क्षेमवृद्धयः क्षत्रियाः । तेषां तनुकेश्यः स्त्रियः । तनुकेशीवृन्दारिकाः । क्षेमवृद्धिवृन्दारिकाः प्राप्नुवन्ति । हंसस्य वरटा । कच्छपस्य डुली । ऋश्यस्य रोहित् । अश्वस्य वडवा । पुरुषस्य योषित् । किं कारणम् । अविशेषात् । न हि कश्चिद्विशेष उपादीयत एवंजातीयकस्य स्त्रीशब्दस्य पुंशब्दातिदेशो भवतीति । अनुपादीयमाने विशेषे सर्वत्र प्रसङ्गः ॥ कथं च नाम नोपादीयते यदा भाषितपुंस्कादित्युच्यते ।

**भाषितपुंस्कानुपपत्तिः ॥ ६ ॥**

ह्यर्थे चायं चः पठितः । सर्वो हि शब्दो

---

काय कारण ?

कारण असें कीं भाषितपुंस्काहून पर ऊङ्भिन्न स्त्रीप्रत्ययाला समानाधिकरण उत्तरपद पुढें असतांना पुंवद्भाव सांगितला आहे. आणि येथें भाषितपुंस्क अशा गार्ग्य शब्दाच्या पुढें जो ष्फ हा स्त्रीप्रत्यय आहे त्याच्या पुढें उत्तरपद नाहीं. आणि ज्या ङीप् या स्त्रीप्रत्ययाच्या पुढें उत्तरपद आहे तो ङीप् प्रत्यय भाषितपुंस्क अशा गार्ग्य शब्दाच्या पुढें नाहीं.

तर मग स्त्रीलिंगी शब्दांचें हें स्त्रीग्रहण असो.

( वा. ५ ) स्त्रीलिंगी शब्दाला पुल्लिंगी शब्दासारखें रूप प्राप्त होतें असें म्हटलें तर सर्वच स्त्रीशब्दांना पुल्लिंगी शब्दांचें स्वरूप प्राप्त होईल. उदाहरणार्थ— अङ्गारका नाम शकुनयः तेषां कालिका[१६]: स्त्रियः कालिकाश्च ता वृन्दारिकाश्च कालिकावृन्दारिकाः. येथें अङ्गारकवृन्दारिकाः असें रूप होऊं लागेल. तसेंच क्षेमवृद्धि नांवाच्या क्षत्रियांच्या तनुकेशी नांवाच्या स्त्रिया होत. तनुकेश्यश्च ता वृन्दारिकाश्च तनुकेशीवृन्दारिकाः. येथें क्षेमवृद्धिवृन्दारिकाः असें रूप होऊं लागेल. त्याप्रमाणें हंसाची स्त्री वरटा[१७], कच्छपाची डुली, ऋश्याची रोहित्, अश्वाची वडवा, व पुरुषाची योषित् ( येथेंही दोष येईल ).

पण येथें दोष येण्याचें काय कारण ?

कारण असें कीं अमुक एक विशेष प्रकारच्या स्त्रीलिंगी शब्दाला पुल्लिंगी शब्दासारखें रूप प्राप्त होतें असा कांहीं विशेष सूत्रामध्यें दाखविला नाहीं. तेव्हां कोणताही विशेष दाखविला नसल्यामुळें सर्वच स्त्रीलिंगी शब्दांना पुल्लिंगी शब्दांचें रूप प्राप्त होणारच.

पण कोणत्याही प्रकारचा विशेष दाखविला नाहीं असें कसें म्हणतां ? कारण भाषितपुंस्कात् असें सूत्रामध्यें म्हटलें आहे ना ?

( वा. ६ ) येथें च शब्द हि या शब्दाच्या

---

१६. अङ्गारक नांवाचे एक प्रकारचे पक्षी आहेत. त्यांचे डोळे लाल असतात. त्यांचे जातींतील स्त्रियांना कालिका असें म्हणतात.

१७. ह्या सर्व ठिकाणीं वरटा वगैरे त्या त्या स्त्री शब्दांना उत्तरपदाबरोबर समानाधिकरण समास केला असतां त्या त्या स्त्रीशब्दांना हंस वगैरे त्या त्या शब्दांसारखें रूप प्राप्त होईल.

भाषितपुंस्कात्परः शक्यः कर्तुम् ॥ अस्तु तर्ह्यर्थग्रहणम् ।

**अर्थातिदेशे विप्रतिषेधानुपपत्तिश्च ॥७॥**

अर्थातिदेशे विप्रतिषेधो नोपपद्यते । पठिष्यति ह्याचार्यो विप्रतिषेधं पुंवद्भावाद्ध्रस्वत्वं खिद्धादिकेष्विति स विप्रतिषेधो नोपपद्यते । किं कारणम् । द्विकार्ययोगो हि नाम विप्रतिषेधो न चात्रैको द्विकार्ययुक्तः । शब्दस्य ह्रस्वत्वमर्थस्य पुंवद्भावः ॥ किं च । सर्वप्रसङ्गोऽविशेषादिति । सर्वस्य स्त्र्यर्थस्य पुंवदर्थः प्राप्नोति । अस्यापि प्राप्नोति । अङ्गारका नाम शकुनयः । तेषां कालिकाः स्त्रियः । कालिकावृन्दारिकाः । अङ्गारकवृन्दारिकाः प्राप्नुवन्ति । क्षेमवृद्धयः क्षत्रियाः । तेषां तनुकेश्यः स्त्रियः । तनुकेशीवृन्दारिकाः । क्षेमवृद्धिवृन्दारिकाः प्राप्नुवन्ति । हंसस्य वरटा । कच्छपस्य डुली । ऋश्यस्य रोहित् । अश्वस्य वडवा । पुरुषस्य योषित् । किं कारणम् । अविशेषात् । न हि कश्चिद्विशेष उपादीयत एवंजातीयकस्य स्त्र्यर्थस्य पुंव-

---

अर्थी वापरला आहे. भाषितपुंस्कात् ह्या म्हणण्यांत कांहीं नीट हेतूच दिसत नाहीं. कारण कोणताही शब्द भाषितपुंस्काहून पर करणें शक्य[१८] आहे.

तर मग स्त्री या शब्दानें स्त्रीलिंगी अर्थाचें ग्रहण[१९] असो.

स्त्र्यर्थाला पुमर्थाचा अतिदेश केला असतां विप्रतिषेध उपपन्न होत नाहीं. खित् व घादिक प्रत्यय पुढें असतांना पुंवद्भावापेक्षां विप्रतिषेधानें परत्वास्तव ह्रस्व होतो (६।३।४२ वा. ५) असा जो विप्रतिषेध पुढें सांगण्यांत येणार आहे तो जुळत नाहीं.

काय कारण ?

कारण असें कीं एकाचे स्थानीं विरुद्ध अशा दोन कार्यांची युगपत् प्राप्ति असतांना तेथें विरोध उत्पन्न होतो. आणि प्रकृत स्थलीं दोन कार्यांची प्राप्ति एकाला येतच नाहीं. कारण ह्रस्व हा शब्दाला आणि पुंवद्भाव हा अर्थाला प्राप्त होत आहे.

शिवाय, सर्वच स्त्र्यर्थाला पुमर्थाचा अतिदेश प्राप्त होत आहे. उदाहरणार्थ० अङ्गारक नांवाच्या पक्ष्यांच्या स्त्रिया कालिका नांवाच्या होत. कालिकावृन्दारिकाः असा कर्मधारय केला असतां तेथें अङ्गारकवृन्दारिकाः असा प्रयोग प्राप्त होत आहे. तसेंच क्षेमवृद्धि नांवाच्या क्षत्रियांच्या तनुकेशी नांवाच्या स्त्रिया होत. त्यांचा तनुकेशीवृन्दारिकाः असा कर्मधारय केला असतां तेथें क्षेमवृद्धिवृन्दारिकाः असा प्रयोग प्रसक्त होत आहे. तसेंच, हंसाची वरटा, कच्छपाची डुली, ऋश्याची रोहित्, अश्वाची वडवा आणि पुरुषाची योषित् या ठिकाणींही दोष येईल.

पण ह्या ठिकाणीं पुंवद्भाव होऊं लागेल याचें काय कारण ?

कारण असें कीं अमुक एक जातीचा स्त्र्यर्थ पुंवदर्थासारखा समजावा असा कांहीं एक विशेष येथें दाखविला नाहीं. तेव्हां विशेष दाखविला नसल्यामुळें सर्वच स्त्र्यर्थाला पुंवदर्थाचा अति-

---

१८. 'कालिकावृन्दारिकाः' येथें कालिका हा स्त्रीलिंगी शब्द आहे. त्याच्या पाठीमागें 'एता' असा स्त्रीलिंगी शब्द लाविला कीं भाषितपुंस्क अशा त्या एतद् शब्दाच्या पुढें कालिका हा शब्द आहे.

१९. 'स्त्रियाः' या पदानें जर स्त्रीलिंगी अर्थाचें ग्रहण केलें तर त्याला पुंवत् असा जो अतिदेश सांगितला आहे तोही पुल्लिंगी अर्थाचाच समजला पाहिजे. कारण अर्थाला शब्दाचा अतिदेश संभवत नाहीं. आणि तसा पुल्लिंगी अर्थाचा अतिदेश समजला कीं पुल्लिंगी टाप् ङीप् वगैरे स्त्रीप्रत्यय नसतात म्हणून अर्थातच त्यांची निवृत्ति होईल.

द्भावो भवतीति । कथं च नाम नोपादीयते यदा भाषितपुंस्कादित्युच्यते । भाषितपुंस्कानुपपत्तिर्हि भवति न ह्यर्थेन पौर्वापर्यमस्ति ॥ अयं तावददोषो यदुच्यते ऽर्थातिदेशे विप्रतिषेधानुपपत्तिरिति । नावश्यं द्विकार्ययोग एव विप्रतिषेधः । किं तर्हि । असंभवोऽपि स चात्रास्त्यसंभवः । कोऽसावसंभवः । पुंवद्भावोऽभिनिर्वर्तमानो ह्रस्वत्वस्य निमित्तं विहन्ति । ह्रस्वत्वमभिनिर्वर्तमानं पुंवद्भावं बाधते । एषोऽसंभवः । सत्यसंभवे युक्तो विप्रतिषेधः ॥ अयं तर्हि दोषः सर्वप्रसङ्गोऽविशेषादिति । तस्मादस्तु स एव मध्यमः पक्षः ॥

ननु चोक्तं स्त्रीशब्दस्य पुंशब्दातिदेश इति चेत्सर्वप्रसङ्गोऽविशेषादिति । नैष दोषः । समासनिर्देशोऽयम् । भाषितपुंस्कादनूङस्मिन्सोऽयं भाषितपुंस्कादनूङिति । यद्येवं लुक्प्राप्नोति । निपातनान्न भविष्यति । अथवालुक्प्रकृतः सोऽनुवर्तिष्यते ॥ कथं पुनरनूङित्यनेन स्त्रीप्रत्ययग्रहणं शक्यं विज्ञातुम् । नञिवयुक्तमन्यसदृशाधिकरणे तथा ह्यर्थगतिः । नञ्युक्तमिवयुक्तं चान्यस्मिंस्त-

---

देश प्रसक्त होतो.

पण येथें कोणत्याही प्रकारचा विशेष दाखविला नाहीं असें कसें म्हणतां ? भाषितपुंस्कात् असें म्हटलें आहे ना ?

भाषितपुंस्कात् या पंचम्यन्त पदाचा संबंध स्त्र्यर्थाकडे संभवत नाहीं. कारण शब्दाचें अर्थाशीं पौर्वापर्य संभवत नाहीं.

आतां पुमर्थाचा अतिदेश कला असतां विप्रतिषेध जुळत नाहीं असें जें म्हटलें आहे तो दोष नाहीं. कारण एकाला विरुद्ध अशीं दोन कार्यें युगपत् प्रसक्त झालीं म्हणजे विरोध होतो असा कांहीं नियम नाहीं; तर दोन कार्यांचा असंभव हाही विरोध होय. तो असंभव येथें आहे.

तो असंभव कसा ?

असा कीं पुंवद्भाव केला असतां तो ऱ्हस्वाचें निमित्त ईकार घालवितो. आणि ऱ्हस्व केला असता तो पुंवद्भावाचा बाध[20] करतो असा असंभव आहे. तेव्हां असंभव असल्यामुळें येथें विप्रतिषेध आहे हें म्हणणें बरोबरच आहे.

तर मग हा दोष येत आहे:—कांहीं एक विशेष दाखविला नसल्यामुळें सर्वच स्त्र्यर्थाला पुमर्थाचा अतिदेश होईल.

तर आता ' स्त्रीलिंगी शब्दाला ' असा मधला पक्षच असूं दे.

पण स्त्रीलिंगी शब्दाला पुल्लिंगी शब्दाचा अतिदेश होतो असें मोघम म्हटलें असल्यामुळें सर्वत्र स्त्रीलिंगी शब्दांना पुंवद्भाव प्रसक्त होतो असा दोष दिला आहे ना ?

हा दोष येत नाहीं. कारण 'भाषितपुंस्कादनूङ्' हा समासानें निर्देश केला आहे. भाषितपुंस्काहून पर आहे अनूङ् ज्यामध्यें असा समुदाय हा समासाचा अर्थ होय.

पण जर हा समास आहे तर भाषितपुंस्क या शब्दाच्या पुढील पंचमीचा लुक् प्राप्त होत आहे.

याच निपातनावरून लुक् होणार नाहीं. अथवा प्रकृत असलेला अलुक् अनुवृत्त करण्यांत येईल[21].

तरी पण 'अनूङ्' या शब्दानें स्त्रीप्रत्ययाचें ग्रहण समजणें कसें शक्य होतें ?

' नञिवयुक्तमन्यसदृशाधिकरणे तथा ह्यर्थगतिः' अशी परिभाषा आहे. म्हणजे नञ् किंवा

---

२०. ह्रस्व पर असल्यामुळें तो अगोदर झाला तर मागून पुंवद्भाव होणार नाहीं.

२१. तें अनुवृत्त आलेलें अलुक् हें पद फक्त येथें 'भाषितपुंस्कादनूङ्' हा अलुक् समास आहे एवढेंच दाखवितें.

त्सदृशे कार्यं विज्ञायते तथा ह्यर्थो गम्यते । तद्यथा । अब्राह्मणमानयेत्युक्ते ब्राह्मणसदृशं पुरुषमानयति नासौ लोष्टमानीय कृती भवती । एवमिहाप्यनूङित्यूङ्प्रतिषेधाद- न्यस्मिन्नूङ्सदृशे कार्यं विज्ञास्यते । किं चान्यदनूङूङ्सदृशम् । स्त्रीप्रत्ययः ॥ एव- मपि इडविड्वृन्दारिका ऐडविडवृन्दारिका पृद्वृन्दारिका पार्थवृन्दारिका दरद्वृन्दारिका दारदवृन्दारिका उशिग्वृन्दारिका औशिज- वृन्दारिका अत्र पुंवद्भावो न प्राप्नोति । कर्तव्योऽत्र यत्नः ॥

अथेह कथं भवितव्यम् । पट्वीमृद्व्यौ भार्ये अस्य । पट्वीमृदुभार्य आहोस्वित्पटुमृदुभार्य इति । पट्वीमृदुभार्य इति भवितव्यम् । पुंवद्भावः कस्मान्न भवति । भाषितपुंस्कादि- त्युच्यते । ननु च भोः पटुशब्दो मृदुशब्दश्च

---

इव यांचा संबंध ज्याच्याशीं असेल तेथें त्याहून भिन्न आणि त्याच्यासारखा असा अर्थ असेल तरच तेथें सांगितलेलें कार्य होतें. कारण त्यापासून तसाच अर्थ मनांत येतो. उदा०— 'अब्राह्मणाला आण' असें म्हटलें असतां ब्राह्मणाहून भिन्न असून ब्राह्मणासारखा एखादा मनुष्यच आणिला जातो. तेवढें ऐकून एखाद्यानें मातीचें ढेकूळ आणिलें तर त्याला शहाणा म्हणत नाहींत. तसें येथें अनूङ् या म्हणण्यानें ऊङाशिवाय निराळा आणि ऊङासारखा असा जो असेल तेथेंच कार्य होईल.

तसा येथें ऊङाहून निराळा आणि ऊङासारखा असा दुसरा कोण आहे ?

फक्त स्त्रीप्रत्ययच तसा आहे.[22]

अशा रीतीनें कालिकावृन्दारिका वगैरे रूपें साधत आहेत तरी इडविड्[23] चासौ वृन्दारिका च ऐडविडवृन्दारिका, पृथ् चासौ वृन्दारिका च पार्थ- वृन्दारिका, उशिक् चासौ वृन्दारिका च औशि- जवृन्दारिका, दरद् चासौ वृन्दारिका च दारद- वृन्दारिका, येथें स्त्रीप्रत्यय नसल्यामुळें पुंवद्भाव होणार नाहीं.

तेथें पुंवद्भाव होण्याकरितां यत्न करावा.[24]

आतां पट्वीमृद्व्यौ भार्ये यस्य असा विग्रह केला असतां पट्वीमृदुभार्यः असें रूप व्हावें किंवा पटुमृदुभार्यः असें व्हावें ?

पट्वीमृदुभार्यः असें व्हावें.

पण तेथें पूर्वपदांतील पट्वीशब्दाला पुंवद्भाव कां बरें होत नाहीं ?

भाषितपुंस्कात् असें म्हटलें आहे म्हणून होणार नाहीं.

अरे पण पटु आणि मृदु हे शब्द पुल्लिंगीही आहेतच ना ?

---

२२. अनूङ् या पदापासून मनांत आलेल्या स्त्रीप्रत्ययाकडे भाषितपुंस्काचा संबंध करतां येतो. तसा स्त्रीप्रत्यय कालिका येथें नसल्यामुळें पुंवद्भाव होत नाहीं.

२३. इडबिड् आणि पृथ् या शब्दांहून अपत्य या अर्थी अञ् प्रत्यय ( ४।१।११८ ) होऊन ऐडबिडः व पार्थः अशीं रूपें होतात. तसेंच उशिज् आणि दरद् या शब्दांहून अपत्य या अर्थी अण् प्रत्यय होऊन औशिजः व दारदः अशीं रूपें होतात. अपत्यं स्त्री अशी स्त्रीत्वविवक्षा केली तर त्या अञ् आणि अण् या स्त्रीप्रत्ययांचा लुक् ( ४।१।१७७ ) होऊन इडबिड्, पृथ्, उशिज् व दरद् अशीं रूपें होतात.

२४. पूर्वी ( पृ. १५३ पं. १३ ) सांगितल्याप्रमाणें अनूङ् या पदानें जो स्त्रीप्रत्यय घ्यावयाचा तो स्त्रियाम् या अधिकारांतीलच घ्यावयाचा असें नाहीं. तर तो प्रत्यय वस्तुतः स्त्र्यर्थाला दाखविणारा असला म्हणजे झालें. तसा येथें 'अपत्यं स्त्री' या अर्थी केलेला अण् व त्याप्रमाणें अञ् हा प्रत्यय प्रत्ययलक्षणानें ( १।१।६२ ) मानतां येत असल्यामुळें ऐडबिडवृन्दारिका इत्यादि उदाहरणांमध्यें पुंवद्भाव होईल.

पुंसि भाष्येते । समानायामाकृतौ यद्भाषितपुंस्कमाकृत्यन्तरे चैतौ भाषितपुंस्कौ । समानायामाकृतावप्येतौ भाषितपुंस्कौ । कथम् । आरभ्यते मतुब्लोपः । एवं तर्हि भाषितपुंस्कादनूङ् समानाधिकरण उत्तरपदे पुंवद्भवतीत्युच्यते यश्चात्र भाषितपुंस्कादनूङ् समानाधिकरण उत्तरपदे कृतस्तस्य पुंवद्भावो यस्य चाकृतो नासौ भाषितपुंस्कादनूङ् समानाधिकरण उत्तरपदे ॥

**पूरण्यां प्रधानपूरणीग्रहणम् ॥ ८ ॥**

पूरण्यां प्रधानपूरणीग्रहणं कर्तव्यम् । इह मा भूत् । कल्याणी पञ्चम्यस्य पक्षस्य कल्याणपञ्चमीकः पक्ष इति ॥ अथेह कथं भवितव्यम् । कल्याणी पञ्चम्यासां रात्रीणाम् । कल्याणीपञ्चमा रात्रय इति भवितव्यम् । रात्रयोऽत्र प्रधानम् ॥

## तसिलादिष्वा कृत्वसुचः ॥ ६ । ३ । ३५ ॥

इह केचित्तसिलादय आ कृत्वसुचः पठ्यन्ते येषु पुंवद्भावो नेष्यते केचिच्चान्यत्र पठ्यन्ते येषु पुंवद्भाव इष्यते । तत्र किं

---

एकाच अर्थानें जो शब्द पुल्लिंगीही चालतो तो भाषितपुंस्क म्हटला जातो. आणि पटु व मृदु हे शब्द तर गुण या अर्थी पुल्लिंगी आहेत[२५].

एकाच अर्थी हे शब्द भाषितपुंस्क आहेत. ते कसें ?

गुणवाचकाहून मतुप् प्रत्ययाचा लुक् (५।२।९४ वा. ३ ) सांगितला आहे[२६].

तर मग येथें भाषितपुंस्काच्या पुढील जो ऊङ्भिन्न प्रत्यय तो शेवटीं असलेल्या स्त्रीलिंगी शब्दाला समानाधिकरण उत्तरपद पुढें असतांना पुंवद्भाव सांगितला आहे. आणि येथें जो ऊङ्भिन्न प्रत्यय शेवटीं असलेला आणि ज्याच्या पुढें समानाधिकरण उत्तरपद आहे असा जो स्त्रीलिंगी मृद्वी शब्द त्याला पुंवद्भाव केला आहे. व ज्याला पुंवद्भाव केला नाहीं असा जो ऊङ्भिन्न प्रत्यय शेवटीं असलेला असा पट्वी हा स्त्रीलिंगी शब्द त्याच्या पुढें समानाधिकरण उत्तरपद नाहीं.

( वा. ८ ) पूरणी शब्दाविषयीं प्रधान पूरणीचें ग्रहण करावें. म्हणजे पूरणीला प्राधान्य असेल तरच निषेध होतो असें वचन करावें. त्यामुळें कल्याणी पञ्चमी अस्य कल्याणपञ्चमीकः पक्षः येथे निषेध होत नाहीं.

आतां कल्याणी पञ्चमी आसां रात्रीणाम् असा विग्रह केला असतां कसें रूप व्हावें ?

कल्याणीपञ्चमाः रात्रयः असें व्हावें. कारण येथें उद्भूतावयवभेद असा रात्रि हा अन्यपदार्थ असल्यामुळें आणि पञ्चमी म्हणजे पांचवी ही रात्रच असल्यामुळें पञ्चमीला प्राधान्य आहे.

( सू. ३५ ) तसिल् प्रत्ययापासून कृत्वसुच् प्रत्ययापर्यंत प्रत्यय पुढें असतांना हा पुंवद्भाव सांगितला आहे. परंतु त्यांमध्यें जे प्रत्यय पुढें असतांना पुंवद्भाव इष्ट नाहीं असे कांहीं प्रत्यय पठित आहेत. आणि जे प्रत्यय पुढें असतांना पुंवद्भाव इष्ट आहे असे कांहीं प्रत्यय त्यांच्या बाहेर अन्य ठिकाणीं पठित आहेत. तेव्हां तेथें न्याय्य उपाय कोणता ?

---

२५. आणि पट्वीमृदुभार्यः येथें गुणी या अर्थी स्त्रीलिंगी आहेत. तेव्हां पुंवद्भाव होणार नाहीं.

२६. तेव्हां गुणी या एकाच अर्थी पटु व मृदु हे शब्द मतुप् प्रत्ययाचा लुक् करून तयार झालेले पुल्लिंगीही आहेत आणि स्त्रीलिंगीही आहेत.

१. ( सू. ३५ ) तसिल् प्रत्ययाला ( ५।३।७ ) प्रारंभ करून कृत्वसुच् ( ५।४।१७ ) प्रत्ययापर्यंत सांगितलेले प्रत्यय पुढें असतांना स्त्रीलिंगी शब्दाला पुंवद्भाव होतो त्या शब्दाच्या शेवटीं भाषितपुंस्काच्या पुढे केलेला ऊङाशिवाय स्त्रीप्रत्यय असला पाहिजे. उदाहरणार्थ–यस्याः इति यतः.

न्याय्यम् । परिगणनं कर्तव्यम् ।

**तसिलादी त्रतसौ ॥ १ ॥**

त्रतसौ तसिलादी द्रष्टव्यौ । तस्यां शालायां वसति तत्र वसति । तस्याः ततः । यस्याम् यत्र । यस्याः यतः ॥

**तरप्तमपौ ॥ २ ॥**

तरप्तमपौ तसिलादी द्रष्टव्यौ । दर्शनीयतरा दर्शनीयतमा ॥

**चरड्जातीयरौ ॥ ३ ॥**

चरड्जातीयरौ तसिलादी द्रष्टव्यौ । पटुचरी पटुजातीया ॥

**कल्पब्देशीयरौ ॥ ४ ॥**

कल्पब्देशीयरौ तसिलादी द्रष्टव्यौ । दर्शनीयकल्पा दर्शनीयदेशीया ॥

**रूपप्पाशपौ ॥ ५ ॥**

रूपप्पाशपौ तसिलादी द्रष्टव्यौ । दर्शनीयरूपा दर्शनीयपाशा ॥

**थम्थालौ ॥ ६ ॥**

थम्थालौ तसिलादी द्रष्टव्यौ । कयाकृत्या कथम् । यया यथा ॥

**दार्हिलौ ॥ ७ ॥**

दार्हिलौ तसिलादी द्रष्टव्यौ । तस्यां वेलायां तदा । तर्हि ॥

**तिल्थ्यनौ ॥ ८ ॥**

तिल्थ्यनौ तसिलादी द्रष्टव्यौ । वृकी वृकतिः । अजथ्या यूतिः ॥

**शसि बह्वल्पार्थस्य ॥ ९ ॥**

शसि बह्वल्पार्थस्य पुंवद्भावो वक्तव्यः । बह्वीभ्यो देहि बहुशो देहि । अल्पशः ॥

---

तसिलादि पदानें कोणते प्रत्यय घेण इष्ट आहे त्यांचें परिगणनच करावें.

( वा. १ ) त्रल् ( ५।३।१० ) व तसिल् ( ५।३।७ ) हे प्रत्यय तसिलादि होत असें समजावें. उदाहरणार्थः— तस्यां शालायां वसति या अर्थी तत्र शालायां वसति; तस्याः या अर्थी ततः; यस्याः या अर्थी यतः.

( वा. २ ) तरप् ( ५।३।५७ ) व तमप् (५।३।५५) हे प्रत्यय तसिलादि होत. उदाहरणार्थः— 'इयमनयोर्दर्शनीया' या अर्थी दर्शनीयतरा; तसेंच 'अतिशयेन दर्शनीया' या अर्थी दर्शनीयतमा.

( वा. ३ ) चरट् ( ५।३।५३ ) व जातीयर् (५।३।६९) हे प्रत्यय तसिलादि समजावे. उदाहरणार्थः-'भूतपूर्वा पट्वी' या अर्थी पटुचरी. तसेंच पट्वीप्रकारा या अर्थी पटुजातीया.

( वा. ४ ) कल्पप् व देशीयर् ( ५।३।६७ ) हे प्रत्यय तसिलादि होत. उदाहरणार्थ— 'ईषन्न्यूना दर्शनीया' या अर्थी दर्शनीयकल्पा व दर्शनीयदेशीया.

( वा. ५ ) रूपप् ( ५।३।६६ ) आणि पाशप् ( ५।३।४७ ) हे प्रत्यय तसिलादिकातील होत. उदाहरणार्थ— 'प्रशस्ता दर्शनीया' या अर्थी दर्शनीयरूपा. 'कुत्सिता दर्शनीया' या अर्थी दर्शनीयपाशा.

( वा. ६ ) थमु ( ५।३।२४ ) व थाल् ( ५।३।२३ ) हे तसिलादि होत. उदाहरणार्थ— 'कया प्रकृत्या' या अर्थी कथम्. 'यया प्रकृत्या' या अर्थी यथा.

( वा. ७ ) दा ( ५।३।१५ ) व र्हिल् ( ५।३।१६ ) हे प्रत्यय तसिलादि होत. उदाहरणार्थ— 'तस्यां वेलायां' या अर्थी, तदा तसेंच तर्हि.

(वा. ८) तिल् (५।४।४१) आणि थ्यन् (५।१।८ ) हे प्रत्यय अन्यत्र पठित आहेत तरी तसिलादिकांत इष्ट आहेत असें समजावें. उदाहरणार्थ—'प्रशस्ता वृकी' या अर्थी वृकतिः. 'अजायै हिता' या अर्थी अजथ्या.

( वा. ९ ) बह्वल्पार्थक शस् प्रत्यय ( ५।४।४२) पुढें असतांना पुंवद्भाव होतो असें वचन करावें. उदाहरणार्थ—'बह्वीभ्यो देहि' या अर्थी बहुशः; तसेंच 'अल्पाभ्यो देहि' या अर्थी अल्पशः.

## त्वतलोर्गुणवचनस्य ॥ १० ॥

त्वतलोर्गुणवचनस्य पुंवद्भावो वक्तव्यः । पट्व्या भावः पटुत्वम् पटुता । गुणवचनस्येति किमर्थम् । कठ्या भावः कठीत्वम् कठीता ॥

## भस्याढे तद्धिते ॥ ११ ॥

भस्याढे तद्धिते पुंवद्भावो वक्तव्यः । हस्तिनीनां समूहो हास्तिकम् । अढ इति किमर्थम् । श्यैनेयः रौहिणेयः ॥ यद्यढ इत्युच्यते अग्नायी देवतास्य आग्नेयः स्थालीपाकः अत्र न प्राप्नोति । इह च प्राप्नोति । कौण्डिन्यः सापत्न इति । यदि पुनरनपत्य इत्युच्येत । नैवं शक्यम् । इह हि न स्यात् । गार्ग्यायण्या अपत्यं माणवको गार्गो जाल्मः । अस्तु तर्ह्यढ इत्येव । कथं कौण्डिन्यः सापत्न इति । कौण्डिन्ये निपा-

---

(वा. १० ) त्व व तल् ( ५।१।११९ ) प्रत्यय पुढें असतांना गुणवाचक स्त्रीलिंगी शब्दाला पुंवद्भाव होतो असें वचन करावें. उदाहरणार्थ–'पट्व्याः भावः' या अर्थी पटुत्वम् अथवा पटुता. 'मृद्व्याः भावः' या अर्थी मृदुत्वम् अथवा मृदुता.

येथें ' गुणवचनस्य ' असे कशाकरितां म्हटलें आहे ?

कठ्याः भावः कठीत्वम्, कठीता. येथें पुंवद्भाव न झाला पाहिजे.

(वा. ११ ) ढ–भिन्न तद्धित प्रत्यय विवक्षित असतांना 'भ'संज्ञकाला पुंवद्भाव होतो असें वचन करावें. उदाहरणार्थ– हस्तिनीनां समूहो हास्तिकम् ( ४।२।४७ ).

येथें ' अढे ' असें कशाकरितां म्हटलें आहे ?

श्यैनेयः[2] रौहिणेयः येथें पुंवद्भाव न झाला पाहिजे म्हणून म्हटले आहे.

पण जर ' ढ–भिन्न ' असें म्हटलें तर अग्नायी देवताऽस्य आग्नेयः[3] स्थालीपाकः येथे पुंवद्भाव होणार नाहीं. आणि कुण्डिन्या अपत्यं कौण्डिन्यः[4], सपत्न्या अपत्यं सापत्नः[5] येथे होऊं लागेल. आतां जर ' अढे ' याचे ऐवजीं ' अनपत्ये ' असें म्हणावें तर तसेंही म्हणणें शक्य नाहीं. कारण गार्ग्यायण्या[6] अपत्यं माणवकः गार्गो जाल्मः येथें पुंवद्भाव होणार नाहीं.

तर मग ' अढे ' असेंच असूं दे.

पण तसें असेल तर कौण्डिन्यः व सापत्नः यांची सिद्धि कशी ?

कौण्डिन्यः येथें निपातनामुळें पुंवद्भावाचा अभाव सिद्ध होत आहे.

---

२. येथे पुंवद्भाव झाला तर श्यैतेयः व रौहितेयः अशीं रूपें होतील.

३. अग्नि शब्दाहून ' ती आहे देवता ज्याची ' या अर्थी ठक् प्रत्यय (४।२।३३) सांगितलेला लिङ्गविशिष्ट परिभाषेनें (पुढील सूत्र ४० पृ. ३२६ स्तंभ २ पं. २०–२१ ) अग्नायी शब्दाहून झाला आहे; व पुंवद्भावानें अग्नायी (४।१।३७) शब्दाला अग्नि असें रूप प्राप्त झालें आहे.

४. कुण्डिनी शब्दाहून गोत्रापत्य या अर्थी यञ् प्रत्यय (४।१।१०५) व ईकाराचा लोप (६।४।१४८) झाला आहे. आभीय कार्य म्हणून तो असिद्ध (६।४।२२) असल्यामुळें टिलोप (६।४।१४४) होत नाहीं. जर येथें पुंवद्भाव झाला तर कुण्डिन् असें रूप प्राप्त होईल; आणि टिलोप होऊन भलतेंच रूप होईल.

५. ' समान आहे पति म्हणजे मालक ज्याचा ' अशा अर्थाच्या सपति शब्दाहून जें ङीप् प्रत्यय होऊन स्त्रीलिंगीं सपत्नी असें रूप होतें त्याहून अपत्य या अर्थी अण् प्रत्यय ( ४।१।११२ ) झाला आहे. येथें पुंवद्भाव झाला तर सपति असें रूप प्राप्त होईल; आणि इकाराचा लोप ( ६।४।१४८ ) होऊन भलतेंच रूप होईल.

६. मागील सूत्रावरील टीप १५ पहा.

सनात्सिद्धम् । किं निपातनम् । आगस्त्यकौण्डिन्ययोरिति । सपत्नशब्दः प्रकृत्यन्तरम् । कथमग्नायी देवतास्य स्थालीपाकस्य आग्नेयः स्थालीपाकः । अस्तु तर्ह्यनपत्य इत्येव । कथं गार्गी जाल्मः । गार्ग्याग्नेयौ न संवदेते । कर्तव्यो ऽत्र यत्नः ।

**ठक्छसोश्च ॥ १२ ॥**

ठक्छसोश्च पुंवद्भावो वक्तव्यः । भवत्याश्छात्रा भावत्काः । भवदीयाः ॥ ठग्ग्रहणं किमर्थं नेके कृते ऽजादावित्येव सिद्धम् । नैवं शक्यम् । अजादिलक्षणे हि माथितिकादिवत्प्रसङ्गः । अजादिलक्षणे हि माथितिकादिवत्प्रसज्येत । तद्यथा । मथितं पण्यमस्य माथितिक इत्यकारलोपे कृते तान्तादिति कादेशो न भवति । एवमिहापि न स्यात् ॥

---

तें निपातन कोणतें ?

'आगस्त्यकौण्डिन्ययो०' ( २।४।७० ) हें तें निपातन होय. तसेंच सपत्न असा स्वतंत्र एक अकारान्त शब्द आहे. त्याचें स्त्रीलिंगी सपत्नी ( ४।१।७३ ) असें रूप होतें. त्याहून अपत्यार्थी अण् प्रत्यय (४।१।११२) केला असतां सापत्नः हें साधत आहे.

पण अग्नायी देवताऽस्य स्थालीपाकस्य आग्नेयः हें कसें सिद्ध होईल ?

तर मग ' अढे ' याचे ऐवजीं ' अनपत्ये ' असेंच असूं दे.

पण तसें म्हटलें तर ' गार्गी जाल्मः ' हें कसे साधणार ? तात्पर्य, 'अढे' किंवा 'अनपत्ये' यांपैकीं कोणतें तरी एक ठेवून गार्ग आणि आग्नेय हीं दोन्ही उदाहरणें साधतील असा कांहीं तरी यत्न करावा.

( वा. १२ ) ठक् व छस् पुढें असतांना पुंवद्भाव होतो असें वचन करावें. उदाहरणार्थ–भवत्याश्छात्राः भावत्काः, भवदीयाः.

येथें ठक् शब्द घातला आहे तो कशाकरितां ? तो घालावयास नको. कारण 'ठ'चे स्थानीं 'इक' आदेश केला असतां त्या अजादि प्रत्ययामुळें 'भ'संज्ञा ( १।४।१८ ) झाल्यानें ' भस्याढे० ' यानेंच पुंवद्भाव साधत आहे.

असें म्हणणें शक्य नाहीं. कारण, अजादि प्रत्ययामुळें 'भ'संज्ञा होऊन ' भस्याढे० ' यानें पुंवद्भाव होईल असें म्हटलें तर माथितिकः याप्रमाणें भावत्कः येथें 'क' आदेश होणार नाहीं असा दोष येतो. उदाहरणार्थ मथितं पण्यमस्य माथितिकः येथें अकारलोप (६।४।१४८) केल्यानंतर तकारान्ताच्या पुढील ठक् प्रत्ययाला सांगितलेला 'क' आदेश ( ७।३।५१ ) होत नाहीं. त्याप्रमाणें येथेंही 'क' आदेश होणार नाहीं.

---

७. प्रकृत वार्तिकामध्यें ' अढे ' असेंच ठेवावें. पण तेथें ' ढ ' या पदानें ' स्त्रीभ्यो ढक् ' ( ४।१।१२० ) हाच ढक् प्रत्यय घ्यावयाचा आहे. कारण, स्त्रीप्रत्ययान्त शब्दाला ढ प्रत्यय पुढें असतांना पुंवद्भाव होत नाहीं असें येथें म्हटलें आहे. तेव्हां अर्थातच प्रतिपदोक्त असा जो स्त्रीप्रत्ययान्ताहून ढक् प्रत्यय सांगितला आहे तोच झटदिशीं मनांत येतो. म्हणून आग्नेयः येथें निराळ्या सूत्रानें ( ४।२।३३ ) ढक् प्रत्यय केला असल्यामुळें ' अढे ' हा निषेध येत नाहीं.

८. मथित शब्दांतील अकाराचा लोप झाल्यानंतर तो शब्द तकारान्त होणार. पण त्या लोपाला 'भ' संज्ञेची जरूर असल्यामुळें इक आदेश ( ७।३।५० ) अगोदरच करावा लागतो. तसें भावत्कः येथें भवती शब्दाला पुंवद्भाव झाल्यानंतर तो शब्द तकारान्त होणार. तो पुंवद्भाव जर ' भस्याढे ' या पूर्वीच्या वार्तिकानें कर्तव्य झाला तर भसंज्ञेकरितां इक आदेश अगोदरच करावा लागेल. तेव्हां इक आदेश केल्यानंतर 'ठ'कार नसल्यामुळें जसा माथितिकः येथें क आदेश होत नाहीं तसा भावत्कः येथें होणार नाहीं.

## क्यङ्मानिनोश्च ॥ ६ । ३ । ३६ ॥[1]

मानिन्ग्रहणं किमर्थम् ।

**मानिन्ग्रहणमस्त्यर्थमसमानाधिकरणार्थं च ॥ १ ॥**

मानिन्ग्रहणं क्रियते ऽस्त्र्यर्थमसमानाधिकरणार्थं च । अस्त्र्यर्थं तावत् । दर्शनीयां मन्यते देवदत्तो यज्ञदत्तां दर्शनीयमान्ययमस्याः । असमानाधिकरणार्थम् । दर्शनीयां मन्यते देवदत्ता यज्ञदत्तां दर्शनीयमानिनीयमस्याः ॥

## न कोपधायाः ॥ ६ । ३ । ३७ ।[1]

किमिदमेवमाद्यनुक्रमणमाद्यस्य योगस्य विषय आहोस्वित्पुंवद्भावमात्रस्य । किं चातः । यद्याद्यस्य योगस्य विषये माध्यमिकीयः शाल्कूकिकीयः अत्र न प्राप्नोति ॥ विधिरप्यत्र न सिध्यति । किं कारणम् । भाषितपुंस्कादनूङित्युच्यते न ह्येतद् भवति भाषितपुंस्कादनूङ् ॥ इह तर्हि विलेपिकाया धर्म्यं वैलेपिकम् । विधिश्च सिद्धो भवति प्रतिषेधश्च न प्राप्नोति ॥ अथ पुंवद्भाव-

---

( सू. ३६ ) येथे मानिन् शब्दाचें ग्रहण कशाकरितां केलें आहे ?

( वा. १ ) उत्तरपद स्त्रीलिंगी नसेल तरी किंवा समानाधिकरण नसेल तरी पुंवद्भाव होण्याकरितां येथें मानिन् शब्दाचें ग्रहण केलें आहे. उदाहरणार्थ– दर्शनीयां मन्यते देवदत्तो यज्ञदत्तामिति दर्शनीयमानी. येथें उत्तरपद स्त्रीलिंगी नाहीं व समानाधिकरणही नाहीं. तसेंच यज्ञदत्तां दर्शनीयां मन्यते दर्शनीयमानिनी देवदत्ता. येथें उत्तरपद स्त्रीलिंगी आहे तरी समानाधिकरण नाहीं.

( सू. ३७ ) ह्या सूत्राला आरंभ करून जे हे पुंवद्भावाचे निषेध सांगितले आहेत ते प्रथमतः सूत्रकारांनीं सांगितलेल्या 'स्त्रियाः पुंवत्०' इत्यादि पुंवद्भावाचेच आहेत किंवा मागून वार्तिककारांनीं सांगितलेल्या पुंवद्भावाचेही आहेत ?

यांत काय बरें फरक होणार आहे ?

जर सूत्रकारांनीं सांगितलेल्या पुंवद्भावाचेच निषेध असतील तर माध्यमिकीयः[2] व शाल्कूकिकीयः येथें पुंवद्भावनिषेध होणार नाहीं.

पण अगोदर येथें पुंवद्भावाची प्राप्तीच येत नाहीं.

काय कारण ?

कारण असें कीं– भाषितपुंस्कादनूङ् असें सूत्रामध्यें म्हटलें आहे. आणि माध्यमिका व शाल्कूकिका हे शब्द तर भाषितपुंस्कच नाहींत.

तर मग विलेपिकाया[3] धर्म्यं वैलेपिकम् हें उदाहरण घ्यावें. येथें पुंवद्भावाची प्राप्ति येत आहे पण निषेध मात्र प्राप्त होत नाहीं.

आतां हा दोष जाण्याकरितां सर्व प्रकारच्या

---

१. ( सू. ३६ ) भाषितपुंस्क शब्दाच्या पुढील जो ऊङ्शिवाय दुसरा स्त्रीप्रत्यय तो शेवटी असलेल्या स्त्रीलिंगी शब्दाला पुंवद्भाव होतो क्यङ् प्रत्यय पुढें असतांना किंवा मानिन् शब्द उत्तरपद पुढें असतांना. उदाहरणार्थ- एनीवाऽऽचरति एतायते. दर्शनीयां मन्यते दर्शनीयमानी दर्शनीयमानिनी.

१. ( सू. ३७ ) ज्या शब्दाच्या उपधेला ककार आहे अशा स्त्रीलिंगी शब्दाला पुंवद्भाव होत नाहीं. उदाहरणार्थ-पाचिका भार्या यस्य पाचिकाभार्यः.

२. माध्यमिका नाम नगरी. तस्यां भवः या अर्थी माध्यमिका शब्दाहून 'वेणुकादिभ्यश्छण्' ( ४।२। १३८ गणसूत्र ) यानें छण् प्रत्यय झाला आहे. तसेंच शाल्कूकिका या नांवाचें एक गांव आहे. त्या शाल्कूकिका शब्दाहून 'तत्र भवः' या अर्थी छ प्रत्यय ( ४।२। १४१ ) केला आहे.

३. विलेपिका म्हणजे विलेपन करणारी. हा शब्द भाषितपुंस्क आहे. त्याहून 'तस्य धर्म्यम्' या अर्थी अण् प्रत्यय ( ४।३।४८ ) झाला आहे.

मात्रस्य विषये हस्तिनीनां समूहो हास्तिकम् जातिलक्षणः पुंवद्भावप्रतिषेधः प्राप्नोति ॥ एवं तर्हि न कोपधाया इत्येष योगः पुंवद्भावमात्रस्योत्तरमेवमाद्यनुक्रमणमाद्यस्य योगस्य विषये ॥

**कोपधप्रतिषेधे तद्धितवुग्रहणम् ॥१॥**

कोपधप्रतिषेधे तद्धितवुग्रहणं कर्तव्यम्। तद्धितस्य यः ककारो वोश्च यः ककारस्तस्य ग्रहणं कर्तव्यम्। इह मा भूत्। पाकभार्यः भेकभार्य इति ॥

**[ [1]संज्ञापूरण्योश्च ॥ ६ । ३ । ३८**

**[1]वृद्धिनिमित्तस्य च तद्धितस्यारक्तविकारे ॥ ६ । ३ । ३९ ]**

**[1]स्वाङ्गाच्चेतः ॥ ६ । ३ । ४० ॥**

**स्वाङ्गाच्चेतोऽमानिनि ॥ १ ॥**

स्वाङ्गाच्चेतोऽमानिनीति वक्तव्यम्। इहापि यथा स्यात्। दीर्घमुखमानी श्लक्ष्णमुखमानी ॥ यद्यमानिनीत्युच्यते दीर्घमुखमानिनीति श्लक्ष्णमुखमानिनीति न सिध्यति। प्रातिपदिकग्रहणे लिङ्गविशिष्टस्यापि ग्रहणं भवतीत्येवं भविष्यति ॥

---

पुंवद्भावाचे हे निषेध आहेत असें म्हटलें तर हस्तिनीनां समूहो हास्तिकम्[4] येथें 'जातेश्च' (६।३।४१) यानें पुंवद्भावाचा निषेध होऊं लागेल.

तर मग आतां 'न कोपधायाः' हा प्रकृत निषेध सर्व पुंवद्भावाचा आहे. आणि याचेपुढील निषेध हे मात्र अगोदर सांगितलेल्या म्हणजे सूत्राने सांगितलेल्या पुंवद्भावाचेच आहेत असें समजावें.

(वा. १) हा जो उपधेला ककार असतांना पुंवद्भावाचा निषेध सांगितला आहे तो ककार तद्धित प्रत्ययांतील असावा किंवा वु याचे स्थानीं जो अक आदेश (७।१।१) होतो त्यांतील असावा? कारण, पाका[5] भार्या यस्य पाकभार्यः, तसेंच भेकभार्यः येथे पुंवद्भावाचा प्रतिषेध न झाला पाहिजे.

(सू. ४० वा. १) ह्या सूत्रामध्यें अमानिनि असा शब्द घालावा. कारण दीर्घमुखीं मन्यते दीर्घमुखमानी तसेंच श्लक्ष्णमुखमानी येथें हा निषेध न येतां पुंवद्भाव झाला पाहिजे.

पण जर सूत्रामध्यें अमानिनि एवढाच शब्द घातला तर दीर्घमुखमानिनी व श्लक्ष्णमुखमानिनी येथें पुंवद्भाव साधत नाहीं.

'प्रातिपदिकाचें ग्रहण केलें असेल तेथें लिंगबोधकप्रत्ययविशिष्टाचेंही ग्रहण करावें' या परिभाषेनें मानिनी शब्द पुढे असतांनाही पुंवद्भाव होईल.

---

४. हस्तिनी शब्दाहून समूह या अर्थी ठक् प्रत्यय (४।२।४७), इक आदेश (७।३।५०), पुंवद्भाव (६।३।३५ वा. ११) व टिलोप (६।४।४४) अशीं कार्यें झालीं आहेत.

५. पाक शब्द उणादि सूत्रामध्यें (५।५३) निपातन केला आहे. पाका म्हणजे प्रथम वयाची. भेक शब्दामध्यें भी धातूहून क प्रत्यय (उणा. ३।४३) झाला आहे. भेका म्हणजे भिणारी.

१ (सू. ३८) स्त्रीलिंगी असलेले जे संज्ञा आणि पूरण-प्रत्ययान्त शब्द त्यांना पुंवद्भाव होत नाहीं. उदाहरणार्थ–दत्ताभार्यः, पञ्चमीभार्यः.

१ (सू. ३९) वृद्धीला कारणीभूत म्हणजे ञित्, णित् किंवा कित् अशा आणि जो रक्त (४।२।१) किंवा विकार (४।३।१३४) या अर्थी केलेला नव्हे अशा तद्धित प्रत्ययाच्या पुढील जो स्त्रीप्रत्यय तदन्त स्त्रीलिंगी शब्दाला पुंवद्भाव होत नाही. उदाहरणार्थ–स्रुघ्ने भवा स्रौघ्नी; स्रौघ्नी भार्या यस्य स्रौघ्नीभार्यः, स्रौघ्नीयते, स्रौघ्नीपाशा.

१ (सू. ४०) स्वाङ्गवाचक शब्दाच्या पुढील जो स्त्रीप्रत्ययाचा ईकार तदन्त स्त्रीलिंगी शब्दाला पुंवद्भाव होत नाहीं उदा०– दीर्घकेशीभार्यः.

[ जातेश्च ॥ ६ । ३ । ४१ ॥ ]
## पुंवत्कर्मधारयजातीयदेशीयेषु ॥ ६ । ३ । ४२ ॥

किमर्थमिदमुच्यते ।

**पुंवत्कर्मधारये प्रतिषिद्धार्थम् ॥ १ ॥**

प्रतिषिद्धार्थोऽयमारम्भः । न कोपधायाः [ ३७ ] इत्युक्तं तत्रापि पुंवद्भवति । कारिका वृन्दारिका कारकवृन्दारिका । कारकजातीया कारकदेशीया ॥ संज्ञापूरण्योश्च [ ३८ ] इत्युक्तं तत्रापि पुंवद्भवति । दत्ता वृन्दारिका दत्तवृन्दारिका । दत्तजातीया दत्तदेशीया । पञ्चमी वृन्दारिका पञ्चमवृन्दारिका । पञ्चमजातीया पञ्चमदेशीया ॥ वृद्धिनिमित्तस्येत्युक्तं तत्रापि पुंवद्भवति । स्रौघ्नी वृन्दारिका स्रौघ्नवृन्दारिका । स्रौघ्नजातीया स्रौघ्नदेशीया ॥ स्वाङ्गाच्चेतोऽमानिनीत्युक्तं तत्रापि पुंवद्भवति । श्लक्ष्णमुखी वृन्दारिका श्लक्ष्णमुखवृन्दारिका । श्लक्ष्णमुखजातीया श्लक्ष्णमुखदेशीया ॥ जातेश्च [ ४१ ] इत्युक्तं तत्रापि पुंवद्भवति । कठी वृन्दारिका कठवृन्दारिका । कठजातीया कठदेशीया ॥

**कुक्कुट्यादीनामण्डादिषु पुंवद्वचनम् ॥ २ ॥**

कुक्कुट्यादीनामण्डादिषु पुंवद्भावो वक्तव्यः । कुक्कुट्या अण्डं कुक्कुटाण्डम् ।

---

( सू. ४२ ) हें सूत्र कशाकरितां केलें आहे ? तें करावयास नको. कारण पूर्वींच्या सामान्य सूत्रांनींच येथें पुंवद्भाव साधत आहे.

( वा. १ ) त्या सामान्य सूत्रांचा जेथें निषेध प्राप्त होतो अशा कांहीं ठिकाणीं पुंवद्भाव होण्याकरितां हें सूत्र केलें आहे. ' न कोपधायाः ' हा निषेध सांगितला आहे, पण तेथेंही ह्या सूत्रानें पुंवद्भाव होतो; उदाहरणार्थ— कारिका वृन्दारिका कारकवृन्दारिका, कारकजातीया, कारकदेशीया. तसेंच ' संज्ञापूरण्योश्च ' हा निषेध सांगितला आहे; पण तेथेंही ह्या सूत्रानें पुंवद्भाव होतो; उदाहरणार्थ— दत्ता चासौ वृन्दारिका च दत्तवृन्दारिका, दत्तजातीया, दत्तदेशीया; पञ्चमी चासौ वृन्दारिका च पञ्चमवृन्दारिका, पञ्चमजातीया, पञ्चमदेशीया. तसेंच ' वृद्धिनिमित्तस्य० ' हा निषेध सांगितला आहे. तेथेंही ह्या सूत्रानें पुंवद्भाव होतो. उदाहरणार्थ— स्रौघ्नी वृन्दारिका स्रौघ्नवृन्दारिका, स्रौघ्नजातीया, स्रौघ्नदेशीया. तसेंच ' स्वाङ्गाच्चेतोऽमानिनि ' हा निषेध सांगितला आहे; पण तेथेंही ह्या सूत्रानें पुंवद्भाव होतो. उदाहरणार्थ—श्लक्ष्णमुखी चासौ वृन्दारिका च श्लक्ष्णमुखवृन्दारिका, श्लक्ष्णमुखजातीया, श्लक्ष्णमुखदेशीया. तसेंच— ' जातेश्च ' हा निषेध सांगितला आहे; पण तेथही ह्या सूत्रानें पुंवद्भाव होतो; उदाहरणार्थ—कठी चासौ वृन्दारिका च कठवृन्दारिका, कठजातीया, कठदेशीया.

( वा. २ ) कुक्कुटी वगैरे शब्दांना अण्ड वगैरे शब्द पुढें असतांना पुंवद्भाव होतो असें वचन करावें. उदाहरणार्थ— कुक्कुट्याः अण्डम्

---

१. ( सू. ४१ ) जातिशब्दाच्या ( ४।१।६३ भाष्य भाग ४ पृ. ७२ ) पुढें स्त्रीप्रत्यय केला असतां तेथें पुंवद्भाव होत नाहीं. उदा०—कठीभार्यः. मानिन् शब्द पुढें असेल तर हा निषेध येत नाहीं. उदाहरणार्थ-कठमानिनी

१ ( सू. ४२ ) भाषितपुंस्क शब्दाच्या पुढें ऊङा-शिवाय जो स्त्रीप्रत्यय तो शेवटीं असलेल्या स्त्रीलिंगी शब्दाला निषेध बाजूला सारून पुंवद्भाव होतो कर्मधारय समासामध्यें किंवा जातीय अथवा देशीय प्रत्यय पुढें असतांना. उदाहरणार्थ-पाचकवृन्दारिका, पाचकजातीया ( ५।३।६९ ), पाचकदेशीया ( ५।३।३७ ).

मृग्याः पदं मृगपदम् । काक्याः शावः काकशावः ॥

## न वास्त्रीपूर्वपदविवक्षितत्वात् ॥ ३ ॥

न वा वक्तव्यम् । किं कारणम् । अस्त्रीपूर्वपदविवक्षितत्वात् । नात्र स्त्री पूर्वपदं विवक्षितम् । किं तर्हि । अस्त्री पूर्वपदम् । उभयोरण्डमुभयोः पदमुभयोः शावः ॥ यद्यपि तावदत्रैतच्छक्यते वक्तुमिह तु कथम् । मृग्याः क्षीरं मृगक्षीरमिति । अत्रापि न वास्त्रीपूर्वपदविवक्षितत्वादित्येव । कथं पुनः सतो नामाविवक्षा स्यात् । सतोऽप्यविवक्षा भवति । तद्यथा । अलोमिकैडका । अनुदरा कन्येति । असतश्च विवक्षा भवति । तद्यथा । समुद्रः कुण्डिका । विन्ध्यो वर्धितकमिति ॥

## अग्नेरीत्त्वाद्वरुणस्य वृद्धिर्विप्रतिषेधेन ॥ ४ ॥

अग्नेरीत्त्वाद्वरुणस्य वृद्धिर्भवति विप्रतिषेधेन । अग्नेरीत्त्वस्यावकाशः । अग्नीषोमौ । वरुणस्य वृद्धेरवकाशः । वायुवारुणम् । इहोभयं प्राप्नोति । आग्निवारुणीमनड्वाहीमालभेत । वरुणस्य वृद्धिर्भवति विप्रतिषेधेन ॥

---

कुक्कुटाण्डम् , मृग्याः पदं मृगपदम् , काक्याः शावः काकशावः.

( वा. ३ ) हें पुंवद्भावाचें वचन करावयास नको. कारण, येथें स्त्रीलिंगीं पूर्वपद घेऊंच नये. तर पूर्वपद स्त्रीलिंगभिन्न म्हणजे पुल्लिंगी घ्यावें.[2] कारण अण्ड, पद, आणि शाव हें स्त्री व पुरुष या दोघांचेंही संभवतें.

कुक्कुटाण्ड वगैरे स्थलीं जरी असें म्हणतां आलें तरी मृग्याः क्षीरं मृगक्षीरम् येथें कसें ?

येथेंही पूर्वपद स्त्रीलिंगीं विवक्षित नसल्यामुळें पुंवद्भाववचन करावयास नको, हेंच उत्तर समजावें.

पण विद्यमान वस्तूची अविवक्षा कशी बरें होईल. ?

विद्यमानाचीही अविवक्षा होते. उदाहरणार्थ— अलोमिका[4] एडका, अनुदरा कन्या. तशीच अविद्यमान वस्तूची पण विवक्षा होते. उदाहरणार्थ— समुद्रः कुण्डिका[5]; विन्ध्यो वार्धितकम्.

( वा. ४ ) ' ईदग्नेः सोम० ' ( ६।३।२७ ) यानें अग्नि शब्दाला सांगितलेल्या ईत्वापेक्षा विप्रतिषेधानें परत्वास्तव ' देवताद्वन्द्वे च ' ( ७।३।२१ ) यानें वरुण शब्दाला वृद्धि होते. उदाहरणार्थ— ईत्त्वाला अग्नीषोमौ येथें अवकाश आहे; व वृद्धीला वायुश्च वरुणश्च देवते अस्य वायुवारुणम् येथें अवकाश आहे. पण आग्निवारुणीमनड्वाहीमालभेत येथें दोहोंची प्राप्ति येते. त्यांमध्यें विप्रतिषेधानें परत्वास्तव वरुणशब्दाला वृद्धि होते.

---

२. अशा रीतीनें कुक्कुटाण्डम् वगैरे प्रयोग साधावे; आणि कुक्कुटी शब्दाचा अण्डाशी संबंध करून कुक्कुट्यण्डम् असा प्रयोग कोणी करूं लागेल तर अनभिधानास्तव तेथें तशी विवक्षा करू नये.

३. येथें मृगाचें क्षीर असा संबंध दाखविण्याची विवक्षा नाहीं; तर मृगाहून इतर ज्या गो, महिषी वगैरे जाती त्यांचें नव्हे असा भेद दाखविण्याची विवक्षा आहे. संबंधाची विवक्षा अनभिधानास्तव होत नाहीं.

४. अगदींच लव नाहीं असें कधींच होत नाहीं; तरी पण फारच बारीक न दिसण्यासारखी लव असल्यामुळें अविवक्षा करतां येते. तसेंच, उदरही फारच लहान असल्यामुळें अविवक्षा करून अनुदरा असें म्हणण्याचा प्रघात आहे.

५. समुद्र हा कुंडी नसून त्याला कुंडी म्हटलें आहे. तसेंच विन्ध्य पर्वताला वर्धितक म्हटलें आहे. वर्धितक म्हणजे शेराचें माप.

नैष युक्तो विप्रतिषेधः । द्विकार्ययोगो हि विप्रतिषेधो न चात्रैको द्विकार्ययुक्तः । कथम् । अग्नेरीत्त्वं वरुणस्य वृद्धिः ॥ नावश्यं द्विकार्ययोग एव विप्रतिषेधः । किं तर्हि । असंभवोऽपि स चात्रास्त्यसंभवः । कोऽसावसंभवः । अग्नेरीत्त्वमभिनिर्वर्तमानं वरुणस्य वृद्धिं बाधते । वरुणस्य वृद्धिरभिनिर्वर्तमानाग्नेरीत्त्वं बाधते । एषोऽसंभवः । सत्यसंभवे युक्तो विप्रतिषेधः ॥

## पुंवद्भावाद्ध्रस्वत्वं खिद्घादिकेषु ॥५॥

पुंवद्भावाद्ध्रस्वत्वं भवति विप्रतिषेधेन खिद्घादिकेषु । पुंवद्भावस्यावकाशः । पटुभार्यः मृदुभार्यः । खिति ह्रस्वो भवतीत्यस्यावकाशः । कालिमन्यः हरिणिमन्यः । इहोभयं प्राप्नोति । कालिमन्या हरिणिमन्या । घादिषु नद्या ह्रस्वो भवतीत्यस्यावकाशः । नर्तकितरा नर्तकितमा । पुंवद्भावस्यावकाशः । दर्शनीयतरा दर्शनीयतमा । इहोभयं प्राप्नोति । पट्वितरा पट्वितमा । के ह्रस्वो भवतीत्यस्यावकाशः । नर्तकिका । पुंवद्भावस्यावकाशः । दारदिका । इहोभयं प्राप्नोति । पट्विका मृद्विका । ह्रस्वत्वं भवति विप्रति-

---

हा विप्रतिषध बरोबर नाहीं. कारण, एकाला दोन कार्यांनीं पछाडलें असतां विप्रतिषेध होईल. आणि येथें तर एक स्थानी दोघांनीं पछाडलेला नाहीं.

तो कसा ?

अग्नि शब्दाला ईत्त्व आणि वरुणशब्दाला वृद्धि.

पण एक स्थानी दोन कार्यांनीं पछाडला म्हणजेच विप्रतिषेध होतो असा कांहीं नियम नाहीं; तर दोन कार्यांचा संभव नसणें यालाही विप्रतिषेध म्हणतात. आणि तसा असंभव येथें आहे.

तो कसा ?

असा कीं–अग्नि शब्दाला ईत्त्व केलें कीं निषेधानें ( ७।३।२३ ) वृद्धीचा बाध होतो आणि वरुण शब्दाला वृद्धि केली कीं इत्त्वानें ( ६।३।२८ ) ईत्त्वाचा बाध होतो; असा असंभव आहे. तेव्हां असंभव असल्यानें येथें विप्रतिषेध आहे हें म्हणणें योग्यच आहे.

( वा. ५ ) पुंवद्भावापेक्षां विप्रतिषेधानें परत्वास्तव खित् व घ वगैरे प्रत्यय पुढें असतांना सांगितलेला ऱ्हस्व होतो; उदाहरणार्थ–पुंवद्भावाला ( ६।३।३४ ) पटुभार्यः येथें अवकाश आहे व 'खित्यनव्ययस्य' ( ६।३।६६ ) या खित् प्रत्यय पुढें असतांना सांगितलेल्या ऱ्हस्वाला कालीमात्मानं मन्यते कालिमन्यो देवदत्तः येथें अवकाश आहे. आणि कालीमात्मानं मन्यते कालिमन्या देवदत्ता तसेंच हरिणिमन्या येथें दोहोंची प्राप्ति येते. तेथें विप्रतिषेधानें परत्वास्तव ऱ्हस्व होतो. तसेंच घ वगैरे प्रत्यय पुढें असतांना नद्यन्ताला सांगितलेल्या ऱ्हस्वाला ( ६।३।४३ ) नर्तकितरा व नर्तकितमा येथें अवकाश आहे; व पुंवद्भावाला ( ६।३।३५ ) दर्शनीयतरा व दर्शनीयतमा येथें अवकाश आहे. आणि पट्वितरा व पट्वितमा येथें दोहोंची प्राप्ति येते. तेथें विप्रतिषेधानें परत्वास्तव ऱ्हस्व होतो. तसेंच 'क' प्रत्यय पुढें असतांना सांगितलेल्या ऱ्हस्वाला ( ७।४।१३ ) नर्तकिका येथें अवकाश आहे; व पुंवद्भावाला दारदिका[१] येथें अवकाश आहे; आणि पट्विका व मृद्विका येथें दोहोंची प्राप्ति येते. तेथें विप्रतिषेधानें परत्वास्तव ऱ्हस्व होतो.

---

१. दरद् शब्दाहून 'अपत्य स्त्री' या अर्थी अण् प्रत्यय ( ४।१। १७० ), त्याचा लुक् (४।१।१७७) व नंतर त्याहून स्वार्थी क प्रत्यय ( ५।३।७३ ) केला असतां पुंवद्भावानें (६।३।३५) दरद असें रूप प्राप्त होतें. क प्रत्ययाच्या पुढें टाप् होऊन नंतर इत्त्व ( ७।३।४४ ) झालें आहे. याच भाष्यावरून तसिलादि ( ६।३।३५ ) परिगणनामध्यें क प्रत्यय आहे असें समजावें.

षेधेन ॥ अथेदानीं ह्रस्वत्वे कृते पुनःप्रसङ्ग-विज्ञानात्पुंवद्भावः कस्मान्न भवति । सकृद्गतौ विप्रतिषेधे यद्बाधितं तद्बाधितमेवेति ॥

**घरूपकल्पचेलड्ब्रुवगोत्रमतहतेषु ङ्योऽनेकाचो ह्रस्वः ॥ ६ । ३ । ४३ ॥**

ङीग्रहणं किमर्थम् । अनेकाचो ह्रस्व इतीयत्युच्यमाने खट्वातरा मालातरा अत्रापि प्रसज्येत । नैतदस्ति प्रयोजनम् । भाषितपुंस्कादिति वर्तते ॥ एवमपि दत्तातरा गुप्तातरा अत्रापि प्राप्नोति । ईत इति वर्तते ॥ एवमपि ग्रामणीतरः सेनानीतरः अत्रापि प्राप्नोति । स्त्रियामिति वर्तते ॥ एवमपि ग्रामणीतरा सेनानीतरा अत्रापि प्राप्नोति । स्त्रियाः स्त्रियामिति वर्तते ॥ शेषप्रक्लृप्त्यर्थं तर्हि ङीग्रहणं कर्तव्यम् । नद्याः शेषस्यान्यतरस्याम् [ ६ ३. ४४ ] इति । कश्च शेषः । अङी च या नदी ङ्यन्तं च यदेकाच् ॥ अन्तरेणापि ङीग्रहणं प्रक्लृप्तः शेषः । कथम् । ईत इति वर्तते ।

---

आतां येथें ऱ्हस्व केला असतां 'पुनःप्रसङ्गविज्ञान' न्यायानें ( १।४।२ भाष्य भाग २ पृ. ११४ ) पुंवद्भाव कां बरें होत नाहीं ?

'परत्वास्तव ज्याचा एकदां बाध केला त्याचा बाधच कायम होतो' या सकृद्गतिन्यायानें पुनः पुंवद्भाव होत नाहीं.

( सू. ४३ ) येथें ङ्यः असें ङी-ग्रहण कशाकरितां केलें आहे ?

अनेकाचो ह्रस्वः इतकेंच म्हटलें तर खट्वातरा व मालातरा येथें अकारालाही ऱ्हस्व होऊं लागेल.

हें ङीग्रहणाचें प्रयोजन नाहीं. कारण 'भाषितपुंस्कात्' असें म्हटलें आहे.

तरी पण दत्तातरा व गुप्तातरा येथें ह्रस्व प्राप्त होत आहे.

'ईतः' याची अनुवृत्ति येत आहे. त्यामुळें तेथें ऱ्हस्व होणार नाहीं.

तरी देखील ग्रामणीतरः सेनानीतरः येथें ऱ्हस्व प्राप्त होत आहे. 'स्त्रियामपूरणी०' (६।३।३४ ) येथून 'स्त्रियाम्' या पदाची अनुवृत्ति येत आहे. तरी देखील ग्रामणीतरा सेनानीतरा येथें प्राप्त होत आहे.

स्त्रियाः व स्त्रियाम् या दोन्ही पदांची अनुवृत्ति येत आहे.

तर मग 'नद्याः शेषस्यान्यतरस्याम्' या पुढील सूत्रामध्यें शेष पदाचा अर्थ ठरण्याकरितां येथें ङीग्रहण केलें आहे.

तर मग तेथें शेष पदाचा अर्थ काय होतो ?

ङीभिन्न नदी आणि ङ्यन्त एकाच् हा तेथें शेष होय.

पण येथें ङीग्रहण केल्यावांचून हा ( वरतीं दिलेला ) शेष या पदाचा अर्थ घेतां येईल.

---

१. ( सू. ४३ ) भाषितपुंस्क शब्दाच्या पुढील जो ङी प्रत्यय तो शेवटीं असलेल्या अनेकाच् शब्दांतील शेवटच्या ईकाराला ऱ्हस्व होतो, तरप्, तमप्, रूप, कल्प हे प्रत्यय किंवा चेलट्, ब्रुव, गोत्र, मत आणि हत हे शब्द उत्तरपद पुढें असतांना. उदाहरणार्थ– ब्राह्मणितरा.

२. 'तर' प्रत्यय हा स्वार्थी होत असल्यामुळें येथें तो स्त्रीत्वद्योतक आहे असें म्हणतां येतें.

३. स्त्रियाः याचा ईतः याचेकडे संबंध होऊन स्त्री-प्रत्यय जो ईकार तदन्त असा अर्थ होतो. ग्रामणी शब्द येथें जरी स्त्रीलिंगी घेतला तरी तो स्त्रीप्रत्ययान्त नाहीं म्हणून ऱ्हस्व होत नाहीं.

४. उक्तात् अन्यः शेषः म्हणजे पूर्वी सांगितलेल्याहून निराळ्याला शेष म्हणतात. येथें 'ङ्यः अनेकाचः' असें म्हटलें आहे. तेव्हां त्याहून निराळा म्हणजे ङ्यन्त नव्हे असा अनेकाच् नदी शब्द आणि अनेकाच् नव्हे असा ङ्यन्त नदी शब्द ह्या दोन्ही प्रकारच्या शब्दांचें तेथें 'नद्याः शेषस्य' यानें ग्रहण होतें.

अनीच्च या नदीदन्तं च यदेकाच् ॥ शेषग्रहणमपि शक्यमकर्तुम्। कथम्। अविशेषेण घादिषु नद्या अन्यतरस्यां ह्रस्वत्वमुत्सर्गः। अस्यानेकाचो नित्यं ह्रस्वत्वमपवादः। तस्मिन्नित्ये प्राप्त उगितो विभाषारभ्यते ॥ यद्येवं लक्ष्मितरा तन्त्रितरा इति न सिध्यति लक्ष्मीतरा तन्त्रीतरेति प्राप्नोति। इष्टमेवैतत्संगृहीतम्। लक्ष्मीतरा तन्त्रीतरेत्येव भवितव्यम्। एवं हि सौनागाः पठन्ति। घादिषु नद्या ह्रस्वत्वे कृन्नद्याः प्रतिषेध इति ॥

## [ नद्याः शेषस्यान्यतरस्याम् ॥ ६ । ३ । ४४ उगितश्च ॥ ६ । ३ । ४५ ॥ ]

इति श्रीभगवत्पतञ्जलिविरचिते व्याकरणमहाभाष्ये षष्ठस्याध्यायस्य तृतीये पादे द्वितीयमाह्निकम्।

---

तो कसा ?

असा कीं येथें 'ईतः' याची अनुवृत्ति आहे. तेव्हा स्त्रीप्रत्यय-ईकारान्त-भिन्न नदी आणि स्त्रीप्रत्यय-ईकारान्त एकाच् असा अर्थ तेथें 'शेष' या पदाचा होईल.

'नद्याः शेषस्या०' येथे शेषग्रहणही करावयास नको.

तें कसें ?

अनेकाचः आणि ईतः यांना संबंध न करतां फक्त घ, रूप वगैरे पुढें असतांना स्त्रीप्रत्ययान्त नदीसंज्ञकाला विकल्पानें ऱ्हस्व होतो असें सामान्यतः पुढील सूत्रानें सांगून त्याचा अपवाद असा प्रकृत सूत्रानें स्त्रीप्रत्यय-ईकारान्त अनेकाचाला नित्य ऱ्हस्व सांगावा व तो नित्य ऱ्हस्व प्राप्त असतां उक् इत् असेल त्या ठिकाणीं 'उगितश्च' (६।३।४५) यानें विकल्प सांगावा म्हणजे सर्व सिद्ध होईल.

असें आहे तर मग लक्ष्मितरा व तन्त्रितरा हीं रूपें साधणार नाहींत, लक्ष्मीतरा व तन्त्रीतरा अशींच रूपें होतील.

अरे, हा दोषच नव्हे. जें पाहिजे तेंच हें होत आहे. कारण लक्ष्मीतरा व तन्त्रीतरा अशींच रूपें येथें होतात. कारण, सौनाग वैयाकरण असें म्हणतात कीं कृत् प्रत्ययांतील ईकार शेवटीं असलेल्या नदीसंज्ञक शब्दाला ऱ्हस्व होत नाहीं.

याप्रमाणें श्रीभगवान् पतञ्जलि ऋषींनीं रचिलेल्या व्याकरणमहाभाष्यातील सहाव्या अध्यायाच्या तिसऱ्या पादांतील दुसरें आन्हिक समाप्त झालें.

---

५. तात्पर्य, येथें ङी-ग्रहण करावयास नको.

६. प्रकृत सूत्रामध्यें ङ्यः हे पद होतें तेव्हां मागून स्त्रियाः या पदाची अनुवृत्ति ह्या ऱ्हस्व-प्रकरणामध्यें मुळींच नव्हती. म्हणून पुढील सूत्रानें लक्ष्मी व तन्त्री येथे स्त्रीप्रत्यय ईकार नसला तरी ऱ्हस्व प्राप्त होतो. आणि स्त्रियाः या पदाची अनुवृत्ति केली म्हणजे लक्ष्मी व तन्त्री या शब्दांना ऱ्हस्व होणार नाहीं.

१. ( सू. ४४ ) ज्या ठिकाणीं पूर्वसूत्राची प्राप्ति नाहीं अशा नदीसंज्ञक शब्दाला तरप्, तमप् वगैरे प्रत्यय किंवा चेलट् वगैरे उत्तरपद पुढें असतांना विकल्पानें ऱ्हस्व होतो. उदाहरणार्थ-ब्रह्मबन्धूतरा, ब्रह्मबन्धुतरा; स्त्रीतरा, स्त्रितरा. ङयन्तभिन्न अनेकाच् आणि ङयन्त एकाच् या दोन ठिकाणीं पूर्वसूत्राची प्राप्ति येत नाहीं.

१. ( सू. ४५ ) उक् म्हणजे उ, ऋ किंवा ऌ. यांपैकीं कोणताही स्वर इत्संज्ञक असलेल्या प्रत्यय वगैरेंच्या पुढील जो नदीसंज्ञक वर्ण तो शेवटी असलेल्या स्त्रीलिंगी शब्दांतील शेवटच्या वर्णाला विकल्पानें ऱ्हस्व होतो तरप् तमप् वगैरे प्रत्यय पुढें असतांना. उदाहरणार्थ- विदुषितरा, विदुषीतरा. येथें विद् धातूहून वसु प्रत्यय ( ७।१।३६ ) केला आहे. त्याचा उकार हा उक् इत्संज्ञक आहे, त्यानंतर ङीप् झाला आहे ( ४।१।६ ) व पुढें तरप् प्रत्यय झाला आहे.

अ. ६ पा. ३ आह्निक २ समाप्त.

**आन्महतः समानाधिकरणजातीययोः ॥ ६ । ३ । ४६ ॥**[1]

इह कस्मान्न भवति । अमहान्महान्संपन्नो महद्भूतश्चन्द्रमा इति ।

**अन्यप्रकृतिस्त्वमहान्**
**भूतप्रकृतौ महान्महत्येव ।**

अन्यो महान् । अन्योऽमहान्भूतप्रकृतौ वर्तते । महान्महत्येव ॥

**तस्मादात्त्वं न स्यात्**

तस्मादात्त्वं न भविष्यति ॥

**पुंवत्तु कथं भवेदत्र ॥ १ ॥**

पुंवद्भावोऽपि तर्हि न प्राप्नोति । अमहती महती संपन्ना महद्भूता ब्राह्मणी ॥ एवं तर्हि

**अमहति महान्हि वृत्तस्तद्वाची चात्र भूतशब्दोऽयम् ।**

अमहति महच्छब्दो वर्तते तद्वाची चात्र भूतशब्दः प्रयुज्यते । किंवाची । महद्वाची ॥

**तस्मात्सिध्यति पुंवत्**

तस्मात्सिध्यति पुंवद्भावः ॥ यद्येवमात्त्वमपि प्राप्नोति । महद्भूतश्चन्द्रमाः ।

**निवर्त्यमात्त्वं तु मन्यन्ते ॥ २ ॥**

आत्त्वमपि प्राप्नोति ॥ नैष दोषः । कथम् ।

**यस्तु महतः प्रतिपदं**
**समास उक्तस्तदाश्रयं ह्यात्त्वम् ।**
**कर्तव्यं मन्यन्ते**
**न लक्षणेन लक्षणोक्तश्चायम् ॥ ३ ॥**

एवं तर्हि लक्षणप्रतिपदोक्तयोः प्रतिपदो-

---

( सू. ४६ ) अमहान् महान् संपन्नः, महद्भूतश्चन्द्रमाः यथ प्रकृत सूत्रानें आत्व कां बरें होत नाहीं ?

( श्लो. १ ) महान् निराळा आणि अमहान् निराळा. तो अमहान् हा आपणाहून अन्य अशी जी आपली महान् ही विकृति त्याची प्रकृति होय. तो अमहान् हाच भूत या अर्थाशीं समानाधिकरण होत आहे[2]; आणि महत् हा शब्द महान् या आपल्या अर्थीच आहे. म्हणून महद्भूतः येथें आत्व होणार नाहीं.

तर मग अमहती महती संपन्ना या अर्थी 'महद्भूता ब्राह्मणी' येथें पुंवद्भावही होणार नाहीं.

असें आहे तर मग—

( श्लो. २ ) अमहान् या अर्थाचा महान् हा शब्द आहे आणि त्याच अर्थाचा हा 'भूत' शब्द आहे.

त्याच अर्थाचा म्हणजे कोणत्या अर्थाचा ?

महान् या अर्थाचा[3]. म्हणून महद्भूता येथें पुंवद्भाव साधत आहे.

असें आहे तर मग महद्भूतश्चन्द्रमाः येथें आत्वही होऊं लागेल.

आत्वाची आपत्ति दूर करण्यासारखी असल्यामुळें हा दोष येत नाहीं.

तो कसा ?

( श्लो. ३ ) लाक्षणिक व प्रतिपदोक्त या दोघांमध्यें प्रतिपदोक्ताचेंच ग्रहण करावें

---

१. (सू. ४६) महत् शब्दाच्या तकाराला 'आ' असा आदेश होतो समानाधिकरण उत्तरपद पुढें असतांना किंवा जातीय प्रत्यय पुढें असतांना. उदाहरणार्थ— महादेवः; महाजातीयः.

२. 'अत्वं त्वं संपद्यते' येथें अत्वम् या प्रकृतीशीं संपद्यते याचें सामानाधिकरण्य असल्यामुळें प्रथमपुरुष झाला आहे. तसेंच संधीभवन्ति ब्राह्मणाः येथें ब्राह्मण या प्रकृतीशीं सामानाधिकरण्य असल्यामुळे भवन्ति येथें बहुवचन झालें आहे.

३. प्रकृति आणि विकार यांचें ऐक्य असल्यामुळें भूत शब्दाशीं महान् याचेंही सामानाधिकरण्य आहे. सुवर्णकुण्डले भवतः येथें कुण्डल या विकाराशीं सामानाधिकरण्य गृहीत धरूनच भवतः हें द्विवचन केलें आहे.

क्तस्यैवेति प्रतिपदं यः समासो विहितस्तस्य ग्रहणं लक्षणोक्तश्चायम् ॥ इहापि तर्हि न प्राप्नोति । महान्बाहुरस्य महाबाहुः ।

शेषवचनात्तु योऽसौ
प्रत्यारम्भात्कृतो बहुव्रीहिः ।
तस्मात्सिध्यति तस्मिन्

यस्माच्शेषो बहुव्रीहिः [ २. २. २३ ] इति सिद्धे ऽनेकमन्यपदार्थे [ २४ ] इत्याह तेन प्रतिपदं भवति ॥

प्रधानतो वा यतो वृत्तिः ॥ ४ ॥

अथवा गौणमुख्ययोर्मुख्ये कार्यसंप्रत्ययः । तद्यथा । गौरनूबन्ध्योऽजोऽग्नीषोमीय इति न वाहीकोऽनुबध्यते । कथं तर्हि वाहीके वृद्ध्यात्त्वे भवतः । गौस्तिष्ठस्ति । गामानयेति । अर्थाश्रय एतदेवं भवति । यद्धि शब्दाश्रयं शब्दमात्रे तद्भवति । शब्दाश्रये च

---

या परिभाषेनें महत् शब्दाचा 'सन्महत्परमो०' ( २।१।६१ ) यानें सांगितलेला जो प्रतिपदोक्त समास तेथेंच महत् शब्दाला आत्त्व करावयाचें असें म्हणतात. लाक्षणिक समास असेल तेथें आत्त्व करावयाचें नाहीं; आणि महद्भूतः येथें तर लाक्षणिक समास आहे. म्हणून आत्त्व होत नाहीं.

पण असें असेल तर महान् बाहुरस्य महाबाहुः येथेंही आत्त्व होणार नाहीं.

( श्लो ४ ) ज्या अर्थी शेषो बहुव्रीहिः ( २।२।२३ ) येथील 'शेष' ग्रहणानें सिद्ध होत असतांना 'अनेकमन्यपदार्थे' ( २।२।२४ ) येथें 'अनेकम्' असें पद मुद्दाम घातलें आहे त्या अर्थी तो बहुव्रीहि समास प्रतिपदोक्तासारखा समजला जातो. त्यामुळें महाबाहुः येथें आत्व सिद्ध होतें.

अथवा, ज्या शब्दापासून मुख्य रीतीनें अर्थ मनांत येतो अशाच महत् शब्दाला येथें आत्त्व होतें. कारण "गौण आणि मुख्य यांमध्यें मुख्याचे ठिकाणींच कार्याचा संबंध होतो" असा न्याय आहे. उदाहरणार्थ—बैलाचें अनुबन्धन करावें, किंवा अग्नीषोम देवतेला उद्देशून बोकड द्यावा, असें यज्ञामध्यें सांगितलें आहे. तेथें प्रत्यक्ष बैल व प्रत्यक्ष बोकडच आणिला जातो. एखाद्या अडाणी मनुष्याला लोकामध्यें 'हा बैल आहे' तसेंच 'हा शुद्ध बोकड आहे' असें म्हणण्याचा प्रघात असला तरी तसला मनुष्य तेथें आणिला जात नाहीं.

तर मग 'गौस्तिष्ठति' अथवा 'गामानय' असा जो प्रयोग त्या अडाणी मनुष्याला उद्देशून केला जातो तेथें गो शब्दाला वृद्धि तसेंच आत्व कसें बरें करण्यांत येतें ?

जें कार्य अर्थावर अवलंबून होत असेल तेथें तें कार्य मुख्य अर्थ असेल तरच होईल. पण जें शब्दावर अवलंबून कार्य होत असेल तें कार्य

---

४. महद्भूतः येथें महत् शब्दाहून अभूततद्भाव या अर्थी च्विप्रत्यय ( ५।४।५० ), गति संज्ञा ( १।४।६१ ), नंतर 'कुगति०' ( २।२।१८ ) यानें समास हीं कार्यें झालीं आहेत. 'सन्महत्०' (१।४।६१) यासारखा हा समास 'कुगति०' या सूत्रानें मुद्दाम सांगितलेला नाहीं.

५. प्रकृत शास्त्रामध्यें जर 'समास' हा शब्द असता तर तेथें प्रतिपदोक्तच समास घ्यावा असें 'लक्षणप्रतिपदोक्त०' परिभाषेनें म्हणतां आलें असतें. आतां येथें समास शब्दाचा अध्याहार केला तर मात्र ती परिभाषा घेतां येईल. परंतु त्यापेक्षां निराळ्याच रीतीनें भाष्यकार आत्वाचे निवारण करीत आहेत.

६. येथें मुख्य अर्थाचा गो शब्द नसल्यामुळे 'गोतो णित्' ( ७।१।९० ) हें शास्त्र येणार नाही व त्यामुळें वृद्धि ( ७।२।११५ ) होणार नाहीं. तसेंच गाम् येथें 'आ गोतोऽम् शसोः' ( ६।१।८३ ) यानें आत्व होणार नाहीं.

वृद्ध्यात्त्वे ॥

**महदात्त्वे घासकरविशिष्टेषूपसंख्यानं पुंवद्वचनं च नानाधिकरणार्थम् ॥ १ ॥**

महदात्त्वे घासकरविशिष्टेषूपसंख्यानं कर्तव्यं पुंवद्भावश्च नानाधिकरणार्थः कर्तव्यः । महत्या घासो महाघासः । महत्याः करो महाकरः । महत्या विशिष्टो महाविशिष्टः ॥

**अष्टनः कपाले हविषि ॥ २ ॥**

अष्टनः कपाले हविष्युपसंख्यानं कर्तव्यम् । अष्टाकपालं चरुं निर्वपेत् । हविषीति किमर्थम् । अष्टकपालं ब्राह्मणस्य ॥

**गवि च युक्ते ॥ ३ ॥**

गवि च युक्त उपसंख्यानं कर्तव्यम् । अष्टागवेन शकटेन । युक्त इति किमर्थम् । अष्टगवं ब्राह्मणस्य ॥

**द्व्यष्टनः संख्यायामबहुव्रीह्यशीत्योः ॥ ६ । ३ । ४७ ॥**

प्राक्शतादिति वक्तव्यम् । इह मा भूत् ।

---

फक्त तसा शब्द दृष्टीस पडला कीं तेथें होणारच. वृद्धि आणि आत्व हीं शब्दावर अवलंबून होणारींच कार्यें आहेत.

( वा. १ ) घास, कर, व विशिष्ट हे शब्द उत्तरपद पुढें असतांना महत् शब्दाच्या तकाराला आत्व होतें, आणि महती शब्दाला पुंवद्भावही होतो असें वचन करावें. समानाधिकरण उत्तरपद पुढें नसतांनाही आत्व व पुंवद्भाव होण्याकरिता हें वचन केलें आहे असें समजावें. उदाहरणार्थ–महत्याः घासः महाघासः; महत्याः करः महाकरः; महत्या विशिष्टः महाविशिष्टः

( वा. २ ) कपाल शब्द उत्तरपद पुढें असतांना अष्टन् शब्दाच्या नकाराला आत्व होतें हविर्द्रव्य वाच्य असतांना असें वचन करावें. उदा० अष्टाकपालः.

येथें हविषि असें कशाकरितां म्हटलें आहे? अष्टकपालं ब्राह्मणस्य येथें आत्व होऊं नये म्हणून म्हटलें आहे.

( वा. ३ ) गो शब्द पुढें असतांना आणि युक्त हा अर्थ गम्यमान असतांना अष्टन् शब्दाच्या नकाराला आत्व होतें असें वचन करावें. उदाहरणार्थ–अष्टागवं शकटम्.

येथें 'युक्ते' असें कशाकरितां म्हटलें आहे? अष्टगवं ब्राह्मणस्य येथे आत्व होऊं नये म्हणून.

( सू. ४७) 'प्राक् शतादिति वक्तव्यम्' म्हणजे

---

७. गोतो णित् येथें ओतो णित् असें म्हणावें असें सांगितलें आहे. आत्व सांगणाऱ्या शास्त्रामध्यें तर मूळचें पाणिनीनेंच 'ओतः' असें म्हटलें आहे. तेव्हां त्या ठिकाणीं ओतः या वर्णनिर्देशापासून ओकारान्त शब्द मनांत येतो. त्या शब्दाचा अर्थ तेथें मनांत येण्याचें कांहींच कारण नाहीं.

८. अष्टसु कपालेषु संस्कृतः म्हणजे आठ कपालांचे ठिकाणीं संस्कार केलेला जो पुरोडाश त्याला 'अष्टाकपाल' म्हणतात. येथें अष्टन् आणि कपाल या शब्दांचा तद्धितार्थीं द्विगु समास ( २।१।५१ ) करून पुढें तद्धित अण् प्रत्यय ( ४।२।१६ ) होऊन त्याचा लुक् ( ४।१।८८ ) झाला आहे.

९. अष्टानां कपालानां समाहारः अष्टकपालम् असा येथें समाहारी द्विगु समास झाला आहे.

१०. आठ बैलांनीं युक्त म्हणजे आठ बैल जोडलेला गाडा असा अर्थ येथें विवक्षित आहे. ज्या ठिकाणीं आठ बैलांचा समाहार एवढाच अर्थ विवक्षित असेल तेथें अष्टगवम् असेंच होतें.

१ ( सू. ४७ ) द्वि आणि अष्टन् या शब्दांच्या शेवटल्या वर्णाला आत्व होते संख्यावाचक शब्द उत्तरपद पुढें असतांना; पण बहुव्रीहि समास उपयोगी नाहीं आणि अशीति हा शब्द उत्तरपद उपयोगी नाहीं. उदाहरणार्थ–द्वादश, अष्टादश.

द्विशतम् द्विसहस्रम् । अष्टशतम् अष्टसहस्रम् ॥

[ त्रेस्त्रयः ॥ ६।३।४८ ॥ ]

**विभाषा चत्वारिंशत्प्रभृतौ सर्वेषाम् ॥ ६ । ३ । ४९ ॥**

सर्वेषांग्रहणं किमर्थम् । चत्वारिंशत्प्रभृतौ सर्वेषां विभाषा यथा स्याद् द्व्यष्टनोश्च त्रेश्च ॥ नैतदस्ति प्रयोजनम् । प्रकृतं द्व्यष्टन्ग्रहणमनुवर्तिष्यते । यदि तदनुवर्तते त्रेस्त्रयो द्व्यष्टनोश्चेति द्व्यष्टनोरपि त्रय आदेशः प्राप्नोति । नैष दोषः । मण्डूकगतयोऽधिकाराः । यथा मण्डूका उत्प्लुत्योत्प्लुत्य गच्छन्ति तद्वदधिकाराः । अथवैकयोगः करिष्यते । द्व्यष्टनः संख्यायामबहुव्रीह्यशीत्योस्त्रेस्त्रयः । ततो विभाषा चत्वारिंशत्प्रभृतौ सर्वेषाम् । अथवोभयं निवृत्तं तदपेक्षिष्यामहे ॥

---

शत शब्दाच्या मागील शब्दापर्यंतच संख्यावाचक शब्द पुढें असतांना आत्व होतें असें वचन करावें. कारण, द्विशतम्, द्विसहस्रम्, अष्टशतम्, अष्टसहस्रम्, येथें आत्व न झालें पाहिजे.

( सू. ४९ ) येथें 'सर्वेषाम्' हा शब्द कशाकरितां घातला आहे ?

" विभाषा चत्वारिंशत्०" येथें सर्वेषाम् हा शब्द घातला आहे तो द्वि, अष्टन् आणि त्रि या सर्वांना सांगितलेलें कार्य विकल्पानें व्हावें म्हणून घातला आहे.

हें प्रयोजन नाहीं. कारण 'त्रेः' या पदाप्रमाणें मागें असलेल्या 'द्व्यष्टनः' या पदाचीही अनुवृत्ति केली जाईल.

पण जर अनुवृत्ति केली तर 'त्रेस्त्रयः' ( ६।३।४८ ) येथेंही त्याचा संबंध करणें जरूर असल्यामुळे त्रिशब्दाप्रमाणें द्वि, व अष्टन् या शब्दांनाही त्रयस् आदेश होऊं लागेल.

हा दोष येत नाहीं.

कारण मंडूकाप्रमाणें अधिकारांची गति असते. म्हणजे मंडूक जसें उड्या मारीत चालतात[2] तसें अधिकारही चालतात.

अथवा 'द्व्यष्टनः संख्यायामबहुव्रीह्यशीत्योस्त्रेस्त्रयः' असें एकच सूत्र केले जाईल. त्याचे पुढें 'विभाषा चत्वारिंशत्प्रभृतौ सर्वेषाम्' हें सूत्र होय. एकाच सूत्रामध्यें पूर्ववाक्यातील पदाचा पुढील वाक्यामध्यें संबंध होतोच असा नियम नाहीं.

अथवा त्रेः आणि द्व्यष्टनः या दोन्ही पदांचा येथें प्रत्यक्ष संबंध करूं नये. तर 'चत्वारिंशत् वगैरे शब्द पुढें असतांना विकल्पानें होतो' एवढाच वाक्यार्थ येथें झाला तरी 'काय विकल्पानें होतें' अशी आकांक्षा उत्पन्न झाली असतांना येथें चत्वारिंशत् वगैरे शब्द हे संख्यावाचक असल्यामुळें संख्याशब्द पुढें असतांना जें जें कार्य पूर्वी सांगितलें असेल तें तें विकल्पानें होतें असें अर्थातच येथें समजतां येईल.

---

१. ( सू. ४८. ) त्रि शब्दाला त्रयस् असा आदेश होतो संख्यावाचक शब्द उत्तरपद पुढें असतांना, पण बहुव्रीहि समास उपयोगी नाहीं आणि अशीति शब्द उत्तरपद उपयोगी नाहीं. उदाहरणार्थ- त्रयोदश.

१ ( सू. ४९ ) द्वि आणि अष्टन् या शब्दांच्या शेवटच्या वर्णाला आत्व आणि त्रि शब्दाला त्रयस् आदेश विकल्पानें करावे, चत्वारिंशत्, पञ्चाशत्, षष्टि, सप्तति, आणि नवति हे शब्द पुढें असतांना; पण बहुव्रीहि समास उपयोगी नाहीं. उदाहरणार्थ-द्विचत्वारिंशत्, द्वाचत्वारिंशत्.

२. तेव्हां 'द्व्यष्टनः' या पदाचा मध्यें संबंध न होतां उडी मारून एकदम येथें संबंध होईल.

## [1]हृदयस्य हृल्लेखयदण्लासेषु ॥ ६ । ३ । ५० ॥

यदण्ग्रहणमिदं प्रत्ययग्रहणं तत्र प्रत्ययग्रहणे यस्मात्स तदादेर्ग्रहणं भवतीति यदणन्ते प्राप्नोति ।

### यदण्ग्रहणे रूपग्रहणं लेखग्रहणात् ॥ १ ॥

यदण्ग्रहणे रूपग्रहणं द्रष्टव्यम् । कुतः । लेखग्रहणात् । यदयं लेखग्रहणं करोति तज्ज्ञापयत्याचार्यो न यदणन्ते भवतीति ॥

अपर आह । अत्यल्पमिदमुच्यते । सर्वत्रैवोत्तरपदाधिकारे प्रत्ययग्रहणे रूपग्रहणं द्रष्टव्यम् । कुतः । लेखग्रहणादेव । किं प्रयोजनम् । कुमारी गौरितरा । घादिषु नद्या ह्रस्वो भवतीति ह्रस्वत्वं प्रसज्येत ॥ यद्येतज्ज्ञाप्यते खित्यनव्ययस्य [ ६. ३. ६६ ] इति खित्येवानन्तरस्यानव्ययस्य ह्रस्वत्वं प्राप्नोति । खित्यनन्तरो ह्रस्वभावी नास्तीति कृत्वा खिदन्ते भविष्यति । ननु

---

( सू. ५० ) येथें यत् आणि अण् हे प्रत्यय आहेत. तेव्हां ' प्रत्ययाचें ग्रहण असेल तेथें तो प्रत्यय ज्या प्रकृतीहून केला असेल ती प्रकृति आरंभीं असलेला व तो प्रत्यय शेवटीं असलेला असा जो शब्दसमुदाय त्याचें ग्रहण करावें ' या परिभाषेनें यत्प्रत्ययान्त आणि अण्प्रत्ययान्त पुढें असताना त्याच्या मागील हृदय शब्दाला हृद् आदेश होऊं लागेल.

( वा. १ ) यत् व अण् या शब्दांमुळें यत् आणि अण् यांच्या फक्त स्वरूपाचेंच येथें ग्रहण करावयाचें आहे.

कशावरून ?

अशावरून कीं ज्या अर्थी हे आचार्य पाणिनि लेख शब्दाचें ग्रहण करीत आहेत त्या अर्थी यत्प्रत्ययान्त आणि अण्प्रत्ययान्त पुढें असतांना हें सूत्र प्रवृत्त होत नाहीं असें ते ज्ञापन करीत आहेत.

येथें अन्य वैयाकरण असें म्हणतात कीं हें असें ज्ञापक अत्यन्त संकुचित होत आहे; तर या उत्तरपदाधिकारामध्यें सर्वच ठिकाणीं प्रत्ययाचें ग्रहण केलें असतां तेथें फक्त त्या प्रत्ययाचें स्वरूप तेवढेंच घ्यावें.

कशावरून ?

येथील लेखग्रहणावरूनच ही गोष्ट सिद्ध होते.

याचें काय प्रयोजन ?

कुमारी गौरितरा येथें कुमारी शब्दाला ' घरूप० ' ( ६।३।४३ ) यानें ह्रस्व प्रसक्त होत आहे तो होत नाहीं.

पण जर असें सर्वसाधारण ज्ञापन केलें तर ' खित्यनव्ययस्य ' ( ६।३।६६ ) यानें खित् प्रत्यय पुढें असतांना त्या प्रत्ययाच्या मागील अव्ययभिन्न अशा जवळच्या वर्णाला ह्रस्व प्रसक्त होत आहे असा दोष येतो.

पण खित् प्रत्यय पुढें असतांना त्याच्या मागें अव्यवहित असा ह्रस्व होण्यास लायक वर्ण कोठेंच मिळत नसल्यामुळें अर्थात् खित्-प्रत्ययान्त उत्तरपद पुढें असतांना ह्रस्व होईल.

---

१. ( सू. ५० ) अण्-प्रत्ययान्त लेख हा शब्द, यत् प्रत्यय, अण् प्रत्यय आणि लास शब्द हे पुढें असतांता हृदय शब्दाला हृद् असा आदेश होतो. उदाहरणार्थ-हृदयं लिखतीति हृल्लेखः ( ३।२।१ ), हृदयस्य प्रियम् हृद्यम् ( ४।१।९५ ) हृदयस्येदं हार्दम् ( ४।३।१२० ), हृदयस्य लासो हृल्लासः.

चायमस्ति स्तनंधय इति । अत्रापि शपा व्यवधानम् । एकादेशे कृते नास्ति व्यवधानम् । एकादेशः पूर्वविधौ स्थानिवद्भवतीति स्थानिवद्भावाद्व्यवधानमेव । अथवैतदेव ज्ञापयति खिदन्ते ह्रस्वो भवतीति यदयमनव्ययस्येति प्रतिषेधं शास्ति । न हि खित्यनन्तरमव्ययमस्ति ॥

**[ वा[1] शोकष्यञ्रोगेषु ॥ ६ । ३ । ५१ ॥ ]**

**पादस्य[1] पदाज्यातिगोपहतेषु ॥ ६ । ३ । ५२ ॥**

**पदादेशेऽन्तोदात्तनिपातनं**

पदादेशेऽन्तोदात्तनिपातनं कर्तव्यम् । किं प्रयोजनम् ।

**पदोपहतार्थम् ॥ १ ॥**

पादेनोपहतं पदोपहतम् । तृतीया कर्मणि [ ६. २. ४८ ] इति प्रकृतिस्वरत्वे पूर्वपदान्तोदात्तत्वं यथा स्यात् ॥

**उपदेशिवद्वचनं च स्वरसिद्ध्यर्थम् ॥ २ ॥**

उपदेशिवद्भावश्च कर्तव्यः । किं प्रयोजनम् । स्वरसिद्ध्यर्थम् । उपदेशावस्थाया-

---

पण स्तनंधय[2]: येथें खित् प्रत्यय पुढें असतांना त्याच्या मागें जवळच ऱ्हस्व होण्यास लायक असा धे धातु आहे ना ?

येथेंही खित् प्रत्यय आणि एकार यांमध्यें शप् प्रत्ययानें व्यवधान आहेच.

पण पररूप एकादेश केला असतांना व्यवधान नाहीं ना ?

पूर्वाला विधि कर्तव्य असतांना एकादेशाला स्थानिवद्भाव ( १।१।५७ ) होत असल्यामुळें व्यवधान कायम आहेच.

किंवा, ज्या अर्थी आचार्य पाणिनि हे 'अनव्ययस्य' असा अव्ययाचा प्रतिषेध करीत आहेत त्या अर्थी खित् प्रत्यय पुढें असतांना त्याच्या मागील जवळच्या वर्णाला ऱ्हस्व होत नाहीं असें ते ज्ञापन करीत आहेत. कारण, खित् प्रत्ययाच्या मागें अव्यवहित अव्यय संभवतच नाहीं.

( सू ५२ वा. १ ) या पद आदेशाचे ठिकाणीं अन्तोदात्ताचें निपातन करावें.

त्याचें काय प्रयोजन ?

पादेन उपहतं पदोपहतम् येथें 'तृतीया कर्मणि' ( ६।२।४८ ) यानें पूर्वपदप्रकृतिस्वरानें पूर्वपदाला अन्तोदात्त व्हावा म्हणून.

( वा. २ ) आणि हा अन्तोदात्त उपदेशावस्थेमध्यें म्हणजे विग्रहवाक्यामध्येंच होतो असें म्हणावें.

त्याचा काय उपयोग ?

पदाजिः व पदातिः येथें उपदेशावस्थेमध्येंच हा अन्तोदात्त केला असतां समासाला प्राप्त

---

२ स्तन शब्द उपपद असतांना धे धातूहून खश् प्रत्यय ( ३।२।२९ ), मध्यें शप् प्रत्यय ( ३।१।६८ ), एकाराला अय् आदेश ( ६।१।७८ ) आणि शप् प्रत्ययाचा अकार व खश् प्रत्ययाचा अकार या दोघाचे स्थानीं पररूप ( ६।१।९७ ) अशीं कार्यें झालीं आहेत.

३ तर, खित्-प्रत्ययान्त पुढें असतांनाच होतो.

१ ( सू. ५१ ) शोक शब्द, ष्यञ् प्रत्यय, आणि रोग शब्द हे पुढें असतांना हृदय शब्दाला हृत् असा आदेश विकल्पानें होतो. उदा०—हृच्छोकः, हृदयशोकः, सौहार्दम्, सौहृदय्यम्. सौहार्दम् येथें ष्यञ् प्रत्यय ( ५।१।१२४ ) आणि दोन्ही पदांना वृद्धि ( ७।३।१९ ) झाली आहे.

१ ( सू. ५२ ) पाद शब्दाला पद् आदेश होतो आजि, आति, ग आणि उपहत हे शब्द उत्तरपद पुढें असतांना. उदाहरणार्थ–पादाभ्यामजतीति पदाजिः. येथें अज धातूहून इण् प्रत्यय ( उणा. ४।१३१ ) झाला आहे.

मन्तोदात्तनिपातने कृते समासस्वरेण बाधनं यथा स्यात् । पदाजिः पदातिः ॥

**पद्यत्यतदर्थे ॥ ६ । ३ । ५३ ॥**

**पद्भाव इके चरतावुपसंख्यानम् ॥१॥**

पद्भाव इके चरतावुपसंख्यानं कर्तव्यम् । पादाभ्यां चरति पदिकः ॥

**[ हिमकाषिहतिषु च ॥ ६ । ३ । ५४ ॥**

**ऋचः शे ॥ ६ । ३ । ५५ ॥ ]**

**वा घोषमिश्रशब्देषु ॥ ६ । ३ । ५६ ॥**

निष्के चोपसंख्यानं कर्तव्यम् । पन्निष्केण पादनिष्केण ॥

**उदकस्योदः संज्ञायाम् ॥ ६ । ३ । ५७ ॥**

**संज्ञायामुत्तरपदस्य च ॥ १ ॥**

संज्ञायामुत्तरपदस्येति वक्तव्यम् । इहापि यथा स्यात् । क्षीरोदः लोहितोदः ॥

**[ पेषंवासवाहनधिषु च ॥ ६ । ३ । ५८ ॥ ]**

**एकहलादौ पूरयितव्ये ऽन्यतरस्याम् ॥ ६ । ३ । ५९ ॥**

एकहलादाविति किमर्थम् । उदकस्थालम् ॥ उच्यमानेऽप्येतस्मिन्नत्र प्राप्नोति ।

---

होणाऱ्या 'गतिकारको०' (६।२।१३९) या कृदुत्तरपदप्रकृतिस्वरानें अन्तोदात्ताचा बाध व्हावा म्हणून.

(सू. ५३ वा. १) चरति या अर्थाचा इक प्रत्यय (४।४।१०) पुढें असतांनाही पाद या शब्दाला हा पत् आदश होतो असें म्हणावें. उदाहरणार्थ—पादाभ्यां चरति पदिकः.

(सू. ५६) निष्क शब्द पुढें असतांना पद् आदेश होतो असें वचन करावें. उदाहरणार्थ—पन्निष्केण, पादनिष्केण.

(सू. ५७ वा. १) संज्ञा-शब्दामध्यें उत्तरपद असताही उदक शब्दाला उद आदेश होतो असें वचन करावें. कारण, लोहितोदः व क्षीरोदः येथेंही उद आदेश झाला पाहिजे.

(सू. ५९) येथें एकहलादौ असें कशाकरितां म्हटलें आहे ?

उदकस्थालम् येथें उद आदेश न व्हावा म्हणून म्हटलें आहे.

---

१ (सू. ५३) पाद शब्दाला पद् असा आदेश होतो यत् प्रत्यय पुढें असतांना. पण तो यत् प्रत्यय तादर्थ्य या अर्थी (५।४।२४) केलेला नसावा. उदाहरणार्थ-पादौ विध्यन्ति पद्याः शर्कराः (४।४।८३).

१ (सू. ५४) हिम, काषिन् आणि हति हे शब्द उत्तरपद पुढें असतांना पाद शब्दाला पद् आदेश होतो. उदाहरणार्थ—पद्धिमम्, पत्काषी, पद्धतिः

१ (सू. ५५) ऋचेचा पाद या अर्थाच्या पाद शब्दाला पद् आदेश होतो श प्रत्यय पुढें असतांना. उदाहरणार्थ— पच्छः गायत्रीं शंसति. पच्छः येथें पाद शब्दाहून शस् प्रत्यय (५।४।४३) झाला आहे.

१ (सू. ५६) घोष, मिश्र आणि शब्द हे शब्द उत्तरपद पुढें असतांना पाद शब्दाला पद् आदेश विकल्पानें होतो. उदा०— पद्घोषः, पादघोषः.

१ (सू. ५७) संज्ञाशब्दामध्यें उदक शब्दाला उद असा आदेश होतो उत्तरपद पुढें असतांना. उदा०— उदमेघः, उदवाहः. हीं ऋषींचीं नावें आहेत.

१ (सू. ५८) पेषम्, वास, वाहन आणि धि हे शब्द उत्तरपद पुढें असतांना उदक शब्दाला उद आदेश होतो. उदा०— उदपेषं पिनष्टि. येथें णमुल् प्रत्यय (३।४।३८) झाला आहे.

१ (सू. ५९) जो पदार्थ पाण्यानें भरतां येतो त्या पदार्थाचें वाचक आणि एकटेंच व्यंजन आरंभीं असलेलें असें उत्तरपद पुढें असतांना उदक शब्दाला उद आदेश विकल्पानें होतो. उदा०-उदकुम्भः, उदककुम्भः.

एतदप्येकहलादि । किं कारणम् । एकैकवर्णवर्तित्वाद्वाच उच्चरितप्रध्वंसित्वाच्च वर्णानाम् । एकैकवर्णवर्तिनी वाक् । न द्वौ वर्णौ युगपदुच्चारयति । तद्यथा । गौरित्युक्ते यावद्गकारे वाक्प्रवर्तते तावन्नौकारे न विसर्जनीये यावदौकारे न गकारे न विसर्जनीये यावद्विसर्जनीये न गकारे नौकारे । उच्चरितप्रध्वंसित्वाच्च वर्णानाम् । उच्चरितः प्रध्वस्तश्च । अथापरः प्रयुज्यते न वर्णो वर्णस्य सहायः ॥ एवं तर्ह्येकहलादावित्युच्यते सर्वश्चैकहलादिस्तत्र प्रकर्षगतिर्विज्ञास्यते । साधीयो य एकहलादिरिति । कश्च साधीयः । यत्रैकं हलमुच्चार्याजुच्चार्यते ॥

**[ [१]मन्थौदनसक्तुबिन्दुवज्रभारहारवीवधगाहेषु च ॥ ६।३।६० ॥ ]**

**इको ह्रस्वोऽङ्यो गालवस्य ॥ ६ । ३ । ६१ ।**

**इको ह्रस्वत्वमुत्तरपदमात्रे ॥ १ ॥**

इको ह्रस्वत्वमुत्तरपदमात्रे वक्तव्यम् । इहापि यथा स्यात् । अलाबुकर्कन्धुदृन्भुफलमिति ॥ किं पुनः कारणं न सिध्यति ।

---

एकहलादौ असें म्हटलें तरीही येथें उद आदेश प्राप्त होत आहेच. कारण, स्थाल हा शब्द एकहलादि असाच आहे.

तो कसा ?

एकैकवर्णवर्तित्वाद्वाचः । उच्चरितप्रध्वंसित्वाच्च वर्णानाम् । म्हणजे वाणीनें एकेकच वर्ण उच्चारिला जातो; एकदम अनेक वर्ण वाणीकडून उच्चारले जात नाहींत. उदाहरणार्थ– गौः असें उच्चारण केलें असतां जेव्हां गकार उच्चारण्याविषयीं वाणी प्रवृत्त होते तेव्हां औकार किंवा विसर्ग यांच्या उच्चाराविषयीं वाणीची प्रवृत्ति नसते, व जेव्हां औकार उच्चारण्याविषयीं वाणीची प्रवृत्ति होते तेव्हां गकार व विसर्ग यांच्या उच्चाराविषयीं तिची प्रवृत्ति नसते. तसेंच, जेव्हां विसर्गाच्या उच्चाराविषयीं वाणीची प्रवृत्ति होते तेव्हां गकार व औकार यांच्या उच्चारांविषयीं तिची प्रवृत्ति होत नाहीं. शिवाय, वर्ण हा उच्चारल्याबरोबर लागलींच नाश पावतो, त्यानंतर दुसरा वर्ण उच्चारिला जातो. तेव्हां कोणत्याही एका वर्णाला जोडीदार दुसरा वर्ण आहे असें म्हणतां येत नाहीं.[२]

याचें उत्तर असें कीं–एकहलादौ असें तर येथें म्हटलें आहे. आणि सवच शब्द एकहलादि आहेत. तेव्हां एकहलाविषयीं प्रकर्षगति म्हणजे उत्कृष्ट जो एकहलादि असें समजलें जाईल.

आतां उत्कृष्ट एकहलादि असा कोण ?

जेथें एक हल् उच्चारून त्याचें पुढें दुसरा अच् उच्चारिला जातो तो उत्कृष्ट एकहलादि होय.

( सू. ६१ वा. १ ) कोणत्याही प्रकारचें उत्तरपद पुढें असतांना इकाला ऱ्हस्व होतो असें वचन करावें. कारण अलाबुकर्कन्धुदृन्भुफलम्, येथें अलाबू व कर्कन्धू यांना ह्रस्व झाला पाहिजे.

---

२ तात्पर्य, प्रत्येक वर्ण एकटाच असतो म्हणून स्थाल यांतील सकार हा एकटाच आरंभीं असल्यामुळें सूत्रामध्यें ' एकहलादौ ' असें म्हटलें तरी उदकस्थालम् येथें उद आदेश होऊं लागेल.

१ ( सू. ६० ) मन्थ, ओदन, सक्तु, बिन्दु, वज्र, भार, हार, वीवध आणि गाह हे शब्द उत्तरपद पुढें असतांना उदक शब्दाला उद आदेश विकल्पानें होतो. उदा०–उदमन्थः, उदकमन्थः.

१ ( सू. ६१ ) इक् अन्तीं असलेलें आणि ङ्यन्तभिन्न असें जें पूर्वीचें पद त्याला उत्तरपद पुढें असतांना गालव आचार्यांच्या मतानें विकल्पानें ऱ्हस्व होतो. उदा०–ग्रामणिपुत्रः, ग्रामणीपुत्रः.

**सर्वान्ते हि लोकविज्ञानम् ॥ २ ॥**

लोकविज्ञानाद्धि यदेव सर्वान्त्यं पदं तस्मिन्पूर्वपदस्य ह्रस्वत्वं स्यात् ॥

अथवैवं विग्रहः करिष्यते । अलाबूश्च कर्कन्धूश्चालाबुकर्कन्ध्वौ । अलाबुकर्कन्ध्वौ च हन्भूश्चालाबुकर्कन्धुहन्भ्वः । अलाबुकर्कन्धुहन्भूनां फलमलाबुकर्कन्धुहन्भुफलमिति । यद्येवं हन्भ्वाः पूर्वनिपातः प्राप्नोति । राजदन्तादिषु पाठः करिष्यते ॥ अथवा हन्भ्वाः फलं हन्भुफलम् कर्कन्धूश्च हन्भुफलं च कर्कन्धुहन्भुफलम् अलाबूश्च कर्कन्धुहन्भुफलं चालाबुकर्कन्धुहन्भुफलम् । एवमपि फलेनाकृतो ऽभिसंबन्धो भवति । प्रत्येकं फलशब्दः परिसमाप्यते ॥

**इयङुवङ्व्ययप्रतिषेधः ॥ ३ ॥**

इयङुवङ्भाविनामव्ययानां च प्रतिषेधो वक्तव्यः । श्रीकुलम् भ्रूकुलम् । काण्डीभूतं वृषलकुलम् । कुड्यीभूतं वृषलकुलम् ॥

अभ्रूकुंसादीनामिति वक्तव्यम् । भ्रुकुटि· भ्रुकुंसः ॥

अपर आह । अकारो भ्रूकुंसादीनामिति वक्तव्यम् । भ्रकुटिः भ्रकुंसः ॥

**एकतद्धिते च ॥ ६ । ३ । ६२ ॥**

---

पण हें वचन नसेल तर प्रकृत स्थलीं कां वेरें ऱ्हस्व होणार नाहीं ?

( वा. २ ) समासामध्यें सर्वांत शेवटलें जें पद त्यालाच उत्तरपद म्हणण्याची लोकांत रूढि आहे म्हणून शेवटचें पद पुढें असतांच फक्त हन्भू शब्दाला ऱ्हस्व होईल.

अथवा, पुढील प्रमाणें विग्रह करण्यांत येईल – अलाबूश्च कर्कन्धूश्च अलाबुकर्कन्ध्वौ. अलाबुकर्कन्ध्वौ च हन्भूश्च अलाबुकर्कन्धुहन्भ्वः. अलाबुकर्कन्धुहन्भूनां फलम् अलाबुकर्कन्धुहन्भुफलम्.

पण अलाबुकर्कन्ध्वौ च हन्भूश्च या द्वंद्व समासामध्यें हन्भू शब्दाला 'अल्पाच्तरम्' ( २।२।३४ ) यानें पूर्वनिपात प्राप्त होत आहे.

राजदन्तादि गणामध्यें ( २।२।३१ ) या समासाचा पाठ करण्यांत येईल.

किंवा पुढीलप्रमाणें विग्रह करण्यांत येईल– हन्भ्वाः फलं हन्भुफलम्. कर्कन्धूश्च हन्भुफलं च कर्कन्धुहन्भुफलम्. अलाबूश्च कर्कन्धुहन्भुफलं च अलाबुकर्कन्धुहन्भुफलम्.

अशा विग्रह केला असतां हन्भू शब्दाला पूर्वनिपात होणार नाहीं हे खरें; पण फल या शब्दाशीं अलाबू व कर्कन्धू यांचा संबंध होत नाहीं.

हा दोष येत नाहीं. कारण फल शब्दाशीं प्रत्येकाचा संबंध आर्थिक घेतां येईल.

( वा. ३ ) ज्यांना इयङ् व उवङ् होण्याची लायकी आहे अशा शब्दांना आणि अव्ययाला हा ऱ्हस्व होत नाहीं असें प्रतिषेधाकरितां वचन करावें. उदाहरणार्थ श्रीकुलम्, भ्रूकुलम्, काण्डीभूतम् वृषलकुलम्; कुड्यीभूतम् वृषलकुलम्.

'अभ्रूकुंसादीनामिति वक्तव्यम्' म्हणजे भ्रुकुंस, भ्रुकुटि, वगैरे शब्दांना 'इयङुवङ्व्यय०' हा निषेध लागू पडत नाही असें वचन करावें. उदाहरणार्थ – भ्रुकुंसः भ्रूकुंसः, भ्रुकुटिः भ्रूकुटिः.

अन्य वैयाकरणांचें असें मत आहे कीं अकारो भ्रूकुंसादीनामिति वक्तव्यम् म्हणजे भ्रूकुंसादि शब्दामध्यें इकाला ऱ्हस्व न होतां अकार आदेश

---

२. पहिल्या द्वंद्वामध्यें कर्कन्धू हें उत्तरपद आहे. दुसऱ्या द्वंद्वामध्यें हन्भू हें उत्तरपद आणि षष्ठीतत्पुरुषामध्यें फल हें उत्तरपद आहे. तेव्हां उत्तरपद शब्दाचा अर्थ लोकरूढीप्रमाणें घेतला तरी त्या त्या उत्तरपदामुळें तिन्ही शब्दांना ऱ्हस्व करतां येतो.

१ ( सू. ६२ ) 'एका' या शब्दाच्या शेवटच्या आकाराला ऱ्हस्व होतो तद्धित प्रत्यय किंवा उत्तरपद पुढें असतांना. उदा०–एकस्याः भावः एकत्वम्;

तद्धिते किमुदाहरणम् । एकत्वम् एकता । नैतदस्ति प्रयोजनम् । पुंवद्भावेनाप्येतत्सिद्धम् । कथं पुंवद्भावः । तसिलादिष्वा कृत्वसुचः । [ ६. ३. ३५ ] । इदं तर्हि प्रयोजनम् । एकस्या आगतमेकरूप्यम् एकमयम् । इदं चाप्युदाहरणम् एकत्वम् एकता । ननु चोक्तं पुंवद्भावेनाप्येतत्सिद्धमिति । न सिध्यति । उक्तमेतत्त्वतलोर्गुणवचनस्येति ॥

अथोत्तरपदे किमुदाहरणम् । एकशाटी । नैतदस्ति । पुंवद्भावेनाप्येतत्सिद्धम् । कथं पुंवद्भावः । समानाधिकरणलक्षणः । इदं तर्हि प्रयोजनम् । एकस्याः क्षीरमेकक्षीरम् । इदं चाप्युदाहरणम् । एकशाटी । ननु चोक्तं पुंवद्भावेनाप्येतत्सिद्धमिति । न सिध्यति । न कोपधायाः [ ६. ३. ३७ ] इति प्रतिषेधः प्राप्नोति । नैष दोषः । उक्तमेतत्कोपधप्रतिषेधे तद्धितवुग्रहणमिति ॥

**[१]ङ्यापोः संज्ञाछन्दसोर्बहुलम् ॥ ६ । ३ । ६३ ॥**

**[१]त्वे च ॥ ६ । ३ । ६४ ॥**

---

होतो असें वचन करावें. जसें— भ्रकुटिः भ्रकुंसः.

( सू. ६२ ) या सूत्राचें तद्धितप्रत्यय पुढें असतांना उदाहरण कोणतें ?

एकस्याः भावः एकत्वम्, एकता हीं उदाहरणें होत.

हें या सूत्राचें प्रयोजन म्हणतां येत नाहीं. कारण, पुंवद्भावानेंही हीं उदाहरणें साधत आहेत.

तो पुंवद्भाव कशानें करावयाचा ?

'तसिलादि०' ( ६।३।३५ ) यानें करावयाचा.

तर मग पुढें दिलेलें हें प्रयोजन समजावें— एकस्या आगतमेकरूप्यम्[२], एकमयम्.

एकत्वम् व एकता हींही उदाहरणें होत आहेत.

पण पुंवद्भावानें एकत्वम् व एकता हीं उदाहरणें साधतात असें म्हटलें आहे ना ?

पुंवद्भावानें साधत नाहींत. कारण— त्व व तल् पुढें असतांना गुणवाचकालाच पुंवद्भाव होतो ( ६।३।३५ वा. १० ) असें वचन आहे.

आता उत्तरपद पुढें असतांना 'एक' या शब्दाला ऱ्हस्व होतो याचें कोणतें उदाहरण ?

एका शाटी एकशाटी हें उदाहरण होय.

हें उदाहरण होऊं शकत नाहीं. कारण पुंवद्भाव केल्यानेंही हें साधत आहे.

तो पुंवद्भाव कशानें करावयाचा ?

'स्त्रियाः पुंवद्भाषित०' ( ६।३।३४ ) यानें करावयाचा.

तर मग एकस्याः क्षीरम् एकक्षीरम् हें प्रयोजन समजावें.

एकशाटी हेंही उदाहरण होऊं शकतें.

पण पुंवद्भावानें हें उदाहरण साधतें असें म्हटलें आहे ना ?

पुंवद्भावानें साधत नाहीं. कारण— 'न कोपधायाः' ( ६।३।३७ ) यानें पुंवद्भावाचा निषेध तेथें प्राप्त होत आहे.

हा निषेध तेथें येऊं शकत नाहीं. कारण तेथें ककार हा तद्धितप्रत्ययाचा किंवा 'वु' याचे स्थानीं झालेल्या अक आदेशाचा असा असावा (६।३।३७ वा. १) असें सांगितलें आहे.

---

एकस्याः क्षीरम् एकक्षीरम्.

२. येथें 'एका' शब्दाहून रूप्य प्रत्यय (४।३।८१) आणि मयट् प्रत्यय ( ४।३।८२ ) झाले आहेत.

१ ( सू. ६३ ) संज्ञा-शब्दामध्यें किंवा वेदामध्यें उत्तरपद पुढें असतांना ङी-प्रत्ययान्ताला किंवा आप्-प्रत्ययान्ताला बाहुल्येंकरून ऱ्हस्व होतो. उदा०— रेवतिपुत्रः, कुमारिदारा, शिलवहम्, अजक्षीरम्.

१ ( सू. ६४ ) त्व प्रत्यय पुढें असतांना ङी-प्रत्ययान्त किंवा आप्-प्रत्ययान्त शब्दाला बाहुल्यें करून वेदामध्यें ऱ्हस्व होतो. उदा०— रोहिणित्वम्, रोहिणीत्वम्; अजत्वम्, अजात्वम्.

**इष्टकेषीकामालानां चिततूलभारिषु ॥ ६ । ३ । ६५ ॥ ]**

**खित्यनव्ययस्य ॥ ६ । ३ । ६६ ॥**

**खिति ह्रस्वाप्रसिद्धिरनजन्तत्वात् ॥ १ ॥**

खिति ह्रस्वस्याप्रसिद्धिः । कालिंमन्या हरिणिंमन्या । किं कारणम् । अनजन्तत्वात् । मुमि कृतेऽनजन्तत्वाद्ध्रस्वत्वं न प्राप्नोति ॥

**सिद्धं तु ह्रस्वान्तस्य मुम्वचनात् ॥ २ ॥**

सिद्धमेतत् । कथम् । ह्रस्वान्तस्य मुम्भवतीति वक्तव्यम् ॥

**संनियोगाद्वा ॥ ३ ॥**

अथवा संनियोगः करिष्यते । क एष यत्नश्चोद्यते संनियोगो नाम । चकारः कर्तव्यः । मुम्च । किं च । यच्चान्यत्प्राप्नोति । किं चान्यत्प्राप्नोति । ह्रस्वत्वम् । सिध्यति । सूत्रं तर्हि भिद्यते ॥ यथान्यासमेवास्तु । ननु चोक्तं खिति ह्रस्वाप्रसिद्धिरनजन्तत्वादिति । परिहृतमेतत्सिद्धं तु ह्रस्वान्तस्य मुम्वचनादिति । तत्तर्हि ह्रस्वग्रहणं कर्त-

---

(सू. ६६ वा. १) खित्-प्रत्ययान्त उत्तरपद पुढें असतांना मागें ऱ्हस्व करतां येत नाहीं. उदाहरणार्थ कालिंमन्या, हरिणिंमन्या.

काय कारण ?

कारण असें कीं- पुढील सूत्रानें मुम् केला असतां पूर्वपदाच्या शेवटीं अच् असत नाहीं.

(वा. २) हें सिद्ध होत आहे.

तें कसें ?

ह्रस्वान्तालाच मुम् होतो असें वचन[2] करावें.

(वा. ३) अथवा संनियोग करण्यांत येईल.

संनियोग म्हणून हा जो यत्न करण्यास सांगितलें आहे तो संनियोग म्हणजे काय ?

संनियोग असा कीं– 'अरुर्द्विषद०' या पुढील सूत्रामध्यें मुम् च असा चकाराचा पाठ करावा. म्हणजे मुम् आगम होतो, आणखीही कार्य होतें असा अर्थ होईल.

आणखी तें कोणतें ?

जें दुसरें कांहीं कार्य प्राप्त होत असेल तें. म्हणजे अर्थात ह्या पूर्वसूत्रानें सांगितलेला ह्रस्व होय.

अशा रीतीनें कालिंमन्या इत्यादि उदाहरणांची सिद्धि होईल. पण यांत मूळचा सूत्रन्यास बदलला जात आहे.

तर मग आहे तसाच सूत्रन्यास असूं दे.

पण मुम् केला असतां अजन्त नसल्यामुळें ऱ्हस्व प्राप्त होत नाहीं असें दूषण दिलें आहे ना ?

या दूषणाचा परिहारही पूर्वी 'ऱ्हस्वान्तालाच मुम् सांगावा' असा केला आहे.

तर मग 'अरुर्द्विषदजन्त०' येथें ऱ्हस्वग्रहण केलें पाहिजे.

ऱ्हस्वग्रहण करावयास नको. मागून अनुवृत्तीनें तें येत आहे.

---

१ (सू. ६५) इष्टका, इषीका आणि माला या तीन शब्दांना क्रमानें चित, तूल, आणि भारिन् हे शब्द उत्तरपद पुढें असतांना ऱ्हस्व होतो. उदा०– इष्टकचितम्, इषीकतूलम्, मालभारी.

१ (सू. ६६) खित्-प्रत्ययान्त उत्तरपद पुढें असतांना पूर्वपदाला ऱ्हस्व होतो, तें पूर्वपद अव्यय नसलें पाहिजे. उदा०– कालिंमन्या.

२. तेव्हां कालिंमन्या येथें ऱ्हस्व करण्याचे पूर्वी मुम् आगमाची प्राप्तीच येत नाहीं.

३. 'संनियोग म्ह०दोन कार्यांचा कायमचा समुच्चय' या अर्थाचा चकार करावा. ज्या समुच्चयांतील दोघांची फाटाफूट होत नाहीं तो कायमचा समुच्चय होय.

व्यम् । न कर्तव्यम् । प्रकृतमनुवर्तते । क प्रकृतम् । इको ह्रस्वोऽङ्यो गालवस्य [ ६१ ] इति । तद्वै प्रथमानिर्दिष्टं षष्ठीनिर्दिष्टेन चेहार्थः । खितीत्येषा सप्तमी ह्रस्व इति प्रथमायाः षष्ठीं प्रकल्पयिष्यति तस्मिन्निति निर्दिष्टे पूर्वस्य [ १. १. ६६ ] इति ॥

अथवा खिति ह्रस्वो भवतीत्युच्यते । खित्यनन्तरो ह्रस्वभावी नास्तीति कृत्वा भूतपूर्वगतिर्विज्ञास्यते । अजन्तं यद् भूतपूर्वमिति ॥ अथवा कार्यकालं संज्ञापरिभाषं यत्र कार्यं तत्र द्रष्टव्यम् । खिति ह्रस्वो भवतीत्युपस्थितमिदं भवत्यच इति । तत्र वचनादनजन्तस्यापि भविष्यति ॥ इहापि वचनात्प्राप्नोति । वाङ्मन्यः । नैतदस्ति । इक इति वर्तते । एवमपि खट्वंमन्यः अत्र न प्राप्नोति । नैष दोषः । आब्ग्रहणमपि प्रकृतमनुवर्तते । क प्रकृतम् । ङ्यापोः संज्ञाछन्दसोर्बहुलम् [ ६३ ] इति । एवमपि कीलालपंमन्यः शुभंयंमन्यः अत्र न प्राप्नोति । तस्मात्पूर्वोक्तावेव परिहारौ ॥

---

मागें कोठें ऱ्हस्व-ग्रहण आहे ?

' इको ह्रस्वोऽङ्यो० ' ( ६।३।६१ ) येथें आहे.

पण तें ऱ्हस्वग्रहण तेथें प्रथमान्त आहे आणि येथें तर ऱ्हस्वस्य असें षष्ठ्यन्त उपयोगी पडत आहे.

खिति ही सप्तमी 'तस्मिन्निति०' (१।१।६६) या परिभाषेच्या मदतीनें ऱ्हस्वः या प्रथमा विभक्तीला षष्ठीची कल्पना करील.

अथवा खित्–प्रत्ययान्त पुढें असतांना ऱ्हस्व होतो असें येथे सागितलें आहे. पण मुम् आगम पूर्वी झाल्यानंतर खित्–प्रत्ययान्ताच्या मागें ऱ्हस्व होण्यासारखें अजन्त पूर्वपद कोठेंच नाहीं म्हणून भूतपूर्वगति समजली जाईल. म्हणजे पूर्वी जें अजन्त होतें तें ऱ्हस्व करतांना अजन्त नसलें तरी त्या अचाला ऱ्हस्व होईल.

अथवा संज्ञा आणि परिभाषा यांच्याविषयीं कार्यकाल–पक्ष आहे. म्हणजे जेथें कार्य सांगितलें असेल तेथें त्या संज्ञा व परिभाषा येतात. तेव्हां येथें ऱ्हस्व होतो असें म्हटल्याबरोबर 'अचश्च' या परिभाषेनें अचः असें षष्ठ्यन्त पद प्राप्त होतें. तेव्हां खित्–प्रत्ययान्त उत्तरपद पुढे असतांना अचाला ऱ्हस्व होतो असा अर्थ झाल्यामुळें अच् हा पूर्वपदाच्या शेवटीं नसला तरी वचनसामर्थ्यास्तव एका वर्णानें व्यवधान सहन करून त्याच्या मागील अचाला ऱ्हस्व होईल.

तर मग वाचं मन्यते वाङ्मन्यः येथेंही आकाराला ऱ्हस्व होऊं लागेल.

हा दोष येत नाहीं. कारण, ' इको ऱ्हस्वोऽङ्यो० ' ( ६।३।६१ ) येथून इकः या पदाची अनुवृत्ति येत आहे.

पण इकः याची अनुवृत्ति केली तर खट्वंमन्यः येथें आकाराला ऱ्हस्व होणार नाहीं.

हा दोष येत नाहीं. कारण मागून आप्-ग्रहणही अनुवृत्तीनें येत आहे.

मागे कोठें आप्ग्रहण आहे ?

' ङ्यापोः संज्ञाछन्दसो०' ( ६।३।६३ ) येथें आहे.

तरी देखील कीलालपां मन्यते कीलालपंमन्यः तसेंच शुभंया मन्यते शुभंयंमन्यः येथें ऱ्हस्व होणार नाहीं, हा दोष येणारच. तेव्हां ऱ्हस्वान्ताला मुम् सांगावा किंवा भूतपूर्वगति घ्यावी हे पूर्वी सांगितलेलेच दोन परिहार कायम समजावे.

---

४. कारण, कीलालपा व शुभंया या शब्दांतील शेवटचा आकार हा ' आप् ' प्रत्ययाचा नव्हे.

[ अरुर्द्विषदजन्तस्य मुम् ॥ ६ । ३ । ६७ ॥ ]

इच एकाचोऽम्प्रत्ययवच्च ॥ ६ । ३ । ६८ ॥

अमः प्रत्ययवदनुदेशे किं प्रयोजनम् ।

अमः प्रत्ययवदनुदेशे प्रयोजनमात्वपूर्वसवर्णगुणेयङुवङादेशाः ॥ १ ॥

अमः प्रत्ययवदनुदेशे आत्वपूर्वसवर्णगुणेयङुवङादेशाः प्रयोजनम् । आत्वं प्रयोजनम् । गांमन्यः । पूर्वसवर्णः प्रयोजनम् । स्त्रींमन्यः । गुणः प्रयोजनम् । नरंमन्यः । इयङुवङौ प्रयोजनम् । श्रियंमन्यः भ्रुवंमन्यः ॥

अमः प्रत्ययवदनुदेश आत्वपूर्वसवर्णाप्रसिद्धिरप्रथमात्वात् ॥ २ ॥

अमः प्रत्ययवदनुदेश आत्वपूर्वसवर्णयोरप्रसिद्धिः । किं कारणम् । अप्रथमात्वात् । प्रथमयोरित्युच्यते न चात्र प्रथमां पश्यामः । किं च भो आत्वं प्रथमयोरित्युच्यते । न खलु प्रथमयोरित्युच्यते प्रथमयोरिति तु विज्ञायते । कथम् । अम्शसोरित्युच्यते त एवं विज्ञास्यामः शस्सहचरितो योऽम्शब्दः । कश्च शस्सहचरितः । प्रथमैव ॥ ननु च प्रत्ययवदनुदेशाद्ध-

---

(सू. ६६) येथें 'अम्' याचें विधान करून तो प्रत्ययासारखा समजावा असा जो अतिदेश केला आहे त्याचे काय प्रयोजन ?

(वा. १) अम् याला प्रत्ययासारखा समजण्याचें प्रयोजन आत्व, पूर्वसवर्ण, गुण, इयङ् व उवङ् हे आदेश होत. उदाहरणार्थ–गांमन्यः. येथें आत्व (६।१।९३) होते. स्त्रींमन्यः येथें पूर्वसवर्णदीर्घ (६।१।१०२) होतो. नरंमन्यः येथें नृशब्दाला गुण (७।३।११०) होतो. श्रियंमन्यः व भ्रुवंमन्यः येथें इयङ् व उवङ् (६।४।७७) होतात.

(वा. २) अम् हा प्रत्ययासारखा समजला असतांही आत्व आणि पूर्वसवर्ण हे साधत नाहींत.

काय कारण ?

कारण असें कीं– अप्रथमात्वात् म्हणजे विधायक शास्त्रामध्यें 'प्रथमयोः' असें म्हटलें आहे. आणि प्रकृत उदाहरणांमध्यें तर अम् हा प्रत्ययासारखा समजला तरी प्रथमा किंवा द्वितीया दृष्टीस पडत नाहीं.

पण काय हो, प्रथमयोः असें निमित्त धरून आत्व (६।१।९३) कोठें बरें सांगितलें आहे ?

प्रथमयोः असें निमित्त उच्चारलें नाहीं खरें. परंतु, अर्थात् प्रथमयोः असें तेथें निमित्त फलित होत आहे.

तें कसें ?

अम् विधीचें ठिकाणीं 'अम्शसोः' असें निमित्त उच्चारिलें आहे. त्यावरून शस्सहचरित जो अम् तो घ्यावयाचा असें आम्ही समजतों.

शस्सहचरित असा अम् तो कोणता ?

प्रथमा व द्वितीया विभक्तींमध्यें असलेला अम् तो तसा होय.

---

१ (सू. ६७) अरुस्, द्विषत् आणि अजन्त पूर्वपदांना मुम् आगम् होतो खित्–प्रत्ययान्त उत्तरपद पुढें असतांना. उदा०– अरुन्तुदः, द्विषन्तपः, कालिंमन्या. अव्ययांना मात्र हा मुम् होत नाहीं.

१. (सू. ६८) खित्-प्रत्ययान्त उत्तरपद पुढें असतांना इजन्त असें जें एकाच् पूर्वपद त्याला अम् असा आगम होतो. आणि तो अम् द्वितीया एकवचन अम् प्रत्ययासारखा समजावा. उदा०– गांमन्यः. द्वितीयाएकवचनासारखा समजल्यामुळें मकाराला इत्संज्ञा होत नाहीं. (१।३।४).

२ अम् हा अम् प्रत्ययासारखा समजावा असा अर्थ गृहीत न धरतां ही शंका केली आहे.

सिध्यति । न सिध्यति । किं कारणम् ।

**सामान्यातिदेशे विशेषानतिदेशः ॥ ३ ॥**

सामान्ये ह्यतिदिश्यमाने विशेषोऽनतिदिष्टो भवति । तद्यथा । ब्राह्मणवदस्मिन्क्षत्रिये वर्तितव्यमिति सामान्यं यद्ब्राह्मणकार्यं तत्क्षत्रियेऽतिदिश्यते यद्विशिष्टं माठरे कौण्डिन्ये वा न तदतिदिश्यते । एवमिहापि सामान्यं यत्प्रत्ययकार्यं तदतिदिश्यते यद्विशिष्टं द्वितीयैकवचने भवति प्रथमयोरिति न तदतिदिश्यते ॥

**सिद्धं तु द्वितीयैकवचनवद्वचनात् ॥४॥**

सिद्धमेतत् । कथम् । द्वितीयैकवचनवद्भवतीति वक्तव्यम् ॥

**एकशेषनिर्देशाद्वा ॥ ५ ॥**

अथवैकशेषनिर्देशोऽयम् । अम् च अम् च अम् । इच एकाचोऽम्भवति । अम्प्रत्ययवच्चास्मिन्कार्यं भवतीति ॥

अथेह कथं भवितव्यम् । श्रियमात्मानं मन्यते ब्राह्मणकुलम् । श्रियंमन्यमाहोस्विच्छ्रिमन्यमिति । श्रियंमन्यमिति भवितव्यम् । स्वमोर्नपुंसकात् [ ७. १. २३ ] इति लुकस्मान्न भवति । नाप्राप्ते लुक्ययमारभ्यते स यथैव सुपो धातुप्रातिपदिकयोः [ २. ४. ७१ ] इत्येतं बाधत एवं स्वमोर्नपुंसकादित्येतमपि बाधेत ॥ न बाधते । किं कारणम् । येन नाप्राप्ते तस्य बाधनं भवति न चाप्राप्ते सुपो धातुप्रातिपदिकयो-

---

पण अम् हा प्रत्ययासारखा समजावा या म्हणण्यानेंच द्वितीया एकवचनासारखा असें समजून आत्व वगैरे विधी होतील.

तशा रीतीनें येथें काम भागणार नाहीं.

काय कारण ?

कारण असें कीं—

( वा. ३ ) सामान्य धर्माचा अतिदेश केला असतां तेथें विशेष धर्माचा अतिदेश होत नाहीं. जसें 'या क्षत्रियाबरोबर ब्राह्मणासारखें वर्तन करावें ' असें सांगितलें असतां तेथें त्याच्याशीं ज्यास्त सलगीनें वागणूक होते. पण माठर, कौंडिन्य वगैरे विशिष्ट ब्राह्मणांचें जें अग्रपूजा वगैरे कार्य तें केलें जात नाहीं. तसेंच, येथेंही सामान्यप्रत्ययप्रयुक्त जें कार्य तेंच ह्या अमाला लागू केलें जाईल, आणि विशिष्ट जो द्वितीया-एकवचन प्रत्यय त्याचे ठिकाणीं होणारें जें कार्य तें ह्याला लागू केलें जाणार नाहीं.

( वा. ४ ) हें सिद्ध होत आहे.

तें कसें ?

अम् होतो आणि तो द्वितीया एकवचनासारखा समजावा असें वचन करावें.

( वा. ५ ) अथवा 'अम् च अम् च अम्' असा हा एकशेष समजावा. म्हणजे एकाच् इजन्ताहून अम् होतो. आणि तो पुढें असतांना अम् प्रत्ययाप्रमाणें कार्य आत्व वगैरे होतें असा अर्थ होईल.

आतां श्रियमात्मानं मन्यते ब्राह्मणकुलं या अर्थीं श्रियंमन्यं ब्राह्मणकुलम् असें व्हावें किंवा श्रिमन्यम् असें व्हावें ?

'श्रियंमन्यम् ' असें व्हावें.

पण तेथें 'स्वमोर्नपुंसकात्' ( ७।१।२३ ) यानें अमाचा लुक् कां बरें होत नाहीं ?

लुकाची अवश्य प्राप्ति आली असतां हा अम्-विधि आरंभिला आहे. तो जसा 'सुपो धातु०' ( २।४।७१ ) याचा बाध करतो त्याप्रमाणें 'स्वमोर्नपुंसकात्' या लुकाचाही बाध करील.

पण हा अम्-विधि 'स्वमोर्नपुंसकात्' या लुकाचा बाध करणार नाहीं. कारण, ज्याची अवश्य प्राप्ति आहे त्याचाच बाध होतो. सुपो धातु० या लुकाची अवश्य प्राप्ति असतांनाच

रित्येतस्मिन्नेतदारभ्यते स्वमोर्नपुंसकादित्येतस्मिन्पुनः प्राप्ते चाप्राप्ते च । अथवा मध्येऽपवादाः पूर्वान्विधीन्बाधन्त इत्येवमयं सुपो धातुप्रातिपदिकयोरित्येतं बाधते स्वमोर्नपुंसकादित्येतं न बाधिष्यते ॥ एवं तर्ह्यसिद्धं बहिरङ्गमन्तरङ्ग इत्यसिद्धत्वाद्बहिरङ्गलक्षणस्यामोऽन्तरङ्गलक्षणो लुग्न भविष्यति ॥ नैषा परिभाषेहोत्तरपदाधिकारे शक्या विज्ञातुम् । इह हि दोषः स्यात् । द्विषंतपः परंतपः । संयोगान्तलोपो न स्यात् । तस्माच्छ्रिमन्यमिति भवितव्यम् ॥

**[ वाचंयमपुरंदरौ च ॥ ६ । ३ । ६९ ॥ ]**

**कारे सत्यागदस्य ॥ ६ । ३ । ७० ॥**

**अस्तुसत्यागदस्य कारे ॥ १ ॥**

अस्तुसत्यागदस्य कार उपसंख्यानं कर्तव्यम् । अस्तुंकारः सत्यंकारः अगदंकारः ॥

**भक्षस्य च्छन्दसि ॥ २ ॥**

भक्षस्य च्छन्दस्युपसंख्यानं कर्तव्यम् । तस्य ते भक्षंकारस्य । छन्दसीति किमर्थम् । भक्षकारस्य ॥

**धेनोर्भव्यायाम् ॥ ३ ॥**

धेनोर्भव्यायामुपसंख्यानं कर्तव्यम् । धेनुंभव्या ॥

**लोकस्य पृणे ॥ ४ ॥**

लोकस्य पृण उपसंख्यानं कर्तव्यम् ।

---

हा अम्-विधि आरंभिला आहे. आणि 'स्वमोर्नपुंसकात्' याची प्राप्ति तर कोठें येते आणि कोठें येत नाहीं. किंवा 'मध्यें पठित असलेले अपवाद पूर्वविधीचाच बाध करतात, उत्तरविधीचा बाध करीत नाहींत' या न्यायानें हा अम् आगम 'सुपो धातु०' या लुकाचाच बाध करतो आणि 'स्वमोर्नपुं०' या लुकाचा बाध करीत नाहीं.

तर मग 'अंतरंग कर्तव्य असतांना बहिरंग शास्त्र असिद्ध समजावें' या परिभाषेनें उत्तरपदाच्या निमित्तानें झालेला व म्हणूनच बहिरंग असा हा अम् आगम असिद्ध असल्यामुळें स्वमोर्नपुंसकात् हा अंतरंग लुक् होणार नाहीं.

या उत्तरपदाधिकारामध्यें अंतरंग परिभाषा घेणें शक्य होत नाहीं. कारण द्विषंतपः व परंतपः येथेंही बहिरंग मुम् आगम असिद्ध असल्यामुळें संयोगान्तलोप व अनुस्वार हे होणार नाहींत असा दोष येईल. तेव्हां श्रिमन्यं कुलम् असेंच रूप व्हावें.

( सू. ७० वा. १ ) अस्तु, सत्य, आणि अगद यांना मुम् आगम होतो कार शब्द पुढें असतांना असें वचन करावें. उदाहरणार्थ—अस्तुंकारः, सत्यंकारः, अगदंकारः.

( वा. २ ) कार शब्द पुढें असतांना भक्ष शब्दाला वेदामध्यें मुम् आगम होतो असें वचन करावें. उदाहरणार्थ—तस्य ते भक्षंकारस्य.

येथें छन्दसि असें कशाकरितां म्हटलें आहे ? 'भक्षकारस्य तन्मतम्' येथें लौकिक प्रयोगामध्यें मुम् न व्हावा म्हणून म्हटलें आहे.

( वा. ३ ) धेनु शब्दाला मुम् आगम होतो भव्या शब्द पुढें असतांना, असें वचन करावें. जसें—धेनुंभव्या.

( वा. ४ ) लोक शब्दाला मुम् आगम होतो पृणशब्द पुढें असतांना असें वचन करावें. उदा-

---

३ तेव्हां 'स्वमोर्नपुंसकात्' याचा बाध होणार नाहीं. म्हणून तो लुक् होऊन श्रिमन्यम् असेंच रूप होईल.

१ ( सू. ६९ ) वाचंमय आणि पुरंदर हे दोन शब्द निपातन केले आहेत. उदा०-वाचं यच्छतीति वाचंयमः मौनव्रती. पुराणि दारयतीति पुरंदरः.

१ (सू. ७०) सत्य आणि अगद या दोन शब्दांना मुम् आगम होतो कार शब्द उत्तरपद पुढें असतांना. उदा०- सत्यंकारः, अगदंकारः.

लोकंपृणस्य ॥

**इत्येऽनभ्याशस्य ॥ ५ ॥**

इत्येऽनभ्याशस्योपसंख्यानं कर्तव्यम् । अनभ्याशमित्यः ॥

**भ्राष्ट्राग्न्योरिन्धे ॥ ६ ॥**

भ्राष्ट्राग्न्योरिन्ध उपसंख्यानं कर्तव्यम् । भ्राष्ट्रमिन्धः अग्निमिन्धः ॥

**गिलेऽगिलस्य ॥ ७ ॥**

गिले ऽगिलस्योपसंख्यानं कर्तव्यम् । तिमिंगिलः । अगिलस्येति किमर्थम् । गिलगिलः ॥

गिलगिले चेति वक्तव्यम् । तिमिंगिलगिलः ॥

**उष्णभद्रयोः करणे ॥ ८ ॥**

उष्णभद्रयोः करण उपसंख्यानं कर्तव्यम् । उष्णंकरणम् भद्रंकरणम् ॥

**सूतोग्रराजभोजकुलमेरुभ्यो दुहितुः पुत्रड्वा ॥ ९ ॥**

सूतोग्रराजभोजकुलमेरुभ्यो दुहितुः पुत्रड्वा भवतीति वक्तव्यम् । सूतपुत्री सूतदुहिता । उग्रपुत्री उग्रदुहिता । राजपुत्री राजदुहिता । भोजपुत्री भोजदुहिता । कुलपुत्री कुलदुहिता । मेरुपुत्री मेरुदुहिता ॥

**[ श्येनतिलस्य पाते ञे ॥ ६ । ३ । ७१ ॥ ]**[१]

**रात्रेः कृति विभाषा ॥ ६।३।७२ ॥**[१]

किमियं प्राप्ते विभाषाहोस्विदप्राप्ते । कथं च प्राप्ते कथं वाप्राप्ते । खितीति वा नित्ये

---

हरणार्थ– लोकंपृणस्य.

( वा. ५ ) इत्यशब्द पुढें असतांना अनभ्याश शब्दाला मुम् आगम होतो असें वचन करावें. उदाहरणार्थ–अनभ्याशमित्यः.

( वा. ६ ) भ्राष्ट्र आणि अग्नि या शब्दांना मुम् आगम होतो इन्धशब्द पुढें असतांना असें वचन करावें. उदाहरणार्थ–भ्राष्ट्रमिन्धः.

( वा. ७ ) गिलशब्द पुढें असतांना गिलशब्द–भिन्न पूर्वपदाला मुम् आगम होतो, असें वचन करावें. उदाहरणार्थ–तिमिंगिलः.

येथें ‘ अगिलस्य ’ असें कशाकरितां म्हटलें आहे ?

गिलगिलः येथें मुम् आगम न व्हावा म्हणून म्हटलें आहे.

गिलगिले चेति वक्तव्यम् । म्हणजे गिलगिल शब्द पुढें असतांनाही पूर्वपदाला मुम् आगम होतो असें वचन करावें. उदाहरणार्थ–तिमिंगिलगिलः.

( वा. ८ ) उष्ण आणि भद्र या शब्दांना मुम् आगम होतो करण शब्द पुढें असतांना असें वचन करावें. जसें–उष्णंकरणम् भद्रंकरणम्.

सूत, उग्र, राज, भोज, कुल, आणि मेरु या शब्दांच्या पुढील दुहितृ शब्दाचे स्थानीं पुत्रट् असा आदेश विकल्पानें होतो असें वचन करावें. उदाहरणार्थ–सूतपुत्री, सूतदुहिता; उग्रपुत्री, उग्रदुहिता; राजपुत्री, राजदुहिता; भोजपुत्री, भोजदुहिता; कुलपुत्री, कुलदुहिता; मेरुपुत्री, मेरुदुहिता.

( सू. ७२ ) काय हो, ही प्राप्तविभाषा समजावयाची किंवा अप्राप्तविभाषा समजावयाची ?

ही प्राप्तविभाषा कशी होते व अप्राप्तविभाषा कशी होते ?

---

१ ( सू. ७१ ) श्येन आणि तिल या शब्दांना पात शब्द उत्तरपद पुढें असतांना मुम् आदेश होतो, परंतु त्याच्या पुढें ‘ ञ ’ प्रत्यय ( ४।२।५८ ) केला असला पाहिजे. उदा०– श्येनपातः अस्यां वर्तते श्यैनंपाता क्रीडा; तैलंपाता.

१ ( सू. ७२ ) कृत्–प्रत्ययान्त उत्तरपद पुढें असतांना रात्रि या शब्दाला विकल्पानें मुम् आगम होतो. उदा०– रात्रिंचरः, रात्रिचरः.

प्राप्तेऽन्यत्र वाप्राप्ते ।

**रात्रेरप्राप्ते ॥ १ ॥**

रात्रेरप्राप्ते विभाषा । प्राप्ते नित्यो विधिः । रात्रिमन्यः । अप्राप्ते विभाषा । रात्र्यटः रात्रिमटः ॥

**नलोपो नञः ॥ ६ । ३ । ७३ ॥**[1]

किमर्थं नञः सानुबन्धकस्य ग्रहणं क्रियते न नस्येत्येवोच्येत । नस्येतीयत्युच्यमाने कर्णपुत्रः वर्णपुत्र इत्यत्रापि प्रसज्येत । नैष दोषः । अर्थवद्ग्रहणे नानर्थकस्येत्येवमेतस्य न भविष्यति ॥ एवमपि प्रश्नपुत्रः विश्नपुत्र इत्यत्रापि प्राप्नोति । नैष दोषः । अननुबन्धकग्रहणे न सानुबन्धकस्येत्येवमेतस्य न भविष्यति ॥ एवमपि वामनपुत्रः पामनपुत्र इत्यत्रापि प्राप्नोति । तस्मात्सानुबन्धकस्य ग्रहणं कर्तव्यम् ।

**नञो नलोपे ऽवक्षेपे तिङ्युपसंख्यानम् ॥ १ ॥**

नञो नलोपे ऽवक्षेपे तिङ्युपसंख्यानं कर्तव्यम् । अपचसि वै त्वं जाल्म । अकरोषि वै त्वं जाल्म ॥

---

जर 'खिति' याची अनुवृत्ति आणिली तर मुम् नित्य प्राप्त (६।३।६७) होतो म्हणून प्राप्त–विभाषा ठरते. आतां जर 'खिति' या पदाची अनुवृत्ति आणिली नाहीं तर अप्राप्तविभाषा ठरते.

(वा. १) रात्रि शब्दाला हा जो येथें मुम् आगमाचा विकल्प सांगितला आहे, तेथें ही अप्राप्तविभाषा होय. तेव्हां खित् प्रत्यय केला असतां तेथें पूर्वविप्रतिषेधानें नित्यच मुम् आगम होतो. उदाहरणार्थ–रात्रिमन्यः. आतां जेथें मुम् आगमाची प्राप्ति नसेल तेथें या प्रकृत सूत्रानें विकल्प होतो. जसें–रात्रिमटः, रात्र्यटः.

(सू. ७३) येथें अनुबंधसहित अशा नञ् शब्दाचें ग्रहण कशाकरितां केलें आहे? तसें करूं नये. 'नलोपो नस्य' असेंच म्हणावें.

पण तसें म्हटलें तर कर्णपुत्रः[2] तसेंच वर्णपुत्रः येथेंही नकाराचा लोप होऊं लागेल.

हा दोष येत नाहीं. कारण 'अर्थवानाचें[3] ग्रहण संभवत असतांना अनर्थकाचें ग्रहण करूं नये' या परिभाषेनें येथील न हा शब्द अनर्थक असल्यामुळें लोप होणार नाहीं.

तरी पण प्रश्नपुत्रः[4] व विश्नपुत्रः येथेंही नलोप प्राप्त होत आहे.

हा दोष येत नाहीं. कारण निरनुबंधकाचें ग्रहण संभवत असतांना तेथें सानुबंधकाचें ग्रहण करावयाचें नाहीं, या परिभाषेनें प्रश्न व विश्न या शब्दांतील नकाराचा लोप होणार नाही.[5]

तरी देखील वामनपुत्रः[6] व पामनपुत्रः येथें नकाराचा लोप प्राप्त होतो. एकंदरीत येथें सानुबंधक 'न' शब्दाचें ग्रहण केलें पाहिजे.

(वा. १) तिङन्त उत्तर पद पुढें असतांना असें वचन करावें. उदा० अपचसि वै त्वं जाल्म; अकरोषि वै त्वं जाल्म.

---

१ (सू ७३) नञ् अव्ययाच्या नकाराचा लोप उत्तरपद पुढें असतांना होतो. उदा०– अब्राह्मणः.

२ कर्ण धातुहून अच् प्रत्यय केला आहे. त्रैपादिक णत्व (८।४।१) असिद्ध असल्यामुळें नकार आहे असें समजून त्या नकाराचा लोप होऊं लागेल.

३ धातूचा नकार आणि प्रत्ययाचा अकार मिळून हा 'न' शब्द होतो. तेव्हां तो अनर्थकच आहे.

४ प्रच्छ् धातूहून नङ् प्रत्यय (३।३।९०) येथें झाला आहे. तेव्हां तो अर्थवान् आहे.

५ कारण, प्रश्न व विश्न या शब्दांतील नङ् प्रत्ययाला ङकार हा अनुबंध म्हणजे इत्संज्ञक लाविला आहे.

६ वामन् व पामन् शब्दाहून न प्रत्यय (५।२।१००) झाला आहे.

**तस्मान्नुडचि ॥ ६ । ३ । ७४ ॥**

किमर्थं तस्मादित्युच्यते न नुडचीत्येवोच्येत । नुडचीतीयत्युच्यमाने नञ एव नुट् प्रसज्येत ॥ एवं तर्हि पूर्वान्तः करिष्यते । तत्रायमप्यर्थस्तदोः सः सावनन्त्ययोः [ ७. २. १०६ ] इति तदोर्ग्रहणं न कर्तव्यं भवति । तत्र हि तवर्गानिर्देश एतत्प्रयोजनमिह मा भूत् अनेषः करोतीति । यावता पूर्वान्तः सोऽप्यदोषो भवति ॥ नैवं शक्यम् । अनुष्ण इति नलोपः प्रातिपदिकान्तस्य [ ८. २. ७ ] इति नलोपः प्रसज्येत । नुग्वचनान्न भविष्यति । ङमुट् तर्हि प्राप्नोति । तस्मात्परादिः कर्तव्यः परादौ च क्रियमाणे तस्मादिति वक्तव्यम् ॥

**[ नभ्राण्नपान्नवेदानासत्यानमुचिनकुलनखनपुंसकनक्षत्रनक्रनाकेषु प्रकृत्या ॥ ६ । ३ । ७५ ॥ ]**

**एकादिश्चैकस्य चादुक् ॥ ६ । ३ । ७६ ॥**

किमर्थमादुगुच्यते न अदुगेवोच्येत ।

---

( सू. ७४ ) येथें तस्मात् असा शब्द कशाकरितां घातला आहे? तो घालूं नये. ‘ नुडचि ’ एवढेंच सूत्र करावें.

‘ नुडचि ’ एवढेंच सूत्र केलें तर नञालाच नुट् आगम होऊं लागेल.

तसा होईल तर पूर्वाचा अंतावयव असा नुकच करण्यांत येईल. शिवाय, तसें करण्यांत हाही एक फायदा होत आहे की–‘तदोः सः सावनन्त्ययोः ’ येथें तदोः असें म्हणावयास नको. तेथें ‘तोः सः सौः’ असा ‘त’ वर्गाचा निर्देश न करतांना ‘ तदोः ’ असें जें म्हटलें आहे त्याचें कारण असें आहे कीं–‘ अनेषः ’ येथें नकाराला सकार न व्हावा. परंतु जर आतां हा पूर्वाचा अंतावयव नुक् असा आगम केला तर ‘ अनेषः ’ येथें नकार हा एतद् शब्दाचा अवयव होत नसल्यामुळें त्याला सत्व होण्याची भीतीच रहात नाहीं.

पूर्वाचा अंतावयव नुक् करणें शक्य नाहीं. कारण अनुष्णः येथें ‘ नलोपः प्रातिपदिकान्तस्य’ ( ८।२।७ ) यानें नकाराचा लोप होऊं लागेल.

पण तशा रीतीनें सर्वत्रच नकारलोप प्राप्त होत असल्यामुळें नुक्–विधान व्यर्थ होईल. तेव्हां त्या नुक्–विधानाच्या जोरावर नकारलोप होणार नाहीं.

तरी पण अनश्वः वगैरे उदाहरणांमध्यें ङमुट् आगम ( ८।३।३२ ) होऊं लागेल. म्हणून परादि नुट् असाच आगम करणें भाग आहे. परादि नुट् केला असतां तो नञाला न व्हावा म्हणून सूत्रामध्यें तस्मात् शब्द घातला पाहिजे.

( सू. ७६ ) येथें आदुक् असा दीर्घादि आगम कशाकरितां सांगितला आहे ? तसा सांगूं नये; तर अदुक् असा ऱ्हस्वादीच सांगावा.

---

१ ( सू ७४ ) ज्या नञाच्या नकाराचा लोप झाला आहे त्या नञाच्या पुढील अजादि उत्तरपदाला नुट् असा आगम होतो. उदा०– अश्वः अनश्वः.

१ ( सू. ७५. ) नभ्राट्, नपात्, नवेदाः, नासत्याः, नमुचि, नकुल, नख, नपुंसक, नक्षत्र, नक्र, आणि नाक या शब्दांमध्यें नञ् हा मूळच्या स्वरूपांतच राहतो; म्हणजे नकाराचा लोप ( ६।३।७३ ) होत नाहीं. न वेत्तीति नवेदाः. हें नवेदस् शब्दाचें प्रथमा एकवचन आहे. न सत्याः असत्याः न असत्याः नासत्याः. हें प्रथमा बहुवचन आहे.

१ ( सू. ७६ ) नञाच्या मागें समासामध्यें एक हा शब्द असेल तर तो नञ् मूळच्या स्वरूपांतच कायम राहतो. शिवाय तेथें त्या मागील एक शब्दाला आदुक् असा आगम होतो. उदा०–एकेन न विंशतिः एकान्नविंशतिः.

का रूपसिद्धिः एकान्नविंशतिः एकान्नशतम्। सवर्णदीर्घत्वेन सिद्धम्। न सिध्यति। अतो गुणे [ ६. १. ९७ ] इति पररूपत्वं प्राप्नोति॥ एवं तर्ह्यदुट्क्रियते। अदुट्क्रियते। अदुट्शक्यः कर्तुमानुनासिक्यं हि न स्यात्। यद्धि तद्यरो ऽनुनासिकेऽनुनासिको वा [ ८. ४. ४५ ] इति पदान्तस्येत्येवं तत्। किं पुनः कारणं पदान्तस्येत्येवं तत्। इह मा भूत्। बुध्नः ब्रध्नः बध्नाति॥ एवं तर्ह्यनुट्क्रियते। अनुट्शक्यः कर्तुम्। विभाषयानुनासिक्यम्। तेनैतदेव रूपं स्यात् एकान्नविंशतिः इदं न स्यात् एकाद्नविंशतिरिति॥ अस्तु तर्ह्यदुगेव। ननु चोक्तमतो गुण इति पररूपत्वं प्राप्नोतीति। नैष दोषः। अकारोच्चारणसामर्थ्यान्न भविष्यति॥ यदि तर्हि प्राप्नुवन्विधिरकारोच्चारणसामर्थ्याद्बाध्यते सवर्णदीर्घत्वमपि न प्राप्नोति। यं विधिं प्रत्युपदेशो ऽनर्थकः स विधिर्बाध्यते यस्य तु विधेर्निमित्तमेव नासौ बाध्यते। पररूपं च प्रत्यकारोच्चारणमनर्थकं सवर्ण-

---

पण अदुक् असा ऱ्हस्वादि सांगितला असतां एकान्नविंशतिः, एकान्नशतम् इत्यादि उदाहरणांची सिद्धि कशी होईल ?

सवर्णदीर्घ केला म्हणजे होईल.

तशी सिद्धि होत नाही. कारण, सवर्णदीर्घाचा बाध करून 'अतो गुणे' (६।१।९७) यानें पररूप प्राप्त होत आहे.

असें आहे तर मग अदुट् असा आगम करण्यांत येईल.

अदुट् असा आगम करणें शक्य नाहीं; कारण अनुनासिक होणार नाहीं. 'यरोऽनुनासिके' (६।४।४५) यानें जो अनुनासिक सांगितला आहे तो पदान्ताला सांगितला आहे.

पण तो अनुनासिक पदान्ताला सांगण्याचें काय बरें कारण ?

ब्रध्नः, बुध्नः बध्नाति, दध्ना, गृभ्णाति वगैरे ठिकाणीं अपदान्त अशा यराला अनुनासिक न व्हावा म्हणून तसा सांगितला आहे.

तर मग अनुट् असा नकारान्तच आगम करण्यांत येईल.

अनुट् असा आगम करणें शक्य नाहीं. कारण तसा आगम केल्यास एकान्नविंशतिः असें एकच रूप होईल, आणि एकाद्नविंशतिः असें रूप होणार नाहीं. व अदुक् असा आगम केला म्हणजे अनुनासिकाचा विकल्प (८।४।४५) असल्यामुळें दोन रूपें साधतात.

तर मग अदुक् असाच असूं दे.

पण अदुक् असा आगम असला तर पररूप प्राप्त होतें असा पूर्वी दोष दिला आहे ना ?

हा दोष येत नाहीं. कारण पररूप होईल तर अदुक् यांतील अकाराचें उच्चारण व्यर्थ होईल त्या जोरावर पररूप होणार नाहीं.

आतां अकारोच्चारणाचे जोरावर प्राप्त असलेल्या विधीचा जर बाध होत आहे, तर सवर्णदीर्घही प्राप्त होऊं शकत नाहीं.

जो विधि केला असतां अकारोच्चारण व्यर्थ होतें त्याच विधीचा बाध केला जातो. आणि ज्या विधीला तो अकार निमित्तच होत आहे त्याचा बाध होत नाहीं. येथें पररूप केलें तर अकारोच्चारण व्यर्थ होतें आणि सवर्णदीर्घाला

---

२ अदुट् असा टित् आगम पुढील नञाचा आद्यावयव होईल. त्यामुळें 'एक' या शब्दाचा आकार पदान्तींच आहे म्हणून पररूप होणार नाहीं. आणि सवर्णदीर्घ होऊन एकान्नविंशतिः इत्यादि रूपें साधतील.

१ एक+अद् येथें पररूप झालें तर एकद् असें होणार, तें दुक् असा आगम सांगितला तरी होईल म्हणून अदुक् यांतील अकार व्यर्थ होईल.

दीर्घत्वस्य पुनर्निमित्तमेव ॥

[ नगोऽप्राणिष्वन्यतरस्याम् ॥ ६ । ३ । ७७ ]

सहस्य सः संज्ञायाम् ॥ ६ । ३ । ७८ ॥

सहस्य हलोपवचनम् ॥ १ ॥

सहस्य हलोपो वक्तव्यः ॥

सादेशे हि स्वरे दोषः ॥ २ ॥

सादेशे हि स्वरे दोषः स्यात् । आन्तर्यत उदात्तानुदात्तयोः स्वरितः प्रसज्येत ॥ स तर्हि लोपो वक्तव्यः । न वक्तव्यः । आद्युदात्तनिपातनं करिष्यते स निपातनस्वरः प्रकृतिस्वरस्य बाधको भविष्यति ॥ एवमप्युपदेशिवद्भावो वक्तव्यः । स यथैव हि निपातनस्वरः प्रकृतिस्वरं बाधत एवं समासस्वरमपि बाधेत । सेष्टि सपशुबन्धम् ॥

ग्रन्थान्ताधिके च ॥ ६।३।७९ ॥

ग्रन्थान्ते वचनानर्थक्यमव्ययीभावेन कृतत्वात् ॥ १ ॥

ग्रन्थान्ते वचनमनर्थकम् । किं कारणम् । अव्ययीभावेन कृतत्वात् । अव्ययीभावे

---

तर तो अकार निमित्तच होत आहे.

( सू. ७८ वा. १ ) सह यांतील ह या अक्षराचा लोप होतो असें वचन करावें.

( वा. २ ) सह या शब्दाला स असा आदेश सांगितला तर स्वरासंबंधानें दोष येतो. कारण, उदात्त व अनुदात्त अशा दोन स्वरांच्या शब्दाचे स्थानीं स्वरित स आदेश होऊं लागेल.[2] उदाहरणार्थ--सपुत्रः, सभार्यः.

तर मग ह या अक्षराचा लोप सांगितला पाहिजे.

सांगावयास नको. कारण प्रकृत सूत्रामध्यें आद्युदात्त स असें निपातन करण्यात येईल. तो निपातन केलेला स्वर आन्तरतम्यास्तव ( १।१। ५० ) प्राप्त होणाऱ्या स्वरित स्वराचा बाध करील.

असें आहे तरीही तो निपातन स्वर उपदेशींच होतो असें म्हणावें. नाहीं तर तो निपातनस्वर जसा सादृश्यामुळें प्राप्त होणाऱ्या स्वरित स्वराचा बाध करतो, तसा समास–स्वराचाही बाध करील. उदाहरणार्थ–सेष्टि, सपशुबन्धम्.

( सू. ७९ वा. १ ) ग्रन्थान्त हा अर्थ गम्यमान असतांना सह शब्दाला जें स या आदेशाचें

---

१ ( सू. ७७ ) नग शब्दांतील नआच्या नकाराचा लोप विकल्पानें होतो. परंतु तेथें प्राणिभिन्न अर्थ असला पाहिजे. उदा०–न गच्छतीति नगः, अगः पर्वतः.

१ ( सू. ७८ ) संज्ञाशब्दामध्यें सह शब्दाला स आदेश होतो उत्तरपद पुढें असतांना. उदा०–साश्वत्थम्.

२ सह या शब्दांतील पहिला अकार उदात्त ( फिट् सूत्र. ४।१२ ) आहे. दुसरा अकार शेषनिघातानें ( ६।१।१५८ ) अनुदात्त आहे. तेव्हां सपुत्रः वगैरे उदाहरणांमध्यें त्या सह शब्दाचे स्थानीं होणारा स आदेश स्थानीप्रमाणें स्वरित स्वराचा होईल. कारण, स्वरितामध्यें उदात्त आणि अनुदात्त या दोहोंचा समावेश होतो. आतां ‘ ह ’ या अक्षराचा लोप सांगितला म्हणजे स हा उदात्त-स्वराचा आपोआपच शिल्लक राहतो. आणि तोच सपुत्रः या बहुव्रीहीमध्यें पूर्वपद-प्रकृतिस्वरानें ( ६।२।१ ) कायम होतो. अव्ययीभाव केला तर मात्र सतिशिष्ट अशा समासस्वरानें (६।१। २२३) अन्त उदात्तच होतो. उदा–सेष्टि, सपशुबन्धम्.

१ ( सू. ७९ ) उत्तरपद पुढें असतांना सह-शब्दाला स आदेश होतो. ‘ अमुक ग्रंथापर्यंत ’ हा अर्थ किंवा ‘अधिक’ हा अर्थ गम्यमान असतांना. उदा०–सकलं ज्योतिषमधीते. कला–ग्रंथापर्यंत ज्योतिष शास्त्राचें अध्ययन करतो. सद्रोणा खारी. खारी म्हणजे दीड मण. द्रोण म्हणजे अर्धा मण.

चाकाले [ ६. ३. ८१ ] इत्येव सिद्धम् ॥ यस्तर्हि कालोत्तरपदो ग्रन्थस्तदर्थमिदं वक्तव्यम् । सकाष्ठं ज्योतिषमधीते । सकलम् समुहूर्तम् ॥

[ [१]द्वितीये चानुपाख्ये ॥६।३।८०॥
[१]अव्ययीभावे चाकाले॥ ६ । ३ । ८१ ॥ ]

[१]वोपसर्जनस्य ॥ ६ । ३ । ८२ ॥

**उपसर्जनस्य वावचने सर्वप्रसङ्गोऽविशेषात् ॥ १ ॥**

उपसर्जनस्य वावचने सर्वप्रसङ्गः । सर्वस्योपसर्जनस्य सादेशः प्राप्नोति । अस्यापि प्राप्नोति । सहयुध्वा सहकृत्वा । किं कारणम् । अविशेषात् । न हि कश्चिद्विशेष उपादीयत एवंजातीयकस्य सादेशो भवतीति । अनुपादीयमाने विशेषे सर्वप्रसङ्गः ॥

**सिद्धं तु बहुव्रीहिनिर्देशात् ॥ २ ॥**

सिद्धमेतत् । कथम् । बहुव्रीहिनिर्देशात् । बहुव्रीहिनिर्देशः कर्तव्यः ॥ एवमपि सहयुध्वप्रियः सहकृत्वप्रियः अत्रापि प्राप्नोति । बहुव्रीहौ यदुत्तरपदमित्येवं विज्ञास्यते ।

---

विधान केलें आहे ते व्यर्थ होत आहे. कारण, 'अव्ययीभावे चाकाले' (६।३।८१) यानेंच तेथें स आदेश सिद्ध होत आहे.

तर मग कालवाचक उत्तरपद असून ग्रन्थान्त हा अर्थ गम्यमान होत असेल त्या ठिकाणीं सह शब्दाला स आदेश होण्याकरितां ग्रन्थान्त-ग्रहण करावयास पाहिजे. उदाहरणार्थ-सकाष्ठं[२] ज्योतिषमधीते. तसेंच सकलम्, समुहूर्तम्.

(सू. ८२ वा. १) येथें उपसर्जन अशा सह शब्दाला स आदेश विकल्पानें सांगितला आहे. तेव्हां सर्वच ठिकाणीं उपसर्जन अशा सह शब्दाला तो विकल्प प्राप्त होत आहे. म्हणजे सह युध्यतीति सहयुध्वा तसेंच सहकृत्वा येथेंही विकल्प प्राप्त होत आहे.

काय कारण ?

कारण असें कीं- अमुक एक प्रकारच्या उपसर्जन सह शब्दालाच तो विकल्प होतो असा कोणताही विशेष सूत्रांत गृहीत धरला नाहीं.

( वा. २ ) हें सिद्ध होत आहे.

तें कसें ?

वोपसर्जनस्य बहुव्रीहौ असा निर्देश करावा.

तरीही सहयुध्वा प्रियो यस्य सहयुध्वप्रियः तसेंच सहकृत्वप्रियः येथें तो विकल्प प्राप्त होत आहे.

बहुव्रीहि समासांतील उत्तरपद पुढें असतांना असा त्याचा अर्थ आहे.

---

२. काष्ठा कला व मुहूर्त हे शब्द कालवाचक आहेत. येथें त्या कालाचें प्रतिपादन करणारा ग्रंथ असा त्या शब्दांचा अर्थ आहे. मुहूर्त म्ह० दोन घटका. एक घटका म्हणजे साठ पळें. क्षण म्हणजे दहा पळें. कला म्हणजे पळाचा तृतीयांश. काष्ठा म्हणजे कलेचा तिसावा भाग ( अठरा निमेष ). निमेष म्ह० पापणी लवण्याचा काल.

( सू. ८० ) जेथें एखाद्या वस्तूनें सहित दुसरा पदार्थ दाखवावयाचा असतो तेथें ती वस्तु त्याच पदार्थावरून अनुमानानें समजण्यासारखी असेल तर तेथें त्या वस्तूचें दर्शक उत्तरपद पुढे असतांना सह शब्दाला स आदेश होतो. उदा०- सराक्षसीका निशा.

१ ( सू. ८१ ) अव्ययीभाव समासामध्यें कालवाचकाशिवाय इतर उत्तरपद पुढें असतांना सह शब्दाला स आदेश होतो. उदा०-सचक्रं धेहि.

१ ( सू. ८२ ) बहुव्रीहि समासामध्यें उत्तरपद पुढें असतांना सह शब्दाला स आदेश विकल्पानें होतो. उदा०- सपुत्रः, सहपुत्रः.

नन्वेतदपि बहुव्रीहावुत्तरपदम् । एवं तर्हि बहुव्रीहौ यदुपसर्जनमित्येवं विज्ञास्यते । बहुव्रीहौ च यदुपसर्जनं बहुव्रीहिं प्रति च यदुपसर्जनम् ॥ स तर्हि बहुव्रीहिनिर्देशः कर्तव्यः । न कर्तव्यः । इह कश्चित्प्रधानानामेव समासः कश्चिदुपसर्जनानामेव कश्चित्प्रधानोपसर्जनानाम् । तद्य उपसर्जनानामेव समासस्तदुपसर्जनम् ॥ अथवाकारो मत्वर्थीयः । तद्यथा । तुन्दः घाट इति ॥ अथवा मतुब्लोपोऽत्र द्रष्टव्यः । तद्यथा । पुष्यका एषां त इमे पुष्यकाः । कालका एषां त इमे कालका इति ॥

## प्रकृत्याशिषि ॥ ६ । ३ । ८३ ॥

### प्रकृत्याशिष्यगवादिषु ॥ १ ॥

प्रकृत्याशिष्यगवादिष्विति वक्तव्यम् । इह मा भूत् । सगवे सवत्साय सहलाय ॥

## [समानस्य छन्दस्यमूर्धप्रभृत्युदर्केषु ॥ ६ । ३ । ८४ ॥

---

तरी देखील युध्वन् हें बहुव्रीहि समासांतील उत्तरपद होत आहेच.[2]

तर मग बहुव्रीहीमध्यें जें उपसर्जन अशा रीतीनें बहुव्रीहिग्रहण हें उपसर्जनाचें विशेषण समजलें जाईल, आणि बहुव्रीहीमध्यें जें उपसर्जन एवढाच त्याचा अर्थ न समजतां बहुव्रीहीमध्यें जें उपसर्जन आणि बहुव्रीहीमुळें जें उपसर्जन अशा 'सह' या शब्दाला हा 'स' आदेश होतो असा अर्थ केला जाईल.

एकंदरींत बहुव्रीहिग्रहण केलें पाहिजे.

बहुव्रीहिग्रहण करावयास नको. असें पहा कीं, एखाद्या समासामध्यें म्हणजे द्वंद्वामध्यें दोन्ही पदांचे अर्थ प्रधानच असतात. आणि एखाद्या समासामध्यें म्हणजे बहुव्रीहीमध्यें दोन्ही पदांचे अर्थ उपसर्जन म्हणजे अप्रधानच असतात. आणि बाकीच्या समासांमध्यें म्हणजे तत्पुरुष वगैरेंमध्यें एखाद्या पदाचा अर्थ प्रधान असतो, आणि एखाद्या पदाचा अर्थ अप्रधान असतो. त्यांत जो अप्रधानांचाच समास होतो त्याला उपसर्जन–समास म्हणतात. त्याच अर्थाचा येथें उपसर्जन शब्द घातला आहे.

अथवा उपसर्जन पदाहून मत्वर्थी 'अर्श-आदिभ्यो'ऽच अकार प्रत्यय (५।२।१२७) करून उपसर्जन शब्द येथें उच्चारला आहे.[3] उदाहरणार्थ– तुंदः, घाटः.

किंवा उपसर्जन पदाचे ठिकाणीं मतुप् प्रत्ययाचा लोप केला आहे असें समजावें. उदाहरणार्थ– पुष्यकाः सन्ति येषां ते पुष्यकाः. कालकाः सन्ति येषां ते कालकाः.

(सू. ८३ वा. १) गो, वत्स, आणि हल यांशिवाय उत्तरपद पुढें असतांना सह शब्द मूळच्या स्वरूपांतच राहतो असें वचन करावें. कारण, स्वस्ति भवते सगवे सवत्साय सहलाय येथें हा प्रकृतिभाव न झाला पाहिजे.

---

२. सह शब्दाचा युध्वन् शब्दाबरोबर बहुव्रीहि समास केला नाहीं तरी सहयुध्वन् शब्दाचा जो प्रिय शब्दाबरोबर बहुव्रीहि समास केला आहे त्या बहुव्रीहीमध्यें युध्वन् हें तत्पुरुषाचें उत्तरपद सांपडत आहेच असा अभिप्राय आहे.

३. तेव्हां उपसर्जन म्हणजे अप्रधान अशीं पदें ज्यामध्यें आहेत त्या समासाला उपसर्जन म्हणतां येईल.

४. मागें अ. ६।१।१५८ टीप ४ आणि ५ पहाव्या.

१ (सू. ८३) आशीर्वाद हा अर्थ गम्यमान असतांना सह शब्द मूळच्या स्वरूपांतच राहतो. म्हणजे त्याला स आदेश होत नाहीं. उदा० स्वस्ति देवदत्ताय सहपुत्राय.

१. (सू. ८४) मूर्ध, प्रभृति, आणि उदर्क यांशिवाय उत्तरपद पुढें असतांना वेदामध्यें समान शब्दाला स आदेश होतो. उदा० सगर्भ्यः.

[1]ज्योतिर्जनपदरात्रिनाभिनामगोत्ररूपस्थानवर्णवयोवचनबन्धुषु ॥ ६ । ३ । ८५ ]

[1]चरणे ब्रह्मचारिणि ॥ ६।३।८६ ॥

चरणे किं निपात्यते ।

ब्रह्मण्युपपदे समानपूर्वे व्रते कर्मणि चरेर्णिनिर्व्रतलोपश्च ॥ १ ॥

ब्रह्मण्युपपदे समानपूर्वे व्रते कर्मणि चरेर्णिनिर्व्रतलोपश्च निपात्यते । समाने ब्रह्मणि व्रतं चरतीति सब्रह्मचारी ॥

[ [1]तीर्थे ये ॥ ६ । ३ । ८७ ॥

[1]विभाषोदरे ॥ ६ । ३ । ८८ ॥ ]

[1]दृग्दृशवतुषु ॥ ६ । ३ । ८९ ॥

दृग्दृशवतुषु दृक्ष उपसंख्यानम् ॥१॥

दृग्दृशवतुषु दृक्ष उपसंख्यानं कर्तव्यम् । सदृक्षासः प्रतिसदृक्षासः ॥

[ [1]इदंकिमोरीश्की ॥ ६ । ३ । ९० ॥

[1]आ सर्वनाम्नः ॥ ६ । ३ । ९१ ]

[1]समः समि ॥ ६ । ३ । ९३ ॥

[1]नहिवृतिवृषिव्यधिरुचिसहितनिषु क्वौ ॥ ६ । ३ । ११६ ॥

---

( सू. ८६ ) येथें निपातनाने काय काय केलें आहे ?

( वा. १ ) समान हा शब्द पूर्वी असलेला ब्रह्मन् शब्द उपपद असून त्याच्या पुढें कर्मवाचक व्रत शब्द उपपद असतांना चर् धातूहून णिनि प्रत्यय व व्रत शब्दाचा लोप हीं दोन कार्यें निपातनानें केलीं आहेत. समाने ब्रह्मणि व्रतं चरतीति सब्रह्मचारी.

( सू. ८९ वा. १ ) दृक्, दृश, आणि वतु, यांचेबरोबर दृक्ष हा शब्द पुढें असतांनाही समान या शब्दाला स आदेश होतो असें वचन करावें. जसें– सदृक्षासः, प्रतिदृक्षासः.

---

१ ( सू. ८५ ) ज्योतिस्, जनपद, रात्रि, नाभि, नामन्, गोत्र, रूप, स्थान, वर्ण, वयस्, वचन, आणि बन्धु हे शब्द उत्तरपद पुढें असतांना समान या शब्दाला स आदेश होतो. उदाहरणार्थ–सज्योतिः वगैरे.

१ ( सू. ८६ ) ' आचरण करणें ' हा अर्थ गम्यमान असतांना आणि ब्रह्मचारिन् शब्द उत्तरपद पुढें असतांना समान या शब्दाला स आदेश होतो. उदाहरणार्थ– सब्रह्मचारी.

१ ( सू. ८७ ) समान शब्दाला तीर्थ शब्द उत्तरपद पुढें असतांना, आणि त्याच्या पुढें 'य' प्रत्यय कर्तव्य असतांना स आदेश होतो. उदाहरणार्थ- समाने तीर्थे वासी सतीर्थ्यः. येथें यत्प्रत्यय (४।४।१०७) झाला आहे.

१ ( सू. ८८ ) समान शब्दाला स आदेश विकल्पानें होतो उदर शब्द उत्तरपद पुढें असतांना आणि त्याच्या पुढें यत् हा प्रत्यय कर्तव्य असतांना. उदाहरणार्थ- समाने उदरे भवः सोदर्यः, समानोदर्यः. येथें यत् प्रत्यय ( ४।४।१०८ ) झाला आहे.

१ ( सू. ८९ ) दृक्, दृश आणि वतु हे शब्द पुढें असतांना समान शब्दाला स आदेश होतो. उदाहरणार्थ-सदृक् ( ३।२।६० वा. १ ).

१ ( सू. ९० ) इदम् शब्दाला ईश् आदेश होतो आणि किम् शब्दाला की आदेश होतो दृक्, दृश, वतु आणि दृक्ष हे शब्द पुढें असतांना. उदाहरणार्थ– ईदृक्, कीदृक् इत्यादि.

१ (सू. ९१) सर्वनाम-संज्ञक शब्दांच्या शेवटच्या वर्णाला दृक्, दृश, वतु आणि दृक्ष हे शब्द पुढें असतांना 'आ'कार आदेश होतो. उदाहरणार्थ–तादृक् इत्यादि.

१ ( सू. ९३ ) सम् या उपसर्गाला वप्रत्ययान्त अञ्च् धातु उत्तरपद पुढें असतांना समि असा आदेश होतो. उदाहरणार्थ- सम्यङ्.

१ ( सू. ११६ ) नह्, वृत्, वृष्, व्यध्, रुच्, सह् आणि तन्, हे क्वि-प्रत्ययान्त धातू उत्तरपद म्हणून पुढें असतांना पूर्वपदाच्या शेवटच्या अचाला दीर्घ होतो. उदाहरणार्थ– उपानत्.

किमर्थमञ्चतिनह्यादिषु क्विब्ग्रहणं क्रियते। इह मा भूत् । समञ्चनम् उपनहनम् । नैतदस्ति प्रयोजनम् । उत्तरपद इति वर्तते न चान्तरेण क्विपमञ्चतिनह्यादय उत्तरपदानि भवन्ति तत्रान्तरेण क्विब्ग्रहणं क्विबन्त एव भविष्यति । तदादिविधिना प्राप्नोति ॥ अत उत्तरं पठति ।

**अञ्चतिनह्यादिषु क्विब्ग्रहणानर्थक्यं यस्मिन्विधिस्तदादावल्ग्रहणे ॥ १ ॥**

अञ्चतिनह्यादिषु क्विब्ग्रहणमनर्थकम् । किं कारणम् । यस्मिन्विधिस्तदादावल्ग्रहण एव भवति न चेदमल्ग्रहणम् ॥ एवं तर्हि सिद्धे सति यत्क्विब्ग्रहणं करोति तज्ज्ञापयत्याचार्योऽन्यत्र धातुग्रहणे तदादिविधिर्भवतीति । किमेतस्य ज्ञापने प्रयोजनम् । अतः कृकमीत्यत्र अयस्कृत् अयस्कार इत्यपि सिद्धं भवति ॥

**विष्वग्देवयोश्च टेरद्र्यञ्चतौ वप्रत्यये ॥ ६ । ३ । ९२ ॥**

**[ तिरसस्तिर्यलोपे ॥ ६ । ३ । ९४ ]**

---

( सू. ९३,११६ ) अञ्च् धातु आणि नह्, वृत्, वृष् वगैरे धातू याविषयीं क्विप्ग्रहण कशाकरिता केले आहे ?

समञ्चनम् व उपनहनम् येथें ल्युट्–प्रत्ययान्त अञ्च् धातु आणि नह् धातु पुढे असतांना प्रकृत सूत्रानें समि आदेश व दीर्घ ( ६।३।११६ ) न व्हावे म्हणून केलें आहे.

हें प्रयोजन होत नाहीं. कारण, उत्तरपदे हा अधिकार चालू आहे. तेव्हां क्विप् केल्यावांचून अञ्च् नह् वगैरे धातूंना उत्तरपद म्हणताच येत नाहीं. तेव्हां अर्थात् सूत्रामध्यें क्विप्–ग्रहण केल्यावांचून क्विबन्तच अञ्च् वगैरे धातू पुढें असतांना कार्य होईल.

पण, अञ्च् वगैरे धातू आरंभीं असलेलें उत्तरपद पुढें असतांना असा तदादि–विधीनें अर्थ केला असतां पूर्वोक्त स्थलीं समि आदेश व दीर्घ यांची प्राप्ति येत आहे हे मनांत घेऊन वार्तिककार म्हणतात.

( वा. १ ) अञ्च्, नह् वगैरे धातूंविषयीं केलेले क्विप्–ग्रहण व्यर्थ होत आहे.

काय कारण ?

कारण असें कीं– अल्–ग्रहण असतांनाच तदादिविधि ( १।१।७२ वा. २९ ) सांगितला आहे. आणि प्रकृत स्थलीं तर अञ्च् नह् वगैरे शब्द हें अल्ग्रहण नव्हे. तर मग अशा रीतीनें सिद्धि होत असतांनाही ज्या अर्थी येथें आचार्य क्विप् ग्रहण करीत आहेत त्या अर्थी इतर ठिकाणीं धातूचें ग्रहण केलें असतां तेथें तदादिविधि होतो असें आचार्य ज्ञापन करीत आहेत.

या ज्ञापनाचें काय फल ?

' अतः कृकमिकंसकुम्भपात्रकुशाकर्णीष्वनव्ययस्य ' ( ८।३।४६ ) यानें कृ वगैरे उत्तरपद पुढें असतांना सांगितलेलें सत्व अयस्कृत् येथील–प्रमाणें अयस्कारः येथेंही साधत आहे.

---

२. पूर्वसूत्रामध्यें आणि या सूत्रामध्यें वप्रत्ययान्त अञ्च् धातु असें म्हटलें आहे. तेथे वप्रत्यय शब्दानें क्विप्–प्रत्यय येतो. तसेंच, पुढें ' नहिवृति० ' (६।३।११६) या सूत्रामध्यें क्विप्–प्रत्ययान्त नह् वगैरे धातू पुढें असतांना असें म्हटलें आहे.

१ ( सू. ९२ ) विष्वक्, देव, आणि सर्वनाम–संज्ञक शब्द यांच्या टि–संज्ञक भागाला अद्रि असा आदेश होतो, व–प्रत्ययान्त अञ्च् धातु उत्तरपद पुढें असतांना. उदाहरणार्थ– विष्वक् अञ्चतीति विष्वद्र्यङ् ( ३।२।५९ ). क्विप् वगैरे प्रत्ययांना व प्रत्यय किंवा अप्रत्यय असें म्हणतात. मागें ६।२।५२ टीप १ पहा.

१ ( सू. ९४ ) तिरस् शब्दाला वप्रत्ययान्त अञ्च्

## सहस्य सध्रिः ॥ ६ । ३ । ९५ ॥

**अद्रिसध्र्योरन्तोदात्तवचनं कृत्स्वरनिवृत्त्यर्थम् ॥ १ ॥**

अद्रिसध्र्योरन्तोदात्तत्वं वक्तव्यम् । किं प्रयोजनम् । कृत्स्वरनिवृत्त्यर्थम् । कृत्स्वरो मा भूत् । विष्वद्र्यङ् विष्वद्र्यञ्चौ विष्वद्र्यञ्चः । सध्र्यङ् सध्र्यञ्चौ सध्र्यञ्चः ॥

**तत्र च्छन्दसि स्त्रियां प्रतिषेधः ॥ २ ॥**

तत्र च्छन्दसि स्त्रियां प्रतिषेधो वक्तव्यः । विश्वाची घृताची ॥ यदि च्छन्दसि स्त्रियां प्रतिषेध उच्यते कथं सा कद्रीची । एवं तर्हि च्छन्दसि स्त्रियां बहुलमिति वक्तव्यम् ॥

## [ सध मादस्थयोश्छन्दसि ॥ ६ । ३ । ९६ ॥ । ]

## द्व्यन्तरुपसर्गेभ्योऽप ईत् ॥ ६ । ३ । ९७ ।

**समाप ईत्त्वप्रतिषेधः ॥ १ ॥**

समाप ईत्त्वप्रतिषेधो वक्तव्यः । समापं नाम देवयजनम् ॥

अपर आह । ईत्त्वमनवर्णादिति वक्तव्यम् । समीपम् अन्तरीपम् । इह मा भूत् ।

---

( सू. ९२, ९५ वा. १ ) अद्रि व सध्रि यांना अन्तोदात्त होतो असें वचन करावें.

याचे काय प्रयोजन ?

' गतिकारकोपपदात्कृत् ' ( ६।२।१३९ ) यानें जो कृत्–प्रत्ययान्त उत्तरपदाला प्रकृतिस्वर सांगितला आहे तो येथें होऊं नये हें प्रयोजन होय. उदाहरणार्थ– विष्वद्र्यङ् विष्वद्र्यञ्चौ विष्वद्र्यञ्चः, सध्र्यङ् सध्र्यञ्चौ सध्र्यञ्चः.

( वा. २ ) हे अद्रि व सध्रि आदेश वेदामध्यें स्त्रीलिंगांत होत नाहींत असें वचन करावें. उदाहरणार्थ– विश्वमञ्चतीति विश्वाची.

पण जर वेदामध्यें स्त्रीलिंगांत हा प्रतिषेध केला तर कद्रीची येथें किम् शब्दाच्या टिसंज्ञक भागाला अद्रि आदेश कसा ?

असें आहे तर ' छन्दसि स्त्रियां बहुलम् ' असें वचन करावें.[3]

( सू. ९७ वा. १ ) समाप शब्दामध्यें ईत्त्व होत नाहीं असें प्रतिषेधाकरितां वचन करावें. उदाहरणार्थ– समापं नाम देवयजनम्.

अन्य कोणी वैयाकरण येथें असें म्हणतात कीं– ईत्त्वमनवर्णादिति वक्तव्यम् म्हणजे अवर्णभिन्नाहून पर अप शब्दाला ईत्त्व होतें असें वचन करावें. कारण, संगताः आपः यस्मिन् समीपम् , व अन्तर्गताः आपः यत्र अन्तरीपम् येथें ईत्त्व झालें पाहिजे. आणि प्रकृष्टाः आपः यस्मिन् प्रापम् व परागताः आपः यत्र परापम् येथें न

---

धातु उत्तरपद पुढें असतांना, परंतु त्या अञ्चू धातूच्या अकाराचा लोप झाला नसेल तर, तिरि असा आदेश होतो. उदाहरणार्थ– तिर्यङ्.

१ ( सू. ९५ ) सह शब्दाला व–प्रत्ययान्त अञ्चू धातु उत्तरपद पुढें असतांना सध्रि असा आदेश होतो. उदाहरणार्थ–सध्र्यङ्.

२. अद्रि व सध्रि या आदेशांतील इकार उदात्त झाल्यामुळें त्याला यण् झाल्यानंतर पुढील अकाराला स्वरित ( ८।२।४ ) होतो.

३. बहुलम् असें म्हटलें म्हणजे वेदामध्यें जेथें आदेश केला असेल तेथें होईल; आणि जेथें केला नसेल तेथें होणार नाहीं.

१ ( सू. ९६ ) वेदामध्यें सह शब्दाला माद किंवा स्थ हे शब्द उत्तरपद पुढें असतांना ' सध ' आदेश होतो. उदाहरणार्थ सधमादः, सधस्थः.

१ ( सू. ९७ ) द्वि, अन्तर् आणि उपसर्ग यांच्या पुढील अप् शब्दाच्या आदि अकाराला ईकार आदेश होतो; पण समासान्त ' अ ' प्रत्यय केला असला पाहिजे. उदाहरणार्थ-द्विर्गताः आपः यस्मिन् तत् द्वीपम्.

प्रापम् परापम् ॥

**ऊदनोर्देशे ॥ ६ । ३ । ९८ ॥**

दीर्घोच्चारणं किमर्थं न उदनोर्देश इत्येवोच्येत । का रूपसिद्धिः अनूपः । सवर्णदीर्घत्वेन सिद्धम् । न सिध्यति । अवग्रहे दोषः स्यात् ॥

**अषष्ठ्यतृतीयास्थस्यान्यस्य दुगाशीराशास्थास्थितोत्सुकोतिकारकरागच्छेषु ॥ ६ । ३ । ९९ ॥**

अषष्ठ्यतृतीयास्थस्येत्युच्यते तत्रेदं न सिध्यति । अन्यस्येदमन्यदीयम् । अन्यस्य कारकमन्यत्कारकम् ॥ एवं तर्ह्यविशेषेणान्यस्य दुक्छकारकयोरित्युक्त्वा ततो वक्ष्याम्यषष्ठ्यतृतीयास्थस्याशीराशास्थास्थितोत्सुकोतिरागेष्विति ॥

**[ अर्थे विभाषा ॥ ६ । ३ । १०० ]**

**कोः कत्तत्पुरुषेऽचि ॥ ६ । ३ । १०१ ॥**

**कद्भावे त्रावुपसंख्यानम् ॥ १ ॥**

कद्भावे त्रावुपसंख्यानं कर्तव्यम् । कुत्सितास्त्रयः कत्त्रयः । के वा त्रयः । न बिभृयुः

---

झालें पाहिजे.

( सू. ९८ ) येथें ऊत् असा दीर्घ कशाकरितां उच्चारला आहे ? तसा उच्चारूं नये. ‘ उदनोर्देशे ’ असा ऱ्हस्वच उच्चारावा.

पण ऱ्हस्व सांगितला तर अनूप हा शब्द कसा बरें साधेल ?

दोन उकारांचा सवर्णदीर्घ केला म्हणजे साधेल.

तसें साधतां येत नाहीं. कारण अवग्रह करतांना दोष[२] येईल.

( सू. ९९ ) येथें षष्ठी किंवा तृतीया केली नसेल तर असें म्हटले आहे. तेव्हां अन्यस्येदमन्यदीयम् अन्यस्य कारकः अन्यत्कारकः येथें दुक् आगम साधत नाहीं

तर मग ‘ अन्यस्य[२] दुक् छकारकयोः ’ असें मोघमच एक सूत्र करून पुढें ‘ अषष्ठ्यतृतीयास्थस्याऽऽशीराशास्थास्थितोत्सुकोतिरागेषु ’ असें दुसरें सूत्र करतां येईल.

( सू. १०१ वा. १) त्रि शब्द पुढें असतांना कद् आदेश होतो असें वचन करावें. उदाहरणार्थ–कुत्सिताः त्रयः कत्त्रयः. किंवा के वा त्रयः ?

---

१ ( सू. ९८ ) अनु शब्दाच्या पुढील अप् शब्दाच्या आदि अकाराला ऊकार आदेश होतो; पण समासान्त अ प्रत्यय केला असला पाहिजे; आणि देश वाच्य असला पाहिजे. उदाहरणार्थ– अनूपो देशः,

२. अवग्रहामध्यें संधिकार्य होत नाहीं. तेव्हां तेथें दीर्घाचें श्रवण होतें. उदाहरणार्थ–अनूपमित्यनु-ऊपम्.

१ ( सू. ९९ ) अन्य शब्दाला आशिस्, आशा, आस्थित, उत्सुक, ऊति, कारक आणि राग हे शब्द उत्तरपद पुढें असतांना किंवा छ प्रत्यय पुढें असतांना दुक् आगम होतो. परंतु त्या अन्य शब्दाच्या पुढें षष्ठी किंवा तृतीया विभक्ति केली नसली पाहिजे. उदाहरणार्थ– अन्या आशीः अन्यदाशीः.

२. या प्रकृत सूत्राचा विभाग केल्यानंतर त्या दोन सूत्रांपैकीं दुसऱ्या सूत्रामध्यें षष्ठी किंवा तृतीया नसावी ही अट घालावी. आणि आशिस् आशा वगैरे जे शब्द निमित्त म्हणून सूत्रांत उच्चारले आहेत, त्यांपैकीं फक्त कारक शब्द आणि छ प्रत्यय हे दोनच पहिल्या सूत्रामध्यें घालावे.

१ ( सू. १०० ) अन्य शब्दाला अर्थ शब्द उत्तरपद पुढें असतांना दुक् आगम विकल्पानें होतो. उदाहरणार्थ–अन्यदर्थः, अन्यार्थः.

१ ( सू. १०१ ) तत्पुरुष समासामध्यें अजादि उत्तरपद पुढें असतांना कु शब्दाला कद् असा आदेश होतो. उदाहरणार्थ– कदश्वः.

२. येथें कु शब्दाला कद् असा आदेश झाला आहे.

कत्त्रयः ॥

[ [1]रथवदयोश्च ॥ ६ । ३ । १०२ ॥
[1]तृणे च जातौ ॥ ६ । ३ । १०३ ॥
[1]का पथ्यक्षयोः ॥ ६ । ३ । १०४ ॥
[1]ईषदर्थे ॥ ६ । ३ । १०५ ॥
वि[1]भाषा पुरुषे ॥ ६ । ३ । १०६ ॥
[1]कवं चोष्णे ॥ ६ । ३ । १०७ ॥
[1]पथि च च्छन्दसि ॥६।३।१०८॥]
[1]पृषोदरादीनि यथोपदिष्टम् ॥ ६ । ३ । १०९ ॥

पृषोदरादीनीत्युच्यते कानि पृषोदरादीनि । पृषोदरप्रकाराणि । कानि पुनः पृषोदरप्रकाराणि । येषु लोपागमवर्णविकाराः श्रूयन्ते न चोच्यन्ते ॥ अथ यथेति किमिदम् । प्रकारवचने थाल् [ ५. ३. २३ ] ॥ अथ किमिदमुपदिष्टानीति । उच्चरितानि । कुत एतत् । दिशिरुच्चारणक्रियः । उच्चार्य हि वर्णानाहोपदिष्टा इमे वर्णा इति । कैः पुन-

---

न बिभृयुः क[3]त्त्रयः.

(सू. १०९) येथें पृषोदरादीनि असें म्हटलें आहे ते पृषोदरादिक शब्द कोणते ?

जे पृषोदर या शब्दासारखे आहेत ते पृषोदरादि शब्द होत.

पृषोदर शब्दासारखे शब्द कसे बरें ओळखावे ?

ज्या शब्दांमध्यें लोप, आगम आणि वर्णविकार दृष्टीस पडतात पण शास्त्रानें त्यांचें विधान केलेलें दिसत नाहीं असे जे शब्द ते पृषोदर या शब्दासारखे शब्द होत.

आतां या सूत्रामध्यें 'यथा' हा शब्द कोणत्या अर्थाचा आहे ?

'प्रकारवचने थाल्' ( ५।३।२३ ) या सूत्रानें थाल् प्र[2]त्यय झाला आहे.

आतां उपदिष्टानि म्हणजे काय ?

उच्चारण केलेलीं असा त्याचा अर्थ आहे.

हें कशावरून ?

दिश् धातूचा अर्थ उच्चारण करणें असा आहे. कारण वर्णांचा उच्चार करून 'इमे वर्णा

---

३. येथें प्रश्नार्थक किम् शब्दाला कद् आदेश झाला आहे. वार्तिकानें सांगितलेला कद् आदेश कु शब्दालाच होतो असें नाहीं.

१ (सू. १०२) रथ किंवा वद हे शब्द उत्तरपद पुढें असतांना कु शब्दाला कद् आदेश होतो. उदाहरणार्थ- कद्रथः, कद्वदः.

१ (सू. १०३) तृण शब्द उत्तरपद पुढें असतांना कु शब्दाला जाति वाच्य असतांना कद् आदेश होतो. उदाहरणार्थ-कत्तृणम्.

१ (सू. १०४) पथिन् किंवा अक्ष हे शब्द उत्तरपद पुढें असतांना कु शब्दाला का असा आदेश होतो. उदाहरणार्थ- कापथः, काक्षः.

१ (सू. १०५) ईषत् या अर्थाच्या कु शब्दाला उत्तरपद पुढें असतांना का असा आदेश होतो. उदाहरणार्थ- कालवणम्, कोष्णम्.

१ (सू. १०६) पुरुष शब्द उत्तरपद पुढें असतांना कु शब्दाला का असा आदेश विकल्पानें होतो. उदाहरणार्थ- कापुरुषः, कुपुरुषः.

१ (सू. १०७) उष्ण शब्द उत्तरपद पुढें असतांना कु शब्दाला कव आणि का असे आदेश विकल्पानें होतात. उदाहरणार्थ-कवोष्णम्, कोष्णम्, कदुष्णम्.

१. (सू. १०८) वेदामध्यें पथिन् शब्द उत्तरपद पुढें असतांना कु शब्दाला कव आणि का असे आदेश विकल्पानें होतात. उदाहरणार्थ- कवपथः, कापथः, कुपथः.

१ (सू. १०९) पृषोदरादि गणामध्यें पृषोदर वगैरे शब्द जसे उच्चारले आहेत तसेच ते साधु म्हणजे शुद्ध आहेत असें समजावें.

२. तेव्हां 'यथा' शब्दाचा अर्थ 'ज्या प्रकारचे' असा आहे.

रुपदिष्टाः । शिष्टैः । के पुनः शिष्टाः । वैयाकरणाः । कुत एतत् । शास्त्रपूर्विका हि शिष्टिर्वैयाकरणाश्च शास्त्रज्ञाः । यदि तर्हि शास्त्रपूर्विका शिष्टिः शिष्टिपूर्वकं च शास्त्रं तदितरेतराश्रयं भवति । इतरेतराश्रयाणि च न प्रकल्पन्ते । एवं तर्हि निवासत आचारतश्च । स चाचार आर्यावर्त एव । कः पुनरार्यावर्तः । प्रागादर्शात्प्रत्यक्कालकवनाद्दक्षिणेन हिमवन्तमुत्तरेण पारियात्रम् । एतस्मिन्नार्यनिवासे ये ब्राह्मणाः कुम्भीधान्या अलोलुपा अगृह्यमाणकारणाः किंचिदन्तरेण कस्याश्चिद्विद्यायाः पारगास्तत्रभवन्तः शिष्टाः ॥ यदि तर्हि शिष्टाः शब्देषु प्रमाणं किमष्टाध्याय्या क्रियते । शिष्टज्ञानार्थाष्टाध्यायी । कथं पुनरष्टाध्याय्या शिष्टाः शक्या विज्ञातुम् । अष्टाध्यायीमधीयानोऽन्यं पश्यत्यनधीयानं येऽत्र विहिताः शब्दास्तान्प्रयुञ्जानम् । स पश्यति । नूनमस्य दैवानुग्रहः

---

उपदिष्टाः ' असें म्हणतात.

पण येथें पृषोदर वगैरे शब्द कोणीं उच्चारलेले समजावयाचे ?

शिष्ट लोकांनीं.

ते शिष्ट कोणते ?

वैयाकरण लोक शिष्ट होत.

हें कशावरून ?

योग्य सांगणें हें जें शिष्टांचें कर्तव्य तें शास्त्रज्ञानपूर्वक आहे. आणि वैयाकरण हे शास्त्रज्ञ आहेत.

पण शास्त्रज्ञानामुळें 'अमुक योग्य आहे' असें शिष्ट लोक सांगणार; आणि योग्य काय तें समजल्यानंतर पृषोदर वगैरे शब्द साधु आहेत असें शास्त्र सांगणार. तेव्हां अन्योन्याश्रय दोष येत आहे. आणि अशा रीतीनें एकमेकावर अवलंबून असलेलीं कार्यें तर मुळींच घडून येत नाहींत.[1]

असें आहे तर मग चांगल्या ठिकाणीं राहणारे व सदाचारसंपन्न जे लोक ते येथें शिष्ट समजावे; व तो सदाचार आर्यावर्त देशामध्येंच आहे.

आर्यावर्त देश तो कोणता ?

पश्चिमेकडे कुरुक्षेत्रांतील आदर्श, पूर्वेकडे प्रयागाशेजारीं कालक वन, उत्तरेकडे हिमालय, आणि दक्षिणेकडे पारियात्र, या चार सीमांच्या मधील जो देश तो आर्यावर्त होय. या आर्यावर्त देशामध्यें राहणारे, ज्यांच्या जवळ धान्याचा साठा एका घागरींत मावण्याइतकाच आहे असे निर्लोभी, स्वभावतःच सदाचारानें वागणारे, आणि कांहीं विशेष दृश्यमान कारणावांचून विद्येमध्यें परिनिष्ठित असे जे प्रभावशाली लोक ते शिष्ट होत.

आतां जर शब्दाच्या साधुत्वाबद्दल शिष्ट लोक हे प्रमाण धरले जातील तर ह्या अष्टाध्यायीचा काय उपयोग ?

शिष्ट कोण हे ओळखण्याकडे अष्टाध्यायीचा उपयोग होत आहे.

पण अष्टाध्यायीवरून कसे बरें शिष्ट ओळखले जातात ?

अष्टाध्यायीचें अध्ययन केलेला मनुष्य अष्टाध्यायीचें अध्ययन न केलेल्या अशा एखाद्या मनुष्याला अष्टाध्यायीमध्यें सांगितल्याप्रमाणें बिनचूक शब्दप्रयोग करतांना पाहतो. त्यावरून तो अशी कल्पना करतो कीं ज्या अर्थी हा अष्टाध्यायी न म्हणतां बिनचूक शब्दप्रयोग करतो त्या अर्थी याच्यावर खरोखर ईश्वराची कृपा झाली असली पाहिजे कीं ज्या योगानें हा अष्टाध्यायी तर म्हणत नाहीं आणि शब्दप्रयोग तर

---

[1] तात्पर्य, 'शास्त्र जाणणारे ते शिष्ट' अशी शिष्ट शब्दाची व्याख्या येथें गृहीत धरतां येत नाहीं.

स्वभावो वा योऽयं न चाष्टाध्यायीमधीते ये चात्र विहिताः शब्दास्तांश्च प्रयुङ्क्ते । अयं नूनमन्यानपि जानाति । एवमेषा शिष्टज्ञानार्थाष्टाध्यायी ॥

**दिक्शब्देभ्यस्तीरस्य तारभावो वा ॥ १ ॥**

दिक्शब्देभ्यस्तीरस्य तारभावो वा वक्तव्यः । दक्षिणतीरम् दक्षिणतारम् ॥

**वाचो वादे डत्वं वलभावश्चोत्तरपदस्येञि ॥ २ ॥**

वाचो वादे डत्वं वक्तव्यं वलभावश्चोत्तरपदस्येञि वक्तव्यः । वाग्वादस्यापत्यं वाड्वलिः ॥

**षष उत्वं दतृदशसूत्तरपदादेः ष्टुत्वं च ॥ ३ ॥**

षष उत्वं वक्तव्यमुत्तरपदादेः ष्टुत्वं च वक्तव्यम् । षोडन् षोडश ॥

**धासु वा ॥ ४ ॥**

धासु वेति वक्तव्यमुत्तरपदादेः ष्टुत्वं च वक्तव्यम् । षोढा । षड्ढा कुरु ॥ अथ किमर्थं बहुवचननिर्देशः क्रियते न पुनर्धायामित्येवोच्येत । नानाधिकरणवाची यो धाशब्दस्तस्य ग्रहणं यथा विज्ञायेत । इह मा भूत् । षड् दधातीति षडधेति ॥

**दुरो दाशनाशदभध्येषु ॥ ५ ॥**

दुरो दाशनाशदभध्येषूत्वं वक्तव्यमुत्तर-

---

बिनचूक अष्टाध्यायींत सांगितल्याप्रमाणें करतो. तेव्हां यावरूनच अष्टाध्यायीमध्यें न सांगितलेले शब्दही याला बरोबर माहीत असलेच पाहिजेत असें अष्टाध्यायीचें अध्ययन करणारा मनुष्य अनुमान ठरवितो.

( वा. १ ) दिक्–वाचक शब्दाहून पुढील जो तीर शब्द त्याचे स्थानीं विकल्पानें तार असा आदेश होतो असें वचन करावें. उदाहरणार्थ– दक्षिणतारम्, दक्षिणतीरम्; उत्तरतारम्, उत्तरतीरम्.

( वा. २ ) वाच् शब्दाच्या चकाराला डकार आदेश होतो आणि त्याच्या पुढें उत्तरपद जो वाद शब्द त्याचे स्थानीं वल असा आदेश इञ् प्रत्यय पुढें असतांना होतो असें वचन करावें. उदाहरणार्थ– वाचं वदतीति वाग्वादः; तस्यापत्यं वाड्वलिः.

( वा. ३ ) षष् शब्दाच्या शेवटच्या षकाराला उकार आदेश होतो दतृ ( ५।४।१४१ ) व दशन् हे शब्द उत्तरपद पुढें असतांना आणि त्या उत्तरपदाच्या आदि दकाराला ष्टुत्व होतें असें वचन करावें. उदाहरणार्थ– षट् दन्ता अस्य षोडन्. षट् च दश च षोडश.

( वा. ४ ) धा शब्द पुढें असतांना षष् शब्दाच्या शेवटच्या षकाराला विकल्पानें उत्व होतें असें वचन करावें. तसेंच त्या धा शब्दाच्या आदि धकाराला ष्टुत्व होतें असें वचन करावें. उदाहरणार्थ– षोढा तसेंच षड्ढा कुरु.

आतां येथें 'धासु' असा बहुवचनानें निर्देश कां बरें केला आहे ? 'धा'याम् असेंच कां बरें म्हटलें नाहीं ?

पदार्थांचें अनेकत्व दाखविणारा जो 'धा' शब्द (५।३।४३) तो येथें घेतला जावा याकरितां बहुवचनानें निर्देश केला आहे. कारण, षट् दधातीति षड्धा येथें उत्व न झालें पाहिजे.

( वा. ५ ) दुर् शब्दाच्या रेफाला दाश, नाश, दभ, आणि ध्य हे शब्द उत्तरपद पुढें

---

४. येथें षट् शब्द उपपद असतांना धा धातूहून क प्रत्यय ( ३।२।३ ), धातूच्या आकाराचा लोप ( ६।४।६४ ) व पुढें टाप् प्रत्यय ( ४।१।४ ) अशीं कार्यें झालीं आहेत.

पदादेश्च ष्टुत्वम् । दूडाशः दूणाशः दूडभः दूढ्यः ॥

**स्वरो रोहतौ छन्दसि ॥ ६ ॥**

स्वरो रोहतौ छन्दस्युत्वं वक्तव्यम् । एहि स्वं जाये स्वो रोहाव ॥

पीवोपवसनादीनां छन्दसि लोपो वक्तव्यः । पीवोपवसनानाम् पयोपवसनानाम् श्रियेदम् ॥

**[ संख्याविसायपूर्वस्याह्नस्यान्यतरस्यां ङौ ॥६।३।११० ]**

**ढ्रलोपे पूर्वस्य दीर्घोऽणः ॥ ६ । ३ । १११ ॥**

पूर्वग्रहणं किमर्थं न तस्मिन्निति निर्दिष्टे पूर्वस्य [ १. १. ६६ ] इति पूर्वस्यैव भविष्यति । न सिध्यति न हि ढ्रलोपेनानन्तर्यम् ॥ इह कस्मान्न भवति । करणीयम् हरणीयम् । नैवं विज्ञायते ढ्रोर्लोपो ढ्रलोपः ढ्रलोप इति । कथं तर्हि । ढ्रोर्लोपो ऽस्मिन्सो-

---

असतांना उत्व होतें आणि उत्तरपदाच्या आद्य वर्णाला ष्टुत्व होतें असें वचन करावें. उदाहरणार्थ– दुःखेन दाश्यते दूडाशः; दुःखेन नाश्यते दूणाशः; दुःखेन दभ्यते दूडभः; दुःखेन ध्यायतीति दूढ्यः.

(वा. ६) वेदामध्यें 'स्व र्, शब्दाच्या रेफाला रुह् धातु पुढें असतांना उत्व होतें असें वचन करावें. उदाहरणार्थ– एहि त्वं जाये स्वो रोहाव.

'पीवोपवसनादीनां छन्दसि लोपः' म्हणजे वेदामध्यें पीवोपवसन वगैरे शब्द सिद्ध होण्याकरितां त्यांतील वर्णाचा लोप होतो असें वचन करावें. उदाहरणार्थ– पीवोपवसनानाम्, पयोपवसनानाम्, श्रियेदम्.[५]

( सू. १११ ) येथें पूर्वस्य हा शब्द कशाकरितां आहे ? तो घालावयास नको. 'सप्तमीनिर्देशानें सांगितलेलें कार्य पूर्वाला करावें' या अर्थाच्या 'तस्मिन्निति०' ( १।१।६६ ) या परिभाषेनेंच ' पूर्वस्य ' या अर्थाचा लाभ होईल.

अशा रीतीनें सिद्ध होणार नाहीं. कारण ' ढ्रलोपे ' या सप्तम्यन्त पदाचा अर्थ ' ढकार व रेफ यांचा लोप ' असा आहे. आणि लोप हा अभावरूपी असल्यामुळे त्याच्या जवळचा मागील अण् असें म्हणतां येत नाहीं.

आतां करणीयम् हरणीयम् येथें अनीयर् ( ३।१।९६ ) प्रत्ययांतील रेफाचा लोप झाला असल्यामुळें पूर्व अणाला प्रकृत सूत्रानें दीर्घ कां बरें होत नाहीं ?

हा दोष येत नाहीं. कारण ढ्रोर्लोपः ढ्रलोपः असा षष्ठीतत्पुरुष आम्ही समजत नाहीं. तर ढ्रोर्लोपो यस्मिन् सोऽयं ढ्रलोपः असा बहुव्रीहि समजला जात आहे.[२]

---

५. येथें पीवस् व पयस् या शब्दांतील सकाराचा लोप झाला आहे. श्रियेदम् येथें इदम् शब्दाच्या इकाराचा लोप झाला आहे.

१ ( सू. ११० ) संख्यावाचक शब्द, वि शब्द आणि सायं शब्द यांच्या पुढील उत्तरपद जो अह्न शब्द त्याला ङी प्रत्यय पुढें असतांना विकल्पानें अहन् आदेश होतो. उदाहरणार्थ– द्वयोरह्नोर्भवः द्व्यह्नः, द्व्यह्नि, द्व्यहनि ( ६।४।१३६ ), द्व्यह्ने. येथें अहन् शब्दाला समासामध्यें अह्न आदेश ( ५।४।८८ ) झाला आहे.

१ ( सू. १११ ) जो ढकार पुढें असतांना मागील ढकाराचा लोप ( ८।३।१३ ) झाला असेल किंवा जो रेफ पुढें असतांना मागील रेफाचा लोप ( ८।३।१४ ) झाला असेल असा ढकार किंवा रेफ पुढें असतांना पूर्वीच्या अणाला दीर्घ होतो. उदाहरणार्थ– लीढः; पुना रमते; हरी रम्यः.

२. ' जे ढकार किंवा रेफ पुढें असतांना मागील ढकाराचा किंवा रेफाचा लोप होतो ते ढकार आणि रेफ ' असा ढ्रलोप या शब्दाचा बहुव्रीहीनें अर्थ होतो.

ऽयं ढ्रलोपः ढ्रलोप इति । यद्येवं नार्थः पूर्वग्रहणेन भवति हि ढ्रलोपेनानन्तर्यम् ॥ इदं तर्हि प्रयोजनम् । उत्तरपद इति वर्तते आनन्तर्यमात्रे कार्यं यथा स्यात् । औदुम्बरी राजा । पुना रूपाणि कल्पयेत् ॥

**सहिवहोरोदवर्णस्य ॥ ६ । ३ । ११२ ॥**

वर्णग्रहणं किमर्थं न सहिवहोरोदस्येत्येवोच्येत । वृद्धावपि कृतायामोत्त्वं यथा स्यात् । उदवोढाम् उदवोढम् उदवोढेति ॥ अथावर्णग्रहणं किमर्थम् । इह मा भूत् । ऊढः ऊढवानिति । नैतदस्ति प्रयोजनम् । भवत्येवात्रौत्त्वम् । श्रवणं कस्मान्न भवति । पूर्वत्वमस्य भविष्यति । इदमिह संप्रधा-

---

पण असा अर्थ समजला तर पूर्वस्य हा शब्द घालण्याचें प्रयोजन दिसत नाहीं. कारण बहुव्रीहि समजला असतां ढ्रलोप याचा अर्थ ढकार आणि रेफ यांचा लोप करणारे ढकार आणि रेफ असा होत असल्यामुळें त्याच्या मागील जवळचा अण् असें म्हणतां येतें.

तर मग आतां येथें पूर्वस्य हा शब्द घालण्याचा उपयोग असा समजावा कीं– येथें उत्तरपदे हें अनुवृत्त होऊन उत्तरपद पुढें असतांनाच पूर्वपदांतील अणाला प्रकृत सूत्रानें दीर्घ होईल आणि आम्हाला तर ढकार व रेफ यांचा लोप करणारे ढकार व रेफ पुढें असले म्हणजे तशा सर्वच ठिकाणीं दीर्घ झाला पाहिजे; उत्तरपद पुढें असो अथवा नसो. उदाहरणार्थ– औदुम्बरी[३] राजा, धूमाकी रथेन, पुना रूपाणि, लीढः.

( सू. ११२ ) येथें वर्ण हा शब्द कशाकरितां घातला आहे ? तो घालूं नये. ' सहिवहोरोदस्य'[१] एवढेंच म्हणावें.

सह् आणि वह् या धातूंच्या अकाराला वृद्धि केली असतांनाही ओकार आदेश व्हावा याकरितां वर्ण शब्द घातला आहे. उदाहरणार्थ– उदवोढाम्[२], उदवोढम्, उदवोढ.

आतां येथें अवर्णस्य असें कशाकरितां बरें म्हटलें आहे ?

ऊढः ऊढवान् येथें ऊकाराला ओकार आदेश न व्हावा म्हणून म्हटलें आहे.

हें प्रयोजन होत नाहीं. कारण, येथे ओकार आदेश होतच आहे.

तर मग त्या ओकाराचें श्रवण ऊढः इत्यादि स्थलीं कां बरें होत नाहीं ?

ओकाराला ' संप्रसारणाच्च ' ( ६।१।१०८ ) यानें पूर्वरूप होतें म्हणून.

पण येथें अगोदर असा विचार केला पाहिजे कीं वह् धातूच्या वकाराला संप्रसारणानें ( ६।१। १५ ) उकार आदेश केल्यानंतर त्याच्या पुढील अकाराला प्रकृत सूत्रानें ओकार अगोदर करावा किंवा पूर्वरूप करावें.

---

३. औदुम्बरिः राजा अशीं येथें निराळीं पदें आहेत. समास नसल्यामुळें उत्तरपद म्हणतां येत नाहीं. तसेंच धूमाकिः रथेन आणि पुनः रमते हीं निराळीं पदें आहेत.

१ ( सू. ११२ ) ढकाराचा लोप करणारा ढकार पुढें असतां सह् आणि वह् या धातूंच्या अ या वर्णाला ओकार आदेश होतो. उदाहरणार्थ सोढा वोढा. येथें सह् व वह् या धातूंहून तृच् प्रत्यय केला आहे.

२. वह् धातूहून लुङ्, प्रथमपुरुष द्विवचन तस्, त्याला ताम् आदेश ( ३।४।१० ), मध्यें च्लि प्रत्यय ( ३।१।४३ ), त्याला सिच्, धातूच्या अकाराला वृद्धि ( ७।२।३ ), ढत्व ( ८।२।३१ ), धत्व (८।२।४०), ष्टुत्व ( ८।४।४१ ), ढकाराचा लोप ( ८।३।१३ ) आणि प्रकृत सूत्रानें आकाराला ओकार अशीं कार्यें झालीं आहेत.

येम्। ओत्त्वं क्रियतां पूर्वत्वमिति किमत्र कर्तव्यम्। परत्वादोत्त्वम्। अन्तरङ्गं पूर्वत्वम्॥ एवं तर्हीदमिह संप्रधार्यम्। ओत्त्वं क्रियतां संप्रसारणमिति किमत्र कर्तव्यम्। परत्वादोत्त्वम्। नित्यं संप्रसारणम्। कृतेऽप्योत्त्वे प्राप्नोत्यकृतेऽपि। ओत्त्वमपि नित्यम्। कृतेऽपि संप्रसारणे प्राप्नोत्यकृतेऽपि। अनित्यमोत्त्वं न हि कृते संप्रसारणे प्राप्नोति। अन्तरङ्गं पूर्वत्वम्। यस्य च लक्षणान्तरेण निमित्तं विहन्यते न तद्नित्यम्। न च संप्रसारणमेवौत्त्वस्य निमित्तं विहन्त्यवश्यं लक्षणान्तरं पूर्वत्वं प्रतीक्ष्यम्। उभयोर्नित्ययोः परत्वादोत्त्वम्। ओत्त्वे कृते संप्रसारणं संप्रसारणपरपूर्वत्वम्। तत्र कार्यकृतत्वात्पुनरोत्त्वं न भविष्यति॥

**[साढ्यै साढ्वा साढेति निगमे ॥ ६ । ३ । ११३ ॥**

**संहितायाम् ॥ ६ । ३ । ११४ ॥**

---

मग यांत काय बरें करावें ?

पर असल्यामुळें ओत्त्व अगोदर करावें.

पण पूर्वरूप अंतरंग आहे ना ?

तर मग येथें असा विचार करावा कीं—अगोदर ओत्त्व करावें किंवा संप्रसारण करावें.

मग यांमध्यें काय बरें अगोदर करावें ?

पर असल्यामुळें ओत्त्व अगोदर करावें.

पण ओत्त्व केलें किंवा न केलें तरी संप्रसारण हें प्राप्त होत असल्यामुळें संप्रसारण नित्य आहे.

ओत्त्वही नित्य आहे. कारण, संप्रसारण केलें अथवा न केलें तरीही तें प्राप्त होत आहेच.

पण ओत्त्व नित्य म्हणतां येत नाहीं. कारण संप्रसारण केलें असतां ओत्त्व प्राप्त होत नाहीं. कारण, अन्तरङ्ग अशा पूर्वरूपानें त्याचा बाध होतो.

पण प्राप्त झालेल्या दोन शास्त्रांपैकीं ज्याच्या निमित्ताचा विनाश त्या दोघांवाचून तिसऱ्या शास्त्रानें होत असेल त्या शास्त्राला अनित्य म्हणतां येत नाहीं. प्रकृत स्थलीं तर केवळ संप्रसारणच कांहीं ओत्वाच्या निमित्ताचा विनाश करीत नाहीं. तर तें काम संप्रसारणानें पूर्वरूपाकडे दिलेलें आहे.[3] एकदरींत दोघांनाही नित्यत्व असल्यामुळें परत्वास्तव प्रथमत: ओत्त्व होतें. ओत्त्व करून संप्रसारण केल्यानंतर पूर्वरूप करावयाचें, तें पूर्वरूप केल्यानंतर पूर्वी एकदा ओत्त्व तेथें केलें असल्यामुळें पुन: ओत्त्व होणार[4] नाहीं.

---

३. तात्पर्य, संप्रसारण नित्य आहे तसें ओत्वही नित्य आहे.

४. ‘ ज्या उदाहरणामध्यें ज्या ठिकाणीं एकदां एक शास्त्र केलें असेल त्याच उदाहरणामध्यें त्या ठिकाणीं पुनः तें शास्त्र प्रवृत्त होत नाहीं ’ या अर्थाचा ‘लक्ष्ये लक्षणं सकृदेव प्रवर्तते ’ असा न्याय आहे.

१ ( सू. ११३ ) साढ्यै, साढ्वा आणि साढा हे तीन शब्द वेदामध्यें निपातन केले जातात. सह् धातूहून क्त्वा प्रत्यय केल्यानंतर त्याला एकदां ध्यै आदेश निपातनामुळें होतो. तिन्ही ठिकाणीं निपातनामुळें पूर्वसूत्रानें ‘ ओ ’ कार आदेश झाला नाहीं.

१ ( सू. ११४ ) हें अधिकारसूत्र आहे. हा पाद संपेपर्यंत ‘संहितायाम्’ याचा संबंध आहे. संहिता म्हणजे जोडून म्हणणें ( १।४।१०९ ). विद्मा हि त्वा० या मंत्रामध्यें विद्म या क्रियापदाला दीर्घ ( ६।३।१३५ ) झाला आहे. जेव्हां तोडून निरनिराळीं पदें म्हणावयाचीं तेव्हां संहिता नसल्यामुळें दीर्घ होत नाहीं. म्हणून विद्म हि त्वा असेंच म्हणावें लागतें.

**[ कर्णे लक्षणस्याविष्टाष्टपञ्चमणिभिन्नच्छिन्नच्छिद्रस्रुवस्वस्तिकस्य ॥ ६ । ३ । ११५ ॥**

**नहिवृतिवृषिव्यधिरुचिसहितनिषु कौ ॥ ६ । ३ । ११६ ॥**

**वनगिर्योः संज्ञायां कोटरकिंशुलुकादीनाम् ॥ ६ । ३ । ११७ ॥**

**वले ॥ ६ । ३ । ११८ ॥**

**मतौ बह्वचोऽनजिरादीनाम् ॥ ६ । ३ । ११९ ॥**

**शरादीनां च ॥ ६ । ३ । १२० ॥ ]**

**इको वहेऽपीलोः ॥ ६ । ३ । १२१ ॥**

अपील्वादीनामिति वक्तव्यम् । इह मा भूत् । रुचिवहम् चारुवहम् ॥

**उपसर्गस्य घञ्यमनुष्ये बहुलम् ॥ ६ । ३ । १२२ ॥**

अमनुष्यादिष्विति वक्तव्यम् । इह मा भूत् । प्रसेवः प्रहारः प्रसारः ॥

**सादकारयोः कृत्रिमे ॥ १ ॥**

सादकारयोः कृत्रिम इति वक्तव्यम् । इहैव यथा स्यात् । प्रासादः प्राकारः । इह

---

( सू. १२१ ) अपील्वादीनामिति वक्तव्यम् म्हणजे अपीलोः याचे ऐवजीं ' अपील्वादीनाम् ' असें पठन करावें. कारण पील्वादि गणांतील इतर शब्दांनाही हा दीर्घ न झाला पाहिजे. उदाहरणार्थ– रुचिवहम्, चारुवहम्.

( सू. १२२ ) अमनुष्यादिष्विति वक्तव्यम् म्हणजे अमनुष्ये याच्या ऐवजीं ' अमनुष्यादिषु ' असें येथें पठन करावें. कारण प्रसेवः, प्रसारः, प्रहारः येथें दीर्घ न झाला पाहिजे.

( वा. १ ) साद आणि कार हे घञ्-प्रत्ययान्त शब्द उत्तरपद पुढें असतांना उपसर्गाला जो प्रकृत सूत्रानें दीर्घ प्राप्त होतो तो त्या सामासिक शब्दानें कृत्रिम या अर्थाचें प्रतिपादन केलें असेल तर होतो असें वचन करावें. कारण

---

१ ( सू. ११५ ) विष्ट, अष्टन्, पञ्चन्, मणि, भिन्न, छिन्न, छिद्र, स्रुव आणि स्वस्तिक या शब्दांशिवाय कोणत्याहि पूर्वपदाच्या शेवटच्या अचाला दीर्घ होतो कर्ण शब्द उत्तरपद पुढें असतांना आणि त्या पूर्वपदापासून कानाची कांहीं तरी विशेष खूण दाखविली जात असतांना. उदाहरणार्थ– द्विगुणाकर्णः.

१ ( सू. ११७ ) वन शब्द उत्तरपद पुढें असतांना कोटर वगैरे शब्दांतील शेवटच्या अचाला दीर्घ होतो. परंतु तो सामासिक शब्द कोणाची तरी संज्ञा म्हणून असला पाहिजे. उदाहरणार्थ– कोटरावनम्. किंशुलुकागिरिः.

१ ( सू. ११८ ) वल प्रत्यय (५।२।११२) पुढें असतांना पूर्वी असलेल्या अचाला दीर्घ होतो. उदाहरणार्थ– कृषीवलः.

१ ( सू. ११९ ) ज्या शब्दामध्यें कमींत कमी तीन अच् आहेत अशा शब्दांतील शेवटच्या अचाला मतुप् प्रत्यय पुढें असतांना दीर्घ होतो; परंतु तो शब्द अजिरादि गणांतील नसला पाहिजे, आणि तो मतुप्-प्रत्ययान्त शब्द कोणाची तरी संज्ञा असला पाहिजे. उदाहरणार्थ– उदुम्बरावती.

१ ( सू. १२० ) मतुप् प्रत्यय पुढें असतांना शर वगैरे शब्दांतील शेवटच्या अचाला दीर्घ होतो; तो मतुप्-प्रत्ययान्त शब्द कोणाची तरी संज्ञा असला पाहिजे. उदाहरणार्थ– शरावती नदी.

१ ( सू. १२१ ) पीलु शब्दाशिवाय इतर कोणत्याही पूर्वपदाच्या शेवटच्या इकाला वह शब्द उत्तरपद पुढें असतांना दीर्घ होतो. उदाहरणार्थ– ऋषीवहम्.

१. ( सू. १२२ ) घञ्-प्रत्ययान्त उत्तरपद पुढें असतांना मागील उपसर्गाच्या शेवटच्या अचाला मनुष्य हा अर्थ गम्यमान होत नसेल तर बाहुल्येकरून दीर्घ होतो. उदाहरणार्थ– अपामार्गः.

मा भूत् । एषोऽस्य प्रसादः । एषोऽस्य प्रकारः ॥

**प्रतिवेशादीनां विभाषा ॥ २ ॥**

प्रतिवेशादीनां विभाषा दीर्घत्वं वक्तव्यम् । प्रतिवेशः प्रतीवेशः ॥

**[ इकः काशे[1] ॥६ । ३ । १२३॥ ]**

**दस्ति[1] ॥ ६ । ३ । १२४ ॥**

कथमिदं विज्ञायते । दा इत्येतस्मिंस्तकारादौ । आहोस्विद्दा इत्येतस्मिंस्तकारान्त इति । किं चातः । यदि विज्ञायते तकारादाविति नीत्ता वीत्ता अत्र न प्राप्नोति । अथ विज्ञायते तकारान्त इति सुदत्तम् प्रतिदत्तम् अत्रापि प्राप्नोति । यथेच्छसि तथास्तु ॥ अस्तु तावत्तकारादाविति । कथं नीत्ता वीत्ता । चर्त्वे कृते भविष्यति । असिद्धं चर्त्वं तस्यासिद्धत्वान्न प्राप्नोति । आश्रयात्सिद्धत्वं भविष्यति ॥ अथवा पुनरस्तु तकारान्त इति । कथं सुदत्तम् प्रतिदत्तम् । नैतत्तकारान्तं

---

एषोऽस्य प्रासादः, एषोऽस्य प्राकारः येथेंच दीर्घ झाला पाहिजे; आणि एषोऽस्य प्रकारः, एषोऽस्य प्रसादः येथें दीर्घ न झाला पाहिजे म्हणून म्हटलें आहे.

( वा. २ ) प्रतिवेश वगैरे शब्दांमध्यें पूर्वपदाला विकल्पानें दीर्घ होतो असें वचन करावें. उदाहरणार्थ– प्रतिवेशः, प्रतीवेशः; प्रतिकारः, प्रतीकारः.

( सू. १२४ ) काय हो, येथें दा धातूपासून साधलेलें असें तकारादि उत्तरपद पुढें असतांना असा याचा अर्थ आहे किंवा तकारान्त उत्तरपद पुढें असतांना असा अर्थ आहे ?

मग यांत काय बरें फरक आहे ?

जर तकारादि उत्तरपद हा पहिला पक्ष गृहीत धरला तर नीत्ता[2] व वीत्ता येथें दीर्घ होणार नाहीं. आतां तकारान्त उत्तरपद हा द्वितीय पक्ष गृहीत धरला तर सुदत्तम्[3] व प्रतिदत्तम् येथेंही दीर्घ होऊं लागेल.

मग आतां येथें तुमच्या इच्छेप्रमाणें कोणताही पक्ष असे ना. तकारादि उत्तरपद असा कां असे ना.

पण तो पक्ष घेतला तर नीत्ता व वीत्ता हीं रूपें कशीं साधावयाचीं ?

चर्त्व केल्यावर दीर्घ होईल.

पण चर्त्व असिद्ध असल्यामुळें दीर्घ प्राप्त होत नाहीं ना ?

दा-धातुसाधित तकारादि उत्तरपद असें येथें म्हटलें आहे. आणि तसें उत्तरपद चर्त्वानेंच तयार होणार असल्यामुळें सामर्थ्यास्तव चर्त्व सिद्ध समजलें जाईल. अथवा तकारान्त उत्तरपद हा पक्ष घेतला तरी हरकत नाहीं.

पण तो पक्ष घेतला तर सुदत्तम् व प्रतिदत्तम् येथें दीर्घ होऊं लागेल त्याची वाट काय ?

---

१ ( सू. १२३ ) काश शब्द उत्तरपद पुढें असतांना उपसर्गांतील शेवटच्या इकाला दीर्घ होतो. उदा०- नीकाशः. येथें काश हा शब्द अच्–प्रत्ययान्त आहे.

१ ( सू. १२४ ) दा धातूला झालेला जो तकार तो आरंभीं असलेलें उत्तरपद पुढें असतांना उपसर्गांतील शेवटच्या इकाला दीर्घ होतो. उदाहरणार्थ–नीत्तम्. येथें नि उपसर्गपूर्वक दा धातूहून क्त प्रत्यय, धातूच्या आकाराला तकार ( ७।४।४७ ), दकाराला तकार ( ८।४।५५ ), आणि नि या उपसर्गाच्या इकाराला प्रकृत सूत्रानें दीर्घ अशीं कार्यें झालीं आहेत.

२. येथें दा धातूच्या दकाराला जो तकार झाला आहे तो जरी उत्तरपदाच्या आरंभीं आहे तरी असिद्ध आहे. आणि जो अकाराला तकार झाला आहे तो जरी सिद्ध आहे तरी उत्तरपदाच्या आरंभीं नाहीं.

३. येथें दा धातूला दत् आदेश ( ७।४।४६ ) झाला आहे.

थकारान्तमेतत् ॥

[ अष्टनः संज्ञायाम् ॥ ६ । ३ । १२५ ॥[1]

छन्दसि च ॥ ६ । ३ । १२६ ॥[1]

चितेः कपि ॥ ६ । ३ । १२७ ॥[1]

विश्वस्य वसुराटोः ॥६।३।१२८॥[1]

नरे संज्ञायाम् ॥ ६ । ३ । १२९ ॥[1]

मित्रे चर्षौ ॥ ६ । ३ । १३० ॥[1]

मन्त्रे सोमाश्वेन्द्रियविश्वदेव्यस्य मतौ ॥ ६ । ३ । १३१ ॥[1]

ओषधेश्च विभक्तावप्रथमायाम् ॥ ६ । ३ । १३२ ॥[1]

ऋचि तुनुघमक्षुतङ्कुत्रोरुष्याणाम् ॥ ६ । ३ । १३३ ॥[1]

इकः सुञि ॥ ६ । ३ । १३४ ॥[1]

द्व्यचोऽतस्तिङः ॥ ६ । ३ । १३५ ॥[1]

निपातस्य च ॥ ६ । ३ । १३६ ॥[1]

अन्येषामपि दृश्यते ॥ ६ । ३ ।

---

येथें दा धातुला केलेला आदेश दत् असा तकारान्त नाहीं; तर दथ् असा थकारान्त आहे.

१ ( सू. १२५ ) अष्टन् शब्दांतील पुढील अकाराला उत्तरपद पुढें असतांना दीर्घ होतो. पण तो सामासिक शब्द कोणाची तरी संज्ञा असला पाहिजे. उदाहरणार्थ-अष्टावक्रः.

१ ( सू. १२६ ) वेदामध्यें अष्टन् शब्दांतील पुढील अकाराला उत्तरपद पुढें असतांना दीर्घ होतो. उदाहरणार्थ-अष्टापदी.

१ ( सू. १२७ ) कप् प्रत्यय पुढें असतांना चिति शब्दांतील शेवटच्या इकाराला दीर्घ होतो. उदाहरणार्थ - एकचितीकः

१ ( सू. १२८ ) वसु किंवा राट् हे शब्द उत्तरपद पुढें असतांना विश्व शब्दांतील शेवटच्या अकाराला दीर्घ होतो. उदा०-विश्वावसुः, विश्वाराट्.

१. ( सू. १२९ ) नर शब्द उत्तरपद पुढें असतांना विश्व शब्दांतील शेवटच्या अकाराला दीर्घ होतो. पण तो सामासिक शब्द कोणाची तरी संज्ञा असला पाहिजे. उदाहरणार्थ-विश्वानरो नाम कश्चन ऋषिः.

१. ( सू. १३० ) मित्र शब्द उत्तरपद पुढें असतांना विश्व शब्दांतील शेवटच्या अकाराला ऋषि हा अर्थ गम्यमान असतांना दीर्घ होतो. उदाहरणार्थ-विश्वामित्रः ऋषिः.

१ ( सू. १३१ ) सोम, अश्व, इन्द्रिय आणि विश्वदेव्य या शब्दांतील शेवटच्या अकाराला मंत्रामध्यें मतुप् प्रत्यय पुढें असतांना दीर्घ होतो. उदाहरणार्थ- सोमावती.

१ ( सू. १३२ ) मंत्रामध्यें ओषधि या शब्दांतील शेवटच्या इकाराला प्रथमेशिवाय इतर विभक्ति पुढें असतांना दीर्घ होतो. उदाहरणार्थ-नम ओषधीभ्यः.

१. ( सू. १३३ ) तु, नु, घ, मक्षु, ङित् त, कुत्र आणि उरुष्य या शब्दांतील शेवटच्या अचाला ऋचेमध्यें दीर्घ होतो. उदा०- आ तू न इन्द्र. 'तस्थस्थ०' ( ३।४।१०१ ) यानें सांगितलेला त आदेश ङित् ( १।२।४ ) मानला म्हणजे तो येथें 'ङित् त' या शब्दानें घेतां येतो.

१. ( सू. १३४ ) अकारेत्संज्ञक सु हा निपात पुढें असतांना मागील इकाला मंत्रामध्यें दीर्घ होतो. उदा०- अभी षु णः सखीनाम्.

१. ( सू. १३५ ) ज्यामध्यें दोन अच् आहेत अशा अकारान्त क्रियापदांतील शेवटच्या अकाराला दीर्घ होतो. उदा०-विद्मा हि त्वा.

१. ( सू. १३६ ) ऋचेमध्यें निपातांतील शेवटच्या अचाला दीर्घ होतो. उदा०-एवा ते, अच्छा ते.

१. ( सू. १३७ ) इतर शब्दांनाही क्वचित् दीर्घ दृष्टीस पडतो. उदा०- केशाकेशि. येथें दोन केश शब्दांचा बहुव्रीहि समास ( २।२।२७ ), समासान्त इच् प्रत्यय ( ५।४।१२७ ), आणि प्रकृत सूत्रानें पूर्वपदांतील अकाराला दीर्घ अशी कार्यें झालीं आहेत.

१३७ ॥ ]

**चौ ॥ ६ । ३ । १३८ ॥**

इहान्य आचार्याश्चौ प्रत्यङ्गस्य प्रतिषेधमाहुस्तदिहापि साध्यम् । नैष दोषः । एतज्ज्ञापयति न चौ प्रत्यङ्गं भवतीति यदयं चौ दीर्घत्वं शास्ति ॥

**संप्रसारणस्य ॥ ६ । ३ । १३९ ॥**

**इको ह्रस्वात्संप्रसारणदीर्घत्वं विप्रतिषेधेन ॥ १ ॥**

इको ह्रस्वात्संप्रसारणदीर्घत्वं भवति विप्रतिषेधेन । इको ह्रस्वस्यावकाशः । ग्रामणिकुलम् सेनानिकुलम् । संप्रसारणदीर्घत्वस्यावकाशः । विभाषा ह्रस्वत्वं यदा न ह्रस्वत्वं सोऽवकाशः । ह्रस्वप्रसङ्ग उभयं प्राप्नोति । कारीषगन्धीपुत्रः । संप्रसारणदीर्घत्वं भवति विप्रतिषेधेन ॥ अथेदानीं दीर्घत्वे कृते पुनःप्रसङ्गविज्ञानाद्ध्रस्वत्वं कस्मान्न भवति । सकृद्गतौ विप्रतिषेधे यद्बाधितं तद्बाधितमेवेति ॥

इति श्रीभगवत्पतञ्जलिविरचिते व्याकरणमहाभाष्ये षष्ठस्याध्यायस्य तृतीये पादे तृतीयमाह्निकम् ॥ पादश्च समाप्तः ॥

---

( सू. १३८ ) येथें अन्य कोणी आचार्य 'चौ' या सूत्राच्या दृष्टीनें जें अंतरंग शास्त्र त्याच्या प्रतिषेधाकरितां वचन पठन करतात. तो प्रतिषेध या शास्त्रांतही घेतला पाहिजे[2].

हा दोष येत नाही. कारण ज्या अर्थी हे आचार्य पाणिनि 'चौ' या सूत्रानें दीर्घाचें विधान करीत आहेत त्या अर्थी या सूत्राच्या दृष्टीनें जें अंतरंग शास्त्र तें होत नाहीं असें ते सुचवीत आहेत.

( सू. १३९ वा. १ ) 'इको ह्रस्वोऽङ्यो०' ( ६।३।६१ ) यानें सांगितलेल्या ह्रस्वापेक्षां प्रकृत सूत्रानें संप्रसारणाला सांगितलेला दीर्घ विप्रतिषेधानें होतो. 'इको ह्रस्वो०' या ह्रस्वाला ग्रामणिकुलम् व सेनानिकुलम् येथें अवकाश आहे. व या संप्रसारणदीर्घाला ह्रस्व विकल्पानें सांगितला असल्यामुळे ह्रस्वाभावपक्षीं कौमुदगन्धीपुत्रः येथें अवकाश आहे. आणि ह्रस्वपक्षीं कौमुदगन्धि+पुत्रः अशा स्थितींत दोघांची प्राप्ति आली असतां विप्रतिषेधानें संप्रसारणदीर्घ होतो. उदाहरणार्थ– कारीषगन्धीपुत्रः, कौमुदगन्धीपुत्रः.

आतां येथें दीर्घ केल्यानंतर 'पुनःप्रसंग'–न्यायानें ह्रस्व कां बरें होत नाहीं ?

'पूर्व आणि पर अशा दोन शास्त्रांची युगपत् प्राप्ति आली असतां विप्रतिषेधानें ज्याचा एकदां बाध केला जातो त्याचा कायमचाच तेथें बाध होतो' या सकृद्गतिन्यायानें पुनः ह्रस्व होत नाहीं.

याप्रमाणें श्रीभगवान् पतंजलि ऋषींनीं रचिलेल्या व्याकरणमहाभाष्याच्या सहाव्या अध्यायाच्या तिसऱ्या पादाचें तिसरें आन्हिक समाप्त झालें व तिसरा पादही समाप्त झाला.

---

१. ( सू. १३८ ) अन्चु धातूच्या अकाराचा आणि नकाराचा लोप झाल्यानंतर त्याच्या मागील पूर्वपदांतील शेवटच्या अचाला दीर्घ होतो. उदा०– दधीचः पश्य.

२. नाहीं तर दधीचः येथें अंतरंग म्हणून अगोदरच दधि शब्दांतील इकाराला यण् होऊं लागेल. तसेंच इतर ठिकाणीहि पूर्वी संधिकार्य झालें तर प्रकृत सूत्राला उदाहरणच मिळणार नाहीं.

१. ( सू. १३९ ) संप्रसारणाला उत्तरपद पुढें असतांना दीर्घ होतो. उदा०– कारीषगन्धीपुत्रः. येथें ष्यङ् प्रत्ययाच्या ( ४।१।७८ ) यकाराला संप्रसारण ( ६।१।१३ ) झालें आहे.

## अङ्गस्य ॥ ६ । ४ । १ ॥

आ कुतोऽयमधिकारः । आ सप्तमाध्यायपरिसमाप्तेरङ्गाधिकारः ॥ यद्या सप्तमाध्यायपरिसमाप्तेरङ्गाधिकारो गुणो यङ्लुकोः [ ७. ४. ८२ ] इति यङ्लुग्ग्रहणं कर्तव्यम् । प्रागभ्यासविकारेभ्यः पुनरङ्गाधिकारे सति प्रत्ययलक्षणेन सिद्धम् । अस्तु तर्हि प्रागभ्यासविकारेभ्योऽङ्गाधिकारः ॥ यदि प्रागभ्यासविकारेभ्योऽङ्गाधिकारो वव्रश्च वकारस्य संप्रसारणं प्राप्नोति । आ सप्तमाध्यायपरिसमाप्तेः पुनरङ्गाधिकारे सत्युरदत्त्वस्य स्थानिवद्भावान्न संप्रसारणे संप्रसारणम् [ ६. १. ३७ ] इति प्रतिषेधः सिद्धो भवति । स चेदानीमपरिहारो

---

( सू १ ) 'अङ्गस्य' हा अधिकार कोठपर्यंत चालू राहतो ?

सातव्या अध्यायाच्या अखेरपर्यंत हा अङ्गाधिकार चालू राहतो.

जर सप्तमाध्याय संपेपर्यंत अङ्गाधिकार चालू असेल तर 'गुणो यङ्लुकोः' ( ७।४।८२ ) येथें लुक्–ग्रहणं[2] करावें लागणार आहे. परंतु जर 'अत्र लोपो०' ( ७।४।५८ ) इत्यादि अभ्यासविकारांच्या पूर्वींच हा 'अङ्गस्य' अधिकार संपत असेल तर प्रत्ययलक्षणानें निर्वाह होत असल्यामुळें लुक्–ग्रहण करावयास नको.

तर मग अभ्यासविकारांच्या सुरवातीपर्यंतच अङ्गाधिकार असो.

जर अभ्यासविकारांच्या सुरुवातीपर्यंतच अङ्गाधिकार असेल तर 'वव्रश्च' येथें वकाराला संप्रसारण प्राप्त होत आहे. आणि सातवा अध्याय संपेपर्यंत अङ्गाधिकार असेल तर 'उरत्' ( ७।४।६६ ) यानें केलेल्या अकार आदेशाला स्थानिवद्भाव झाल्यामुळें 'न संप्रसारणे०' ( ६।१।३७ ) यानें संप्रसारणाचा निषेध सिद्ध होत आहे. शिवाय, 'अमीमपत्' येथें सन्वद्भावानें अभ्यासलोप कां होत नाहीं

---

१. ( सू. १ ) हें अधिकारसूत्र आहे. सातवा अध्याय संपेपर्यंत प्रत्येक सूत्रामध्यें 'अङ्गस्य' या पदाचा संबंध होतो.

२. 'गुणो यङ्लुकोः' (७।४।८२) येथें लुक्-ग्रहण न केलें तर बोभवीति इत्यादि स्थलीं यङाचा लुक् ( २।४।७४ ) करून द्वित्व केलें असतां यङ् प्रत्यय पुढें नसल्यामुळें अभ्यासाला 'गुणो यङ्लुकोः' या सूत्रानें सांगितलेला गुण होणार नाहीं. कारण, हा गुण 'अङ्गस्य' या अधिकारांतील असल्यामुळें 'न लुमताऽङ्गस्य' ( १।१।६३ ) यानें प्रत्ययलक्षणाचा निषेध केला जात आहे. म्हणून गुण होण्याकरितां लुक्-ग्रहण करावयास पाहिजे.

३. व्रश्च् धातूहून लिट्, तिप्, णल् व द्वित्व करून व्रश्च्+व्रश्च्+अ अशी स्थिति असतां "लिट्यभ्यासस्यो०" ( ६।१।१७ ) यानें रेफाला संप्रसारणानें ऋकार आदेश केला असतां 'उरत्' (७।४।६६) यानें त्या ऋकाराला अत्त्व करावयाचें. नंतर हलादिशेष झाल्यानें वव्रश्च असें रूप साधतें. त्यानंतर 'न संप्रसारणे०' ( ६।१।३७ ) यानें निषेध झाल्यामुळें वकाराला संप्रसारण होत नाहीं. परंतु त्या निषेधाकरितां उरत् यानें झालेला अकार हा स्थानिवद्भावानें ( १।१।५७ ) संप्रसारण आहे असें समजलें पाहिजे. त्या स्थानिवद्भावाकरितां उरत् यानें झालेला अकार आदेश हा पराच्या निमित्तानें झाला आहे असें समजलें पाहिजे. तसें समजण्याकरितां 'उरत्' येथें 'अङ्गस्य' हा अधिकार येतो असें मानिलें पाहिजे. कारण, 'अङ्गस्य' हा अधिकार तेथें आला तरच अङ्ग संज्ञा ही प्रत्ययाच्या निमित्तानेंच ( १।४।१३ ) होत असल्यामुळें त्या अङ्गसंज्ञेच्या द्वारानें 'उरत्' याला परनिमित्त आहे असें म्हणतां येतें.

भवति यत्तदुक्तमङ्गान्यत्वाच्च सिद्धमिति ॥ अस्तु तर्ह्या सप्तमाध्यायपरिसमाप्तेरङ्गाधिकारः । ननु चोक्तं गुणो यङ्लुकोरिति यङ्लुग्ग्रहणं कर्तव्यमिति । क्रियते न्यास एव ॥

किं पुनरियं स्थानषष्ठी । अङ्गस्य स्थान इति । एवं भवितुमर्हति ।

**अङ्गस्येति स्थानषष्ठी चेत्पञ्चम्यन्तस्य चाधिकारः ॥ १ ॥**

अङ्गस्येति स्थानषष्ठी चेत्पञ्चम्यन्तस्य चाधिकारः कर्तव्यः । अङ्गादित्यपि वक्तव्यम् । अनुच्यमाने ह्यतो भिस ऐस्भवतीत्यत इति पञ्चम्यङ्गस्येति स्थानषष्ठी तत्राशक्यं विविभक्तित्वादत इति पञ्चम्याङ्गं विशेषयितुम् । तत्र को दोषः । अकारात्परस्य भिस्मात्रस्यैस्भावो भवतीतीहापि प्रसज्येत । ब्राह्मणभिस्सा ओदनभिस्सटेति ॥

**अवयवषष्ठ्यादीनां चाप्रसिद्धिः ॥२॥**

---

या शंकेचा परिहार ‘अङ्गान्यत्वात्’ असा जो सांगितला आहे तोही परिहार ‘अभ्यासविकारांच्या सुरुवातीपर्यंतच अङ्गाधिकार आहे’ या पक्षीं उपपन्न होत नाहीं.

असें आहे तर मग सातवा अध्याय संपेपर्यंत अङ्गाधिकार असो.

पण, ‘गुणो यङ्लुकोः’ येथें लुक्-ग्रहण करावयास पाहिजे असें म्हटले आहे ना ?

‘गुणो यङ्लुकोः’ या सूत्रामध्यें ‘लुक्’ असा शब्द आचार्यांनीं घातलाच आहे.

आतां अङ्गस्य ही ‘स्थाने’ अशा अर्थाची षष्ठी आहे काय ?

स्थानषष्ठी घेणें हें योग्यच आहे.

( वा. १ ) ‘अङ्गस्य’ ही स्थानषष्ठी असेल तर पञ्चम्यन्ताचा अधिकार केला पाहिजे. म्हणजे ‘अङ्गात्’ असेंही अधिकार--सूत्र केलें पाहिजे. जर ‘अङ्गात्’ असा पंचम्यन्त अधिकार केला नाहीं तर ‘अतो भिस ऐस्’ (७।१।९) येथें ‘अतः’ ही पञ्चमी व अङ्गस्य ही षष्ठी अशी दोघांची भिन्न भिन्न विभक्ति असल्यामुळें अतः हें अङ्गाचें विशेषण करणें शक्य नाहीं.

तसें झाल्यास काय दोष येत आहे ?

‘अतो भिस ऐस्’ (७।१।९) याचा अकाराहून पर अशा वाटेल त्या भिस् शब्दाला ऐस् आदेश होतो असा अर्थ होईल आणि ब्राह्मणभिस्सा ब्राह्मणभिस्सटा येथेंही भिस् याला ऐस् आदेश होऊं लागेल.

---

४. ‘मी’ या धातूहून णिच्, ‘मीनातिमिनोति०’ (६।१।५०) यानें आत्व, पुक् आगम (७।३।३६), लुङ्, तिप्, ‘इतश्च’ यानें लोप, च्लि, चङ्, अट् आगम, णिलोप, उपधाह्रस्व, द्वित्व, सन्वद्भावानें अभ्यासाला इत्व व त्याला दीर्घ हीं कार्यें केलीं असतां अमीमपत् असें रूप सिद्ध होतें. येथें सन्वद्भावानें (७।४।९३) अभ्यासाचा लोप (७।४।५८) कां होत नाहीं या शंकेचें उत्तर ‘अङ्गान्यत्वाद्वा सिद्धम्’ (७।४।९३ वा. ४) असें दिलें आहे. तें उत्तर सप्तमाध्याय सपेपर्यंत अङ्गाधिकार गृहीत धरला असतां सन्वद्भाव सांगणाऱ्या शास्त्रामध्यें अङ्गस्य याचा संबंध होतो तो मनांत घेऊन दिलें आहे. द्वित्वाच्या द्वारानें अभ्यास संज्ञेला कारणीभूत चङ् प्रत्यय आहे. त्या चङ् प्रत्ययामुळें अङ्ग संज्ञा झालेल्याला प्रत्यक्ष सन् प्रत्यय केला असतां जें कार्य होतें तें चङ् प्रत्यय केला असतां अभ्यासाला करावें. आतां अमीमपत् येथें चङ् प्रत्ययामुळें अङ्ग संज्ञा मी धातूला नाहीं; तर णिप्रत्ययान्त मी धातूला आहे. आणि प्रत्यक्ष सन् प्रत्यय केला असता णिप्रत्ययान्त मी धातूच्या अभ्यासाचा लोप कधींच होत नाहीं.

अवयवषष्ठ्यादयश्च न सिध्यन्ति । तत्र को दोषः । शास इदङ्हलोः [ ६. ४. ३४ ] इति शासेश्चान्त्यस्य स्यादुपधामात्रस्य च । ऊदुपधाया गोहः [ ६. ४. ८९ ] इति गोहेश्चान्त्यस्य स्यादुपधामात्रस्य च ॥

**सिद्धं तु परस्परं प्रत्यङ्गप्रत्ययसंज्ञाभावात् ॥ ३ ॥**

सिद्धमेतत् । कथम् । परस्परं प्रत्यङ्गप्रत्ययसंज्ञे भवतः । अङ्गसंज्ञां प्रति प्रत्ययसंज्ञा प्रत्ययसंज्ञां प्रत्यङ्गसंज्ञा ॥ किमतो यत्परस्परं प्रत्यङ्गप्रत्ययसंज्ञे भवतः ।

**संबन्धषष्ठीनिर्देशश्च ॥ ४ ॥**

संबन्धषष्ठीनिर्देशश्चायं कृतो भवति । अङ्गस्य यो भिस्शब्द इति । किं चाङ्गस्य भिस्शब्दः । निमित्तम् । यस्मिन्नङ्गमित्येतद्भवति । कस्मिंश्चैतद्भवति । प्रत्यये ॥ एवमप्यवयवषष्ठ्यादयो ऽविशेषिता भवन्ति । अवयवषष्ठ्यादयोऽपि संबन्ध एव ॥ एवमपि स्थानमविशेषितं भवति । स्थानमपि संबन्ध एव ॥ एवमपि न ज्ञायते क्व स्थान-

---

( वा. २ ) शिवाय, अङ्गस्य ही स्थानषष्ठी असल्यामुळे कोठेंही अवयवषष्ठी किंवा दुसरी कोणतीही षष्ठी घेतां येणार नाहीं.

तसें झाल्यास कोणता दोष येईल ?

'शास इदङ्०' ( ६।४।३४ ) यानें सांगितलेलें इत्त्व शास् धातूच्या अन्त्याला व वाटेल त्याच्या उपधेला होईल. तसेंच 'ऊदुपधाया गोहः' ( ६।४।८९ ) यानें सांगितलेला ऊकार आदेश 'गोह्' धातूच्या अन्त्याला आणि वाटेल त्याच्या उपधेला होईल[५].

( वा. ३ ) हें सिद्ध होत आहे.

तें कसें ?

प्रकृतीला अङ्गसंज्ञा होण्याला प्रत्ययाची जरूर आहे ( १।४।१३ ) आणि प्रत्यय होण्याला प्रकृतीची जरूर आहे. अशा रीतीनें अङ्गसंज्ञा व प्रत्ययसंज्ञा यांना परस्परांची अपेक्षा आहे.

अङ्गसंज्ञा व प्रत्ययसंज्ञा यांना परस्परांची अपेक्षा असली म्हणून काय फायदा होत आहे ?

( वा. ४ ) 'अङ्गस्य' हा संबन्धसामान्यार्थक षष्ठीचा निर्देश केला आहे असें गृहीत धरलें म्हणजे फायदा होतो. तो असा कीं– 'अतो भिस ऐस्' येथें अङ्गाचा संबंधी जो भिस् शब्द असा अर्थ होतो[६].

भिस् शब्द हा अङ्गाचा कोण होत आहे ?

निमित्त होत आहे. कारण, जो पुढें असतांना 'अङ्ग' संज्ञा होते तो अङ्गाचा निमित्तभूत असा म्हटला जातो.

कोण पुढें असतांना अङ्ग संज्ञा होते ?

प्रत्यय पुढें असतांना.

तरी पण अवयवाशीं संबंध दाखविणारी षष्ठी ज्या शब्दापुढें आहे त्याच्याकडे अङ्गस्य याचा संबंध होणार नाहीं.

अवयवाशीं असलेला संबंध हा सामान्य संबंधामध्यें अंतर्भूत आहेच.

तर मग स्थानषष्ठी असलेल्या शब्दाकडे अङ्गस्य याचा संबंध होणार नाहीं.

स्थानाशीं असलेला संबंधही सामान्य संबंधामध्यें अंतर्भूत आहेच.

---

५. अङ्गस्य ही स्थानषष्ठी ठरली असतां त्याच्याशीं जुळतात म्हणून शासः, गोहः इत्यादि षष्ठी ह्या स्थानषष्ठीच ठरतील. तेव्हां त्यांच्या अन्त्य अलाचे स्थानी व वाटेल त्या धातूच्या उपधेचे स्थानीं इत्त्व होतें, असा अर्थ होईल.

६. तेव्हां अङ्गाचा निमित्त असा जो भिस्, म्हणजे अर्थात् प्रत्यय जो भिस्, त्याला ऐस् आदेश होतो असा सूत्राचा अर्थ होतो म्हणून 'ब्राह्मणभिस्सा' येथें दोष येत नाहीं.

षष्ठी च विशेषणषष्ठीति । यत्र षष्ठ्यन्ययोगं नापेक्षते सा स्थानषष्ठी । यत्र ह्यन्ययोगमपेक्षते सा विशेषणषष्ठी ॥

कानि पुनरङ्गाधिकारस्य प्रयोजनानि ।

**अङ्गाधिकारस्य प्रयोजनं संप्रसारणदीर्घत्वे ॥ ५ ॥**

हल उत्तरस्य संप्रसारणस्य दीर्घो भवति । हूतः जीनः संवीतः शूनः । अङ्गस्येति किमर्थम् । निरुतम् दुरुतम् ॥

**नाम्सनोश्च ॥ ६ ॥**

नाम्सनोश्च दीर्घत्वे प्रयोजनम् । नामि दीर्घो भवति । अग्नीनाम् वायूनाम् । अङ्गस्येति किमर्थम् । क्रिमिणां पश्य । पामनां पश्य ॥ सनि दीर्घो भवति । चिचीषति तुष्टूषति । अङ्गस्येति किमर्थम् । दधि सनोति । मधु सनोति ॥

पण अशा रीतीनें 'अङ्गस्य' याचा दोन्ही ठिकाणीं निरनिराळ्या प्रकारानें संबंध करतां आला तर स्थानषष्ठी कोठें घ्यावयाची व अवयवषष्ठी कोठें घ्यावयाची हा विषयविभाग समजला जाणार नाहीं.

ज्या ठिकाणीं अन्वयाला योग्य अशा दुसऱ्या पदाच्या संनिधानामुळें षष्ठी ही त्याच्याशीं संबंध होण्याकरितां त्याची अपेक्षा करते तेथें त्याचेंच विशेषण होत असल्यामुळें ती विशेषणषष्ठी होते. आणि ज्या ठिकाणीं तसें संनिधान नसेल तेथें स्थानषष्ठी होते.

आतां या अङ्गाधिकाराचीं प्रयोजनें कोणतीं ?

(वा. ५) संप्रसारणाला होणाऱ्या दीर्घासंबंधानें अङ्गाधिकाराचा उपयोग येत आहे. उदाहरणार्थ– हल: (६।४।२) या सूत्रानें हलाहून पुढें असलेल्या संप्रसारणाला सांगितलेला दीर्घ हूतः, जीनः, संवीतः, शूनः इत्यादि ठिकाणीं होतो. आणि अङ्गाधिकार असल्यामुळें निरुतं व दुरुतं येथें होत नाहीं.

(वा. ६) नाम् किंवा सन् पुढें असतांना होणाऱ्या दीर्घासंबंधानें अङ्गाधिकाराचा उपयोग होत आहे. उदाहरणार्थ– "नामि" (६।४।३) यानें सांगितलेला दीर्घ अग्नीनाम् व इन्दूनाम् येथें होतो आणि अङ्गाधिकारामुळें क्रिमिणां पश्य व पामनां पश्य येथें होत नाहीं. तसेंच "अज्झनगमां सनि" (६।४।१६) यानें सांगितलेला दीर्घ चिचीषति व तुष्टूषति येथें होतो; आणि अङ्गाधिकारामुळें दधि सनोति व मधु सनोति येथें होत नाहीं.

---

७. "हलः" या सूत्रामध्यें अनुवृत्त असलेल्या अङ्गस्य या पदाची आवृत्ति करून एक पद हलाचें विशेषण व दुसरें संप्रसारणाचें विशेष्य करावयाचें. त्यामुळें 'अङ्गाचा अवयव जो हल् त्याहून पर जें संप्रसारण तदन्त अङ्गाला दीर्घ होतो' असा 'हलः' या सूत्राचा अर्थ होतो. त्यामुळें हूतः इत्यादि स्थलीं दीर्घ होतो आणि निरुतम् येथें होत नाहीं. कारण, तेथें रेफ हा हल् उपसर्गाचा अवयव आहे; अङ्गाचा अवयव नव्हे. हूतः इत्यादि उदाहरणांमध्यें ह्वेञ्, ज्या, व्येञ् आणि श्वि या धातूंहून क्त प्रत्यय (३।२।१०२), संप्रसारण (६।१।१५,१६), आणि दीर्घ (६।४।२) हीं कार्यें झालीं आहेत. जीनः व शूनः येथें क्त या प्रत्ययाच्या तकाराला नकार (८।२।४४,४५) झाला आहे.

८. क्रिमि व पामन् या शब्दांहून 'लोमादिपामादि०' (५।२।१००) यानें 'न' प्रत्यय व 'टाप्' प्रत्यय होऊन 'क्रिमिणा' आणि 'पामना' असे स्त्रीलिंगी शब्द होतात. त्यांचें हें द्वितीयेचें एकवचन आहे. येथें नाम् हा प्रत्यय नाही. 'अङ्गस्य' या अधिकारामुळें अङ्गसंज्ञेचे निमित्त असे नाम्, सन्, मिस् वगैरे प्रत्ययच घ्यावयाचे आहेत.

## लिङ्येत्वे ॥ ७ ॥

लिङ्येत्वे प्रयोजनम् । ग्लेयात् म्लेयात् । अङ्गस्येति किमर्थम् । निर्यायात् निर्वायात् ॥

## अतो भिस ऐस्त्वे ॥ ८ ॥

अतो भिस ऐस्त्वे प्रयोजनम् । वृक्षैः प्लक्षैः । अङ्गस्येति किमर्थम् । ब्राह्मणभिस्सा ओदनभिस्सटा ॥

## लुङादिष्वडाटौ ॥ ९ ॥

लुङादिष्वडाटौ प्रयोजनम् । अकार्षीत् ऐहिष्ट । अङ्गस्येति किमर्थम् । प्राकरोत् उपैहिष्ट ॥

## इयङुवङ्युष्मदस्मत्तातङामिनुडाने-मुकेह्रस्वयिदीर्घभितत्वानि ॥ १० ॥

इयङुवङौ प्रयोजनम् । श्रियौ श्रियः । भ्रुवौः भ्रुवः । अङ्गस्येति किमर्थम् । इय्यर्थम् उव्वर्थम् ॥ युष्मदस्मदोः प्रयोजनम् । साम आकम् [ ७. १. ३३ ] युष्माकम् अस्माकम् । अङ्गस्येति किमर्थम् । युष्मत्साम । अस्मत्साम ॥ तातङ् प्रयोजनम् । जीवताद्भवान् । अङ्गस्येति किमर्थम् । पच हि तावत्त्वम् । जल्प तु तावत्त्वम् ॥ आमि नुट् प्रयोजनम् । कुमारीणाम् किशोरीणाम् । अङ्गस्येति किम-

(वा. ७) लिङ् पुढे असतांना होणाऱ्या एत्वाविषयीं अङ्गाधिकाराचा उपयोग होत आहे. उदाहरणार्थ– "वान्यस्य०" (६।४।६८) यानें सांगितलेलें एत्व ग्लेयात् व म्लेयात् येथे होतें आणि अङ्गाधिकारामुळे निर्वायात् व निर्यायात् येथे होतें नाहीं.

(वा.८) अकाराहून पर अशा भिस् प्रत्ययाचे स्थानीं होणाऱ्या ऐस् आदेशाविषयीं अधिकाराचा उपयोग होत आहे. उदाहरणार्थ– "अतो भिस ऐस्" (७।१।९) यानें सांगितलेला ऐस् आदेश वृक्षैः व प्लक्षैः येथें होतो. आणि अङ्गाधिकारामुळें ब्राह्मणभिस्सा व ब्राह्मणभिस्सटा येथें होत नाहीं.

(वा ९) लुङ् लङ् आणि लृङ् पुढें असतांना सांगितलेले अट् व आट् हे आगम अङ्गालाच होण्याबद्दल या अधिकाराचा उपयोग होत आहे. उदाहरणार्थ– अकार्षीत् व ऐहिष्ट. जर अङ्गाधिकार नसेल तर प्राकरोत् व उपैहिष्ट येथें उपसर्गांच्या मागें अट् व आट् होऊं लागतील.

(वा. १०) इयङ् व उवङ् हे आदेश अङ्गाधिकाराचें प्रयोजन होत. उदाहरणार्थ– श्रियौ, श्रियः, भ्रुवौः, भ्रुवः. येथें अङ्गाधिकारामुळें अजादि प्रत्यय पुढें असताना इयङ् व उवङ् होतात. जर अङ्गाधिकार नसेल तर इय्यर्थम् व उव्वर्थम् येथें अजादि प्रत्यय पुढें नसतांनाही ते होऊं लागतील. युष्मद् व अस्मद् या शब्दाचे आदेश हे या अधिकाराचें प्रयोजन होत आहे. उदाहरणार्थ– "साम आकम्" (७।१।३३) यानें सांगितलेला आकम् हा आदेश युष्माकम् व अस्माकम् येथें प्रत्ययालाच होतो. जर अङ्गाधिकार नसेल तर युष्मत्साम व अस्मत्साम येथेंही तो होऊं लागेल. "तुह्योस्तातङा०" (७।१।३५) यानें सांगितलेला तातङ् आदेश हाही या अधिकाराचें प्रयोजन होय. उदाहरणार्थ– जीवतु, जीवतात्. अङ्गाधिकार नसेल तर पच हि त्वम्, पच तु त्वम् येथे अङ्गनिमित्त नसलेल्या तु व हि या शब्दांनाही तातङ् आदेश होऊं लागेल. आम् प्रत्ययाला सांगितलेला नुडागम (७।१।५४) अङ्गाधिकाराचें प्रयोजन होतो. उदाहरणार्थ– किशोरीणाम् व कुमारीणाम्. अङ्गाधिकार नसेल तर 'कुमारी आम् इत्याह' येथेही अङ्गनिमित्त नसलेल्या आम्

---

९. निर्यायात् व निर्वायात् येथें रेफ हा उपसर्गाचा अवयव आहे म्हणून रेफ आणि यकार यांचा संयोग हा अङ्गापैकीं नसल्यामुळें एत्व होत नाहीं.

र्थम् । कुमारी आमित्याह । किशोरी आमित्याह ॥ आने मुक् [ ७. २. ८२ ] प्रयोजनम् । पचमानः यजमानः । अङ्गस्येति किमर्थम् । प्राणः ॥ के ह्रस्वः प्रयोजनम् । किशोरिका कुमारिका । अङ्गस्येति किमर्थम् । कुमारीं कायति कुमारीकः ॥ यि दीर्घः प्रयोजनम् । चीयते स्तूयते । अङ्गस्येति किमर्थम् । दधियानम् मधुयानम् ॥ भि तत्वं प्रयोजनम् । अद्भिः अद्भ्यः । अङ्गस्येति किमर्थम् । अब्भारः अब्भक्षः ॥

नैतानि सन्ति प्रयोजनानि । कथम् ।

**अर्थवद्ग्रहणप्रत्ययग्रहणाभ्यां सिद्धम् ॥ ११ ॥**

अर्थवद्ग्रहणप्रत्ययग्रहणाभ्यामेवैतानि सिद्धानि । क्वचिदर्थवद्ग्रहणे नानर्थकस्येत्येवं भविष्यति क्वचित्प्रत्ययाप्रत्यययोर्ग्रहणे प्रत्ययस्यैव ग्रहणं भवतीति ॥ अथवा प्रत्यय इति प्रकृत्याङ्गकार्यमध्येष्ये । यदि प्रत्यय इति प्रकृत्याङ्गकार्यमधीषे प्राकरोत् उपैहिष्ट उपसर्गात्पूर्वमडाटौ प्राप्नुतः । सिद्धं तु प्रत्ययग्रहणे यस्मात्स तदादितदन्तविज्ञानात् । सिद्धमेतत् । कथम् । प्रत्ययग्रहणे यस्मात्स

---

शब्दाला नुडागम होऊं लागेल. "आने मुक्" (७।२।८२) यानें सांगितलेला मुक् आगम अङ्गाधिकाराचें प्रयोजन आहे. उदाहरणार्थ– पचमानः यजमानः. जर अङ्गाधिकार नसेल तर प्राणः येथेंही अङ्गनिमित्त नसलेला आन शब्द पुढें असतांना मुक् होऊं लागेल. "केऽणः" (७।४।१३) यानें सांगितलेला ऱ्हस्व हा अङ्गाधिकाराचें प्रयोजन आहे. उदाहरणार्थ– किशोरिका व कुमारिका. येथे "केऽणः" यानें ऱ्हस्व होतो. जर अङ्गाधिकार नसेल तर कुमारीं कायतीति कुमारीकः येथें अङ्गसंज्ञा निमित्त नसलेला 'क' शब्द पुढे असतानाही ऱ्हस्व होऊं लागेल. "अकृत्सार्वधातुकयोर्दीर्घः" (७।४।२५) यानें यकारादि प्रत्यय पुढें असतांना सांगितलेला दीर्घ अङ्गाधिकाराचें प्रयोजन आहे. उदाहरणार्थ– चीयते, स्तूयते. अङ्गाधिकार नसेल तर दधियानम् येथेंही अङ्गसंज्ञा निमित्त नसलेला यकारादि शब्द पुढें असतांना दीर्घ होऊं लागेल. "अपो भि" (७।४।४८) यानें भकारादि प्रत्यय पुढें असतांना सांगितलेला तकार आदेश अङ्गाधिकाराचें प्रयोजन आहे. उदाहरणार्थ– अद्भिः, अद्भ्यः. येथे तकार आदेश होतो. जर अङ्गाधिकार नसेल तर अब्भक्षः व अब्भारः येथेंही अङ्गसंज्ञा निमित्त नसलला भकारादि शब्द पुढें असतांना तकार आदेश होऊं लागेल.

हीं अङ्गाधिकाराचीं प्रयोजनें होऊं शकत नाहींत.

ती कशीं ?

(वा. ११) अर्थवद्ग्रहणे० व प्रत्ययाप्रत्यययोः० ह्या परिभाषानींच अङ्गाधिकाराचीं प्रयोजनें साधत आहेत. म्हणजे या प्रयोजनांपैकीं काहीं ठिकाणीं 'अर्थवानाचें ग्रहण संभवत असतांना अनर्थकाचें ग्रहण करूं नये' या परिभाषेनें इष्ट नसलेलें कार्य होणार नाहीं; आणि काहीं ठिकाणीं 'प्रत्यय आणि अप्रत्यय यापैकीं प्रत्ययाचेंच ग्रहण करावें, अप्रत्ययाचें ग्रहण करूं नये' या परिभाषेनें इष्ट नसलेलें कार्य होणार नाहीं.

किंवा 'अङ्गस्य' याचे ऐवजीं 'प्रत्यय' असा अधिकार केला म्हणजे काम भागेल.

पण जर प्रत्यय निमित्त धरून अङ्गकार्यें पठन केलीं तर प्राकरोत् व उपैहिष्ट येथें उपसर्गाच्या मागे अट् व आट् हे आगम प्राप्त होत आहेत.

धातूच्याच मागे अट् व आट् आगम होणें हें साधत आहे.

तें कसें ?

प्रत्ययाचें ग्रहण केलें असतांना तेथें 'तो

विहितस्तदादेस्तदन्तस्य च ग्रहणं भवतीत्येवमुपसर्गात्पूर्वमडाटौ न भविष्यतः ॥

## ह्लः ॥ ६ । ४ । २ ॥

इह कस्मान्न भवति । तृतीयः ।

### अण्प्रकरणादृकारस्याप्राप्तिः ।

अण्प्रकरणादृकारस्य दीर्घत्वं न भविष्यति । अण इति वर्तते । क्व प्रकृतम् । ढ्रलोपे पूर्वस्य दीर्घोऽणः [ ६. ३. १११ ] इति ॥ तद्वा इकः काशे [ १२३ ] इत्यनेनेग्ग्रहणेन व्यवच्छिन्नं न शक्यमनुवर्तयितुम् ।

### इग्ग्रहणस्य चाण्विशेषणत्वात् ।

अण्विशेषणमिग्ग्रहणम् । अण इक इति ॥ यदि तर्ह्यण्विशेषणमिग्ग्रहणं चौ दीर्घो भवतीतीह न प्राप्नोति । अवाचा अवाचे । नैष दोषः । अण्ग्रहणमनुवर्तत इग्ग्रहणं निवृत्तम् ॥ एवमपि कर्तृचा कर्तृचे अत्र न प्राप्नोति । यथालक्षणमप्रयुक्ते ॥ अथवोभयं निवृत्तम् । कस्मान्न भवति तृतीय इति । निपातनात् । किं निपातनम् । द्विती-

---

प्रत्यय ज्याहून केला जातो त्या प्रकृतीला आरंभ करून तो प्रत्यय शेवटीं असलेल्या अशा समुदायाचें ग्रहण करावें ' या परिभाषेनें उपसर्गाचे मागें अट् व आट् होणार नाहींत.

( सू. २ ) तृतीयः येथें प्रकृत सूत्रानें दीर्घ का बरें होत नाहीं ?

अण्प्रकरणादृकारस्याप्राप्तिः म्हणजे अण्–प्रकरण चालू असल्यामुळे ऋकाराला दीर्घ होणार नाहीं. अण्ग्रहण येथें अनुवृत्त आहे.

तें अण्–ग्रहण कोठे केलें आहे ?

' ढ्रलोपे पूर्वस्य० ' ( ६।३।१११ ) येथें.

पण तें अण्–ग्रहण ' इकः काशे ' ( ६।३।१२३ ) येथील इक्–ग्रहणानें विच्छिन्न झाल्यामुळें अनुवृत्त करणें शक्य नाहीं.

इग्ग्रहणस्य चाण्विशेषणत्वात् म्हणजे इक् ग्रहण अणाचें विशेषण आहे. इक्रूप जो अण् त्याला दीर्घ होतो असा अर्थ आहे.

जर इक्ग्रहण अणाचें विशेषण आहे तर 'चौ' ( ६।३।१३८ ) यानें अणाला सांगितलेला दीर्घ 'अवाचा' व ' अवाचे ' येथें प्राप्त होतें नाहीं.

हा दोष येत नाहीं. कारण ' चौ ' या सूत्रामध्यें अण्ग्रहण अनुवृत्त आहे आणि इक् ग्रहण निवृत्त आहे.

तरी देखील कर्तृचा व कर्तृचे येथें दीर्घ प्राप्त होणार नाहीं.

अप्रयुक्ताविषयीं लक्षणप्रवृत्ति न होणेंच योग्य आहे.

अथवा कर्तृचाः वगैरे स्थलीं दीर्घ होतोच असा आग्रह असेल तर 'चौ' येथें 'अणः' आणि 'इकः' या दोन्ही पदांची अनुवृत्ति करूं नये.

पण मग तृतीयः येथें दीर्घ कां होत नाहीं ही शंका कायम राहते.

---

१०. ' लुङ्लङ्लृङ्क्ष्वडुदात्तः ' येथे ' प्रत्यये ' हा अधिकार येतो; त्यामुळें ही परिभाषा उपस्थित होते. म्हणून धातूच्या मागेंच अट् व आट् आगम होतात. उपसर्गाच्या मागें होत नाहींत. तेव्हां प्राकरोत् वगैरे ठिकाणीं दोष येत नाहीं.

१. ( सू. २ ) अङ्गाचा अवयव अशा हलापुढील जें संप्रसारण तदन्त अङ्गाला दीर्घ होतो.

२. त्रि शब्दाहून तीय प्रत्यय आणि त्रि शब्दांतील रेफाला संप्रसारणानें ( ५।२।५५ ) ऋकार झाला आहे.

३. कारण, अव यांतील अकार हा अण् आहे, पण इक् नव्हे.

४. ज्या ठिकाणीं प्रामाणिक प्रयोग नाहीं त्या ठिकाणीं ' अमुक कार्य होणार नाहीं ' असा दोष देणें बरोबर नाहीं. कारण, तें कार्य तेथें होतच नसतें असें म्हणतां येतें.

यतृतीयचतुर्थतुर्याण्यन्यतरस्याम् [ २. २. ३ ] इति ॥

**नामि ॥ ६ । ४ । ३ ॥**

किमर्थमामः सनकारस्य ग्रहणं क्रियते न आमि दीर्घ इत्येवोच्येत । केनेदानीं सनकारके भविष्यति । नुडयमाम्भक्त आम्ग्रहणेन ग्राहिष्यते ॥ अत उत्तरं पठति।

**नामि दीर्घ आमि चेत्स्यात्**
**कृते दीर्घे न नुड्भवेत् ।**

नामि दीर्घ आमि चेत्स्यात्कृते दीर्घत्वे न नुट् स्यात् । अग्नीनाम् इन्दूनाम् ॥ इदमिह संप्रधार्यम् । दीर्घत्वं क्रियतां नुडिति किमत्र कर्तव्यम् । परत्वान्नुट् । नित्यं दीर्घत्वम् । कृतेऽपि नुटि प्राप्नोत्यकृतेऽपि । नित्यत्वाद्दीर्घत्वे कृते ह्रस्वाश्रयो नुड्न प्राप्नोति ॥ एवं तर्ह्याहायं ह्रस्वान्तान्नुडिति न च ह्रस्वान्तोऽस्ति तत्र वचनाद्भविष्यति ॥

**वचनाद्यत्र तन्नास्ति**

नेदं वचनाल्लभ्यम् । अस्ति ह्यन्यदेतस्य वचने प्रयोजनम् । किम् । यत्र दीर्घत्वं प्रति-

---

निपातनामुळें येथें दीर्घ होत नाहीं.

तें निपातन कोणतें ?

द्वितीयतृतीयचतुर्थतुर्याण्यन्यतरस्याम् ( २।२।३ ) हें तें निपातन होय.

( सू. ३ ) येथें नकारसहित असें आम् प्रत्ययाचें ग्रहण केले आहे तें कशाकरितां ? तें तसे करूं नये; तर आम् पुढें असतांना दीर्घ होतो अशा अर्थाचें 'आमि' असेंच सूत्र करावें.

आमि असें म्हटलें तर नुट् झाल्यानंतर त्या नाम् याचे आम् या पदानें ग्रहण कसें बरें होईल?

नुडागम हा आमाचा अवयव आहे म्हणून आम्-ग्रहणानें नाम् याचें ग्रहण केलें जाईल.

यानंतर वार्तिककार म्हणतात-

( श्लो. वा. १ ) नाम् पुढें असतांना सांगितलेला जो दीर्घ तो आम् पुढें असतांना सांगितला तर अग्नीनाम् व इन्दूनाम् येथें अग्नि+आम् अशा स्थितीमध्यें पूर्वी दीर्घ केला असता मागून ऱ्हस्वान्त नसल्यामुळें नुट् होणार नाहीं.

पण येथें अगोदर असा विचार करावा कीं- अग्नि+आम् या स्थितींत प्रथमतः दीर्घ करावा किंवा नुट् करावा ?

यांपैकीं काय बरे प्रथम करावें ?

पर असल्यामुळें प्रथमतः नुट् करावा.

पण आमि यानें सांगितलेला दीर्घ नित्य आहे. कारण नुडागम केला अथवा न केला तरी त्याची प्राप्ति आहे. तेव्हां नित्य असल्यामुळें प्रथमतः दीर्घ केला असतां ऱ्हस्वान्ताहून सांगितलेला नुट् होणार नाहीं.

असें आहे तर ऱ्हस्वान्ताहून आमाला नुट् होतो असें आचार्य विधान करीत आहेत आणि नित्यत्वास्तव प्रथम दीर्घ झाल्यामुळें आम् पुढें असतांना मागें ऱ्हस्वान्त कोठेंही असूं शकत नाहीं. तेव्हां 'ऱ्हस्वान्तान्नुट्' हें विधान व्यर्थ होत असल्यामुळें त्या जोरावर पूर्वी ऱ्हस्व होतो या समजुतीनें दीर्घोत्तर नुट् होईल.

ऱ्हस्वान्ताहून नुट् होतो या वचनावरून नुडागमाचा लाभ होणें शक्य नाहीं. कारण त्या विधानाला अवकाश मिळत आहे.

तो कोठें ?

ज्या ठिकाणीं दीर्घाचा निषेध केला जातो तेथें. उदाहरणार्थ- तिसृणाम्, चतसृणाम्.

ऱ्हस्वान्ताहून आमाला नुट् सांगण्याचें हें

---

१. ( सू. २ ) नाम् पुढें असतांना अजन्त अंगाला दीर्घ होतो. उदा०- रामाणाम्.

२. स्त्रीलिंगी चतुर् या शब्दाहून षष्ठी बहुवचन आम् प्रत्यय व चतसृ आदेश ( ७।२।९९ ) हीं कार्यें केलीं असतां चतसृ+आम् या अवस्थेत 'आमि' यानें दीर्घ प्राप्त होतो. परंतु 'न तिसृचतसृ' ( ६।४।४ )

षिध्यते । तिसृणाम् चतसृणामिति ॥ नैतदस्ति प्रयोजनम् । इह तावच्चतसृणामिति षट्चतुर्भ्यश्च [ ७. १. ५५ ] इत्येवं भविष्यति । तिसृणामिति त्रिग्रहणमपि तत्र प्रकृतमनुवर्तते । क्व प्रकृतम् । त्रेस्त्रयः [ ५३ ] इति ॥ इदं तर्हि । त्वं नृणां नृपते जायसे शुचिः ॥ नैकमुदाहरणं ह्रस्वग्रहणं प्रयोजयति । तत्र वचनाद् भूतपूर्वगतिर्विज्ञास्यते । ह्रस्वान्तं यद् भूतपूर्वमिति ॥ उत्तरार्थं तर्हि सनकारग्रहणं कर्तव्यम् ।

**नोपधायाश्च चर्मणाम् ॥**

नोपधाया नामि यथा स्यात् । इह मा भूत् । चर्मणाम वर्मणामिति ॥

**नामि दीर्घ आमि चेत्स्यात्**
**कृते दीर्घे न नुड् भवेत् ।**
**वचनाद्यत्र तन्नास्ति**
**नोपधायाश्च चर्मणाम् ॥**

**[ न तिसृचतसृ ॥ ६ । ४ । ४ ॥**
**छन्दस्युभयथा ॥ ६ । ४ । ५ ॥**
**नृ च ॥ ६ । ४ । ६ ॥**
**नोपधायाः ॥ ६ । ४ । ७ ॥**
**सर्वनामस्थाने चासंबुद्धौ ॥ ६ । ४ । ८ ॥**
**वा षपूर्वस्य निगमे ॥ ६।४।९ ॥**

---

प्रयोजन होऊं शकत नाहीं. कारण येथें ' षट्चतुर्भ्यश्च ' ( ७।१।५५ ) यानें नुट् होईल. बरें, तिसृणाम् हें त्याच प्रयोजन आहे असें म्हणशील तर तेंहीं नाहीं. कारण; त्याच सूत्रामध्यें मागून त्रिग्रहणाचीही अनुवृत्ति येत आहे.

तें त्रिग्रहण कोठें प्रकृत आहे ?

त्रेस्त्रयः ( ७।१।५३ ) येथें.

तर मग ' त्वं नॄणां नृपते जायसे शुचिः ' हें ऱ्हस्वान्ताहून नुट् सांगण्याचें प्रयोजन होय.

पण एकट्या नृ शब्दासाठीं ऱ्हस्व शब्द घालणें बरोबर नाहीं. तेव्हां त्या ऱ्हस्व शब्दाच्या जोरावर भूतपूर्व गति समजली जाईल. अर्थात् भूतपूर्व म्हणजे जो पूर्वी ऱ्हस्वान्त होता त्याहून नुट् होतो असा अर्थ होईल.

तर मग पुढें अनुवृत्ती होण्याकरितां नामि असें म्हटलें पाहिजे; व त्यामुळेंच ' नोपधायाः ' यानें सांगितलेला दीर्घ नाम् पुढें असतांनाच होतो. आणि चर्मणाम् व वर्मणाम् येथें होत नाहीं.

---

याने त्याचा निषेध होतो. ह्रस्वान्ताहून आमाला नुट् सांगणाऱ्या वचनाला चारितार्थ्य असल्यामुळें भूतपूर्वगतीनें नुडागमाची कल्पना करतां येणें शक्य नाहीं.

३. नृणाम् येथें नृ शब्दाहून आम् प्रत्यय केला असतां ' नृ+आम् या स्थितीत प्राप्त झालेल्या दीर्घाचा 'नृ च' ( ६।४।६ ) यानें विकल्प केल्यामुळें दीर्घाच्या अभावपक्षीं ह्रस्वान्ताहून नुट् आगम सांगणाऱ्या वचनाला चारितार्थ्य मिळतें.

४. तेवढेंच उदाहरण असेल तर आचार्यांनीं ह्रस्वशब्दाच्या ऐवजीं नृ शब्दच घातला असता.

१. ( सू. ४ ) तिसृ व चतसृ या शब्दांना ' नाम् ' प्रत्यय पुढें असतांना दीर्घ होत नाहीं.

१. ( सू. ५ ) वेदामध्यें नाम् पुढें असतांना अजन्त अङ्गाला विकल्पानें दीर्घ होतो.

१. ( सू. ६ ) नृ शब्दाला नाम् पुढें असतांना दीर्घ विकल्पानें होतो.

१. ( सू. ७ ) नकारान्त शब्दाच्या उपधेला नाम् पुढें असतांना दीर्घ होतो.

१. ( सू. ८ ) नकारान्त शब्दाच्या उपधेला संबुद्धिभिन्न सर्वनामस्थान प्रत्यय पुढें असतांना दीर्घ होतो.

१ ( सू. ९ ) वेदामध्यें षकाराच्या पुढील उपधेला संबुद्धिभिन्न सर्वनामस्थान प्रत्यय पुढें असतांना विकल्पानें दीर्घ होतो.

**सान्तमहतः संयोगस्य ॥ ६ । ४ । १० ॥**

**अप्तृन्तृच्स्वसृनप्तृनेष्टृत्वष्टृक्षत्तृहोतृपोतृप्रशास्तॄणाम् ॥ ६ । ४ । ११ ]**

**इन्हन्पूषार्यम्णां शौ ॥ ६ । ४ । १२ ॥**

**सौ च ॥ ६ । ४ । १३ ॥**

**हनः क्वावुपधादीर्घत्वप्रसङ्गः ॥ १ ॥**

हनः क्वावुपधालक्षणं दीर्घत्वं प्राप्नोति । अनुनासिकस्य क्विझलोः क्ङिति [ १५ ] इति । तस्य प्रतिषेधो वक्तव्यः । वृत्रहणौ वृत्रहण इति ॥ नियमवचनात्सिद्धम् । इन्हन्पूषार्यम्णां शौ सौ चेत्येतस्मान्नियमवचनाद्दीर्घत्वं न भविष्यति ।

**नियमवचनात्सिद्धमिति चेत्सर्वनामस्थानप्रकरणे नियमवचनादन्यत्रानियमः ॥ २ ॥**

नियमवचनात्सिद्धमिति चेत्सर्वनामस्थानप्रकरणे नियमवचनादन्यत्र नियमो न प्राप्नोति । क्वान्यत्र । वृत्रहणि भ्रूणहनि ॥ एवं तर्हि

**दीर्घविधिर्य इहेन्प्रभृतीनां**
**तं विनियम्य सुटीति सुविद्वान् ।**

दीर्घविधिर्य इहेन्प्रभृतीनां तं सर्वनामस्थाने विनियम्य । इन्हन्पूषार्यम्णां सर्वनामस्थाने दीर्घो भवति । किमर्थमिदम् । नियमार्थम् । इन्हन्पूषार्यम्णां सर्वनामस्थान

---

( सू. १२,१३ वा. १ ) वृत्रं हतवान् वृत्रहा येथे वृत्र शब्द उपपद असतांना 'ब्रह्मभ्रूण०' यानें हन् धातूहून क्विप् प्रत्यय केला असतांना 'अनुनासिकस्य क्वि०' ( ६।४।१५ ) यानें उपधेला दीर्घ प्राप्त होतो त्याचा प्रतिषेध करावा. उदाहरणार्थ–वृत्रहणौ, वृत्रहणः.

'इन्हन्पूषार्यम्णां शौ' तसेंच 'सौ च' या नियमवचनांमुळें दीर्घ होणार नाहीं.

( वा. २ ) नियमवचनानें सिद्ध होतें असें म्हटलें तर सर्वनामस्थानप्रकरण चालू असल्यामुळें सर्वनामस्थानाहून अन्य ठिकाणीं नियम प्राप्त होत नाहीं.

अन्य ठिकाणीं म्हणजे कोठें ?

वृत्रहणि भ्रूणहनि इत्यादि ठिकाणीं. तर मग ( श्लो. वा. १ ) या शास्त्रामध्यें इन् हन् वगैरेंना जो दीर्घ होतो तो सर्वनामस्थान पुढें असतांनाच होतो असा त्याचा नियम करून म्हणजे योगविभाग करून 'इन्हन्पूषार्यम्णाम्' या पहिल्या सूत्रांत 'सर्वनामस्थानें' याची अनुवृत्ति केली असतां 'इन् हन् वगैरेंच्या उपधेला दीर्घ होतो सर्वनामस्थान पुढें असतांना' असा अर्थ होतो.

कशाकरितां हें सूत्र आहे ?

नियमार्थ आहे. तो नियम असा कीं–इन् हन् पूषन् व अर्यमन् यांना सर्वनामस्थान प्रत्यय पुढें असतानाच दीर्घ होतो, तद्व्यतिरिक्त प्रयत्य पुढें

---

१ ( सू. १० ) सकारान्त संयोग व महत् शब्द यांचा जो नकार त्याच्या उपधेला संबुद्धिभिन्न सर्वनामस्थान प्रत्यय पुढें असतांना दीर्घ होतो.

१ ( सू. ११ ) अप् शब्द, तृन्–प्रत्ययान्त, तृच्–प्रत्ययान्त, स्वसृ, नप्तृ, नेष्टृ, त्वष्टृ, क्षत्तृ, होतृ, पोतृ, आणि प्रशास्तृ या शब्दांच्या उपधेला संबुद्धिभिन्न सर्वनामस्थान प्रत्यय पुढें असतांना दीर्घ होतो.

१ ( सू. १२–१३ ) इन्, हन्, पूषन्, आणि अर्यमन् या शब्दांच्या उपधेला कोणत्याही सूत्रानें दीर्घ कर्तव्य झाला तरी तो फक्त नपुंसक लिंगांतील प्रथमा आणि द्वितीया यांचें बहुवचन 'शि' प्रत्यय पुढें असतांनाच करावा. तसाच प्रथमा एकवचन 'सु' प्रत्यय पुढें असतांनाही करावा.

एव नान्यत्र ।

**शौ नियम पुनरेव विदध्यात्**

ततः शौ । शावेव सर्वनामस्थाने नान्यत्र । ततः सौ । सावेव सर्वनामस्थाने नान्यत्र ॥

**भ्रूणहनीति तथास्य न दुष्येत् ॥१॥**

तथास्य भ्रूणहनीति न दोषो भवति ॥

**शास्मि निवर्त्य सुटीत्यविशेषे**
**शौ नियमं कुरु वाप्यसमीक्ष्य ।**

अथवा निवृत्ते सर्वनामस्थानप्रकरणेऽविशेषेण शौ नियमं वक्ष्यामि । इन्हन्पूषार्यम्णां शावेव । ततः सौ । सावेव ॥ इहापि तर्हि नियमान्न प्राप्नोति । इन्द्रो वृत्रहायते ।

**दीर्घविधेरुपधानियमान्मे**
**हन्त यि दीर्घविधौ च न दोषः ॥ २ ॥**

उपधालक्षणदीर्घत्वस्य नियमो न चैतदुपधालक्षणं दीर्घत्वम् ॥

**सुट्यपि वा प्रकृतेऽनवकाशः**
**शौ नियमोऽप्रकृतप्रतिषेधे ।**

अथवानुवर्तमाने सर्वनामस्थानग्रहणेऽनवकाशः शौ नियमोऽप्रकृतस्यापि दीर्घत्वस्य नियामको भविष्यति । कथम् ।

**यस्य हि शौ नियमः सुटि नैतत्**
**तेन न तत्र भवेद्विनियम्यम् ॥ ३ ॥**

---

असताना होत नाहीं.

असा नियम करून त्यानंतर 'शौ' या दुसऱ्या सूत्रानें नियम करावयाचा तो असा—शि हें सर्वनामस्थान पुढें असताना जो इन् हन् वगैरेंना दीर्घ होतो तो फक्त 'शि' पुढें असतांनाच होतो, इतर पुढें असतांना होत नाहीं. त्यानंतर पुढें 'सौ च' यानेंही सु हें सर्वनामस्थान पुढें असतानाच दीर्घ होतो, अन्यत्र होत नाहीं असा नियम करावयाचा.

याप्रमाणें योगविभाग करून दोन नियम केले असतां भ्रूणहनि हा दोष उरत नाहीं.

( श्लो. वा. २ ) अथवा एकच सूत्र असूं दे; व त्यामध्यें सर्वनामस्थानग्रहणाची अनुवृत्ति करूं नये आणि सर्वनामस्थानाचें हें प्रकरण चालूं आहे हेंही मनात आणू नये; आणि मोघम नियम करावा. तो असा कीं—कोणताही प्रत्यय पुढें असतांना इन् हन् वगैरेंना जर दीर्घ होत असेल तर तो 'शि' प्रत्यय पुढें असतांनाच होतो तसाच 'सु' प्रत्यय पुढें असतांनाच होतो.

पण असा नियम केला तर वृत्रहायते[2] येथेंही दीर्घ होणार नाहीं.

उपधादीर्घाचाच हा नियम केला आहे[3]. तेव्हां हन् धातूहून यकारादि प्रत्यय पुढें असतांना प्राप्त झालेला जो दीर्घ तो उपधेच्या निमित्तानें होणारा नसल्यामुळें त्या दीर्घाचा हा नियम होत नाहीं, म्हणून दोष नाहीं.

( श्लो. वा. ३ ) अथवा सर्वनामस्थान प्रकरण चालू असल्यामुळें आणि शि प्रत्यय हा नपुंसकलिंगामध्येंच होत असल्यामुळें 'नपुंसकलिंगामध्यें फक्त शि हें सर्वनामस्थान पुढें असतांनाच इन् हन् वगैरेंना दीर्घ होतो' असा नियम होईल. परंतु, नपुंसकलिंगामध्यें शि प्रत्ययाशिवाय दुसरा सर्वनामस्थान प्रत्यय नसल्यामुळें नियम अनवकाश होईल आणि म्हणूनच तो त्या जोरावर अप्रकृत दीर्घाचाही बाध करील.

तें कसें ?

---

२. वृत्रहन् शब्दाहून क्यङ् प्रत्यय ( ३।१।११ ), पद संज्ञा ( १।४।१५ ), न-लोप ( ८।२।७ ) आणि दीर्घ ( ७।४।२५ ), ही कार्यें झालीं आहेत.

३. "नोपधायाः" येथून उपधा पदाची अनुवृत्ति करून उपधेला सांगितलेला जो दीर्घ तो कोणताही प्रत्यय पुढें असतांना इन् हन् वगैरेंना करणें झाल्यास शि किंवा सु हे प्रत्यय पुढें असतांनाच करावा.

यस्य हि शिः सर्वनामस्थानं न तस्य सुट्। यस्य सुट्सर्वनामस्थानं न तस्य शिः। तत्र सर्वनामस्थानप्रकरणे नियम्यं नास्तीति कृत्वाविशेषेण शौ नियमो विज्ञास्यते॥

दीर्घविधिर्य इहेन्प्रभृतीनां
तं विनियम्य सुटीति सुविद्वान्।
शौ नियमं पुनरेव विदध्याद्
भ्रूणहनीति तथास्य न दुष्येत्॥ १॥
शास्मि निवर्त्य सुटीत्यविशेषे
शौ नियमं कुरु वाप्यसमीक्ष्य।
दीर्घविधेरुपधानियमान्मे
हन्त यि दीर्घविधौ च न दोषः॥ २॥
सुट्यपि वा प्रकृतेऽनवकाशः
शौ नियमोऽप्रकृतप्रतिषेधे।
यस्य हि शौ नियमः सुटि नैतत्
तेन न तत्र भवेद्विनियम्यम्॥ ३॥

## अत्वसन्तस्य चाधातोः॥ ६। ४। १४॥

अत्वसन्तस्य दीर्घत्वे पित उपसंख्यानम्॥ १॥

अत्वसन्तस्य दीघत्वे पित उपसंख्यानं कर्तव्यम्। गोमान् यवमान्। किं पुनः कारणं न सिध्यति। अननुबन्धकग्रहणे हि सानुबन्धकस्य ग्रहणं नेत्येवं पितो न प्राप्नोति॥ अननुबन्धकग्रहण इत्युच्यते सानुबन्धकस्येदं ग्रहणम्। एवं तर्हि तदनुबन्धकग्रहणेऽतदनुबन्धकस्य ग्रहणं नेत्येवं पितो न प्राप्नोति॥

---

ज्या नपुंसकलिंगामध्यें शि या प्रत्ययाला सर्वनामस्थान संज्ञा आहे त्यामध्यें सुटाला सर्वनामस्थान संज्ञा (१।१।४३) नाहीं आणि ज्या स्त्रीलिंग आणि पुंलिंग यांमध्यें सुट् प्रत्ययांना सर्वनामस्थान संज्ञा (१।१।४३) आहे त्यांमध्यें 'शि' प्रत्ययाला सर्वनामस्थान संज्ञा नाहीं. तेथें सर्वनामस्थान प्रकरणाचा संबंध गृहीत धरला असता नियमाला व्यावृत्ति संभवत नसल्यामुळें सर्व विशेष सोडून देऊन सामान्यतः शि प्रत्यय पुढें असतांनाच दीर्घ होतो इतर प्रत्यय पुढें असतांना होत नाहीं असा मोघम नियम समजला जाईल.

(सू. १४) 'अत्वसन्तस्य०' या सूत्रानें 'अतु' प्रत्ययाला सांगितलेला जो दीघ त्याविषयीं तो अतु प्रत्यय पित् असला तरी तेथें दीर्घ होतो असे म्हणावे. उदाहरणार्थ– गोमान्, यवमान्.

पण येथ प्रस्तुत सूत्रानें दीर्घ साधत नाहीं याचे काय बरे कारण?

'अननुबन्धकाचें ग्रहण केलें असतांना तेथें सानुबन्धकाचें ग्रहण होत नाहीं' अशी परिभाषा आहे म्हणून पकारेत्संज्ञक अतु प्रत्ययाचें येथें ग्रहण होणार नाहीं.

पण 'अननुबन्धकग्रहणे' असें म्हटलें आहे आणि सूत्रात तर 'अतु' हें सानुबन्धकाचें ग्रहण आहे.

तर मग 'विशिष्ट अनुबन्ध उच्चारला असतां तो आणि दुसरा असे अनुबन्ध असतील तर त्या शब्दाचें ग्रहण करू नये' अशी परिभाषा आहे तो पित् आहे.

---

१ (सू. १४) अतु आहे अन्ती ज्याच्या अशा अङ्गाच्या, तसेंच, धात्ववयवभिन्न जो अस् तो आहे शेवटीं ज्याच्या अशा अङ्गाच्या उपधेला संबुद्धिभिन्न सु प्रत्यय पुढें असतांना दीर्घ होतो.

२. गोमान् येथें मतुप् प्रत्यय (५।२।११४) केला आहे तो पित् आहे.

३. जेथें बिलकूल अनुबंध नाहीं त्यालाच अननुबंधक म्हणणें योग्य आहे. आणि येथें उकार हा अनुबंध उच्चारला आहे. त्यामुळें हें अननुबधकाचें ग्रहण होत नाहीं.

तत्तर्ह्युपसंख्यानं कर्तव्यम् । न कर्तव्यम् । पकारलोपे कृते नातुबन्तं भवत्यत्वन्तमेव । यथैव तर्हि पकारलोपे कृते नातुबन्तमेवमुकारलोपे ऽपि कृते नात्वन्तम् । ननु च भूतपूर्वगत्या भविष्यत्यत्वन्तम् । यथैव तर्हि भूतपूर्वगत्यात्वन्तमेवमतुबन्तमपि । एवं तर्ह्याश्रीयमाणे भूतपूर्वगतिरत्वन्तं चाश्रीयते नातुबन्तम् ॥ न सिध्यति । इह हि व्याकरणे सर्वेष्वेव सानुबन्धकग्रहणेषु रूपमाश्रीयते यत्रास्यैतद्रूपमिति । रूपनिर्ग्रहश्च शब्दस्य नान्तरेण लौकिकं प्रयोगम् । तस्मिंश्च लौकिके प्रयोगे सानुबन्धकानां प्रयोगो नास्तीति कृत्वा द्वितीयः प्रयोग उपास्यते । कोऽसौ । उपदेशो नाम । उपदेशे चैतदतुबन्तं नात्वन्तम् ॥

यदि पुनरत्शब्दं गृहीत्वा दीर्घत्वमुच्येत । नैवं शक्यम् । इहापि प्रसज्येत । जगत् जनगत् । अर्थवद्ग्रहणे नानर्थकस्येत्येवमेतस्य न भविष्यति । इहापि तर्हि न प्राप्नोति । कृतवान् भुक्तवानिति । क्व तर्हि स्यात् । पचन् यजन् । न वा अत्रेष्यते ॥

---

आहे. म्हणून पकारेत्संज्ञक 'अतु' प्रत्ययाचें येथें ग्रहण होणार नाहीं.

तर मग तसें वचन करावयास पाहिजे.

तसे वचन करावयास नको. कारण, पकाराचा लोप केला असतांना हें (पद) अतुबन्त होत नाहीं, तर अत्वन्तच होतें.

पण जसें पकारलोप केला असतांना अतुबन्त होत नाहीं तसें उकारलोप केला असतां हें अत्वन्तही होत नाहीं.

तर मग भूतपूर्वगतीनें हें अत्वन्त समजलें जाईल.

पण, जर भूतपूर्वगतीनें हें अत्वन्त होत आहे तर त्याप्रमाणें भूतपूर्वगतीनें हें अतुबन्तही होत आहे.

होत आहे खरें. पण सूत्रामध्यें उकार उच्चारला असल्यामुळें त्याविषयीं भूतपूर्वगति समजली जाते. आणि प्रकृत स्थलीं तर अतु असें उच्चारलें आहे; अतुप् असें उच्चारलें नाहीं.

तरी पण, पिताला दीर्घ साधत नाहीं. कारण या व्याकरणशास्त्रामध्यें सानुबन्धकाचें उच्चारण केलें असेल अशा सर्वच ठिकाणीं एक प्रकारच्या शब्दस्वरूपाचा आश्रय केला जातो. पण अमक्या शब्दाचें अमुक रूप आहे, असा निश्चय लौकिक प्रयोगावाचून होणें अशक्य आहे. आणि त्या लौकिक प्रयोगामध्यें पहावें तर सानुबन्धकाचा प्रयोगच दिसत नाहीं. तेव्हां त्याच्याच दुसऱ्या स्वरूपाचा हा प्रयोग आहे असें समजलें जातें. ते दुसरें स्वरूप कोणतें म्हणाल तर उपदेश म्हणून ज्याला म्हणतात तेंच तें होय. आतां त्या उपदेशामध्यें तर हें अतुबन्त आहे अत्वन्त नाहीं.

आतां जर ह्या सूत्रामध्यें अतु शब्दाच्याऐवजीं अत् शब्द उच्चारला तर हें साधेल; पण असें करणें शक्य नाहीं. कारण, जगत् व जनगत् येथेंही दीर्घ होऊं लागेल.

'अर्थवान् शब्दाचें ग्रहण संभवत असतांना अनर्थकाचें ग्रहण करूं नये' या परिभाषेनें जगत् व जनगत् येथें दीर्घ होणार नाहीं.

पण असें म्हटलें तर कृतवान् व भुक्तवान्

---

४. सूत्रामध्यें अतु असें म्हटलें आहे. पण उकाराचा लोप होत असल्यामुळें अतु असें स्वरूप कोठेंच दृष्टी पडत नाहीं. म्हणून सामर्थ्यास्तव भूतपूर्वगतीनें अतु म्हणजे अत्वन्त असें येथें समजावयाचें आहे. तेव्हां मतुपांतील उकाराचा लोप झाला तरी भूतपूर्वगतीनें अत्वन्त असें म्हणतां येतें.

अनिष्टं च प्राप्नोति । इष्टं च न सिध्यति । तस्मादुपसंख्यानं कर्तव्यम् ॥

## [ अनुनासिकस्य क्विझलोः क्ङिति ॥ ६ । ४ । १५ ]

## अज्झनगमां सनि ॥ ६ । ४ । १६ ॥

### गमेर्दीर्घत्व इङ्ग्रहणम् ॥ १ ॥

गमेर्दीर्घत्व इङ्ग्रहणं कर्तव्यम् । इङ्गमेरिति वक्तव्यम् । इह मा भूत् । संजिगंसते वत्सो मात्रेति ॥

### अग्रहणे ह्यनादेशस्यापि दीर्घप्रसङ्गः ॥ २ ॥

अक्रियमाणे हीङ्ग्रहणेऽनादेशस्यापि दीर्घत्वं प्रसज्येत । संजिगंसते वत्सो मात्रेति ॥

### न वा छन्दस्यनादेशस्यापि दीर्घत्वदर्शनादिङ्ग्रहणानर्थक्यम् ॥ ३ ॥

न वेङ्ग्रहणं कर्तव्यम् । किं कारणम् । छन्दस्यनादेशस्यापि दीर्घत्वदर्शनात् । छन्दस्यनादेशस्यापि गमेर्दीर्घत्वं दृश्यते । स्वर्गं लोकं संजिगांसत् । छन्दस्यनादेशस्यापि गमेर्दीर्घत्वं भवत्येवं भाषायामपि प्राप्नोति । तस्मादिङ्ग्रहणं कर्तव्यम् ॥ न कर्तव्यम् । योगविभागः करिष्यते । अचः सनि । अजन्तानां सनि दीर्घो भवति । ततो हनिगम्योः । हनिगम्योश्च सनि दीर्घो भवति ।

---

येथेंही दीर्घ होणार नाहीं.

तर मग कोठे बरे दीर्घ होईल ?

पचन् व यजन् येथें दीर्घ होईल.

पण येथें दीर्घ होणें इष्ट नाहीं. तेव्हां अनिष्ट प्रसक्त होतें व इष्ट साधत नाहीं. एकंदरींत 'पित उपसंख्यानम्' असें वचन केलें पाहिजे.

( सू. १६ वा. १ ) गम् धातूला सांगितलेल्या दीर्घाविषयीं इङाचें ग्रहण करावें. म्हणजे इङ् धातूचे स्थानीं आदेश झालेल्या गम् धातूला अशा अर्थाचे 'इङ्गमेः' असें म्हणावें. कारण संजिगंसते वत्सो मात्रा येथें दीर्घ न झाला पाहिजे.

( वा. २ ) इङ्ग्रहण न केलें तर आदेश नव्हे अशाही गम् धातूला दीर्घ होऊं लागेल. उदाहरणार्थ संजिगंसते वत्सो मात्रा.

( वा. ३ ) इङ्ग्रहण करावयास नको.

काय कारण ?

वेदामध्यें आदेश नव्हे अशाही गम् धातूला दीर्घ केल्याच दृष्टीस पडत आहे. उदाहरणार्थ— 'स्वर्गं लोकं संजिगांसत्.' तेव्हां इङ्ग्रहण अनर्थक होत आहे.

तर जसें वेदामध्यें आदेश नव्हे अशाही गम् धातूला दीर्घ होतो त्याप्रमाणे भाषेमध्येंही प्राप्त होत आहे तो न व्हावा म्हणून इङ्ग्रहण केले पाहिजे.

तरी पण इङ्ग्रहण करावयास नको. कारण, योगविभाग करण्यात येईल. तो असा—'अचः सनि' म्हणजे अजन्त धातूंना सन् पुढें असतांना दीर्घ होतो. त्यानंतर 'हनिगम्योः'; येथें अचः हें अनुवृत्त आहे. तेव्हां अचाचे स्थानीं जो गम्

---

१. ( सू. १५ ) अनुनासिकान्त अङ्गाच्या उपधेला क्वि प्रत्यय, तसाच झलादि कित् किंवा ङित् प्रत्यय पुढें असतांना दीर्घ होतो. उदा०—प्रशान्, प्रशान्तः.

१. ( सू. १६ ) अजन्त धातु, हन् धातु आणि अचाचे स्थानीं आदेश झालेला असा गम् धातु यांना झलादि सन् प्रत्यय पुढें असतांना दीर्घ होतो.

२. सम् उपसर्ग पूर्वी असलेल्या गम् धातूहून आत्मनेपद ( १।३।२९ ) सांगितले असल्यामुळे 'पूर्ववत्सनः' ( १।३।६८ ) यानें सन्नन्ताहून आत्मनेपद झाले आहे.

३. आणि तें गम् धातूचें विशेषण आहे. इङ् धातूच्या ङकाराला इत्संज्ञा होऊन लोप झाल्यानंतर इकाराला गम् आदेश होतो तो अचाचे स्थानीं झालेला गम् होय.

अच इत्येव । अचः स्थाने यौ हनिगमी ॥ अथोपधाग्रहणमनुवर्तत उताहो न । किं चातः ।

**सनि दीर्घ उपधाधिकारश्चेद्व्यञ्जनप्रतिषेधः ॥ ४ ॥**

सनि दीर्घ उपधाधिकारश्चेद् व्यञ्जनस्य प्रतिषेधो वक्तव्यः । चिचीषति तुष्टूषतीत्येवमर्थम् ॥ एवं तर्हि निवृत्तम् ।

**अनधिकार उक्तम् ॥ ५ ॥**

किमुक्तम् । हनिगमिदीर्घेष्वज्ग्रहणमिति ॥ नैष दोषः । उक्तमेतद्ध्रस्वो दीर्घः प्लुत इति यत्र ब्रूयादच इत्येतत्तत्रोपस्थितं द्रष्टव्यमिति ॥

**[ तनोतेर्विभाषा[1] ॥ ६ । ४ । १७ ॥**

**क्रमश्च क्त्वि[1] ॥ ६ । ४ । १८ ॥ ]**

**च्छ्वोः शूडनुनासिके च[1] ॥ ६ । ४ । १९ ॥**

अथ ऊडादिः कस्मान्न भवति । आदिष्टिद्भवतीति प्राप्नोति । कस्य पुनरादिः । वकारस्य । अस्तु । वकारस्य का प्रतिपत्तिः । लोपो व्योर्वलि [ ६. १. ६६ ] इति लोपो भविष्यति । नैवं शक्यम् ।

---

धातु व हन् धातु त्यांना सन् पुढें असतांना दीर्घ होतो असा अर्थ होतो.

आतां येथें मागून चालू असलेलें उपधाग्रहण अनुवृत्त होतें किंवा नाहीं ?

त्यांत काय बर विशेष आहे ?

( वा. ४ ) सन् पुढें असतांना दीर्घ सांगणाऱ्या या शास्त्रामध्यें उपधा हें पद अनुवृत्त असेल तर व्यंजनाला दीर्घाचा प्रतिषेध केला पाहिजे. कारण चिचीषति व तुष्टूषति येथे व्यंजनाला दीघ न झाला पाहिजे.

असें आहे तर उपधाग्रहण निवृत्त झालें असें समजावें.

( वा. ५ ) निवृत्त समजलें तर सांगितलेंच आहे.

तें काय सांगितलें आहे ?

हन् आणि गम् यांना सांगितलेल्या दीर्घाविषयीं अच् ग्रहण केलें पाहिजे. ( १।२।२८ वा. १ ).

हा दोष येत नाहीं. कारण, ऱ्हस्व दीर्घ अथवा प्लुत होतो असें जेथें सांगितलें आहे तेथें 'अचः' असें षष्ठ्यन्त पद उपस्थित होतें.

(सू. १९) हा ऊट् आदि असा कां बरें होत नाहीं ? टित् हा आद्यावयव होतो ( १।१।४६ ) असें सांगितलें आहे म्हणून हा ऊठ् आदि असा प्राप्त[2] होतो.

पण हा कोणाचा बरें आदि होणार ?

वकाराचा.

ऊट् वकाराचाच आदि होत असेल तर होऊं दे. त्यांत काय होणार आहे ? 'लोपो व्योर्वलि' ( ६।१।६६ ) यानें लोप होईल.

असें करणें शक्य नाहीं. कारण येथें इष्ट असें

---

१. ( सू. १७ ) तन् धातूच्या उपधेला झलादि सन् प्रत्यय पुढें असतांना विकल्पानें दीर्घ होतो. उदा० तितांसति, तितसति.

१. ( सू. १८ ) क्रम् धातूच्या उपधेला झलादि क्त्वा प्रत्यय पुढें असतांना विकल्पानें दीर्घ होतो. उदा० क्रान्त्वा, क्रन्त्वा.

१. ( सू. १९ ) सतुक् छकार व वकार यांचे स्थानी अनुनासिकादि प्रत्यय, क्वि प्रत्यय किंवा झलादि कित् किंवा ङित् प्रत्यय, पुढें असतांना क्रमानें श व ऊठ् असे आदेश होतात. उदा०-विश्नः, प्रश्नः, स्योनः; अक्षद्यूः, द्यूतः.

२. 'छ्वोः शूडनु०' येथें सूत्रामध्यें जश्त्वानें (८।२।३९ ) 'ड'कार झाला आहे. मूळचा तो 'ठ'कार आहे. आतां तो मूळचा 'ट'कार आहे असें गृहीत धरून ही शंका केली आहे.

ज्वरत्वरस्रिव्यविमवामुपधायाश्च [ ६. ४. २० ] इति द्वावूठौ स्याताम् ॥ एवं तर्हि नैष टित् । कस्तर्हि । ठित् । यदि तर्हि ठित् धौतः पट इत्येत्येधत्यूठ्सु [ ६. १. ८९ ] इति वृद्धिर्न प्राप्नोति । चर्त्वे कृते भविष्यति । असिद्धं चर्त्वं तस्यासिद्धत्वान्न प्राप्नोति । आश्रयात्सिद्धत्वं भविष्यति । असत्यन्यस्मिन्नाश्रयात्सिद्धत्वं स्यादस्ति चान्यः सिद्धो वाह ऊडिति । एषोऽपि ठित्करिष्यते । तत्रोभयोश्चर्त्वे कृत आश्रयात्सिद्धत्वं भविष्यति ॥

अथ क्ङिद्ग्रहणमनुवर्तत उताहो न । किं चातः ।

**शूठ्त्वे क्ङिदधिकारश्चेच्छः षत्वम्**

शूठ्त्वे क्ङिदधिकारश्चेच्छः षत्वं वक्तव्यम् । प्रष्टा प्रष्टुम् प्रष्टव्यम् ॥

**तुक्प्रसङ्गश्च ।**

तुक् च प्राप्नोति ॥ निवृत्तेऽपि वै

---

काम झालें तरी ' ज्वरत्वर० ' ( ६।४।२० ) या सूत्रानें वकाराच्या पूर्वी एक आणि उपधेच्या पूर्वी एक असे दोन ऊट् होऊ लागतील.

तर मग हा ऊठ् टित् नव्हे, तर ठितच आहे.

जर हा ऊठ् ठित् आहे तर धौतः पटः येथें ' एत्येधत्यूठ्सु ' ( ६।१।८९ ) यानें वृद्धि प्राप्त होत नाहीं.

ऊठाच्या ठकाराला चर्त्व ( ८।४।५५ ) केलें असता मागून वृद्धि होईल.

चर्त्व असिद्ध आहे म्हणून वृद्धि प्राप्त होत नाहीं.

पण ज्याअर्थी ऊट् पुढे असतांना वृद्धि सांगितली आहे आणि ऊट् तर चर्त्वाशिवाय मूळचा कोठेंच नाहीं त्याअर्थी चर्त्व सिद्ध समजले जाईल.

मूळचाच टकार असलेला असा दुसरा ऊट् नसेल तर वृद्धीला ऊट् असा निमित्त धरला आहे त्याच्या जोरावर चर्त्व सिद्ध समजलें जाईल. पण ' वाह ऊट् ' हा मूळचाच टकारविशिष्ट असा ऊट् आहे.

हाही ठित्च केला जाईल. तेव्हां दोन्ही ऊठांच्या ठकाराला चर्त्व केलें असतां वृद्धीला ऊट् असा निमित्त धरला आहे त्याच्या जोरावर चर्त्व सिद्ध समजलें जाईल.

आतां या प्रकृतसूत्रामध्यें ' अनुनासिक० ' ( ६।४।१५ ) या सूत्रांतून ' क्ङिति ' या पदाची अनुवृत्ति आहे किंवा नाहीं ?

यांत काय बरे विशेष आहे ?

( श्लो. वा. १ ) प्रकृत सूत्रानें सांगितलेल्या शकार आणि ऊठ् यांविषयीं क्ङिति या पदाची अनुवृत्ति असेल तर छकाराला षत्व ( ८।२।३६ ) सांगितले पाहिजे. उदाहरणार्थ– प्रष्टा प्रष्टुम् प्रष्टव्यम् .

शिवाय, तुगागमाचा प्रसङ्ग येईल.

पण क्ङिद्–ग्रहणाची निवृत्ति मानिली तरीही तुक्

---

३. ' एत्येधत्यूठसु ' येथें ' ऊट् ' असा टकारान्त शब्द उच्चारला आहे असें गृहीत धरून हें विचारलें आहे. ' धावु ' या धातूहून क्त प्रत्यय पुढें असतांना प्रकृत सूत्रानें वकाराला ऊठ् होऊन वृद्धि झाली आहे.

४. येथें क्ङित् ग्रहणाची अनुवृत्ति असेल तर क्ङित् नव्हेत असे तृजादि प्रत्यय पुढें असतांना प्रष्टा इत्यादि स्थलीं शकार आदेश प्राप्त होत नाहीं. म्हणून छकाराला षत्व होण्याकरितां ' व्रश्चभ्रस्ज० ' ( ८।२।३६ ) या सूत्रामध्यें छग्रहण करावें लागत आहे. आणि क्ङित् ग्रहण अनुवृत्त नसेल तर क्ङित् आणि अक्ङित् पुढें असतांना या सूत्रानें छकाराला शकार होत असल्यामुळें ' व्रश्चभ्रस्ज० ' या सूत्रामध्ये शकाराहून निराळें छग्रहण करावें लागत नाहीं. शिवाय, ' व्रश्चभ्रस्ज० ' या सूत्रामध्यें छग्रहण केलें तरीही छकाराला केलेलें षत्व असिद्ध असल्यामुळे तुक् आगम केला असतांना प्रतृष्टा असें रूप प्राप्त होतें. आणि या सूत्रानें शकाराचे विधान केलें असतां तो सिद्ध असल्यामुळें तुक् होत नाहीं.

क्किद्ग्रहणेऽवश्यमत्र तुगभावार्थो यत्नः कर्तव्यः । अन्तरङ्गत्वाद्धि तुक्प्राप्नोति । च्छ्वोरिति संनिपातग्रहणं विज्ञायते । ननु चैवमप्यन्त्यस्य प्राप्नोति । संनिपातग्रहणसामर्थ्यात्सर्वस्य भविष्यति । एवमप्यङ्गस्य प्राप्नोति । निर्दिश्यमानस्यादेशा भवन्तीत्येवमङ्गस्य न भविष्यति ॥ यद्येवमुत्पुच्छयतेरप्रत्यय उत्पुडिति प्राप्नोति उत्पुदिति चेष्यते । तथा वाञ्छतेरप्रत्ययो वान् वांशौ वांश इति न सिध्यति । यथालक्षणमप्रयुक्ते ॥ तत्र त्वेतावान्विशेषः । अनुवर्तमाने क्किद्ग्रहणे छः षत्वं वक्तव्यं तत्र चापि सनिपातग्रहणं विज्ञेयम् ।

---

न होण्याकरितां यत्न करणें जरूर आहेच. कारण, अन्तरंग असल्यामुळे ह्या सूत्रानें शकार करण्यापूर्वीच तुक् प्रसक्त होत आहे.

येथें ‘च्छ्वोः’ असें तुगागमासहित तृछ् या समुदायाचें ग्रहण केलें आहे.[5]

सतुक् छकाराचें ग्रहण समजलें तरी अन्त्य छकाराला शकार प्राप्त होत आहे.[6]

तकारविशिष्ट छकाराचें ग्रहण केलें असल्यानें त्या जोरावर समुदायाचे स्थानीं शकार आदश होईल.

तरी पण अङ्गाचे स्थानीं आदेश प्राप्त होत आहे.[7]

‘ सूत्रोच्चारिताचे स्थानीं आदेश करावे ’ अशी परिभाषा असल्यामुळे सर्व अङ्गाला आदेश होणार नाहीं

तकारासहित छकाराचें ग्रहण केलें तर उत् मार्गे असतां पुच्छ या शब्दाहून णिङ् प्रत्यय (३।१।२०) करून पुढे क्विप् प्रत्यय केला असतांना उत्पुट् असें रूप प्राप्त होतें आणि उत्पुत् असें तर इष्ट आहे. तसेंच वाञ्छ् धातूहून क्विप् प्रत्यय केला असतां वान् वांशौ वांशः हीं रूपें साधत नाहींत.[8]

अप्रयुक्त शब्दाविषयीं सूत्राच्या अनुरोधानें जसें रूप बनेल तसेंच करावें.[9]

आतां येथें एवढा विशेष समजावा कीं, क्किद्ग्रहणाची येथें अनुवृत्ति केली तर प्रष्टा इत्यादि उदाहरणांमध्यें यानें शकार आदेश प्राप्त होत नसल्यामुळे तेथें षत्व होण्याकरितां ‘व्रश्च०’ या सूत्रामध्यें छकार ग्रहण ठेवावे लागेल. आणि तेथेंही तें तकारासहित अशा छकाराचें ग्रहण समजावें लागेल.

---

५. तेव्हां तुक् अगोदर झाला तरी तृछ या दोन व्यंजनांच्या समुदायाला मिळून शकार झाला म्हणजे दोष येत नाहीं. सूत्रामध्यें तकाराला चकार ( ८।४।४० ) होऊन च्छ असे झालें आहे.

६. समुदायाला सांगितला असला तरी ‘ अलोऽन्त्यस्य ’ ( १।१।५२ ) या परिभाषेनें केवल छकाराला शकार झाला असतांना प्रतृष्टा असेच रूप प्राप्त होतें.

७. सतुक् छकार अङ्गाचें विशेषण होऊन तृछ् हा समुदाय शेवटीं असलेल्या अङ्गाला शकार आदेश होतो असा अर्थ होतो. तेथें अलोऽन्त्यस्य ही परिभाषा आली नाही तर अर्थातच सर्व अङ्गाला आदेश प्राप्त होत आहे.

८. पुतं गुह्यस्थानं छादयतीति पुच्छम् असा येथें मूळचाच तकार आहे; तुक् आगमाचा नव्हे. येथें त्या ‘त’काराला श्चुत्वानें चकार झाला आहे. सूत्रामध्यें ‘त’कारासहित ‘छ’काराचा निर्देश केला तर येथें तकारविशिष्ट छकाराला शकार करून त्याला षत्व ( ८।२।३६ ) आणि जश्त्व ( ८।२।३९ ) केलें असतां उत्पुट् असें रूप होऊं लागेल. आणि केवळ छकाराला शकार होऊन त्याचा संयोगान्तलोप ( ८।२।२३ ) झाला म्हणजे उत्पुत् असें रूप होत असतें. तसेंच वाञ्छ् धातूच्या छकाराला प्रकृत सूत्रानें शकार होऊन त्याचा संयोगान्तलोप होऊन वान्, वांशौ, वांशः अशीं रूपें होतात. जर तकारासहित छकाराचा निर्देश केला तर येथें छकाराच्या मागें तकार नसल्यामुळें शकार होणार नाही, असा दोष येतो.

९. तेव्हां उत्पुट्, वान्, वाञ्छौ, वाञ्छः, अशींच रूपें होतात असें समजावें; अथवा अशा प्रयोगांचें अनभिधानच मानावें.

**निवृत्ते दिव ऊड्भावः**

निवृत्ते दिव ऊड्भावः प्राप्नोति । द्युभ्याम द्युभिः । अस्तु । कथं द्युभ्याम् द्युभिरिति । ऊठि कृते दिव उत् [ ६. १. १३१ ] इत्युत्त्वं भविष्यति । न सिध्यति । आन्तर्यतो दीर्घस्य दीर्घः प्राप्नोति ।

**तदर्थं तपरः कृतः ॥**

एवमर्थं तपरः क्रियते ॥

क पुनः क्ङिद्ग्रहणं प्रकृतम् । अनुनासिकस्य क्विझलोः क्ङिति [१५] इति । यदि तदनुवर्ततेऽज्झनगमां सनि [१६] क्विझलोश्चेति क्विझलोरपि दीर्घत्वं प्राप्नोति ॥ झलि तावन्न दोषः । सनं झल्ग्रहणेन विशेषयिष्यामः । सनि झलादाविति । क्वावप्याचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयति नानेन क्वौ दीर्घत्वं भवतीति यदयं क्विब्वचिप्रच्छ्यायतस्तुकटप्रुजुश्रीणां दीर्घोऽसंप्रसारणं चेति दीर्घत्वं शास्ति ॥

**[ ज्वरत्वरस्रिव्यविमवामुपधायाश्च ॥ ६।४।२० ॥**

**राल्लोपः ॥ ६ । ४ । २१ ॥ ]**

इति श्रीभगवत्पतञ्जलिविरचिते व्याकरणमहाभाष्ये षष्ठस्याध्यायस्य चतुर्थे पादे प्रथममाह्निकम् ॥

---

आता तें क्ङित्ग्रहण निवृत्त झालें तर द्युभ्यां द्युभिः वगैरे उदाहरणांमध्यें दिव् शब्दाला ऊठ् आदेश होऊं लागेल.

झाला तर होऊं दे.

मग द्युभ्याम् द्युभिः इत्यादि उदाहरणें कशीं बरें साधतील ?

अगोदर ऊठ् केला असतां मागाहून ‘ दिव उत् ’ ( ६।१।१३१ ) यानें उत्व होईल.

उत्व होऊन साधणार नाहीं. कारण, सादृश्यामुळें दीर्घच ( १।१।५० ) दीर्घाला प्राप्त होत आहे.

दीर्घालाही ऱ्हस्वच व्हावा म्हणून तर तेथें तपरग्रहण केलें आहे.

पण हें क्ङित्–ग्रहण मागें कोठें बरें लेकें आहे ?

‘ अनुनासिकस्य क्विझलोः क्ङिति ’ ( ६।४।१५ ) येथें.

तें क्ङित् ग्रहण येथें अनुवृत्त आहे तर मध्यें ‘ अज्झन० ’ ( ६।४।१६ ) येथेही ते अनुवृत्त असल्यामुळें क्वि आणि झलादि प्रत्यय पुढें असतांनाही दीर्घ होऊं लागेल.

‘ झलादि प्रत्यय पुढे असतांना दीर्घ होईल ’ हा दोष येत नाहीं. कारण, झल्ग्रहण सनाचें विशेषण आह्मी करीत आहों. त्यामुळे झलादि सन् प्रत्यय पुढें असताना असा अर्थ होतो. ‘ क्विप् प्रत्यय पुढें असताना दीर्घ होईल ’ हाही दोष येत नाहीं. कारण ज्या अर्थी आचार्य हे ‘ क्विब्वचिप्रच्छया० ’ ( ३।२।१७८ वा. २ ) इत्यादि वचनानें क्विप् प्रत्यय पुढे असतांना दीर्घाचें विधान करीत आहेत त्या अर्थी क्विप् प्रत्यय पुढें असतांना ‘ अज्झनगमाम्० ’ या सूत्रानें दीर्घ होत नाहीं असें ते सुचवीत आहेत.

याप्रमाणें श्रीभगवान् पतंजलि ऋषींनीं रचिलेल्या व्याकरणमहाभाष्याच्या सहाव्या अध्यायाच्या चौथ्या पादांतील पहिलें आन्हिक समाप्त झालें.

---

१. ( सू. २० ) ज्वर, त्वर, स्रिवि, अव, आणि मव् या धातूंची उपधा आणि वकार यांचे स्थानीं ऊठ असा आदेश क्वि, अनुनासिकादि प्रत्यय व झलादि प्रत्यय पुढे असतांना होतो.

१. ( सू. २१ ) रेफाहून पुढें असलेल्या तकारामहिन छकाराचा आणि वकाराचा क्वि, झलादि प्रत्यय, आणि अनुनासिकादि प्रत्यय पुढें असतांना लोप होतो.

अ० ६ पा० ४ आ० १ समाप्त.

## असिद्धवदत्रा भात् ॥ ६ । ४ । २२ ॥

असिद्धवचनं किमर्थम् ।

**असिद्धवचन उक्तम् ॥ १ ॥**

किमुक्तम् । तत्र तावदुक्तं षत्वतुकोरसिद्धवचनमादेशलक्षणप्रतिषेधार्थमुत्सर्गलक्षणभावार्थं चेति । इहाप्यसिद्धवचनमादेशलक्षणप्रतिषेधार्थमुत्सर्गलक्षणभावार्थं च। आदेशलक्षणप्रतिषेधार्थं तावत् । आगहि जहि । गतः गतवानिति । अनुनासिकलोपे जभावे च कृते ऽतो लोपः [ ६. ४. ४८ ] अतो हेः [१०५] इति च प्राप्नोति । असिद्धत्वान्न भवति । उत्सर्गलक्षणभावार्थं च । एधि शाधीति । अस्तिशास्त्योरेत्त्वशाभावयोः कृतयोर्झलक्षणं धित्वं न प्राप्नोति । असिद्धत्वाद्भवति ॥

अथात्रग्रहणं किमर्थम् ।

**अत्रग्रहणं विषयार्थम् ॥ २ ॥**

विषयः प्रतिनिर्दिश्यते । अत्रैतस्मिन्ना भाच्छास्त्र आ भाच्छास्त्रमसिद्धं यथा

---

( सू. २२ ) असिद्ध सांगणारें हें वचन कशाकरितां केलें आहे ?

( वा. १ ) असिद्ध सांगणाऱ्या वचनासंबंधानें मागें सांगितलेंच आहे.

तें काय सांगितलें आहे ?

" षत्वतुकोरसिद्धः " हें वचन आदेशप्रयुक्त कार्याच्या प्रतिषेधाकरितां आणि स्थानि-प्रयुक्त कार्याच्या प्रवृत्तीकरितां केलें आहे असें म्हटले आहे. त्याप्रमाणें येथेंही असिद्ध वचन हें आदेश–प्रयुक्त कार्याच्या प्रतिषेधाकरितां आणि स्थानि–प्रयुक्त कार्याच्या प्रवृत्तीकरितां आहे. त्यांत आदेश–प्रयुक्त कार्याच्या प्रतिषेधाचें उदाहरण–आगहि, जहि; गतः व गतवान्. येथें अनुनासिकलोप ( ६।४।३७ ) व ज आदेश ( ६।१।३६ ) केले असतां ' अतो लोपः ' ( ६।४।४८ ) हा अकाराचा लोप आणि ' अतो हेः ' ( ६।४। १०५ ) हा ' हि ' प्रत्ययाचा लुक् हे प्राप्त होतात. परंतु अनुनासिकलोप व ज आदेश असिद्ध असल्यामुळें ते होत नाहींत.

स्थानि–प्रयुक्त कार्याच्या प्रवृत्तीचें उदाहरण–एधि, शाधि. येथें अस् व शास् या धातूंना क्रमानें एत्व ( ६।४।११९ ) आणि शा आदेश ( ६।४।३५ ) केले असतां झलन्त अङ्ग नसल्यामुळें झलन्तापुढील 'हि' या प्रत्ययाला सांगितलेला 'धि' आदेश ( ६।४।१०१ ) प्राप्त होत नाहीं. पण एत्व व शा आदेश हे असिद्ध असल्यामुळें धि आदेश होतो.

आतां येथें ' अत्र ' शब्द घातला आहे तो कशाकरितां ?

( वा. २ ) अत्रग्रहणानें हें प्रकृत वचन कोणतें शास्त्र कर्तव्य असतांना प्रवृत्त होतें तें ठरविलें आहे. येथून ' भस्य ' हा अधिकार

---

१. ( सू. २२ ) समानाश्रय आभीयशास्त्र कर्तव्य असतांना समानाश्रय आभीयशास्त्र असिद्ध समजावें. ह्या सूत्रापासून हा पाद संपेपर्यंत जी शास्त्रें आहेत त्यांना ' आभीयशास्त्र ' असें म्हणतात.

२. आङ्–उपसर्ग–पूर्वक गम् धातूहून लोट्, सिप्, हि आदेश (३।४।८७), 'बहुलं छन्दसि' (२।४।७३) यानें शपाचा लुक् व अनुनासिकलोप होऊन आगहि. हन्, धातूहून लोट् , सिप्, हि आदेश , अदादित्वास्तव शपाचा ( २।४।७२ ) लुक्, ' हन्तेर्जः ' यानें ज आदेश होऊन जहि. गम् धातूहून क्त, व क्तवतु प्रत्यय व अनुनासिकलोप होऊन गतः व गतवान्.

३. अस् आणि शास् या धातूंहून लोट्, सिप्, हि आदेश, शपाचा लुक्. नंतर ' एधि ' येथें सकाराला एत्व ( ६।४।११९ ) केलें आहे; आणि 'शाधि' येथें ' शा ' (६।४।३५) आदेश केला आहे.

स्यात् । इह मा भूत् । अभाजि रागः उपबर्हणमिति ॥

कानि पुनरस्य योगस्य प्रयोजनानि ।

**प्रयोजनं शैत्त्वं धित्वे ॥ ३ ॥**

शाभाव एत्त्वं च धित्वे प्रयोजनम् । एधि शाधीति । अस्तिशास्त्योरेत्त्वशाभावयोः कृतयोर्झल्लक्षणं धित्वं न प्राप्नोति । असिद्धत्वाद्भवति ॥ शाभावस्तावन्न प्रयोजयति । एवं वक्ष्यामि शास् हौ शा हाविति । यत्वभूतः सकारस्तत्र साद्धित्वं धि च [ ८. २. २५ ] इति सकारस्य लोपः । अथवा आ हाविति वक्ष्यामि । एवमपि सकारस्य प्राप्नोति । उपधाया इति वर्तते । उपधाया आत्वे कृते साद्धित्वं धि चेति सकारलोपः । अथवा न हाविति वक्ष्यामि । तत्रेत्त्वे प्रतिषिद्धे साद्धित्वं धि

---

संपेपर्यंत कोणतेही शास्त्र आभीय समजले जातें. तें आभीय शास्त्र, दुसरें आभीय शास्त्र कर्तव्य असतांनाच असिद्ध व्हावें याकरितां 'अत्र' शब्द घातला आहे. आणि म्हणूनच अभाजि, रागः, व उपबर्हणम् येथें आभीय शास्त्र असिद्ध होत नाहीं.

आतां ह्या सूत्राचीं प्रयोजनें कोणतीं ?

( वा. ३ ) शा आदेश आणि एत्व हीं कार्यें धि आदेश कर्तव्य असताना असिद्ध होतात हें या सूत्राचें प्रयोजन होय. उदाहरणार्थ– एधि, शाधि. येथें अस् व शास् याना एत्व व शा आदेश केले असताना मागील अंग झलन्त नसल्यामुळें झलन्तापुढील हि प्रत्ययाला सांगितलेला धि आदेश प्राप्त होत नाहीं. पण, एत्व आणि शा आदेश हे असिद्ध असल्यामुळें तो होतो.

शाभाव म्हणजे शा आदेश तर या सूत्राचें प्रयोजन होत नाहीं. कारण, 'शास् धातूला शास् आदेश होतो हि पुढे असतांना' असाच 'शा हौ' या सूत्राचा अर्थ करता येईल. सूत्रामध्यें शास् असेंच मूळचें उच्चारण आहे. त्यातील सकाराला रुत्व ( ८।२।६६ ) यत्व ( ८।३।१७ ) आणि यकाराचा लोप ( ८।३।१९ ) झाल्यामुळें शा हौ असें उच्चारलें आहे. तेथें सकाराहून पुढील हि प्रत्ययाला धि आदेश होऊन 'धि च' ( ८।२।२५ ) यानें सकाराचा लोप होईल. किंवा 'आ हौ' असें सूत्र करावें.

पण तसें सूत्र केलें तर सकाराला आत्व होऊं लागेल.

'अनिदिताम्०' येथून 'उपधायाः' हें पद अनुवृत्त येत आहे. अर्थात् शास् धातूच्या उपधेला आत्व केल्यानंतर सकाराहून पुढील हि प्रत्ययाला धि आदेश होऊन 'धि च' यानें सकाराचा लोप होईल. अथवा 'न हौ' असें सूत्र

---

४. भञ्ज् धातूहून कर्मणि लुङ्, त, च्लि, चिण् (३।१।६६); 'भञ्जेश्च०' (६।४।३३) यानें नकाराचा लोप, आणि उपधावृद्धि ( ७।२।११६ ) होऊन अभाजि असें रूप होतें. रञ्ज् धातूहून घञ् प्रत्यय, नकाराचा लोप ( ६।४।२७ ) व उपधावृद्धि होऊन राग शब्द सिद्ध होतो. येथें 'अत्र' शब्द नसेल तर आभीय नकाराचा लोप हा असिद्ध झाल्यामुळें उपधावृद्धि होणार नाहीं; आणि अत्रग्रहण केलें असतां आभीय शास्त्र कर्तव्य असतांनाच आभीय शास्त्र असिद्ध होतें असा अर्थ झाल्यामुळें दोष येत नाहीं. कारण उपधावृद्धि ही आभीय नव्हे. तसेंच, उपबर्हणम् येथें गुण ( ७।३।८६ ) हा आभीय नसल्यामुळें त्याला नकाराचा लोप ( ६।४।२४ वा. २ ) असिद्ध होत नाहीं.

५. 'शास इदङ्०' ( ६।४।३४ ) यानें उपधेला प्राप्त झालेल्या इत्त्वाच्या बाधाकरितां शास् धातूला शास् असाच आदेश सांगितला आहे. तेव्हां सकार कायम असल्यामुळें झलन्तत्वामुळें धि आदेश होईल.

चेति सकारलोपः ॥ एत्त्वमपि लोपापवादो विज्ञास्यते न च सकारस्य लोपः प्राप्नोति ॥

**हिलोप उत्त्वे ॥ ४ ॥**

हिलोप उत्त्वे प्रयोजनम् । कुर्वित्यत्र हिलोपे कृते सार्वधातुकपर उकार इत्युत्त्वं न प्राप्नोति । असिद्धत्वाद्भवति ॥ एतदपि नास्ति प्रयोजनम् । वक्ष्यति तत्र सार्वधातुकग्रहणस्य प्रयोजनं सार्वधातुके भूतपूर्वमात्रेऽपि यथा स्यादुत्त्वम् ॥

**तास्तिलोपेण्यणादेशा अडाड्विधौ ॥ ५ ॥**

तलोपोऽस्तिलोप इणश्च यणादेशोऽडाड्विधौ प्रयोजनम् । अकारि ऐहीति । तलोपे कृते लुङीत्यडाटौ न प्राप्नुतः । असिद्धत्वाद्भवतः । अस्तिलोप इणश्च यणादेशः प्रयोजनम् । आसन् आयन्निति ।

---

करण्यांत येईल. त्या सूत्रानें हि पुढें असतांना 'शास इदङ्०' ( ६।४।३४ ) यानें प्राप्त झालेल्या इत्वाचा निषेध झाल्यानंतर सकाराच्या पुढील हि प्रत्ययाला धि आदेश होऊन 'धि च' यानें सकाराचा लोप होईल.

एत्वसुद्धां 'श्नसोरल्लोपः' या लोपाचा अपवाद समजला जाईल. आणि तो लोप तर सकाराला प्राप्त होत नाहीं.

( वा. ४ ) कृ धातूला उत्व कर्तव्य असतांना हिलोप असिद्ध होतो हें असिद्धवत्सूत्राचें प्रयोजन होय. कुरु येथें 'उतश्च प्रत्ययात्' (६।४।१०६ ) यानें हि प्रत्ययाचा लोप केला असतां सार्वधातुक पुढें असतांना कृ धातूच्या अकाराला सांगितलेलें उत्व (६।४।११० ) प्राप्त होत नाहीं. हिलोप असिद्ध असल्यामुळें उत्व होतें.

हेंही प्रयोजन नाहीं. कारण, 'अत उत्सार्वधातुके' (६।४।११० ) येथील सार्वधातुक ग्रहणाचें प्रयोजन असें सांगण्यांत येणार आहे कीं लुक् झाल्यानंतर सार्वधातुक पुढें नसलें तरी पूर्वी सार्वधातुक पुढें होतें त्याचा आश्रय करून उत्व व्हावें याकरितां सार्वधातुकग्रहण केलें आहे.

( वा. ५ ) तलोप, अस्तिलोप व इण्स्थानिक यणादेश हे अट् व आट् कर्तव्य असतांना असिद्ध होतात हें या सूत्राचें प्रयोजन होय. उदाहरणार्थ– अकारि, ऐहि. येथें 'चिणो लुक्' ( ६।४।१०४ ) यानें त शब्दाचा लोप केला असतां लुङ् पुढें असतांना सांगितलेले अट् व आट् ( ६।४।७१, ७२ ) प्राप्त होत नाहींत. त प्रत्ययाचा लोप असिद्ध असल्यामुळें होतात.

तसेच, अस्तिलोप व इण्स्थानिक यणादेश यांचीं उदाहरणें आसन् व आयन्. येथें 'श्नसोरल्लोपः' यानें अस् धातूच्या अकाराचा

---

६. तेव्हां अर्थात् त्या लोपाचा अपवाद एत्व हें अकाराचे स्थानींच होतें. तेव्हां सकार कायम असल्यामुळें झलन्तत्वामुळेंच धि आदेश साधत आहे.

७. कृ धातूहून लोट्, सिप्, हि आदेश, उ प्रत्यय व गुण हा रपर झाल्यानंतर कर्–उ–हि असें असतांना ' उतश्च प्रत्ययात् ० ' यानें हि प्रत्ययाचा लुक्. मागून ' अत उत्सार्वधातुके ' यानें करोतीच्या अकाराला उत्त्व झाले म्हणजे कुरु असें रूप साधतें.

८. कृ धातूहून कर्मणि लुङ्, त आदेश, च्लि, चिण्, व वृद्धि होऊन कारि+त असें असतां लुक् हा नित्य असल्यामुळें ' चिणो लुक् ' ( ६।४।१०४ ) यानें त शब्दाचा लुक्, व अट् आगम हीं कार्यें झालीं आहेत. ऐहि हें ईह् धातूचें रूप आहे. येथें आट् आगम झाला आहे.

९ अस् धातूहून लुङ्, झि, अन्तादेश, इतश्च यानें इकाराचा लोप, शप्–लुक्, ' श्नसोर० ' (६।४।१११) यानें अकाराचा लोप, व आट् आगम हीं कार्यें झालीं आहेत. आयन् येथें इण् धातूला ' इणो यण् ' ( ६।४।८१ ) यानें यण् झाला आहे.

इणस्त्योर्यण्लोपयोः कृतयोरनजादित्वादाड् न प्राप्नोति । असिद्धत्वाद्भवति ॥ अस्तिलोपस्तावन्न प्रयोजयति । आचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयति लोपादाड्बलीयानिति यदयं श्नसोरल्लोपः [ ६. ४. १११ ] इति तपरकरणं करोति ॥ इण्यणादेशश्चापि न प्रयोजयति । यणादेशे योगविभागः करिष्यते । इणो यण्भवति । तत एरनेकाचः । एश्चानेकाच इणो यण्भवति । ततोऽसंयोगपूर्वस्य यण्भवति । एरनेकाच इत्येव ॥ सर्वेषामेव परिहारः । उपदेश इति वर्तते तत्रोपदेशावस्थायामेवाडाटौ भवतः । अथवार्धधातुक इति वर्तते । अथवा लुङ्लङ्लृङ्क्ष्वडिति द्विलकारको निर्देशः । लुङादिषु लकारादि-

लोप केला असतांना व 'इणो यण्' (६।४।८१) यानें इण् धातूला यण् आदेश केला असताना धातु अजादि नसल्यानें 'आडजादीनाम्' यानें आट् आगम प्राप्त होत नाहीं. यण् आणि लोप हे असिद्ध असल्यामुळें तो होतो.

अस्तिलोप हा असिद्ध होतो ह असिद्धवत्सूत्राचें प्रयोजन होत नाहीं. कारण, ज्याअर्थी आचार्य हे 'श्नसोरल्लोपः' येथें तपरकरण करीत आहेत त्याअर्थी अस्तिलोपापेक्षां आडागम बलवत्तर आहे असे ते सुचवीत आहेत.

यण् आदेश असिद्ध होतो हेंही असिद्धवत्सूत्राचें प्रयोजन होत नाहीं. कारण, यणादेशाविषयीं योगविभाग करण्यात येईल. तो असा– "इणो यण्" (६।४।८१) इण् धातूला यण् होतो; त्याच्या पुढें "एरनेकाचः"[11] एवढेच सूत्र करण्यांत येईल; अनेकाच् जो इण् त्याच्या इकाराला यण् होतो; त्याच्या पुढें "असंयोगपूर्वस्य" सूत्र करण्यांत येईल व तेथें 'एरनेकाचः' हें अनुवृत्त आहेच.

अथवा अकारि वगैरे सर्वच उदाहरणांमध्यें असा परिहार समजावा कीं 'स्यसिच्०' (६।४।६२) या सूत्रांतून उपदेशग्रहणाची अनुवृत्ति करावी. म्हणजे लुङ् वगैरे प्रत्यय करण्यापूर्वी उपदेशावस्थेमध्येंच अट् व आट् होतील.

अथवा आर्धधातुकाधिकाराची[12] अनुवृत्ति येत आहे. त्यामुळेच काम भागेल.

किंवा "लुङ्लङ्लृङ्क्ष्वडुदात्तः"[13] येथें लकार-

१०. आस्ताम् आसन् वगैरे ठिकाणी आट् आगम केल्यानंतर त्या दीर्घ आकाराचा लोप न व्हावा म्हणून 'श्नसोरल्लोपः' येथें तपरकरण केलें आहे. तेथें जर आट् आगमापेक्षा पूर्वी तकाराचा लोप होईल तर मागून अजादि नसल्यामुळें आट् आगमाची प्राप्तीच येणार नाहीं. तेव्हां त्याचा लोप न होण्याकरितां तपरकरण करावयास नको. ज्याअर्थी तें केलें आहे, त्याअर्थी लोपापेक्षां अगोदर आट् होतो असें सूत्रकार सुचवीत आहेत.

११. या योगविभागानें अनेकाच् इण् धातूला यणाचें विधान केलें आहे. आतां 'इणो यण्' यानेंच काम भागत आहे. तेव्हां या सूत्राचा उपयोग असा कीं ज्या ठिकाणीं इण् धातु अनेकाच् होण्याचा संभव असेल त्या ठिकाणीं अनेकाच् होतो. तोपर्यंत 'इणो यण्' या सूत्रानें यण् होत नाहीं. इण् धातु हा द्वित्वानें किंवा आट् आगमानें अनेकाच् होतो. त्यांपैकीं द्वित्वाच्या उदाहरणामध्यें द्वित्वापूर्वी यण् न होणें हें काम 'द्विर्वचनेऽचि' (१।१।२९) यानेंच साधनें. तेव्हां आट् आगमाचें पूर्वी यण् न होणें हाच त्याचा उपयोग ठरतो.

१२. आर्धधातुकसंज्ञक लुङ्, लङ्, व लृङ् हे पुढें असतांना असा अर्थ झाला म्हणजे तिप् वगैरे आदेश करण्याच्या पूर्वी लकारावस्थेमध्येंच अट् व आट् होतील.

१३. तिन्ही ठिकाणीं लकाराच्या पूर्वी आणखी एक लकार मूळांत उच्चारला आहे. त्याचा लोप (८।४।६४) झाला आहे. 'मयतेरिदन्य०' (६।४।७०) यह

ष्विति ॥ सर्वथा ऐज्यत औप्यतेति न सिध्यति । वक्ष्यत्येतदजादीनामटा सिद्धमिति ॥

**अनुनासिकलोपो हिलोपाल्लोपयोर्जभावश्च ॥ ६ ॥**

अनुनासिकलोपो हिलोपाल्लोपयोर्जभावश्च प्रयोजनम् । आगहि जहि । गतः गतवानिति । अनुनासिकलोपे कृते जभावे चातो हेरतो लोप इति च लोपः प्राप्नोति । असिद्धत्वान्न भवति ॥ अनुनासिकलोपस्तावन्न प्रयोजयति । अल्लोप उपदेश इति वर्तते । यद्युपदेश इति वर्तते धिनुतः कृणुतः अत्र न प्राप्नोति । नैष दोषः । नोपदेशग्रहणेन प्रकृतिरभिसंबध्यते । किं तर्हि ।

---

द्व्यघटित निर्देश केला आहे. त्यामुळें लकार रूपी लुङ् वगैरे पुढें असतांना असा अर्थ होईल.

आतां या तिन्ही परिहारपक्षीं ऐज्यत व औप्यत हीं रूपें साधत नाहींत.

असा दोष येतो खरा, पण ‘अजादि धातूना अडागम केल्यानें काम भागतें’ असें पुढें (६।४।७४ श्लो. वा. १) वार्तिककार सांगणार आहेत; त्यामुळेच तो दोष जाईल.[15]

(वा. ६) हि प्रत्ययाचा लोप आणि ऱ्हस्व अकाराचा लोप कर्तव्य असतांना अनुनासिकलोप असिद्ध होतो; तसेंच हि प्रत्ययाचा लोप कर्तव्य असतांना ज आदेश असिद्ध होतो. हें या सूत्राचें प्रयोजन होय. उदाहरणार्थ– आगहि, जहि, गतः, गतवान्. येथें “अनुदात्तोपदेश०” (६।४।३७) यानें अनुनासिक–लोप आणि ‘हन्तेर्जः’ (६।४।३६) यानें ज आदेश हीं कार्यें केलीं असतांना ‘हि’ या प्रत्ययाचा लोप (६।४।१०५) आणि ऱ्हस्व अकाराचा लोप (६।४।४८) हे प्रसक्त होत आहेत. पण प्रकृत सूत्रानें ज आदेश व अनुनासिकलोप हे असिद्ध असल्यामुळें ते होत नाहींत.

अनुनासिक–लोप तर असिद्ध समजण्याचा कांहीं उपयोग होत नाहीं. कारण, “अतो लोपः” येथें उपदेशग्रहणाची अनुवृत्ति येत आहे.[16]

जर उपदेशग्रहणाची अनुवृत्ति येत आहे तर धिनुतः व कृणुतः येथें अकाराचा लोप होणार नाहीं.[17]

हा दोष येत नाहीं. कारण, उपदेश या पदाशीं

---

मागील सूत्राला जोडून हें सूत्र म्हटलें म्हणजे त्या सूत्राच्या शेवटी असलेला अनुस्वार (८।३।२३) हा (हयवरट् वा. ७ प्रमाणें) हल् समजून लुङ् याच्या पूर्वींच्या लकाराचा लोप करतां येईल.

१४. यज् व वप् या धातूंहून कर्मणि लङ्, त, यक्, “वचिस्वपि०” (६।१।१५) यानें संप्रसारण, आट् आगम न “आटश्च” (६।१।९०) यानें वृद्धि हीं कार्यें झालीं आहेत. तिन्ही पक्षीं लकारावस्थेमध्यें अट् आगम होऊं लागेल; आट् होणार नाहीं. आणि, त्या अवस्थेमध्यें ते धातू अजादि नसल्यामुळें वृद्धि होणार नाहीं.

१५. आडजादीनाम् (६।४।७२) हें सूत्र करायाम नको. तर अजादि धातूंनाहि ‘लुङ्लङ्०’ या पूर्वसूत्रानें अडागमच होऊं दे. वृद्धि होण्याकरितां ‘आटश्च’ (६।१।९०) याचे ऐवजीं ‘अटश्च’ असें सूत्र करावे.

१६ तेव्हां गम् धातु उपदेशीं अकारान्त नसल्यामुळे अकाराचा लोप होत नाहीं.

१७. धिव् आणि कृव् या धातूंना नुम् आगम (७।१।१५८), पुढें लट्, तस्, ‘धिन्विकृण्व्योर च’ (३।१।८०) यानें धातूच्या वकाराला अकार आदेश, आणि पुढें ‘उ’ हा विकरण प्रत्यय झाला आहे. नंतर त्या अकाराचा लोप झाला आहे तो होणार नाहीं. कारण, हे धातू उपदेशीं अकारान्त नाहींत.

आर्धधातुकमभिसंबध्यते । आर्धधातुकोपदेशे यदकारान्तमिति ॥ जभावश्चापि न प्रयोजयति । हिलोपे योगविभागः करिष्यते । अतो हेः । तत उतश्च । उतश्च हेर्लुग्भवतीति । ततः प्रत्ययात् । प्रत्ययादित्युभयोः शेषः ॥ अथ किमर्थमनुनासिकलोपो हिलोपाल्लोपयोर्जभावश्चेत्युच्यते नानुनासिकलोपजभावावल्लोपहिलोपयोरित्येवोच्येत । संख्यातानुदेशो मा भूदिति । अनुनासिकलोपो हिलोपे प्रयोजयति । मण्डूकि ताभिरागहि । रोहिदश्व इहागहि । मरुद्भिरग्न आगहि ॥

**संप्रसारणमवर्णलोपे ॥ ७ ॥**

संप्रसारणमवर्णलोपे प्रयोजनम् । मघोनः पश्य । मघोना मघोने । संप्रसारणे कृते यस्येति लोपः प्राप्नोति । असिद्धत्वान्न

---

प्रकृतीचा संबंध करावयाचा नाहीं; तर आर्धधातुकग्रहणाचा संबंध करावयाचा आहे. त्यामुळें आर्धधातुकाच्या उपदेशकालीं जें अकारान्त असा अर्थ होतो.[18]

तसेंच ज आदेश होणें हाही असिद्ध समजण्याचा उपयोग नाहीं. कारण, हिलोपाविषयीं योगविभाग करण्यांत येईल. तो असा– प्रथम 'अतो हेः' हें सूत्र; त्याचें पुढें 'उतश्च'[19] एवढेंच सूत्र होईल. उकारान्ताहूनही पुढील हि प्रत्ययाचा लुक् होतो असा त्याचा अर्थ होईल. त्याच्या पुढें 'प्रत्ययात्' हें सूत्र 'अतो हेः' व 'उतश्च' या दोन्ही सूत्राचा शेष[20] होईल.

आता आचार्यांनीं 'अनुनासिकलोपो हिलोपाल्लोपयोर्जभावश्च' असें कशाकरितां[21] बरें म्हटलें आहे ? तसें म्हणूं नये; तर 'अनुनासिकलोपजभावावल्लोपहिलोपयोः' असें सरळच म्हणावें.

क्रमानें संबंध आहे असें मनांत येईल, तें न यावें याकरितां तसें म्हटलें आहे. कारण, अनुनासिकलोप हा एक अल्लोप कर्तव्य असतांनाच होतो असें नाहीं; तर हि या प्रत्ययाचा लोप कर्तव्य असतानाहीं तो असिद्ध समजला जातो. उदाहरणार्थ– "मण्डूकि ताभिरागहि;[22]" "रोहिदश्व इहाऽऽगहि;" "मरुद्भिरग्न आगहि".

( वा. ७ ) अकाराचा लोप कर्तव्य असतांना संप्रसारण असिद्ध होतें, हा प्रकृत सूत्राचा उपयोग आहे. उदाहरणार्थ– मघोनः,[23] मघोना, मघोने. येथें संप्रसारण केलें असतांना 'यस्ये-

---

१८. धिनुतः येथे धातूच्या वकाराला अकार आदेश आणि पुढें उ प्रत्यय हीं दोन्ही कार्यें "धिन्विकृण्व्योर च" ह्या एकाच सूत्रानें होतात. त्यामध्यें सुद्धां अकार आदेश पूर्वीं होतो आणि नंतर पुढें उ प्रत्यय होतो. कारण, सूत्रामध्यें अगोदर अ उच्चारून नंतर त्याच्या पुढें उ या प्रत्ययाचा संबंध दाखविणारा 'च' शब्द उच्चारला आहे. तेव्हां उ हा आर्धधातुक प्रत्यय करतांना त्याच्या मागें अकारान्त शब्दस्वरूप होतें; म्हणून जरी धातु अकारान्त नसला तरी लोप होण्यास हरकत नाहीं.

१९. 'असंयोगपूर्वात्' हें पद 'उतश्च' याच सूत्रांत घालावयाचें आहे.

२०. प्रत्ययात् हें सूत्र स्वतंत्र विधायक नव्हे; तर 'अतो हेः' आणि 'उतश्च०' या दोहोंचा शेष होय. तेव्हां पूर्वींच्या दोन सूत्रानी जो अकार व उकार यांच्या पुढील हि प्रत्ययाचा लुक् मागितला आहे तो ते अकार व उकार प्रत्ययाचे असतील तरच करावा असा त्याचा अर्थ होईल. तेव्हां जहि येथें प्रत्ययाचा अकार नसल्यामुळें लुक् होत नाही.

२१. ह्या वार्तिकामध्यें 'हिलोपाल्लोपयोः' हा जसा समास केला आहे तसा अनुनासिकलोप आणि जभाव यांचा समास कां केला नाहीं असें तात्पर्य.

२२. हा वैदिक प्रयोग आहे. येथें शप् प्रत्ययाचा लुक् ( २।४।७३ ) झाला आहे.

२३. मघ शब्दाहून मत्वर्थी 'छन्दसीवनिपौ च' ( ५।२।१०९ वा. २ ) या वचनानें वनिप् प्रत्यय,

भवति ॥ नैतदस्ति प्रयोजनम् । वक्ष्यत्येतन्मघवन्शब्दोऽव्युत्पन्नं प्रातिपदिकमिति ॥

**रेभाव आल्लोपे ॥ ८ ॥**

रेभाव आल्लोपे प्रयोजनम् । किं स्विद्गर्भं प्रथमं दध्र आपः । रेभावे कृत आतो लोप इटि च [ ६. ४. ६४ ] इत्याकारलोपो न प्राप्नोति । असिद्धत्वाद्भवति ॥ एतदपि नास्ति प्रयोजनम् । छन्दसो रेभावो लिट् च च्छन्दसि सार्वधातुकमपि भवति । तत्र सार्वधातुकमपिन्ङिद्भवतीति ङित्त्वं श्नाभ्यस्तयोरातः [ ६. ४. ११२ ] इत्याकारलोपो भवति ॥

यदि तर्ह्ययं योगो नारभ्यते

**उत्तु कृञः कथमोर्विनिवृत्तौ**

इह कुर्वः कुर्मः कुर्यादित्युकारलोपे कृते सार्वधातुकपर उकार इत्युत्त्वं न प्राप्नोति ॥

**णेरपि चेटि कथं विनिवृत्तिः ।**

---

ति च ’ ( ६।४।१४८ ) हा लोप प्राप्त होत आहे; पण प्रकृत सूत्रानें संप्रसारण असिद्ध असल्यामुळें तो होत नाहीं.

हेंही प्रयोजन नाहीं. कारण, मघवन् हें अव्युत्पन्न[२४] प्रातिपदिक आहे ( ४।१।७२ भाष्य, भाग ४ पृ. २९ ) असें सांगण्यांत येणार आहे.

( वा. ८ ) आकाराचा लोप कर्तव्य असतांना रे आदेश असिद्ध होतो हें प्रकृतसूत्राचें प्रजोजन होय. उदाहरणार्थ– प्रथमं दध्र आपः[२५]. येथें रे आदेश केला असतां "आतो लोप इटि च" याने अकारलोप प्राप्त होत नाहीं. रे आदेश असिद्ध असल्यामुळें तो होतो.

हेंही प्रयोजन नाहीं. कारण, रे आदेश हा वैदिक प्रयोगामध्यें होतो. आणि तेथें तर "छन्दस्युभयथा" ( ३।४।११७ ) यानें लिटाला सार्वधातुक संज्ञाही होते. तेव्हां 'सार्वधातुकमपित्' ( १।२।४ ) यानें तो रे आदेश ङित् समजला जाईल; आणि नंतर 'श्नाभ्यस्तयोरातः' ( ६।४।११२ ) यानें आकारलोप होईल.

पण जर हें सूत्र केलें नाहीं तर—

( श्लो. वा. १ ) कुर्वः, कुर्मः, कुर्यात् येथें उकाराची लोपानें ( ६।४।१०७ ) निवृत्ति झाल्यानंतर सार्वधातुक पुढें असलेला उकार[२६] पुढे असतांना कृञ् धातूच्या अकाराला सांगितलेलें उत्त्व ( ६।४।११० ) प्राप्त होत नाहीं.

तसेंच णिप्रत्ययान्त 'कृ' धातुच्या कारिष्यते या उदाहरणामध्यें इट् आगम (६।४।६२)

---

त्याहून द्वितीया बहुवचन शस् , ‘ श्वयुवमघोनाम्०, ’ ( ६।४।१३३ ) यानें संप्रसारण व आद्गुण केला असतां मघोनः इत्यादि रूपे साधतात. येथें वनिप् प्रत्ययाच्या वकाराला संप्रसारण झाल्यानंतर तो अजादि प्रत्यय होतो. म्हणून मागील 'मघ' शब्दाला भसंज्ञा होईल व अकाराचा लोप होईल.

२४. अमुक प्रकृतीला अमुक प्रत्यय लागून हे प्रातिपदिक तयार झालें अशी कल्पना ज्या प्रातिपदिकासंबंधानें नाहीं तें अव्युत्पन्न प्रातिपदिक होय.

२५. धा धातूहून लिट् प्रत्यय, झ आदेश, त्याला इरे आदेश ( ३।४।८१ ) हीं कार्यें झालीं आहेत. नंतर त्या इरे आदेशाला ‘ इरयो रे ’ ( ६।४।७६ ) यानें रे आदेश झाला आहे. तो असिद्ध असल्यामुळें हा इरे असा अजादि प्रत्ययच पुढें आहे अशा समजुतीनें आकाराचा लोप (६।४।६४) केला असतां दध्रे असें रूप होतें.

२६. ‘ अत उत्सार्व०, ’ ( ६।४।११० ) या सूत्रामध्यें ‘ उतश्च प्रत्ययाद्० ’ ( ६।४।१०६ ) या सूत्रांतून उतः याची अनुवृत्ति आहे. त्याचा सप्तम्यन्तत्वानें विपरिमाण केला आहे. उकारान्त कृ धातु अस

इह च कारयतेः कारिष्यते णेरनिटि [ ६. ४. ५१ ] इति णिलोपो न प्राप्नोति ॥

अब्रुवतस्तव योगमिमं स्यात्
लुक्चिणो नु कथं न तरस्य ॥

इह च अकारितराम् अहारितरामिति चिण उत्तरस्य तरस्य लुक्कथं न स्यात् ॥

चं भगवान्कृतवांस्तु तदर्थं
तेन भवेदिटि णेर्विनिवृत्तिः ।

इह स्यसिच्सीयुट्तासिषु भावकर्मणो रुपदेशेऽज्झनग्रहदृशां वा चिण्वदिट् च [ ६. ४. ६२ ] । किं च । णिलोपश्च ॥

म्वोरपि ये च तथाप्यनुवृत्तौ

इहापि कुर्वः कुर्मः कुर्यादिति म्वोर्ये चेत्येतदप्यनुवर्तिष्यते ॥

चिण्लुकि च क्ङित एव हि लुक्स्यात् ॥

चिण्लुक्यपि प्रकृतं क्ङिद्ग्रहणमनु-

---

झाल्यानंतर 'णेरनिटि' ( ६।४।१११ ) यानें णिलोप प्राप्त होत नाहीं.[२६]

तसेंच, हें सूत्र न करणाऱ्या तुझ्या मतीं 'अकारितराम्'[२८] व 'अहारितराम्' येथें चिण् प्रत्ययाहून पुढील अशा 'तर' प्रत्ययाचा लुक् ( ६।४।१०४ ) कां बरें होणार नाहीं ?

( श्लो. वा. २ ) 'स्यसिच्सीयुट्०' ( ६।४।६२ ) ह्या सूत्रामध्यें भगवान् सूत्रकारांनीं णिलोपाकरितां इट् शब्दाच्या पुढें च शब्द घातला आहे; त्यामुळें इट् आगम केल्यानंतर णि प्रत्ययाची निवृत्ति होईल. 'इट् च' याचा अर्थ इट् आगम होतो आणि दुसरें कांहीं तरी होतें असा आहे. आतां तें दुसरें कोणतें तर णिलोप होय.

तसेंच 'म्वोः' आणि 'ये च' या दोन्ही पदांची अनुवृत्ति 'अत उत्०' ( ६।४।११० ) येथें केली असतां[२९] कुर्वः, कुर्मः व कुर्यात् येथें उत्व होईल.

'चिणो लुक्' येथें मागून क्ङित् ग्रहण अनुवृत्तीनें येत आहे.

---

अन्वय संभवत नाही, कारण, कृ धातु उकारान्त नाहीं, या आशयानें उकार पुढें असतांना असें म्हटलें आहे. कुर्वः व कुर्मः येथे कृ धातूहून लट्, वस् व मस्, उ प्रत्यय ( ३।१।७९ ), गुण, 'नित्यं करोतेः' ( ६।४।१०८ ) यानें उकारलोप, व 'अत उत्सार्वधातुके' यानें उत्व हीं कार्यें झालीं आहेत. कुर्यात् येथें "ये च" ( ६।४।१०९ ) यानें उकारलोप झाला आहे.

२७. प्रकृत सूत्र केले असतां 'स्यसिच्०' या सूत्रानें झालेला इट् आगम असिद्ध असल्यामुळें णिलोप होतो आणि कारिष्यते असें रूप तयार होतें.

२८. अकारितराम् येथें 'कृ' धातूहून कर्मणि लुङ्, त, च्लि, चिण्, अट् आगम, वृद्धि, त या प्रत्ययाचा 'चिणो लुक्' यानें लुक्, 'तिङश्च' ( ५।३।५६ ) यानें तरप्, तदन्ताहून आम् ( ५।४।११ ) हीं कार्यें होतात. चिणाहून पुढील प्रत्ययाचा लुक् होतो एवढाच सूत्राचा अर्थ आहे. 'त शब्दाचा' हें म्हणणें असिद्धवत्सूत्रामुळें फलित होतें. येथें 'चिणो लुक्' या सूत्रानें तर प्रत्ययाचा लुक् कर्तव्य असतांना त्याच सूत्रानें पूर्वी केलेला 'त' या प्रत्ययाचा लुक् प्रकृत सूत्रानें असिद्ध आहे. म्हणून 'तर' या प्रत्ययाचा लुक् होत नाहीं.

२९. 'लोपश्चास्यान्य०' ( ६।४।१०७ ) येथून 'म्वोः' या पदाची आणि 'ये च' ( ६।४।१०९ ) येथून 'ये' या पदाची 'अत उत्सार्व०' (६।४।११०) येथें अनुवृत्ति करून वाक्यभेदानें मकारादि, वकारादि व यकारादि सार्वधातुक पुढें असतांना कृञ् धातूच्या अकाराला उत्व होतें असा स्वतंत्र अर्थ केला असतां कुर्वः, कुर्मः, कुर्यात्, येथें असिद्धवत् सूत्रावांचूनच उत्व होईल.

३०. चिण् प्रत्ययाच्या पुढील कित् अथवा ङित् प्रत्ययाचा लुक् होतो असा अर्थ झाल्यामुळें 'तर' प्रत्ययाचा लुक् होत नाहीं. सबब, असिद्धवत्सूत्राचें हेंही प्रयोजन नाहीं.

वर्तते । क्व प्रकृतम् । गमहनजनखनघसां लोपः क्ङित्यनङि [ ६. ४. ९८ ] इति । तद्वै सप्तमीनिर्दिष्टं षष्ठीनिर्दिष्टेन चेहार्थः । चिण इत्येषा पञ्चमी क्ङितीति सप्तम्याः षष्ठीं प्रकल्पयिष्यति तस्मादित्युत्तरस्य [ १. १. ६७ ] इति ॥

उत्तु कृञः कथमोर्विनिवृत्तौ
णेरपि चेटि कथं विनिवृत्तिः ।
अब्रुवतस्तत्र योगमिमं स्यात्
लुक् च चिणो नु कथं न तरस्य ॥
चं भगवान्कृतवांस्तु तदर्थं
तेन भवेदिटि णेर्विनिवृत्तिः ।
म्वोरपि ये च तथाप्यनुवृत्तौ
चिण्लुकि च क्ङित एव हि लुक्स्यात् ॥

आरभ्यमाणेऽप्येतस्मिन्योगे

सिद्धं वसुसंप्रसारणमज्विधौ ॥ ९ ॥

वसोः संप्रसारणमज्विधौ सिद्धं वक्तव्यम् । किं प्रयोजनम् । पपुषः पश्य । तस्थुषः पश्य । निन्युषः पश्य । चिच्युषः पश्य । लुलुवुषः पश्य । पुपुवुषः पश्येति । वसोः संप्रसारणे कृते ऽचीत्याकारलोपादीनि यथा स्युरिति । किं पुनः कारणं न सिध्यन्ति ।

बहिरङ्गलक्षणत्वादसिद्धत्वाच्च ॥१०॥

बहिरङ्गलक्षणं चैव हि वसुसंप्रसारणमसिद्धं च ॥

---

तें क्ङित् ग्रहण मागें कोठें बरें आहे ?

' गमहनजनखनघसाम्० ' ( ६।४।९८ ) येथें आहे.

पण तें तेथें ' क्ङिति ' असें सप्तमी विभक्तीनें निर्दिष्ट आहे. आणि येथें तर षष्ठी विभक्तीनें निर्दिष्ट ' क्ङितः' असें पाहिजे.

चिणः ही पंचमी क्ङिति या सप्तमीला 'तस्मादित्यु० ' (१।१।६७) या परिभाषेच्या साहाय्यानें षष्ठीची कल्पना करतां येईल.

आतां हें सूत्र केलें असतांनाही—

( वा. ९ ) ' वसोः संप्रसारणम् ' ( ६।४।१३१ ) यानें सांगितलेलें संप्रसारण अचाच्या निमित्तानें होणारें कार्य कर्तव्य असतांना सिद्ध होतें असें वचन केले पाहिजे.

काय प्रयोजन ?

पपुषः पश्य, तस्थुषः पश्य, निन्युषः पश्य, चिच्युषः पश्य, लुलुवुषः पश्य, पुपुवुषः पश्य या ठिकाणीं संप्रसारण केलें असतांना त्या अचाला मानून आकारलोप यण् वगैरे कार्यें होतात हें प्रयोजन होय.[३१]

पण पपुषः वगैरे उदाहरणांमध्यें हीं कार्यें कां बरें साधत नाहींत ?

( वा. १० ) ' वसोः संप्रसारणम् ' यानें केलेलें संप्रसारण बहिरंग आहे आणि आभीय असल्यामुळें असिद्धही आहे म्हणून[३२] साधत नाहींत.

---

३१. 'पा' व ' स्था ' या धातूंहून लिट् त्याला क्वसु आदेश (३।२।१०७), द्वित्व, वगैरे कार्यें झाल्यानंतर पपावस् या प्रातिपदिकाहून द्वितीया बहुवचन शस् केला आहे. नंतर 'वसोः संप्रसारण०' ( ६।४।१३१ ) यानें वस् यांतील वकाराला संप्रसारण झाल्यानंतर उस् हा अजादि प्रत्यय आहे म्हणून पा आणि स्था या धातूंच्या आकाराचा लोप ( ६।४।८४ ) होतो, नी, व चि या धातूंच्या इकाराला यण् ( ६।४।८२ ) होतो, आणि लू व पू या धातूंच्या उकाराला उवङ् ( ६।४।७७ ) होतो. संप्रसारण हें प्रकृत सूत्रानें असिद्ध समजलें तर आकाराचा लोप यण् आणि उवङ् हीं कार्यें होणार नाहींत.

३२. आकाराचा लोप वगैरे कार्यांना शस् प्रत्ययाची जरूर नाहीं. म्हणून तीं कार्यें अंतरंग होत. आणि शस् प्रत्ययाला मानून होणारें संप्रसारण हें बहिरंग होय. तेव्हां ' अंतरंग कर्तव्य असतांना बहिरंग असिद्ध समजावें ' या परिभाषेनें तें असिद्ध होईल व प्रकृत सूत्रानेंही तें असिद्ध होईल.

**आत्त्वं यलोपाल्लोपयोः पशुषो न वाजान् चाखायिता चाखायितुम् ॥११॥**

आत्त्वं यलोपाल्लोपयोः सिद्धं वक्तव्यम् । किं प्रयोजनम् । पशुषो न वाजान् । पशुष इत्यात्त्वस्यासिद्धत्वादातो धातोः [ ६. ४. १४० ] इत्याकारलोपो न प्राप्नोति । चाखायिता चाखायितुमित्यात्त्वस्यासिद्धत्वाद्यस्य हलः [ ६. ४. ४९ ] इति यलोपः प्राप्नोति ॥

**समानाश्रयवचनात्सिद्धम् ॥ १२ ॥**

समानाश्रयमसिद्धं भवति व्याश्रयं चैतत् । इह तावत्पपुषः पश्य तस्थुषः पश्य निन्युषः पश्य चिच्युषः पश्य लुलुवुषः पश्य पुपुवुषः पश्येति वसावाकारलोपादीनि वस्वन्तस्य विभक्तौ संप्रसारणम् । पशुष इति विट्यात्त्वं विडन्तस्य विभक्तावाकारलोपः । चाखायिता चाखायितुमिति यङ्यात्त्वं यङन्तस्य चार्धधातुके लोप इति ॥ किं वक्तव्यमेतम् । न हि । कथमनुच्यमानं गंस्यते । अत्रग्रहणसामर्थ्यात् ॥ ननु

---

(वा. ११) यलोप व आल्लोप कर्तव्य असतांना आत्व सिद्ध होतें असें वचन केलें पाहिजे.

काय प्रयोजन ?

पशुषो[३३] न वाजान्. 'पशुषः' येथें आत्व (६।४।४१) असिद्ध असल्यामुळें 'आतो धातोः' (६।४।१४०) यानें आकारलोप होणार नाहीं. तसेंच चाखायिता[३४] व चाखायितुम् येथें आत्व (६।४।४३) असिद्ध असल्यामुळें 'यस्य हलः' (६।४।४९) यानें यलोप होऊं लागेल.

(वा. १२) समानाश्रय आभीय शास्त्र असिद्ध होतें आणि प्रकृत कार्यें तर विभिन्नाश्रय आहेत[३५]. उदाहरणार्थ– 'पपुषः पश्य', 'तस्थुषः पश्य', 'निन्युषः पश्य', 'चिच्युषः पश्य', 'पुपुवुषः पश्य', 'लुलुवुषः पश्य'. येथें वसु प्रत्यय पुढें असतांना आकारलोप वगैरे कार्यें होतात; आणि विभक्ति पुढें असतांना वस्वन्ताला संप्रसारण होतें. तसेंच पशुषः येथें विट् प्रत्यय पुढें असताना आत्व होतें आणि विट्–प्रत्ययान्ताला विभक्ति पुढें असतांना आकारलोप होतो. तसेंच, चाखायिता व चाखायितुम् येथें यङ् पुढें असतांना आत्व होतें आणि यङन्त धातूहून आर्धधातुक प्रत्यय केल्यानंतर यकाराचा लोप होणार आहे.

मग काय ह्या सूत्रामध्यें 'समानाश्रय' असें म्हटलें पाहिजे ना ?

तसें म्हणावयास नको.

तसें म्हटलें नाहीं तर समानाश्रय हा अर्थ झाली आहे.

---

३३. पशुशब्दपूर्वक 'सन्' धातूहून विट् प्रत्यय (३।२।६७), नकाराला आत्व, पुढें शस् प्रत्यय, नंतर 'आतो धातोः' (६।४।१४०) यानें आकारलोप व सनोतेरनः' (८।३।१०८) यानें षत्व होऊन 'पशुषः' हें रूप तयार होतें.

३४. खन् धातूहून 'धातोरेकाचो०' (३।१।२२) यानें यङ्, 'ये विभाषा' (६।४।४३) यानें आत्व, द्वित्व वगैरे कार्यें झाल्यानंतर 'चाखाय' या यङन्त धातूहून तृच् किंवा तुमुन् प्रत्यय, आणि त्याला इट् आगम व अकाराचा लोप (६।४।४८) अशीं कार्यें

३५. आभीय शास्त्र कर्तव्य असतांना आभीय शास्त्र असिद्ध होतें; पण त्या दोन्ही आभीय शास्त्रांचा आश्रय एक असला पाहिजे. पपुषः वगैरे उदाहरणांमध्यें आकारलोप वगैरे कार्यांना कारण असलेला प्रकृतिप्रत्ययसमुदाय आणि संप्रसारणाला कारण असलेला प्रकृतिप्रत्ययसमुदाय हे दोन्ही समान नाहींत; तर, कमज्यास्त आहेत म्हणून हीं आभीय शास्त्रें व्याश्रय असल्यामुळें त्यांविषयीं आभीयासिद्धत्वसूत्र प्रवृत्त होत नाहीं.

चान्यदत्रग्रहणस्य प्रयोजनमुक्तम् । किमुक्तम् । अत्रग्रहणं विषयार्थमिति । अधिकारादप्येतत्सिद्धम् ॥

इह पपुषः चिच्युषः लुलुवुषः द्वौ हेतू व्यपदिष्टौ बहिरङ्गलक्षणत्वं चासिद्धत्वं चेति । तत्र भवेदसिद्धत्वं प्रत्युक्तं बहिरङ्गलक्षणं तु नैव प्रत्युक्तम् । नैष दोषः । बहिरङ्गमन्तरङ्गमिति च प्रतिद्वन्द्विभाविनावेतावर्थौ । कथम् । सत्यन्तरङ्गे बहिरङ्गं सति च बहिरङ्गेऽन्तरङ्गम् । न चात्रान्तरङ्गबहिरङ्ग-

---

कसा मनांत येईल ?

येथें ' अत्र ' हा शब्द घातला आहे त्यावरून मनांत येईल.

पण अत्र शब्दाचा उपयोग पूर्वीं निराळाच दाखविला आहे ना ?

तो कोणता ?

' अत्रग्रहणं विषयार्थम् ' (वा. २) असा दाखविला आहे.

असिद्धवदत्राभात् ' हा अधिकार[३६] समजल्यानेंही हें अत्रग्रहणाचें प्रयोजन सिद्ध होत आहे.

आतां पपुषः, चिच्युषः, लुलुवुषः येथें संप्रसारण केलें असतांना आकाराचा लोप वगैरे कार्यें प्राप्त होत नाहींत याबद्दल दोन हेतू दाखविले आहेत. एक बहिरंगामुळें असिद्धत्व व दुसरें आभीयासिद्धत्व. त्यांत आभीयासिद्धत्वाचें निराकरण झालें पण बहिरंगामुळें आलेल्या असिद्धत्वाचें निराकरण केलें नाहीं.[३७]

हा दोष येत नाहीं. कारण बहिरंग आणि अंतरंग हे दोन अर्थ परस्परसापेक्ष[३८] आहेत.

ते कसे ?

अंतरंग असेल तर त्याच्यामुळें बहिरंगाला

---

३६. असिद्धवदत्राऽऽभात् हें स्वतंत्र सूत्र आहे. येथें असिद्धवत् याचें उद्देश्य ' आभात् ' हें आहे. म्हणजे, आभीय शास्त्र असिद्ध होतें; तें केव्हां असिद्ध होतें तो विषय ' अत्र ' या शब्दानें दाखविला आहे. अत्र या 'इदं'–शब्दानें आभीय शास्त्राचा परामर्श केला आहे. तेव्हां ' आभीय शास्त्र कर्तव्य असतांना आभीय शास्त्र असिद्ध होतें ' असा अर्थ होतो. हें मनांत घेऊन पूर्वीं वार्तिककारांनीं ' अत्रग्रहणं विषयार्थम् ' (वा.२) असें म्हटलें आहे. आतां येथें भाष्यकारांनीं ' असिद्धवदत्राभात् ' हें अधिकारसूत्र आहे असें गृहीत धरलें आहे. त्यामुळें याचा स्वदेशीं वाक्यार्थ नाहीं. असिद्धवत् अत्र आणि आभात् या तिन्ही पदांचा पुढील सूत्रांमध्यें संबंध होऊन प्रत्येक सूत्रामध्यें निराळा वाक्यार्थ होतो. उदा०– ' हन्तेर्जः ' सूत्र घ्या. हि पुढें असतांना हन् धातूला ' ज ' आदेश होतो असा त्याचा अर्थ झाल्यानंतर दुसरा वाक्यार्थ तेथेंच करावयाचा. तो असा– असिद्धवत् याचें उद्देश्य 'ज' हा आदेश होय; आभात् यानें त्याचा विषय दाखविला आहे, आभात् म्हणजे आभीयशास्त्र कर्तव्य असतांना; त्या आभीय शास्त्राकडे ' अत्र ' याचा संबंध आहे; अत्र यांतील इदम् शब्दानें ज आदेशाच्या उद्देश्याचा म्हणजे हि पुढें असतांना हन् धातूचा परामर्श केला आहे. एकंदर अर्थ असा होतो कीं, हि प्रत्यय पुढें असतांना हन् धातूला ' ज ' हा आदेश होतो , आणि हि प्रत्यय पुढें असतांना जो हन् धातु त्याचे आश्रयानें प्राप्त झालेलें आभीय शास्त्र कर्तव्य असतांना तो ' ज ' हा आदेश असिद्ध होतो.

३७. अर्थात् समानाश्रय आभीय कार्य कर्तव्य असतांना समानाश्रय आभीय कार्य असिद्ध होतें असा अत्र ग्रहणावरून अर्थ होतो; त्यामुळें प्रकृत सूत्रानें संप्रसारण असिद्ध होत नाहीं; तरी पण तें संप्रसारण बहिरंग असल्यामुळें असिद्ध होणारच. तेव्हां दोष कायमच राहतो.

३८. उदाहरणार्थ— पिता व पुत्र. पिता असेल तर पुत्र, आणि पुत्र असेल तर पिता. हे दोन परस्परांवर अवलंबूनच आहेत; घट किंवा पट यांप्रमाणें स्वभावसिद्ध नव्हेत. तसेंच हें होय.

योर्युगपत्समवस्थानमस्ति । नानभिनिर्वृत्ते बहिरङ्गे ऽन्तरङ्गं प्राप्नोति । तत्र निमित्तमेव बहिरङ्गमन्तरङ्गस्य ॥

## ऱ्हस्वयलोपाल्लोपाश्चायादेशे ल्यपि ॥ १३ ॥

ह्रस्वयलोपाल्लोपाश्चायादेशे ल्यपि सिद्धा वक्तव्याः । प्रशमय्य गतः प्रतमय्य गतः । प्रबेभिदय्य गतः प्रचेच्छिदय्य गतः । प्रस्तनय्य गतः प्रगदय्य गतः । ह्रस्वयलोपाल्लोपानामसिद्धत्वाल्ल्यपि लघुपूर्वात् [ ६. ४. ५६ ] इत्ययादेशो न प्राप्नोति ॥ अत्राप्येष परिहारः समानाश्रयवचनात्सिद्धमिति । कथम् । णावेते विधयो णेर्ल्यप्ययादेशः ॥

## वुग्युटावुवङ्यणोः ॥ १४ ॥

बहिरंग असें म्हणतां येतें; आणि बहिरंग असेल तर त्याच्यामुळें अंतरंगाला अंतरंग असें म्हणतां येतें. आतां 'पपुषः' इत्यादि उदाहरणांमध्यें पहावें तर अंतरंग व बहिरंग यांची बरोबर प्राप्तीच येत नाहीं. कारण बहिरंग केल्यावाचून अंतरंग प्राप्त होत नाहीं. उलट येथें बहिरंग हें अंतरंगाला उपजीव्यच होत[३९] आहे.

( वा. १३ ) ऱ्हस्व, यलोप आणि अल्लोप हे ल्यप्-निमित्तक अयादेश कर्तव्य असतांना सिद्ध होतात, असें वचन करावें. उदाहरणार्थ-प्रशमय्य[४०], प्रतमय्य, प्रबेभिदय्य, प्रचेच्छिदय्य, प्रस्तनय्य, प्रगदय्य गतः. येथें ह्रस्व, यलोप आणि अल्लोप हे प्रकृत सूत्रानें असिद्ध असल्यामुळें 'ल्यपि लघुपूर्वात्' ( ६।४।५६ ) यानें अय् आदेश होणार नाहीं.

येथेंही 'समानाश्रयवचनात्सिद्धम्' हा परिहार समजावा.

तो कसा ?

णि पुढें असतांना ऱ्हस्व वगैरे कार्यें होतात, आणि 'णि'ला ल्यप् पुढें असतांना अय् आदेश होतो; तेव्हां त्यांचा आश्रय एक नाहीं.

---

३९. एकंदरीत, अंतरंग आणि बहिरंग या दोन शास्त्रांची बरोबर प्राप्ति नसल्यामुळें येथें अंतरंग-परिभाषा प्रवृत्त होत नाहीं असें सिद्ध होतें. आतां अंतरंग कर्तव्य असतांना पूर्वी झालेलें बहिरंग असिद्ध होतें अशा अर्थानें ही परिभाषा प्रवृत्त झाली असतांना दोष येतो खरा, पण तशा अर्थाची परिभाषा 'वाह ऊठ्' ( ६।४।१३२ ) येथें ज्ञापित होते, म्हणून ती आभीय आहे. तेव्हां तिच्या दृष्टीनें आकाराचा लोप वगैरे अंतरंग शास्त्रेंच प्रकृत सूत्रानें असिद्ध होतात. म्हणून तशा अर्थाची परिभाषा येथें प्रवृत्त होत नाहीं.

४०. शम् आणि तम् या धातूंहून णिच् , उपधावृद्धि, व 'मितां ऱ्हस्वः' ( ६।४।९२ ) यानें ऱ्हस्व हीं कार्यें झालीं आहेत. बेभिद्य आणि चेच्छिद्य या यङन्त धातूंहून णिच्, यङाच्या अकाराचा लोप ( ६।४।४९ ) आणि यकाराचा लोप ( ६।४।४८ ) हीं कार्यें झालीं आहेत. तसेंच स्तन या अकारान्त धातूहून णिच् प्रत्यय (३।१।२५) व अकाराचा लोप ( ६।४।४८ ) हीं कार्यें झालीं आहेत. ह्या सर्व ठिकाणीं णिच्-प्रत्ययान्त धातूहून क्त्वा प्रत्यय ( ३।४।२१ ), त्याच्याशीं प्र या उपसर्गाचा समास, नंतर क्त्वाचे स्थानीं ल्यप् (७।१।३७) होऊन णि प्रत्ययाला अय् आदेश ( ६।४।५६ ) झाला आहे. येथें ऱ्हस्व, यलोप आणि अकाराचा लोप हे प्रकृत सूत्रानें असिद्ध होत असल्यामुळें अय् आदेश होणार नाहीं. कारण, लघु अच् पूर्वी असलेल्या अशा व्यंजनापुढें अव्यवहित णिच् असेल तर अय् आदेश होत असतो. प्रशमय्य येथे ऱ्हस्व असिद्ध असल्यामुळें मकाराच्या मागें लघु अच् नाहीं. प्रबेभिदय्य येथें यलोप असिद्ध असल्यामुळें इकाराला गुरु संज्ञा ( १।४।११ ) होते म्हणून दकाराच्या मागें लघु नाहीं व प्रस्तनय्य येथें अल्लोप असिद्ध असल्यामुळें नकाराहून अव्यवहित णिच् घडत नाहीं.

वुग्युटावुवङ्यणोः सिद्धौ वक्तव्यौ । बभूवतुः बभूवुः । वुकोऽसिद्धत्वादुवङादेशः प्राप्नोति । उपदिदीये उपदिदीयाते । युटोऽसिद्धत्वाद्यणादेशः प्राप्नोति ॥ वुकस्तावन्न वक्तव्यम् । वुकं न वक्ष्यामि । एवं वक्ष्यामि भुवो लुङ्लिटोरूदुपधाया इति । अत्रोवङादेशे कृते योपधा तस्या ऊत्त्वं भविष्यति ॥ एवमपि कुतो नु खल्वेतदुवङादेशे कृते योपधा तस्या ऊत्त्वं भविष्यति न पुनः सांप्रतिकी योपधा तस्याः स्याद्भकारस्येति । नैष दोषः । ओरिति वर्तते तेनोवर्णस्य भविष्यति ॥ भवेत्सिद्धं बभूवतुः बभूवुः इदं तु न सिध्यति बभूव बभूविथेति । किं कारणम् । गुणवृद्ध्योः कृतयोरुवर्णाभावात् । नात्र गुणवृद्धी प्राप्नुतः । किं कारणम् । क्ङिति च [ १. १. ५ ] इति प्रतिषेधात् । कथं कित्त्वम् । इन्धिभवतिभ्यां च [ १. २. ६ ] इति । तद्वै वयं कित्त्वं प्रत्याचक्ष्महे वुका । इह तु कित्त्वेन वुक्प्रत्याख्यायते । किं पुनरत्र न्याय्यम् । वुग्वचनमेव

---

( वा. १४) 'उवङ् व यण् कर्तव्य असतांना अनुक्रमें वुक् व युट् हे सिद्ध होतात' असें वचन करावें. उदाहरणार्थ बभूवतुः बभूवुः.[४१] येथें वुक् आगम ( ६।४।८८ ) असिद्ध असल्यामुळें उवङ् ( ६।४।७७ ) होऊं लागेल. तसेंच, उपदिदीये[४२] व उपदिदीयाते येथें युट् आगम ( ६।४। ६३ ) असिद्ध असल्यामुळें यण् ( ६।४।८२ ) होऊं लागेल.

वुक् आगम सिद्ध आहे असें तर सांगावयास नकोच. कारण, वुक् आगमाचें विधानच करावयाचें नाहीं. 'भुवो लुङ्लिटोरूदुपधायाः' असें सूत्र करावें. तेव्हां, उवङादेश केला असतां जी उपधा तिला ऊकार आदेश होईल.

पण उवङ् केला असतांना उकाररूपी उपधेला ऊकार आदेश होईल, आणि उवङ् करण्याचे पूर्वी जी भकाररूपी उपधा तिला होणार नाहीं हें कशावरून ?

हा दोष येत नाहीं. कारण, 'ओः सुपि' ( ६।४।८३ ) येथून 'ओः' या पदाची अनुवृत्ति येत आहे. त्यामुळें उकाररूपी उपधेला ऊकार आदेश होईल.

अशा रीतीनें बभूवतुः व बभूवुः हीं रूपें साधतील; पण बभूव व बभूविथ हीं रूपें साधणार नाहींत.

काय कारण?

कारण असें कीं तेथें उवङाचा बाध करून गुण व वृद्धि केलीं असतांना उवर्णच असत नाहीं.

पण तेथें गुण व वृद्धि होऊं शकत नाहींत.

काय कारण ?

कारण असें कीं 'क्ङिति च' हा त्यांचा प्रतिषेध आहे.

पण येथें लिटाला कित्त्व कशानें ?

'इन्धिभवतिभ्यां च' (१।२।६) या सूत्रानें.

पण त्या कित्वाचें आम्ही वुक् आगमाच्या योगानें प्रत्याख्यान करीत[४३] आहों; आणि प्रकृत स्थळीं तर 'इन्धिभव०' (१।२।६) या कित्त्वाच्या योगानें वुक् आगमाचें प्रत्याख्यान केलें जात आहे.

मग यांत न्याय्य तरी कोणतें ?

वुक् आगम सांगणें हेंच न्याय्य होय. कारण 'इन्धिभवति०' ( १।२।६ ) हें कित्ववचन

---

४१. भू धातूचीं लिट् प्रथमपुरुष द्विवचन व बहुवचनाचीं हीं रूपें आहेत.

४२. 'दीङ् क्षये' या धातूचें आत्मनेपद प्रथमपुरुष एकवचनाचें हें रूप आहे.

४३. कारण, गुण व वृद्धि यांचा वुक् आगमानेंच बाध होत आहे.

न्याय्यम् । सत्यपि हि किच्त्वे स्यातामेवात्र गुणवृद्धी । किं कारणम् । इग्लक्षणयोर्गुणवृद्ध्योः स प्रतिषेधो न चैषेग्लक्षणा वृद्धिः ॥ एवं तर्हि नार्थो वुका नापि कित्त्वेन । स्तामत्र गुणवृद्धी गुणवृद्ध्योः कृतयोरवावोश्च कृतयोर्योपधा तस्या ऊत्त्वं भविष्यति । कथम् । ओरित्यत्रावर्णमपि प्रतिनिर्दिश्यते । इहापि तर्हि प्राप्नोति । कीलालपः पश्य । शुभंयः पश्येति । लोपोऽत्र बाधको भविष्यति । इह तर्हि प्राप्नोति । कीलालपौ कीलालपा इति । एवं तर्हि व्योरिति वर्तते तेनोवर्णं विशेषयिष्यामः । ओर्व्योरिति । इहेदानीमोरित्यनुवर्तते व्योरिति निवृत्तम् ॥ युटश्चापि न

---

असलें तरीही येथें गुण व वृद्धि[४४] होतीलच.

काय कारण ?

कारण असें कीं 'क्ङिति च' ( १।१।६ ) हा इग्लक्षण अशा गुणवृद्धींचा निषेध आहे. आणि बभूव येथें प्राप्त झालेली ' अचो ञ्णिति ' (७।२।११५) ही वृद्धि तर इग्लक्षण नाहीं.[४५]

असे आहे तर मग वुक् आगमाचें विधान करण्यांतही अर्थ नाहीं, आणि किद्वचन करण्यांतहीं अर्थ नाहीं. बभूव आणि बभूविथ येथें गुण व वृद्धि होवोत; ते झाल्यानंतर त्यांना अव् आणि आव् आदेशही केले असता जी अकाररूपी उपधा जिला ऊकार आदेश होईल.

तो कसा ?

ओः येथें अवर्णाचाही निर्देश केला आहे म्हणून.[४६]

जर ओः येथें अकाराचाही निर्देश आहे तर कीलालपः पश्य, शुभंयः पश्य येथेंही ' ओः सुपि ' (६।४।८३) यानें आकाराला यण् होऊं लागेल.

पण येथें ' आतो धातोः ' ( ६।४।१४० ) हा लोप परत्वास्तव यणाचा बाध करील.

तर मग कीलालपौ व कीलालपाः येथें यण् होऊं लागेल.

असें आहे तर मग ' अचिश्नु० ' (६।४।७७ ) येथून [४७]य्वोः या पदाची अनुवृत्ति येत आहे. त्या य्वोः या शब्दाचा ओः या शब्दाकडे संबंध करूं. तो असा— य्वोः ओः इति. म्हणजे, उकार किंवा इकाररूपी जो अकार किंवा उकार त्याला यण् होतो अजादि सुप् पुढें असतांना असा अर्थ होईल. आणि अकाराला यण् होणार नाहीं. ' भुवो वुङ्लिटोरूदुपधायाः' येथें मात्र फक्त ओः या पदाचीच अनुवृत्ति आहे, आणि य्वोः या पदाची निवृत्ति आहे असें समजावें.[४८] युट् आगमालाही सिद्धत्व सांगावयास नको. कारण, दिदीये येथें युट केल्या-

---

४४. येथें गुण व वृद्धि होतीलच, असे जरी म्हटले आहे तरी फक्त वृद्धीविषयीच तात्पर्य आहे.

४५. ' इको गुणवृद्धी ' ( १।१।३ ) या परिभाषेनें इकः असें षष्ठ्यन्त पद उपस्थित होऊन ज्या गुणवृद्धीचें विधान केलें जातें ते गुण व वृद्धि हे इग्लक्षण होत. ' अचो ञ्णिति ' ( ७।२।११५ ) येथें स्थानीचा निर्देश असल्यामुळें इक् हें पद उपस्थित होत नाहीं. तेव्हां बभूव येथें त्या वृद्धीचा निषेध नसल्यामुळे तो वृद्धि झाली असतां उपधाभूत उकार नाहीं. म्हणून ऊत्त्व होणार नाहीं. तेव्हां, वुक् आगमाचें विधान केलेंच पाहिजे.

४६. ओः ही षष्ठी उ या वर्णाची आहे असें समजूं नये. तर, येथें अकार आणि उकार यांचा 'आद् गुणः' यानें गुण करून त्या ओ या वर्णाची ओः ही षष्ठी आहे. तेव्हां अकार व उकार यांचे स्थानीं असा ओः या षष्ठ्यन्ताचा अर्थ होतो.

४७. य्वोः या पदाची अनुवृत्ति येत आहे. तीच येथें य्वोः या पदानें घ्यावयाची आहे.

४८. तेव्हां लुङ् व लिट् यांसंबंधीं अच् पुढें असताना भू धातूच्या उपधेला जो अकार किंवा उकार त्याचे स्थानीं ऊकार होतो असा त्या सूत्राचा अर्थ होतो;

वक्तव्यम् । युड्वचनसामर्थ्यान्न भविष्यति । अस्त्यन्यद्युड्वचने प्रयोजनम् । किम् । द्वयोर्यकारयोः श्रवणं यथा स्यात् । न व्यञ्जनपरस्यानेकस्यैकस्य वा यकारस्य श्रवणं प्रति विशेषोऽस्ति ॥

किं पुनः प्राग्भादसिद्धत्वमाहोस्वित्सह तेन । कुतः पुनरयं संदेहः । आङयं निर्देशः क्रियत आङ्च पुनः संदेहं जनयति । तद्यथा । आ पाटलिपुत्राद् वृष्टो देव इति संदेहः किं प्राक्पाटलिपुत्रात्सह तेनेति । एवमिहापि संदेहः प्राग्भात्सह तेनेति । कश्चात्र विशेषः ।

**प्राग्भादिति चेच्छुनामघोनाभूगुणेषूपसंख्यानम् ॥ १५ ॥**

प्राग्भादिति चेच्छुनामघोनाभूगुणेषूपसंख्यानं कर्तव्यम् । शुनः पश्य । शुना

नंतर त्याच्या असिद्धत्वास्तव जर यण् होईल तर युट् आगमाचें विधान व्यर्थ होईल. त्या जोरावर युट् आगम केल्यानंतर यण् होणार नाहीं.

पण युट् आगमाचें विधान करण्याचें दुसरें प्रयोजन आहे.

तें कोणतें ?

दिदीये येथें दोन यकारांचें श्रवण व्हावें हें होय.

व्यंजनाहून पर अशा एक किंवा अनेक यकारांचें श्रवणांत कांहीं फरक दिसत नाहीं.

आतां येथें आभीय पदानें जीं यापुढील शास्त्रें घ्यावयाचीं तीं काय भस्य ( ६।४।१२९ ) या अधिकाराच्या पूर्वींचीं घ्यावयाचीं किंवा हा अधिकार संपेपर्यंतचीं घ्यावयाचीं ?

पण काय म्हणून बरें हा संशय येत आहे ?

' आङ् ' शब्द घालून हा प्रस्तुत सूत्रामध्यें निर्देश केला आहे; आणि तो आङ् तर[४९] संशय उत्पन्न करीत आहे. उदाहरणार्थ– 'आ पाटलिपुत्रात् वृष्टो देवः' असें म्हटले असतां पाटलिपुत्राच्या अलीकडील प्रदेशांत पर्जन्य पडला कीं पाटलिपुत्रांतसुद्धां पडला असा संशय येतो; त्याप्रमाणें येथेंही ' भस्य ' या अधिकाराच्या पूर्वींचींच शास्त्रें असिद्ध होतात किंवा त्या अधिकारांतील शास्त्रें सुद्धां असिद्ध होतात असा संशय येतो.

यांत काय बरें फरक होत आहे ?

( वा. १५ ) ' भस्य ' या अधिकाराच्या पूर्वींचींच शास्त्रे आभीय पदानें घ्यावयाचीं असें गृहीत धरलें तर शुना मघोना आणि भुगुण यांविषयीं असिद्ध होण्याबद्दल निराळें वचन करावयास पाहिजे. उदाहरणार्थ– शुनः[५०], शुना, शुने- येथें ' श्वयुव० ' ( ६।४।१३३ ) यानें संप्रसा-

म्हणून गुण व वृद्धि होतील. तेथें अव् व आव् आदेश झाल्यानंतर त्यांतील अकार किंवा आकार यांना ऊकार होतो आणि उवङ् होईल तेथें त्यांतील उकाराला ऊकार होतो. अतुस् वगैरे प्रत्ययांना कित्त्व ( १।२।५ ) असल्यामुळें गुण होत नाहीं; म्हणून तेथें उवङ् होतो.

४९. आङ् याचे मर्यादा आणि अभिविधि असे दोन अर्थ आहेत. ' त्यावांचून ' ही मर्यादा. व 'त्यासहित ' हा अभिविधि होय. उदाहरणार्थ–आ मुक्तेः संसारः असें म्हटलें असतां मुक्तीच्या पूर्वक्षणापर्यंत संसार असा अर्थ प्रतीत झाल्यामुळें मुक्ति ही संसाराची मर्यादा ठरते. आ बालेभ्यः हरिभक्तिः असें म्हटलें असतां बालांसुद्धां सर्वांना हरिभक्ति आहे असा बोध होतो. त्यावरून बालासकट असा अभिविधीहि आङाचा अर्थ ठरतो. आ भात् येथें आङाचा प्रयोग असल्यामुळें हा संशय येत आहे. अर्थात् आ भात् येथें आङाचा मर्यादा हा अर्थ आहे किंवा अभिविधि हा अर्थ आहे ?

५०. श्वन् शब्दाहून शस् , टा व ङे हे प्रत्यय करून ' श्वयुव० ' ( ६।४।१३३ ) यानें संप्रसारण, व ' संप्रसारणाच्च ' ( ६।१।१०८ ) यानें पूर्वरूप केलें असतां शुनः, शुना व शुने अशीं रूपें तयार होतात. हे दोष सिद्धान्त्यानें दाखविले आहेत.

शुने । संप्रसारणे कृतेऽल्लोपोऽनः [ ६. ४. १३४ ] इति प्राप्नोति । यस्य पुनः सह तेनासिद्धत्वमसिद्धत्वात्तस्य न संयोगाद्वमन्तात् [ १३७ ] इति प्रतिषेधो भविष्यति ॥ यस्यापि प्राग्भादसिद्धत्वं तस्याप्येष न दोषः । कथम् । नास्त्यत्र विशेषोऽल्लोपेन वा निवृत्तौ सत्यां पूर्वत्वेन वा ॥ अयमस्ति विशेषः । अल्लोपेन निवृत्तौ सत्यामुदात्तनिवृत्तिस्वरः प्रसज्येत । नात्रोदात्तनिवृत्तिस्वरः प्राप्नोति । किं कारणम् । न गोश्वन्साववर्ण [ ६. १. १८२ ] इति प्रतिषेधात् । नैष उदात्तनिवृत्तिस्वरस्य प्रतिषेधः । कस्य तर्हि । तृतीयादिस्वरस्य । यत्र तर्हि तृतीयादिस्वरो नास्ति । शुनः पश्येति । एवं तर्हि न वयं लक्षणस्य प्रतिषेधं शिष्मः । किं तर्हि । येन केनचिल्लक्षणेन प्राप्तस्य विभक्तिस्वरस्यायं प्रतिषेधः । यत्र तर्हि विभक्तिस्वरो नास्ति । बहुशुनीति ॥ यदि

रण केलें असतां ' अल्लोपोऽनः ' ( ६।४।१३४ ) यानें अल्लोप होऊं लागेल आणि ज्याच्या मतीं भस्य या अधिकारांतील शास्त्रांनासुद्धां आभीय म्हणावयाचें त्याच्या मतीं संप्रसारण असिद्ध असल्यामुळे ' न संयोगाद्वमन्तात् ' ( ६।४।१३७ ) यानें अल्लोपाचा निषेध होईल.

ज्याच्यीं[51] मतीं ' भस्य ' या अधिकाराच्या पूर्वीचींच शास्त्रें आभीय आहेत त्यालाही हा दोष येत नाहीं.

तो कसा ?

ज्या अकाराचा लोप होऊं लागेल असा दोष दाखविला त्या अकाराची पूर्वरूपानें ( ६।१।१०८ ) तरी निवृत्ति होणारच. मग, अकाराची निवृत्ति लोपानें झाली काय, आणि पूर्वरूपानें झाली काय त्यांत कांहींच फरक दिसत नाहीं.

फरक आहे तर. अल्लोपानें अकाराची निवृत्ति झाली तर उदात्त–निवृत्तिस्वर ( ६।१।१६१ ) होऊं लागेल[52].

येथें उदात्त[53]–निवृत्तिस्वर प्राप्त होऊं शकत नाहीं.

काय कारण ?

कारण असें कीं ' न गोश्वन्० ' ( ६।१।१८२ ) यानें त्याचा निषेध केला आहे.

' न गोश्वन्०[54] ' हा उदात्तनिवृत्तिस्वराचा प्रतिषेध नव्हे.

तर मग कोणाचा ?

' सावेकाच० ' ( ६।१।१६८ ) या तृतीयादि–स्वराचा. शिवाय जेथें तृतीयादि–स्वर नाहीं, उदाहरणार्थ– शुनः पश्य, तेथें अर्थात् उदात्तनिवृत्तिस्वर होऊं लागेल.

असें[55] आहे तर ' न गोश्वन्० ' हा निषेध ' सावेकाच० ' या सूत्रानें प्राप्त झालेल्या स्वराचाच आहे असें आम्ही म्हणत नाहीं; तर कोणत्याही सूत्रानें प्राप्त झालेल्या विभक्ति–स्वराचा[56] न गोश्वन्० हा निषेध होय.

तर मग जेथें विभक्तिस्वर नाहीं, उदाहर–

५१. हें वादी म्हणजे पूर्वपक्षी म्हणत आहे.

५२. सिद्धान्ती फरक दाखवीत आहे. लोप झाला असतां ' अनुदात्तस्य च० ' ( ६।१।१६१ ) यानें शसाला उदात्त झाल्यामुळें अन्तोदात्त पद होईल आणि संप्रसारण व पूर्वरूप हीं केलीं असतां ' एकादेश० ' ( ८।२।५ ) यानें एकादेश उदात्त झाल्यानें आद्युदात्त पद होत असतें.

५३. पूर्वपक्षी आपल्या मताचें समर्थन करीत आहे.

५४. हें सिद्धान्ती म्हणत आहे.

५५. पूर्वपक्षी पुनः आपल्या मताचें प्रस्थापन करीत आहे.

५६. ' सावेकाच० ' येथून ' न गोश्वन्० ' येथें विभक्तिग्रहणाची अनुवृत्ति गृहीत धरली आहे.

पुनरयमुदात्तनिवृत्तिस्वरस्यापि प्रतिषेधो विज्ञायेत । नैवं शक्यम् । इहापि प्रसज्येत । कुमारीति ॥ एवं तर्ह्याचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयति नोदात्तनिवृत्तिस्वरः शुन्यवतरतीति यदयं श्वन्शब्दं गौरादिषु पठति । अन्तोदात्तार्थं यत्नं करोति । सिद्धं हि स्यान्ङीपैव ॥ मघोनः पश्य । मघोना मघोने । संप्रसारणे कृते यस्येति लोपः प्राप्नोति । यस्य पुनः सह तेनासिद्धत्वमसिद्धत्वात्तस्य न भविष्यति ॥ यस्यापि हि प्राग्भादसिद्धत्वं तस्याप्येष न दोषः । कथम् । वक्ष्यत्येतन्मघवन्शब्दोऽव्युत्पन्नं प्रातिपदिकमिति ॥ भूगुणः । भूयान् । भूभावे कृत ओर्गुणः प्राप्नोति । यस्य पुनः सह तेनासिद्धत्वमसिद्धत्वात्तस्य

णार्थ– बहुशुनी[57], तेथें दोष येईल त्याची वाट काय ? शिवाय, 'न गोश्वन्०' हा निषेध उदात्तनिवृत्तिस्वराचाही आहे असें म्हणतां पण हें शक्य नाहीं. कारण कुमारी[58] येथेंही उदात्तनिवृत्तिस्वराचा निषेध होऊं लागेल.

असें आहे तर 'उदात्तनिवृत्तिस्वर श्वन् शब्दाविषयीं प्रवृत्त होत नाहीं' असें आचार्यांचा व्यवहार सुचवीत आहे. कारण, आचार्य हे गौरादि गणामध्यें (४।१।४१) श्वन् शब्दाचा पाट करीत आहेत, व तो अन्तोदात्त होण्याकरितां करीत आहेत[59]. जर उदात्तनिवृत्तिस्वर येथें साधावयाचा असेल तर तो अन्तोदात्त ङीपानेंही साधत आहे.

मघोनः[60] पश्य, मघोना, मघोने, येथें 'श्वयुव०' (६।४।१३३) यानें संप्रसारण केलें असतां 'यस्येति च' यानें अकारलोप होऊं लागेल; व ज्याच्या मतीं भस्य हा अधिकार संपेपर्यंत आभीयासिद्धत्व आहे त्याच्या मतीं संप्रसारणाला असिद्धत्व असल्यामुळें 'यस्येति च' हा लोप होत नाहीं.

ज्याच्या मतीं भस्य या अधिकाराच्या पूर्वीच असिद्धत्व आहे त्यालाही हा दोष नाहीं.

तो कसा ?

मघवन् शब्द अव्युत्पन्न प्रातिपदिक आहे असें सांगावयाचें आहे.

भूगुणाचें उदाहरणः- भूयान्[61]. येथें 'बहोर्लोपो०' (६।४।१५८) यानें 'भू' आदेश केला असतां 'ओर्गुणः' (६।४।१४६) यानें गुण होऊं लागेल. आणि ज्याच्या मतीं 'भस्य' हा अधिकार संपेपर्यंत आभीयासिद्धत्व आहे त्याच्या मतीं भू आदेश असिद्ध असल्यामुळें 'ओर्गुणः' यानें गुण होणार नाहीं.

---

५७. बहवः श्वानो यस्याम् सा बहुशुनी, असा बहुव्रीहि समास आहे. येथें अल्लोपानें अकारनिवृत्ति झाली तर 'अन उपधालोपिनो०' (४।१।२८) यानें विकल्पानें ङीप् होऊं लागेल. आणि 'बहोर्नञ्०' (६।२।१७५) यानें उत्तरपदाला अन्तोदात्त झाला असल्यामुळें उदात्तनिवृत्तिस्वरही होऊ लागेल.

५८. कुमार शब्दांतील शेवटचा अकार उदात्त आहे. ङीप् हा अनुदात्त ईकार पुढें असतांना त्या उदात्त अकाराचा लोप (६।४।१४८) झाल्यामुळे उदात्तनिवृत्तिस्वरानें ङीप् प्रत्ययाच्या ईकाराला उदात्त होतो त्याचा निषेध होईल. कारण कुमार हें सुप्रत्यय पुढे असतांना अवर्णान्त आहे.

५९. श्वन् शब्दाहून ङीष् प्रत्यय झाला म्हणजे प्रत्ययस्वरानें (३।१।३) उदात्त होतो. एकंदर शब्द अन्तोदात्त होतो.

६०. 'भस्य या अधिकाराच्या पूर्वींच्याच शास्त्रांना आभीय म्हणावयाचें' या मतावर दुसरा दोष येथून दाखवीत आहेत. मागें वार्तिक ७ पहा.

६१. बहु शब्दाहून ईयसुन् प्रत्यय (५।३।७) 'बहोर्लोपो०' (६।४।१५८) यानें ईयस् प्रत्ययाच्या ईकाराचा लोप, व बहुशब्दाला भू आदेश अशीं कार्यें झालीं आहेत.

न भविष्यति ॥ यस्यापि प्राग्भादसिद्धत्वं तस्याप्येष न दोषः । कथम् । दीर्घोच्चारणसामर्थ्यान्न भविष्यति । अस्त्यन्यद्दीर्घोच्चारणस्य प्रयोजनम् । किम् । भूमेति । निपातनादेतत्सिद्धम् । किं निपातनम् । बहोर्नञ्वदुत्तरपदभूम्नि [ ६. २. १७५ ] इति ॥ अथवा पुनरस्तु सह तेनेति ।

## आ भादिति चेद्वसुसंप्रसारणयलोपप्रस्थादीनां प्रतिषेधः ॥ १६ ॥

आ भादिति चेद्वसुसंप्रसारणयलोपप्रस्थादीनां प्रतिषेधो वक्तव्यः । पपुषः पश्य तस्थुषः । निन्युषः चिच्युषः । लुलुवुषः पुपुवुष इति । वसुसंप्रसारणे कृते तस्यासिद्धत्वादचीत्याकारलोपादीनि न सिध्यन्ति ॥ नैष दोषः । उक्तमेतत्समानाश्रयवचनात्सिद्धमिति । कथम् । वसावाकारलोपादीनि वस्वन्तस्य विभक्तौ संप्रसारणमिति ॥ यलोपः । सौरी बलाका । योऽसावण्यकारो

---

ज्याच्या मतीं 'भस्य' या अधिकाराच्या पूर्वीच असिद्धत्व आहे त्यालाही हा दोष नाहीं.

तो कसा ?

गुण होईल तर भू आदेशाचे ठिकाणीं दीर्घोच्चारण सांगितलेलं होणार नाहीं; म्हणून दीर्घोच्चारणाच्या जोरावर गुण होणार नाहीं.

भू आदेश दीर्घ सांगण्याचें दुसरें प्रयोजन आहे.

तें कोणतें ?

भूमा.[६२]

निपातनावरून भूमा येथें दीर्घ साधत आहे.

ते निपातन कोणतें ?

'बहोर्नञ्वदुत्तरपदभूम्नि' (६।२।१७५) हें निपातन होय.[६३]

अथवा 'भस्य' हा अधिकार संपेपर्यंत आभीयासिद्धत्व असो.

'भस्य' हा अधिकार संपेपर्यंत आभीयासिद्धत्व असलें तर वसुसंप्रसारण, यलोप आणि प्र, स्थ वगैरे आदेश यांविषयीं आभीयासिद्धत्व प्रवृत्त होत नाहीं असें निषेधाकरितां वचन केलें पाहिजे. उदाहरणार्थ–पपुषः, निन्युषः, लुलुवुषः. येथे संप्रसारण केलें असतां त्या अचाला मानून होणारीं आकारलोप वगैरे कार्यें संप्रसारण असिद्ध समजलें तर होणार नाहींत.

हा दोष येत नाहीं.

कारण, समानाश्रय आभीय शास्त्र कर्तव्य असतांना समानाश्रय आभीय शास्त्र असिद्ध होतें असें पूर्वी सांगितलें आहे.

पण येथे भिन्नाश्रयत्व कसें ?

वसु प्रत्यय पुढें असताना आकारलोप वगैरे कार्यें होतात, आणि वस्वन्ताला विभक्ति पुढें असतांना संप्रसारण होतें.

यलोपाविषयींचें उदाहरण सौरी बलाका.[६४] येथें अण् पुढे असतांना जो हा अकाराचा लोप

---

६२. बहु शब्दाहून 'पृथ्वादिभ्य०' (५।१।१२२) यानें इमनिच् प्रत्यय, 'बहोर्लोपो०' यानें इमनिच् प्रत्ययाच्या इकाराचा लोप आणि बहु शब्दाला भू आदेश होऊन भूमा असें रूप होतें. येथें भ संज्ञा नसल्यामुळें गुणाची प्राप्ती येत नाहीं.

६३. येथें भूम्नि असें दीर्घोच्चारण केलें असल्यामुळें ह्रस्वान्त भु असा आदेश केला असतांही भूमा येथें दीर्घ होईल.

६४. सूर्येण एकदिक् सौरी. सूर्यशब्दाहून 'तेनैकदिक्' (४।३।११२) यानें अण् प्रत्यय 'यस्येति च' (६।४।१४८) यानें आकाराचा लोप. त्या अणन्ताहून 'टिड्ढाणञ्०' (४।१।१५) यानें ङीप्. पुनः 'यस्येति च' यानें अकाराचा लोप; 'सूर्यतिष्या०' (६।४।१४९) यानें यकाराचा लोप अशीं कार्यें झालीं आहेत.

लुप्यते तस्यासिद्धत्वादीतीति यलोपो न प्राप्नोति ॥ अत्राप्येष एव परिहारः समानाश्रयवचनात्सिद्धमिति । कथम् । अण्यकारलोपोऽणन्तस्येति यलोपः ॥ प्रस्थादिषु । प्रेयान् स्थेयान् । प्रस्थादीनामसिद्धत्वात्प्रकृत्यैकाच् [ ६. ४. १६३ ] इति प्रकृतिभावो न प्राप्नोति ॥ नैष दोषः । यथैव प्रस्थादीनामसिद्धत्वात्प्रकृतिभावो न प्राप्नोत्येवं टिलोपोऽपि न भविष्यति ॥

## श्नान्नलोपः ॥ ६ । ४ । २३ ॥

अथ किमर्थं श्नमः सशकारस्य ग्रहणं क्रियते न नान्नलोप इत्येवोच्येत । नान्नलोप इतीयत्युच्यमाने नन्दिता नन्दक इत्यत्रापि प्रसज्येत ॥ एवं तर्ह्येवं वक्ष्यामि । नान्नलोपोऽनिदिताम् । ततो हल उपधायाः क्ङिति । अनिदितामिति । नैवं शक्यम् ।

---

झाला आहे तो असिद्ध असल्यामुळें 'सूर्यतिष्या०' या सूत्रानें ईकार पुढें असतांना सांगितलेला यलोप प्राप्त होत नाहीं.

येथेंही 'समानाश्रय आभीय असिद्ध होतें' या म्हणण्यानेंच इष्ट साधत आहे.

पण येथें भिन्नाश्रयत्व कसें ?

अण् पुढे असताना अकाराचा लोप झाला आहे; आणि ङीप् पुढें असतांना जें अण्-प्रत्ययान्त त्याच्या यकाराचा लोप होणार आहे.

प्र, स्थ वगैरे आदेशांचीं उदाहरणे-प्रेयान्[६५] स्थेयान् वगैरे. येथें प्र, स्थ, वगैरे आदेश असिद्ध असल्यामुळें 'प्रकृत्यैकाच्' (६।४।१६३) यानें प्रकृतिभाव होणार नाहीं.

हा दोष येत नाहीं कारण, प्र स्थ वगैरे आदेश असिद्ध असल्यामुळें जसा प्रकृतिभाव होणार नाहीं तसा टिलोपही होणार नाहीं[६६].

(सू. २३) येथें 'श्नात्' असें शकार लावून श्नम् या प्रत्ययाचें ग्रहण केलें आहे तें कशाकरितां ? तसें करूं नये. 'नान्नलोपः' असेंच म्हणावें.

पण नान्नलोपः[२] एवढेंच म्हटलें तर नन्दिता व नन्दकः येथेंही नलोप होऊं लागेल.

असें आहे तर 'नान्नलोपोऽनिदिताम्[३]' असा सूत्राचा विभाग करावा. त्याच्या नंतर 'हल उपधायाः क्ङिति' असें पुढील सूत्र होईल. तेथें अनिदिताम् हें अनुवृत्तीनें येईल.

असें करणें शक्य नाहीं. हिनस्ति येथें लोप होणार नाहीं म्हणून तसें करणें शक्य नाहीं.

---

६५. प्रिय व स्थिर शब्दांहून ईयसुन् प्रत्यय 'प्रियस्थिर०' (६।४।१५७) यानें अनुक्रमें प्र व स्थ आदेश झाल्यानंतर एकाच् असल्यामुळें प्रकृतिभाव (६।४।१६३) होतो म्हणून टिलोप (६।४।१५५) होत नाहीं. नंतर गुण (६।१।८७) होऊन प्रेयस् व स्थेयस् असे शब्द सिद्ध होतात. त्यांहून प्रथमा एकवचन केलें असतां प्रेयान् व स्थेयान् अशीं रूपें होतात.

६६. कारण, टिलोप आभीय असल्यामुळें त्याच्या दृष्टीनें प्र स्थ वगैरे आदेश असिद्धच आहेत.

१. (सू. २३) 'श्न' प्रत्ययाहून पुढें असलेल्या नकाराचा लोप होतो.

२. 'न शब्दाहून पुढें असलेल्या नकाराचा लोप होतो' असा अर्थ. 'टुनदि समृद्धौ' हा धातु, 'इदितो नुम्०' (७।१।५८) यानें नुमागम, तृच्, इट् आगम, नन्दिता, ण्वुल् व अक आदेश केले असतां नन्दकः असें रूप होतें.

३. पुढील सूत्रांतील 'अनिदिताम्' हें पद याच सूत्रांत घालावें. म्हणजे ह्रस्व इकार ज्याचा इत्संज्ञक नाहीं, अशा अंगांतील न शब्दाहून पुढील नकाराचा लोप होतो असा अर्थ होईल. नदि धातूचा इकार इत्संज्ञक असल्यामुळें नकाराचा लोप होणार नाहीं.

४. हिसि हिंसायाम्, 'इदितो नुम्०' यानें नुम्, लट्; तिप्, 'रुधादिभ्यः०' (३।१।७८) यानें श्नम्; श्नम् हा मित् असल्यानें अन्त्य अचाहून पुढें होतो.

**इह हि न स्यात् । हिनस्ति । तस्मान्नैवं शक्यम् । न चेदेवं नन्दिता नन्दक इति प्राप्नोति ॥ एवं तर्हि क्ङितीति वर्तते । एवमपि हिनस्तीत्यत्र न प्राप्नोति । नैषा परसप्तमी । का तर्हि । सत्सप्तमी । क्ङिति सति । एवमपि नन्दमान इत्यत्रापि प्राप्नोति । एवं तर्हि नशब्द एवात्र क्ङित्त्वेन विशेष्यते क्ङिद्यो नशब्दो भवतीति । एवमपि यज्ञानाम् यत्नानामित्यत्र प्राप्नोति । दीर्घत्वमत्र बाधकं भविष्यति । इदमिह संप्रधार्यम् । दीर्घत्वं क्रियतां नलोप इति किमत्र कर्तव्यम् । परत्वान्नलोपः । तस्मात्सशका-**

---

पण तसें न केलें तर नन्दिता व नन्दकः येथेंही नलोप होऊं लागेल हा दोष शिल्लक राहतो.

असे आहे तर पुढील सूत्रांतील 'क्ङिति' हें पद[५] येथें घालतां येईल.

तर मग हिनस्ति येथें नलोप होणार नाहीं.

क्ङिति ही परसप्तमी नव्हे.

तर कोणती सप्तमी आहे ?

कित् व ङित् असतांना अशा अर्थाची ही सति–सप्तमी[६] आहे.

असें म्हटलें तर नन्दमानः[७] येथेंही नलोप प्राप्त होत आहे.

तसें झाल्यास येथें क्ङित् याचा संबंध न या शब्दाकडे केला जाईल. त्यामुळें कित् किंवा ङित् असा जो 'न' हा शब्द त्याच्या पुढील नकाराचा लोप होतो असा अर्थ होतो.

तरीही यज्ञानाम्[८] व यत्नानाम् येथे नलोप प्राप्त होत आहे.

तेथें 'नामि' (६।४।३) हा दीर्घ नलोपाचा बाध करील.

आतां येथे असा विचार उत्पन्न होतो कीं– प्रथमतः दीर्घ करावा किंवा नलोप करावा ?

मग यांपैकीं काय बरें करावें ?

पर[९] असल्यामुळें नकाराचा लोपच अगोदर

---

प्रकृत सूत्रानें नलोप केल्यानें हिनस्ति असें रूप होतें. येथें ह्रस्व-इकारेत्संज्ञक अङ्ग असल्यानें नलोप होणार नाही. म्हणून 'नान्नलोपोऽनिदिताम्' असें सूत्र करणें शक्य नाहीं.

५. नन्दिता नन्दकः येथें तृच् किंवा ण्वुल् हे प्रत्यय कित्ही नाहीत आणि ङित्ही नाहींत. म्हणून दोष येत नाहीं.

६. 'हिनस्ति' येथें पुढील तिप् हा प्रत्यय ङित् नसला तरी श्नम् प्रत्ययच ङित् (१।२।४) असल्यामुळे लोप होईल. आणि नन्दिता व नन्दकः या उदाहरणांमध्यें कित् किंवा ङित् प्रत्यय कोठेंच नसल्यामुळे लोप होत नाही.

७. नद् धातु इकारेत्संज्ञक असल्यामुळे नुम् आगम (७।१।५८), पुढें चानश् (३।२।१२९), शप्, आनें मुक् (७।२।८२) याने मुक् आगम केल्यानंतर नन्दमानः असें रूप होतें. येथें क्ङिति ही सत् सप्तमी गृहीत धरली तर चानश् हा ङित् प्रत्यय आहे म्हणून नलोप होऊं लागेल.

८. यज् धातूहून 'यजयाचयत०' (३।३।९०) यानें नङ् प्रत्यय, श्चुत्वानें नकाराला ञकार, नंतर जञोर्ज्ञः. अशा रीतीनें यज्ञ शब्द तयार होतो. यत धातूहून नङ् प्रत्यय केला म्हणजे यत्न शब्द तयार होतो. या दोन्ही शब्दांहून षष्ठी बहुवचन आम्, नुट्, व 'नामि' (६।४।३) यानें दीर्घ केला म्हणजे यज्ञानाम् व यत्नानाम् अशी रूपें होतात. येथे नङ् प्रत्यय हा ङित् असल्यामुळें नुडागमाच्या नकाराचा लोप होऊं लागेल.

९. अग्नीनाम् येथें 'नामि' या दीर्घाला अवकाश आहे; व हिनस्ति येथें नलोपाला अवकाश आहे. आणि यज्ञानाम् इत्यादि स्थलीं दोहोंची प्राप्ति असतां परत्वास्तव नलोप प्रसक्त होत आहे.

रस्य ग्रहणं कर्तव्यम् ॥ अथ क्रियमाणेऽपि सशकारग्रहण इह कस्मान्न भवति । विश्नानाम् । प्रश्नानामिति । लक्षणप्रतिपदोक्तयोः प्रतिपदोक्तस्यैवेत्येवं न भविष्यति ॥

## अनिदितां हल उपधायाः क्ङिति ॥ ६ । ४ । २४ ।

**अनिदितां नलोपे लङ्गिकम्प्योरुपतापशरीरविकारयोरुपसंख्यानम् ॥ १ ॥**

अनिदितां नलोपे लङ्गिकम्प्योरुपतापशरीरविकारयोरुपसंख्यानं कर्तव्यम् । विलगितः विकपितः । उपतापशरीरविकारयोरिति किमर्थम् । विलङ्गितः विकम्पितः ॥

**बृंहेरच्यनिटि ॥ २ ॥**

बृंहेरच्यनिटयुपसंख्यानं कर्तव्यम् । निबर्हयति निबर्हकः । अचीति किमर्थम् । निबृंह्यते । अनिटीति किमर्थम् । निबृंहिता

---

करावा लागेल.

तर मग शकाराचें ग्रहण केलेंच पाहिजे असें अर्थातच ठरतें.

आतां शकाराचें ग्रहण केलें असतांही विश्नानाम् व प्रश्नानाम् येथें कां बरें नलोप होत नाहीं ?

' लाक्षणिक आणि प्रतिपदोक्त यांमध्यें प्रतिपदोक्ताचेंच ग्रहण करावें' अशा अर्थाची 'लक्षणप्रतिपदोक्तयोः प्रतिपदोक्तस्यैव ग्रहणम्' अशी परिभाषा असल्यामुळें तेथें नलोप होणार नाहीं.

( सू. २४ वा. १ ) ' अनिदिताम्०' या प्रकृत सूत्रानें नकाराचा लोप सांगितला आहे तेथें लङ्ग् व कम्प् या धातूंमधील नकाराचा लोप होतो अनुक्रमें उपताप व शरीरविकार हे अर्थ गम्यमान असतांना असें म्हणावें. उदाहरणार्थ— विलगितः, विकपितः.

उपताप व शरीरविकार हे अर्थ गम्यमान असतांना असें कशाकरितां म्हटलें आहे ?

विलङ्गितः व विकम्पितः येथें नलोप न झाला पाहिजे.

( वा. २ ) इट् आगम झाल्याशिवाय जो अजादि प्रत्यय तो पुढें असतांना बृंह् या धातूमधील नकाराचा लोप होतो असें म्हणावें. उदाहरणार्थ—निबर्हयति, निबर्हकः

' अच् पुढें असतांना' असें कशाकरितां म्हटलें आहे ?

निबृंह्यते येथें नलोप न व्हावा म्हणून.

---

१०. विच्छ् व प्रच्छ् या धातूंहून ' यजयाच० ' (३।३।९० ) यानें नङ् प्रत्यय, ' छ्वोः शूड० ' (६।४।१९ ) यानें सतुक् छकाराचे स्थानीं शकार होऊन विश्न व प्रश्न शब्द साधतात. पुढें षष्ठी बहुवचन आम् प्रत्यय झाला आहे.

११. ' श्नान्नलोपः ' येथें श्न शब्दानें साक्षात् उच्चारित आणि म्हणूनच शीघ्रोपस्थितिक असा श्नम् प्रत्ययच घ्यावयाचा. शास्त्रानुसंधानानें कल्पित व म्हणूनच विलंबोपस्थितिक असा विश्न इत्यादि शब्दामधील श्न शब्द घ्यावयाचा नाहीं.

( सू. २४ ) ज्यांचा ह्रस्व इकार इत्संज्ञक नाहीं, अशा हलन्त अङ्गाच्या उपधाभूत नकाराचा कित् किंवा ङित् वचन पुढें असतांना लोप होतो.

२. अर्थात् लङ्ग् व कम्प् धातूंच्या नकाराचा लोप होतो असें वचन करावें असें तात्पर्य आहे.

३. लगि व कपि असे मूळचे इकार-इत्संज्ञक धातू आहेत म्हणून सूत्रानें सिद्धि होत नाहीं. त्यांना नुम् आगम, (७।१।५८), पुढें गत्यर्थाकर्मक० (३।४।७२) यानें कर्तरि क्त प्रत्यय, इट् आगम, प्रकृत वार्तिकानें नलोप, विलगितः, विकपितः. ' संकटानें प्राप्त झालेला ' असा विलगित याचा अर्थ आहे. विकपितः म्हणजे व्याधित.

४. गत आणि चलित असे येथें क्रमानें अर्थ आहेत.

५ बृहि असा मूळचा इकार-इत्संज्ञक असलेला धातु आहे. त्याला नुम् आगम, पुढें णिच् प्रत्यय, व ण्वुल् प्रत्यय करून प्रकृत वार्तिकानें नकाराचा लोप झाला आहे.

निर्बृंहितुम् ॥ तत्तर्ह्युपसंख्यानं कर्तव्यम् । न कर्तव्यम् । बृहिः प्रकृत्यन्तरम् । कथं ज्ञायते । अचीति लोप उच्यते ऽनजादावपि दृश्यते । निबृह्यते । अनिटीत्युच्यत इडादावपि दृश्यते । निबर्हितुम् । अजादावित्युच्यतेऽजादावपि न दृश्यते । निबृंहयति निबृंहकः ॥

**रञ्जेर्णौ मृगरमणे ॥ ३ ॥**

रञ्जेर्णौ मृगरमण उपसंख्यानं कर्तव्यम् । रजयति मृगान् । मृगरमण इति किमर्थम् । रञ्जयति वस्त्राणि ॥

घिनुणि चोपसंख्यानं कर्तव्यम् । रागी ।

**घिनुणि निपातनात्सिद्धम् ॥ ४ ॥**

किं निपातनम् । त्यजरजेति ॥ अशक्यं धातुनिर्देशे निपातनं तन्त्रमाश्रयितुम् । इह हि दोषः स्यात् । दशनहः करणे । दंष्ट्रा ।

---

'इट् आगमाशिवाय' असें कशाकरितां म्हटलें आहे ?

निबृंहिता व निबृंहितुम् येथें नलोप न व्हावा म्हणून.

तर मग तसें म्हटलें पाहिजे.

तसें म्हणावयास नको. कारण बृह्[६] असा निराळा धातु आहे.

बृंह् धातूपेक्षां निराळा बृह् धातु आहे हें कशावरून ?

अजादि प्रत्यय पुढें असतांना नलोप सागितला आहे; आणि हलादि प्रत्यय पुढें असतांनाही तो दिसतो. उदाहरणार्थ– निबृह्यते. तसेंच इट् आगमाशिवाय असें म्हटलें आहे आणि इट् आगम पुढें असतानाही तो दिसतो. उदाहरणार्थ– निबर्हिता निबर्हितुम्. बरें; कांहीं ठिकाणीं अजादि प्रत्यय पुढें असतांनाही नलोप दिसत नाहीं. उदाहरणार्थ– निबृंहयति, निबृंहकः.[७]

(वा. ३) णि प्रत्यय पुढें असताना रञ्ज् धातूंतील नकाराचा लोप होतो मृगरमण हा अर्थ गम्यमान असतांना असें म्हणावें. उदाहरणार्थ– रजयति[८] मृगान्.

'मृगरमण हा अर्थ गम्यमान असतांना' असें कशाकरितां म्हटलें आहे ?

रञ्जयति वस्त्राणि येथें नलोप न व्हावा म्हणून.

घिनुण् प्रत्यय पुढें असतांनाही रञ्ज् धातूच्या नकाराचा लोप होतो असें म्हणावें. उदाहरणार्थ– रागी.

(वा. ४) घिनुण् प्रत्यय पुढें असतांना निपातनावरून नलोप सिद्ध होत आहे.

तें निपातन कोणतें ?

'संपृचानुरुधा०' (३।२।१४२) या घिनुण् सांगणाऱ्या सूत्रामध्यें 'त्यजरज' असें नलोप करून 'रञ्ज्' धातूचें ग्रहण केलें आहे तें निपातन.

धातुनिर्देशस्थलीं निपातन मानणें शक्य नाहीं. कारण 'दाम्नीशस०' (३।३।१८२) या सूत्रामध्यें 'दशनह' असें नलोप करून

---

६. तेव्हां निबर्हयति वगैरे उदाहरणें त्या धातूचींच होतील.

७. एकंदरींत बृह् धातु निराळा मानिल्याशिवाय गत्यन्तर नाहीं. तेव्हां त्यानेंच काम भागत असल्यामुळें हें वार्तिक नको.

८. रञ्ज् धातूहून णिच्, वार्तिकानें नलोप, उपधावृद्धि. 'जनीजॄष्०' या वचनानें मित्संज्ञा व 'मितां ह्रस्वः' (६।४।९२) यानें ह्रस्व झाला आहे. येथें मृगरमण याचा शिकार असा अर्थ कोणी करतात; परंतु 'रजयांचकार विरजाः स मृगान्' या भारविप्रयोगावरून मृगमनोरञ्जन असाच अर्थ प्रतीत होतो; म्हणूनच भाष्यकारांनी 'रञ्जयति वस्त्राणि' असें प्रत्युदाहरण दिलें आहे असें भाष्यतत्त्ववेत्ते म्हणतात.

नैतद्धातुनिपातनम् । किं तर्हि । प्रत्ययान्तस्यैतद्रूपं तस्मिंश्चास्य प्रत्यये लोपो भवति दंशसञ्जस्वञ्जां शपि [ ६. ४. २५ ] इति ॥

रजकरजनरजःसूपसंख्यानं कर्तव्यम् । रजकः रजनम् रज इति ।

**रजकरजनरजःसु कित्त्वात्सिद्धम् ॥५॥**

कित एवैत औणादिकाः । तद्यथा । रुचकः भुवनम् शिर इति ॥

**[ दंशसञ्जस्वञ्जां शपि ॥ ६।४। २५ ॥**

**रञ्जेश्च ॥ ६ । ४ । २६ ॥**

**घञि च भावकरणयोः ॥ ६ । ४ । २७ ॥**

**स्यदो जवे ॥ ६ । ४ । २८ ॥**

**अवोदैधौद्मप्रश्रथहिमश्रथाः ॥ ६ । ४ । २९ ॥**

**नाञ्चेः पूजायाम् ॥ ६।४।३० ॥**

**क्त्वि स्कन्दिस्यन्दोः ॥ ६ । ४ । ३१ ॥**

**जान्तनशां विभाषा ॥ ६ । ४ । ३२ ॥**

**भञ्जेश्च चिणि ॥ ६।४।३३ ॥ ]**

---

दंश् धातूचें ग्रहण केलें असल्यामुळें दंष्ट्रा येथें दोष येईल.

' दशनः ' हें केवळ दंश् धातूचें निपातन नव्हे. तर दंश् धातूहून शप् प्रत्यय करून त्या शप्–प्रत्ययान्ताचें दंश हें रूप आहे. तो शप् प्रत्यय पुढें असतांना ' दंशसञ्ज० ' ( ६।४। २५ ) यानें नलोप झाला आहे.

रजक, रजन आणि रजस् या शब्दांमध्यें रञ्ज् धातूच्या नकाराचा लोप होतो असें वचन करावें. उदाहरणार्थ– रजकः. रजनम्. रजः.

( वा. ५ ) रजक, रजन आणि रजस् या तीन शब्दांचे ठिकाणीं औणादिक प्रत्यय केले आहेत व ते कित् आहेत. उदाहरणार्थ–रुचकः, भुवनम्, शिरः.

---

९. रजकः येथें रञ्ज् धातूहून ' क्वुन् शिल्पिसंज्ञयोः ' ( उणा०२।३७ ) यानें औणादिक क्वुन् प्रत्यय, रजनम् येथें ' रञ्जेः क्युन् ' ( उणा. २।८० ) यानें क्युन् प्रत्यय व तो बहुलग्रहणानें टित् होतो. रजः येथें ' भूरञ्जिभ्याम्० ' ( उणा० ४।२१६ ) यानें असुन् प्रत्यय. हे सर्व औणादिक प्रत्यय कित् असल्यानें ' अनिदिताम्० ' या प्रकृत सूत्रानेंच नलोप साधत आहे.

१. ( सू. २५ ) दंश्, सञ्ज व स्वञ्ज् यांच्या उपधानकाराचा शप् प्रत्यय पुढें असतांना लोप होतो.

१. ( सू २६ ) रञ्ज् धातूच्याही उपधानकाराचा शप् पुढें असतांना लोप होतो.

१. ( सू. २७ ) भाव किंवा करण या अर्थाचा घञ् प्रत्यय पुढें असतांना रञ्ज् धातूच्या उपधानकाराचा लोप होतो.

१. ( सू. २८ ) घञ् प्रत्यय पुढें असतांना स्यन्द् धातूच्या नकाराचा लोप करून वृद्धि न करतां स्यद असें निपातन वेग हा अर्थ गम्यमान असतांना केलें आहे.

१. ( सू. २९ ) अवोद, एध, ओद्म, प्रश्रथ आणि हिमश्रथ या शब्दांचें निपातन केलें आहे.

१. (सू. ३० ) पूजार्थक अञ्च् धातूच्या उपधानकाराचा लोप होत नाहीं.

१. ( सू. ३१ ) स्कन्द् आणि स्यन्द् धातूंच्या उपधानकाराचा क्त्वा प्रत्यय पुढें असतांना लोप होत नाहीं.

१. ( सू. ३२ ) जकारान्त धातु आणि नश् धातु यांच्या नकाराचा क्त्वा प्रत्यय पुढें असतांना विकल्पानें लोप होतो.

१. ( सू. ३३) भञ्ज् धातूच्या नकाराचा विकल्पकरून चिण् पुढें असतांना लोप होतो.

## शास इदङ्हलोः ॥ ६।४।३४ ॥

### शास इत्त्व आशासः क्वौ ॥ १ ॥

शास इत्त्व आशासः क्वावुपसंख्यानं कर्तव्यम् । आशीरिति । किं पुनरिदं नियमार्थमाहोस्विद्विध्यर्थम् । कथं च नियमार्थं स्यात्कथं वा विध्यर्थम् । यदि तावच्छासिमात्रस्य ग्रहणं ततो नियमार्थम् । अथ हि यस्माच्छासेरङ्विहितस्तस्य ग्रहणं ततो विध्यर्थम् । यद्यपि शासिमात्रस्य ग्रहणमेवमपि विध्यर्थमेव । कथम् । अङ्हलोरित्युच्यते न चात्र हलादिं पश्यामः । ननु च क्विबेव हलादिः । क्विपो लोपे कृते हलाद्यभावान्न प्राप्नोति । इदमिह संप्रधार्यम् । क्विब्लोपः क्रियतामङ्हलोरित्त्वमिति किमत्र कर्तव्यम् । परत्वादङ्हलोरित्त्वम् । नित्यः क्विब्लोपः । कृतेऽप्यङ्हलोरित्त्वे प्राप्नोत्यकृतेऽपि । नित्यत्वात्क्विब्लोपे कृते हलाद्यभावान्न प्राप्नोति । एवं तर्हि प्रत्ययलक्षणेन भविष्यति । वर्णा-

---

( सू. ३४ वा. १ ) शास् धातुला इत्त्व सांगणाऱ्या या प्रकृत सूत्रामध्यें ' क्वि ' प्रत्यय पुढें असतांना आङ्पूर्वक शास् धातूच्या उपधेला इत्त्व होतें असें वचन करावें. उदाहरणार्थ– आशीः.

पण काय हो हें वचन नियमार्थ समजावयाचें किंवा विध्यर्थ समजावयाचें ?

तें नियमार्थ कसें आणि विध्यर्थ कसें ?

जर सूत्रांतील शास् पदानें दोन्ही शास् धातूंचें ग्रहण केलें तर हें वचन नियमार्थ होतें; आणि जर परस्मैपदी अशा ज्या शास् धातूहून अङ् प्रत्यय ( ३।१।५६ ) सांगितला आहे त्याच शास् धातूचें येथें ग्रहण केलें तर हें वचन विध्यर्थ होतें.

पण जरी दोन्ही शास् धातूंचें येथे ग्रहण केलें तरीही हें वचन विध्यर्थच होणार आहे.

तें कसें बरें ?

असें कीं–अङ् किंवा हलादि प्रत्यय पुढें असतांना असें येथें म्हटलें आहे. आणि आशीः येथें अङ् तर नाहींच, पण हलादि प्रत्ययही दिसत नाहीं.

पण येथें क्विप् हाच हलादि प्रत्यय आहे ना ?

क्विपाचा लोप केला असतां हलादि प्रत्यय नसल्यामुळें इत्त्व प्राप्त होत नाहीं.

आतां येथें असा विचार उत्पन्न होतो कीं– शास् धातूहून क्विप् प्रत्यय केला असतां प्रथमतः क्विपाचा लोप ( ६।१।६७ ) करावा किंवा ' शास् इदङ्० ' यानें इत्त्व करावें.

मग यांत काय बरें करावें ?

पर असल्यामुळें इत्त्व करावें.

पण क्विपाचा लोप नित्य आहे. इत्त्व केलें अथवा न केलें तरीही तो प्राप्त होत आहे. तेव्हां नित्य असल्यामुळें प्रथमतः क्विपाचा लोप केला असतां पुढें हलादि प्रत्यय नसल्यामुळें इत्त्व प्राप्त होत नाहीं.

असें आहे तर मग प्रत्ययलक्षणानें ( १।१।

---

१. ( सू. ३४ ) अङ् प्रत्यय किंवा हलादि कित् किंवा ङित् प्रत्यय पुढें असतांना शास् धातूच्या उपधेला ऱ्हस्व इकार आदेश होतो.

२. शासु अनुशिष्टौ परस्मैपदी, आङः शासु इच्छायाम् आत्मनेपदी, असे दोन्ही शास् धातू दुसऱ्या गणांत आहेत. आतां प्रकृत सूत्रामध्यें दोन्ही शास् धातूंचें ग्रहण केलें तर ' आशासः क्वौ ' हें वचन नियमार्थ होतें: आङ्–पूर्वक शास् धातूला जर प्रकृत सूत्रानें इत्व होईल तर फक्त क्वि प्रत्यय पुढें असतांनाच होईल असा तो नियम होतो. आतां, येथें शास् पदानें परस्मैपदी शास् धातूचेंच ग्रहण केलें तर आत्मनेपदी शास् धातूला इत्व प्राप्त होत नसल्यामुळें क्वि प्रत्यय पुढें असतांना त्या शास् धातूला इत्त्व होण्याकरितां 'आशासः क्वौ ' हें वचन विध्यर्थ होतें.

श्रये नास्ति प्रत्ययलक्षणम् । यदि वा कानिचिद्वर्णाश्रयाण्यपि प्रत्ययलक्षणेन भवन्ति तथा चेदमपि भविष्यति ॥ अथवैवं वक्ष्यामि । शास इदङ्हलोः । ततः क्वौ । क्वौ च शास इद्भवति । आर्यशीः मित्रशीः । तत आङः । आङ्पूर्वाच्च क्वौ शास इद्भवति । आशीरिति । इदमिदानीं किमर्थम् । नियमार्थम् । आङ्पूर्वाच्छासेः क्वावेव । क्व मा भूत् । आशास्यते आशास्यमान इति ॥ तर्हि वक्तव्यम् । न वक्तव्यम् । अविशेषेण शास इद्भवतीत्युक्त्वा ततोऽङीति वक्ष्यामि । तन्नियमार्थं भविष्यति । अङ्येवाजादौ नान्यस्मिन्नजादाविति । इहापि तर्हि नियमादित्त्वं प्राप्नोति । आशास्यते आशास्यमान इति । यस्माच्छासेरङ्विहितस्तस्य ग्रहणं न चैतस्माच्छासेरङ्विहितः । कथमा-

६२ ) इत्व होईल.

पण वर्णाश्रये[३] कार्याविषयीं प्रत्ययलक्षण होत नाहीं ना ?

वर्णावर अवलंबून असलेलींही कांहीं कार्यें प्रत्ययलक्षणानें होत असतात त्याप्रमाणें हेंही होईल[४].

अथवा[५] अशी व्यवस्था करावी– ' शास इदङ्हलोः.' त्यानंतर ' क्वौ ' असें म्हणावें. क्वि प्रत्यय पुढें असतांनाही शास् धातूला इत्व होतें. उदाहरणार्थ–आर्यशीः मित्रशीः. त्यानंतर ' आङः ' असें म्हणावें. आङ्पूर्वक शास् धातूच्या उपधेला क्विप् पुढें असतांना इत्व होतें. उदाहरणार्थ–आशीः.

आतां, ' आङः ' हें वचन कशाकरितां ?

नियमाकरितां. तो नियम असा कीं–क्वि प्रत्यय पुढें असतांनाच आङ्पूर्वक शास् धातूच्या उपधेला इत्व होतें.

या नियमानें कोठें होत नाहीं ?

आशास्यते व आशास्यमानः येथें.

तर मग तशी व्यवस्था केली पाहिजे.

तशी व्यवस्था करावयास नको. कारण कांहीं एक निमित्त न धरतां शास् धातूला इत्व होतें असें मोघम सांगून[६] पुढें ' अङि ' असें म्हणावें. तें नियमार्थ होईल. तो नियम असा कीं–अजादि प्रत्यय पुढें असतांना शास् धातूला इत्व करणें झाल्यास अङ् प्रत्यय पुढें असतांनाच करावें. अर्थात् अङ्–भिन्न अजादि प्रत्यय पुढें असतांना करूं नये.

तरी पण, या नियमामुँळें[७] आशास्यते व आशास्यमानः येथेंही इत्व प्राप्त होत आहे.

ज्या शास् धातूहून अङ् प्रत्यय सांगितला आहे ( ३।१।५६ ) त्याच शास् धातूचें ग्रहण करावयाचें; आणि पूर्वोक्त उदाहरणांतील शास् धातूहून अङ् प्रत्यय सांगितला नाहीं; म्हणून पूर्वोक्त उदाहरणामध्यें इत्व होणार नाहीं.

३. येथें प्रत्ययलक्षणानें हलादि प्रत्यय पुढें आहे अशी कल्पना करावयाची आहे. हल् हें विशेषण आहे; आणि तें तर वर्णग्रहण आहे.

४. अ. २ पा. ४. सूत्र. ६२ टीप १९ पहा. एकंदरींत प्रत्ययलक्षणानें क्विप् प्रत्यय पुढें असल्यामुळें इत्व सिद्ध होतें. सूत्रामधील शास् पदानें दोन्ही शास् धातू घेतले असतां वार्तिक नियमार्थ होतें, आणि एकच शास् धातु घेतला तर विध्यर्थ होतें असें सिद्ध झालें.

५. आतां येथून वार्तिक-प्रत्याख्यान मार्ग सुरू केला आहे.

६. मोघम सांगण्यानें क्विप् प्रत्यय केला असतां प्रत्ययलक्षणाशिवायच इत्व होईल.

७. या नियमामुळें अङ् प्रत्ययाशिवाय इतर अजादि पुढें असतांना इत्व होणार नाहीं हें खरें; पण आत्मनेपदी शास् धातूला हलादि प्रत्यय पुढें असतांना इत्व होऊं लागेल हा दोष राहतोच. सूत्रामध्यें शास् धातूंचें ग्रहण होत आहे असें या शंकाकाराला वाटत आहे.

शीरिति । निपातनात्सिद्धम् । किं निपातनम् । क्षियाशीःप्रैषेषु तिङाकाङ्क्षम् [ ८. २. १०४ ] इति ॥

[ शा हौ ॥ ६ । ४ । ३५ ॥

हन्तेर्जः ॥ ६ । ४ । ३६ ॥ ]

**अनुदात्तोपदेशवनतितनोत्यादीनामनुनासिकलोपो झलि क्ङिति ॥ ६ । ४ । ३७ ॥**

अनुदात्तोपदेशेऽनुनासिकलोपो ल्यपि च ॥ १ ॥

अनुदात्तोपदेशेऽनुनासिकलोपो ल्यपि चेति वक्तव्यम् । प्रमत्य प्रतत्य ॥ ततो

वामः ॥ २ ॥

वाम इति वक्तव्यम् । प्रयत्य प्रयम्य । प्ररत्य प्ररम्य । प्रणत्य प्रणम्य ॥

[ वा ल्यपि ॥ ६ । ४ । ३८ ॥

न क्तिचि दीर्घश्च ॥ ६ । ४ । ३९ ॥ ]

गमः क्वौ ॥ ६ । ४ । ४० ॥

गमादीनामिति वक्तव्यम् । इहापि यथा स्यात् । परीतत्सहृकण्ठिका । संयत् सुनदिति ॥

---

तर मग आशीः या उदाहरणामध्यें इत्त्व कसें ?

येथें निपातनावरून इत्त्व साधत आहे.

तें निपातन कोणतें ?

' क्षियाशीःप्रैषेषु तिङाकाङ्क्षम् ' (८।२।१०४ ) हें होय.

( सू. ३७ वा. १ ) अनुदात्तोपदेश इत्यादि धातूंविषयीं ल्यप् पुढें असतांनाही अनुनासिकाचा लोप होतो असें वचन करावें. उदाहरणार्थ— प्रमत्य, प्रतत्य.

त्यानंतर—

( वा. २ ) ' वामः ' असें वचन करावें. त्याचा अर्थ— अनुदात्तोपदेश इत्यादिकांपैकीं अमन्त धातूंच्या अनुनासिकाचा ल्यप् पुढें असतांना विकल्पानें लोप होतो. उदाहरणार्थ प्रयत्य, प्रयम्य; प्ररत्य, प्ररम्य; प्रणत्य, प्रणम्य.

( सू. ४० ) 'गमः क्वौ' येथें ' गमः ' याचे ऐवजीं ' गमादीनाम् ' असें म्हणावें. कारण, परीतत्सहृकण्ठिका, संयत्, सुनत्, येथेंही अनुनासिकाचा लोप झाला पाहिजे.

---

१. ( सू. ३५ ) शास् धातूचे स्थानी हि प्रत्यय पुढे असतांना ' शा ' असा आदेश होतो.

१.( सू. ३६) हन् धातूला हि प्रत्यय पुढें असताना ' ज ' असा आदेश होतो.

१.(सू. ३७) अनुनासिकान्त असे जे अनुदात्त धातू, तसेच तनोत्यादिक धातू आणि वन् धातु यांच्या शेवटीं असलेल्या अनुनासिकवर्णाचा झलादि कित् किंवा ङित् प्रत्यय पुढें असतांना लोप होतो.

२. ' अनुदात्तोपदेश० ' या प्रकृत सूत्राच्या पुढें ' वा ल्यपि ' असें मूळचें सूत्र आहे. त्यामुळें ह्या प्रकृत सूत्रांतील सर्वच धातूंना ल्यप् पुढें असतांना विकल्प प्राप्त होतो, तो इष्ट नाहीं. तर, त्यांपैकीं अमन्त धातूंना विकल्प आणि तद्व्यतिरिक्त धातूंना नित्य लोप इष्ट आहे. ही व्यवस्था सिद्ध होण्याकरितां हें वचन केलें आहे.

१. ( सू. ३८ ) ल्यप् पुढे असतांना अनुदात्तोपदेश वन् व तनोत्यादिक धातूंच्या अनुनासिकाचा लोप विकल्पानें होतो.

१. ( सू. ३९ ) क्तिच् प्रत्यय पुढे असतांना अनुदात्तोपदेश वन् व तनोत्यादिक धातूंच्या अनुनासिकाचा लोप होत नाहीं आणि दीर्घही होत नाहीं.

१. ( सू. ४० ) क्वि प्रत्यय पुढें असतांना गम् धातूच्या अनुनासिकाचा लोप होतो.

२. येथें परि उपसर्ग पूर्वक तन् धातूहून क्विप्, अनुनासिकलोप, तुक् आगम ( ६।१।७१ ), ' नहिवृति० ' ( ६।३।११६ ) यानें पूर्वपदाला दीर्घ हीं कार्यें

ऊङ् च गमादीनामिति वक्तव्यम् । अग्रेगूः भ्रूः ॥

[ विड्वनोरनुनासिकस्याऽऽत् ॥ ६ । ४ । ४१ ॥ ]

जनसनखनां सञ्झलोः ॥ ६ । ४ । ४२ ॥

अथ किमयं समुच्चयः । सनि च झलादौ चेति । आहोस्वित्सन्विशेषणं झल्ग्रहणम् । सनि झलादाविति । किं चातः । यदि समुच्चयः सन्यझलादावपि प्राप्नोति । सिसनिषति जिजनिषते चिखनिषति । अथ सन्विशेषणं झल्ग्रहणं जातः जातवानित्यत्र न प्राप्नोति ॥ यथेच्छसि तथास्तु । अस्तु तावत्समुच्चयः । ननु चोक्तं सन्यझलादावपि प्राप्नोतीति । नैष दोषः । प्रकृतं झल्ग्रहणमनुवर्तते तेन सनं विशेषयिष्यामः । सनि झलादाविति । अथवा पुनरस्तु सन्विशेषणम् । कथं जातः जातवानिति । प्रकृतं

---

गम् वगैरे धातूंना ऊङ् असा आदेशही होतो असें वचन करावें, अर्थात् अनुनासिकलोपही होतो. उदाहरणार्थ– अग्रेगूः

( सू. ४२ ) काय, येथें 'सञ्झलोः' म्हणजे सन्‌ही पुढें असतांना व झलादीही पुढें असताना असा समुच्चय समजावयाचा, किंवा झलादि सन् पुढें असतांना असें सनाचें विशेषण झल्–ग्रहण समजावयाचें ?

यांत काय विशेष आहे ?

जर समुच्चय समजावा तर सिसनिषति, जिजनिषते, चिखनिषति, येथें सन् प्रत्यय झलादि नसतांनाही आत्व होऊं लागेल. आतां जर झल्ग्रहण सनाचें विशेषण समजावें तर जातः, जातवान् येथें आत्व प्राप्त होत नाहीं.

तुझ्या मनास येईल तसें असो; समुच्चय कां असे ना.

पण सन् प्रत्यय झलादि नसतांनाही आत्व होऊं लागेल असें आतांच सांगितलें आहे ना ?

हा दोष येत नाहीं. कारण 'अनुदात्तोप०' (६।४।३७) येथून झल्ग्रहण अनुवृत्त आहे; तें सन् प्रत्ययाचें विशेषण करूं म्हणजे झलादि सन् पुढें असतांना असा अर्थ होईल.

किंवा सूत्रांतील झल्–ग्रहण हें सनाचें विशेषण केलें तरी हरकत नाहीं.

तसें केलें तर जातः व जातवान् येथें आत्व कसें होईल ?

---

झाली आहेत. संयत् येथें सम्–उपसर्गपूर्वक यम् धातूहून क्विप्, अनुनासिकलोप, व तुक् हीं कार्यें झालीं आहेत. सुनत् येथें सु–उपसर्ग–पूर्वक नम् धातूहून क्विप्. इतर कार्यें पूर्वीप्रमाणें.

३. अग्रे गच्छतीति अग्रेगूः. अग्रे असें सप्तम्येकवचनान्त उपपद असतांना गम् धातूहून क्विप् व अनुनासिकलोप केल्यानंतर अकाराला ऊङ्, 'तत्पुरुषे कृति०' (६।३।१४) यानें सप्तमीचा अलुक्. अग्रेभ्रूः येथेंही असेंच समजावें.

१. ( सू. ४१ ) विट् आणि वन् प्रत्यय पुढें असतांना अङ्गाच्या शेवटीं असलेल्या अनुनासिक वर्णाला आ असा आदेश होतो.

१. (सू. ४२) जन्, सन्, व खन्, या धातूंच्या नकाराला झलादि सन् किंवा कित् अथवा ङित् प्रत्यय पुढें असतांना आ असा आदेश होतो.

२. येथें जन् धातूहून सन् प्रत्यय, द्वित्व, इट आगम, वगैरे कार्यें झालीं आहेत. सिसनिषति येथें सन् धातूहून सन् 'सनीवन्तर्ध०' (७।२।४९) यानें पाक्षिक इट् आगम. 'स्तौतिण्योः (८।३।६१) या नियमानें षत्व होत नाहीं.

३. येथें जन् धातूहून क्त आणि क्तवतु प्रत्यय (३।२।१०२), इट् आगमाचा निषेध. (७।२।१५।) आणि प्रकृत सूत्रानें आत्व हीं कार्यें झालीं आहेत.

झलि क्ङितीत्यनुवर्तते ॥ यद्येवं नार्थो झल्ग्रहणेन । योगविभागः करिष्यते । जनसनखनामनुनासिकस्याकारो भवति झलि क्ङिति । ततः सनि । सनि च जनसनखनामनुनासिकस्याकारो भवति झलीत्येव । तस्मान्नार्थो झल्ग्रहणेन ॥

**सनोतेरनुनासिकलोपादात्त्वं विप्रतिषेधेन ॥ १ ॥**

सनोतेरनुनासिकलोपादात्त्वं भवति विप्रतिषेधेन । सनोतेरनुनासिकलोपस्यावकाशोऽन्ये तनोत्यादयः । आत्त्वस्यावकाशोऽन्ये जनादयः । सनोतेरनुनासिकस्योभयं प्राप्नोति आत्त्वं भवति विप्रतिषेधेन ॥ नैष युक्तो विप्रतिषेधः । न हि सनोतेरनुनासिकलोपस्यान्ये तनोत्यादयोऽवकाशः । सनोतेर्यस्तनोत्यादिषु पाठः सोऽनवकाशः । न खल्वप्यात्त्वस्यान्ये जनादयोऽवकाशः । सनोतेर्यदात्त्वे ग्रहणं तदनवकाशं तस्यानवकाशत्वादयुक्तो विप्रतिषेधः ॥ एवं तर्हि तनोत्यादिषु पाठस्तावत्सावकाशः । कोऽवकाशः । अन्यानि तनोत्यादिकार्याणि । तनादिभ्यस्तथासोः [ २. ४. ७९ ] इति । आत्त्वेऽपि ग्रहणं सावकाशम् । कोऽवकाशः । सनि ये विभाषा [ ६. ४. ४३ ] च ।

---

'अनुदात्तोपदेश०' येथून 'झलि क्ङिति' हीं दोन्ही पदें अनुवृत्तीनें आणावीं म्हणजे तें आत्वाचें स्वतंत्र निमित्त समजलें जाईल.

असें आहे तर मग येथें झल्ग्रहण मुळींच करावयास नको. फक्त योगविभाग केला म्हणजे झालें. तो असा– 'जनसनखनाम्' म्हणजे जन्, सन् व खन् यांच्या अनुनासिकाला आ आदेश होतो झलादि कित् किंवा ङित् प्रत्यय पुढें असतांना असा त्याचा अर्थ होईल. त्यानंतर 'सनि' हें सूत्र. येथें 'झलि' हें अनुवृत्त आहेच. झलादि सन् प्रत्यय पुढें असतांना जन् सन् आणि खन् यांच्या अनुनासिकाला आ आदेश होतो असा त्याचा अर्थ होईल. तेव्हां येथें झल्ग्रहण करण्यांत कांहीं अर्थ नाहीं.

(वा. १) सन् धातूला, विप्रतिषेध असल्यामुळें अनुनासिकलोपापेक्षा परत्वास्तव आत्व होतें. उदाहरणार्थ– अनुनासिकलोपाला सन् धातूहून अन्य जन् व खन् हे अवकाश आहेत. पण सातः व सातवान्[४] येथें सन् धातूच्या नकाराला दोन्ही प्राप्त होत आहेत. तेथें विप्रतिषेध असल्यामुळें परत्वास्तव आत्व होतें.

हा विप्रतिषेध योग्य नाहीं. कारण, सन् धातूसंबंधीं जो अनुनासिकलोप त्याला अन्य तन् वगैरे धातू अवकाश होऊं शकत नाहींत. तेव्हां, सनोति धातूचा तनोत्यादिकांमध्यें पाठ केला आहे तो अनवकाशच होत आहे. तसेंच आत्वालाही अन्य जन् व खन् धातू अवकाश होत नाहींत. म्हणून आत्वविधायकांमध्यें सन् धातूचें ग्रहण केलें आहे तें अनवकाशच होत आहे. म्हणून, विप्रतिषेध अयोग्य होय.

तर मग तनोत्यादिकांमध्यें सनोतीचा जो पाठ केला आहे त्यालाही अवकाश आहे.

तो कोणता ?

अनुनासिकलोपाहून अन्य अशीं 'तनादिभ्यस्तथासोः' (२।४।७९) इत्यादि[५] शास्त्रांनीं सांगितलेलीं कार्यें तीं अवकाश होत. तसेंच, आत्व सांगणाऱ्या शास्त्रामध्यें जें सन् धातूचें ग्रहण केलें आहे त्यालाही अवकाश आहे.

तो कोणता ?

सन् पुढें असतांना आत्व होणें; तसेंच 'ये

---

४. सन् धातूहून क्त व क्तवतु. 'यस्य विभाषा' (७।२।१५) यानें इट् आगमाचा निषेध आणि प्रकृत सूत्रानें आत्व हीं कार्यें झालीं आहेत.

५. इत्यादि शब्दानें 'तनादिकृञ्भ्य उः' (३।१।७९) हें शास्त्र घ्यावें.

उभयोः सावकाशयोर्युक्तो विप्रतिषेधः ॥ एवमप्ययुक्तो विप्रतिषेधः । पठिष्यति ह्याचार्यः पूर्वत्रासिद्धे नास्ति विप्रतिषेधोऽभावादुत्तरस्येति । एकस्य हि नामाभावे विप्रतिषेधो न स्यात्किं पुनर्यत्रोभयं नास्ति ॥ नैष दोषः । भवतीह विप्रतिषेधः । किं वक्तव्यमेतत् । न हि । कथमनुच्यमानं गंस्यते । आचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयति भवतीह विप्रतिषेध इति यदयं घुमास्थागापाजहातिसां हलि [ ६. ४. ६६ ] इति हल्ग्रहणं करोति । कथं कृत्वा ज्ञापकम् । हल्ग्रहणस्यैतत्प्रयोजनं हलादावीत्त्वं यथा स्यादिह मा भूत् गोदः कम्बलद इति । यदि चात्र विप्रतिषेधो न स्याद्धल्ग्रहणमनर्थकं स्यात् । अस्त्वत्रेत्त्वम् । ईत्त्वस्यासिद्धत्वाल्लोपो भविष्यति । पश्यति त्वाचार्यो

---

विभाषा ' या पुढील सूत्रानें विकल्पानें आत्व होणें हा अवकाश होय. तेव्हां दोघांनाही अवकाश असल्यामुळें विप्रतिषेध योग्यच आहे.

तरीही विप्रतिषेध योग्य नाहीं. कारण, ' पूर्वत्रासिद्धम् ' ( ८।२।१ ) या अधिकारामध्यें उत्तरसूत्राचा अभाव असल्यामुळें विप्रतिषेध घडत नाहीं ( ८।२।१ वा. १ ) असें आचार्य सांगणार आहेत. तेव्हां जर तेथें एकाचाच अभाव असतांनाही विप्रतिषेध संभवत नाहीं, तर मग जेथें दोघांचाही अभाव आहे तेथें विप्रतिषेध संभवत नाहीं हें निराळें सांगण्याचें कारणच नाहीं.

हा दोष येत नाहीं. कारण ' असिद्धवद० ' ( ६।४।२२ ) या अधिकारामध्यें विप्रतिषेध आहे.

' असिद्धवदत्राऽऽभात् ' या अधिकारामध्यें विप्रतिषेध आहे असें वचन करावयाचें कीं काय ?

नाहीं.

तर मग तसें प्रत्यक्ष सांगितल्यावांचून कसें बरें समजतां येईल ?

ज्याअर्थी आचार्य हे ' घुमास्थागा० ' ( ६।४।६६ ) येथें हल्ग्रहण करीत आहेत त्याअर्थी ' असिद्धवद० ' ( ६।४।२२ ) या अधिकारामध्यें विप्रतिषेध आहे असें ते ज्ञापन करीत आहेत.

तें ज्ञापन कसें ?

' घुमास्था० ' येथें हल्ग्रहण करण्याचें हें प्रयोजन आहे कीं– हलादि प्रत्यय पुढें असतांनाच ईत्व व्हावें; आणि गोदः व कम्बलदः, येथें अजादि प्रत्यय पुढें असतांना न व्हावें. तेव्हां, जर ' असिद्धवदत्रा० ' या अधिकारामध्यें विप्रतिषेध नसेल तर तेथील हल्ग्रहण अनर्थक होईल. तें असें कीं--गोदः व कम्बलदः येथें ईत्व होऊं दे. तें ' असिद्धवदत्र० ' यानें असिद्ध असल्यामुळें 'आतो लोप०' ( ६।४।६४ ) यानें लोप होऊन रूप साधेल. तेव्हां ' असिद्धवदत्राभात्० ' या अधिकारामध्यें विप्रतिषेध आहे असें

---

६. सनोति इत्यादि उदाहरणांमध्यें उ प्रत्यय व असात इत्यादि उदाहरणामध्यें सिच् प्रत्ययाचा लुक् होण्यानें तनोत्यादि गणामध्यें सन् धातूचा पाठ चरितार्थ आहे. तसेंच, सिषासति व सायात् येथें आत्व होण्यानें प्रकृत सूत्रांतील सनूग्रहणही चरितार्थ आहे. असें निरनिराळें चारितार्थ्य असल्यामुळें विप्रतिषेध घेणें योग्य आहे.

७. एका शास्त्राला असिद्धत्व असतांना जर त्याला सिद्ध शास्त्राशीं स्पर्धा करतां येत नाहीं, तर जेथें दोघांनाहि एकमेकाच्या दृष्टीनें असिद्धत्व आहे तेथें स्पर्धेचें नांवच काढावयास नको. आणि येथें आत्व आणि अनुनासिकलोप हीं दोन्हीं शास्त्रें आभीय असल्यामुळें एकमेकाच्या दृष्टीनें असिद्ध आहेत. ( ६।४।२२ ).

भवतीह विप्रतिषेधस्ततो हल्ग्रहणं करोति ॥ नैतदस्ति ज्ञापकम् । व्यवस्थार्थमेतत्स्यात् । हलादावीत्त्वं यथा स्यादजादौ मा भूदिति । किं च स्यात् । इयङादेशः प्रसज्येत । ननु चासिद्धत्वादेवेयङादेशो न भविष्यति । न शक्यमीत्त्वमियङादेशे ऽसिद्धं विज्ञातुम् । इह हि दोषः स्यात् धियौ धियः पियौ पियः इति । नैतदीत्त्वम् । किं तर्हि । ध्याप्योः संप्रसारणमेतत् । समानाश्रयं खल्वप्यसिद्धं भवति व्याश्रयं चैतत् । कथम् । क्वावीत्त्वं क्विबन्तस्य विभक्तावियङादेशः ॥ व्यवस्थार्थमेव तर्हि हल्ग्रहणं कर्तव्यम् । कुतो

---

आचार्य मनांत धरूनच हल्ग्रहण करीत आहेत.

हें हल्ग्रहण ज्ञापक होऊं शकत नाहीं. कारण हलादि प्रत्यय पुढें असतांना ईत्त्व व्हावें आणि अजादि प्रत्यय पुढें असतांना न व्हावें या व्यवस्थेकरितां हा हल् शब्द पाहिजे.

पण अजादि प्रत्यय पुढें असतांना ईत्त्व झाल्यास कोणता दोष येईल ?

जर अजादि प्रत्यय पुढें असतांनाही ईत्त्व होईल तर तेथें इयङ् आदेश होऊं लागेल.

पण ईत्त्व हें आभीय असिद्ध असल्यामुळेंच इयङ् आदेश होणार नाहीं.

इयङ् आदेश कर्तव्य असतांना ईत्त्व असिद्ध समजणें शक्य नाहीं. कारण, तसें समजलें तर धियौ,[10] धियः, पियौ, पियः; येथें दोष येतो. धियौ वगैरे उदाहरणामध्यें ईत्त्व झालेंच नाहीं.

तर मग ते शब्द कसे साधले आहेत ?

' ध्याप्योः संप्रसारणम्०' (उणा. ४।११४) यानें संप्रसारण केलें आहे. शिवाय, धियौ वगैरे उदाहरणांमध्यें ईत्त्व गृहीत धरलें तरीही समानाश्रयच शास्त्र असिद्ध होतें. आणि हें ईत्त्व तर विभिन्नाश्रय आहे.

तें कसें ?

तें असें कीं—क्वि प्रत्यय पुढें असतांना ईत्त्व होतें; आणि क्विबन्ताला विभक्ति पुढें असतांना इयङ्[11] आदेश होतो.

तरी पण व्यवस्थेकरितांच हल्ग्रहण करावयास पाहिजे. कारण, ईत्त्व करून तें असिद्ध असल्यामुळें लोप करून उदाहरण साधावयाचें.

---

८. गो व कम्बल हे शब्द उपपद असतांना दा धातूहून क प्रत्यय ( ३।२।३ ) व ' आतो लोपः ' ( ६।४।६६ ) यानें आकाराचा लोप झाला आहे. त्यामुळें गोदः व कम्बलदः हीं रूपें साधतात. येथें दा+अ असें असतां ' घुमास्था०' ( ६।४।६६ ) येथें हल्ग्रहण नसेल तर तें ईत्त्व आणि आकाराचा लोप हीं बरोबरच प्राप्त होत आहेत. परंतु, आभीयासिद्धत्वाविषयीं विप्रतिषेध नसल्यामुळें प्रथमतः ईत्त्व होतें तें परत्वास्तव न होतां प्रतिपदोक्तत्वास्तव होईल; व मागाहून ईत्त्वाचे असिद्धत्वास्तव आलोप केला म्हणजे काम भागत असल्यामुळें हल्ग्रहण व्यर्थ होतें. त्यावरून आभीयासिद्धत्वाविषयीं विप्रतिषेध असल्याचें ठरतें. अर्थात् युगपत्प्राप्तिस्थलीं असिद्धत्व नाहीं. तेव्हां परत्वास्तव प्रथमतः आलोपाचा बाध करून ईत्त्व केलें असतां मागाहून सकृद्गतिन्यायानें आलोप होणार नाहीं. सबब ईत्त्व न होण्याकरितां हल्ग्रहण केलें तें बरोबरच आहे.

९. तेव्हां गोदः येथें ईत्त्व झालें तरी तें आभीय-असिद्ध असल्यामुळें ' हा आकारच आहे ' अशा समजुतीनें त्याचा लोप होऊन रूप साधेल असें म्हणतां येत नाहीं.

१०. धा व पा या धातूंहून क्विप् प्रत्यय, ईत्त्व ( ६।४।६६), पुढें औ प्रत्यय, नंतर इयङ् ( ६।४।७७ ) हीं कार्यें झालीं आहेत.

११. तात्पर्य, ईत्त्वाविषयीं आभीयासिद्धत्व येत नाहीं असें मानण्याचें कारण नाहीं. तेव्हां गोदः इत्यादि स्थलीं ईत्त्व व इयङ् हे समानाश्रय होत असल्यामुळें इयङ् कर्तव्य असतांना ईत्त्व असिद्ध होणार; म्हणून इयङ् होणार नाहीं. तेव्हां ज्ञापक कायम होत आहे.

ह्येतदीत्त्वस्यासिद्धत्वाल्लोपो न पुनर्लोपस्यासिद्धत्वादीत्त्वमिति। तत्र चक्रकमव्यवस्था प्रसज्येत। नास्ति चक्रकप्रसङ्गः। न ह्यव्यवस्थाकारिणा शास्त्रेण भवितव्यम्। शास्त्रतो नाम व्यवस्था। तत्रेत्त्वस्यासिद्धत्वाल्लोपो लोपेनावस्थानं भविष्यति। न खल्वपि तस्मिंस्तदेवासिद्धं भवति॥ व्यवस्थार्थमेव तर्हि हल्ग्रहणं कर्तव्यम्। हलादावीत्त्वं यथा स्यादजादौ मा भूदिति। कुतो ह्येतदीत्त्वस्यासिद्धत्वाल्लोपो लोपेनावस्थानं भविष्यति न पुनर्लोपस्यासिद्धत्वादीत्त्वमीत्त्वेन व्यवस्थानं स्यात्। तदेव खल्वपि तस्मिन्नसिद्धं भवति। कथम्। पठिष्यति ह्याचार्यश्चिणो लुकि तग्रहणानार्थक्यं संघातस्याप्रत्ययत्वात्तलोपस्य चासिद्धत्वादिति। चिणो लुक्चिणो लुक्येवासिद्धो भवति॥ एवं तर्हि यदि व्यवस्थार्थमेतत्स्यान्नैवायं हल्ग्रहणं कुर्वीत। अविशेषेणायमीत्त्वमुक्त्वा तस्याजादौ लोपमपवादं विदधीत। इदमस्ति। आतो लोप इटि चेति। ततो घुमास्थागापाजहातिसाम्।

---

परंतु, असाच क्रम कशावरून घ्यावा कीं अगोदर ईत्त्व करून तें असिद्ध समजून लोप होतो, अगोदर लोप करून तो असिद्ध समजून ईत्त्व होतें असें कां समजूं नये? शिवाय, ईत्त्व करून तें असिद्ध समजून लोप झाला तरी पुनः ईत्त्व होणारच; कारण लोप आणि पूर्वी झालेलें ईत्त्व हीं दोन्ही कार्यें ईत्वाच्या दृष्टीनें असिद्ध आहेत; तेव्हां चक्रक येतें.

असें चक्रक मात्र येत नाहीं. कारण शास्त्र कांहीं अव्यवस्थेकरितां केलें नाहीं. शास्त्रानें व्यवस्थाच झाली पाहिजे. ती अशी कीं—ईत्त्व करून तें असिद्ध समजून लोप केला म्हणजे व्यवस्था होत आहे. पुनः ईत्त्व मात्र होणार नाहीं. कारण ईत्त्व हें आभीय आहे.

हें सर्व खरें; पण तें आपणच आपल्याला असिद्ध असें कसें म्हणतां येईल?

तरी पण व्यवस्थेकरितांच हल्ग्रहण केलें पाहिजे. हलादि प्रत्यय पुढें असतांनाच ईत्त्व व्हावें, अजादि प्रत्यय पुढें असतांना होऊं नये. कारण, ईत्व करून, तें असिद्ध असल्यामुळें लोप झाला म्हणजे तेथेंच शास्त्रप्रवृत्ति थांबून व्यवस्था होईलच. आणि लोप करून तो असिद्ध असल्यामुळें ईत्व झालें म्हणजे तेथें शास्त्रप्रवृत्ति न थांबतां अव्यवस्था होईल असें कशावरून? कारण, आभीयशास्त्र हें आपणच आपल्याला असिद्ध होणारच.

तें कसें?

आचार्य पुढें असें सांगणार आहेत कीं— 'चिणो लुक्' या लुकाविषयीं 'त' शब्दाचें ग्रहण करावयास नको. कारण, संघात हा प्रत्यय नव्हे; आणि तलोप हा असिद्ध आहे (६।४।१०४ वा. १,२). तेव्हां जसा अकारितराम् येथें 'चिणो लुक्' यानें झालेला 'त' या प्रत्ययाचा लुक् हा पुनः त्याच सूत्रानें 'तर' या प्रत्ययाचा लुक् कर्तव्य असतांना असिद्ध होतो तसें येथेंही घेतां येईल.

तर मग एकंदरींत जर व्यवस्थेकरितांच हें हल्ग्रहण केलें पाहिजे असें असतें तर येथें हल्ग्रहण मुळींच केलें नसतें. तर घु, मा, स्था इत्यादिकांना मोघमच कित् अथवा ङित् पुढें असतांना ईत्वाचें विधान करून फक्त अजादि कित् अथवा ङित् पुढें असतांना त्या ईत्वाचा अपवाद म्हणून आकाराचा लोप सांगितला असता.

तो कसा?

"आतो लोप इटि च" (६।४।६४) असें

लोपो भवतीटि चाजादौ क्ङितीति । किमर्थं पुनरिदम् । ईत्त्वं वक्ष्यति तद्बाधनार्थम् । तत ईत् । ईश्च भवति घ्वादीनाम् । तत एर्लिङि । वान्यस्य संयोगादेः । न ल्यपि । मयतेरिदन्यतरस्याम् । ततो यति । यति चेद्भवति । सोऽयमेवं लघीयसा न्यासेन सिद्धे सति यद्धल्ग्रहणं करोति गरीयांसं यत्नमारभते तज्ज्ञापयत्याचार्यो भवतीह विप्रतिषेध इति ॥

[ [1]ये विभाषा ॥ ६ । ४ । ४३ ॥

तनोतेर्यकि ॥ ६ । ४ । ४४ ]

[1]सनः क्तिचि लोपश्चास्यान्यतरस्याम् ॥ ६ । ४ । ४५ ॥

इहान्यतरस्यांग्रहणं शक्यमकर्तुम् । कथम् । सनः क्तिचि लोपश्च । आत्त्वं च विभाषेति ॥

अपर आह । सर्व एवायं योगः शक्योऽवक्तुम् । कथम् । इह लोपोऽपि प्रकृत आत्त्वमपि प्रकृतं विभाषाग्रहणमपि प्रकृतम् । तत्र केवलमभिसंबन्धमात्रं कर्तव्यम् ।

---

सूत्र आहेच त्याचे पुढें 'घुमास्थागापाजहातिसाम्' एवढेंच सूत्र करावें. अजादि कित् ङित् किंवा इट् पुढें असतांना सूत्रामध्यें सांगितलेल्या धातूंच्या आकाराचा लोप होतो असा त्याचा अर्थ होईल.

पूर्वसूत्रानें रूपसिद्धि होत असतां कशाकरितां बरें पुनः ह्या सूत्रानें लोप सांगितला आहे ?

घु मा स्था इत्यादिक धातूंना सूत्रकार ईत्वाचें विधान करणार आहेत. त्याचे अपवादादाखल हें सूत्र केलें आहे. त्याचे पुढें 'ईत्' असें सूत्र करावें. घु मा स्था इत्यादिक धातूंना कित् अथवा ङित् प्रत्यय पुढें असतांना ईत्व होतें असा त्याचा अर्थ होईल. त्याचे पुढें 'एर्लिङि', 'वाऽन्यस्य संयोगादेः', 'न ल्यपि', 'मयतेरिदन्यतरस्याम्' अशीं ओळीनें चार सूत्रें घालून त्यानंतर 'यति' असें सूत्र करावें. यत् प्रत्यय पुढें असतांना आकाराला ईत्व होतें असा त्याचा अर्थ होईल. अशा रीतीनें सूत्रें फिरवून थोडक्यांत काम भागत असतां ज्या अर्थी आचार्य हल्–ग्रहण करून गुरुभूत यत्न आरंभीत आहेत त्या अर्थी 'असिद्धवदत्रा०' या अधिकारामध्यें युगपत्प्राप्तिस्थलीं असिद्धत्वाचा बाध करून विप्रतिषेध होतो असें ते सुचवीत आहेत.

( सू. ४५ ) येथें अन्यतरस्याम् हा शब्द घातला नाहीं तरी चालेल.

तें कसें ?

'सनः क्तिचि लोपश्च' एवढेंच सूत्र करावें. म्हणजे सन् धातूच्या नकाराला क्तिच् पुढें असतांना लोप आणि आत्व विकल्पानें होतात असा अर्थ होईल.

येथें दुसऱ्या एकाचें असें म्हणणें आहे कीं 'सनः क्तिचि' या दोन पदांवांचून सगळेंच हें सूत्र करावयास नको.

ते कसें ?

'अनुदात्तोपदेश०' (६।४।३७) येथें लोप हा शब्दही आहे; तसाच आत् हाही शब्द मागें (६।४।४१) आहे. आणि विभाषा ग्रहणही मागें (६।४।४३) आहे. तेव्हां या तिन्ही शब्दांची 'सनः क्तिचि' येथें अनुवृत्ति

---

1. (सू. ४३) जन्, सन् व खन् यांच्या 'न'–काराला यकारादि कित् किंवा ङित् प्रत्यय पुढें असतांना 'आ'कार आदेश होतो.

1. (सू. ४४) यक् प्रत्यय पुढें असतांना तन् धातूच्या नकाराला 'आ'कार आदेश विकल्पानें होतो.

1. (सू. ४५) क्तिच् प्रत्यय पुढें असतांना सन् धातूच्या नकाराला आकार आदेश विकल्पानें होतो आणि सन् धातूच्या नकाराचा लोपही विकल्पानें होतो.

सनः क्तिचि लोपश्चात्वं च विभाषेति ॥

**आर्धधातुके ॥ ६ । ४ । ४६ ॥**

कानि पुनरार्धधातुकाधिकारस्य प्रयोजनानि ।

**अतो लोपो यलोपश्च णिलोपश्च प्रयोजनम् ।**
**आल्लोप ईत्त्वमेत्त्वं च चिण्वद्भावश्च सीयुटि ॥ १ ॥**

अतो लोपः [ ६. ४. ४८ ] चिकीर्षिता चिकीर्षितुम् । आर्धधातुक इति किमर्थम् । चिकीर्षति ॥ नैतदस्ति प्रयोजनम् । अस्त्वत्र सनोऽकारलोपः शपो ऽकारस्य श्रवणं भविष्यति । शप एव तर्हि मा भूदिति । एतदपि नास्ति प्रयोजनम् । आचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयति नानेन शबकारस्य लोपो भवतीति यदयमदिप्रभृतिभ्यः शपो लुकं शास्ति । नैतदस्ति ज्ञापकम् । कार्यार्थमेतत्स्यात् । वित्तः मृष्ट इति । यत्तर्ह्याकारान्तेभ्यो लुकं शास्ति ।

---

करून केवळ संबंध केला म्हणजे झालें. तो संबंध असा– सन् धातूला क्तिच् पुढें असतांना लोप आणि आत्व विकल्पानें होतात.

( सू. ४६ ) या आर्धधातुकाधिकाराचीं प्रयोजनें कोणतीं ?

' अतो लोपः ' ( ६।४।४८ ) यानें सांगितलेला अकाराचा लोप चिकीर्षिता चिकीर्षितुम् येथें होतो आणि आर्धधातुक पुढें असतांना असें म्हटलें असल्यामुळें चिकीर्षति येथें होत नाहीं.

हें प्रयोजन नाहीं. कारण, चिकीर्षति येथें सन् प्रत्ययाच्या अकाराचा लोप झाला तरी शपाच्या अकाराचें श्रवण होईल.

तर मग, शपाच्याच अकाराचा लोप होऊं लागेल; तो न व्हावा म्हणून हा अधिकार पाहिजे.

हेंही प्रयोजन नाहीं. कारण, ज्या अर्थी आचार्य हे ' अदिप्रभृतिभ्यः० ' ( २।४।७२ ) या सूत्रानें शपाच्या लुकाचें विधान करीत आहेत त्या अर्थी शपाच्या अकाराचा लोप या सूत्रानें होत नाहीं असें ते सुचवीत आहेत.

हें ज्ञापक होत नाहीं. तर वित्तः व मृष्टः येथें प्रत्ययलक्षणनिषेधाकरितां लुक् सांगितला पाहिजे.

तर मग जें आकारान्त धातूहून शपाच्या लुकाचें याति, वाति वगैरे ठिकाणीं आचार्य विधान करीत आहेत तें ज्ञापक होईल. तसेंच, अस् धातूहूनही शपाच्या लुकाचें अस्ति स्तः वगैरे

---

१. ( सू. ४६ ) हें अधिकारसूत्र आहे. येथून पुढील सूत्रांमध्यें ' आर्धधातुके ' या पदाचा संबंध होतो. हा अधिकार ' न ल्यपि ' ( ६।४।६९ ) येथपर्यन्तच समजावा.

२. कृ धातूहून सन् प्रत्यय; धातु अनुदात्त असल्यामुळें सनाला इट् आगम होत नाहीं; ' इको झल् ' ( १।२।९ ) यानें कित्त्व, ' क्ङिति च ' यानें गुणाचा निषेध, 'अज्झन०' (६।४।१६) यानें दीर्घ, ' ॠत इद्० ' ( ७।१।१०० ) यानें इत्त्व , ' सन्यङोः ' यानें द्वित्व , अभ्यासह्रस्व, वगैरे कार्यें येथें झालीं आहेत.

३. विद् व मृज्, धातूंहून लट्, तस्, शप्, शब्लुक्, ' क्ङिति च ' ( १।१।५ ) यानें गुणाचा ( ७।२।८६ ) आणि वृद्धीचा ( ७।२।११४ ) निषेध झाल्यामुळें वित्तः व मृष्टः हीं रूपें साधतात. येथें ' अतो लोपः ' यानें शपाच्या अकाराचा लोप केला असतां प्रत्ययलक्षणानें गुण व वृद्धि प्रवृत्त होतील. आणि लुक्विधान केलें असतां ' न लुमता० ' ( १।१।६३ ) यानें प्रत्ययलक्षणाचा निषेध झाल्यामुळें गुण व वृद्धि होत नाहींत.

४. याति, वाति, अत्ति, अस्ति इत्यादि स्थलीं शपाचा लुक् केला काय किंवा ' अतो लोपः ' यानें अकाराचा लोप केला काय त्यांत कांहीं विशेष नाहीं. कारण, येथें गुण व वृद्धि यांचा प्रसंगच नाहीं. तेव्हां अशा धातूंचा अदादि गणामध्यें पाठ करण्यांत काय मतलब आहे ?

याति वाति ॥ इदं तर्हि प्रयोजनम् । वृक्षस्य प्लक्षस्य । अतो लोपः प्राप्नोति ॥ यलोपोऽपि प्रयोजनम् । बेभिदिता चेच्छिदिता । आर्धधातुक इति किमर्थम् । बेभिद्यते चेच्छिद्यते ॥ णिलोपः । पाच्यते याज्यते । आर्धधातुक इति किमर्थम् । पाचयति याजयति ॥ आल्लोपः । ययतुः ययुः । ववतुः ववुः । आर्धधातुक इति किमर्थम् । यान्ति वान्ति ॥ ईत्वम् । दीयते धीयते । आर्धधातुक इति किमर्थम् । अदाताम् अधाताम् ॥ एत्वम् । ग्लेयात् म्लेयात् । आर्धधातुक इति किमर्थम् । ग्लायात् ॥ चिण्व-

---

ठिकाणीं विधान करीत आहेत तेंही ज्ञापक होईल.[5]

तर मग, आर्धधातुकाधिकाराचें हें प्रयोजन समजावें कीं, वृक्षस्य व प्लक्षस्य येथें 'अतो लोपः' यानें लोप प्राप्त होतो तो होत नाहीं.

'यस्य हलः' (६।४।४९) यानें सांगितलेला जो यकाराचा लोप तेथेंही आर्धधातुकाधिकाराचा उपयोग होत आहे. उदाहरणार्थ—बेभिदिता[6] चेच्छिदिता.

आर्धधातुके हें कशाकरितां ?

बेभिद्यते चेच्छिद्यते येथें यकाराचा लोप न व्हावा म्हणून.

'णेरनिटि' (६।४।५१) यानें सांगितलेला जो णिलोप तेथेंही आर्धधातुके या अधिकाराचा उपयोग होत आहे. जसें—पाच्यते[7], याज्यते; कारणा, हारणा.

आर्धधातुके हें कशाकरितां ?

पाचयति, याजयति, येथे णिलोप न व्हावा म्हणून.

'आतो लोप इटि च' (६।४।६४) यानें सांगितलेला जो आकाराचा लोप तेथेंही या अधिकाराचा उपयोग होतो. उदाहरणार्थ—ययतुः, ययुः; ववतुः, ववुः.

आर्धधातुके हें कशाकरितां ?

यान्ति वान्ति येथें आल्लोप न व्हावा म्हणून.

'घुमास्था०' (६।४।६६) यानें सांगितलेलें जें ईत्व तेथेंही या अधिकाराचा उपयोग होत आहे. उदाहरणार्थ—दीयते, धीयते.

आर्धधातुके हें कशाकरितां ?

अदाताम्[8], अधाताम् येथें ईत्वन व्हावें म्हणून.

'वाऽन्यस्य०' (६।४।६८) यानें सांगितलेलें जें एत्व तेथेंही या अधिकाराचा उपयोग होत आहे. उदाहरणार्थ—ग्लेयात्[9], म्लेयात्.

आर्धधातुके हें कशाकरितां ?

---

सबब, त्यांचा भ्वादि गणामध्यें पाठ करणें उचित असतां ज्याअर्थी शबलुक् होण्याकरितां अदादि गणामध्यें पाठ केला आहे त्याअर्थी शपाचा 'अतो लोपः' यानें लोप होत नाहीं असें अनुमान निघतें.

५. "याति वाति ॥ अस्तेश्च । अस्तेश्च शपो लुकं शास्ति—अस्ति ॥ इदं तर्हि प्रयोजनम् ।" हा काशी मुद्रित प्रतींतील पाठ घेऊन भाषांतर केलें आहे.

६. भिद् व छिद् या धातूंहून यङ् प्रत्यय (३।१।२२) केला असतां बेभिद्य व चेच्छिद्य हे यङन्त धातू (३।१।३२) होतात. त्यांहून तृच् प्रत्यय (३।१।१३३) केला आहे.

७. पच् व यज् धातूंहून णिच् प्रत्यय करून पुढें कर्मणि लट् प्रत्यय झाला आहे. यक् हा आर्धधातुक-प्रत्यय पुढें असल्यामुळें णिच् प्रत्ययाचा 'णेरनिटि' (६।४।५१) यानें लोप झाला आहे तसेंच कारणा व हारणा येथें कृ व हृ या धातूंहून णिच् प्रत्यय केल्यानंतर 'ण्यासश्रन्थो०' (३।३।१०७) यानें युच् प्रत्यय झाला. आहे.

८. दा आणि धा या धातूंहून तस् प्रत्यय, त्याला ताम् आदेश, च्लि, सिच्, अट्, 'गातिस्था०' (२।४।७७) यानें सिच् प्रत्ययाचा लुक् अशीं कार्यें झालीं आहेत.

९. ग्लै व म्लै या धातूंना आत्व करून पुढें आशीर्लिङ्, तिप्, इकाराचा लोप, यासुट्, सुट्, दोन्ही सकारांचा लोप (८।२।२९) 'वाऽन्यस्य०' यानें एत्व हीं कार्यें झालीं आहेत.

द्भावश्च सीयुटि। चिण्वद्भावे सीयुटि किमुदाहरणम्। कारिषीष्ट हारिषीष्ट। आर्धधातुक इति किमर्थम्। क्रियेत ह्रियेत। नैतदुदाहरणम्। यका व्यवहितत्वान्न भविष्यति। इदं तर्ह्युदाहरणम्। प्रस्नुवीत। इदं चाप्युदाहरणम्। क्रियेत ह्रियेत। ननु चोक्तं यका व्यवहितत्वान्न भविष्यतीति। यक एव तर्हि मा भूदिति। किं च स्यात्। वृद्धिः। वृद्धौ कृतायां युक्प्रसज्येत॥

## भ्रस्जो रोपधयो रमन्यतरस्याम् ॥ ६।४।४७॥

अयं रम्रेफस्य स्थाने कस्मान्न भवति। मिदचोऽन्त्यात्परः [ १. १. ४७ ] इत्यनेनाचामन्त्यात्परः क्रियते। रेफस्य तर्हि श्रवणं कस्मान्न भवति। षष्ठ्युच्चारणसामर्थ्यात्॥

---

स्नायात्[10] स्नायाताम् येथें एत्व न व्हावें म्हणून.

'स्यसिच्०' (६।४।६२) यानें सीयुट् पुढें असताना सांगितलेला जो चिण्वद्भाव तेथेंही या अधिकाराचा उपयोग होत आहे. उदाहरणार्थ-कारिषीष्ट[11] हारिषीष्ट.

आर्धधातुके हें कशाकरितां ?

क्रियेत[12] ह्रियेत येथें चिण्वद्भाव न व्हावा म्हणून.

क्रियेत वगैरे चिण्वद्भावाचीं उदाहरणें होऊं शकत नाहींत. कारण, यक् प्रत्ययानें व्यवधान असल्यामुळें चिण्वद्भाव होणार नाहीं.

तर मग प्रस्नुवीत[13] हें उदाहरण घ्यावें.

क्रियेत, ह्रियेत हींही उदाहरणें होतात.

पण यक् प्रत्ययानें व्यवधान असल्यामुळें चिण्वद्भाव होणार नाहीं असें आतांच सांगितलें आहे ना ?

तर मग क्रियेत इत्यादि स्थलीं यक् प्रत्यें-[14] यालाच चिण्वद्भाव न व्हावा यासाठीं आर्धधातुकाधिकाराचा उपयोग होत आहे.

यक् प्रत्ययाला चिण्वद्भाव झाला असता काय दोष येईल ?

वृद्धि होईल; आणि वृद्धि झाली असतां 'आतो युक्०' (७।३।३३) यानें युक् आगम होऊं लागेल.

(सू. ४७[1]) हा रम् आगम रेफाचे स्थानीं कां बरें होत नाहीं ?

मकारेतसंज्ञक हा अच्-समुदायांतील शेवटच्या अचाहून पुढें करावा या अर्थाच्या 'मिदचो०' (१।१।४०) या परिभाषेनें अच्-समुदायांतील शेवटच्या अचाहून पुढें तो केला जातो.

तर मग भ्रस्ज् येथील रेफाचें श्रवण कां बरें होत नाहीं ?

'रोपधयोः' येथें षष्ठी (१।१।४९) उच्चारिली आहे.

---

१०. 'ष्णा शौचे' धात्वादेः षः सः ' (६।४।६४) यानें स आदेश, पुढें विधिलिङ्, तिप्, यासुट्, सुट्, नंतर 'लिङः सलोपो०' (७।२।७९) यानें दोन्ही सकारांचा लोप झाला आहे.

११. कृ व हृ धातू. कर्मणि आशीर्लिङ्, त, सीयुट्, सुट्, 'स्यसिच्०' यानें चिण्वद्भाव झाल्यामुळें वृद्धि आणि इट् आगम झाले आहेत.

१२. कृ व हृ धातूंहून कर्मणि विधिलिङ्, त, यक्, रिङ्, सीयुट्, सुट्, दोन्ही सकारांचा लोप आणि गुण हीं कार्यें झालीं आहेत.

१३. हा कर्मकर्तरि प्रयोग आहे. येथें यक् प्रत्ययाचा निषेध (३।१।८९) झाला आहे.

१४. कारण, यक् प्रत्यय हाच उपदेशीं अजन्त आहे.

१. (सू. ४७) भ्रस्ज् धातूच्या रेफ आणि उपधा यांचे स्थानीं आर्धधातुक प्रत्यय पुढें असतांना रम् आगम विकल्पेंकरून होतो.

भारद्वाजीयाः पठन्ति । भ्रस्जो रोपधयोर्लोप आगमो रम्विधीयत इति ॥

**भ्रस्जादेशात्संप्रसारणं विप्रतिषेधेन ॥१॥**

भ्रस्जादेशात्संप्रसारणं भवति विप्रतिषेधेन । भ्रस्जादेशस्यावकाशः । भर्ष्टा भ्रष्टा । संप्रसारणस्यावकाशः । भृज्जति । इहोभयं प्राप्नोति । भृष्टः भृष्टवानिति । संप्रसारणं भवति विप्रतिषेधेन ॥ स तर्हि पूर्वविप्रतिषेधो वक्तव्यः । न वक्तव्यः । रसोर्वर्वचनात्सिद्धम् । रसोर्वा ऋ भवतीति वक्ष्यामि ।

**रसोर्ऋवचने सिचि वृद्धेर्भ्रस्जादेशः ॥ २ ॥**

रसोर्वा ऋवचने सिचि वृद्धेर्भ्रस्जादेशो वक्तव्यः । वृद्धौ कृतायामिदमेव रूपं स्यात् ।

---

रिली आहे म्हणून होत नाहीं.[2]

भारद्वाजीय[3] वैयाकरण—भ्रस्ज् धातूच्या रेफाचा व उपधेचा लोप होतो, आणि त्याला रम् आगम होतो असा सूत्रार्थ वर्णन करतात.

( वा. १ ) पूर्वविप्रतिषेध असल्यामुळें भ्रस्ज् धातुसंबंधीं आदेशाचा बाध करून प्रथमतः संप्रसारण होतें. भ्रस्जादेशाला अवकाश भर्ष्टा[4] व भर्ष्टुम् येथें आहे; आणि संप्रसारणाला अवकाश भृज्जति येथें आहे. पण भृष्टः[5] व भृष्टवान् येथें दोन्ही बरोबर प्राप्त होत आहेत. तेव्हां पूर्वविप्रतिषेध असल्यामुळे संप्रसारण होतें.

तर मग तें पूर्वविप्रतिषेधवचन करावयास पाहिजे.

पूर्वविप्रतिषेधवचन करावयास नको.

कारण—रसोर्वर्वचनात्सिद्धम्[6] म्हणजे भ्रस्ज् धातूमधील र शब्द आणि सकार यांचे स्थानीं विकल्पानें 'ऋ' असा आदेश होतो असें येथें सांगितलें म्हणजे भृष्टः इत्यादि उदाहरणें साधतील.

( वा. २ ) भ्रस्ज् धातूच्या र शब्द आणि सकार यांचें स्थानीं 'ऋ' आदेशाचें विधान केलें तर सिच् पुढें असतांना हलन्तलक्षण वृद्धीचा बाध करून पूर्वविप्रतिषेधानें प्रथमतः हा ऋ आदेश होतो असें वचन करावयास पाहिजे. कारण वृद्धि केली असतां अभ्राक्षीत्[8]

---

२. रम् आगम मित् असल्यामुळें अन्त्य अचाहून पुढें होतो. तेव्हां रेफ आणि उपधा यांची निवृत्ति न मानली तर रोपधग्रहण व्यर्थ होईल.

३. यांच्या मतीं येथें मागून (६।४।४५) 'लोपः' या पदाची अनुवृत्ति आहे.

४ भ्रस्ज् धातूहून तृच् व तुमुन् प्रत्यय, 'एकाच उपदेशे' ( ७।२।१० ) यानें इट् आगमाचा निषेध, आणि प्रकृत सूत्रानें रेफ व उपधा यांची निवृत्ति, आणि अकाराहून पुढें रम् आगम. नंतर जकाराला षकार झाला आहे ( ८।२।३६ ) आणि प्रत्ययाच्या तकाराला टकार ( ८।४।४१ ) झाला आहे. भृज्जति येथें संप्रसारण ( ६।१।१६ ) झाल्यानंतर सकाराला शकार ( ८।४।४० ) आणि त्या शकाराला जकार ( ८।४।५३ ) झाला आहे.

५. भ्रस्ज् धातूहून क्त व क्तवतु प्रत्यय; संप्रसारण, पूर्वरूप, सकाराचा लोप ( ८।२।२९ ) षत्व व ष्टुत्व ही कार्यें झालीं आहेत.

६. रसोः, वा, ऋवचनात् अशीं पदें आहेत.

७. र शब्दासहित सकाराला ऋ आदेश केला असतां कित्–ङित्–भिन्न पुढें असतांना गुण झाल्यामुळें भर्ष्टा हें रूप साधतें. आणि ऋकाराचे अभावपक्षीं भ्रष्टा हें सिद्ध होतें; व कित् ङित् पुढें असतांना ऋकार आदेश केल्यावेळीं भृष्टः इत्यादि साधत आहेत. ऋकारादेशाच्या अभावपक्षींही संप्रसारणानें तसेंच रूप होतें. तेव्हां पूर्वविप्रतिषेधवचन करण्याचा उपयोग होत नाहीं.

८. ऋकार आदेशाचा परत्वास्तव बाध करून 'वदव्रज०' ( ७।२।३ ) यानें वृद्धि केली असतां 'र' नसल्यामुळें ऋ आदेश होणार नाहीं. तेव्हां अभ्राक्षीत् असें एकच रूप होईल. आणि पूर्वविप्रतिषेधवचन केलें

अभ्राक्षीत् । इदं न स्यात् । अभार्क्षीदिति ॥ सर्वथा वयं पूर्वविप्रतिषेधान्न मुच्यामहे । सूत्रं च भिद्यते ॥ यथान्यासमेवास्तु । ननु चोक्तं भ्रस्जादेशात्संप्रसारणं विप्रतिषेधेनेति । इदमिह संप्रधार्यम् । भ्रस्जादेशः क्रियतां संप्रसारणमिति किमत्र कर्तव्यम् । परत्वाद् भ्रस्जादेशः । नित्यत्वात्संप्रसारणम् । कृतेऽपि भ्रस्जादेशे प्राप्नोत्यकृतेऽपि । भ्रस्जादेशोऽपि नित्यः । कृतेऽपि संप्रसारणे प्राप्नोत्यकृतेऽपि प्राप्नोति । कथम् । योऽसावृकारे रेफस्तस्य चोपधायाश्च कृतेऽपि प्राप्नोति । अनित्यो भ्रस्जादेशो न हि कृते संप्रसारणे प्राप्नोति । किं कारणम् । न हि वर्णैकदेशा वर्णग्रहणेन गृह्यन्ते । अथापि गृह्यन्त एवमप्यनित्यः । कथम् । उपदेश इति वर्तते । तच्चावश्यमुपदेशग्रहणमनुवर्त्यं बरीभृज्ज्यत इत्येवमर्थम् ॥

---

असेंच एक रूप होईल, आणि अभार्क्षीत् हें होणार नाहीं. एकंदरींत सूत्रन्यास कसाही असला तरी पूर्वविप्रतिषेधवचनांतून सुटका होत नाहीं. शिवाय, ऋ आदेश सांगावयाचा म्हणजे मूळचा सूत्रन्यास बदलावा लागणार आहे.

तर मग मूळचें सूत्र आहे तसेंच असूं दे.

पण या रम् आगमाचा पूर्वविप्रतिषेधानें बाध करून संप्रसारण प्रथमतः होतें असें वचन केले पाहिजे असें पूर्वी सांगितलें आहे ना ?

अगोदर येथें असा विचार उत्पन्न होतो कीं, भ्रस्ज् धातुला हा रम् आगम पूर्वी करावा किंवा संप्रसारण पूर्वी करावें.

मग यात काय बरें पूर्वी करावें ?

पर असल्यामुळें भ्रस्जादेश म्हणजे रम् आगम हा प्रथमतः करावा.

पण नित्य असल्यामुळें संप्रसारण पूर्वी करावें. कारण भ्रस्जादेश केला अथवा न केला तरीही संप्रसारण प्राप्त होतें.

भ्रस्जादेशही नित्य आहे. कारण संप्रसारण केलें अथवा न केलें तरीही तो प्राप्त होत आहे.

संप्रसारण केल्यानंतर रेफ नसल्यामुळें भ्रस्जादेश कसा बरें प्राप्त होतो ?

संप्रसारणानें ऋकार केल्यानंतर त्या ऋकारामध्यें जो हा रेफ आहे त्याला आणि उपधेला हा भ्रस्जादेश म्हणजे रम् आगम प्राप्त होत आहे.

भ्रस्जादेश अनित्य होय. कारण संप्रसारण केल्यानंतर तो प्राप्त होत नाहीं.

काय कारण ?

कारण असें कीं— वर्णांतील एकदेश हे वर्ण समजले जात नाहींत. आतां जरी ते स्वतंत्र वर्णासारखे वर्ण समजले तरीही भ्रस्जादेश अनित्यच होय.

तो कसा ?

'अनुदात्तोपदेश०' ( ६।४।३७ ) येथून उपदेशग्रहणाची अनुवृत्ति येत आहे. आणि तें तर बरीभृज्यते येथें रम् आगम न होण्याकरितां अवश्य अनुवृत्त केलेंच पाहिजे.

---

असतां वृद्धीचा बाध करून ऋ आदेश केल्यानंतर वृद्धि होऊन अभार्क्षीत् हें रूप साधतें; तसेंच, ऋ आदेशाच्या अभावपक्षीं अकाराला वृद्धि होऊन अभ्राक्षीत् हेंही रूप साधते.

९. भ्रस्ज् धातूहून यङ्, संप्रसारण, द्वित्व, 'रीगृदुपध०' ( ७।४।९० ) यानें अभ्यासाला रीक् आगम, बरीभृज्यते. येथें तन्मध्यपतितन्यायानें रीक् आगमाचा रेफ भ्रस्ज् धातूसंबंधीं असल्यामुळें रम् आगम प्राप्त होत आहे. परंतु हा रेफ उपदेशकालीं नसल्यामुळें होत नाहीं. याकरितां उपदेशग्रहणाची अनुवृत्ति करणें जरूर आहे. त्यामुळें संप्रसारण केल्यानंतर त्या ऋकारांतील रेफ धातूच्या उपदेशकालीं नसल्यामुळें रम् आगमाची प्राप्ति येत नाहीं; म्हणून तो अनित्य आहे. तेव्हां पूर्वविप्रतिषेधाची जरूर नाहीं.

## अतो लोपः ॥ ६ । ४ । ४८ ॥

**ण्यल्लोपावियङ्यण्गुणवृद्धिदीर्घत्वेभ्यः पूर्वविप्रतिषिद्धम् ॥ १ ॥**

ण्यल्लोपावियङ्यण्गुणवृद्धिदीर्घत्वेभ्यो भवतः पूर्वविप्रतिषेधेन । णिलोपस्यावकाशः । कार्यते हार्यते । इयङादेशस्यावकाशः । श्रियौ श्रियः । इहोभयं प्राप्नोति । आटिटत् आशिशत् । ननु चात्र यणादेशेन भवितव्यम् । इदं तर्हि । अततक्षत् अररक्षत् ॥ यणादेशस्यावकाशः । निन्यतुः निन्युः । णिलोपस्य स एव । इहोभयं प्राप्नोति । आटिटत् आशिशत् ॥ वृद्धेरवकाशः । सखायौ सखायः । णिलोपस्य स एव । इहोभयं प्राप्नोति । कारयतेः कारकः । हारयतेर्हारकः ॥ गुणस्यावकाशः । चेता स्तोता । णिलोपस्यावकाशः । आटिटत् आशिशत् । इहोभयं प्राप्नोति । कारणा हारणा ॥ दीर्घत्वस्यावकाशः । चीयते स्तूयते । णिलोपस्यावकाशः । कारणा हारणा । इहोभयं प्राप्नोति । कार्यते

---

( सू. ४८ वा. १ ) णिलोप व अल्लोप हे इयङ्, यण्, गुण, वृद्धि आणि दीर्घ यांना पूर्वविप्रतिषेधानें बाध करून होतात. उदाहरणार्थ— णिलोपाला अवकाश कार्यते हार्यते[2] येथें आहे; इयङ् आदेशाला श्रियौ श्रियः[3] येथें अवकाश आहे; आणि आटिटत् व आशिशत् येथें दोघांची युगपत् प्राप्ति येत आहे.

पण येथ इयङ आदेशाचा बाधक 'एरनेका०' ( ६।४।८७ ) हा यण् आदेश प्राप्त होत आहे ना ?

तर मग अततक्षत्[4] व अररक्षत् हीं इयङापेक्षां पूर्वविप्रतिषेधानें णिलोप होतो याचीं उदाहरणें समजावीं.

यणादेशाला निन्यतुः निन्युः येथें अवकाश आहे; व णिलोपाला कार्यते हार्यते इत्यादि ठिकाणीं अवकाश पूर्वी दाखविलाच आहे. पण आटिटत् व आशिशत् येथें दोघांची युगपत्–प्राप्ति येत आहे.[5]

वृद्धीला ( ७।२।११५ ) सखायौ सखायः येथें अवकाश आहे व णिलोपाला पूर्वी दाखविलाच आहे. पण कारि व हारि या णिजन्त धातूंहून ण्वुल् प्रत्यय केल्यानंतर कारकः व हारकः येथें दोघांची युगपत्–प्राप्ति येत आहे.[6]

गुणाला ( ७।३।८४ ) चेता व स्तोता येथें अवकाश आहे, व णिलोपाला आटिटत् आशिशत् येथें अवकाश आहे. पण कारणा[7] व हारणा येथें दोघांची युगपत् प्राप्ति येत आहे.

'अकृत्सार्व० ' ( ७।४।२५ ) या दीर्घाला चीयते व स्तूयते येथें अवकाश आहे व णिलोपाला अवकाश दाखविलाच आहे. पण कार्यतें[8]

---

१. ( सू. ४८ ) आर्धधातुकाच्या उपदेशकालीं जें अकारान्त त्याच्या अकाराचा आर्धधातुक प्रत्यय पुढें असतांना लोप होतो.

२. कृ व हृ या धातूंहून णिच् प्रत्यय करून त्या कारि व हारि या णिजन्त धातूंहून कर्मणि लट् केला आहे. येथें अच् पुढें नसल्यामुळें इयङ् आदेशाची प्राप्ति नाहीं. तेव्हां हा णिलोपाला अवकाश आहे.

३. येथें णिलोपाची प्राप्ति नाहीं. तेव्हां येथें इयङ् आदेशाला अवकाश आहे.

४. येथें क्ष हा संयोग पूर्वी असल्यामुळें यणाची प्राप्ति नाहीं. तेव्हां येथें इयङाचा बाध करून णिलोप होतो.

५. तेव्हां येथें पूर्वविप्रतिषेधानें यणाचा बाध करून णिलोप होतो.

६. तेव्हां येथें पूर्वविप्रतिषेधानें वृद्धीचा बाध करून णिलोप होतो.

७. कारि व हारि या णिजन्त धातूंहून 'ण्यासश्रन्थो युच् ' ( ३।३।१०७ ) यानें युच्. येथें पूर्वविप्रतिषेधानें गुणाचा बाध करून णिलोप होतो.

८. येथें पूर्वविप्रतिषेधानें दीर्घाचा बाध करून णिलोप होतो.

ह्रार्यते । णिलोपो भवति विप्रतिषेधेन ॥ स तर्हि पूर्वविप्रतिषेधो वक्तव्यः । न वक्तव्यः । सन्त्वत्रैते विधय एतेषु विधिषु कृतेषु स्थानिवद्भावाण्णिग्रहणेन ग्रहणाण्णिलोपो भविष्यति । नैवं शक्यम् । इयङादेशे हि दोषः स्यात् । अन्त्यस्य लोपः प्रसज्येत ॥ अल्लोपस्येयङ्यणोश्च नास्ति संप्रधारणा ॥ वृद्धेरवकाशः । प्रियमाचष्टे प्रापयति । अल्लोपस्यावकाशः । चिकीर्षिता चिकीर्षितुम् । इहोभयं प्राप्नोति । चिकीर्षकः जिहीर्षकः ॥ गुणस्याल्लोपस्य च नास्ति संप्रधारणा ॥ दीर्घत्वस्यावकाशः । अपि काकः श्येनायते । अल्लोपस्य स एव । इहोभयं प्राप्नोति । चिकीर्ष्यते जिहीर्ष्यते । अल्लोपो

---

व ह्रार्यते येथें दोघांची युगपत् प्राप्ति येत आहे.

तेव्हां या सर्व ठिकाणीं पूर्वविप्रतिषेधामुळें णिलोप होतो.

तर मग तें पूर्वविप्रतिषेधवचन करावयास पाहिजे.

पूर्वविप्रतिषेधवचन करावयास नको. कारण, या सर्व उदाहरणांमध्यें णि प्रत्ययाला इयङ् वगैरे कार्यें होवोत; तीं झाल्यानंतर स्थानिवद्भावानें ( १।१।५६ ) णिप्रत्यय आहे असें समजून लोप होईल.

हें म्हणणें शक्य नाहीं. कारण, इयङ् आदेशाविषयीं दोष येतो.

तो कसा ?

अलोऽन्त्यस्य या परिभाषेनें अन्त्य यकाराचा लोप प्रसक्त[9] होईल.

अल्लोप आणि इयङ्—यण् यांची स्पर्धा संभवत नाहीं.[10]

"अचो ञ्णिति" (७।२।११५) या वृद्धीला प्रियमाचष्टे प्रापयति[11] येथें अवकाश आहे; व अल्लोपाला चिकीर्षिता, चिकीर्षितुम् येथें अवकाश आहे. पण चिकीर्षकः[12] व जिहीर्षकः येथें दोन्ही युगपत् प्राप्त होतात.

गुण व अल्लोप यांची परस्पराशीं स्पर्धा संभवत नाहीं.

'अकृत्०' ( ७।४।२५ ) या दीर्घाला अपि काकः श्येनायते[13] येथें अवकाश आहे; व अल्लोपाला अवकाश पूर्वी दाखविलाच आहे. आणि चिकीर्ष्यते व जिहीर्ष्यते येथें दोन्ही प्राप्त होतात. तेथें पूर्वविप्रतिषेधानें सर्व ठिकाणीं अल्लोप होतो.

---

९. अततक्षत् येथे परत्वास्तव इयङ् केला तर तो स्थानिवद्भावानें णि आहे असें समजून णिलोप होईल. पण 'अलोऽन्त्यस्य' (१।१।५२) या परिभाषेनें अन्त्य यकाराचा लोप होऊं लागेल.

१०. आतांपर्यंत इयङ् वगैरेंपेक्षां णिलोप पूर्वी होतो अशीं उदाहरणें दाखविलीं. आतां त्या इयङ् वगैरेंपेक्षां अल्लोप पूर्वी होतो अशी उदाहरणें दाखवावयाचीं, पण, त्यांत अल्लोपाची इयङ् आदेश आणि यण् आदेश यांच्या बरोबर कोठें गाठच पडत नाहीं. कारण, अलोप हा ऱ्हस्व अकाराचा आणि इयङ् व यण् हे इकाराला होणारे आहेत.

११. प्रिय शब्दाहून 'प्रातिपदिकाद्धात्वर्थे०' (चुरादिगणसूत्र ) यानें णिच्, 'प्रियस्थिर०' (६।४।१५७) यानें प्र आदेश, वृद्धि, पुक्; येथें धातूहून णिचाचें विधान नसल्यामुळें त्याला आर्धधातुक संज्ञा नाहीं म्हणून 'अतो लोपः' (६।४।४८) यानें अल्लोप प्राप्त होत नाहीं.

१२. चिकीर्ष या सन्-प्रत्ययान्त धातूहून ण्वुल् प्रत्यय केला आहे. येथें पूर्वविप्रतिषेधानें वृद्धीचा बाध करून अल्लोप झाला आहे.

१३. श्येन या शब्दाहून 'कर्तुः क्यङ्०' (३।१।११ ) यानें क्यङ् प्रत्यय आणि 'अकृत्०' ( ७।४।२५ ) यानें दीर्घ झाला आहे.

भवति विप्रतिषेधेन ॥ स तर्हि पूर्वविप्रतिषेधो वक्तव्यः । न वक्तव्यः । इष्टवाची परशब्दः । विप्रतिषेधे परं यदिष्टं तद्भवतीति ॥

## यस्य[1] हलः ॥ ६ । ४ । ४९ ॥

किमिदं यलोपे वर्णग्रहणमाहोस्वित्संघातग्रहणम् । कश्चात्र विशेषः ।

**यलोपे वर्णग्रहणं चेद्धात्वन्तस्य प्रतिषेधः ॥ १ ॥**

यलोपे वर्णग्रहणं चेद्धात्वन्तस्य प्रतिषेधो वक्तव्यः । शुच्यिता शुच्यितुम् ॥ अस्तु तर्हि संघातग्रहणम् । यदि संघातग्रहणमन्त्यस्य लोपः प्राप्नोति । सिद्धोऽन्त्यस्य पूर्वेणैव तत्रारम्भसामर्थ्यात्सर्वस्य भविष्यति ॥ एवमपि तेनातिप्रसक्तमिति कृत्वा नियमो विज्ञायेत । यस्य हल एव नान्यतः । क मा भूत् । लोलूयिता पोपूयिता । कैमर्थक्यान्नियमो भवति । विधेयं नास्तीति

---

तर मग णिलोप आणि अल्लोप याविषयीं पूर्वविप्रतिषेधवचन करावयास पाहिजे.

वचन करावयास नको. कारण ' विप्रतिषेधे परम्० ' ( १।४।२ ) येथें पर हा शब्द इष्ट अशा अर्थाचा वाचक आहे. तस्मात् विप्रतिषेध असतां जे इष्ट असेल तें कार्य होतें.

( सू. ४९ ) काय ह्या सूत्रामध्यें 'यस्य' हें वर्णाचे[2] ग्रहण आहे किंवा समुदायाचें ग्रहण आहे ?

या दोन तऱ्हामध्यें काय बरें फरक आहे ?

यलोपाविषयीं ' य ' हें वर्णग्रहण गृहीत धरलें तर धातूच्या शेवटीं असलेल्या यकाराच्या लोपाचा प्रतिषेध करावयास पाहिजे. उदाहरणार्थ— शुच्यिता[3], शुच्यितुम्.

तर मग समुदायाचें ग्रहण असो.

जर समुदायाचें ग्रहण असेल तर ' अलोऽन्त्यस्य ' ( १।४।५२ ) या परिभाषेनें अन्त्य अकाराचा लोप प्राप्त होत आहे.

अन्त्य अकाराचा लोप ' अतो लोपः ' या पूर्वसूत्रानेंच साधत आहे म्हणून या सूत्राचा आरंभ केल्याचे जोरावर सगळ्या 'य' शब्दाचा लोप होईल.

तरी[4] पण ' अतो लोपः ' यानें सर्वत्र लोप होऊं लागेल म्हणून त्याच्या व्यावृत्तीकरितां प्रकृत सूत्र नियमार्थ समजलें जाईल. तो नियम असा— य शब्दांतील अकाराचा ' अतो लोपः ' यानें लोप करणें झाल्यास तो य शब्द हलाहून पुढें असेल तरच करावा. तद्व्यतिरिक्ताहून पर असतां करूं नये.

ह्या नियमानें कोठें बरें ' य ' शब्दांतील अकाराचा लोप होणार नाहीं ?

लोलूयिता[5] पोपूयिता येथें.

जेथें कांहीं अपूर्व विधेय नसल्यामुळें एखादें सूत्र अगदींच फुकट जाऊं लागलें तर तेथें

---

१. ( सू. ४९ ) हलाहून पुढील अशा य शब्दांतील यकाराचा आर्धधातुक प्रत्यय पुढें असतांना लोप होतो.

२. जर उच्चारणार्थ अकार लावून ' यस्य ' हा निर्देश केला आहे असें गृहीत धरलें तर यस्य हें वर्णाचें ग्रहण होतें; आणि अकार विवक्षित आहे असें गृहीत धरलें तर यस्य हें समुदायाचें ग्रहण होतें.

३. शुच्य् या धातूहून तृच् प्रत्यय झाला आहे व त्याला इट् आगम झाला आहे.

४. सूत्राचा आरंभ केल्याचे जोरावर अलोऽन्त्यस्य या परिभाषेचा बाध करून समुदायाचा लोप होईल असें म्हटलें; पण, सिद्ध असतांना आरंभ केला आहे त्या अर्थी नियम केल्यानेंही ' यस्य हलः ' हें चरितार्थ होत आहे.

५. लू आणि पू या धातूंहून यङ् प्रत्यय, पुढें तृच्, इट् आगम, आणि यङाच्या अकाराचा लोप हीं कार्यें झालीं आहेत.

कृत्वा । इह चास्ति विधेयम् । किम् । अन्त्यस्य लोपः प्राप्तः स सर्वस्य विधेयः । तत्रापूर्वो विधिरस्तु नियमोऽस्त्वित्यपूर्व एव विधिर्भविष्यति न नियमः । एवमप्यन्त्यस्य प्राप्नोति । किं कारणम् । न हि लोपः सर्वापहारी । ननु च संघातग्रहणसामर्थ्यात्सर्वस्य भविष्यति ।

## संघातग्रहणं चेत्क्यस्य विभाषायां दोषः ॥ २ ॥

संघातग्रहणं चेत्क्यस्य विभाषायां दोषो भवति । समिधिता समिध्यिता । यदा लोपस्तदा सर्वस्य लोपः । यदालोपस्तदा सर्वस्यालोपः प्राप्नोति ॥

## आदेः परवचनात्सिद्धम् ॥ ३ ॥

हल इति पञ्चमी । तस्मादित्युत्तरस्यादेः परस्य [ १. १. ६७; ५४ ] इति यकारस्यैव भविष्यति ॥ अथवा पुनरस्तु वर्णग्रहणम् । ननु चोक्तं यलोपे वर्णग्रहणं चेद्धात्वन्तस्य प्रतिषेध इति । नैष दोषः । अङ्गादिति हि वर्तते । न वा अङ्गादिति पञ्चम्यस्ति ।

---

नियम होत असतो. आणि येथें तर अपूर्व विधेय आहे.

ते कोणतें ?

अन्त्य अकाराचा लोप प्राप्त होत आहे, तो सगळ्या 'य' शब्दाचा होतो असें विधान येथें करतां येतें.

आतां अपूर्वविधि करावा किंवा नियम करावा अशी आशंका आली असतां अपूर्वविधीच योग्य ठरेल नियम ठरणार[६] नाहीं.

तरीही अन्त्य अकाराचा लोप प्राप्त होत आहे.

काय कारण ?

लोप हा लुकाप्रमाणें सगळ्या स्थानीला खाणारा नव्हे.

पण समुदायाचें ग्रहण केलें आहे त्या जोरावर सगळ्या 'य' शब्दाचा लोप होईल.

( वा. २ ) 'यस्य' हें समुदायाचें ग्रहण असेल तर 'क्यस्य विभाषा' ( ६।४।५० ) यानें सांगितलेल्या वैकल्पिक यलोपाविषयीं दोष येत आहे. उदाहरणार्थ—समिधिता समिध्यिता. येथें जेव्हां लोप करावयाचा असा पक्ष घेतला तेव्हां सर्वाचा लोप होईल आणि जेव्हां लोप करावयाचा नाहीं असा पक्ष घेतला तेव्हां सर्वच 'य' शब्द राहूं लागेल.

( वा. ३ ) येथें 'हलः' ही पंचमी असल्यानें 'पंचम्यन्ताहून पुढच्याला सांगितलेलें कार्य अव्यवहित अशा त्याच्या आद्यावयवाला करावें' अशा अर्थाच्या 'तस्मादित्यु०' ( १।१।६७ ) 'आदेः परस्य ( १।१।५४ ) या परिभाषांनीं यकाराचाच लोप होईल; अर्थात् विकल्पानें होईल. आणि अकाराचा लोप अनित्य होईल.

किंवा यस्य हें वर्णग्रहण असो.

पण यस्य हें वर्णग्रहण असेल तर धातूच्या शेवटीं असलेल्या यकाराचा लोप प्राप्त होतो त्याचा प्रतिषेध करावयास पाहिजे, असा दोष दिला आहे ना ?

हा दोष येत नाहीं. कारण अङ्गात् असें पद अनुवृत्त[७] आहे.

पण अङ्गात् अशी पंचमी तेथें नाहीं, तर षष्ठी आहे.

असें आहे तर, अङ्गस्य ही संबंधार्थक षष्ठी

---

६. नियम करणें झाल्यास परार्थकल्पना, प्राप्तबाध वगैरे दोष येतात. त्यामुळें विधि आणि नियम हे दोन्ही जेथें संभवतील तेथें विधि मानणेंच योग्य होय.

७. अंगाहून पुढील अशा यकाराचा लोप होतो असा सूत्राचा अर्थ झाल्यामुळें शुच्यिता येथें यकाराचा लोप होणार नाहीं.

एवं तर्ह्यङ्गस्येति संबन्धषष्ठी विज्ञास्यते। अङ्गस्य यो यकारः। किं चाङ्गस्य यकारः। निमित्तम्। यस्मिन्नङ्गमित्येतद्भवति। कस्मिंश्चैतद्भवति। प्रत्यये॥

## [क्यस्य विभाषा॥ ६।४।५०॥]

## णेरनिटि॥ ६।४।५१।

अथानिटीति किमर्थम्। कारयिता कारयितुम्॥ अनिटीति शक्यमवक्तुम्। कस्मान्न भवति। कारयिता कारयितुम्। निष्ठायां सेटि [६. ४. ५२] इत्येतन्नियमार्थं भविष्यति। निष्ठायामेव सेटि णेर्लोपो भवति नान्यत्र। क मा भूत्। कारयिता कारयितुम्॥ अथवोपरिष्टाद्योगविभागः करिष्यते। इदमस्ति। निष्ठायां सेटि [५२] जनिता मन्त्रे [५३] शमिता यज्ञे [५४]। ततः अय्। अयादेशो भवति णेः सेटि। तत आमन्तात्वाय्येत्न्विष्णुषु। अयभवतीत्येव॥

## निष्ठायां सेटि॥ ६।४।५२॥

अथ सेड्ग्रहणं किमर्थम्। निष्ठायां सेड्ग्रहणमनिटि प्रतिषेधार्थम्। निष्ठायां सेड्ग्रहणं क्रियते ऽनिटि प्रतिषेधो यथा

---

समजली जाईल. ती अशी– अङ्गाचा संबंधी जो यकार.

अंगाशीं संबंध असलेला यकार कोणता?

जो यकार पुढें असतांना अङ्गसंज्ञा होते तो.

कोण पुढें असताना अंगसंज्ञा होते?

प्रत्यय पुढें असतांना.

(सू. ५१) येथें इट् आगम न झालेला प्रत्यय पुढें असतांना असे कशाकरितां म्हटलें आहे?

कारयिता व कारयितुम् येथें णिलोप न व्हावा म्हणून म्हटलें आहे.

तसें नाहीं म्हटलें तरी चालेल.

तर मग कारयिता व कारयितुम् येथें णिलोप कां बरें होत नाहीं?

'निष्ठायां सेटि' हें सूत्र नियमार्थ होईल. तो नियम असा:– इट् आगम झालेला आर्धधातुक प्रत्यय पुढें असतांना णिलोप करणें झाल्यास तशा प्रकारचा फक्त निष्ठाप्रत्यय पुढें असतांनाच करावा. इतर तसा आर्धधातुक प्रत्यय पुढें असतांना करूं नये.

इतर कोठें णिलोप न झाला पाहिजे?

कारयिता कारयितुम् इत्यादि ठिकाणीं.

अथवा पुढें योगविभाग करण्यांत येईल. तो असा– 'निष्ठायां सेटि', 'जनिता मन्त्रे', 'शमिता यज्ञे' असा सूत्रपाठ आहे. त्याच्या-पुढे 'अय्' असें सूत्र करावें. णि प्रत्ययाचे स्थानीं इट् आगम झालेला आर्धधातुक प्रत्यय पुढे असतांना अय् असा आदेश होतो असा त्याचा अर्थ होईल. त्याच्या पुढें 'आमन्तात्वाय्येत्न्विष्णुषु' असें दुसरें सूत्र पूर्वीप्रमाणें अय् आदेश सांगणारें आहेच.

(सू. ५२) येथे इट् आगम झालेला असें कशाकरितां म्हटलें आहे?

'निष्ठायां सेटि' या सूत्रामध्यें सेटि हा शब्द घातला आहे तो इडागम न झालेला निष्ठा प्रत्यय पुढें असतांना णिलोपाचा प्रतिषेध

---

१. (सू. ५०) हलाहून पुढें असलेल्या क्यच् आणि क्यङ् यांतील यकाराचा आर्धधातुक प्रत्यय पुढें असतांना विकल्पानें लोप होतो.

१. (सू. ५१) ज्याला इट् आगम झालेला नाहीं असा आर्धधातुक प्रत्यय पुढें असतांना णि या प्रत्ययाचा लोप होतो.

१. (सू. ५२) इट् आगम झालेला निष्ठा प्रत्यय पुढें असतांना णि या प्रत्ययाचा लोप होतो.

स्यादिति । संज्ञपितः पशुरिति ॥

**निष्ठायां सेड्ग्रहणमनिटि प्रतिषेधार्थमिति चेत्तत्सिद्धमनिडभावात् ॥ १ ॥**

निष्ठायां सेड्ग्रहणमनिटि प्रतिषेधार्थमिति चेदन्तरेणापि सेड्ग्रहणं तत्सिद्धम् । कथम् । अनिडभावात् ॥ ननु च यस्य विभाषा [ ७. २. १५ ] इति ज्ञपेरिट्प्रतिषेधः ।

**एकाचो हि प्रतिषेधः ॥ २ ॥**

एकाचो हि स प्रतिषेधो ज्ञपिश्चानेकाच् ॥

**इड्भावार्थं तु तन्निमित्तत्वाल्लोपस्य ॥ ३ ॥**

इड्भावार्थं तर्हि सेड्ग्रहणं क्रियते । कथं पुनः सेटीत्यनेनेट् शक्यो भावयितुम् । तन्निमित्तत्वाल्लोपस्य । नात्राकृत इटि णिलोपेन भवितव्यम् । किं कारणम् । सेटीत्युच्यते ॥

**अवचने हि णिलोप इट्प्रतिषेधप्रसङ्गः ॥ ४ ॥**

अक्रियमाणे हि सेड्ग्रहणे णिलोपे कृत

---

व्हावा म्हणून घातला आहे. उदाहरणार्थ– संज्ञपितः पशुः.[२]

( वा. १ ) इडागम न झालेला निष्ठाप्रत्यय पुढे असतांना णिलोप होऊं नये याकरितां सेड्ग्रहण केलें आहे असें म्हणणें असेल तर तें सेट्ग्रहण केल्यावांचूनही साधत आहे.

तें कसें ?

इडागम न झालेला असा निष्ठाप्रत्यय नाहीं म्हणून.

पण " यस्य विभाषा " ( ७।२।१५ ) यानें ज्ञपि धातूहून निष्ठा प्रत्ययाला इट् आगमाचा प्रतिषेध होत आहे ना ?

( वा. २ ) एकाच् धातूहून निष्ठाप्रत्ययाला तो इट् आगमाचा निषेध होतो. आणि ज्ञपि धातू तर अनेकाच् आहे.

( वा. ३ ) तर मग, ण्यन्ताहून निष्ठाप्रत्ययाला इट् आगम होण्याकरितां सेड्ग्रहण[४] केलें आहे.

पण सेड्ग्रहण केल्यानें निष्ठाप्रत्ययाला इट् आगम कसा बरे करता येईल ?

निष्ठाप्रत्ययाला इट् आगम करणें हें णिलोपाचें निमित्तच धरलें आहे. तव्हा अर्थात् जोंपर्यंत इट् आगम केला नाहीं तोंपर्यंत णिलोप होतच नाहीं.

काय कारण ?

'सेटि' म्हणजे इडागम झालेला निष्ठा प्रत्यय पुढें असतांना असें म्हटलें आहे म्हणून.

( वा. ४ ) सेड्ग्रहण न केलें तर कारितम् व हारितम् येथें नित्यत्वास्तव पूर्वी णिलोप केला असतां ' एकाच उपदेशे० ' ( ७।२।१० )

---

२. ज्ञा धातूहून णिच्, पुक्, ' मितां ह्रस्वः ' यानें ह्रस्व, किंवा चुरादि गणांतील ज्ञप् धातूहून णिच् ( ३।१।२५ ), वृद्धि आणि ह्रस्व; पुढे क्त प्रत्यय, त्याला इट् आगम होत नाहीं. कारण ' सनीवन्तर्ध० ' ( ७।२।४९ ) यानें ज्ञपि धातूहून सनाला इडागमाचा विकल्प सांगितला असल्यामुळें ' यस्य विभाषा ' (७।२।१५ ) यानें निषेध होत आहे असें शंकाकारानें गृहीत धरलें आहे.

३. ' यस्य विभाषा ' येथें ' एकाच उपदेशेऽनुदात्तात्' येथून 'एकाचः' या पदाची अनुवृत्ति करावयाची आहे. ती न केली तर ' तनिपति० ' या वचनानें दरिद्रा धातूहून सन् प्रत्ययाला इट् आगमाचा विकल्प सांगितला असल्यामुळ दरिद्रितः येथें ' यस्य विभाषा ' यानें इट् आगमाचा निषेध होईल.

४. इट् आगम झाल्यानंतरच णिलोप व्हावा, अगोदर होऊं नये असा णिलोप प्रवृत्तीचा काल ठरविण्याकरतां सेट्-ग्रहण केलें आहे.

एकाच इतीट्प्रतिषेधः प्रसज्येत । कारितम् हारितम् ॥

एवं तर्हि नार्थः सेड्ग्रहणेन नापि सूत्रेण । कथम् । सप्तमे योगविभागः करिष्यते । इद्-मस्ति । निष्ठायां नेड भवति । ततो णेः । ण्यन्तस्य निष्ठायां नेड् भवति । कारितम् हारितम् । ततो वृत्तम् । वृत्तमिति च निपात्यते । किं निपात्यते । णेर्निष्ठायां लोपो निपात्यते । किं प्रयोजनम् । नियमार्थम् । अत्रैव णेर्निष्ठायां लोपो भवति नान्यत्र । क मा भूत् । कारितम् हारितम् । इहापि तर्हि प्राप्नोति । वर्तितमन्नम् । वर्तिता भिक्षेति । ततः अध्ययने । अध्ययने चेद् वृतिर्वर्तत इति ॥

**वृधिरमिशृधीनामुपसंख्यानं सार्वधातुकत्वात् ॥ ५ ॥**

वृधिरमिशृधीनामुपसंख्यानं कर्तव्यम् । किं कारणम् । सार्वधातुकत्वात् । वर्धन्तु त्वा सुष्टुतयो गिरो मे । वर्धयन्त्वित्येवं प्राप्ते । बृहस्पतिष्ट्वा सुम्ने रम्णातु । रमय-

---

यानें इट् आगमाचा निषेध होऊं लागेल.

असें आहे तर सेड्ग्रहण करण्याचाही उपयोग होत नाहीं. आणि निष्ठायां सेटि हें सूत्र करण्याचाही कांहीं उपयोग नाहीं.

तो कसा ?

सप्तमाध्यायामध्यें योगविभाग करावा. तो असाः– निष्ठेला इडागम होत नाहीं असें प्रकरण चालू असतांना 'णेरध्ययने वृत्तम्' (७।२।२७) येथे 'णेः' असें पृथक् सूत्र करावें. 'ण्यन्ताहून निष्ठेला इट् आगम होत नाहीं' असा त्याचा अर्थ होईल. उदाहरणार्थ–कारितम्, हारितम्. त्याचें पुढें 'वृत्तम्' असें सूत्र करावें. 'वृत्त' या रूपाचें निपातन केलें आहे असा त्याचा अर्थ होईल.

तेथें काय निपातन केलें आहे ?

निष्ठा प्रत्यय पुढें असतांना णिलोपाचें निपातन केलें आहे.

निपातनाचें काय प्रयोजन ?

नियम करणें हें प्रयोजन होय. तो नियम असा– निष्ठा प्रत्यय पुढें असतांना 'णेरनिटि' यानें णिलोप करणें झाल्यास 'वृत्त' या शब्दामध्येच करावा अन्यत्र करू नये.

निष्ठा पुढें असतांना कोठें णिलोप होऊं नये ?

कारितम् हारितम् इत्यादि ठिकाणीं.

तर मग वर्तितमन्नम्, वर्तिता भिक्षा येथेंही णिलोप होऊन वृत्त असेंच रूप होईल.

त्याच्या पुढें 'अध्ययने' हा तिसरा योगविभाग करावा. अध्ययन होईल तेव्हां वर्तितमन्नम् येथें वृत् धातु अध्ययनार्थक नसल्यामुळें णिलोप होत नाहीं. अर्थात् 'निष्ठायां सेटि' हें सूत्र करण्यात फायदा नाहीं.

(वा.५) वृध्, रम आणि शृध् या धातूंपुढील णि या प्रत्ययाचा लोप होतो असें वचन करावें ?

काय कारण ?

कारण असें कीं–सार्वधातुक प्रत्यय पुढें आहे.

उदाहरणार्थ–'वर्धन्तु त्वा' येथें वर्धयन्तु असें रूप प्राप्त आहे. तसेंच, 'बृहस्पतिष्ट्वा सुम्ने रम्णातु'

---

५. 'निष्ठायां सेटि' हें सूत्र आहे त्या वेळीं कारितम् येथें इकार इट् आगमाचा आहे, आणि सूत्र-प्रत्याख्यान पक्षीं तो इकार णि या प्रत्ययाचा आहे. कसाही असला तरी कारित शब्द साधला म्हणजे झालें. आतां त्या णि प्रत्ययाचा पूर्वसूत्रानें लोप होऊं लागेल तो 'वृत्तम्' या सूत्रानें नियम केल्यामुळें होत नाहीं.

६. वर्धन्तु इत्यादि प्रयोगांमध्यें लटाचे स्थानीं झालेल्या तिङ् प्रत्ययांना सार्वधातुक संज्ञा होत असल्यामुळें 'णेरनिटि' यानें णिलोप प्राप्त होत नाहीं; म्हणून हें वचन प्रवृत्त झालें आहे. रम्णातु येथें व्यत्यययानें (३।१।८५) श्ना हा विकरण केला आहे.

त्वित्येवं प्राप्ते । अग्ने शर्ध महते सौभगाय । शर्धयेति प्राप्ते ॥ तत्तर्हि वक्तव्यम् । न वक्तव्यम् । वृधिरमिशृधीनामार्धधातुकत्वा त्सिद्धम् । कथमार्धधातुकत्वम् । अन्येऽपि हि धातुप्रत्यया उभयथा छन्दसि दृश्यन्ते ॥

**[ जनिता मन्त्रे ॥ ६।४।५३ ॥**

**शमिता यज्ञे ॥ ६ । ४ । ५४ ॥ ]**

**अयामन्ताल्वाय्येत्न्विष्णुषु ॥ ६ । ४ । ५५ ॥**

किं पुनरयं क्त्नुराहोस्विदित्नुः । कश्चात्र विशेषः ।

**क्त्नाविटि णेर्गुणवचनम् ॥ १ ॥**

क्त्नौ सतीटि णेर्गुणो वक्तव्यः । गदयित्नुः स्तनयित्नुः ॥ अस्तु तर्हीत्नुः ।

**इत्नौ प्रत्ययान्तरकरणम् ॥ २ ॥**

यदि तर्हीत्नुः प्रत्ययान्तरं कर्तव्यम् ॥

**अयादेशे चोपसंख्यानम् ॥ ३ ॥**

अयादेशे चोपसंख्यानं कर्तव्यम् ॥

---

येथें रमयतु असें प्राप्त आहे. त्याप्रमाणेंच ' अग्ने शर्ध महते सौभगाय ' येथें शर्धय असें प्राप्त होत आहे.

तर मग तसें उपसंख्यान केले पाहिजे.

उपसंख्यान करावयास नको. कारण—

वर्धन्तु इत्यादि उदाहरणामध्यें प्रत्ययांना आर्धधातुक संज्ञा केली म्हणजे पूर्वसूत्रानेच णिलोप होईल.

वर्धन्तु इत्यादि प्रयोग वैदिक आहेत; आणि वेदामध्यें तर ह्याच प्रत्ययांना काय, धातूहून केलेल्या इतर प्रत्ययाना सुद्धा वाटेल त्या ठिकाणीं सार्वधातुक व आर्धधातुक ह्या संज्ञा होतात. कांहीं ठिकाणीं दोन्हीं संज्ञा होतात असें दृष्टीस पडतें ( ३।४।११७ ).

( सू. ५५ ) गदयित्नुः आणि स्तनयित्नुः येथें गदि आणि स्तनि या णिप्रत्ययान्त धातूहून क्त्नु[२] प्रत्यय करून त्याला इट् आगम झाला आहे किंवा इत्नु असाच प्रत्यय केला आहे ?

यांत काय बरें फरक आहे ?

( वा. १ ) क्त्नु प्रत्यय ' स्तनिहृषि० ( उ. सू. ३।२९ ) यानें करून त्या क्त्नु प्रत्ययाला इट् आगम केला तर तेथें णिप्रत्ययाला गुणाचें[३] विधान केलें पाहिजे, म्हणजे स्तनयित्नुः व गदयित्नुः अशीं रूपे होतील.

तर मग इत्नु असाच प्रत्यय तेथें घ्यावा.

( वा. २ ) जर तेथे ' इत्नु ' असा प्रत्यय घ्यावयाचा असेल तर 'स्तनिहृषि०' या उणादिसूत्राने इत्नु अशा निराळ्याच प्रत्ययाचें विधान केले पाहिजे.

( वा. ३ ) शिवाय, अय् आदेश सांगणाऱ्या प्रकृत सूत्रामध्यें इत्नु प्रत्ययाचा पाठ केला पाहिजे.

---

१. ( सू. ५३) वेदामध्यें जनिता येथे इडादि तृच् प्रत्यय पुढें असतांना णिलोपाचें निपातन केले आहे.

१ ( सू. ५४ ) यज्ञकर्मामध्यें शमिता येथें इडादि तृच् प्रत्यय पुढे असतांना णिलोपाचे निपातन केले आहे.

१. ( सू. ५५ ) आम्, अन्त, आलु, आय्य, इत्नु, आणि इष्णु हे प्रत्यय पुढे असतांना णि या प्रत्ययाचे स्थानी अय् असा आदेश होतो.

२. ' स्तनिहृषिपुषिगदिमदिभ्यो णेरित्नुच् ' ( उणा. सू. ३।२९ ) या सूत्रानें क्त्नु प्रत्यय सागावा म्हणजे याच्या पुढील ' कृहनिभ्यां क्त्नुः ' या सूत्रामध्यें निराळें क्त्नुः असें उच्चारावयास नको, असें गृहीत धरले आहे.

३. जर ' स्तनिहृषि० ' या सूत्रानें क्त्नु प्रत्ययाचें विधान केलें तर त्याला इट् आगम केला असतां ' णेरनिटि ' येथे अनिटि असे म्हटलें असल्यामुळे णिलोप येऊं शकत नाहीं. पण, क्त्विामुळे गुणनिषेध प्राप्त होत आहे. त्याकरितां गुणाचें विधान करावयास पाहिजे.

४. ' स्तनिहृषि० ' येथें इत्नु असा प्रत्यय असेल तर अनुवृत्तीचा संभव नसल्यामुळें ' कृहनि० ' या सूत्रामध्यें क्त्नु ग्रहण केलें पाहिजे.

उभयं क्रियते न्यास एव ॥

**ल्यपि लघुपूर्वस्य ॥ ६।४।५६ ॥**

**ल्यपि लघुपूर्वस्येति चेद्व्यञ्जनान्तेषूपसंख्यानम् ॥ १ ॥**

ल्यपि लघुपूर्वस्येति चेद्व्यञ्जनान्तेषूपसंख्यानं कर्तव्यम् । प्रशमय्य गतः । प्रतमय्य गतः ॥

**अल्लोपे च गुरुपूर्वात्प्रतिषेधः ॥ २ ॥**

अल्लोपे च गुरुपूर्वात्प्रतिषेधो वक्तव्यः । प्रचिकीर्ष्य गतः ॥

**ल्यपि लघुपूर्वादिति वचनात्सिद्धम् ३ ॥**

ल्यपि लघुपूर्वादिति वक्तव्यम् ॥ एवमपि ह्रस्वयलोपाल्लोपानामसिद्धत्वाल्ल्यपि लघुपूर्वादित्ययादेशो न प्राप्नोति । प्रशमय्य गतः प्रतमय्य गतः । प्रबेभिदय्य गतः प्रचेच्छिदय्य गतः । प्रगदय्य गतः प्रस्तनय्य गतः ।

**ह्रस्वादिषु चोक्तम् ॥ ४ ॥**

किमुक्तम् । समानाश्रयवचनात्सिद्ध-

---

ह्या दोन्ही गोष्टी[5] सूत्रामध्यें करून ठेविल्याच आहेत.

( सू. ५६ वा. १ ) लघु आहे पूर्वी ज्याहून[1] अशा णि प्रत्ययाला ल्यप् प्रत्यय पुढें असताना अयादेशाचें विधान असेल तर व्यञ्जनान्त धातूचें पुढील णि प्रत्ययाचे स्थानीं ' अय् ' आदेश होतो असें वचन केलें पाहिजे. उदाहरणार्थ–प्रशमय्य[2] गतः, प्रतमय्य गतः

( वा. २ ) शिवाय, अल्लोप केल्यानंतर ज्या व्यजनाच्या पूर्वी गुरु आहे त्या व्यंजनाच्या पुढील णि या प्रत्ययाला अय् आदेश होत नाहीं असें वचन केलें पाहिजे. उदाहरणार्थ–प्रतिचिकीर्ष्य[4] गतः.

( वा. ३ ) ' ल्यपि लघुपूर्वात् ' असें सूत्र पठन करावे म्हणजे सर्व सिद्ध होत आहे.

तरीही ह्रस्व, यलोप आणि अल्लोप यांना आभीय असिद्धत्व असल्यामुळें लघुपूर्वात् असें सूत्र केलें असतांना अय् आदेश प्राप्त होत नाहीं. उदाहरणार्थ–प्रशमय्य, प्रतमय्य, प्रबेभिदय्य, प्रचेच्छिदय्य, प्रगदय्य, प्रस्तनय्य, गतः.

( वा. ४ ) ह्रस्व वगैरेंविषयीं पूर्वी सांगितलेंच आहे.

तें काय सांगितलें आहे ?

' समानाश्रयवचनात्सिद्धम् ' ( ६।४।२२ वा. १२ ) समानाश्रय आभीय असिद्ध होतें; आणि येथें तर आभीय शास्त्रें व्याश्रय आहेत.

तीं व्याश्रय कशीं ?

---

५. ' अयामन्ता० ' येथे इत्नु प्रत्ययाचा पाठ आणि ' कृइनि० ' येथें ब नु ग्रहण.

१. ( सू. ५६ ) लघु आहे पूर्वी ज्याहून अशा वर्णाहून पुढें असलेल्या णि या प्रत्ययाचे स्थानीं ल्यप् प्रत्यय पुढें असतांना अय् असा आदेश होतो.

२. लघुपूर्वस्य असा पाठ घेऊन हें वार्तिक प्रवृत्त झालें आहे. लघुपूर्वस्य हें ' णेः ' याचे विशेषण होय. ज्याच्या पूर्वी लघु आहे अशा णि या प्रत्ययाला अय् आदेश होतो असा अर्थ आहे. विगणय्य अशीं अकारान्त धातूचीं उदाहरणें आहेत. येथें ' अतो लोपः ' याचा बाध करून अगोदर अय् आदेश झाल्यानंतर मागाहून लोप होतो.

३. प्र-उपसर्ग-पूर्वक शम् आणि तम् धातूंहून णिच्, उपधावृद्धि, ह्रस्व ( ६।४।९२ ), पुढें क्त्वा प्रत्यय, त्याला ल्यप् आदेश आणि प्रकृत सूत्रानें अय् आदेश-हीं कार्यें होत असतात. येथें णि प्रत्ययाच्या मागें व्यंजन आहे; लघु नाहीं. सबब अय् आदेश होणार नाहीं म्हणून वचन करावयास पाहिजे.

४. चिकीर्ष या सन्-प्रत्ययान्त धातूहून णिच् केला आहे. विगणय्य याप्रमाणें येथें अय् आदेश होऊं लागेल त्याचा निषेध केला पाहिजे.

५. मागें ( ६।४।२२ वा. १३ ) पहावें.

मिति । कथम् । णावेते विधयो णेरल्यप्यया-देशः ॥

**विभाषाऽऽपः ॥ ६ । ४ । ५७ ॥**

इङादेशस्य प्रतिषेधो वक्तव्यः । अध्याप्य गतः ।

**आपः सानुबन्धकानिर्देशादिङि सिद्धम् ॥ १ ॥**

आपः सानुबन्धकस्य निर्देशः करिष्यते । आप्लृ इति । तेनेङादेशस्य न भविष्यति ॥ स तर्हि सानुबन्धकनिर्देशः कर्तव्यः । न कर्तव्यः । लक्षणप्रतिपदोक्तयोः प्रतिपदोक्तस्यैवेत्येवं न भविष्यति ॥

**[ युप्लुवोर्दीर्घश्छन्दसि ॥ ६ । ४ । ५८ ॥**

**क्षियः ॥ ६ । ४ । ५९ ॥**

**निष्ठायामण्यदर्थे ॥ ६।४।६० ॥**

**वाऽऽक्रोशदैन्ययोः ॥ ६।४।६१ ]**

इति श्रीभगवत्पतञ्जलिविरचिते व्याकरणमहाभाष्ये षष्ठस्याध्यायस्य चतुर्थे पादे द्वितीयमाह्निकम् ॥

---

णि या प्रत्ययामुळें ह्रस्व वगैरे कार्यें झालीं आहेत; आणि ल्यप् या प्रत्ययामुळें अय् आदेश प्राप्त होत आहे.

( सू. ५७ ) इङ् धातुला आदेश होऊन जें आप् असें रूप होतें त्याहून पुढील णि या प्रत्ययाला अय् आदेश होत नाहीं असें वचन करावें. उदाहरणार्थ–अध्याप्य गतः.

( वा. १ ) विभाषाऽऽपः येथें आपः याचे ऐवजी आप्लृ असा इत्संज्ञक लृकार लावून निर्देश केला म्हणजे त्यामुळें इङादेश जो आप् त्याहून पुढील णि या प्रत्ययाला अय् आदेश होणार नाहीं.

तर मग तसा लृकार लावून निर्देश केला पाहिजे.

तसा निर्देश करावयास नको.

नाहीं केला तर अध्याप्य गतः येथें कां बरें अय् आदेश होत नाहीं ?

लाक्षणिक व प्रतिपदोक्त यांमध्यें प्रतिपदोक्ताचेंच ग्रहण करावें असें सांगणाऱ्या ' लक्षणप्रतिपदोक्तयोः प्रतिपदोक्तस्यैव ग्रहणम् ' या परिभाषेनें अध्याप्य गतः येथें अय् आदेश होणार नाहीं.

याप्रमाणें श्रीभगवान् पतंजलि ऋषींनीं रचिलेल्या व्याकरण–महाभाष्याच्या सहाव्या अध्यायाच्या चवथ्या पादांतील दुसरें आन्हिक समाप्त झालें.

---

१. ( सू. ५७ ) आप् धातूहून पुढें असलेल्या णि प्रत्ययाचे स्थानी ल्यप् प्रत्यय पुढें असतांना अय् आदेश विकल्पेंकरून होतो.

२. ' इङ् अध्ययने ' या धातूहून णिच्, ' क्रीङ्-जीनां० ' ( ६।४।४८ ) यानें आत्व, ' अर्तिह्री० ' ( ७।३।३६ ) यानें पुक्, पुढें क्त्वा प्रत्यय आणि त्याला ल्यप् आदेश हीं कार्यें झाली आहेत अध्याप्य गतः येथेंही आप् असें स्वरूप झालें असल्यामुळें अय् आदेश प्राप्त होतो. त्याच्या निषेधाकरितां वार्तिकाची प्रवृत्ति झाली आहे.

१. ( सू. ५८ ) यु व प्लु या धातूंना ल्यप् प्रत्यय पुढें असतांना दीर्घ होतो. उदाहरणार्थ वियूय, परिप्लूय.

१. ( सू. ५९ ) क्षि धातूला ल्यप् पुढें असतांना दीर्घ होतो. उदाहरणार्थ–प्रक्षीय.

१. ( सू. ६० ) भाव किंवा कर्म यांहून अन्य अर्थाचा निष्ठा प्रत्यय पुढें असतांना क्षि धातूला आक्रोश किंवा दैन्य हे अर्थ गम्यमान असतांना विकल्पानें दीर्घ होतो. उदाहरणार्थ–क्षितायुरेधि; क्षीणायुरेधि; क्षितोऽयं तपस्वी; क्षीणोऽयं तपस्वी.

१. ( सू. ६१ ) ण्यत् प्रत्ययाचा अर्थ जो भाव किंवा कर्म त्याहून अन्य अर्थी विद्यमान जो निष्ठा प्रत्यय तो पुढें असतांना क्षि धातूला दीर्घ होतो. उदाहरणार्थ–प्रक्षीणः

अध्याय ६ पाद ४ आ. २ समाप्त.

**स्यसिच्सीयुट्तासिषु भावकर्मणोरुपदेशेऽज्झनग्रहदृशां वा चिण्वदिट् च ॥ ६ । ४ । ६२ ॥**

भावकर्मणोरिति कथमिदं विज्ञायते । भावकर्मणोर्ये स्यादय इति । आहोस्विद्भावकर्मवाचिनि परतो ये स्यादय इति । किं चातः । यदि विज्ञायते भावकर्मणोर्ये स्यादय इति सीयुड् विशेषितः स्यसिच्तासयोऽविशेषिताः । अथ विज्ञायते भावकर्मवाचिनि परतो ये स्यादय इति स्यसिच्तासयो विशेषिताः सीयुडविशेषितः । उभयथा चिण्वद्भावोऽविशेषितः ॥ यथेच्छसि तथास्तु । अस्तु तावद्भावकर्मणोर्ये स्यादय इति । ननु चोक्तं सीयुड् विशेषितः स्यसिच्तासयोऽविशेषिता इति । स्यसिच्तासयश्च विशेषिताः । कथम् । भावकर्मणोर्यग्भवती-

---

( सू. १ ) काय, येथें भाव किंवा कर्म या अर्थी विद्यमान जे स्य वगैरे प्रत्यय असा अर्थ आहे, अथवा भावकर्मवाचक प्रत्यय पुढें असतांना जे स्य वगैरे प्रत्यय असा आहे ?

यांत काय बरें फरक आहे ?

जर भाव किंवा कर्म या अर्थी विद्यमान जे स्य वगैरे प्रत्यय असा अर्थ असेल तर ' भावकर्मणोः ' हें विशेषण फक्त सीयुटालाच लागूं पडतें; आणि स्य, सिच् व तासि यांना लागू पडत नाहीं.

आतां, जर भाव किंवा कर्म या अर्थांचा वाचक प्रत्यय पुढें असतांना जे स्य वगैरे प्रत्यय असा अर्थ असेल तर भावकर्मणोः हें विशेषण स्य, सिच् आणि तास् यांना लागूं पडतें पण सीयुटाला लागूं पडत नाहीं. तेव्हां, कोणतीही तऱ्हा घेतली तरी स्य, सिच् वगैरे चौघांकडे ' भावकर्मणोः ' याचा संबंध जमत नसल्यामुळें त्या स्य, सिच् इत्यादिकांच्या द्वारानें चिण्वद्भावाचा विषय ठरवावयाचा असल्यास तो ठरत नाहीं.

दोन तऱ्हांपैकीं तुझ्या इच्छेप्रमाणें कोणतीही तऱ्हा असो. भाव किंवा कर्म या अर्थी विद्यमान जे स्य वगैरे प्रत्यय असा कां अर्थ असे ना ?

पण ही तऱ्हा घेतली तर भावकर्मणोः हे विशेषण फक्त सीयुटालाच लागूं पडतें आणि स्य, सिच्, तासि यांना लागूं पडत नाहीं असें सांगितलें आहे ना ?

स्य, सिच् आणि तासि यांनाही ' भावकर्मणोः ' हें विशेषण लागू होतें.

तें कसें ?

भाव व कर्म या अर्थी सार्वधातुक प्रत्यय पुढें असतांना यक् होतो असें ' सार्वधातुके यक् '

---

१. ( सू. ६२ ) उपदेशीं अच् शेवटीं असलेले तसेच हन्, ग्रह् व दृश् हे जे धातू त्यांना णिच् प्रत्यय पुढें असतांना जे कार्य होतें तें कार्य स्य सिच् सीयुट् आणि तासि हे प्रत्यय पुढें असतांना होतें, आणि त्या स्य वगैरे प्रत्ययांना इट् आगम होतो; हें सर्व विकल्पानें होतें; भावे प्रयोग किंवा कर्मणि प्रयोग मात्र असला पाहिजे.

२. क्रियापदामध्यें धातूच्या पुढें होणारा लकार हा भाव या अर्थी केला तर भावे प्रयोग म्हणतात; तसाच कर्म या अर्थी केला तर कर्मणि प्रयोग म्हणतात; आणि कर्ता या अर्थी केला तर कर्तरि प्रयोग म्हणतात. सीयुट् हा लिङ् प्रत्ययाचा आगम होत असल्यामुळें सीयुटाला भाव व कर्म हे अर्थ आहेत असें म्हणतां येतें; आणि लृङ् किंवा लृट् पुढें असतांना धातूच्या पुढें मध्यें होणारा स्य प्रत्यय, तसाच लुट् पुढें असतांना मध्यें होणारा तास् प्रत्यय, आणि लुङ् पुढें असतांना मध्यें होणारा सिच् प्रत्यय यांना भाव व कर्म हे अर्थ आहेत असें म्हणतां येत नाहीं.

त्यत्र स्यादयोऽप्यनुवर्तिष्यन्ते । अथवा पुनरस्तु भावकर्मवाचिनि परतो ये स्यादय इति । ननु चोक्तं स्यसिच्तासामयो विशेषिताः सीयुडविशेषित इति । सीयुट् च विशेषितः । कथम् । भावकर्मवाचिनि परतः सीयुड् नास्तीति कृत्वा भावकर्मवाचिनि सीयुटि कार्यं विज्ञास्यते ॥

अथेट् चेत्युच्यते कस्यायमिड् भवति । अङ्गस्येति वर्तते । यद्येवमादित इट् प्राप्नोत्यडाड्वत् । तद्यथाडाटौ टित्त्वादादितो भवतस्तद्वत् ॥ एवं तर्हि स्यादीनामेव भविष्यति । एवमपि षष्ठ्यभावान्न प्राप्नोति । ननु च भावकर्मणोरित्येषा षष्ठी । नैषा षष्ठी । किं तर्हि । अर्थनिर्देश एषा सप्तमी । भावे चार्थे कर्मणि चेति । एवं तर्हि भावकर्मणोरित्येषा सप्तमी स्यादिष्विति सप्तम्याः षष्ठीं प्रकल्पयिष्यति तस्मिन्निति निर्दिष्टे पूर्वस्य [ १. १ ६६ ] इति । एवमपि न सिध्यति ।

---

यानें विधान करून तेथें स्य वगैरेंची अनुवृत्ति करण्यांत येईल.

अथवा भावकर्मवाचक प्रत्यय पुढें असतांना जे स्य वगैरे प्रत्यय असा कां अर्थ असे ना ?

पण ही तऱ्हा घेतली असता स्य, सिच् व तास् याना भावकर्मणो: हे विशेषण लागू पडतें पण सीयुटाला लागू पडत नाहीं असें म्हटलें आहे ना ?

सीयुटालाही तें विशेषण लागू पडतें.

तें कसें ?

भावकर्मवाचक प्रत्यय पुढें असतांना जो सीयुट् असें विशेषण संभवत नाहीं; म्हणून भावकर्मवाचक जो सीयुट् असें विशेषण लावून तो पुढें असतांना तें कार्य समजलें जाईल.

आतां येथें इट् आगम होतो असें म्हटलें आहे; तो इट् आगम कोणाला बरें होतो ? अङ्ग हा अधिकार अनुवृत्तीनें येत आहे.

असें आहे तर मग अंगाचा आद्यावयव इट् आगम होऊं लागेल. जसे अट् व आट् ( ६।४।७१, ७२ ) हे आगम अंगाचे आद्यावयव होतात तसाच येथेंही इट् आगम आद्यावयव होईल.

तर मग स्य वगैरे प्रत्ययांना इट् आगम होतो असा अर्थ करतां येईल.

' स्यसिच्सीयुट्तासिषु ' येथें षष्ठी नसल्यामुळें तसा अर्थ करता येणार नाहीं.

पण ' भावकर्मणोः ' ही षष्ठी आहे ना ?

ही षष्ठी नव्हे; तर, भावकर्म या अर्थी अशा अर्थाची ही सप्तमी आहे.

असें आहे तर ' भावकर्मणोः ' ही सप्तमी स्यसिच्सीयुट्तासिषु या सप्तमीला ' तस्मिन्निति निर्दिष्टे० ' ( १।१।६६ ) या परिभाषेच्या साह्यानें षष्ठी बनवील.

तरीही स्य वगैरेंना इडागम साधत नाहीं.

---

३ ' सार्वधातुके यक् ' ( ३।१।६७ ) येथें ' भावकर्मणोः ' याचा सार्वधातुक प्रत्ययाशीं संबंध आहे तो आतां यक् प्रत्ययाशीं संबंध करावयाचा. तेव्हां भाव व कर्म या अर्थी सार्वधातुक प्रत्यय पुढें असतांना यक् होतो असा अर्थ होतो. तेथें ' स्यतासी लृ० ' ( ३।१।३३ ) ' च्लेः सिच् ' ( ३।१।४४ ) येथून स्य वगैरेंची अनुवृत्ति करून वाक्यभेदानें संबंध करावयाचा. तो असा–स्य वगैरे जे प्रत्यय सांगितले आहेत ते भाव व कर्म या अर्थी होतात असें विधान केल्यानें सीयुटाप्रमाणें स्य, सिच् आणि तास् यांनाहि भावकर्मवाचकत्व येतें.

४ तेव्हां भाववाचक अथवा कर्मवाचक प्रत्यय पुढें असतांना जे स्य, सिच्, सीयुट् आणि तास् त्यांना इट् आगम होतो असा अर्थ होईल.

किं कारणम् । न ह्यर्थेन पौर्वापर्यमस्ति । अर्थेऽसंभवात्तद्वाचिनि शब्दे कार्यं विज्ञास्यते । एवमपि सीयुटो न प्राप्नोति ॥ एवं तर्हि सप्तमे योगविभागः करिष्यते । आर्धधातुकस्येट् । यावानिड् नाम स सर्व आर्धधातुकस्येड् भवति । ततो वलादेः । वलादेरार्धधातुकस्येड् भवतीति ॥ यद्येवं स्यसिच्सीयुट्तासिष्विड् भवति चिण्वद्भावोऽविशेषितो भवति । तत्र को दोषः । स्यसिच्सीयुट्तासिष्विड् भवत्यज्झनग्रहदृशां वा चिण्वदिति क्वचिदेव चिण्वद्भावः स्यात् । एवं तर्हि स्यादीनेवापेक्षिष्यामहे । स्यसि-

काय कारण ?

कारण असे कीं– भाव आणि कर्म हे अर्थ आहेत. 'ते अर्थ पुढें असताना जे स्य वगैरे प्रत्यय' असें कसें म्हणता येईल ? अर्थाबरोबर शब्दाचें पौर्वापर्य कधींच असत नाहीं.

तर मग अर्थाबरोबर पौर्वापर्य संभवत नसल्यामुळे भावकर्मवाचक शब्द पुढें असताना जे स्य, सिच् वगैरे त्यांना इट् आगम होतो असें समजलें जाईल.

तरी देखील सीयुटाला इट् आगम प्राप्त होत नाहींच.

तर मग, आतां सप्तमाध्यायामध्यें योगविभाग करण्यांत येईल. तो असा– 'आर्धधातुकस्येट्' (७।२।३५) एवढेंच एक सूत्र होय. जेवढा इडागम म्हणून सांगितला आहे तो सर्व आर्धधातुकाला होतो असा त्याचा अर्थ समजावा.[६] त्यानंतर 'वलादेः' असे दुसरें सूत्र होय. वलादि आर्धधातुकाला इट् आगम होतो असा त्याचा पूर्वीप्रमाणेंच अर्थ आहे.

अशा रीतीनें स्य, सिच्, सीयुट् आणि तास् यांना इट् आगम होऊं शकतो, पण कोणता प्रत्यय केला असताना चिण्वद्भाव करावा तो विशिष्ट प्रत्यय काहीं समजत नाहीं.

मग तसें झाल्यास कोठें दोष येत आहे ?

स्य, सिच्, सीयुट् आणि तास् हे असतांना इट् आगम होतो व अजन्त, हन्, ग्रह् आणि दृश् या धातूंना चिण्वद्भाव विकल्पानें होतो असा अर्थ झाल्यामुळें त्या धातूंना कोणताही प्रत्यय केला तरी तेथें चिण्वद्भाव होऊं लागेल.

असें आहे तर या चिण्वद्भावाविषयींही स्य,

५. जसे भावकर्मवाचक प्रत्यय स्य, सिच् आणि तास् या प्रत्ययांच्या पुढें आहेत असें म्हणतां येतें, तसें भावकर्मवाचक प्रत्यय सीयुटाच्या पुढें आहेत असें म्हणतां येत नाही. कारण सीयुट् हा भावकर्मवाचक प्रत्ययाचा अवयव आहे

६. जेथें इट् आगम सांगितला असेल तेथें 'आर्धधातुकस्य' हें पद उपस्थित होतें अशी पदोपस्थापक परिभाषाही आहे. तेव्हां 'स्यसिच्सीयुट्तासिषु' या सप्तमीला षष्ठीची कल्पना केली नाहीं तरी स्य, सिच वगैरेंना इट् आगम होईल. तसेंच भावकर्मवाचक प्रत्यय सीयुटाच्या पुढें नसला तरी तो असला म्हणजे सीयुटाला इट् आगम होईल. कारण, भाव अथवा कर्म हा अर्थ गम्यमान असतांना आणि स्य सिच् सीयुट् किंवा तास् हे असतांना आर्धधातुकाला इट् आगम होतो असा अर्थ होतो. आतां, आर्धधातुक प्रत्यय कोणता अशी आकांक्षा उत्पन्न झाली असतांना अर्थातच स्य, सिच्, सीयुट् व तास् हेच आर्धधातुक घेतां येतील.

७. ह्या सूत्रानें इट् आगम आणि चिण्वद्भाव अशीं दोन विधानें केली आहेत. इट् आगमामुळें आर्धधातुकस्य हें पद उपस्थित झालें, व तें आर्धधातुक प्रत्यय कोणते ते दाखविण्याच्या कामीं 'स्य सिच् सीयुट् आणि तास् हे असतांना आर्धधातुकाला इट् आगम होतो' अशा अर्थानें 'स्यसिच्सीयुट्तासिषु' हें पद खर्ची पडलें; तेव्हां त्याचा चिण्वद्भावाकडे संबंध होणार नाहीं. म्हणून 'भाव किंवा कर्म अर्थ गम्यमान असतांना उपदेशीं अजन्त आणि हन् ग्रह् व दृश् या धातूंना चिण्वद्भाव होतो, आणि स्य सिच् वगैरे प्रत्यय अस-

च्सीयुट्तासिष्विड् भवति । अज्झनग्रहदृशां वा चिण्वत्स्यादिष्विति ॥

अथ के पुनरिममिटं प्रयोजयन्ति । येऽनुदात्ताः । अथ य उदात्तास्तेषां कथम् । सिद्धं तेनैव परत्वात् ॥ उदात्तेभ्योऽपि वा अनेनैवेडेषितव्यः । किं प्रयोजनम् । कारयतेः कारिष्यते । हारयतेर्हारिष्यते । इटोऽसिद्धत्वाण्णेरनिटि [ ६. ४. ५१ ] इति णिलोपो यथा स्यात् । कथं पुनरिच्छतापि भवतोदात्तेभ्यो ऽनेनैवेड् लभ्यो न पुनरनेनास्तु तेन वेति तेनैव स्याद्विप्रतिषेधेन । ननु च नित्योऽयम् । कृतेऽपि तस्मिन्प्राप्नोत्यकृतेऽपि प्राप्नोति । न त्वस्मिन्कृतेऽपि स प्राप्नोति । किं कारणम् । अवलादित्वात् । तस्मादनेनैव भविष्यतीट् ॥

कानि पुनरस्य योगस्य प्रयोजनानि ।

---

सिच् वगैरे प्रत्ययांची अपेक्षा धरता येईल; म्हणजे चिण्वद्भावाकडेही त्याचा संबंध करण्यांत येईल. तो असा–स्य सिच् वगैरेंना इट् होतो, व अजन्त, हन्, ग्रह आणि दृश् या धातूंना स्य सिच् वगैरे प्रत्यय पुढें असतांना विकल्पानें चिण्वद्भाव होतो.

आतां, येथें अजन्त, हन्, ग्रह्, आणि दृश् यांपैकीं कोणत्या धातूकरितां बर इट् आगमाचें विधान करावें लागत आहे ?

जे धातू अनुदात्त आहेत त्यांकरितां.

आता या धातूमध्यें जे उदात्त धातू आहेत त्यांच्या संबंधानें काय व्यवस्था आहे ?

त्यांच्या संबंधाने वलादेः ( ७।२।३५ ) या सामान्य सूत्रानेच इट् आगम सिद्ध आहे; आणि तेथें प्रकृत सूत्रानें इट् आगम प्राप्त झाला तरी परत्वास्तव त्याचा बाध करून सामान्य सूत्रानेंच तेथें इट् आगम करावा लागणार आहे.

पण उदात्त धातू असले तरी तेथेंही प्रकृत सूत्रानेंच इट् आगम होणें इष्ट आहे.

काय कारण ?

कारण असें कीं कृ धातूहून णिच् प्रत्यय करून सिद्ध झालेल्या कारि या णिजन्त धातूहून कर्मणि लृट् प्रत्यय केला असतांना कारिष्यते असें रूप होतें. तसेंच, हृ धातूचें हारिष्यते असें रूप होतें. येथें प्रकृत सूत्रानें इट् आगम झाला असतां त्याला आभीयासिद्धत्व असल्यामुळें "णेरनिटि" ( ६।४।५१ ) यानें णिलोप होतो तो झाला पाहिजे.

तेथें प्रकृत सूत्रानें इट् आगम व्हावा अशी इच्छा खरी, पण व्हावा कसा ? यानेंही होईल व त्यानेही होईल असें कां होणार नाहीं ? विचारच केला तर पर असल्यामुळें 'वलादेः' यानेंच इट् होईल.

पण, प्रकृत सूत्रानें प्राप्त झालेला इट् आगम नित्य आहे. कारण 'वलादेः' या सामान्य सूत्रानें इट् आगम केला अथवा न केला तरीही प्रकृत सूत्राने इट् आगम प्राप्त होतो. आणि प्रकृत सूत्रानें इट् आगम केला असतां 'वलादेः' याने मात्र इट् आगम प्राप्त होत नाहीं.

काय कारण ?

कारण असें कीं प्रकृत सूत्रानें इट् आगम झाल्यानंतर स्य सिच् वगैरे प्रत्यय वलादि असत नाहींत. तेव्हां कारिष्यते इत्यादि उदाहरणांमध्यें उदात्त धातू असले तरी तेथें स्य वगैरे प्रत्ययांना प्रकृत सूत्रानेंच इट् आगम इष्ट असलेला साधत आहे.

आतां या सूत्राचीं उदाहरणें कोणतीं बरें ?

---

तील तेथ त्यांना इट् आगम होतो' असा अर्थ होईल, आणि वाटेल तो प्रत्यय केला तरी तेथें चिण्वद्भाव होऊं लागेल.

८. अनुदात्त धातू कोणते ते "एकाच०" ( ७।२।१० ) या सूत्रावरील भाष्यामध्यें सांगितले आहेत.

**वृद्धिश्चिण्वद्युक् च हन्तेश्च घत्वं दीर्घश्चोक्तो यो मितां वा चिणीति ।**

वृद्धिः प्रयोजनम् । चेष्यते चायिष्यते ॥ युक् च प्रयोजनम् । ग्लास्यते ग्लायिष्यते ॥ हन्तेश्च घत्वं प्रयोजनम् । हनिष्यते घानिष्यते ॥ दीर्घश्चोक्तो यो मितां वा चिणीति स च प्रयोजनम् । शमिष्यते शामिष्यते । तमिष्यते तामिष्यते ॥

**इट् चासिद्धस्तेन मे लुप्यते णिर्नित्यश्चायं वल्निमित्तो विघाती ॥**

इटोऽसिद्धत्वाण्णेरनिटि [ ६. ४. ५१ ] इति णिलोपो यथा स्यात् । कथं पुनरयं नित्यः । कृताकृतप्रसङ्गित्वात् । कृतेऽपि तस्मिन्निटि साप्तमिक आर्धधातुकस्येड् वलादेः [ ७. २. ३५ ] इति पुनरयं भवति । अस्मिंस्तु विहिते वलादित्वस्य निमित्तस्य विहतत्वात्साप्तमिको न भवति ॥

अथोपदेशग्रहणं किमर्थम् ।

---

( श्लो वा. १ ) " अचो ञ्णिति " ( ७।२।११५ ) या सूत्रानें सांगितलेली वृद्धि होणें हें या सूत्राचें प्रयोजन होय. उदाहरणार्थ--चेष्यते, चायिष्यते.

" आतो युक्० " ( ७।३।३३ ) या सूत्रानें युक् आगम होणें हें चिण्वद्भावाचें प्रयोजन होय. उदाहरणार्थ--ग्लास्यते, ग्लायिष्यते.

" हो हन्तेः० " ( ७।३।५४ ) या सूत्रानें सांगितलेलें कुत्व म्हणजे येथें घकार आदेश होणें हें चिण्वद्भावाचें प्रयोजन होय. उदाहरणार्थ--हनिष्यते, घानिष्यते.

" चिण्णमुलोः० " ( ६।४।९३ ) यानें चिण् पुढें असतांना विकल्पानें मित्संज्ञकांना सांगितलेला जो दीर्घ तोही या सूत्राचें प्रयोजन होय. उदाहरणार्थ–शमिष्यते, शामिष्यते; तमिष्यते तामिष्यते.

प्रकृत सूत्रानें सांगितलेला इट् आगम हा आभीय असल्यामुळें असिद्ध आहे; म्हणून "णेरनिटि " ( ६।४।५१ ) या सूत्रानें णिलोप होतो हेही या सूत्राचें प्रयोजन होय. येथें प्रकृत सूत्रानें सांगितलेला इट् आगम हाच होतो. कारण तो नित्य आहे; आणि वलादि म्हणून होणारा इट् आगम अनित्य आहे.

प्रकृत सूत्रानें सांगितलेला इट् आगम हा नित्य कसा ?

सातव्या अध्यायातील ' आर्धधातुकस्येड्० ' ( ७।२।३५ ) या सूत्रानें इट् आगम केला अथवा न केला तरी पुनः प्रकृत सूत्राने इट् आगम प्राप्त होत आहे. आणि हा इट् आगम केला म्हणजे मात्र वलादित्व हें त्या इट् आगमाचें निमित्त नष्ट होत असल्यामुळें त्याची प्राप्ति येत नाहीं; हा इट् आगम केल्यानें त्याचें निमित्त वलादित्व हें नष्ट होतें. तेव्हां हा त्याच्या निमित्ताचा नाश करणारा आहे म्हणूनच हा नित्य आहे. तो इट् आगम झाला तरी तो ह्या इट् आगमाचें निमित्त नष्ट करीत नाहीं.

आता येथें ' उपदेशे ' असें कशाकरितां म्हटलें आहे ?

---

९. चि धातूहून कर्मणि लुट्, त पत्व, स्य, चिण्वद्भावानें वृद्धि, इट् आगम व अय् आदेश हीं कार्यें झालीं आहेत.

१०. ग्लै धातूहून भावे लृट् त वगैरे कार्यें झालीं आहेत व चिण्वद्भावामुळें ' आतो युक्० ' यानें युक् आगम झाला आहे.

११. हन् धातूहून कर्मणि लृट् वगैरे, हन्+स्य+ते असें असतां चिण्वद्भावानें वृद्धि व ' होहन्तेः ' ( ७।३।५४) यानें घत्व आणि इट् आगम हीं कार्यें झालीं आहेत.

१२. शम् धातूहून णिच्; उपधावृद्धि; मितां ह्रस्वः, लृट् वगैरे; शमिस्यते असें असतां चिण्वद्भावामुळें ' चिण्णमुलोः ' यानें पाक्षिक दीर्घ इट् व णिलोप हीं कार्यें झालीं आहेत.

**चिण्वद्भाव उपदेशवचनमृकारगुणबलीयस्त्वात् ॥ १ ॥**

चिण्वद्भाव उपदेशवचनं क्रियत ऋकारगुणस्य बलीयस्त्वात् । कारिष्यते । परत्वाद् गुणे कृते रपरत्वे चानजन्तत्वाच्चिण्वद्भावो न प्राप्नोति । उपदेशग्रहणाद्भविष्यति ॥

**वधिभावात्सीयुटि चिण्वद्भावो विप्रतिषेधेन ॥ २ ॥**

वधिभावात्सीयुटि चिण्वद्भावो भवति विप्रतिषेधेन । वधिभावस्यावकाशः । वध्यात् वध्यास्ताम् वध्यासुः । चिण्वद्भावस्यावकाशः । घानिष्यते अघानिष्यत । इहोभयं प्राप्नोति । घानिषीष्ट घानिषीयास्ताम् घानिषीरन् । चिण्वद्भावो भवति विप्रतिषेधेन ॥ अथेदानीं चिण्वद्भावे कृते पुनःप्रसङ्गविज्ञानाद्वधिभावः कस्मान्न भवति । सकृद्गतौ विप्रतिषेधे यद्बाधितं तद्बाधितमेवेति ॥

---

( वा. १ ) चिण्वद्भाव सांगणाऱ्या ह्या प्रकृत सूत्रामध्यें 'उपदेशे' असे जें म्हटलें तें ऋकाराला[13] होणारा गुण बलवान् आहे म्हणून म्हटलें आहे. उदाहरणार्थ—कारिष्यते[13]. येथें परत्वास्तव ऋकाराला गुण होतो तो रपर केला असतांना अजन्त अंग नसल्यामुळे चिण्वद्भाव प्राप्त होत नाहीं; आणि उपदेश—ग्रहण केलें असतांना सध्यां अजन्त नसलें तरी उपदेशीं अजन्त असल्यामळे चिण्वद्भाव होतो.

( वा. २ ) सीयुट् पुढे असतांना विप्रतिषेध असल्यामुळें वध आदेशाचा ( २।४।४२ ) बाध करून प्रथमतः चिण्वद्भाव होतो. उदाहरणार्थ—वध आदेशाला वध्यात्[14] वध्यास्तां वध्यासुः येथें अवकाश आहे; व चिण्वद्भावाला घानिष्यते अघानिष्यत येथें अवकाश आहे. पण घानिषीष्ट[15] घानिषीयास्ताम् येथें दोघांची युगपत् प्राप्ति येते; तेव्हा तेथे पर असल्यामुळें चिण्वद्भाव होतो.

आतां, घानिषीष्ट येथें चिण्वद्भाव केल्यानंतर पुनःप्रसंगविज्ञानन्यायानें वध आदेश कां बरें होत नाहीं ?

पूर्व व पर शास्त्रांची युगपत् प्राप्ति आली असतांना पर शास्त्रानें ज्याचा एकदां बाध केला त्याचा बाधच कायम होतो, अर्थात् तशा ठिकाणीं पूर्वशास्त्राची पुनः प्रवृत्ति करावयाची नाहीं असें 'सकृद्गतौ विप्रतिषेधेन यद्बाधितं तद्बाधितमेव' ही परिभाषा सांगत आहे.

---

१३. कृ धातूहून कर्मणि लृट् वगैरे; कृ+स्यते अशी स्थिति असतांना या प्रकृत सूत्रानें चिण्वद्भाव आणि गुण (७।३।८४) यांची प्राप्ति येते त्यांमध्ये गुण अगोदर केला तर अजन्त नसल्यामुळे चिण्वद्भावाची प्राप्ति नाही. तसेंच चिण्वद्भाव केला तर गुणाची प्राप्ति येत नाहीं; कारण वृद्धीनें ( ७।२।११५ ) बाध होत आहे. तेव्हां दोन्ही अनित्य असल्यामुळें परत्वास्तव गुण होईल. चि स्तु वगैरे इकारान्त व उकारान्त धातूंना प्राप्त होणारा गुण अनित्य असल्यामुळें बलवान् नाहीं; कारण, चिण्वद्भाव नित्य आहे गुण केला तरी अजन्तत्व नष्ट होत नाहीं म्हणून येथें ऋकाराचें उदाहरण घेतलें आहे.

१४. हन् धातूला आर्धधातुकविवक्षा असल्यानें अगोदर वध आदेश करून नंतर आशीर्लिङ्, तिप्, इतश्च यानें लोप, यासुट्, सुट्, अचा लोप, 'स्कोः०' यानें दोन्ही सकारांचा लोप हीं कार्यें झालीं आहेत.

१५. हन् धातूहून कर्मणि आशीर्लिङ्, त, सीयुट्, सुट् हीं कार्यें झालीं आहेत. येथें 'हनो वध०' ( २।४।४२ ) यानें वध आदेश येतो. पण परत्वास्तव चिण्वद्भावानें त्याचा बाध होतो.

**हनिणिङादेशप्रतिषेधश्च ॥ ३ ॥**

हनिणिङादेशानां च प्रतिषेधो वक्तव्यः। हनिष्यते घानिष्यते। एष्यते आयिष्यते। अध्येष्यते अध्यायिष्यते। लुङीति हनिणिङादेशाः प्राप्नुवन्ति ॥

**अङ्गस्येति तु प्रकरणादाङ्गशास्त्रातिदेशात्सिद्धम् ॥ ४ ॥**

आङ्गं यत्कार्यं तत्प्रतिनिर्दिश्यते न च हनिणिङादेशा आङ्गा भवन्तीति ॥

**[ दीङो युडचि क्ङिति ॥ ६ । ४ । ६३ ॥ ]**

**आतो लोप इटि च ॥ ६ । ४ । ६४ ॥**

अथेड्ग्रहणं किमर्थम्।

**इड्ग्रहणमक्ङिदर्थम् ॥ १ ॥**

इड्ग्रहणं क्रियतेऽक्ङिति लोपो यथा स्यात्। पपिथ तस्थिथेति।

**सार्वधातुके चादीत्यार्धधातुकाधिकारादुपसंख्यानम् ॥ २ ॥**

सार्वधातुके चादीत्यार्धधातुकाधिकारा-

---

(वा. ३) हन्, इण् व इङ् या धातूंना सांगितलेले आदेश चिण्वद्भावानें होत नाहींत असें वचन करावें. उदाहरणार्थ—हनिष्यते; घानिष्यते; एष्यते, आयिष्यते; अध्येष्यते, अध्यायिष्यते. येथें "लुङि च" (२।४।४३), "इणो गा०" (२।४।४५), "विभाषा लुङ्लृङोः" (२।४।५०), या सूत्रांनीं लुङ् पुढें असताना सांगितलेले वध, गा, आणि गाङ् हे आदेश चिण्वद्भावामुळें प्राप्त होत आहेत.[१६]

(वा. ४) 'अङ्गस्य' असा अधिकार येथें चालू असल्यामुळे अङ्गस्य या अधिकारामध्यें जें काय सांगितलें आहे त्याचाच चिण्वद्भावानें अतिदेश केला जात आहे. आणि हन् इण् व इङ् यांचे आदेश तर अंगाधिकारामधील नाहींत.

(सू. ६४) येथें इट् पुढें असतांना असें कशाकरिता म्हटलें आहे?

(वा. १) पपिथ, तस्थिथ, वगैरे उदाहरणांमध्ये कित् किंवा ङित् पुढें नसतांनाही आकाराचा लोप व्हावा म्हणून इट् पुढें असतांना असें स्वतंत्र निमित्त धरलें आहे.

(वा. २) 'आदि' येथें आकाराचा लोप होण्याकरिता 'सार्वधातुक इट् पुढें असतांनाही

---

१६. आर्धधातुके (२।४।३५) या अधिकारांत सांगितलेले जे हन् वगैरेंचे आदेश ते, चिण् हा प्रत्यय आर्धधातुक असल्यामुळें चिण् पुढें असतांना होणारे आहेत; म्हणून चिण्वद्भावानें प्राप्त होत आहेत.

१. (सू. ६३) दीङ् धातूहून पुढें असलेल्या अजादि कित् अथवा ङित् आर्धधातुक प्रत्ययाला युट् आगम होतो. उदा०—दिदीये.

१. (सू. ६४) अजादि आर्धधातुक कित् किंवा ङित् प्रत्यय किंवा इट् आगम पुढें असतांना आकाराचा लोप होतो.

२. ह्या प्रकृत सूत्रामध्यें 'इटि च' असा जो इटि याच्या पुढील 'च' शब्द आहे त्यानें मागील सप्तम्यन्ताचा समुच्चय करावयाचा आहे. आर्धधातुके हें सप्तम्यन्त आहे खरें, पण तें दूर आहे. त्यापेक्षां पूर्वींच्या सूत्रांतील सप्तम्यन्ताचा समुच्चय करणें योग्य आहे. आतां पूर्वसूत्रांत पहावें तर तेथें अचि आणि क्ङिति अशीं दोन सप्तम्यन्त पदें आहेत त्या दोहोंमध्यें जें विशेष्य त्याचाच समुच्चय 'च' शब्दानें होणें योग्य आहे. तेथें क्ङिति हे विशेष्य आहे. अर्थात् क्ङित् आणि इट् पुढें असतांना असें म्हटलें म्हणजे क्ङित् नव्हे असा इट् येथें इट् शब्दानें घेतां येतो; तसेंच, आर्धधातुके हेंही क्ङिति आणि इटि या दोघांना लागतें.

३. दा धातूहून लङ्, उत्तम पुरुष एकवचन इट् प्रत्यय. वेदांतील प्रयोग असल्यामुळें शपाचा लुक् (२।४।७३) व आट् आगम (६।४।७३), ही कार्यें झालीं आहेत. येथें आर्धधातुक संज्ञा नसल्यामुळें

ट्टुपसंख्यानं कर्तव्यम् । इषमूर्जमहमित आदि ॥ ननु च क्ङितीति वर्तमाने यथैवेड्ग्रहणमक्ङिदर्थमेवमार्धधातुक इत्यपि वर्तमान इड्ग्रहणं सार्वधातुकार्थं भविष्यति । न सिध्यति । किं कारणम् । न हि क्ङिताज्विशेष्यते । अचि भवति कतरस्मिन् क्ङितीति । किं तर्हि । अचा क्ङिद्विशेष्यते । क्ङिति भवति कतरस्मिन् अचीति । किं पुनः कारणमचा क्ङिद्विशेष्यते । यथेडप्यज्ग्रहणेन विशेष्येत । अस्ति चेदानीं कचिदिडनजादिर्यदर्थो विधिः स्यात् । अस्तीत्याह । दासीय धासीय ॥ तत्तर्ह्युपसंख्यानं कर्तव्यम् । न कर्तव्यम् । आर्धधातुकत्वात्सिद्धम् । कथमार्धधातुकत्वम् । उभयथा छन्दसीति वचनात् । अन्येऽपि धातुप्रत्यया उभयथा छन्दसि दृश्यन्ते ॥

**[ [1]ईद्यति ॥ ६ । ४ । ६५ ॥ ]**

---

आकाराचा लोप होतो ' असें वचन करावें. उदाहरणार्थ— इषमूर्जमहमित आदि.

पण जसें क्ङिति या पदाची अनुवृत्ति असल्यामुळें इड्-ग्रहण हें क्ङिद्भिन्न पुढें असतांना आकारलोपाकरितां ठरतें, तसें ' आर्धधातुके ' याचीही अनुवृत्ति असल्यामुळें हें इड्ग्रहण सार्वधातुक पुढें असतांना आकारलोपाकरिता ठरेल[4].

हें म्हणणें सिद्ध होत नाहीं.

काय कारण ?

कारण असें कीं— कित् किंवा ङित् असा अच् पुढें असतांना असें ' क्ङिति ' हें अचि याचें विशेषण केलें जात नाहीं. तर, अजादि असा कित् किंवा ङित् पुढें असतांना असें 'अचि' हें क्ङिति याचें विशेषण केलें जात आहे.

पण अचि हें क्ङिति याचें विशेषण आहे याचें काय बरें कारण ?

क्ङिताप्रमाणें ' इटि ' याचेंही ' अचि ' हें विशेषण व्हावें.

पण अजादि नव्हे असा इट् कोठेंतरी आहे कां कीं ज्याच्या व्यावृत्तीकरितां इटि याचें अचि हें विशेषण करण्याचा उपयोग होईल ?

होय, अजादि नव्हे असा इट् आहे असें म्हणतों. उदाहरणार्थ — दासीय, धासीय.

एकंदरीत, सार्वधातुक इट् पुढें असतांना आकाराचा लोप होतो असें वचन केलें पाहिजे.

तसें वचन करावयास नको. कारण ' आदि ' या उदाहरणामध्यें इट् हा आर्धधातुक असल्यामुळें सूत्रानेंच लोप साधत आहे.

तेथे आर्धधातुक संज्ञा कशी बरें होईल.

वेदामध्यें दोन्ही संज्ञा होतात ( ३।४।११७ ) असें सांगितलें आहे म्हणून होईल. वेदामध्यें सार्वधातुक आणि आर्धधातुक ह्या संज्ञा वाटेल त्या ठिकाणीं झालेल्या दृष्टीस पडतात.

---

प्रकृत सूत्रानें आकाराचा लोप होणार नाहीं म्हणून हें वचन केलें आहे.

४. ' दीधी युडचि क्ङिति ' या पूर्वसूत्रामध्यें अचि क्ङिति याचें विशेष्य असेल तर त्याचा समुच्चय येथील ' च ' शब्दानें प्राप्त होतो. परंतु तो संभवत नाहीं. कारण, अच् नव्हे असा इट् कोठेंच नाहीं. तेव्हां दुसऱ्या कोणाचा तरी समुच्चय केला पाहिजे. अशी स्थिति प्राप्त झाली असतां जर आर्धधातुके याचा येथील च शब्दानें समुच्चय होईल तर आर्धधातुक नव्हे असा इट् पुढें असतांना प्रकृत सूत्रानें आकाराचा लोप करतां येईल.

१. (सू. ६५) यत् प्रत्यय पुढें असतांना अंगाच्या शेवटच्या आकाराला ईकार आदेश होतो.

**घुमास्थागापाजहातिसां हलि ॥ ६ । ४ । ६६ ॥**

**ईत्त्वे वकारप्रतिषेधो घृतं घृतपावान इति दर्शनात् ॥ १ ॥**

ईत्त्वे वकारे प्रतिषेधो वक्तव्यः । किं प्रयोजनम् । घृतं घृतपावान इति दर्शनात् । इह मा भूत् । घृतं घृतपावानः पिबत वसां वसापावानः पिबतेति ॥ यदि तर्हि वकारे प्रतिषेध उच्यते कथं धीवरी पीवरीति ।

**धीवरी पीवरीति चोक्तम् ॥ २ ॥**

किमुक्तम् । नैतदीत्त्वम् किं तर्हि ध्याप्यो- रेतत्संप्रसारणमिति ॥

स तर्हि प्रतिषेधो वक्तव्यः । न वक्तव्यः । वनिबेष भविष्यति न कनिबिति ॥

**[ एर्लिङि ॥ ६ । ४ । ६७ ॥**

**वाऽन्यस्य संयोगादेः ॥ ६ । ४ । ६८ ॥**

**न ल्यपि ॥ ६ । ४ । ६९ ॥**

**मयतेरिदन्यतरस्याम् ॥ ६ । ४ । ७० ॥**

**लुङ्लङ्लृङ्क्ष्वडुदात्तः ॥ ६ । ४ । ७१ ॥**

**आडजादीनाम् ॥ ६ । ४ । ७२ ॥**

---

( सू. ६६ वा. १ ) वकारादि प्रत्यय पुढें असतांना ईत्व होत नाहीं असें वचन करावें.

काय प्रयोजन ?

प्रयोजन असें कीं– ' घृतं घृतपावानः पिबत', तसेंच ' वसां वसापावानः पिबत ' येथें ईत्व झालेलें दृष्टीस पडत नाहीं.

जर वकारादि प्रत्यय पुढें असतांना ईत्वाचा प्रतिषेध केला तर धीवरी व पीवरी हीं रूपें कशीं साधतील ?

धीवरी व पीवरी यांविषयीं मागें सांगितलेंच आहे ( ६।४।४२ भाष्य पहा. )

तें काय सांगितलें आहे ?

येथें ईत्व केलेलें नाहीं; तर ' ध्याप्योः संप्रसारणं च ' ( उणा. ४।११४ ) यानें संप्रसारण झालें आहे.

तर मग, तें विप्रतिषेधवचन केलें पाहिजे.

विप्रतिषेधवचन करावयास नको. कारण, घृतपावानः इत्यादि उदाहरणांमध्यें वनिप् प्रत्यय केला आहे; कनिप् नव्हे.

---

१. ( सू. ६६ ) घुसंज्ञक धातू ( दा आणि धा ) तसेंच, मा, स्था, गा, पा, जहाति आणि सा हे धातू यांच्या आकाराला हलादि कित् किंवा ङित् आर्धधातुक पुढें असतांना ईकार आदेश होतो.

२. वेदामध्यें जसे प्रयोग दृष्टीस पडतात तसेच ते बरोबर आहेत असें समजून ते साधावे लागतात. तेव्हां तें काम वनिप् प्रत्ययानें भागतें म्हणून वार्तिक नको.

१. ( सू. ६७ ) घुसंज्ञक ( दा आणि धा ) धातूंना तसेंच मा, स्था, गा, पा, जहाति व सा या धातूंना आर्धधातुक कित् लिङ् पुढें असतांना एत्व होतें उदाहरणार्थ-- देयात्.

१. ( सू. ६८ ) घुमास्थादिकांहून अन्य असून संयोगादि आकारान्त जो धातु त्याला आर्धधातुक कित् लिङ् पुढें असतांना एत्व विकल्पानें होतें. उदाहरणार्थ– ग्लेयात्, ग्लायात्.

१. ( सू. ६९ ) ल्यप् पुढें असतांना घु मा स्था वगैरे धातूंना ईत्व होत नाहीं. उदाहरणार्थ प्रदाय.

१. ( सू. ७० ) मेङ् धातूच्या आकाराला ल्यप् पुढें असतांना ऱ्हस्व इकार आदेश विकल्पानें होतो उदाहरणार्थ अपमित्य, अपमाय.

१. ( सू. ७१ ) लुङ् लङ् आणि लृङ् पुढें असतांना अंगाला अट् असा आगम होतो, व तो उदात्त होतो. उदाहरणार्थ अभूत्.

१. ( सू. ७२ ) अजादि धातूंना लङ् लङ् अथवा लृङ् पुढें असतांना आट् असा आगम होतो. उदाहरणार्थ ऐक्षिष्ट.

**छन्दस्यपि दृश्यते ॥ ६।४।७३ ॥ [1]**

**न माङ्योगे ॥ ६ । ४ । ७४ ॥ [1]**

कस्यायं प्रतिषेधः । आटः प्राप्नोति । अटोऽपीष्यते । तत्तर्ह्यटो ग्रहणं कर्तव्यम् । न कर्तव्यम् । प्रकृतमनुवर्तते । क प्रकृतम् । लुङ्लङ्लृङ्क्ष्वडुदात्तः [ ६. ४. ७१ ] इति । यदि तर्हि तदनुवर्तत आडजादीनाम् [ ७२ ] अट् चेत्यडपि प्राप्नोति । अस्तु । अटि कृते पुनराड् भविष्यति । इहापि तर्ह्यटि कृते पुनराट् प्राप्नोति । अकार्षीत् अहार्षीत् । अड्वचनान्न भविष्यति । इहापि तर्ह्यड्वचनान्न स्यात् । ऐहिष्ट ऐक्षिष्ट । आड्वचनाद्भविष्यति । इहापि तर्ह्याड्वचनात्प्राप्नोति । अकार्षीत् अहार्षीत् । अकृतेऽटि योऽजादिरित्येवमेतद्विज्ञास्यते । किं वक्तव्यमेतत् । न हि । कथमनुच्यमानं गंस्यते । अड्वचनसामर्थ्यात् । यदि कृतेऽटि योऽजादिस्तत्र स्यादड्ग्रहणमनर्थकं स्यात् ॥ अथवोपदेश इति

---

( सू. ७४ ) हा निषेध कोणाचा ?

जवळ असल्यामुळें आट् आगमाचाच निषेध होणार आहे, पण अट् आगमाचाही हा निषेध झाला पाहिजे, तेव्हां येथें अट्ग्रहण केलें पाहिजे.

अट्ग्रहण करावयास नको. कारण मागून अनुवृत्तीनें येत आहे.

तें अड्ग्रहण मागें कोठें आहे ?

लुङ्लङ्लृङ्क्ष्वडुदात्तः ( ६।४।७१ ) येथें आहे.

जर तेथून अड्ग्रहण अनुवृत्तीनें येत आहे तर "आडजादीनाम्" या मधल्या सूत्रामध्येंही त्याचा संबंध करावा लागेल; आणि अजादि धातूंना अट् आगमही होऊं लागेल.

होईल तर होऊं दे. तो केल्यानंतर पुनः आट् करूं म्हणजे झालें.

तर मग अकार्षीत् अहार्षीत् इत्यादि ठिकाणींही अट् केल्यानंतर पुनः आट् करावा लागेल.

अट् केल्यानंतर जर आट् होईल तर अड्विधान व्यर्थ होईल; तेव्हां त्या जोरावर अट् केल्यानंतर पुनः आट् होणार नाहीं.

तर मग, त्याप्रमाणेंच ऐहिष्ट व ऐक्षिष्ट येथेंही अट् केल्यानंतर आट् प्रवृत्त होणार नाहीं.

अट् केल्यानंतर जर आट् प्रवृत्त होणार नाहीं तर आड्विधान व्यर्थ होईल. म्हणून आड्विधानाचे जोरावर अट् केल्यानंतर पुनः आट् प्रवृत्त होईल.

तर मग त्याप्रमाणेंच अकार्षीत् व अहार्षीत् येथेंही अट् केल्यानंतर आट् प्राप्त होत आहे.

अट् केल्यावांचूनच जो अजादि त्याला आट् होतो असें समजण्यांत येईल.

तर मग 'अट् केल्यावाचून जो अजादि' अशा अर्थाचें वचन केलें पाहिजे.

तसें वचन करावयास नको.

तर मग वचनाशिवाय कसें बरें हें लब्ध होत आहे ?

अड्विधानाचे जोरावर लब्ध होत आहे. जर अट् केल्यानंतर जो अजादि बनतो तेथें आट् होईल तर अट् आगम मुळींच सांगावयास नको असें होईल.[2]

अथवा 'स्यसिच्०' ( ६।४।६२ ) येथून

---

१. ( सू. ७३ ) वेदामध्यें हलादि धातूंनाही लुङ् वगैरे पुढें असतांना आट् आगम झालेला दिसून येतो. उदाहरणार्थ सुरुचो वेन आवः.

१. ( सू. ७४ ) माङ् शब्दाचा योग असतांना अट् व आट् आगम होत नाहींत. उदाहरणार्थ मा भवान् कार्षीत्.

२. तेव्हां अर्थातच अट् आगम केल्यावांचून जो अजादि त्यालाच आट् आगम होतो असें समजलें जाईल.

वर्तते । अथवार्धधातुक इति वर्तते । अथवा लुङ्लङ्लृङ्क्ष्वडिति द्विलकारको निर्देशः । लुङादिषु लकारादिषु योऽजादिरिति ॥ सर्वथा ऐज्यत औप्यतेत्येतन्न सिध्यति ॥ एवं तर्हि

**अजादीनामटा सिद्धम्**

अजादीनामटैव सिद्धं नार्थ आटा ॥ एवं तर्हि वृद्ध्यर्थमाड् वक्तव्यः ।

**वृद्ध्यर्थमिति चेदटः ।**

अटो वृद्धिं वक्ष्यामि ॥ यदि तर्ह्यटो वृद्धिरुच्यते

**अस्वपो हसतीत्यत्र**

वृद्धिः प्राप्नोति रोरुत्वे कृते ॥

**धातौ वृद्धिमटः स्मरेत् ॥ १ ॥**

धातावटो वृद्धिं वक्ष्यामि ॥ तत्तर्हि धातुग्रहणं कर्तव्यम् । न कर्तव्यम् । योगविभागः करिष्यते । अटोऽचि वृद्धिर्भवति । तत उपसर्गादृति वृद्धिर्भवति । ततो धातौ ।

---

उपदेशे याची अनुवृत्ति येत आहे. तेव्हां उपदेशीं जो अजादि त्याला आट् होतो.

किंवा, आर्धधातुके हा अधिकार अनुवृत्तीनें येत आहे.[3]

अथवा ' लुङ्लङ्लृङ्क्ष्वडुदात्तः ' असा हा द्विलकारक निर्देश आहे. त्यामुळें लकारावस्थेंतील लुङ् वगैरे पुढें असतांना जो अजादि त्याला आट् होईल.

पण कांहीं झालें तरी, ऐज्यत व औप्यत इत्यादि रूपें साधत नाहींत.[4]

असें आहे तर––

( श्लो. वा १ ) अजादि धातूंना अट् आगम केल्यानेंच ऐज्यत औप्यत इत्यादि सर्व रूपें साधत आहेत; तेव्हां आट् आगम हा मुळींच सांगावयास नको. अजादि धातूंना अट् केला तर ' आटश्च ' ( ६।१।९० ) ही वृद्धि होणार नाहीं म्हणून आट् सांगितलाच पाहिजे.

आटश्च यानें वृद्धि होण्याकरितां आट् आगम सांगितलाच पाहिजे असें म्हणणें असेल तर अटालाच वृद्धि सांगण्यांत येईल; म्हणजे आटश्च हें सूत्र ' अटश्च ' असें करण्यात येईल.

पण जर अटाला वृद्धि सांगितली तर–

अस्वपो हसति येथें ' रु '–ला उत्व केलें असतां वृद्धि प्राप्त होते आहे.[5]

तर मग अटाहून अजादि धातु पुढें असतांना वृद्धि होते असें सांगण्यांत येईल.

तर मग, अटश्च येथें धातुग्रहण करावयास पाहिजे.

धातुग्रहण करावयास नको. कारण योगविभाग करण्यात येईल. तो असा– " अटः " ( ६।१।९० ) अटाहून अच् पुढें असतांना वृद्धि होते असा या सूत्राचा अर्थ होईल. पुढें " उपसर्गादृति " एवढेंच सूत्र करावें. उपसर्गाहून ऋकार पुढें असतांना वृद्धि होते असा त्याचा अर्थ होईल. त्यानंतर " धातौ " असें निराळे सूत्र करावें. हें सूत्र हाच विभाग; व

---

३. लुङ्, लङ् व लृङ् यांना लकार–अवस्थेमध्यें आर्धधातुक संज्ञा आहे. तेव्हां त्या आर्धधातुक प्रत्ययाच्या उत्पत्तीच्या वेळीं जो अजादि धातु त्यालाच आट् आगम होईल.

४. येथें यज् आणि वप् या धातूंना संप्रसारण ( ६।१।१५ ) केल्यानंतर ते अजादि होतात. तेव्हां हे उपदेशीं अजादि नाहींत, आर्धधातुक प्रत्ययाच्या उत्पत्तीच्या वेळींही नाहीत, आणि लकारावस्थेंतही नाहींत.

५. स्वप् धातूहून लङ्, सिप्, शब्लुक् धातूला अट आगम ( ६।४।७१ ), आणि सिप् प्रत्ययाला अट् आगम ( ७।३।९९ ), रुत्व व विसर्ग हीं कार्यें होऊन अस्वपः असें क्रियापद होतें. पुढें हसति याचा योग केला असतां विसर्ग न होतां रूला उत्व (६।१।११४) होऊन गुण होतो. तेथें त्या गुणाचा बाध करून अटश्च यानें वृद्धि होऊं लागेल.

धातावित्युभयोः शेषः ॥ इह तर्हि आटीत् आशीदित्यतो गुणे [ ६. १. ९७ ] इति पररूपत्वं प्राप्नोति ।

परूपं गुणे नाटः

पररूपं गुणेऽटो नेति वक्ष्यामि ॥ तत्तर्हि वक्तव्यम् ।

ओमाङ्गोरुसि तत्समम् ।

यद्यप्येतदुच्यतेऽथवैतर्ह्युस्योमाङ्क्ष्वाटः पररूपप्रतिषेधश्चोदितः स न वक्तव्यो भवति ॥ छन्दोऽर्थं तर्ह्याड् वक्तव्यः । आरैगु कृष्णा । त्रित एनमायुनक् । सुरुचो वेन आवः ।

छन्दोऽर्थं बहुलं दीर्घम्

बहुलं छन्दसि दीर्घत्वं दृश्यते । तद्यथा । पूरुषः नारक इति ॥ एवं तर्हि आयन् आसन् इणस्त्योर्यण्लोपयोः कृतयोरनजादित्वाद् वृद्धिर्न प्राप्नोति ।

इणस्त्योरन्तरङ्गतः ॥ २ ॥

अन्तरङ्गत्वाद् वृद्धिर्भविष्यति । तस्मार्थ आड्ग्रहणेन ॥

---

तो मागील दोन्ही सूत्रांचा शेष समजण्यांत येईल.[६]

असें आहे तर आटीत् आशीत् इत्यादि ठिकाणीं 'अतो गुणे' (६।१।९७) यानें पररूप प्राप्त होत आहे.[७]

(श्लो. वा. २) अटाहून गुण पुढें असतांना पररूप होत नाहीं असें सांगतां येईल.

तर मग 'नाटः' असें म्हणावयास पाहिजे.

तसें म्हणावयास नको.

ओम्, आङ् आणि उस् हे पुढें असतांना प्राप्त झालेल्या पररूपाचें जें निषेधवचन 'उस्योमाङ्क्ष्वाटः प्रतिषेधः' (६।१।९५ वा. १) असें आहे तेंच हें होत आहे. म्हणजे नाटः असें जरी म्हणावें लागलें तरी हरकत नाहीं. कारण 'उस्योमाङ्क्ष्वाटः प्रतिषेधः' असें जें वचन केलें आहे तें आतां निराळें वचन करावयास नको.

तर मग वैदिक प्रयोग साधण्याकरितां आट् आगम सांगितला पाहिजे. उदाहरणार्थ-- आरैगु कृष्णा, त्रित एनमायुनक्, सुरुचो वेन आवः.[८]

वेदामध्यें बाहुल्येंकरून दीर्घ होतो असें दृष्टीस पडतें. उदाहरणार्थ- पूरुषः, नारकः.[९]

तर मग आयन् व आसन् येथें इण् व अस् या धातूंना यण् व अकाराचा लोप केल्यानंतर पुढें अच् नसल्यामुळें वृद्धि प्राप्त होत नाहीं.

इण् व अस् या धातूंना यण् व लोप यांपेक्षां अंतरंग असल्यामुळें प्रथमतःच वृद्धि होईल.[१०]

---

६ अटः आणि उपसर्गादृति या दोन सूत्रांनीं सांगितलेली वृद्धि धातु पुढें असतांना होते असा 'धातौ' या सूत्राचा अर्थ होईल.

७. अट् व अश् या धातूंना आट् आगम झाला असतांना ह्रस्व अकार नसल्यामुळें 'अतो गुणे' याची प्राप्ति येत नाहीं. परंतु आतां आट् न करतां अट् केला तर तेथें वृद्धीचा बाध करून पररूप होऊं लागेल.

८. आरैक्, आयुनक् आणि आवः येथें रिच् युज् आणि वृ हे धातू अजादि नसतांनाही त्यांना आट् आगम पूर्वसूत्रानें (६।४।७३) झाला आहे. हीं रूपें अट् आगमानें साधणार नाहींत.

९. ज्यांना दीर्घ सांगितला नाहीं पण प्रयोगामध्यें दृष्टीस पडतो त्यांना दीर्घ होतो असें "अन्येषामपि दृश्यते" (६।४।१३७) या सूत्रानें सांगितलें आहे. तेव्हां जसा पूरुषः व नारकः येथें दीर्घ होतो तसा आरैक् वगैरे क्रियापदांमध्यें अट् आगमाला दीर्घ होईल.

१०. इण् व अस् या धातूंहून लङ्, अजादि धातूंनाही अट् आगम केला असतां अ+इ+अन् आणि अ+अस्+अन् या अवस्थांमध्यें परत्वास्तव 'अटश्च'

अजादीनामटा सिद्धं
वृद्ध्यर्थमिति चेदटः ।
अस्वपो हसतीत्यत्र
धातौ वृद्धिमटः स्मरेत् ॥ १ ॥
पररूपं गुणे नाट
ओमाङोरुसि तत्समम् ।
छन्दोऽर्थं बहुलं दीर्घ-
मिणस्त्योरन्तरङ्गतः ॥ २ ॥
[ बहुलं छन्दस्यमाङ्योगेऽपि ॥ ६ । ४ । ७५ ॥
इरयोरे ॥ ६ । ४ । ७६ ॥ ]
अचि श्नुधातुभ्रुवां य्वोरियङुवङौ ॥ ६ । ४ । ७७ ॥

इयङादिप्रकरणे तन्वादीनां छन्दसि बहुलम् ॥ १ ॥

इयङादिप्रकरणे तन्वादीनां छन्दसि बहुलमुपसंख्यानं कर्तव्यम् । तन्वं पुषेम । तनुवं पुषेम । विष्वं पश्य । विषुवं पश्य । स्वर्गं लोकम् । सुवर्गं लोकम् । त्र्यम्बकं यजामहे । त्रियम्बकं यजामहे ॥

[ अभ्यासस्यासवर्णे ॥ ६ । ४ । ७८ ॥
स्त्रियाः ॥ ६ । ४ । ७९ ॥
वाऽम्शसोः ॥ ६ । ४ । ८० ॥

---

तेव्हां आट् आगम सांगण्याचा कांहींही उपयोग होत नाहीं.

( सू. ७७ वा. १ ) या इयङुवङ्-प्रकरणामध्यें सांगितलेले आदेश तनु वगैरे शब्दांना बाहुल्येंकरून होतात असें म्हणावें. उदाहरणार्थ— तनुवं पुषेम, तन्वं पुषेम; विष्वं पश्य, विषुवं पश्य; स्वर्गं लोकम्; सुवर्गं लोकम्; त्र्यम्बकं यजामहे, त्रियम्बकं यजामहे.

---

या वृद्धीचा बाध करून ' इणो यण् ' ( ६।४।८१ ) ' श्नसो० ' ( ६।४।१११ ) यांनीं यण् व अकाराचा लोप झाला असतां पुढें अच् नसल्यामुळें ' अटश्च ' ही वृद्धि होऊं शकत नाहीं. तथापि यण् आणि अकाराचा लोप हे पुढील प्रत्ययाच्या निमित्तानें होणारे असल्यामुळें बहिरंग आहेत तेव्हां त्यांपेक्षां अंतरंगत्वास्तव प्रथमतः वृद्धि होईल. आणि आय् आदेश होऊन रूप साधेल.

१. ( सू. ७५ ) वेदामध्यें बाहुल्येंकरून अट् व आट् दिसतात. माङ् शब्दाचा योग असतांनाही ते होतात; आणि योग नसतांनाही होत नाहींत.

१. ( सू. ७६ ) इरे शब्दाचे स्थानीं वेदामध्यें बाहुल्येंकरून ' रे ' असा आदेश होतो. हा रे आदेश झाल्यानंतर ज्या ठिकाणीं त्याला इट् आगम होईल तेथें त्या इरे याला पुनः या प्रकृत सूत्रानें रे आदेश होतो, याकरितांच सूत्रामध्यें इरयोः असें द्विवचन केलें आहे.

१. ( सू. ७७ ) श्नु-प्रत्ययान्त, इवर्ण व उवर्णान्त धातू, आणि भ्रू ह्या अंगांच्या शेवटीं असलेल्या इकार आणि उकार यांना क्रमानें इयङ् व उवङ् हे आदेश अजादि प्रत्यय पुढें असतांना होतात.

२. तनु शब्दांतील उकार आणि त्रि शब्दांतील इकार धातूचा नसला तरी त्याला उवङ् आणि इयङ् हे विकल्पानें झाले आहेत. विष्वम् येथें विषू या शब्दाला ' ओः सुपि ' ( ६।४।८३ ) यानें नित्य यण् प्राप्त झाला आहे, पण तेथेंही एकदां उवङ् होतो. तसेंच स्वर्ग शब्दामध्येंही वकाराच्या ऐवजीं एकदां उवङ् होतो.

१. ( सू. ७८ ) अभ्यासाच्या इवर्ण व उवर्ण यांना असवर्ण अच् पुढें असतांना इयङ् व उवङ् होतात. उदाहरणार्थ—इयेष.

१. ( सू. ७९ ) स्त्री शब्दाला अजादि प्रत्यय पुढें असतांना इयङ् होतो. उदाहरणार्थ—स्त्रियौ.

१. ( सू. ८० ) अम् किंवा शस् पुढें असतांना स्त्री शब्दाला इयङ् विकल्पानें होतो. उदाहरणार्थ— स्त्रियम्, स्त्रीम्.

इणो यण् ॥ ६ । ४ । ८१ ॥ ]

एरनेकाचोऽसंयोगपूर्वस्य ॥ ६ । ४ । ८२ ॥

अथेह कस्मान्न भवति । ब्राह्मणस्य नियौ । ब्राह्मणस्य नियः । अङ्गाधिकारात् । अङ्गस्येत्यनुवर्तते ॥ एवमपि परमनियौ परमनिय इत्यत्र प्राप्नोति । गतिकारकपूर्वस्येष्यते ॥

यणादेशः स्वरपदपूर्वोपधस्य च ॥ १ ॥

यणादेशः स्वरपूर्वोपधस्य पदपूर्वोपधस्य चेति वक्तव्यम् । स्वरपूर्वोपधस्य । निन्यतुः निन्युः । पदपूर्वोपधस्य । उन्न्यौ उन्न्यः । उद्ध्यौ उद्ध्यः । उभयकृतम् । ग्रामण्यौ ग्रामण्यः । सेनान्यौ सेनान्यः ॥

असंयोगपूर्वे ह्यनिष्टप्रसङ्गः ॥ २ ॥

असंयोगपूर्वस्येति ह्युच्यमाने ऽनिष्टं प्रसज्येत । उद्ध्यौ उद्ध्यः । उन्न्यौ उन्न्यः । असंयोगपूर्वस्येति प्रतिषेधः प्रसज्येत ॥

तर्त्तर्हि वक्तव्यम् । न वक्तव्यम् । धातोरिति वर्तते तत्र धातुना संयोगं विशेषयिष्यामः । धातोर्यः संयोगस्तत्पूर्वस्य नेति ।

---

( सू. ८२ ) ब्राह्मणस्य नियौ तसेंच ब्राह्मणस्य नियः येथें प्रकृतसूत्रानें यण् कां बरें होत नाहीं ?

अङ्गस्य या अधिकारापासून अङ्गस्य हें अनुवृत्तीनें येत आहे म्हणून होत नाहीं.

तरीही परमनियौ व परमनियः येथें यण् प्राप्त होत आहे.

'गतिकारकपूर्वस्यैवेष्यते' म्हणजे गति किंवा कारक हे धातूच्या पूर्वी असतील तरच त्या अंगाला यण् इष्ट आहे.

( वा. १ ) प्रकृत सूत्रामध्यें 'असंयोगपूर्वस्य' याच्या ऐवजीं 'स्वरपदपूर्वोपधस्य' असें म्हणावें. म्हणजे ज्या इवर्णान्त अङ्गांतील उपधेच्या मागें स्वर असेल किंवा पद असेल अशा अङ्गाला यण् आदेश होईल. उपधेच्या पूर्वी स्वर असल्याचे उदाहरण–निन्यतुः. पदाचें उदाहरण–उन्न्यौ; उन्न्यः; उद्ध्यौ, उद्ध्यः. दोन्ही पूर्वी असल्याचें उदाहरण–ग्रामण्यौ, ग्रामण्यः; सेनान्यौ, सेनान्यः.

( वा. २ ) संयोग पूर्वी ज्याहून नाहीं अशा अर्थाचा 'असंयोगपूर्वस्य' हा मूळचा शब्द कायम ठेवला तर अनिष्ट गोष्ट होईल. उन्न्यौ, उन्न्यः; उद्ध्यौ, उद्ध्यः येथें असंयोगपूर्वस्य हा यणाचा प्रतिषेध होईल.

तर मग 'स्वरपदपूर्वोपधस्य' असें म्हटलें पाहिजे.

तसें म्हणावयास नको. कारण, धातोः या पदाची अनुवृत्ति येत आहे. त्या धातुग्रहणाचा संयोगाकडे संबंध करतां येईल. तेव्हां, धातूचा अवयव असा संयोग इकाराच्या पूर्वी नसला नाहीं म्हणून यण् होत नाही.

---

१. ( सू. ८१ ) इण् धातुला अजादि प्रत्यय पुढें असतांना यण् होतो. उदाहरणार्थ–यन्ति.

१. ( सू. ८२ ) ज्या इवर्णाच्या पूर्वी धातूचा अवयव असा संयोग नाहीं असा इवर्ण शेवटीं असलेला जो धातु तदन्त जें अनेकाच् अंग त्यांतील शेवटच्या इकाराला अजादि प्रत्यय पुढें असतांना यण् होतो.

२ तेव्हां 'ब्राह्मणस्य नी' हें जें इवर्णान्त अनेकाच् तें अंग नाहीं; व नी हें जें अंग आहे तें अनेकाच्

३, हें भाष्यकारांचें इष्टिरूप वचन आहे; व तें नियमार्थ आहे. तेव्हां 'ज्या अंगामध्यें पूर्वपद आहे अशा इवर्णान्त अनेकाच् अंगाला यण् करणें झाल्यास तें पूर्वपद गति किंवा कारक असेल अशाच अंगाला तो यण् करावा' असा नियम झाल्यामुळें परमनियौ येथें यण् होत नाहीं. कारण, परम हा शब्द गति नव्हे किंवा कारकही नव्हे.

उपसर्जनं वै संयोगो न चोपसर्जनस्य विशेषणमस्ति । धातोरित्यनुवर्तनसामर्थ्यादुपसर्जनस्यापि विशेषणं भविष्यति । अस्त्यन्यद्धातोरित्यनुवर्तनस्य प्रयोजनम् । किम् । इवर्णं विशेषयिष्यामः । नैतदस्ति प्रयोजनम् । यद्धयधातोरिवर्णं भवितव्यमेव तस्य यणादेशेनेको यणचि [ ६. १. ७७ ] इत्येव ॥

**[ ओः सुपि ॥ ६ । ४ । ८३ ॥ ]**

**वर्षाभ्वश्च ॥ ६ । ४ । ८४ ॥**

**वर्षाभूपुनर्भ्वश्च ॥ १ ॥**

वर्षाभू इत्यत्र पुनर्भ्वश्चेति वक्तव्यम् । पुनर्भ्वौ पुनर्भ्वः ॥

अत्यल्पमिदमुच्यते । वर्षाहन्कारपुनःपूर्वस्य भुव इति वक्तव्यम् । वर्षाभ्वौ वर्षाभ्वः । हन्भ्वौ हन्भ्वः । कारभ्वौ कारभ्वः । पुनर्भ्वौ पुनर्भ्वः ॥

**[ न भूसुधियोः ॥ ६।४।८५ ॥**

**छन्दस्युभयथा ॥ ६।४।८६ ॥**

**हुश्नुवोः सार्वधातुके ॥ ६।४।८७ ॥**

---

म्हणजे त्या इकाराला यण् होण्यास कांहीं हरकत नाहीं.

प्रकृत सूत्राच्या वाक्यार्थामध्यें संयोग हा मुख्य नाहीं; तर तो संयोग 'इ' या वर्णाचें विशेषण आहे. तेव्हां त्या विशेषणाला धातोः ह्या विशेषणाचा संबंध होऊं शकत नाहीं.[5]

धातुग्रहणाचें दुसरें प्रयोजन नसल्यामुळें तें विशेषणाचेंही विशेषण होईल.

पण धातुग्रहणाचें दुसरें प्रयोजन आहे.

तें कोणतें ?

धातूचा इ या वर्णाकडे संबंध केला म्हणजे वाटेल त्या इ वर्णाला यण् होणार नाहीं.

हें प्रयोजन नाहीं. कारण जो इ वर्ण धातूचा नव्हे त्याला 'इको यणचि' ( ६।१।७७ ) यानें यण् होणारच.[6]

( सू. ८४ वा. १ ) वर्षाभ्वश्च या सूत्रामध्यें पुनर्भू या शब्दाचेंही ग्रहण करावें. उदाहरणार्थ— पुनर्भ्वौ, पुनर्भ्वः.

पुनर्भू शब्दाचें ग्रहण करावें हें म्हणणें अगदींच अपुरें आहे. 'वर्षाहन्कारपुनःपूर्वस्य भुव इति वक्तव्यम्' म्हणजे वर्षा, हन्, कार आणि पुनर् ह्या शब्दांच्या पुढील भू शब्दाला यण् होतो असें वचन करावें. उदाहरणार्थ— वर्षाभ्वौ, वर्षाभ्वः; हन्भ्वौ, हन्भ्वः; कारभ्वौ, कारभ्वः, पुनर्भ्वौ, पुनर्भ्वः.

---

४. उन्नी येथें धातूचा नकार आणि उत् या उपसर्गाचा तकार मिळून संयोग झाला आहे. हा संयोग धातूचा अवयव नव्हे.

५. कारण 'चाकराची चाकरी करण्यापेक्षां मुख्याची चाकरी करणें बरें' असा न्याय आहे.

६. तेव्हां धातुग्रहणाचा इवर्णाकडे संबंध करण्यांत फायदा नसल्यामुळें त्याचा संयोगाकडे संबंध होईल; आणि उन्न्यौ वगैरे उदाहरणें साधतील. तेव्हां सूत्र बदलावयास नको.

१. ( सू. ८३ ) धातूचा अवयव संयोग ज्याच्या पूर्वी नाहीं असा जो उवर्ण तदन्त जो धातु तदन्त जें अनेकाच् अंग त्याला अजादि सुप् प्रत्यय पुढें असतांना यण् होतो.

१. ( सू. ८४ ) वर्षाभू शब्दाच्या उवर्णाला अजादि सुप् प्रत्यय पुढें असतांना यण् होतो.

१. ( सू. ८५ ) भू आणि सुधी या शब्दांना अजादि सुप् प्रत्यय पुढें असतांना यण् होत नाहीं.

१. ( सू. ८६ ) वेदामध्यें भू व सुधी या शब्दांना अजादि सुप् प्रत्यय पुढें असतांना यण् व इयङ् उवङ् दोन्ही होतात.

१. ( सू. ८७ ) हु धातु आणि श्नु प्रत्यय शेवटीं असलेलें जें अनेकाच् अंग त्या अंगाच्या शेवटीं अस-

हुश्नुग्रहणानर्थक्यमन्यस्याभावात् ॥ १ ॥

हुश्नुग्रहणमनर्थम् । किं कारणम् । अन्यस्याभावात् । न ह्यन्यत्सार्वधातुकेऽस्ति यस्य यणादेशः स्यात् ॥ ननु चायमस्ति । याति वातीति । क्ङितीत्यनुवर्तते । इह तर्हि । यातः वात इति । अचीति वर्तते । इह तर्हि । यान्ति वान्तीति । य्वोरिति वर्तते । एवमपि धियन्ति पियन्तीत्यत्र प्राप्नोति । ओरिति वर्तते । एवमपि सुवन्ति रुवन्तीत्यत्र प्राप्नोति । अनेकाच इति वर्तते । एवमपि असुवन् अरुवन्नित्यत्र प्राप्नोति । एतदप्यटोऽसिद्धत्वादेकाज्भवति । एवमपि प्रोर्णुवन्तीत्यत्र प्राप्नोति ।

---

(सू. ८७ वा. १) येथें हु व श्नु यांचें जें ग्रहण केलें आहे तें अनर्थक होत आहे.

काय कारण ?

कारण असें कीं सार्वधातुक पुढें असतांना यण् आदेश होण्यास लायक असें हु व श्नु यांवाचून दुसरें संभवतच नाहीं.

पण याति अथवा वाति हें तसें आहे.[२]

पण क्ङिति याची अनुवृत्ति आहे.[३]

तर, यातः अथवा वातः हें तसें आहे.

अचि याची अनुवृत्ति आहे.[४]

तर यान्ति व वान्ति हें तसें आहे.

य्वोः या पदाची अनुवृत्ति आहे.[५]

तरीही धियन्ति व पियन्ति येथें यण् प्राप्त होत आहे.

"ओः सुपि:" येथून ओः या पदाची अनुवृत्ति येत आहे.[६]

तरीही सुवन्ति व रुवन्ति येथें यण् प्राप्त होत आहे.

अनेकाच् याची अनुवृत्ति आहे.[७]

तरीही असुवन् व अरुवन् येथें यण् प्राप्त होत आहे.

आभीय अट् आगम असिद्ध असल्यामुळें हेंही एकाचच आहे.

असें आहे तरी प्रोर्णुवन्ति येथें यण् प्राप्त होत आहे.

'असंयोगपूर्वस्य' याची अनुवृत्ति आहे.[८]

---

लेला आणि ज्याच्या पूर्वी संयोग नाहीं असा जो उकार त्याला अजादि सार्वधातुक प्रत्यय पुढें असतांना यण् होतो.

२. 'हुश्नु' ग्रहण नसेल तर सार्वधातुक पुढें असतांना अंगाला यण् होतो असा सूत्रार्थ होत असल्यामुळें याति येथें आकाराला यण् होतो असा सूत्रार्थ होत असल्यामुळें याति येथें आकाराला यण् होऊं लागेल.

३. दीङो युट्० (६।४।६३) येथून क्ङिद्ग्रहणाची अनुवृत्ति येते. तेव्हां कित् किंवा ङित् सार्वधातुक पुढें असतांना असा अर्थ झाल्यामुळें याति येथें यण् होणार नाहीं.

४. "अचि श्नुधातु०" येथून अचि ह्याची अनुवृत्ति येत आहे. तेव्हां अजादि सार्वधातुक प्रत्यय पुढें असतांना असा अर्थ झाल्यामुळे यातः व वातः येथें यण् होत नाहीं.

५. "अचि श्नुधातु० " (६।४।७७) येथून य्वोः या पदाची अनुवृत्ति येत आहे. तेव्हां इवर्णान्त किंवा उवर्णान्त अंगाला यण् होतो असा अर्थ झाल्यामुळें यान्ति व वान्ति येथें यण् होत नाहीं.

६. 'य्वोः' याची अनुवृत्ति न आणतां 'ओः सुपि' (६।४।८३) येथून ओः या पदाची अनुवृत्ति येते. तेव्हां उवर्णान्त अंगाला यण् होतो असा अर्थ झाल्यामुळें धियन्ति व पियन्ति येथें यण् होत नाहीं.

७. तेव्हां उवर्णान्त अनेकाच् अंगाला यण् होतो असा अर्थ झाल्यामुळें सुवन्ति व रुवन्ति येथें यण् होत नाहीं.

८. तें असंयोगपूर्व-ग्रहण उवर्णाचें विशेषण आहे. तेव्हां प्रोर्णुवन्ति येथें यण् होत नाहीं.

असंयोगपूर्वस्येति वर्तते ॥ यङ्लुगर्थं तर्हि हुश्नुग्रहणं कर्तव्यम् । यङ्लुगन्तमनेकाज-संयोगपूर्वमुवर्णान्तमस्ति तदर्थमिदम् । नदं योयुवतीनाम् । वृषभं रोरुवतीनाम् ।

**यङ्लुगर्थमिति चेदार्धधातुकत्वा-त्सिद्धम् ॥ २ ॥**

यङ्लुगर्थमिति चेत्तन्न । किं कारणम् । आर्धधातुकत्वात्सिद्धम् । कथमार्धधातुकत्वम् । उभयथा छन्दसीति वचनात् । अन्येऽपि धातुप्रत्यया श्छन्दस्युभयथा दृश्यन्त इति ॥ एवं तर्हि सिद्धे सति यद्धु-श्नुग्रहणं करोति तज्ज्ञापयत्याचार्यो यङ्लु-ग्भाषायां भवतीति । किमेतस्य ज्ञापने प्रयोजनम् । बेभिदीति चेच्छिदीत्येतत्सिद्धं भवति भाषायामपि ॥

**[ भुवो वुग्लुङ्लिटोः ॥ ६ । ४ । ८८ ]**

**ऊदुपधाया गोहः ॥ ६।४।८९ ॥**

अथ किमर्थं गुहेर्विकृतस्य ग्रहणं क्रियते न पुनर्गुह इत्येवोच्येत ।

**गोहिग्रहणं विषयार्थम् ॥ १ ॥**

गोहिग्रहणं क्रियते विषयार्थम् । विषयः

---

तर मग यङ्लुगन्तामध्यें यण् न होण्याकरितां 'हुश्नु'-ग्रहण करावयास पाहिजे. कारण, यङ्लुगन्त हे अनेकाच् असून असंयोगपूर्वउवर्णान्त आहे. उदाहरणार्थ– नदं योयुवतीनाम्[९]; वृषभं रोरुवतीनाम्.

(वा. २) यङ्लुगन्तामध्यें यण् न होण्याकरितां 'हुश्नु'-ग्रहण पाहिजे असें जें म्हटलें आहे ते बरोबर नाहीं.

काय कारण ?

कारण असें कीं– आर्धधातुक संज्ञा झाल्यामुळेंच हें सिद्ध होत आहे.

तेथें आर्धधातुक संज्ञा कशी ?

वेदामध्यें वाटेल त्या ठिकाणीं जी संज्ञा पाहिजे असेल ती होते (३।४।११७) असें सांगितलें आहे. वेदामध्यें सार्वधातुक व आर्धधातुक ह्या संज्ञा धातूहून केलेल्या प्रत्ययाला वाटेल त्या ठिकाणीं दृष्टीस पडतात.

अशा रीतीने सर्वत्र सिद्धि होत असतांना ज्या अर्थी सूत्रकार 'हुश्नु'-ग्रहण करीत आहेत त्या अर्थी भाषेमध्येंही यङ्लुगन्ताचा प्रयोग होतो असें ते सुचवीत आहेत[१०].

असें सुचविल्याचें काय प्रयोजन ?

बेभिदीति चेच्छिदीति असे यङ्लुगन्ताचे प्रयोग भाषेमध्येंही साधत आहेत.

(सू. ८९) गुह् धातूचें 'गोहः' असें विकृत रूपाचें उच्चारण केले आहे तें कशाकरितां ? तसें उच्चारूं नये; तर 'गुहः' असेंच उच्चारावें.

(वा. १) गोहः असें जें विकृत रूप उच्चारलें

---

९. यु व रु या धातूंहून यङ्, त्याचा लुक् (२।४।७४), नंतर त्या योयु व रोरु या धातूंहून शतृ प्रत्यय, उवङ् व पुढें ङीप् (४।१।६) प्रत्यय हीं कार्यें झालीं आहेत.

१०. यङोऽचि च (२।४।७४) ह्या यङ् प्रत्ययाचा लुक् सांगणाऱ्या शास्त्रामध्यें मागून (२।४।७३) 'छन्दसि' याची अनुवृत्ति येत असल्यामुळें यङ्लुगन्ताचे प्रयोग वेदामध्येंच होतात. जर भाषेमध्यें यङ्लुगन्ताचा प्रयोग असेल तर सार्वधातुक व आर्धधातुक ह्या संज्ञा नियमित ठरल्या असल्यामुळें ज्या ठिकाणीं अजादि क्ङित् सार्वधातुप्रत्यय असेल अशा उदाहरणामध्यें यण् होऊं नये याकरितां 'हुश्नुवोः' असें म्हणावें लागलें असावें. तेव्हां ज्या अर्थी 'हुश्नुवोः' असें उच्चारलें आहे त्या अर्थी यङ्लुगन्ताचा प्रयोग लोकामध्येंही होतो असें सिद्ध होतें.

१. (सू. ८८) भू धातूला लुङ्लिट्संबंधी अच् पुढें असतांना वुक् आगम होतो.

१. (सू. ८९) गुणहेतु असा अजादि प्रत्यय पुढें असतांना गुह् धातूच्या उपधेला ऊत्व होतें.

प्रतिनिर्दिश्यते । यत्रास्यैतद्रूपं तत्र यथा स्यात् । इह मा भूत् । निजुगुहतुः निजुगुहुरिति ॥

**अयादेशप्रतिषेधार्थं च ॥ २ ॥**

अयादेशप्रतिषेधार्थं च विकृतग्रहणं क्रियते ॥

**ह्रस्वादेशे ह्ययादेशप्रसङ्ग ऊत्त्वस्यासिद्धत्वात् ॥ ३ ॥**

ह्रस्वादेशे हि सत्ययादेशः प्रसज्येत । प्रगूह्य गतः । किं कारणम् । ऊत्त्वस्यासिद्धत्वात् । असिद्धमूत्त्वं तस्यासिद्धत्वाल्ल्यपि लघुपूर्वात् [ ६. ४. ५६ ] इत्ययादेशः प्रसज्येत ॥

विषयार्थेन तावन्नार्थो गोहिग्रहणेन । प्रश्लिष्टनिर्देशात्सिद्धम् । प्रश्लिष्टनिर्देशोऽयम् । उ ऊत् ऊदिति । तत्र ह्रस्वस्यावकाशः । निजुगुहतुः निजुगुहुः । गुणस्यावकाशः । निगोढा निगोढुम् । इहोभयं प्राप्नोति ।

---

आहे तें हा ऊकार आदेश कोठें होतो तें ठरविण्याकरिता उच्चारलें आहे. म्हणजे ज्या ठिकाणीं गुह् धातुचें गुण होऊन गोह् असें रूप होईल तेथेंच हा ऊकार आदेश झाला पाहिजे; आणि निजुगुहतुः निजुगुहुः इत्यादि ठिकाणीं होऊं नये.

( वा. २ ) गुह् धातूहून पुढें असलेल्या णि प्रत्ययाला अयादेश न व्हावा म्हणूनही गोहः असा विकृत निर्देश केला आहे.

( वा. ३ ) ऱ्हस्वाचे स्थानींच उकार आदेशाचें विधान केलें तर प्रगूह्य गतः येथें नित्यत्वास्तव गुणाचा बाध करून ऱ्हस्व उकाराला दीर्घ ऊकार केला असता तो दीर्घ ऊकार आदेश आभीयासिद्ध असल्यामुळें 'ल्यपि लघु०' ( ६। ४।५६ ) यानें णि प्रत्ययाला अय् आदेश होऊं लागेल.

आतां त्यांपैकीं ऊकार आदेश कोठें होतो हें ठरविण्याकरितां गोहः असा विकृत निर्देश नको. कारण. उ+ऊत्=ऊत् असा हा प्रश्लिष्ट निर्देश आहे. निजुगुहतुः इत्यादि प्रयोग साधत आहेत. ते असेः प्रकृत सूत्रानें ऱ्हस्व आणि दीर्घ असे दोन आदेश सांगितले आहेत. तेथें ऱ्हस्व उकार आदेशाला निजुगुहतुः निजुगुहुः येथें अवकाश आहे व गुणाला निगोढा निगोढुम् येथें अवकाश आहे. पण निगूहयति, निगूहति निगूहकः येथें

---

२. गुहः असें म्हटलें असतें तर गुह् हा धातुस्वरूप निर्देश होतो. तेव्हां क्ङिद् विषय असतांनाही निजुगुहतुः इत्यादि ठिकाणीं ऊकार आदेश होऊं लागेल. तो न व्हावा म्हणून गुण करून ' गोहः ' असा निर्देश केला आहे. म्हणजे गुणाची प्राप्ति असेल तेथेंच या प्रकृत सूत्रानें ऊकार आदेश होतो.

३. पूर्व वचनानें विषयावधारण दर्शविलें. आतां गुण केल्यावरच ऊकार आदेश होतो असें कालावधारण दाखविण्याकरितां हें वचन आहे. प्रति उपसर्ग-पूर्वक गुह् धातूहून णिच्, लघूपध गुण, प्रकृत सूत्रानें ओकाराला ऊकार आदेश, 'क्त्वा'ला ल्यप्, णिलोप हीं कार्यें होऊन प्रतिगूह्य असें रूप होतें. जर गोहः असें न म्हणतां गुहः असें म्हटलें तर गुणाच्या पूर्वींच ऊकार आदेश होईल आणि तो असिद्ध असल्यामुळें अय् आदेश होऊं लागेल. आतां गोहः असे म्हटलें म्हणजे गुण केल्यानंतरच ऊकार आदेश होतो; आणि तो असिद्ध असला तरी ओकार हा गुरु असल्यामुळें अय् आदेश होत नाही.

४. म्हणजे या सूत्राने गुह् धातूच्या उपधेला ऱ्हस्व उ आणि दीर्घ ऊ असे दोन आदेश सांगितले आहेत. स्थानी जर उकारच असेल तर त्याला स्थानीप्रमाणें ( १।१।५० ) ऱ्हस्व उकारच आदेश होतो. आणि गुण होऊन ओकार हा उपधेला असेल तर त्या स्थानीप्रमाणें द्विमात्र असा दीर्घ ऊकारच आदेश होतो.

५. निगोढा व निगोढुम्. येथें गुह् धातूहून तृच् व तुमुन्, ऊदित् असल्यामुळें इडभाव ( ७।२।४४ ).

निगूहयति निगूहकः । परत्वाद् गुणे कृत आन्तर्यतो दीर्घस्य दीर्घो भवति ॥ अयादेशप्रतिषेधार्थेनापि नार्थः । समानाश्रयवचनात्सिद्धम् । समानाश्रयमसिद्धं भवति व्याश्रयं चैतत् । कथम् । णावूत्त्वं णेर्ल्यप्ययादेशः ॥

**दोषो णौ ॥ ६ । ४ । ९० ॥**

अथ किमर्थं दुषेर्विकृतस्य ग्रहणं क्रियते न पुनर्दुष इत्येवोच्येत ।

**दोषिग्रहणं च ॥ १ ॥**

किम् । अयादेशप्रतिषेधार्थं विकृतग्रहणं क्रियते । ह्रस्वादेशे ह्ययादेशप्रसङ्ग ऊत्त्वस्यासिद्धत्वात् । ह्रस्वादेशे हि सत्ययादेशः प्रसज्येत । प्रदूष्य गतः । किं कारणम् । ऊत्त्वस्यासिद्धत्वात् । असिद्धमूत्त्वं तस्यासिद्धत्वाल्ल्यपि लघुपूर्वादित्ययादेशः प्रसज्येत ॥ अत्रापि समानाश्रयवचनात्सिद्धमित्येव ॥

**[ वा चित्तविरागे ॥ ६।४।९१ ॥**

**मितां ह्रस्वः ॥ ६ । ४ । ९२ ॥ ]**

**चिण्णमुलोर्दीर्घोऽन्यतरस्याम् ॥ ६ । ४ । ९३ ॥**

---

दोषांची प्राप्ति येत आहे; तेथें पर असल्यामुळें प्रथमतः गुण केला असतां प्रमाणतः आन्तर्यामुळें दीर्घ ऊकार होतो.

अयादेश न व्हावा याकरितांही गोहिग्रहणाचा उपयोग नाहीं. कारण— ‘समानाश्रयवचनात्सिद्धम्’ म्हणजे समानाश्रय आभीय कर्तव्य असताना समानाश्रय आभीय असिद्ध होतें असें सांगितलें असल्यामुळें येथें अय् आदेश होत नाहीं. प्रकृत स्थळीं आभीय शास्त्रें व्याश्रय आहेत. कारण, णि या प्रत्ययाच्या निमित्तानें ऊकार आदेश झाला आहे; आणि पुढील ल्यप् प्रत्ययाच्या निमित्तानें अय् आदेश प्राप्त झाला आहे.

( सू. ९० ) दुष् धातूचें येथें दोषः असें विकृत रूप कशाकरितां उच्चारलें आहे ? तसें उच्चारावयास नको. दुषः असेंच उच्चारावें.

( वा. १ ) दोषि या विकृत निर्देशाविषयींही तसेंच.

तसेंच म्हणजे काय ?

अय् आदेश न व्हावा यासाठीं दोषः असा विकृताचा उच्चार केला आहे.

ऱ्हस्वाचे स्थानीं ऊकार आदेशाचें विधान केलें तर प्रदूष्य गतः व उपदूष्य गतः येथें हा आभीय ऊकार आदेश असिद्ध असल्यामुळें ‘ल्यपि लघुपूर्वात्’ यानें णि प्रत्ययाला अय् आदेश होऊं लागेल.

‘समानाश्रयवचनात्सिद्धम्’ हें पूर्वीप्रमाणें येथेंही आहेच. समानाश्रय आभीय कर्तव्य असतांना समानाश्रय आभीय असिद्ध होतें; आणि हीं आभीय शास्त्रें तर विभिन्नाश्रय आहेत. कारण, णि प्रत्यय पुढें असताना हा ऊकार आदेश झाला आहे; आणि ल्यप् प्रत्यय पुढें असतांना णि प्रत्ययाला अय् आदेश प्राप्त झाला आहे.

---

‘ ऊदुपधाया गोहः ’ येथें ‘अचि’ याची अनुवृत्ति असल्यामुळें येथें त्याची प्राप्ति नाहीं.

१. ( सू. ९० ) गुणहेतु अजादि णि हा प्रत्यय पुढें असतांना दुष् धातूच्या उपधेला ऊकार आदेश होतो.

१. ( सू. ९१ ) चित्ताची अप्रीति हा अर्थ गम्यमान असतांना दुष् धातूच्या उपधेला गुणहेतु अजादि णि हा प्रत्यय पुढें असतांना विकल्पानें ऊकार आदेश होतो.

१. ( सू. ९२ ) मित्संज्ञक धातूच्या उपधेला णि प्रत्यय पुढें असतांना ऱ्हस्व होतो.

१. ( सू. ९३ ) चिण् प्रत्यय किंवा णमुल् प्रत्यय ज्याच्या पुढें आहे असा णि प्रत्यय पुढें असतांना मित्संज्ञक धातूंच्या उपधेला विकल्पानें दीर्घ होतो.

**चिण्णमुलोर्णिव्यपेतानां यङ्लोपे चोपसंख्यानं कर्तव्यम्।** शमयन्तं प्रयोजितवान् अशमि अशामि शमं शमम् शामं शामम्। शंशमयतेः अशंशमि अशंशामि शंशमं शंशमम् शंशामं शंशामम्। किं पुनः कारणं न सिध्यति। चिण्णमुल्परे णौ मितामङ्गानां दीर्घो भवतीत्युच्यते यश्चात्र चिण्णमुल्परो न तस्मिन्मिदङ्गं यस्मिंश्च मिदङ्गं नासौ चिण्णमुल्पर इति। लोपे कृते चिण्णमुल्परो भवति। स्थानिवद्भावान्न चिण्णमुल्परः। ननु च प्रतिषिध्यतेऽत्र स्थानिवद्भावो दीर्घविधिं प्रति न स्थानिवदिति। एवमप्यसिद्धत्वान्न प्राप्नोति॥ एवं तर्हि

**चिण्णमुलोर्णिव्यपेतानां यङ्लोपे चान्त-**

( सू. ९३ ) ज्याच्या पुढें चिण् किंवा णमुल् आहे असा णि प्रत्यय पुढें असतांना णिच् या प्रत्ययानें व्यवहित अशा, तसेंच, यङ्लोप झाला असतांना अर्थात् अकारानें व्यवहित अशाही मित्संज्ञकाच्या उपधेला दीर्घ होतो असें वचन करावें. जशी शमविणाराला प्रेरणा करणे या अर्थी एक णिच् प्रत्यय करून पुनः दुसरा णिच् प्रत्यय केला असतां अशमि[2], अशामि, शमशमम्, शामशामम् अशीं रूपें होतात तशींच यङन्ताहून णिच् प्रत्यय केला असतांना अशंशमि, अशंशामि; शंशमंशंशमम्, शंशामंशंशामम् हींही रूपें होतात.

पण या ठिकाणीं मूळ सूत्रानें दीर्घ प्राप्त होत नाहीं याचें काय बरें कारण ?

ज्याच्या पुढे चिण् किंवा णमुल् आहे असा णि प्रत्यय पुढे असतांना मित्संज्ञक अंगाला दीर्घ होतो असें सांगितलें आहे. आणि येथें तर ज्या दुसऱ्या णि प्रत्ययाच्या पुढें चिण् किंवा णमुल् आहे, तो णिच् प्रत्यय पुढें असतांना मागें अव्यवहित मित्संज्ञक अङ्ग नाहीं[3]; व जो णि प्रत्यय पुढें असतांना मागे अव्यवहित मित्संज्ञक अंग आहे त्या णिचाच्या पुढें चिण् किंवा णमुल् नाहीं[4].

पण लोप केला असतां चिण् किंवा णमुल् ज्याच्या पुढे आहे असा णि असूं शकतो[5].

स्थानिवद्भाव झाल्यामुळें तसा असूं शकत नाहीं.

पण दीर्घ-विधि कर्तव्य असतांना स्थानिवद्भाव होत नाहीं असा ' न पदान्त० ' ( १।१।५८ ) या सूत्रानें दीर्घ कर्तव्य असतांना स्थानिवद्भावाचा निषेध केला आहे.

तरीही आभीय दीर्घ कर्तव्य असतांना आभीय णिलोप आणि यङाच्या अकाराचा लोप असिद्ध असल्यामुळें दीर्घ प्राप्त होऊं शकत नाहीं.

( वा. १ ) असें आहे तर चिण् किंवा णमुल् ज्याच्या पुढें आहे असा णि प्रत्यय पुढें असतांना

---

२. शम् धातूहून णिच्, उपधावृद्धि, " मितां ह्रस्वः, " पुनः णिच्, कर्मणि लुङ्, त, च्लि, चिण्, अट् आगम, त प्रत्ययाचा लुक् ( ६।४।१०४ ), व दोन्ही णिच् प्रत्ययांचा ' णेरनिटि ' ( ६।४।५१ ) यानें लोप झाल्यानंतर प्रत्ययलक्षणानें णिच् पुढें आहे असें समजून प्रकृत सूत्रानें विकल्पानें दीर्घ झाला आहे. तसेंच, शम शमम् येथें दोन णिच् करून पुढें णमुल् प्रत्यय ( ३।४।२२ ) आणि द्वित्व ( ८।४।२२ ) ही कार्यें झालीं आहेत. तसेंच अशंशमि व अशंशामि येथें शम् धातूहून णिच् झाल्यावर पुढें कर्मणि लुङ् प्रत्यय झाला आहे. येथें सर्व ठिकाणीं पहिला णिच् किंवा यङाचा अकार यानें व्यवधान होत असल्यामुळें दीर्घ प्राप्त होत नाहीं म्हणून हें वचन केलें आहे.

३. कारण, पहिल्या णिच् प्रत्ययानें व्यवधान येत आहे.

४. कारण, दुसऱ्या णिच् प्रत्ययानें व्यवधान येत आहे.

५. तेव्हां प्रत्ययलक्षणानें णिच् पुढें आहे असें समजून दीर्घ होईल.

रङ्गलक्षणत्वात्सिद्धम् ॥ १ ॥

किमिदमन्तरङ्गलक्षणत्वादिति । यावद् ब्रूयात्समानाश्रयवचनात्सिद्धमित्येव । व्याश्रयं चैतत् । कथम् । णेर्णौ लोपो णौ चिण्णमुल्परे मितामङ्गानां दीर्घत्वमुच्यते । तस्मान्नार्थ उपसंख्यानेनेति ॥

[ खचि ह्रस्वः ॥ ६ । ४ । ९४ ॥

ह्लादो निष्ठायाम् ॥ ६।४।९५ ॥ ]

छादेर्घेऽद्व्युपसर्गस्य ॥ ६।४।९६ ॥

अद्विप्रभृत्युपसर्गस्येति वक्तव्यम् । इहापि यथा स्यात् । समुपाभिच्छाद इति ॥ तर्त्तर्हि वक्तव्यम् । न वक्तव्यम् । यत्र त्रिप्रभृतयः सन्ति द्वावपि तत्र स्तस्तत्राद्व्युपसर्गस्येत्येव सिद्धम् ॥ न वा एष लोके संप्रत्ययः । न हि

णिचानें व्यवहित अशा, व यङ्लोप झाला असतां त्यांतील अकारानें व्यवहित अशा मित्संज्ञक अंगाला दीर्घ अन्तरङ्गत्वामुळें साधत आहे.

येथें अंतरंगत्वामुळें असें जे म्हटलें आहे त्याचा अर्थ काय समजावा ?

अंतरंगत्वामुळें सिद्ध होतें म्हणजे समानाश्रय असें म्हटलें असल्यामुळें सिद्ध होतें असा अर्थ समजावा[६].

पण येथें तर आभीय शास्त्रें व्याश्रय आहेत.

तीं कशीं ?

णि प्रत्यय पुढें असतांना णिलोप होत आहे. आणि चिण् किंवा णमुल् पुढें असलेला णि प्रत्यय पुढें असतांना मित्संज्ञक अङ्गाला दीर्घ होत आहे. तेव्हां उपसंख्यान करण्याचा उपयोग नाहीं.

(सू. ९६) 'अद्व्युपसर्गस्य' याच्या ऐवजीं 'अद्विप्रभृत्युपसर्गस्य' असें म्हणावें. म्हणजे दोन किंवा त्यांपेक्षां ज्यास्त उपसर्ग ज्याच्या मागें नाहींत अशाच छाद् धातूच्या उपधेला ह्रस्व होईल. कारण– 'समुपाभिच्छादः' येथेंही प्रतिषेध झाला पाहिजे.

तर मग तसें सूत्र केलें पाहिजे.

तसें सूत्र करावयास नको. कारण जेथें तीन चार उपसर्ग आहेत तेथें दोनही आहेतच. तेव्हां 'अद्व्युपसर्गस्य' असें म्हटल्यानेंच तेथें काम भागत आहे.

पण लोकामध्यें तीन चार किंवा ज्यास्त पदार्थ असतील तेथें दोन किंवा एक या संख्येचा बोध बिलकूल होत नाहीं. उदाहरणार्थ–द्विपुत्र मनु-

६. अन्तः म्हणजे आंत आहे अङ्ग म्हणजे निमित्त ज्याचें तें अंतरंग होय. पहिल्या णिचाचा लोप आणि यङाच्या अकाराचा लोप यांचें निमित्त जो त्याच्या पुढील णि प्रत्यय तो आंत आहे. आणि त्याच्या बाहेर जो चिण् किंवा णमुल् प्रत्यय तो दीर्घाचें निमित्त आहे. तेव्हां अर्थातच, हीं आभीय शास्त्रें समानाश्रय होत नाहींत. तेव्हां प्रथम णिच् व यङाचा अकार यांचा लोप सिद्धच असल्यामुळें त्यानें व्यवधान होत नाहीं; आणि प्रकृत सूत्रानें दीर्घ करतां येतो.

१. (सू. ९४) खच् पुढें असलेला णि प्रत्यय पुढें असतांना अंगाच्या उपधेला ह्रस्व होतो. उदाहरणार्थ– द्विषंतपः.

१. (सू. ९५) निष्ठा प्रत्यय पुढें असतांना ह्लाद् धातूच्या उपधेला ह्रस्व होतो. उदाहरणार्थ– प्रह्लन्नः.

१. (सू. ९६) दोन किंवा त्यांपेक्षां अधिक उपसर्ग ज्याच्या मागें नाहींत अशा ण्यन्त छादि धातूच्या उपधेला 'घ' प्रत्यय पुढें असतांना ह्रस्व होतो.

२. येथें सम् उप आणि अभि असे दोहोंपेक्षां ज्यास्त उपसर्ग आहेत. येथें ण्यन्त छादि धातूहून "पुंसि संज्ञायाम्०" (३।३।११८) यानें घ प्रत्यय करून णिलोप केला आहे.

३. दोन पुत्र ज्याला आहेत असा.

द्विपुत्र आनीयतामित्युक्ते त्रिपुत्र आनीयते । तस्माददद्विप्रभृत्युपसर्गस्येति वक्तव्यम् ॥

**[ इस्मन्त्रन्क्विषु च ॥ ६ । ४ । ९७ ॥**

**गमहनजनखनघसां लोपः क्ङित्यनङि ॥ ६ । ४ । ९८ ॥**

**तनिपत्योश्छन्दसि ॥ ६ । ४ । ९९ ॥ ]**

**घसिभसोर्हलि ॥ ६।४।१०० ॥**

**हल्ग्रहणमनर्थकमन्यत्रापि दर्शनात् ॥ १ ॥**

हल्ग्रहणमनर्थकम् । किं कारणम् । अन्यत्रापि दर्शनात् । अन्यत्रापि लोपो दृश्यते । अग्निस्तृणानि बप्सति । शरावे बप्सति चरुः ॥

**हुझल्भ्यो हेर्धिः ॥ ६।४।१०१ ॥**

इटः प्रतिषेधो वक्तव्यः । रुदिहि स्वपिहि । झल इति धित्वं प्राप्नोति ॥

**हेर्धित्वे हलधिकारादिटोऽप्रतिषेधः ॥ १ ॥**

हेर्धित्वे हलधिकारादिटोऽप्रतिषेधः । अनर्थकः प्रतिषेधो ऽप्रतिषेधः । धित्वं

---

ष्याला आणा असें सांगितलें असतां त्रिपुत्र मनुष्य केव्हांही आणिला जात नाहीं. तेव्हां येथें 'अद्विप्रभृत्युपसर्गस्य' असें म्हटलें पाहिजे.

( सू. १०० वा. १ ) येथें हल्-ग्रहण केलें आहे तें व्यर्थ होत आहे.

काय कारण ?

कारण असें कीं, हलावाचून अन्य पुढें असतांनाही लोप दृष्टीस पडत आहे. उदाहरणार्थ– अग्निस्तृणानि बप्सति, शरावे बप्सति चरुः.

( सू. १०१ ) इट् आगम झालेल्या अशा हि या शब्दाचा प्रतिषेध करावा. नाहींतर रुदिहि स्वपिहि येथें इट् आगम केला असतांना झलन्तत्वास्तव 'धि' आदेश होऊं लागेल.

( वा. १ ) हि या प्रत्ययाचे स्थानीं सांगितलेल्या ह्या धि आदेशाविषयीं इट् आगम झालेल्या हि शब्दाचा प्रतिषेध केला आहे तो अप्रतिषेध होय म्हणजे अनर्थक होय.

---

१. ( सू. ९७ ) इस् मन् त्रन् आणि क्वि हे प्रत्यय पुढें असतांना ण्यन्त' छादि धातूच्या उपधेला ऱ्हस्व होतो.

१. ( सू. ९८ ) गम्, हन्, जन्, खन्, आणि घस् या धातूंच्या उपधेचा अङ्भिन्न अजादि कित् किंवा ङित् प्रत्यय पुढें असतांना लोप होतो.

१. ( सू. ९९ ) वेदामध्यें तनि व पति या धातूंच्या उपधेचा अजादि कित् किंवा ङित् प्रत्यय पुढें असतांना लोप होतो.

१. ( सू. १०० ) वेदामध्यें घस् आणि भस् या धातूंच्या उपधेचा हलादि व अजादि कित् किंवा डित् प्रत्यय पुढें असतांना लोप होतो.

२. सूत्रामध्यें 'हलि' असें म्हटलें असल्यामुळें मागून चालू असलेलें 'अचि' हें पद येथें अनुवृत्त होणार नाहीं. म्हणून सूत्रकारानी हलि याच्या पुढें च शब्द अचि हे अनुवृत्त होण्याकरितां घातला आहे. हा 'च' शब्द सूत्रामध्यें नाहीं अशा समजुतीनें हें वार्तिक प्रवृत्त झालें आहे.

३. भस् धातूहून लट्, एकवचनाच्या ऐवजीं व्यत्ययानें बहुवचन झि प्रत्यय, शप्, श्लु, द्वित्व, अदादेश, उपधालोप आणि चर्त्वं अशीं कार्यें झालीं आहेत.

१. ( सू. १०१ ) हु धातु आणि झलन्त धातू यांहून पुढें असलेल्या 'हि' या प्रत्ययाला 'धि' असा आदेश होतो.

२. रुद् आणि स्वप् या धातूंहून लोट्, सिप्, हि आदेश, शप्, त्याचा लुक् ( २।४।७३ ) हीं कार्यें झाल्यावर 'रुदादिभ्यः०' ( ७।२।७६ ) यानें इट् आगम केला आहे.

कस्मान्न भवति । हलधिकारात् । प्रकृतं हल्ग्रहणमनुवर्तते । क्व प्रकृतम् । घसिभसोर्हलि [ ६. ४. १०० ] इति । तद्वै सप्तमीनिर्दिष्टं षष्ठीनिर्दिष्टेन चेहार्थः । तद्वै तत्र प्रत्याख्यायते तत्र प्रत्याख्यातं सद्यया विभक्त्या निर्दिश्यमानमर्थवत्तया निर्दिष्टमिहानुवर्तिष्यते ॥ अथवा हुझल्भ्य इत्येषा पञ्चमी हलीति सप्तम्याः षष्ठीं प्रकल्पयिष्यति तस्मादित्युत्तरस्य [ १. १. ६७ ] इति ॥ अथवा निर्दिश्यमानस्यादेशा भवन्तीत्येवं न भविष्यति । यस्तर्हि निर्दिश्यते तस्य कस्मान्न भवति । इटा व्यवहितत्वात् ॥ यद्येवं छिन्द्धकि भिन्द्धकीत्यत्र धित्वं न प्राप्नोति । धित्वे कृते ऽकज्भविष्यति । इदमिह संप्रधार्यम् । धित्वं क्रियतामकजिति किमत्र कर्तव्यम् । परत्वाद्धित्वम् । नित्योऽकच् । कृतेऽपि धित्वे प्राप्नोत्यकृतेऽपि । अकजप्यनित्यः । अन्यस्य

---

तर मग, रुदिहि इत्यादि उदाहरणांमध्यें 'धि' हा आदेश कां बरें होत नाहीं ?

मागून हल्ग्रहण येथें अनुवृत्तीनें येत आहे म्हणून होत नाहीं.

तें हल्ग्रहण मागें कोठें केलें आहे ?

'घसिभसोर्हलि च' (६।४।१००) येथें केलें आहे.

तें हल्ग्रहण तर तेथें सप्तमी विभक्तीनें निर्दिष्ट आहे; आणि येथें तर षष्ठी विभक्तीनें निर्दिष्ट असें पाहिजे.

त्या हल्ग्रहणाचें तर त्या सूत्रांत प्रत्याख्यान केलें आहे. तेव्हां तेथें जरूर नसलेलें तें हल्–ग्रहण जी विभक्ति लावली असतां येथें उपयोगीं पडेल ती विभक्ति लागून येथें अनुवृत्तीनें येईल.

किंवा 'हुझल्भ्यः' ही पंचमी 'हलि' या सप्तमीला 'तस्मादित्युत्तरस्य' (१।१।६७) या परिभाषेच्या साहाय्यानें षष्ठीची कल्पना करील. अथवा सूत्रोच्चारिताला आदेश होतात असें सांगणाऱ्या 'निर्दिश्यमानस्याऽऽदेशा भवन्ति' या परिभाषेनें रुदिहि इत्यादि ठिकाणीं 'धि' आदेश होणार नाहीं.

तर मग सूत्रोच्चारित जो 'हि' शब्द तेवढ्यालाच कां बरें 'धि' आदेश होत नाहीं ?

सूत्रोच्चारित 'हि' शब्द हा इडागमानें व्यवहित आहे म्हणून त्याला 'धि' आदेश होत नाहीं.

असें आहे तर 'भिन्धकि' व 'छिन्धकि' येथें धि आदेश प्राप्त होत नाहीं.

तर मग भिन्धकि इत्यादि स्थलीं अगोदर धि आदेश केल्यानंतर मागाहून अकच् करतां येईल.

आतां येथें असा विचार उत्पन्न होतो कीं— भिन्द् + हि असें असतां येथें प्रथमतः 'धि' आदेश करावा किंवा 'अकच्' करावा.

मग यांत अगोदर काय बरें करावें ?

अकच् (५।३।७१) प्रत्ययापेक्षां पर असल्यामुळें अगोदर 'धि' आदेश करावा.

पण अकच् हा नित्य आहे. कारण धि आदेश केला अथवा न केला तरीही तो प्राप्त होत आहे.

---

३. तेव्हां हलादि हि प्रत्ययाचे स्थानीं धि आदेश असा अर्थ होतो. तेव्हां रुदिहि येथें इट् आगम झाल्यानंतर हलादि हि प्रत्यय नसल्यामुळे धि आदेश होत नाहीं.

४. 'तस्मादित्युत्तरस्य' या परिभाषेनें अव्यवहित उत्तरालाच कार्य करावयास सांगितलें आहे. तेव्हां जो अव्यवहित पुढें 'इहि' असा आहे तो सूत्रोच्चारित नाहीं; व जो सूत्रोच्चारित हि असा आहे तो अव्यवहित पुढें नाहीं.

५. भिन्द्+हि. येथें अकच् केल्यानंतर 'हकि' याला "निर्दिश्यमान०" परिभाषेनें धि आदेश होणार नाहीं.

कृते धित्वे प्राप्नोत्यन्यस्याकृते शब्दान्तरस्य च प्राप्नुवन्विधिरनित्यो भवति । उभयोरनित्ययोः परत्वाद्धित्वं धित्वे कृतेऽकच्भविष्यति ॥ अथवा हकारस्यैवाशक्तिजेनेकारेण ग्रहणमिति ॥

[ श्रुशृणुपृकृवृभ्यश्छन्दसि ॥ ६ । ४ । १०२ ॥

अङितश्च ॥ ६ । ४ । १०३ ॥ ]

चिणो लुक् ॥ ६ । ४ । १०४ ॥

चिणो लुकि तग्रहणं कर्तव्यम् । किं प्रयोजनम् । इह मा भूत् । अकारितराम् अहारितरामिति ॥

चिणो लुकि तग्रहणानर्थक्यं संघातस्याप्रत्ययत्वात् ॥ १ ॥

चिणो लुकि तग्रहणमनर्थकम् । किं कारणम् । संघातस्याप्रत्ययत्वात् । संघातस्य लुकस्मान्न भवति । अप्रत्ययत्वात् । प्रत्ययस्य लुक्श्लुलुपो भवन्तीत्युच्यते न च संघातः प्रत्ययः ॥ तलोपे तर्हि कृते परस्य प्राप्नोति ।

तलोपस्य चासिद्धत्वात् ॥ २ ॥

---

अकच्ही अनित्यच होय. कारण धि आदेश केल्यानंतर निराळ्या म्हणजे धि या शब्दाला प्राप्त होतो; व धि आदेश करण्याच्या पूर्वी निराळ्या शब्दाला म्हणजे हि याला प्राप्त होतो. आणि 'शब्दान्तराला प्राप्त होणारा विधि अनित्य होय' अशी तर परिभाषा आहे. तेव्हां दोघेही अनित्य असल्यामुळें परत्वास्तव प्रथमतः धि आदेश होईल आणि तो केल्यानंतर अकच् होईल.

अथवा स्वर जोडल्याशिवाय केवळ व्यंजनाचा स्पष्ट उच्चार होत नसल्यामुळें 'हेर्धिः' या दोन्ही ठिकाणीं उच्चारणार्थ इकार लावून केवळ ह् आणि ध् या व्यंजनांचाच निर्देश केला आहे असें समजावें.[६]

( सू. १०४ ) चिणो लुक् ह्या सूत्रामध्यें तग्रहण करावें. म्हणजे चिण् प्रत्ययाच्या पुढील त प्रत्ययाचाच लुक् होईल. कारण अकारितराम् अहारितराम् येथें त, तर, आणि आम् या तीन प्रत्ययांचा लुक् न झाला पाहिजे.

( वा. १ ) चिणो लुक् ह्या सूत्रामध्यें तग्रहण करावयास नको.

तर मग अकारितराम् इत्यादि ठिकाणीं त, तर, आम् या तीन प्रत्ययांच्या समुदायाचा लुक् कां बरें होत नाहीं ?

लुक्, श्लु व लुप् हे प्रत्ययाचे होतात ( १।१।६१ ) असें सांगितलें आहे. आणि प्रत्ययांचा समुदाय हा तर प्रत्यय नव्हे. म्हणून त्याचा लुक् होत नाहीं.

तर मग त प्रत्ययाचा लुक् केल्यानंतर पुढें असलेल्या 'तर' प्रत्ययाचा लुक् प्राप्त होत आहे.

---

६. तेव्हां हु धातु आणि झलन्त धातू यांच्या पुढील प्रत्ययाच्या हकाराला धकार होतो असा अर्थ होतो. तेव्हां रुदिहि इत्यादि स्थलीं इट् आगमानें व्यवधान असल्यामुळें हकाराला धकार होत नाहीं.

१. ( सू. १०२ ) वेदामध्यें श्रु, शृणु, पॄ, कृ, आणि वृ या धातूंहून पुढें असलेल्या हि या प्रत्ययाचें स्थानीं धि आदेश होतो.

१. ( सू. १०३ ) अङित् जो 'हि' प्रत्यय त्याचे स्थानींही धि आदेश होतो. उदाहरणार्थ–युयोधि. येथें हि प्रत्यय हा पित् मानिला ( ३।४।८८ ) असल्यामुळें ङित् ( १।२।४ ) झाला नाहीं.

१. ( सू. १०४ ) चिणाहून पुढें असलेल्या प्रत्ययाचा लुक् होतो.

२. कृ धातूहून कर्मणि लुङ्, त, च्लि, चिण्, अट्, तरप् ( ५।३।५६ ), आम् ( ५।४।११ ) हीं कार्यें झालीं आहेत. येथें 'चिणो लुक्,' यानें त प्रत्ययाचा लुक् केल्यानंतर पुनः तरप् प्रत्ययाचा लुक् प्राप्त होत आहे.

असिद्धस्तलोपस्तस्यासिद्धत्वान्न भविष्यति ॥

**कार्यकृतत्वाद्वा ॥ ३ ॥**

अथवा कृतश्चिणो लुगिति कृत्वा पुनर्न भविष्यति लुक्। तद्यथा। वसन्ते ब्राह्मणोऽग्नीनादधीतेति सकृदाधाय कृतः शास्त्रार्थ इति कृत्वा पुनःप्रवृत्तिर्न भवति ॥ विषम उपन्यासः। युक्तं यत्तस्यैव पुनःप्रवृत्तिर्न स्याद्यत्तु तदाश्रयं प्राप्नोति न तच्छक्यं बाधितुम्। तद्यथा। वसन्ते ब्राह्मणोऽग्निष्टोमादिभिः क्रतुभिर्यजेतेत्यग्न्याधाननिमित्तं वसन्ते वसन्त इज्यते। तस्मात्पूर्वोक्तावेव परिहारौ ॥

अथवा क्ङितीति वर्तते। क्व प्रकृतम्। गमहनजनखनघसां लोपः क्ङित्यनङि [ ६. ४. ९८ ] इति। तद्वै सप्तमीनिर्दिष्टं षष्ठीनिर्दिष्टेन चेहार्थः। चिण इत्येषा पञ्चमी क्ङितीति सप्तम्याः षष्ठीं प्रकल्पयिष्यति तस्मादित्युत्तरस्य [ १. १. ६७ ] इति ॥

**[ अतो हेः ॥ ६। ४। १०५ ॥ ]**

**उतश्च प्रत्ययादसंयोगपूर्वात् ॥ ६।४।१०६ ॥**

---

(वा. २) याच सूत्रानें झालेला त प्रत्ययाचा लोप म्हणजे लुक् आभीय असिद्ध असल्यामुळें त्याचे पुढें असलेल्या तर प्रत्ययाचा लुक् होणार नाहीं.

(वा. ३) किंवा एकदां चिणाहून पुढच्याचा लुक् केला असल्यामुळें पुनः लुक् होणार नाहीं. उदाहरणार्थ– ‘वसन्त ऋतूमध्यें ब्राह्मणानें अग्नीचें आधान करावें’ असें श्रुतीनें सांगितलें आहे. तेथें एकदां अग्नीचें आधान केलें म्हणजे तेवढ्यानें शास्त्रार्थ पाळिला गेला म्हणून पुन: अग्नीचें आधान करण्याविषयीं प्रवृत्ति होत नाहीं. तसेंच हे होय.

हा दृष्टान्त बरोबर नाहीं. कारण, ज्या विषयासंबंधानें एकदां प्रवृत्ति झाली त्या विषयासंबंधानेंच पुनः प्रवृत्ति होत नाहीं हें योग्य आहे. परंतु पूर्वीच्या कार्यावर अवलंबून असलेलें असें दुसरें कार्य जर प्राप्त झालें तर त्याचा बाध करणें शक्य नाहीं. उदाहरणार्थ– ‘वसन्त ऋतूमध्यें ब्राह्मणानें अग्निष्टोम वगैरे याग करावे’ असें श्रुतीनें सांगितलें आहे. पूर्वी अग्नीचें आधान केलें असल्यामुळें त्याला करतां येण्यासारखे असे ते याग प्रत्येक वसन्त ऋतूमध्यें केले जातात.

तेव्हां येथें पूर्वींचेच परिहार बरोबर आहेत असें समजावें.

अथवा मागून क्ङिति या पदाची अनुवृत्ति येत आहे.

ते क्ङित्ग्रहण मागें कोठें बरें केलें आहे?

‘गमहनजन०’ (६।४।९८) येथें केलें आहे.

पण तें क्ङित्ग्रहण त्या सूत्रामध्यें सप्तमी विभक्तीनें निर्दिष्ट आहे. आणि येथें तर षष्ठी विभक्तीनें निर्दिष्ट असें पाहिजे.

‘चिण:’ ही पंचमी ‘क्ङिति’ या सप्तमीला ‘तस्मादित्युत्तरस्य’ (१।१।६७) या परिभाषेच्या साहाय्यानें षष्ठीची कल्पना करील.

---

३. त्याप्रमाणें येथें पूर्वी ‘त’ प्रत्ययाचा लुक् केल्यानंतर तो लुक् झाल्यामुळें प्राप्त होणारा जो पुढील तर प्रत्ययाचा लुक् तो ज्योतिष्टोम वगैरे यागांप्रमाणें करतां येईल.

४. सूत्रामध्यें तग्रहण करावें, किंवा त प्रत्ययाचा लुक् आभीय असिद्ध समजावा; म्हणजे तर प्रत्ययाचा लुक् होणार नाहीं.

१. (सू. १०५) ऱ्हस्वअकारान्त अंगाहून पुढें असलेल्या ‘हि’ प्रत्ययाचा लुक् होतो.

१. (सू. १०६) ज्याच्या पूर्वी संयोग नाहीं असा उकार शेवटीं असलेला जो प्रत्यय तदन्त अंगाहून पुढें असलेल्या ‘हि’ प्रत्ययाचा लुक् होतो.

कथमिदं विज्ञायते । उकारात्प्रत्ययादिति । आहोस्विदुकारान्तात्प्रत्ययादिति । किं चातः । यदि विज्ञायत उकारात्प्रत्ययादिति सिद्धं तनु कुरु चिनु सुन्विति न सिध्यति । अथ विज्ञायत उकारान्तात्प्रत्ययादिति सिद्धं चिनु सुनु तनु कुर्विति न सिध्यति ॥ तथासंयोगपूर्वग्रहणेनेहैव पर्युदासः स्यात् तक्ष्णुहि अक्ष्णुहि आप्नुहि शक्नुहीत्यत्र न स्यात् ॥ यथेच्छसि तथास्तु । अस्तु तावदुकारात्प्रत्ययादिति । कथं चिनु सुन्विति । तदन्तविधिना भविष्यति । अथवा पुनरस्तूकारान्तात्प्रत्ययादिति । कथं तनु कुर्विति । व्यपदेशिवद्भावेन भविष्यति ॥ यदप्युच्यते तथासंयोगपूर्वग्रहणेनेहैव पर्युदासः स्यात् तक्ष्णुहि अक्ष्णुहि आप्नुहि शक्नुहीत्यत्र न स्यादिति नास्माभिरसंयोगपूर्वग्रहणेनोकारान्तं विशेष्यते । किं तर्हि । उकारः । उकारो योऽसंयोगपूर्वस्तदन्तात्प्रत्ययादिति ॥

( सू. १०६ ) काय, येथें ' उतः प्रत्ययात् ' याचा उकार जो प्रत्यय त्याहून असा अर्थ आहे किंवा उकारान्त जो प्रत्यय त्याहून असा आहे ?[२]

या दोहोंमध्यें काय बरें फरक आहे ?

जर उकार जो प्रत्यय त्याहून असा अर्थ असेल तर तनु[३] अथवा कुरु हें साधतें; पण चिनु अथवा सुनु हें साधत नाहीं.

आतां उकारान्त जो प्रत्यय त्याहून असा अर्थ असेल तर चिनु अथवा सुनु हें साधतें; पण तनु अथवा कुरु हें साधत नाहीं. तसेंच, त्या पक्षीं असंयोगपूर्वात् हें विशेषण उकारान्त प्रत्ययाला लागत असल्यामुळें अक्ष्णुहि व तक्ष्णुहि येथेंच तो निषेध होईल आणि आप्नुहि व शक्नुहि येथे होणार नाहीं[४]

तुझ्या मनाला वाटेल तसा अर्थ असो. उकार जो प्रत्यय त्याहून असा कां अर्थ असेना ?

तर चिनु अथवा सुनु हें कसें ?

उकारान्त जो प्रत्यय असा तदन्तविधि केल्यामुळें साधेल. अथवा, उकारान्त जो प्रत्यय त्याहून असा दुसराच पक्ष घ्यावा म्हणजे झालें.

पण त्या पक्षीं तनु अथवा कुरु हें कसें ?

'व्यपदेशिवत्०' (१।१।२१ वा. २) या परिभाषेनें उकाररूपी प्रत्ययालाच उकारान्त प्रत्यय असा व्यवहार करतां येत असल्यामुळ साधेल.

आतां त्या पक्षीं असंयोगपूर्वात् हें विशेषण उकारान्त प्रत्ययाला लागेल आणि अक्ष्णुहि व तक्ष्णुहि येथेंच निषेध होईल, आणि आप्नुहि व शक्नुहि येथें होणार नाहीं असें जें म्हटलें आहे तेथें उकारान्त प्रत्यय या पक्षींही आम्ही ' असंयोगपूर्वात् ' हें उकारान्ताकडे लावीत नाहीं, तर उकाराकडेच लावतों. तेव्हा ज्याच्या पूर्वी संयोग नाहीं असा जो उकार तदन्त असा अर्थ केला म्हणजे तो दोष येणार नाहीं.

---

२. विशेषणविशेष्यभावाविषयीं कामचार असल्यामुळें प्रत्यय विशेषण व उकार त्याचें विशेष्य असा अन्वय केला असतां प्रत्यय जो उकार त्याहून असा अर्थ होतो; आणि जर उकार विशेषण व त्याचें प्रत्यय हें विशेष्य असा अन्वय केला तर तन्दतविधि झाल्यामुळे उकारान्त जो प्रत्यय त्याहून असा अर्थ होतो.

३. तन् व कृ या धातूंहून लोट् ' तनादिकृञ्भ्य ०' ( ३।१।७९ ) यानें उ प्रत्यय झाला आहे. चिनु, सुनु येथें चि आणि सु या धातूंहून ' स्वादिभ्यः० ' ( ३।१।७३ ) यानें श्नु प्रत्यय झाला आहे. येथें जो उकार तो प्रत्यय नसल्यामुळे हिलुक् होणार नाहीं.

४. अक्ष् व तक्ष् या धातूंच्या शेवटीं संयोग असल्यामुळें तो ' नु ' या उकारान्त प्रत्ययाच्या पूर्वी आहे. आप्नुहि येथें उकाराच्या पूर्वी धातूचा पकार आणि प्रत्ययाचा नकार मिळून संयोग आहे; तो ' नु ' या प्रत्ययाच्या पूर्वी नाहीं.

**उतश्च प्रत्ययाच्छन्दोवावचनम् ॥ १ ॥**

उतश्च प्रत्ययादित्यत्र च्छन्दसि वेति वक्तव्यम् । अव स्थिरा तनुहि यातुजूनाम् । धिनुहि यज्ञं धिनुहि यज्ञपतिम् । तेन मा भागिनं कृणुहि ॥

**उत्तरार्थं च ॥ २ ॥**

केचित्तावदाहुश्छन्दोग्रहणं कर्तव्यमिति । अपर आहुर्वावचनं कर्तव्यमिति । लोपश्चास्यान्यान्यतरस्यां म्वोः [ १०७ ] इत्यत्रान्यतरस्यांग्रहणं न कर्तव्यं भवति ॥

**[ लोपश्चास्यान्यतरस्यां म्वोः ॥ ६।४।१०७ ॥**

**नित्यं करोतेः ॥ ६ । ४ । १०८ ॥**

**ये च ॥ ६ । ४ । १०९ ॥ ]**

**अत उत्सार्वधातुके ॥ ६ । ४ । ११० ॥**

सार्वधातुक इति किमर्थम् । इह मा भूत् । संचस्करतुः संचस्करुः ॥ स्यान्तस्य प्रतिषेधो वक्तव्यः । करिष्यति करिष्यतः ।

**कृञ उत्त्व उकारान्तनिर्देशात्स्यान्तस्याप्रतिषेधः ॥ १ ॥**

कृञ उत्त्व उकारान्तनिर्देशात्स्यान्तस्या-

---

( वा. १ ) 'उतश्च' या प्रकृत सूत्रानें सांगितलेल्या 'हि'– लुकाविषयीं 'छन्दसि वा' म्हणजे वेदामध्यें 'हि' विकल्पानें होतो असें वचन करावें. उदाहरणार्थ–अव स्थिरा तनुहि, धिनुहि यज्ञम्, धिनुहि यज्ञपतिम्, तेन मा भागिनं कृणुहि.

( वा. २ ) 'नित्यं करोतेः' या पुढील सूत्रामध्यें 'छन्दसि' याची अनुवृत्ति होणें हाही येथें 'छन्दसि वा' यांतील 'छन्दसि' या पदाचा उपयोग आहे असें कोणी म्हणतात. दुसरें कोणी असें म्हणतात कीं पुढील सूत्रामध्यें 'वा' या पदाची अनुवृत्ति होणें हाहीं येथें छन्दसि वा असें म्हणण्याचा उपयोग आहे; आणि त्यामुळें 'लोपश्चास्या०' येथें अन्यतरस्याम् ग्रहण करावयास नको.

( सू. ११० ) येथें सार्वधातुक पुढें असताना असें कशाकरिता म्हटले आहे ?

संचस्करतुः व संचस्करुः येथें उत्त्व न व्हावें म्हणून म्हटलें आहे.

स्य–प्रत्ययान्त अङ्गांतील 'कृ' धातूच्या अकाराला उत्त्व होत नाहीं असें वचन करावें. उदाहरणार्थ – करिष्यति, करिष्यतः.

( वा. १ ) कृ धातुला उत्व सांगतांना उकारान्त कृ धातुला असें म्हटलें असल्यामुळें स्य

---

१ ( सू. १०७ ) संयोग पूर्वीं नाहीं असा आणि अंगाच्या शेवटी असलेला जो प्रत्ययाचा उकार त्याचा मकार आणि वकार पुढें असतांना विकल्पानें लोप होतो. उदाहरणार्थ सुन्वः, सुनुवः; तन्वः, तनुवः.

१ ( सू. १०८ ) कृ धातूच्या पुढील उकार–प्रत्ययाचा मकार व वकार पुढें असतांना नित्य लोप होतो उदाहरणार्थ कुर्वः कुर्मः.

१. ( सू. १०९ ) कृ धातूच्या पुढील उकार–प्रत्ययाचा यकारादि प्रत्यय पुढें असतांना लोप होतो. उदाहरणार्थ कुर्यात्.

१ ( सू. ११० ) उ–प्रत्ययान्त अंगांतील जो कृ धातु त्याच्या अकाराला सार्वधातुक कित् अथवा ङित् प्रत्यय पुढें असतांना उकार होतो.

२. सम् उपसर्गाच्या पुढील कृ धातूहून लिट्, तस्, अतुस्, द्वित्व, 'संपरिभ्याम्०' ( ६।१।१३७ ) यानें उत्तर खंडांतील ककाराच्या मागें सुट् आगम, 'ऋतश्च०' ( ७।४।१० ) यानें गुण, व तो रपर झाला आहे.

३ कृञः असें म्हणावयाचें असतां ज्या अर्थी 'करोतेः' असा निर्देश सूत्रकारांनीं केला आहे त्या अर्थी उ–प्रत्ययान्त कृ धातु असा अर्थ त्यांना विवक्षित आहे.

प्रतिषेधः। अनर्थकः प्रतिषेधो ऽप्रतिषेधः। उत्त्वं कस्मान्न भवति। उकारान्तनिर्देशात्॥ अशक्यः करोतावुकारान्तनिर्देशस्तन्त्रमाश्रयितुम्। इह संपरिभ्यां भूषणसमवाययोः करोतावितीहैव स्यात् संस्करोति संस्कर्ता संस्कर्तुमित्यत्र न स्यात्॥ न ब्रूमो ऽस्मादुकारान्तनिर्देशाद्योऽयं करोतेरिति। किं तर्हि। उकारप्रकरणादुकारान्तमङ्गमभिसंबध्यते। उत इति वर्तते। यद्येवं नार्थः सार्वधातुकग्रहणेन। कस्मान्न भवति संचस्करतुः संचस्करुरिति। उत इति वर्तते॥ उत्तरार्थं तर्हि सार्वधातुकग्रहणं कर्तव्यम्। श्नसोरल्लोपः [१११] इति। श्नम्सार्वधातुक एव। अस्तेरप्यार्धधातुके भूभावेन भवितव्यम्॥ उत्तरार्थमेव तर्हि। श्नाभ्यस्तयोरातः [११२] इति। श्ना सार्वधातुक एव। अभ्यस्तमप्या-

---

प्रत्ययाचा प्रतिषेध हा अप्रतिषेधच होय, म्हणजे निष्फळ होय.

पण तेथें उत्व कां होत नाहीं?

उकारान्त निर्देश केला आहे म्हणून.

करोति असा निर्देश केला असेल तेथें त्या निर्देशावरून उप्रत्ययान्त कृ धातु असला पाहिजे असें म्हणणें शक्य नाहीं. तसें गृहीत धरलें तर सम् व परि या उपसर्गांहून करोति धातूला 'संपरिभ्यां करोतौ भूषणे' व 'समवाये च' (६।१। १३७, १३८) या सूत्रांनीं सांगितलेला सुट् आगम संस्करोति येथेंच होईल आणि संस्कर्ता व संस्कर्तुम् येथें होणार नाहीं.

येथें करोतेः असा उकारान्त निर्देश केला आहे असें आम्ही म्हणत नाहीं. तर उकाराचें प्रकरण चालू असल्यामुळें उकारान्त अङ्ग असा संबंध होत आहे. म्हणजे 'उतश्च प्रत्यया०' (६।४।१०६) येथून उतः हें अनुवृत्तीनें येत आहे[४].

असें आहे तर मग 'सार्वधातुके' हा शब्द घालण्यांत फायदा नाहीं.

'सार्वधातुके' असें म्हटलें नाहीं तर, संचस्करतुः व संचस्करुः येथें उत्व कां बरें होणार नाहीं?

'उतः' याची अनुवृत्ती येत आहे म्हणून होणार नाहीं[५].

तर 'श्नसोरल्लोपः' (६।४।१११) या उत्तर सूत्रामध्यें सार्वधातुक या शब्दाची अनुवृत्ति येण्याकरितां येथें सार्वधातुकग्रहण केलें पाहिजे.

'श्न' हा सार्वधातुक पुढें असतांनाच होणारा (३।१।७८) आहे; आणि अस् धातूलाही आर्धधातुक पुढें असतांना भू आदेश होणार[६] आहे.

तथापि "श्नाभ्यस्तयोः०" (६।४।११२) या उत्तर सूत्रामध्यें अनुवृत्तीकरितांच सार्वधातुक-ग्रहण केलें पाहिजे.

श्ना हा सार्वधातुक पुढें असतानाच होणारा (३।१।८१) आहे. आणि अभ्यस्त तर आकारान्त असें, आर्धधातुक पुढें असतांना संभवतच[७] नाहीं.

---

४. तेव्हां सार्वधातुक पुढें असतांना उकारान्त जें अङ्ग त्यांतील कृ धातुच्या अकाराला उत्त्व होतें असा अर्थ झाल्यामुळें स्य प्रत्यय झाला असेल तेथें उत्वाची प्राप्तीच येत नाहीं. म्हणूनच 'अस्यान्तस्य' हा प्रतिषेध अनर्थक होतो.

५. कारण, उ प्रत्यय हा सार्वधातुक पुढें असतांनाच होणारा आहे.

६. तेव्हां आपोआपच 'श्नसोरल्लोपः' याची प्रवृत्ति सार्वधातुक प्रत्यय पुढें असतांनाच होईल. तेव्हां तेथेंही सार्वधातुके याच्या अनुवृत्तीचा उपयोग नाहीं.

७. ययाश्च येथें इट् आगम होत नाहीं त्या वेळीं आर्धधातुक पुढें असतांना अभ्यस्त संभवतें; पण तो आर्धधातुक प्रत्यय कित् अथवा ङित् नाहीं.

कारान्तमार्धधातुके नास्ति । ननु चेदमस्ति अप्सु यायावरः प्रवपेत पिण्डानिति । नैतदाकारान्तम् । यकारान्तमेतत् ॥ उत्तरार्थमेव तर्हि । ई हल्यघोः [ ११३ ] इति । तत्रापि श्नाभ्यस्तयोरित्येव ॥ अतोऽप्युत्तरार्थमेव तर्हि । इद्दरिद्रस्य [ ११४ ] इति । वक्ष्यत्येतद्दरिद्रातेरार्धधातुके लोपः सिद्धश्च प्रत्ययविधाविति ॥ अतोऽप्युत्तरार्थम् । भियोऽन्यतरस्याम् [ ११५ ] । अभ्यस्तस्येत्येव ॥ अतोऽप्युत्तरार्थमेव । जहातेश्च [ ११६ ] । अभ्यस्तस्येत्येव ॥ अतोऽप्युत्तरार्थम् । आ च हौ [ ११७ ] ॥ हावित्युच्यते । अभ्यस्तस्येत्येव ॥ अतोऽप्युत्तरार्थम् । लोपो यि [ ११८ ] । अभ्यस्तस्येत्येव ॥ अतोऽप्युत्तरार्थम् । घ्वसोरेद्धावभ्यासलोपश्च [ ११९ ] इति । हावित्युच्यते ॥

---

पण 'अप्सु यायावरः प्रवपेत पिण्डान्' येथें यायावरः हें आर्धधातुक पुढें असलेलें आकारान्त अभ्यस्त संभवत आहे ना ?

'यायावर:' येथील अभ्यस्त आकारान्त नाहीं. तर, यायाय् असें यकारान्त⁸ आहे.

तरी पण, ई हल्यघोः' ( ६।४।११३ ) या उत्तर सूत्रीं अनुवृत्तीकरितांच सार्वधातुक–ग्रहण पाहिजे.

तेथेंही 'श्नाभ्यस्तयो:' याची अनुवृत्ति आहेच.

त्याचे पुढें 'इद्दरिद्रस्य' ( ६।४।११४ ) या उत्तरसूत्रामध्यें अनुवृत्तीकरितांच सार्वधातुक-ग्रहण पाहिजे.

'आर्धधातुक–विषय असतांना दरिद्रा धातूच्या आकाराचा लोप करावा व तो प्रत्यय करण्याच्या पूर्वी होईल असा करावा' असें पुढें ( ६।४।११४ वा. १, २ ) वार्तिककार सांगणार आहेत. अर्थात् आर्धधातुक विषयामध्यें लोप विशेषविहित असल्यामुळें तो इत्त्वाचा बाध करुन होणार आहे. तेव्हां आपोआपच इत्त्वाला जागा सार्वधातुकामध्येंच राहते.

त्याहूनही पुढें "भियोऽन्यतरस्याम्" ( ६।४।११५ ) येथें अनुवृत्तीकरितां सार्वधातुक-ग्रहण पाहिजे.

पण तेथेंही अभ्यस्त–ग्रहणाची अनुवृत्ति आहेच.

त्याहूनही पुढें 'जहातेश्च' ( ६।४।११६ ) येथें अनुवृत्तीकरितां सार्वधातुक–ग्रहण पाहिजे.

तेथेंही अभ्यस्त–ग्रहणाची अनुवृत्ति आहेच.

त्याच्याही पुढें 'आ च हौ' ( ६।४।११७ ) येथें अनुवृत्तीकरितां सार्वधातुक–ग्रहण पाहिजे.

तेथें तर 'हौ' म्हणजे हि प्रत्यय पुढें असतांना असें म्हटलें आहे. शिवाय, अभ्यस्तग्रहणाची अनुवृत्ति तेथें आहेच.

त्याच्याही पुढें 'लोपो यि' ( ६।४।११८ ) येथें अनुवृत्तीकरितां सार्वधातुक–ग्रहण पाहिजे.

तेथेंही अभ्यस्त–ग्रहणाची अनुवृत्ति आहेच.

त्याच्याही पुढें 'घ्वसोरेद्धा०' ( ६।४।११९ ) येथें अनुवृत्तीकरितां सार्वधातुक-ग्रहण पाहिजे.

हीं कार्यें झालीं आहेत.⁹

---

८. कारण, यङ् प्रत्ययाच्या यकारासहित याय् या भागाला द्वित्व होतें म्हणून अभ्यस्त संज्ञा ( ६।१।५ ) यकारान्त भागालाच होणार आहे. यायावरः येथें या धातूहून यङ्, द्वित्व, पुढें वरच् प्रत्यय (३।२।१७६ ), अकाराचा लोप आणि यकाराचा लोप ( ६।१।६६ )

९. अर्थात् 'श्नाभ्यस्तयोरातः' ( ६।४।१११ ) या आलोपाप्रमाणें ईत्वाचीही आर्धधातुक प्रत्यय पुढें असतांना प्राप्तीच संभवत नाहीं. म्हणून येथेंही सार्वधातुकानुवृत्तीचा उपयोग नाहीं.

तदेव तर्हि प्रयोजनं श्नसोरल्लोप इति । ननु चोक्तं श्नम्सार्वधातुक एव अस्तेरप्यार्धधातुके भूभावेन भवितव्यमिति ।

**अनुप्रयोगे तु भुवास्त्यबाधनं**
**स्मरन्ति कर्तुर्वचनान्मनीषिणः ।**

अनुप्रयोगे तु भुवास्तेरबाधनमिष्यते । ईहामास ईहामासतुः ईहामासुरिति ॥ किं च स्याद्यद्यत्र लोपः स्यात् ।

**लोपे द्विर्वचनासिद्धिः**

लोपे कृतेऽनच्कत्वाद् द्विर्वचनं न स्यात् ॥ स्थानिवद्भावाद्भविष्यति ।

**स्थानिवदिति चेत्कृते भवेद् द्वित्वे ॥१॥**

कृते द्वित्वे लोपः प्राप्नोति ॥ अस्तु तर्हि परस्य लोपः । अभ्यासस्य योऽकारस्तस्य दीर्घत्वं भविष्यति ॥

**नैवं सिध्यति कस्मात्**
**प्रत्यङ्गत्वाद्भवेद्धि पररूपम् ।**

नैवं सिध्यति । कस्मात् । प्रत्यङ्गत्वात्पररूपं प्राप्नोति ।

**तस्मिंश्च कृते लोपः**

पररूपे च कृते लोपः प्राप्नोति ।

**दीर्घत्वं बाधकं भवेत्तत्र ॥२॥**

---

तेथेंही हि- प्रत्यय पुढें असतांना असें म्हटलें आहे.

तर मग सार्वधातुक-ग्रहणानुवृत्तीचें ' श्नसोरल्लोपः ' ( ६।४।१११ ) हेंच प्रयोजन होय.

पण श्न प्रत्यय हा सार्वधातुक पुढें असतांनाच होणारा आहे. आणि आर्धधातुक पुढें असतांना अस् धातूला भू आदेश होणार आहे असें पूर्वी सांगितले आहे ना ?

( श्लो. वा. १ ) अस् धातूचा अनुप्रयोग केला असतां तेथें अनुप्रयोग करण्याचे जोरावर भू आदेशानें अस् धातु घालविला जात नाहीं असें विद्वान् लोक समजतात. उदाहरणार्थ--- ईहामासतुः, ईहामासुः.

ईहामासतुः इत्यादि ठिकाणीं अस् धातूच्या अकाराचा लोप झाला तर काय बिघडेल ?

इहाम्-अस्-अतुस् असें असतां अस् धातूच्या अकाराचा लोप केला तर अस् धातु अनच्क झाल्यामुळें एकाच् भागाला सांगितलेलें द्वित्व ( ६।१।८ ) होणार नाहीं.

' द्विर्वचनेऽचि ' ( १।१।५९ ) यानें रूप-स्थानिवद्भावें[12] झाल्यामुळें द्वित्व होईल.

स्थानिवद्भावानें द्वित्व होईल असें म्हणणें असेल तर द्वित्व केल्यानंतर लोप होऊं लागेल.

झाला तर झाला लोप; उत्तर खंडांतील अकाराचा लोप होईल. तथापि अभ्यासांतील अकाराला ' अत आदेः ' ( ७।४।७० ) यानें दीर्घ झाल्यानें रूप साधेल.

( श्लो. वा. २ ) अशा रीतीनें रूप साधत नाहीं.

काय कारण ?

कारण असें कीं, अंतरंग असल्यामुळें ' अतो गुणे ' यानें पररूप प्राप्त होत आहे; आणि तें केल्यानंतर अकाराचा लोप होऊन अनिष्ट रूप होईल.

---

१०. आणि हि आदेश तर सार्वधातुकालाच होत आहे. तेव्हां ' ध्वसोरेद्धौ० ' याची आर्धधातुकाविषयीं शंका सुद्धां संभवनीय नाहीं.

११. ईह् धातूहून लिट्, आम् ( ३।१।३६ ), पुढें अस् धातूचा अनुप्रयोग हीं ( ३।१।४० ) कार्यें झालीं आहेत. येथें अस् धातूच्या अकाराचा लोप ' श्नसोरल्लोपः ' ( ६।४।१११ ) या सूत्रानें होऊं नये याकरितां त्या सूत्रांत ( ६।४।१११ ) सार्वधातुके याची अनुवृत्ति केली पाहिजे.

१२. रूपस्थानिवद्भावाविषयीं ' लक्ष्येलक्षण'न्याय प्रवृत्त होत नाहीं. म्हणूनच जग्मतुः येथें उत्तर खंडामध्यें पुन्हां उपधालोप होतो.

अत आदेः [ ७. ४. ७० ] इति दीर्घत्वं बाधकं भविष्यति ॥

इदं तर्हि प्रयोजनं सार्वधातुके भूतपूर्वमात्रेऽपि यथा स्यात् । कुर्विति ॥

**[1] श्नसोरल्लोपः ॥ ६ । ४ । १११ ॥**

अथात्र तपरकरणं किमर्थम् । इह मा भूत् । आस्ताम् आसन् ॥ नैतदस्ति प्रयोजनम् । आटो ऽसिद्धत्वान्न भविष्यति ॥

**[ [1] श्नाभ्यस्तयोरातः ॥ ६ । ४ । ११२ ॥**

**[1] ई हल्यघोः ॥ ६ । ४ । ११३ ॥ ]**

**[1] इद्दरिद्रस्य ॥ ६ । ४ । ११४ ॥**

**दरिद्रातेरार्धधातुके लोपः ॥ १ ॥**

दरिद्रातेरार्धधातुके लोपो वक्तव्यः ॥

**सिद्धश्च प्रत्ययविधौ ॥ २ ॥**

स च सिद्धः प्रत्ययविधौ । किं प्रयोजनम् । दरिद्रातीति दरिद्रः । आकारान्तलक्षणः प्रत्ययविधिर्मा भूदिति ॥

न दरिद्रायके लोपो दरिद्राणे च नेष्यते ॥

---

'अत आदेः' हा दीर्घ येननाप्राप्त–न्यायानें पररूपाचा बाधक होईल.

तर मग सार्वधातुके याचा असा उपयोग समजावा की कुरु[13] येथें 'हि'–लुक् केल्यानंतर सार्वधातुक पुढें नाही तरी येथें पूर्वी सार्वधातुक प्रत्यय पुढें होता अशा भावनेनें उत्व करतां यावें हें सार्वधातुक–ग्रहणाचें प्रयोजन समजावें.

( सू. १११ ) अल्लोपः येथें अत् असें जें तपरकरण केलें आहे तें कशाकरितां ?

आस्ताम् आसन् येथें दीर्घ आकाराचा लोप होऊं नंय म्हणून केलें आहे.

हें प्रयोजन बरोबर नाहीं. कारण, आभीय आट् आगम हा ह्या आभीय लोपाच्या दृष्टीनें असिद्ध असल्यामुळें त्याचा लोप होणार नाहीं.

( सू. ११४ ) दरिद्रा धातूच्या आकाराचा आर्धधातुक प्रत्यय असताना लोप होतो असें वचन करावें.

( वा. २ ) तो आकाराचा लोप प्रत्यय कर्तव्य असतांना त्याच्या पूर्वीच करावा[2].

तसें करण्याचें काय प्रयोजन ?

दरिद्रातीति दरिद्रः येथें 'श्याद्व्यधा०' ( ३।१।१४१ ) यानें आकारान्ताहून ण प्रत्यय न झाला पाहिजे[3].

---

१३. कर+उ+हि अशी स्थिति असतां 'सर्वविधिभ्यो लुग्बलीयान्' या परिभाषेनें प्रथमतः हि–लुक् झाल्यानंतर 'न लुमता०' यानें प्रत्ययलक्षणनिषेधामुळें उत्त्व होणार नाहीं. तेव्हां सार्वधातुकग्रहणसामर्थ्यास्तव भूतपूर्व सार्वधातुकपरकत्व घेतल्यामुळें उत्त्व होतें.

१. ( सू. १११ ) श्ना प्रत्यय व अस् धातु यांच्या ऱ्हस्व अकाराचा सार्वधातुक कित् किंवा ङित् प्रत्यय पुढें असतांना लोप होतो.

१. ( सू. ११२ ) श्ना प्रत्यय व अभ्यस्तसंज्ञक यांच्या आकाराचा कित् अथवा ङित् सार्वधातुक प्रत्यय पुढें असतांना लोप होतो.

१. ( सू. ११३ ) श्ना प्रत्यय व घुसंज्ञकभिन्न अभ्यस्त यांच्या आकाराला हलादि कित् किंवा ङित् प्रत्यय पुढें असतांना ईकार आदेश होतो.

१ ( सू. ११४ ) दरिद्रा धातूच्या आकाराला हलादि कित् किंवा ङित् सार्वधातुक प्रत्यय पुढें असतांना इकार आदेश होतो.

२. आर्धधातुके ही परसप्तमी समजूं नये. तर, विषयसप्तमी घ्यावी.

३. आर्धधातुके ही परसप्तमी गृहीत धरली तर दरिद्रः येथें अच् ( ३।१।१३५ ) प्रत्ययाचा बाध करून 'श्याद्व्यधा०' ( ३।१।१४१ ) यानें ण प्रत्यय होईल, व तो केला असतां युक् आगम ( ७।३।३३ ) होऊन भलतेंच रूप होईल; आणि विषयसप्तमी समजली असतां प्रत्यय करण्याच्या पूर्वीच आकाराचा लोप

दिदरिद्रासतीत्येके दिदरिद्रिषतीति वा॥

**वाऽद्यतन्याम् ॥ ३ ॥**

अद्यतन्यां वेति वक्तव्यम्। अदरिद्रीत् अदरिद्रासीत्॥

[ **भियोऽन्यतरस्याम् ॥ ६ । ४ । ११५ ॥**

**जहातेश्च ॥ ६ । ४ । ११६ ॥**

**आ च हौ ॥ ६ । ४ । ११७ ॥**

**लोपो यि ॥ ६ । ४ । ११८ ॥**

**घ्वसोरेद्धावभ्यासलोपश्च ॥ ६ । ४ । ११९ ॥ ]**

**अत एकहल्मध्येऽनादेशादेर्लिटि ॥ ६ । ४ । १२० ॥**

**णकारषकारादेशादेरेत्त्ववचनं लिटि ॥ १ ॥**

णकारषकारादेशादेरेत्त्वं लिटि वक्तव्यम्। नेमतुः नेमुः। सेहे सेहाते सेहिरे। किं पुनः कारणं न सिध्यति। अनादेशादेरिति प्रतिषेधः प्राप्नोति ॥ तर्हि वक्त-

---

ण्वुल् केला असतां दरिद्रायक शब्दामध्यें, व ल्युट् केला असतां दरिद्राण शब्दामध्यें आकार-लोप इष्ट नाहीं. तसेंच, सन् प्रत्यय केला असतां दिदरिद्रासति अथवा दिदरिद्रिषति असा आकार–लोप विकल्पानें होतो.

( वा. ३ ) लुङ्विषयीं दरिद्रा धातूच्या आकाराचा लोप विकल्पानें होतो. उदाहरणार्थ– अदरिद्रीत्, अदरिद्रासीत्.

( सू. १२० वा. १ ) णकार किंवा षकार यांचे स्थानीं झालेला आदेश ज्याच्या आरंभीं आहे अशा धातूमधील ऱ्हस्व अकाराला लिट् पुढें असतांना एकार होतो असें वचन करावें. उदाहरणार्थ– नेमतुः, नेमुः; सेहे, सेहाते, सेहिरे.

पण तेथें 'अत एक०' या प्रकृत सूत्रानें एत्व कां बरें होत नाहीं ?

ज्याच्या आदीला आदेश झाला आहे अशा धातूला एत्व होत नाहीं अशा अर्थाचा 'अनादेशादेः' हा प्रतिषेध येतो म्हणून.

तर मग त्या ठिकाणीं एकार आदेश होण्या-बद्दल वचन केलें पाहिजे.

---

झाल्यामुळें आकारान्ताहून सांगितलेला ण प्रत्यय होऊं शकत नाहीं. अर्थात् अच् प्रत्यय झाल्यामुळें 'दरिद्र' असें रूप साधतें.

४. 'अद्यतनी' ही लुङ् प्रत्ययाची पूर्वाचार्यांची संज्ञा आहे.

१ ( सू. ११५ ) भी धातूच्या इकाराला हलादि कित् किंवा ङित् सार्वधातुक पुढें असतांना ऱ्हस्व इकार आदेश विकल्पानें होतो. उदाहरणार्थ– बिभीतः, बिभितः.

१. ( सू. ११६ ) परस्मैपदी 'हा' या धातूच्या आकाराला हलादि कित् किंवा ङित् सार्वधातुक पुढें असतांना इकार आदेश विकल्पानें होतो. उदाहरणार्थ– जहितः, जहीतः.

१. ( सू. ११७ ) परस्मैपदी हा धातूच्या आकाराला आकार व ऱ्हस्व इकार असे आदेश हि प्रत्यय पुढें असतांना विकल्पानें होतात. उदाहरणार्थ– जहाहि, जहिहि, जहीहि.

१ ( सू. ११८ ) परस्मैपदी हा धातूच्या आकाराचा यकारादि सार्वधातुक प्रत्यय पुढें असतांना लोप होतो. उदाहरणार्थ--जह्यात्.

१ ( सू. ११९ ) हि प्रत्यय पुढें असतांना घु संज्ञक धातू व अस् धातु यांच्या शेवटच्या वर्णाला एत्व होतें, आणि अभ्यास असेल तर त्याचा लोपही होतो.

१ ( सू. १२० ) लिटाच्या निमित्तानें ज्याच्या आदीला आदेश झाला नाहीं अशा अंगामध्यें असणारा आणि ज्याच्या मागें व पुढे एकेकच व्यंजन आहे असा जो ऱ्हस्व अकार त्याला कित् लिट् पुढें असतांना एकार होतो आणि अभ्यासाचा लोप होतो.

२. 'णम्' या धातूच्या णकाराला नकार ( ६।१।६५ ) आदेश तसाच 'षह्' धातूच्या षकाराला सकार ( ६।१।६४ ) असे आदेश झाले आहेत. त्या दोन धातूंचीं लिट् प्रत्ययाचीं हीं रूपें आहेत.

व्यम् । न वक्तव्यम् । लिटात्रादेशादिं विशेषयिष्यामः । लिटि य आदेशादिस्तदादेर्नेति ॥ अस्त्यन्यल्लिड्ग्रहणस्य प्रयोजनम् । किम् । इह मा भूत् । पक्ता पक्तुम् । नैतदस्ति प्रयोजनम् । क्ङितीति वर्तते । एवमपि पक्वः पक्ववानित्यत्र प्राप्नोति । अभ्यासलोपसंनियोगेनत्वमुच्यते न चात्राभ्यासलोपं पश्यामः । एवमपि पापच्यते अत्र प्राप्नोति । दीर्घत्वमत्र बाधकं भविष्यति । नाप्राप्ते ऽभ्यासविकार एत्त्वमारभ्यते तद्यथाभ्यानभ्यामविकारान्बाधत एवं दीर्घत्वमपि बाधेत । सत्यमेवमेतत् । अभ्यासविकारेष्वपि तु ज्येष्ठमध्यमकनीयांसः प्रकारा भवन्ति । तत्र ह्रस्वहलादिशेषावुत्सर्गौ तयोर्दीर्घत्वमपवाद एत्त्वं च । अपवादविप्रतिषेधाद्दीर्घत्वं भविष्यति ॥ इह

---

वचन करावयास नको. कारण, अनादेशादेः यांतील एकदेश जो आदेशादि त्याला ' लिटि ' हें विशेषण आम्ही देत आहों; म्हणजे लिटाच्या निमित्तानें आरंभींच्या वर्णाला आदेश झालेला नसला पाहिजे असा अर्थ होईल.[3]

पण सूत्रामध्यें लिटि असें जें म्हटलें आहे त्याचें प्रयोजन दुसरें आहे ना ?

ते कोणते ?

पक्ता तसेंच पक्तुम् येथें लिट् प्रत्यय केला नसल्यामुळें प्रकृत सूत्रानें एत्व न होणें हें लिट् ग्रहणाचे प्रयोजन आहे.

हें प्रयोजन नाहीं. कारण ' गमहन० ' ( ६।४।९८ ) येथून क्ङित् ग्रहण अनुवृत्तीनें येतें आहे.[4]

तरी पण पक्वः पक्ववान् येथे एत्व प्राप्त होत आहे.

अभ्यासलोप जोडीला धरून येथें एत्वाचें विधान केलें आहे. आणि पक्वः येथें तर द्वित्व झाले नसल्यामुळे अभ्यासलोप करतां येत नाहीं.[5]

तरीही पापच्यते येथें एत्व प्राप्त होत आहे.

तेथें ' दीर्घोऽकितः' ( ७।४।८३ ) हा दीर्घ अभ्यासलोपाचा परत्वास्तव बाध करील.

अभ्यासविकार नाप्राप्त[6] असतां एत्वाचा आरंभ केला आहे. तेव्हां, जसा इतर अभ्यासविकारांचा एत्व बाध करतें तसा दीर्घाचाही बाध करील.

हें खरें आहे. पण अभ्यासकार्यांमध्येंही ज्येष्ठ, मध्यम आणि कनिष्ठ असे प्रकार आहेत. त्यांत अभ्यासह्रस्व आणि हलादिःशेष हे उत्सर्ग म्हणजे कनिष्ठ[7] होत. त्याचे दीर्घ व एत्व हे दोन्ही अपवाद आहेत. पापच्यते येथें दोन्ही अपवादाची युगपत्–प्राप्ति आली असतांना त्यांमध्यें विप्रतिषेध असल्यामुळें दीर्घ होईल.

---

३. नेमतुः, सेहे इत्यादि उदाहरणांमध्यें णकाराला नकार आणि षकाराला सकार हे जे आदेश झाले आहेत ते लिटाच्या निमित्ताने झालेले नाहीत.

४. तेव्हां कित् प्रत्यय पुढें असतांना असा अर्थ झाल्यामुळें पक्ता इत्यादि ठिकाणीं एत्व होणार नाहीं.

५. तेव्हां जोडीदार नसल्यामुळें एत्व होत नाहीं. कारण, एका सूत्रानें बरोबरीनें सांगितलेलीं ( दोन ) कार्यें झालीं तर दोन्ही होतात नाहीं तर दोन्ही होत नाहींत असा साधारण नियम आहे.

६. ज्या ज्या ठिकाणीं एत्व व अभ्यासलोप यांची प्राप्ति येते त्या त्या सर्व ठिकाणीं ह्रस्व व हलादिशेष वगैरेंपैकी कोठें कांहीं कोठें कांहीं कार्य प्राप्त होत आहेच.

७. ह्या कनिष्ठ प्रकारामध्यें दीर्घाची गणना करतां येत नाहीं. कारण, दीर्घाची प्राप्ति फार थोड्या ठिकाणीं म्हणजे फक्त यङामध्येंच आहे जर कनिष्ठ प्रकारामध्यें दीर्घाची गणना झाली असती तर मात्र एत्व व अभ्यासलोप यामुळें दीर्घाचा बाध झाला असता. तेव्हां एत्व व अभ्यासलोप हें कार्य मध्यम ठरतें; आणि दीर्घ हें कार्य ज्येष्ठ ठरतें.

तर्हि बभणतुः बभणुरित्यभ्यासादेशस्यासिद्धत्वादेत्त्वं प्राप्नोति ।

**फलिभजिग्रहणं तु ज्ञापकमभ्यासादेशसिद्धत्वस्य ॥ २ ॥**

यदयं फलिभज्योर्ग्रहणं करोति तज्ज्ञापयत्याचार्यः सिद्धोऽभ्यासादेश एत्त्व इति ॥ यद्येवं

**प्रथमतृतीयादीनामादेशादित्वादेत्त्वाभावः ॥ ३ ॥**

प्रथमतृतीयादीनामपि तर्ह्यादेशादित्वादेत्त्वं न प्राप्नोति । पेचतुः पेचुः । देभतुः देभुः ॥

**न वा शसिदद्योः प्रतिषेधो ज्ञापको रूपाभेद एत्त्वविज्ञानस्य ॥ ४ ॥**

न वैष दोषः । किं कारणम् । शसिदद्योः प्रतिषेधो ज्ञापको रूपाभेद एत्त्वविज्ञानस्य । यदयं शसिदद्योः प्रतिषेधं शास्ति तज्ज्ञापयत्याचार्यो रूपाभेदेन य आदेशादयो न तेषां

---

तर मग बभणतुः, बभणुः येथेंही अभ्यासाचे आदेशाला 'पूर्वत्रासिद्धम्' (८।२।१) यानें असिद्धत्व असल्यामुळें एत्व प्राप्त होत आहे.

(वा. २) 'तॄफलभज०' येथें ज्या अर्थी फल् आणि भज् धातूचें ग्रहण केलें आहे त्या अर्थी अभ्याससंबंधी आदेशाला सिद्धत्व आहे असें आचार्य ज्ञापन करीत आहेत.

अभ्यासाचे आदेशाला एत्वाच्या दृष्टीनें सिद्धत्व ज्ञापन केलें तर—

(वा. ३) वर्गांतील पहिलें आणि तिसरें व्यंजन धातूच्या आरंभीं असल्यास त्या धातूच्या आरंभींच्या वर्णाला आदेश झाला असल्यामुळें एत्व व अभ्यासलोप प्राप्त होत नाहीत. उदाहरणार्थ–पेचतुः, पेचुः, देभतुः देभुः.

(वा. ४) हा दोष येत नाहीं.

काय कारण?

कारण असें कीं–ज्या अर्थी आचार्य हे 'न शसदद०' (६।४।१२६) यानें शस् व दद् धातूंना एत्वाभ्यासलोपांचा प्रतिषेध करीत आहेत त्या अर्थी आपल्या स्वरूपांत बदल न होतां जे आदेशादि होतात त्यांना 'अनादेशादेः'

---

८. जसें पापच्यते हें उदाहरण दीर्घानें एत्व व अभ्यासलोप यांचा बाध करून साधलें तसें बभणतुः हें उदाहरण जश्त्वानें (८।४।५४) एत्व व अभ्यासलोप यांचा बाध करून साधावयाचें; परंतु जश्त्व असिद्ध (८।२।१) असल्यामुळें एत्व व अभ्यासलोप होतील असा दोष येतो.

९. फलतुः व भेजतुः येथें अभ्यासाच्या आदेशाला असिद्धत्व असल्यामुळे 'अत एक०' यानेंच एत्व व अभ्यासलोप साधत आहेत. तेव्हां 'तॄफल०' (६।४।१२२) येथें एत्व व अभ्यासलोप यांच्या विधानाकरितां केलेलें 'फलभज'ग्रहण विफल होतें; आणि तें तर मुद्दाम तेथें केलें आहे. त्यावरून एत्व व अभ्यासलोप कर्तव्य असतांना अभ्यासादेशाला सिद्धत्व आहे असें अनुमान ठरतें. म्हणून बभणतुः इत्यादि स्थलीं परत्वास्तव प्रथमतः अभ्यासादेश (८।४।५४) होतो; व त्यामुळें आदेशादि असा धातु झाल्यानें एत्व व अभ्यासलोप होत नाहीत.

१० पेचतुः व देभतुः येथें परत्वास्तव एत्व व अभ्यासलोप यांचा बाध करून प्रथमतः 'अभ्यासे चर्च' यानें जश् व चर् आदेश प्राप्त झाले असतां 'स्थानेऽन्तरतमः' (१।१।५०) या परिभाषेनें अभ्यासांत मूळचे चर् असल्यास त्यांना चर्च होतात व मूळचे जश् असल्यास जशूच होतात म्हणून पकाराला पकार होतो व दकाराला दकारच होतो. तेव्हां धातूच्या आरंभींच्या वर्णाला आदेश झाला असल्यानें 'अनादेशादेः' हा प्रतिषेध प्राप्त होतो म्हणून एत्व व अभ्यासलोप होणार नाहींत.

प्रतिषेधो भवतीति ॥

**दम्भ एत्त्वम्**

दम्भ एत्त्वं वक्तव्यम् । देभतुः देभुः ॥ किं पुनः कारणं न सिध्यति ।

**नलोपस्यासिद्धत्वात् ॥ ५ ॥**

असिद्धो नलोपस्तस्यासिद्धत्वादेत्त्वं न प्राप्नोति ॥

**नशिमन्योरलिट्येत्त्वम्**

नशिमन्योरलिट्येत्त्वं वक्तव्यम् ॥

**छन्दस्यमिपचोरपि ।**

छन्दस्यमिपचोरपीति वक्तव्यम् ॥ किं प्रयोजनम् ॥

**अनेशं मेनकेत्येतद्**
**व्येमानं लिङि पेचिरन् ॥ १ ॥**
**यज् आयेजे वप् आवेपे**
**दम्भ एत्त्वमलक्षणम् ।**

असिद्धत्वान्नलोपस्य दम्भ एत्त्वं न सिध्यति ।

**श्नसोरत्त्वे तकारेण**
**ज्ञाप्यते त्वेत्त्वशासनम् ॥ २ ॥**

---

हा प्रतिषेध लागू होत नाहीं असे ते सुचवीत आहेत.

दम्भ् धातूला एत्व होतें असें वचन करावें. उदाहरणार्थ–देभतुः, देभुः.

पण 'अत एक०' या प्रकृत सूत्रानें एत्व साधत नाहीं याचें काय बरें कारण?

(वा. ५) नलोपाला (६।४।२४) आभीयासिद्धत्व असल्यामुळें एत्व प्राप्त होत नाहीं.

(श्लो.वा.१) नश् व मन् या धातूंना लिट् पुढें नसतानाही एत्व होतें असें वचन करावें.

वेदामध्यें अम् व पच् यानाही लिट् पुढें नसला तरी एत्व होतें असें वचन करावें.

काय प्रयोजन?

अनेशम्[११], मेनका, व्येमानम्, पेचिरन् हीं प्रयोजनें होत.

(श्लो. वा.२) यज् व वप् या धातूंना लिट् पुढें नसतानाही वेदामध्यें एत्व होतें. उदाहरणार्थ–आयेजे, आवेपे[१२].

नलोपाला आभीय असिद्धत्व असल्यामुळें दम्भ धातूला सूत्रानें एत्व साधत नाहीं.

'श्नसोरल्लोपः' येथें अत् असें जें तपरकरण केलें आहे त्यानें आभीयासिद्धत्व अनित्य आहे असें ज्ञापन[१३] केलें जातें म्हणून दम्भ् धातूला

---

११. अनेशम् येथें नश धातूहून लुङ् उत्तम पुरुष एकवचन मिप् प्रत्यय, त्याला अम् आदेश (३।४।१०१), च्लि, अङ् (३।१।५५), व अट् आगम (६।४।७१) हीं कार्यें झालीं आहेत. येथें लिट् पुढें नाही; म्हणूनच अभ्यासलोपही नाही; तरी नश् धातूच्या अकाराला एत्व झालें आहे. मेनका येथें मन् धातूहून वुन् प्रत्यय (३।१।१५०), अक आदेश (७।१।१) आणि टाप् प्रत्यय झाले आहेत. येथेंही मन् धातूच्या अकाराला एत्व झालें आहे. व्येमानम् येथें वि उपसर्ग पूर्वी असलेल्या अम् धातूहून चानश्(३।२।१२९), शप् प्रत्ययाचा लुक् (२।४।७३), व अम् धातूच्या अकाराला एत्व झालें आहे. पचेरन् याचे ऐवजीं वेदामध्यें पेचिरन् हें रूप झालें आहे. येथें एकाराला इकार आणि धातूच्या अकाराला एत्व झालें आहे.

१२ यज् आणि वप् या धातूंचीं आयेजे आणि आवेपे हीं लङ् उत्तम पुरुष एकवचनाचीं क्रियापदाचीं रूपें आहेत वैदिक प्रयोग आहेत म्हणून आट् आगम (६।४।७२) झाला आहे; आणि धातूच्या अकाराला एत्व झालें आहे.

१३. आस्ताम् व आसन् येथें आट् आगमाचा लोप न व्हावा म्हणून 'श्नसोरल्लोपः' येथें तपरकरण केलें आहे. परंतु आभीय आट् आगम असिद्ध असल्यामुळेंच लोप होणार नाहीं. तेव्हां तपरकरण व्यर्थ होतें तें अर्थात् आभीय असिद्धत्वाला अनित्यत्व सुचवितें.

अनित्योऽयं विधिरिति ॥

**थलि च सेटि ॥ ६ । ४ । १२१ ॥**

थल्ग्रहणं किमर्थम् ।

**थल्ग्रहणमक्ङिदर्थम् ॥ १ ॥**

थल्ग्रहणं क्रियतेऽक्ङिदर्थम् । अक्ङित्येत्त्वं यथा स्यात् । पेचिथ शेकिथ ॥ नैतदस्ति प्रयोजनम् । सेड्ग्रहणमेवात्राक्ङिदर्थं भविष्यति ॥ इदं तर्हि प्रयोजनं समुच्चयो यथा विज्ञायेत । थलि च सेटि क्ङिति च सेटीति । किं प्रयोजनम् । पेचिव पेचिम । तत्र पचादिभ्य इड्वचनमिति वक्ष्यति तन्न वक्तव्यं भवति ॥

इह कस्मान्न भवति । लुलविथ । गुणस्य प्रतिषेधात् । इहापि तर्हि न प्राप्नोति । पेचिथ शेकिथ । गुणस्य योऽकार इत्येवमेतद्विज्ञास्यते । एवमपि शशरिथ अत्र प्राप्नोति ।

---

एत्व सिद्ध होतें.

( सू. १२१ ) येथें थलि असा शब्द घातला आहे तो कशाकरितां ?

( वा. १ ) कित् किंवा ङित् प्रयय पुढें नसतांनाही एत्व व्हावें म्हणून येथें थल्-ग्रहण केलें आहे. उदाहरणार्थ—पेचिथ, शेकिथ.

हें प्रयोजन नाहीं. कारण येथें सेटि असें म्हटलें आहे तेवढ्यानेंच कित् अथवा ङित् प्रत्यय नसला तरी इट् आगम झाला असला म्हणजे एत्व होईल.

तर सेट् थल् पुढें असतांना आणि सेट् क्ङित् पुढें असतांनाही एत्व व अभ्यासलोप होतात असा समुच्चय व्हावा याकरितां येथें थल्-ग्रहण केलें आहे.

याचा काय उपयोग ?

उपयोग असा कीं—पेचिव तसेंच पेचिम येथेंही इट् आगम केलेला क्ङित् लिट् पुढें असतांना एत्वाभ्यासलोप मागितलें म्हणून क्ङित् लिटाला इट् आगमाचा निषेध ( ७।२।६३ वा. २ ) होणार नाहीं त्यामुळें 'पचादिकांना इट् आगमाचें विधान करावें' असें जें पुढें ( ७।२।६३ वा. २ ) विधान करण्यांत येणार आहे तें करावें लागणार नाहीं.

आतां लुलविथ येथें एत्व व अभ्यासलोप कां बरें होत नाहींत ?

'न शस०' ( ६।४।१२६ ) यानें गुणाला एत्वाचा निषेध केला आहे म्हणून.

असें असेल तर पेचिथ तसेंच शेकिथ येथेंही एत्वाभ्यासलोप प्राप्त होत नाहींत.

गुण जो अकार असा संबंध न करितां गुणाचा जो अकार असा संबंध तेथें करावयाचा आहे.

तरीही शशरिथ येथें प्रतिषेध प्राप्त होऊं

---

१. ( सू १२१ ) लिट् प्रत्ययामुळें ज्याच्या आरंभींच्या वर्णाला आदेश झाला नाही अशा अंगामध्यें असणारा आणि ज्याच्या मागें व पुढें एकेकच व्यंजन आहे असा जो ऱ्हस्व अकार त्याला इट् आगम झालेला थल् प्रत्यय पुढें असतांना एत्व होतें व अभ्यासाचा लोप होतो.

२. पेचिव इत्यादि उदाहरणांमध्यें इट् आगम झालेला कित् लिट् पुढें असतांना पूर्वसूत्रानेंच एत्व व अभ्यासलोप साधत असल्यामुळें अर्थात् हें सूत्र कित् नव्हे असा इट् आगम झालेला लिट् पुढें असतांना एत्व व्हावें म्हणूनच केलें आहे असें सहजच सिद्ध होतें.

३ लूञ् धातूहून लिट्, थल्, इट् आगम, द्वित्व, उत्तरखंडीं गुण, आणि अव् आदेश हीं कार्यें झालीं आहेत. येथें अव् आदेश केल्यानंतर त्या अकाराला प्रकृत सूत्रानें एत्व प्राप्त होतें.

४. ऱ्हस्व अकाराला गुणसंज्ञा 'अदेङ् गुणः' ( १।१।२ ) या सूत्रानें आहे.

५. 'न शसदद०' येथें गुणशब्दानें सामान्यतः अकार, एकार व ओकार हे घ्यावयाचे नाहींत तर 'गुण

गुणस्यैषोऽकारः । कथम् । वृद्धिर्भवति गुणो भवतीति रेफशिरा गुणवृद्धिसंज्ञको ऽभिनिर्वर्तते । अथवाचार्यप्रवृत्तिर्ज्ञापयति नैवंजातीयकानामेत्त्वं भवतीति यदयं तॄफलभजत्रपश्च [ ६. ४. १२२ ] इति तॄग्रहणं करोति ॥

[ तॄफलभजत्रपश्च ॥ ६ । ४ । १२२ ॥ ]

राधो हिंसायाम् ॥ ६।४।१२३ ॥

राधादिषु स्थानिनिर्देशः ॥ १ ॥

राधादिषु स्थानिनिर्देशः कर्तव्यः ॥ न कर्तव्यः । एकहल्मध्य इति वर्तते । यद्येवं त्रेसतुः त्रेसुः रशब्दस्यैत्त्वं प्राप्नोति ।

---

शकत नाहीं.

शशरिथ येथें गुण म्हणून झालेल्या आदेशाचा अवयवच अकार आहे.

तो कसा ?

गुण होतो, वृद्धि होते, असें येथे सांगितलें आहे. आणि ' उरण् रपरः ' ( १।१।५१ ) यानें ऋकाराचे स्थानीं आदेश अण् कर्तव्य असेल तर अगोदर त्याला रेफ आगम पुढें जोडून नंतर करावा असें सांगितलें आहे. तेव्हां ऋकाराचे स्थानीं गुण म्हणून किंवा वृद्धि म्हणून जो आदेश होतो तो रेफ पुढें जोडलेला असा अर् किंवा आर् असाच होतो.

अथवा, ज्या अर्थी आचार्य हे ' तॄफल० ' ( ६।४।१२२ ) येथें एत्वविधानाकरितां तॄ धातूचें ग्रहण करीत आहेत त्या अर्थी अशा गुणशब्दानें झालेल्यांच्या अकाराना ' न शस० ' यानें एत्वाभ्यासलोपांचा निषेध होतो असें ते सुचवीत आहेत.

( सू. १२३ वा. १ ) राध् वगैरे धातूंच्या संबंधानें जें हें एत्व सांगितलें आहे तेथें तें एत्व अमुक वर्णाला होतें असा स्थानीचा निर्देश करावा.

एत्वाच्या स्थानीचा निर्देश करावयास नको. कारण, ' एकहल्मध्ये ' याची अनुवृत्ति आहे. अर्थात् एक एक हल् बाजूला ठेवून त्याच्यामध्यें जो असेल त्याला एत्व होईल.

तर त्रेसतुः, त्रेसुः येथें त्रस् धातूमधील ' र ' हा शब्द तसा असल्यामुळें त्याला एत्व प्राप्त होत आहे.

---

होतो ' असें सांगणाऱ्या शास्त्रानें झालेला जो आदेश तो घेऊन तत्संबंधी ऱ्हस्व अकाराला एत्वाचा निषेध त्यानें होतो. लुलुविथ येथें गुण शब्दानें झालेला जो ओकार त्याचे स्थानीं झालेल्या अव् आदेशातील अकार हा तत्संबंधी आहे म्हणून तेथें एत्वाचा निषेध होतो.

६. शशरिथ येथें गुण शब्दानें झालेल्या आदेशाचा संबंधी अकार नसून गुण शब्दानें झालेलाच आहे, अशा अभिप्रायानें हा प्रश्न केला आहे.

७. तेरतुः येथें शशरतुः याप्रमाणेंच ऋकारला गुण होऊन अकार झाला आहे.

१ (सू. १२२) तॄ, फल्, भज्, आणि त्रप् या धातूंच्या अकाराला कित् लिट् व इट् आगम झालेला थल् पुढें असतांना एत्व होतें आणि अभ्यासाचा लोप होतो.

१ (सू. १२३) हिंसा या अर्थाच्या राध् धातूमधील अवर्णाला कित् लिट् आणि इट् आगम झालेला थल् पुढें असतांना एत्व होतें आणि अभ्यासाचा लोप होतो.

२. कारण, राध् धातूमध्यें ऱ्हस्व अकार नसल्यामुळें अतः ( ६।४।१२० ) याची अनुवृत्ति येथेंच बंद आहे.

अस्तु । अलोऽन्त्यस्य विधयो भवन्तीत्यकारस्य भविष्यति । अनर्थकेऽलोऽन्त्यविधिर्नेत्येवं न प्राप्नोति । नैतस्याः परिभाषायाः सन्ति प्रयोजनानि । अथवात इति वर्तते । एवमपि राधेर्न प्राप्नोति । आकारग्रहणमपि प्रकृतमनुवर्तते । क प्रकृतम् । आभ्यस्तयोरातः [ ६. ४. ११२ ] इति । अथवा श्नसोरल्लोपः [ १११ ] इत्यत्र तपरकरणं प्रत्याख्यायते तत्प्रकृतमिहानुवर्तिष्यते । यदि तदनुवर्तते ऽत एकहल्मध्येऽनादेशादेर्लिटि [ १२० ] अस्य चेत्यवर्णमात्रस्यैत्त्वं प्राप्नोति । बबाधे । अकारेण तपरेणावर्णं विशेषयिष्यामः । अस्यात इति । इहेदानीमस्येत्यनुवर्तते ऽत इति निवृत्तम् ॥

[ वा जॄभ्रमुत्रसाम् ॥ ६ । ४ । १२४ ॥

फणां च सप्तानाम् ॥ ६ । ४ । १२५ ॥

न शसददवादिगुणानाम् ॥ ६ । ४ । १२६ ॥ ]

---

'र' शब्दाला एत्व प्राप्त होवो; हरकत नाहीं. 'अलोऽन्त्यस्य' ( १।१।५२ ) या परिभाषेनें र शब्दातील अन्त्य अकारालाच एत्व होईल.

अनर्थकाविषयीं अलोन्त्यविधि करावयाचा नाहीं असें 'नानर्थकेऽलोन्त्यविधिः०' ही परिभाषा सांगत असल्यामुळें 'र' शब्दातील अंत्य अकाराला एत्व प्राप्त होऊं शकत नाहीं.

'नानर्थकेऽलोन्त्यविधिः०' या परिभाषेच्या उदाहरणाची अन्यथा[3]सिद्धि होत असल्यामुळें ती परिभाषा नकोशीच आहे.

किंवा 'अतः' याची अनुवृत्ति आहे.

तरीही[4] राध् धातूच्या आकाराला एत्व प्राप्त होऊं शकत नाहीं.

प्रकृत आकारग्रहणही अनुवृत्त होत आहे. तें आकारग्रहण मागे कोठें बरें आहे.

'आभ्यस्तयोरातः' ( ६।४।११२ ) येथें.

'अथवा 'श्नसोरल्लोपः' ( ६।४।१११ ) येथें अत् हें तपरकरण नको असें तेथें सांगितलेंच आहे. तेव्हां तेथें तकार काढला म्हणजे नुसत्या अवर्णाची अनुवृत्ति येथें होईल.

पण जर तशी अनुवृत्ति पुढें होत असेल तर 'अत एक०' ( ६।४।१२० ) येथेही त्याचा संबंध होईल.आणि अवर्णमात्राला 'अत एक०' याने एत्वाचें विधान होऊन 'बबाधे' येथें दोष येईल.

'अत एक०' येथें अवर्णाची अनुवृत्ति झाली तरी त्या अवर्णाला सूत्रांतील अतः हें विशेषण करतां येईल. तेव्हां ऱ्हस्व असा जो अवर्ण त्याला, असा अर्थ झाल्यामुळें बबाधे येथें दोष येणार नाहीं. आता प्रकृत सूत्रामध्यें मात्र फक्त अवर्णाचीच अनुवृत्ति करावी; अतः याची करूं नये.

---

३. अलोऽन्त्यात्० ( १।१।६५ ) येथें भाष्यकारांनीं ही अन्यथासिद्धि दाखविली आहे.

४. अतः या पदाच्या अनुवृत्तीनें पुढील सूत्रामध्ये स्थानी कळेल, पण येथे कळणार नाहीं. कारण, राध् धातूमध्यें ऱ्हस्व अकार नाहीं.

( सू. १२४ ) जॄ भ्रम् व त्रस् या धातूंना कित् लिट् किंवा इट् आगम झालेला थल् पुढें असतांना एत्व व अभ्यासलोप विकल्पानें होतात.

( सू. १२५ ) फण, राज् वगैरे सात धातूंना कित् लिट् किंवा इट् आगम झालेला थल् पुढें असतांना एत्व व अभ्यासलोप विकल्पानें होतात.

( सू. १२६ ) शस् धातु, दद् धातु आणि वकारादि धातू यांचा किंवा गुण शब्दानें झालेल्या आदेशाचा संबंधी असलेला असा जो अकार त्याला एत्व व अभ्यासलोप होत नाहींत.

**अर्वणस्त्रसावनञः ॥ ६ । ४ । १२७ ॥**[1]

**मघवा बहुलम् ॥ ६।४।१२८ ॥**[1]

**अर्वणस्तृ मघोनश्च**

**न शिष्यं छान्दसं हि तत् ।**

अर्वणस्तृ मघोनश्च न शिष्यम् । किं कारणम् । छान्दसं हि तत् । दृष्टानुविधिश्छन्दसि भवति ॥

**मतुब्वन्योर्विधानाच्च**

मतुब्वनी खल्वपि च्छन्दसि विधीयेते ॥

**छन्दस्युभयदर्शनात् ॥**

उभयं खल्वपि च्छन्दसि दृश्यते । इमान्यर्वणः पदानि । अनर्वाणं वृषभं मन्द्रजिह्वम् ॥

इति श्रीभगवत्पतञ्जलिविरचिते व्याकरणमहाभाष्ये षष्ठस्याध्यायस्य चतुर्थे पादे तृतीयमाह्निकम् ॥

---

( सू. १२८ श्लो. वा. १ ) अर्वन् आणि मघवन् या शब्दांना तृ आदेशाचें विधान करावयास नको.

काय कारण ?

कारण असें कीं, अर्वन् आणि मघवन् ह्या दोन्ही शब्दांचा फक्त वेदामध्येंच प्रयोग होत आहे. आणि वेदामध्यें तर जसा प्रयोग असेल तसाच तो बरोबर आहे असें म्हणावें लागतें.

शिवाय, लोकाप्रमाणें वेदामध्यें मतुप् प्रत्यय होत आहेच. आणि 'छन्दसीवनिपौ च' ( ५।२।१०९ वा. २ ) या वार्तिकानें वनिप् प्रत्ययही सांगितला आहे[2].

शिवाय, वेदामध्यें 'अर्वणः पदानि' व 'अनर्वाणं वृषभं मन्द्रजिह्वम्' असे दोन्ही प्रकारचे प्रयोग दृष्टीस पडत आहेत.

याप्रमाणें श्रीभगवान् पतंजलि ऋषींनीं रचिलेल्या व्याकरणमहाभाष्याच्या सहाव्या अध्यायाच्या चौथ्या पादातील तिसरें आह्निक समाप्त झालें.

---

१. ( सू. १२७ ) नञानें रहित असें जें अर्वन्-शब्दान्त अंग त्याला तृ असा आदेश होतो; फक्त प्रथमैकवचन सु प्रत्यय पुढें असतांना मात्र तो होत नाहीं.

१ ( सू. १२८ ) तसाच मघवन् शब्दालाही बाहुल्येकरून तृ असा अन्तादेश होतो.

२. ऋ धातूहून 'अन्येभ्योऽपि दृश्यते' ( ३।२।७५ ) यानें विच् प्रत्यय करून गुण केला असतां अर् असा शब्द तयार होतो. त्याहून मतुप् प्रत्यय ( ५।२।९४ ) आणि 'छन्दसीरः' ( ८।२।१५ ) यानें वकार आदेश हे केले असतां अर्वत् शब्द तयार होतो. आणि 'छन्दसीवनिपौ' या वार्तिकानें अर् शब्दाहून वनिप् प्रत्यय केला असतां अर्वन् शब्द साधतो. म्हणून 'अर्वणस्तृ०' हें सूत्र करावयास नको. वेदामध्यें जसा प्रयोग असेल त्याप्रमाणें त्यातील शब्द अर्वत् आहे किंवा अर्वन् आहे ती कल्पना करावी. तसेंच 'श्वन्नुक्षन्०' ( उणा. १।१।५७ ) या उणादि सूत्रानें मघवन् शब्दाचें निपातन केलें आहे. आणि मघ शब्दाहून मतुप् प्रत्यय केला म्हणजे मघवत् असा शब्द साधतो. तेव्हां 'मघवा बहुलम्' हेंही सूत्र करावयास नको.

अ. ६ पा. ४ आ. ३ समाप्त.

[ भस्य ॥ ६ । ४ । १२९ ॥ ]

पादः पत् ॥ ६ । ४ । १३० ॥

पाद उपधाह्रस्वत्वम् ॥ १ ॥

पाद उपधाह्रस्वत्वं वक्तव्यम् । द्विपदः पश्य ॥

आदेशे हि सर्वादेशप्रसङ्गः ॥ २ ॥

आदेशे हि सति सर्वादेशः प्रसज्येत । सर्वस्य द्विपाच्छब्दस्य त्रिपाच्छब्दस्य च पच्छब्द आदेशः प्रसज्येत येन विधिस्तदन्तस्य [ १. १. ७२ ] इति ॥ तत्तर्हि वक्तव्यम् ।

न वा निर्दिश्यमानस्यादेशत्वात् ॥ ३ ॥

न वा वक्तव्यम् । किं कारणम् । निर्दिश्यमानस्यादेशा भवन्तीत्येषा परिभाषा कर्तव्या ॥ कः पुनरत्र विशेष एषा वा परिभाषा क्रियेतोपधाह्रस्वत्वं वोच्येत । अवश्यमेषा परिभाषा कर्तव्या । बहून्येतस्याः परिभाषायाः प्रयोजनानि । कानि ।

प्रयोजनं सुप्तिङादेशे ॥ ४ ॥

सुप् कुमार्याम् । किशोर्याम् । खट्वायाम् मालायाम् । तस्याम् यस्याम् । आड्याट्स्याट्सु कृतेषु साड्याट्स्याट्स्याम्प्राप्नोति । निर्दिश्यमानस्यादेशा भवन्तीति न दोषो

(सू. १३० वा. १) पाद् या शब्दाच्या उपधेला ह्रस्व होतो असें सूत्र करावें. उदाहरणार्थ— द्विपदः पश्य.

( वा. २ ) पद् आदेशाचें विधान केलें तर द्विपात्, त्रिपाद्, वगैरे ठिकाणी सर्वांचे स्थानीं पद् आदेश होऊ लागेल. कारण, 'येन विधिस्तदन्तस्य' (१।१।७२) यानें तदन्तविधि होऊन पाद्-शब्दान्त जें अङ्ग त्याला पद् आदेश होतो असा अर्थ होत आहे.

तर मग तें तसें वचन केलें पाहिजे.

( वा. ३ ) तसें वचन करावयास नको.

काय कारण ?

कारण असे कीं— 'सूत्रोच्चारिताला आदेश होतात' अशा अर्थाची 'निर्दिश्यमानस्याऽऽदेशा भवन्ति' ही परिभाषा केलीच आहे.

ही परिभाषा केली काय आणि पाद् शब्दाच्या उपधेला ह्रस्वाचे विधान केलें काय यांत काय बरें फरक आहे ?

ही परिभाषा अवश्य केलीच पाहिजे. कारण ह्या परिभाषेचीं पुष्कळच प्रयोजनें आहेत.

ती प्रयोजनें कोणतीं ?

( वा. ४ ) सुप् व तिङ् यांचे स्थानीं सांगितलेले जे आदेश तेथें या परिभाषेचा उपयोग आहे. उदाहरणार्थ— कुमार्याम्, किशोर्याम्; खट्वायाम्, मालायाम्; तस्याम्, यस्याम्. येथें सप्तमी एकवचन ङि प्रत्ययाला क्रमानें आट्, याट् व स्याट् हे आगम केले असतां त्या आगमासहित ङि या प्रत्ययाला 'ङेराम्०' (७।३।११६) यानें आम् आदेश प्राप्त होतो; आणि 'निर्दिश्यमानस्य०' ही परिभाषा केली असता हा दोष

१. ( सू. १२९ ) भस्य हा अधिकार पाद संपेपर्यंत चालू राहतो येथून पुढें प्रत्येक सूत्रांत 'भस्य' असें षष्ठ्यन्त पद उपस्थित होतें.

१. ( सू. १३० ) पाद्-शब्दान्त जें भसंज्ञक अङ्ग त्यांतील पाद् शब्दाचे स्थानीं पद् असा आदेश होतो.

२. दोन पाद ज्याला आहेत तो द्विपात. येथें षष्ठीबहुव्रीहि होऊन अकाराचा लोप (५।४।१३८) समासान्त झाला आहे. या द्विपाद् शब्दाचें द्वितीया बहुवचन द्विपदः असें होते.

३. कारण, पाद्-शब्दान्त अङ्गाला सांगितलेला पद् आदेश अनेकाल् असल्यामुळें द्विपाद्, त्रिपाद् इत्यादि सर्व अंगाला प्राप्त होतो.

भवति । इदमिह संप्रधार्यम् । आड्याट्स्याटः क्रियन्तामामिति किमत्र कर्तव्यम् । परत्वादाम् । नित्या आड्याट्स्याटः । कृतेऽप्यामि प्राप्नुवन्त्यकृतेऽपि । अनित्या आड्याट्स्याटः । अन्यस्य कृत आमि प्राप्नुवन्त्यन्यस्याकृते शब्दान्तरस्य च प्राप्नुवन्तोऽनित्या भवन्ति । उभयोरनित्ययोः परत्वादाम् ॥ इदं तर्हि । तस्यै यस्यै । स्याटि कृते सस्याट्कस्य स्मैभावः प्राप्नोति । निर्दिश्यमानस्यादेशा भवन्तीति न दोषो भवति । यस्तर्हि निर्दिश्यते तस्य कस्मान्न भवति । स्याटा व्यवहितत्वात् । सुप् ॥ तिङ् । अरुदिताम् अरुदितम् अरुदितेति । इटि कृते सेट्कस्य ताम्तम्तामादेशाः प्राप्नुवन्ति । निर्दिश्यमानस्यादेशा भवन्तीति न दोषो

येत नाहीं.

येथे असा विचार करावा कीं- ङि प्रत्ययाला अगोदर आट्, याट् आणि स्याट् हे आगम करावे किंवा आम् आदेश अगोदर करावा ?

मग यात काय बरें अगोदर करावें ?

आट् वगैरे आगमापेक्षा पर असल्यामुळें अगोदर आम् आदेश करावा.

पण आट् याट् आणि स्याट् हे नित्य आहेत ना ? कारण, आम् आदेश केला अथवा न केला तरीही ते प्राप्त होत आहेत.

आट्, याट् व स्याट् हे आगम अनित्य आहेत. कारण, आम् आदेश केला असतां आट् वगैरे आगम हे एकाला म्हणजे आम् याला प्राप्त होतात; व आम् आदेश करण्याच्या पूर्वी एकाला म्हणजे ङि याला प्राप्त होतात. अशा रीतीनें निरनिराळया शब्दाला प्राप्त होणारा विधि तर अनित्य समजला जातो. तेव्हां दोघानाही अनित्यत्व असल्यामुळें परत्वास्तव प्रथमतःच आम् आदेश होईल.

तर मग तस्यै यस्यै येथें चतुर्थी एकवचन ङे प्रत्ययाला स्याट् आगम केला असतां त्या आगमासहित ङे प्रत्ययाला 'सर्वनाम्नः स्मै' (७।१।१४) यानें स्मै आदेश प्राप्त होतो आणि ही 'निर्दिश्यमान' परिभाषा घेतली असतां हा दोष येत नाहीं हें प्रयोजन समजावें.

पण येथें निर्दिश्यमान जो ङे प्रत्यय म्हणजे स्याट् आगमाच्या पुढील एकार त्याला कां बरें स्मै आदेश होत नाहीं ?

स्याट् आगमानें व्यवधान असल्यामुळें सर्वनाम संज्ञकाहून अव्यवहित पर तो नाहीं म्हणून त्याला स्मै आदेश होत नाहीं.

तिङादेशाचें उदाहरण– अरुदिताम् अरुदितम् अरुदित. येथें इट् आगम (७।२।७६) केला असतां इट् आगमासहित अशा तस्, थस्, थ आणि मिप् याना क्रमानें ताम्, तम्, त व अम् हे आदेश (३।४।१०१) प्राप्त होत आहेत. आणि ही परिभाषा घेतली म्हणजे हा दोष येत नाहीं.[६]

४. तात्पर्य, 'येथें निर्दिश्यमानस्य०' या परिभाषेचा कांही उपयोग नाही.

५. 'निर्दिश्यमान' परिभाषा लक्ष्यव्यवस्थापक नव्हे, तर वाक्यार्थव्यवस्थापक होय असें गृहीत धरलेंच पाहिजे. तेव्हां सर्वनामसंज्ञकान्त अङ्गाहून पर असलेल्या आणि निर्दिश्यमान अशा ङे प्रत्ययाचे स्थानीं स्मै आदेश होतो असा 'सर्वनाम्नः स्मै' (७।१।१४) याचा वाक्यार्थ होतो. तेव्हां निर्दिश्यमान ङे प्रत्यय स्याट् आगमानें व्यवहित असल्यामुळें स्मै आदेश होत नाहीं.

६. धातोः (३।१।९१) हा अधिकार 'लस्य' (३।४।७७) या सूत्रापर्यंतच आहे असें गृहीत धरलें असतां लादेशामध्यें अमक्याहून पर असें अवधीचें उपादान नसल्यामुळें व्यवधानाचा प्रश्नच उपस्थित होत

भवति । इदमिह संप्रधार्यम् । इट्क्रियतां तास्तम्ताम इति किमत्र कर्तव्यम् । परत्वादिडागमः । अन्तरङ्गास्ताम्तम्तामः ॥ इदं तर्हि । क्रियास्ताम् क्रियास्तम् क्रियास्त । यासुटि कृते सयासुट्कस्य ताम्तम्तामः प्राप्नुवन्ति । निर्दिश्यमानस्यादेशा भवन्तीति न दोषो भवति ॥

**ल्यब्भावे च ॥ ५ ॥**

ल्यब्भावे च प्रयोजनम् । प्रकृत्य प्रहृत्य । क्त्वान्तस्य ल्यप्प्राप्नोति । निर्दिश्यमानस्यादेशा भवन्तीति न दोषो भवति ॥

**त्रिचतुर्युष्मदस्मत्त्यदादिविकारेषु च ॥ ६ ॥**

त्रिचतुर्युष्मदस्मत्त्यदादिविकारेषु च प्रयोजनम् । अतितिस्रः अतिचतस्रः । त्रिचतुरन्तस्य तिसृचतसृभावः प्राप्नोति । निर्दिश्यमानस्यादेशा भवन्तीति न दोषो भवति ॥ युष्मद् अस्मद् । अतियूयम् अतिवयम् । युष्मदस्मदन्तस्य यूयवयौ प्राप्नुतः । निर्दिश्यमानस्यादेशा भवन्तीति

---

पण येथें असा विचार उत्पन्न होतो कीं— येथे तस् वगैरे प्रत्ययांना अगोदर इट् आगम करावा किंवा अगोदर ताम् वगैरे आदेश करावे ?

मग यांत काय बरें प्रथमतः करावें ?

पर असल्यामुळे इट् आगम पूर्वी करावा ?

पण ताम् , तम् त आणि अम् हे आदेश अन्तरङ्ग आहेत.

तर मग क्रियास्ताम् क्रियास्तम् क्रियास्त क्रियासम् येथें यासुट् आगम केला असतां त्या आगमासहित अशा तस् वगैरेंना ताम् वगैरे आदेश प्राप्त होत आहेत. पण, ही परिभाषा स्वीकारली तर हा दोष येत नाहीं. तेव्हां हें निर्दिश्यमान परिभाषेचें प्रयोजन समजावें.

( वा. ५ ) ल्यप् आदेशाविषयींही निर्दिश्यमान परिभाषेचा उपयोग आहे. उदाहरणार्थ— प्रकृत्य, प्रहृत्य. येथें तदन्तविधीमुळें कृत्वा अथवा हृत्वा या क्त्वा-प्रत्ययान्त समुदायाचे स्थानीं ल्यप् आदेश (७।१।३७) प्राप्त होत आहे. आणि निर्दिश्यमान परिभाषा घेतली म्हणजे फक्त क्त्वा प्रत्ययालाच ल्यप् आदेश होतो म्हणून हा दोष येत नाहीं.

( वा. ६ ) त्रि, चतुर्, युष्मत्, अस्मत् आणि त्यदादि शब्द यांच्या आदेशांविषयीं निर्दिश्यमान परिभाषेचा उपयोग आहे. उदाहरणार्थ— अतितिस्रः, अतिचतस्रः. येथें तदन्तविधीमुळें त्रिशब्दान्त व चतुर्-शब्दान्त अंगाचे स्थानीं तिसृ व चतसृ आदेश प्राप्त होत आहेत; पण निर्दिश्यमानाला आदेश होतात ही परिभाषा स्वीकारली म्हणजे हा दोष येत नाहीं.

अतियूयम् अतिवयम् येथें युष्मदस्मच्छब्दान्त अंगाला यूय व वय हे आदेश प्राप्त होत आहेत, पण निर्दिश्यमान परिभाषा स्वीकारली

---

नाहीं. तेव्हां या परिभाषेनें इट् आगमापुढील केवळ तस् वगैरे प्रत्ययांना ताम् वगैरे आदेश होतात म्हणून दोष येत नाहीं.

७. 'लस्य' या सूत्रापर्यंतच 'धातोः' हा अधिकार आहे; पुढें नाहीं. तेव्हां अर्थातच ताम् वगैरे आदेशांना मागें असलेल्या धातूची जरूर नाहीं. म्हणून ते आदेश अंतरंग आहेत. इट् आगमाला मात्र मागील अंगाची जरूर आहे. कारण, तो अंगस्य या अधिकारामध्यें सांगितला आहे. तेव्हां तो बहिरंग आहे. एकंदरीत पूर्वीच आदेश होत असल्यामुळें येथे निर्दिश्यमान परिभाषेचा कांहीं उपयोग नाहीं.

८. तेव्हां तदन्तविधीनें (१।१।७२) सूत्रोच्चारित शब्द शेवटीं असलेल्या समुदायाला जरी आदेश प्राप्त झाला, तसेंच आगम झाला असेल तेथें आगमासहित सूत्रोच्चारिताला आदेश प्राप्त झाला तरी तो त्या समुदायाला होत नाहीं.

न दोषो भवति ॥ त्यदादिविकार । अतिस्यः उत्तमस्यः । अत्यसौ उत्तमासौ । त्यदाद्यन्तस्य त्यदादिविकाराः प्राप्नुवन्ति । किमन्तस्य कादेशः प्राप्नोति । अतिकः परमकः । निर्दिश्यमानस्यादेशा भवन्तीति न दोषो भवति ॥

उदः पूर्वत्वे ॥ ७ ॥

उदः पूर्वत्वे प्रयोजनम् । उदस्थाताम् । अटि कृते साट्कस्य पूर्वसवर्णः प्राप्नोत्युदः स्थास्तम्भोरिति । निर्दिश्यमानस्यादेशा भवन्तीति न दोषो भवति । यस्तर्हि निर्दिश्यते तस्य कस्मान्न भवति । अटा व्यवहितत्वात् ॥

सा तर्ह्येषा परिभाषा कर्तव्या । न कर्तव्या । उक्तं षष्ठी स्थानेयोगा [ १. १. ४९ ] इत्येतस्य योगस्य वचने प्रयोजनं षष्ठ्यन्तं स्थानेन यथा युज्येत यतः षष्ठ्युच्चारितेति ॥

**[ वसोः संप्रसारणम् ॥ ६ । ४ । १३१ ]**

**वाह ऊठ् ॥ ६ । ४ । १३२ ॥**

ऊडादिः कस्मान्न भवति । आदिष्टि·

---

असतां हा दोष येत नाहीं.

त्यदादिविकार—अतिस्यः[१] व उत्तमस्यः तसेंच अत्यसौ व उत्तमासौ येथें त्यद् वगैरे शब्द शेवटीं असलेल्या अंगांतील तकाराला आणि दकाराला सांगितलेलें सत्व (७।२।१०६) अति या शब्दाच्या तकारालाही प्राप्त होत आहे. पण निर्दिश्यमानाला आदेश होतात असें स्वीकारलें तर हा दोष येत नाहीं. तसेंच , अतिकः परमकः येथें किम्—शब्दान्त अङ्गाला क आदेश ( ७।२।१०३ ) प्राप्त होत आहे; पण निर्दिश्यमान परिभाषा स्वीकारली असतां हा दोष येत नाहीं.

( वा. ७ ) उदः स्थास्तम्भोः० ( ८।४।६१ ) यानें सागितलेल्या पूर्वसवर्णाविषयीं निर्दिश्यमान परिभाषेचा उपयोग होत आहे. उदाहरणार्थ—उदस्थात् उदस्थाताम् येथें अट् आगम केला असतां त्या अट् आगमानें युक्त अशा अस्था याला ' उदः स्था० ' या सूत्रानें पूर्वसवर्ण प्राप्त होत आहे; पण निर्दिश्यमानाला आदेश होतात या परिभाषेनें हा दोष येत नाहीं

तर मग, तेथें अट् आगमाच्या पुढील जो स्था हा सूत्रामध्यें उच्चारलेला भाग त्याला कां बरें पूर्वसवर्ण होत नाहीं ?

तो स्था हा भाग उद् याच्या पुढें नाहीं. कारण अट् आगमानें तेथें व्यवधान होत आहे. म्हणून पूर्वसवर्ण होत नाहीं.

तर मग ही निर्दिश्यमान परिभाषा करावयास पाहिजे.

करावयास नको. कारण ' षष्ठी स्थाने० ' ( १।१।४९ ) या सूत्राचा ' ज्या शब्दाहून सूत्रामध्यें षष्ठी उच्चारली आहे तेवढ्याच शब्दाचा स्थानी या नात्यानें आदेशाशीं संबंध होतो ' असा अर्थ पूर्वी त्या सूत्राची व्याख्या करतांना केलाच आहे.

( सू. १३२ ) हा ऊठ् आदेश आद्यावयव कां बरें होत नाहीं ? टकारेत्संज्ञक आद्यावयव होतो असें ' आद्यन्तौ० ' ( १।१।४६ ) यानें सांगि-

---

१. शोभनः स्यः अतिस्यः असा ' कुगति० ' ( २।२।१८ ) यानें उत्तरपदार्थप्रधान तत्पुरुष समास येथें केला आहे.

१. ( सू. १३१ ) वसु-प्रत्ययान्त भसंज्ञक अंगांतील वसु प्रत्ययाच्या वकाराला संप्रसारण होतें.

१ ( सू. १३२ ) वाह्-शब्दान्त भसंज्ञक अंगांतील वाह् याच्या वकाराला संप्रसारणसंज्ञक ऊठ् असा आदेश होतो.

ङ्खवतीत्यादिः प्राप्नोति । संप्रसारणमित्यनेन यणः स्थानं ह्रियते । यद्येवं

**वाह ऊठ्वचनानर्थक्यं संप्रसारणेन कृतत्वात् ॥ १ ॥**

वाह ऊठ्वचनमनर्थकम् । किं कारणम् । संप्रसारणेन कृतत्वात् । संप्रसारणेनैव सिद्धम् । का रूपसिद्धिः प्रष्ठौहः पश्य ।

**गुणः प्रत्ययलक्षणत्वात् ॥ २ ॥**

प्रत्ययलक्षणेन गुणो भविष्यति ॥

**एज्ग्रहणाद् वृद्धिः ॥ ३ ॥**

एज्ग्रहणाद् वृद्धिर्भवति ॥

एवं तर्हि सिद्धे सति यद्वाह ऊटं शास्ति तज्ज्ञापयत्याचार्यो भवत्येषा परिभाषासिद्धं बहिरङ्गलक्षणमन्तरङ्गलक्षण इति । किमेतस्य ज्ञापने प्रयोजनम् । पचावेदम् पचामेदम् । असिद्धत्वाद्बहिरङ्गलक्षणस्यान्तरङ्गलक्षणमैत्वं न भवतीति ॥

---

तलें असल्यामुळें आद्यावयव प्राप्त होत आहे.[२]

संप्रसारण हें विशेषण दिलें असल्यामुळे यणाचे स्थानींच ( १।१।४५ ) ऊट् आदेश केला जात आहे.

असें आहे तर——

( वा. १ ) वाह् याला ऊट् आदेशाचें जें येथे विधान केले आहे तें व्यर्थ होत आहे.

काय कारण ?

कारण असें कीं— वाह् शब्दाला संप्रसारणच फक्त येथे सांगितलें असता काम भागत आहे.

प्रष्ठौहः वगैरे रूपाची सिद्धि कशी बरें होते ?

( वा. २ ) प्रष्ठवाह्– अस् असें असतां वकाराला संप्रसारण केल्यानंतर प्रत्ययलक्षणाने 'ण्वि' प्रत्ययाला मानून लघूपधगुणाने ( ७।३।८६ ) ओकार होइल.

( वा. ३ ) नंतर 'वृद्धिरेचि' ( ६।१।८८ ) यानें एज्निमित्तक वृद्धि झाल्यामुळें प्रष्ठौहः इत्यादि उदाहरणाची सिद्धि होइल.

तर मग अशा रीतीने साधत असतां ज्याअर्थी आचार्य हे वाह् शब्दाला ऊठ् आदेशाचें विधान करीत आहेत त्याअर्थी 'असिद्धं बहिरङ्गमन्तरङ्गे' म्हणजे अन्तरंग कर्तव्य असताना बहिरंग असिद्ध होतें असें ते सुचवीतें आहेत.

असें सुचविण्याचें काय प्रयोजन ?

पचावेदम्, पचामेदम् इत्यादि ठिकाणीं बहिरंग आद्गुण असिद्ध असल्यामुळें अंतरंग 'एत ऐ' ( ३।४।९३ ) हें ऐत्व होत नाहीं.

---

२ 'छ्वोः शूडनु०' ( ६।४।१९ ) येथें ऊठ् हा ठकारेत्संज्ञक आहे असें सांगितलें आहे. तथापि तेथील ऊट् आदेश टकारेत्संज्ञक मानिला असतांही दोष नाहीं हें दाखविण्याकरितां हा विचार केला आहे.

३. प्रष्ठ-उपपदपूर्वक वह् धातूहून 'वहश्च' ( ३।२।६४ ) या सूत्रानें ण्वि प्रत्यय, उपधावृद्धि, उपपद समास, पुढें द्वितीया बहुवचन शस् प्रत्यय, संप्रसारण ऊठ् आदेश, पूर्वरूप ( ६।१।१०८ ) व 'एत्येधत्यूठसु' ( ६।१।८९ ) यानें वृद्धि हीं कार्यें होऊन प्रष्ठौहः असें रूप होतें. आतां येथें केवळ संप्रसारणाचेंच विधान केलें तर वृद्धि होणार नाहीं.

४. अंतरंग परिभाषा घेतल्यानंतर मात्र ऊठग्रहण करावेंच लागतें. कारण ण्वि प्रत्ययाला मानून प्राप्त होणारा लघूपध गुण अंतरंग आहे. आणि त्या ण्वि प्रत्ययाच्या पुढाल शस् प्रत्ययाला मानून झालेलें संप्रसारण बहिरंग आहे. तेव्हां या परिभाषेनें गुणाच्या दृष्टीनें संप्रसारण असिद्ध होत असल्यामुळें गुण होणार नाहीं.

५. पचाव इदम् येथें इदम् या पुढील दुसऱ्या पदांतील इकाराच्या निमित्तानें झालेला गुण ( ६।१।८७ ) बहिरंग आहे आणि ऐत्वाला दुसऱ्या पदांतील कांहींच निमित्त नसल्यामुळें तें अंतरंग आहे. तेव्हां त्या ऐत्वाच्या दृष्टीनें पूर्वी झालेला गुण असिद्ध असल्यामुळें ऐत्व होत नाहीं.

**श्वयुवमघोनामतद्धिते ॥ ६ । ४ । १३३ ॥**

**श्वादीनां प्रसारणे नकारान्तग्रहण-मनकारान्तप्रतिषेधार्थम् ॥ १ ॥**

श्वादीनां संप्रसारणे नकारान्तग्रहणं कर्तव्यम् । किं प्रयोजनम् । अनकारान्तप्रतिषेधार्थम् । अनकारान्तस्य मा भूत् । मघवता मघवते ॥ तथा प्रातिपदिकग्रहणे लिङ्गविशिष्टस्यापि ग्रहणं भवतीति यथेह भवति यूनः पश्येत्येवं युवतीः पश्येत्यत्रापि स्यादिति ॥ यत्तावदुच्यते नकारान्तग्रहणं कर्तव्यमिति न कर्तव्यम् ।

**उक्तं वा ॥ २ ॥**

किमुक्तम् । अर्वणस्तृ मघोनश्च न शिष्यं छान्दसं हि तदिति ॥ यदप्युच्यते तथा प्रातिपदिकग्रहणे लिङ्गविशिष्टस्यापि ग्रहणं भवतीति यथेह भवति यूनः पश्येत्येवं युवतीः पश्येत्यत्रापि स्यादिति लिङ्गविशिष्टग्रहणे चोक्तम् । किमुक्तम् । न वा विभक्तौ लिङ्गविशिष्टाग्रहणादिति ॥ अथवोपरिष्टा-

---

(सू. १३३ वा. १) श्वन्, युवन् आणि मघवन् यांना जें हें संप्रसारण सांगितलें आहे त्याविषयीं नकारान्तग्रहण करावें.

काय प्रयोजन ?

नकारान्त नव्हेत अशा शब्दांना संप्रसारण न झालें पाहिजे. उदाहरणार्थ — मघवता, मघवते.[२]

तसेंच ‘प्रातिपदिकाचें ग्रहण केलें असतां तेथें त्या प्रातिपदिकानें लिङ्गप्रत्ययविशिष्टाचेंही ग्रहण होतें असें सांगितलें असल्यामुळें यूनः पश्य याप्रमाणें युवतीः[३] पश्य येथेंही संप्रसारण प्राप्त होतें तेंही न झालें पाहिजे.

आता नकारान्तग्रहण करावें असें जें म्हटलें आहे तें करावयास नको.

(वा. २) ह्याविषयीं सांगितलेंच आहे.

तें काय सांगितलें आहे ?

अर्वन् व मघवन् यांना तृ आदेशाचें विधान करावयास नको कारण त्या दोन्ही शब्दांचा प्रयोग फक्त वेदामध्येंच होतो असें पूर्वीं (६।४।१२८ भा. वा) सांगितलेंच आहे[४].

आणखीही जें ‘प्रातिपदिकाचें ग्रहण केलें असता तेथें लिंगप्रत्ययविशिष्टाचेंही ग्रहण होतें असें सांगितलें असल्यामुळें यूनः पश्य याप्रमाणें युवतीः पश्य येथेंही संप्रसारण होईल असें म्हटलें आहे त्यावर उत्तर— लिंगप्रत्ययविशिष्टाचे ग्रहणाविषयींही दोष येत नाहीं; कारण विभक्तिनिमित्तक कार्याविषयीं लिंगप्रत्ययविशिष्टाचें ग्रहण होत नाहीं (७।१।१ वा. १३) असें सांगितलें आहे.

किंवा पुढें योगविभाग करण्यांत येईल. तो

---

१. (सू. १३३) श्वन्, युवन् आणि मघवन् या शब्दांतील वकाराला तद्धितभिन्न प्रत्यय पुढें असतां संप्रसारण होतें.

२. मघवन् शब्दाहून तृतीयैकवचन टा प्रत्यय तसाच चतुर्थी एकवचन ङे प्रत्यय केला असतां नकाराला तकार (६।४।१२८) झाल्यानंतर मघवत् असा नकारान्त शब्द नसल्यामुळें संप्रसारण होत नाहीं.

३. युवन् शब्दाहून स्त्रीत्वद्योतक ‘यूनस्तिः’ यानें (४।१।७७) ति प्रत्यय केला आहे व त्याहून पुढें शस् प्रत्यय केला आहे. लिंगविशिष्टपरिभाषेमुळें सूत्रांतील युवन् शब्दानें युवति शब्दाचें ग्रहण होतें म्हणून येथेंही संप्रसारण होऊं लागेल; पण नकारान्त असें म्हटल्यामुळें होत नाहीं.

४. आणि मघवन् शब्दाच्या नकाराला तकार न होतां मघवत् असा तकारान्त शब्द निराळाच घेतला आहे.

गविभागः करिष्यते । श्वयुवमघोनामत-
.ते । ततोऽल्लोपः । अकारस्य च लोपो
भति । ततोऽनः । अन इत्युभयोः शेषः ॥

## [ अल्लोपोऽनः ॥ ६।४।१३४ ॥ ]

## षपूर्वहन्धृतराज्ञामणि ॥ ६ । ४ । १३५ ॥

किमिदं षपूर्वादीनां पुनर्वचनमल्लोपार्थ-
।होस्विन्नियमार्थम् । कथं चाल्लोपार्थं
यात्कथं वा नियमार्थम् । यद्यविशेषेणा-
ोपटिलोपयोः स प्रकृतिभावस्ततोऽल्लोपा-
र्थम् । अथ ह्यणि टिलोपस्यैव प्रकृतिभाव-
स्ततो नियमार्थम् ॥ अत उत्तरं पठति ।

**षपूर्वादीनां पुनर्वचनमल्लोपार्थम् ॥ १ ॥**

षपूर्वादीनां पुनर्वचनं क्रियतेऽल्लोपा-
र्थम् । अविशेषेणाल्लोपटिलोपयोः प्रकृति-
भावः ॥

**अवधारणे ह्यन्यत्र प्रकृतिभाव उप-
धालोपप्रसङ्गः ॥ २ ॥**

अवधारणे हि सत्यन्यत्र प्रकृतिभाव
उपधालोपः प्रसज्येत । कथम् । यदि ताव-

---

१सा– 'श्वयुव०' या प्रकृत सूत्राच्या पुढें 'अल्लोपः' एवढेंच सूत्र करावें. अकाराचा ोप होतो असा त्याचा अर्थ होईल. त्याचे पुढें 'अनः' असें निराळें सूत्र करावें, आणि तें 'श्वयुव०' व 'अल्लोपः' या दोन्ही सूत्रांचा शेष होईल.

( सू. १३५ ) आतां षपूर्व, हन् आणि धृतराजन् यांचें पुनः येथें जें ग्रहण केलें आहे तें अल्लोपविधानाकरितां केलें आहे अथवा नियमाकरितां केलें आहे ?

तें अल्लोपविधानाकरितां कसें आणि नियमाकरितां कसें ?

'अन्' ( ६।४।१६७ ) इत्यादि सूत्रांनीं सांगितलेला प्रकृतिभाव हा अमक्याच लोपाचा बाधक असा विशेष विचार न करतां मोघम लोपाचा बाधक घेतला तर 'षपूर्व' हें विधानाकरितां होतें; आणि हा प्रकृतिभाव जवळच्या टिलोपाचाच बाध करतो असें घेतलें तर नियमाकरितां हें सूत्र होत आहे. हा विचार मनांत आणून वार्तिककार लिहितात–

( वा. १ ) षपूर्व वगैरेंचें जें येथें पुनः वचन केलें आहे तें अल्लोपविधानाकरितां कलें आहे. कारण, 'अन्' इत्यादि सूत्रांनीं सांगितलेला प्रकृतिभाव हा विशेष मनांत न घेतां अल्लोप व टिलोप या उभयतांचाही बाधक आहे.

( वा. २ ) प्रकृतिभाव हा टिलोपाचाच बाधक आहे असें गृहीत धरून प्रकृतसूत्र नियमार्थ घेतलें तर उपधालोपावांचून इतराचा म्हणजे टिलोपाचा प्रकृतिभावानें बाध होईल, पण उपधालोपमात्र जेथें नको तेथेंही होऊं लागेल.

---

५. तेव्हां त्या दोन्ही सूत्रांनीं जें कार्य सांगितलें आहे तें अन्नन्त अंग असेल तरच करावें असा त्याचा अर्थ होतो.

१. ( सू. १३४ ) सुप्रत्ययापासून ( ४।१।२) क प्रत्ययापर्यंत ( ५।४।१५१ ) सांगितलेल्या प्रत्ययांपैकीं जे यकारादि किंवा अजादि प्रत्यय ते पुढें असतांना ज्या मागील अंगाला 'भ' संज्ञा होते त्या भ संज्ञा झालेल्या अंगाच्या शेवटीं असलेला जो अन् त्यांतील अकाराचा लोप होतो.

१. ( सू. १३५ ) षकार पूर्वी असलेला जो अन् तसाच हन् व धृतराजन् त्यांतील अकार त्याचा अण् प्रत्यय पुढें असतांना लोप होतो. उदाहरणार्थ–औक्ष्णः औणघ्नः धार्तराज्ञः. येथें 'अल्लोपोऽनः' (६।४।१३४ यानें उपधालोप म्हणजे अकाराचा लोप प्राप्त झाला आहे. आणि 'नस्तद्धिते' (६।४।१४४) यानें टिलो म्हणजे अन् याचा लोप प्राप्त झाला आहे. तेथें अ (६।४।१६७) या प्रकृतिभावानें दोन्ही लोपांचा बा झाल्यानंतर प्रकृत सूत्रानें अकाराचा लोप झाला आहे

देवं नियमः स्यात्षपूर्वादीनामेवाणीति भवेदिह नियमान्न स्यात् सामनः वैमन इति ताक्षण्य इति प्राप्नोति। अथाप्येवं नियमः स्यात्षपूर्वादीनामण्येवेत्येवमपि भवेदिह नियमान्न स्यात् ताक्षण्य इति सामनः वैमन इति तु प्राप्नोति। अथाप्युभयतो नियमः स्यात्षपूर्वादीनामेवाण्यण्येव षपूर्वादीनामित्येवमपि सामन्यः वेमन्य इति प्राप्नोति। तस्मात्सुष्ठूच्यते षपूर्वादीनां पुनर्वचनमल्लोपार्थमवधारणे ह्यन्यत्र प्रकृतिभाव उपधालोपप्रसङ्ग इति॥

**[ विभाषा ङिश्योः[1] ॥ ६ । ४ । १३६ ॥**

**न संयोगाद्वमन्तात्[1] ॥ ६ । ४ । १३७ ॥**

**अचः[1] ॥ ६ । ४ । १३८ ॥**

**उद ईत्[1] ॥ ६ । ४ । १३९ ॥ ]**

---

तो कसा ?

जर 'षपूर्वहन्०' यानें अण् प्रत्यय पुढें असतांना 'अल्लोपोऽनः' यानें अल्लोप करणें झाल्यास षपूर्व अन् आणि हन् व धृतराजन् यांच्याच अकाराचा लोप करावा असा नियम केला तर सामनः व वैमनः येथें नियमामुळें लोप होणार नाहीं; पण ताक्षण्यः येथें अल्लोप होऊं लागेल.

आतां षपूर्वादिकाचा अल्लोप करणें झाल्यास अण् प्रत्यय पुढें असतांनाच करावा असा नियम केला तर ताक्षण्यः हें रूप साधेल; म्हणजे नियमामुळें तेथें लोप होणार नाहीं; पण सामनः व वैमनः येथें अल्लोप होऊं लागेल.

आतां जरी अण् पुढें असतांना षपूर्वादिकांचाच अल्लोप करावा' व 'षपूर्वादिकांचा अल्लोप अण् पुढें असतांनाच करावा' असा दोन्हीही[3] प्रकारचा नियम केला तरीही सामन्यः व वैमन्यः येथें अल्लोप होऊं लागेल हा दोष कायम राहतोच. तेव्हां 'षपूर्वादीनां पुनर्वचनमल्लोपार्थम्। अवधारणे ह्यन्यत्र प्रकृतिभाव उपधालोपप्रसङ्गः॥' असें जें वार्तिककारांनीं म्हटलें आहे तेंच बरोबर आहे.

---

२. सामन् शब्दाहून 'साऽस्य देवता' (४।२।२४) यानें अण् प्रत्यय झाला आहे. आणि वेमन् शब्दाहून 'तस्येदम्' (४।३।१२०) यानें अण् प्रत्यय झाला आहे. ताक्षण्यः येथें 'सेनान्त०' (४।१।१५२) यानें ण्यप्रत्यय झाला आहे. सामन्यः येथें 'तत्र साधुः' (४।४।९८) यानें यत् प्रत्यय झाला आहे. या सर्व ठिकाणीं अल्लोपही आला आहे आणि टिलोपही आला आहे. त्या दोन्हीं लोपाचा प्रकृतिभावानें (६।४।१६७, १६८) बाध होतो. जर प्रकृतिभावानें टिलोपाचाच बाध केला तर ह्या सर्व ठिकाणीं प्राप्त झालेल्या अल्लोपाची व्यावृत्ति प्रकृन सूत्र नियमार्थ करून साधली पाहिजे. परंतु कसाही नियम केला तरी सर्व ठिकाणीं अल्लोपाची व्यावृत्ति होत नाहीं.

३. लक्ष्यानुरोधानें 'षपूर्व०' या सूत्राची आवृत्ति करून पूर्वोक्त दोन्ही प्रकारचे नियम युगपत् स्वीकारले असतां सामनः व ताक्षण्यः ही दोन्ही रूपें साधतात. तरी सामन्यः येथें अल्लोप होऊं लागणारच. म्हणून प्रकृतिभाव हा अल्लोप व टिलोप या उभयतांचा बाधक आहे असें समजणें जरूर आहे.

१. (सू. १३६) भ संज्ञा झालेल्या अंगाच्या शेवटीं असलेला जो अन् त्याच्या अकाराचा ङि व शी हे प्रत्यय पुढें असतांना विकल्पानें लोप होतो.

१. (सू. १३७) वकार किंवा मकार शेवटी असलेला जो संयोग त्या संयोगाच्या पुढील अन् याच्या अकाराचा लोप होत नाहीं.

१. (सू. १३८) लुप्त आहे नकार ज्याचा असा जो भ-संज्ञक अञ्च् धातु त्याच्या अकाराचा लोप होतो.

१. (सू. १३९) लुप्त आहे नकार ज्याचा असा

**आतो धातोः ॥ ६ । ४ । १४० ॥**

**आतोऽनापः ॥ १ ॥**

आतोऽनाप इति वक्तव्यम् । इहापि यथा स्यात् । समासेऽनञ्पूर्वे क्त्वो ल्यप् [ ७. १ ३७ ] इति । अनाप इति किमर्थम् । खट्वायाम् मालायाम् ॥ यद्यनाप इत्युच्यते कथं क्त्वायाम् । निपातनादेतत्सिद्धम् । किं निपातनम् । क्त्वायां वा प्रतिषेध इति ॥ यद्येवं नार्थोऽनाप इत्यनेन । कथं समासेऽनञ्पूर्वे क्त्वो ल्यबिति ! निपातनादेतत्सिद्धम् । कथं हलः श्नः शानज्झौ [ ३ १. ८३ ] इति । एतदपि निपातनात्सिद्धम् ॥ अथवा योगविभागः करिष्यते । आतः । आकारलोपो भवति । ततो धातोः । धातोश्चाकारस्य लोपो भवतीति ॥

---

( सू. १४० वा. १ ) ' आतो धातोः ' याचे ऐवजीं ' आतोऽनापः ' असें सूत्र करावें. कारण ' समासेऽनञ्पूर्वे क्त्वो ल्यप् ' येथें क्त्वः या पदामध्यें क्त्वा प्रत्ययाच्या आकाराचा लोप झाला पाहिजे.

आतां येथें ' अनापः ' असा जो शब्द घातला आहे तो कशाकरितां ?

खट्वायाम् व मालायाम् येथें आकाराचा लोप होऊं नये याकरितां घातला आहे

जर ' अनापः ' असें म्हटलें तर क्त्वायाम् ह्या प्रयोगामध्यें लोप कां केला नाहीं ?

निपातनावरून क्त्वायाम् येथें आकाराचा लोप होत नाहीं.

तें निपातन कोणतें ?

' क्त्वायां वा प्रतिषेधः' ( ६।२।२ वा. ४ ) हें होय.

निपातनावरच जर भार द्यावयाचा आहे तर ' अनापः ' असें सांगण्यांत कांहीं फायदा नाहीं. धातोः असें आहे तेंच बरें आहे.

तर मग ' समासेऽनञ्पूर्वे क्त्वो ल्यप्' (७। १।३७ ) हा प्रयोग कसा ?

त्याच निपातनावरून तेथें आकाराचा लोप होईल.

' हलः श्नः शानज्झौ ' ( ३।१।८३ ) येथें श्नः या पदामध्यें आकाराचा लोप कसा ?

तोही त्याच निपातनावरून साधत आहे.

अथवा येथें योगविभाग करावा तो असा— ' आतः ' एवढेंच सूत्र निराळें करावें. भसंज्ञक अंगाच्या शेवटीं असलेल्या आकाराचा लोप होतो असा त्याचा अर्थ होईल. त्याच्या पुढें ' धातोः ' असें दुसरें सूत्र राहील. धातूच्याही आकाराचा लोप होतो असा त्याचा अर्थ होईल.

---

जो भसंज्ञक अन्च् धातु तो जर उद् शब्दाहून पुढें असेल तर त्या अन्च् धातूच्या अकाराचे स्थानी ईकार होतो.

१. ( सू. १४० ) आकारान्त जो धातु तदन्त भसंज्ञक जें अंग त्याच्या शेवटीं असलेल्या आकाराचा लोप होतो.

२. आप्भिन्न जो आकार तदन्त भसंज्ञक अंगाचा लोप होतो असा अर्थ झाल्यामुळें क्त्वा शब्दाहून ङस् केला असतां तेथेंही आकाराचा लोप होऊन क्त्वः हा प्रयोग साधतो. सूत्रामध्यें धातोः असेंच ठेवलें तर क्त्वा हा धातु नसल्यामुळें लोप होणार नाहीं.

३. क्त्वायाम् या प्रयोगामध्यें याट् आगम सुद्धां या निपातनामुळेंच झाला आहे.

४ येथें भसंज्ञक अंग पाहिजे. पूर्वीचीं निमित्तें कायम आहेत. आतां ' आतः ' या योगविभागानेंच आकारान्त धातुस्थलींही आकारलोप साधत असतां धातोः हा योगविभाग व्यर्थ होतो; त्यावरून धातुभिन्न आकारान्त स्थलीं ' आतः ' या योगविभागाची क्वचितच प्रवृत्ति होते असें सूचित होतें. त्यामुळें क्त्वः व श्नः येथेंच प्रवृत्ति करावयाची आणि आबन्त स्थलीं करावयाची नाहीं.

## मन्त्रेष्वाङ्यादेरात्मनः ॥ ६ । ४ । १४१ ॥

### मन्त्रेष्वात्मनः प्रत्ययमात्रप्रसङ्गः ॥१॥

मन्त्रेष्वात्मनः प्रत्ययमात्रे लोपः प्रसक्तव्यः । इहापि यथा स्यात् । त्मन्या समक्षन् । त्मनोरन्तरस्थ इति । यदि प्रत्ययमात्रे लोप उच्यते कथमात्मन एव निर्मिमीष्वेति । तस्मान्नार्थः प्रत्ययमात्रे लोपेन । कथं त्मन्या समक्षन् त्मनोरन्तरस्थ इति । छान्दसत्वात्सिद्धम् । छान्दसमेतत् । दृष्टानुविधिश्छन्दसि भवति ॥

### आदिग्रहणानर्थक्यं चाकारप्रकरणात् ॥ २ ॥

आदिग्रहणं चानर्थकम् । किं कारणम् । आकारप्रकरणात् ॥ आत इति वर्तते ॥

## [1]ति विंशतेर्डिति ॥ ६।४।१४२ ॥

तिग्रहणं किमर्थं न विंशतेर्डिति लोप इत्येवोच्येत । नैवं शक्यम् । विंशतेर्डिति लोप इतीयत्युच्यमानेऽन्त्यस्य प्रसज्येत । सिद्धोऽन्त्यस्य यस्येति लोपेनैव तत्रारम्भ-

---

( सू. १४१ वा. १ ) मन्त्रामध्यें कोणताही प्रत्यय पुढें असतांना आत्मन् शब्दाच्या आकाराचा लोप होतो असें सांगितलें पाहिजे. कारण, ' त्मन्या[2] समक्षन्, ' ' त्मनोरन्तरस्थः ' इत्यादि ठिकाणींही लोप झालेला दिसत आहे.

जर कोणताही प्रत्यय पुढे असतांना आत्मन् शब्दाच्या आदीचा लोप सांगितला तर ' आत्मन एव निर्मिमीष्व ' हें कसे साधेल ? तेव्हां मोघम कोणताही प्रत्यय पुढें असताना लोप सांगण्यांत कांहीं अर्थ दिसत नाहीं.

आतां मुळींच लोप सांगितला नाहीं तर ' त्मन्या समक्षन् ' व ' त्मनोरन्तरस्थः ' हे प्रयोग कसे साधावयाचे ?

छान्दसत्वात् सिद्धम् म्हणजे हा वैदिक प्रयोग असल्यामुळे साधत आहे. कारण वेदामध्यें जसा प्रयोग दृष्टीस पडेल तसाच साधावयाचा असतो. तेव्हा त्मन्या येथें आकारलोपाची कल्पना[3] करतां येईल.

( वा. २ ) येथें आदि शब्द घातला आहे तो निष्फळच आहे.

काय कारण ?

कारण असें कीं आकाराचें प्रकरण चालू आहे. ' आतो धातोः ' या मागील सूत्रांतून ' आतः ' या पदाची अनुवृत्ति येत आहे.

( सू. १४२ ) येथें ' ति ' या शब्दाचें ग्रहण केलें आहे तें कशाकरितां केलें आहे ? तें करूं नये. विंशतेर्डिति असेंच सूत्र करावें.

असें सूत्र करणें शक्य नाहीं. कारण, डित् पुढें असतांना विंशतिशब्दाचा लोप होतो एवढेंच सूत्र केलें तर 'अलोऽन्त्यस्य' ( १।१।५२ ) या परिभाषेनें शेवटच्या इकाराचाच फक्त लोप होऊं लागेल.

पण अन्त्य इकाराचा लोप ' यस्येति च ' ( ६।४।१४८ ) यानेंच साधत आहे. तेव्हां ज्या अर्थी हें सूत्र आरंभिलें आहे त्या अर्थी त्याच्या जोरावर सर्व ' ति ' या शब्दाचा लोप होईल.

---

1. ( सू. १४१ ) मन्त्रामध्यें आत्मन् शब्दाच्या आदि अकाराचा तृतीयैकवचन ' टा ' हा प्रत्यय पुढें असतांना लोप होतो.

2. त्मन्या येथें सप्तमी प्रत्ययाचे स्थानीं या हा आदेश ( ७।१।३९ ) झाला आहे.

3. ' शिवा रुद्रस्य ' असें प्राप्त झालें असतां जसा तेथें ' उद्रस्य ' असा प्रयोग असल्यामुळें रेफाच्या लोपाची कल्पना केली जाते तशी त्मन्या येथें सूत्र नसतांनाही आकारलोपाची कल्पना केली जाईल.

1. ( सू. १४२ ) भसंज्ञक जो विंशति शब्द त्याच्या ' ति ' शब्दाचा डकारेत्संज्ञक प्रत्यय पुढें असतांना लोप होतो.

सामर्थ्यात्तिशब्दस्य भविष्यति । कुतो नु खल्वेतदनन्त्यार्थ आरम्भे तिशब्दस्य भविष्यति न पुनरङ्गस्येति । तस्मात्तिग्रहणं कर्तव्यम् ॥ अथ क्रियमाणेऽपि तिग्रहणेऽन्त्यस्य कस्मान्न भवति । निर्दिश्यमानस्यादेशा भवन्तीत्येवं न भविष्यति ॥

टेः ॥ ६ । ४ । १४३ ॥

अभस्योपसंख्यानं कर्तव्यम् । इहापि यथा स्यात् । उपसरजः मन्दुरज इति ॥ तर्त्तहि वक्तव्यम् । न वक्तव्यम् । कथमुपसरजः मन्दुरज इति ॥

डित्यभस्याप्यनुबन्धकरणसामर्थ्यात् ॥ १ ॥

अभस्याप्यनुबन्धकरणसामर्थ्याद्भविष्यति ॥

नस्तद्धिते ॥ ६ । ४ । १४४ ॥

नकारान्तस्य टिलोपे सब्रह्मचारिपीठसर्पिकलापिकुथुमितैतिलिजाजलिलाङ्गलिशिलालिशिखण्डिसूकरसद्मसुपर्वणामुपसंख्यानम् ॥ १ ॥

नकारान्तस्य टिलोपे सब्रह्मचारिन् पीठसर्पिन् कलापिन् कुथुमिन् तैतिलिन् जाज-

---

तरी पण अन्त्याचा लोप सिद्ध असतांना या सूत्राचा आरंभ केला आहे; त्यावरून सबंध शब्दाचा करावयाचा तो ति शब्दाचाच कशावरून होईल? सबंध अंगाचा लोप कां होणार नाहीं? तेव्हां ति शब्दाचाच लोप होण्याकरितां ति शब्दाचें ग्रहण केलें पाहिजे.

आतां ति शब्दाचें ग्रहण केलें असतांही अन्त्याचा लोप कां बरें होत नाहीं.

'निर्दिश्यमानालाच आदेश होतात' असें सांगितलें असल्यामुळें अन्त्याचा लोप होणार नाहीं.[2]

(सू. १४३) 'अभस्योपसंख्यानम्' म्हणजे भसंज्ञा नसली तरी तेथेंही टिलोप होतो असें वचन करावें. कारण, उपसरजः[2] मन्दुरजः इत्यादि ठिकाणींही टिलोप झाला पाहिजे.

तर मग तसें वचन करावयास पाहिजे.

तसें वचन करावयास नको.

पण वचन केलें नाहीं तर उपसरजः व मन्दुरजः हे शब्द कसे साधतील?

(वा. १) डकाररूपी अनुबंध लाविल्याचे जोरावर डित् पुढें असतांना भसंज्ञा नसली तरी तेथेंही टिसंज्ञकाचा लोप होईल.

(सू. १४४ वा. १) 'नस्तद्धिते' यानें सांगितलेला जो हा नकारान्ताच्या टि-संज्ञकाचा लोप तेथें सब्रह्मचारिन्, पीठसर्पिन्, कलापिन्, कुथुमिन्, तैतिलिन्, जाजलिन्, लाङ्गलिन्, शिला-

---

२ यावरून निर्दिश्यमान परिभाषेची येथें प्रवृत्ति केली असें मात्र समजूं नये. कारण, निर्दिश्यमान परिभाषा 'अलोऽन्त्यस्य' व 'आदेः परस्य' या परिभाषांचा बाध करूं शकत नाहीं. बाध केला गेल्यास त्या परिभाषांना कोठेंच थारा मिळणार नाहीं. तेव्हां तिशब्दग्रहणाचे जोरावर अलोन्त्यस्य ही परिभाषा मागें सारिली गेल्यामुळें अर्थात् ति शब्दाचा लोप होतो असें या ग्रंथाचें तात्पर्य समजावें.

१. (सू. १४३) डकारेत्संज्ञक प्रत्यय पुढें असतांना भ-संज्ञकाच्या टि-संज्ञक भागाचा लोप होतो.

२. उपसर व मन्दुरा हे उपपद असतांना जन् धातूहून ड प्रत्यय (३।२।९७) झाल्यानंतर तो डित् आहे म्हणून जन् धातूच्या अन् या टि भागाचा लोप झाला आहे ड हा कृत् प्रत्यय असल्यामुळें येथें भ ही संज्ञा नाहीं.

१. (सू. १४४) नकारान्त असें जें भ-संज्ञक अंग त्याच्या टि-संज्ञक भागाचा तद्धित प्रत्यय पुढें असतांना लोप होतो.

लिन् लाङ्गलिन् शिलालिन् शिखण्डिन् सूकरसद्मन् सुपर्वन्नित्येतेषामुपसंख्यानं कर्तव्यम् । सब्रह्मचारिन् साब्रह्मचाराः सब्रह्मचारिन् । पीठसर्पिन् पैठसर्पाः पीठसर्पिन् । कलापिन् कालापाः कलापिन् । कुथुमिन् कौथुमाः कुथुमिन् । तैतिलिन् तैतिलाः तैतिलिन् । जाजलिन् जाजलाः जाजलिन् । लाङ्गलिन् लाङ्गलाः लाङ्गलिन् । शिलालिन् शैलालाः शिलालिन् । शिखण्डिन् शैखण्डाः शिखण्डिन् । सूकरसद्मन् सौकारसद्माः सूकरसद्मन् । सुपर्वन् सौपर्वाः सुपर्वन् ॥

**चर्मणः कोशे ॥ २ ॥**

चर्मणः कोश उपसंख्यानं कर्तव्यम् । चार्मः कोशः ॥

**अश्मनो विकारे ॥ ३ ॥**

अश्मनो विकार उपसंख्यानं कर्तव्यम् । अश्मनो विकार आश्मः ॥

**शुनः संकोचे ॥ ४ ॥**

शौवः संकोचः ॥

**अव्ययानां च**

---

लिन्, शिखण्डिन्, सूकरसद्मन् आणि सुपर्वन् या शब्दांचें ग्रहण करावें. उदाहरणार्थ सब्रह्मचारिण इमे साब्रह्मचाराः, त्याप्रमाणेच पैठसर्पाः, कालापाः, कौथुमाः, तैतिलाः, जाजलाः, लाङ्गलाः, शैलालाः, शैखण्डाः, सौकरसद्माः व सौपर्वाः.

(वा. २) चर्मन् शब्दांतील टिसंज्ञक भागाचा तद्धित प्रत्यय पुढें असतांना आणि कोश अर्थ गम्यमान असताना लोप होतो. उदाहरणार्थ– चर्मणो विकारश्चार्मः कोशः.

(वा. ३) अश्मन् शब्दांतील टिसंज्ञक भागाचा विकारार्थक प्रत्यय पुढें असतांना लोप होतो असें वचन करावें. उदाहरणार्थ–अश्मनो विकार आश्मः.

(वा. ४) श्वन् शब्दांतील टिसंज्ञक भागाचा तद्धित प्रत्यय पुढें असतांना व संकोच हा अर्थ गम्यमान असताना लोप होतो असें वचन करावें. उदाहरणार्थ– शुनः अयं शौवः संकोचः.

---

२ सूकरसद्मन् आणि सुपर्वन् या दोन शब्दांविषयीं ' अन् ' ( ६।४।१६७ ) यानें, आणि बाकीच्या शब्दांविषयीं ' इनण्यनपत्ये ' ( ६।४।१६४ ) यानें प्रकृतिभाव प्राप्त आहे म्हणून हें वचन केलें आहे.

३. साब्रह्मचाराः येथें समानो ब्रह्मचारी या अर्थी 'चरणे ब्रह्म० ' ( ६।३।८६ ) यानें समान शब्दाला स आदेश होऊन झालेल्या ' सब्रह्मचारिन् ' शब्दाहून ' तस्येदम् ' ( ४।३।१२० ) यानें अण्. पैठसर्पाः येथें पीठेन सर्पतीति पीठसर्पी या शब्दाहून ' सुप्यजातौ० ' ( ३।२।७८ ) यानें णिनि आणि त्याहून ' तस्येदम् ' यानें अण्. कालापाः व कौथुमाः यांचा कलापिना प्रोक्तमधीयते कालापाः, कौथुमिना प्रोक्तमधीयते कौथुमाः असा अर्थ आहे ' कलापिनोऽण् ' ( ४।३।१०८) व 'तेन प्रोक्तम ' ( ४।३।१०१ ) यानीं अण्, तदन्ताहून केलेल्या अध्येतृवेदितृ या अर्थाच्या अण् प्रत्ययाचा ' प्रोक्ताल्लुक् ' ( ४।२।६४ ) यानें लुक्. तैतिलाः , जाजलाः व लाङ्गलाः येथें तैतिलि, जाजलि, व लाङ्गलि या शब्दांनी लक्षणेनें ' त्या त्या ऋषीने प्रोक्त शास्त्र ' इतका अर्थ समजावयाचा आहे. त्या शब्दांहून ' तदधीते० ' ( ४।२।५९ ) यानें अण् प्रत्यय झाला आहे. शैलालाः वगैरे चारी शब्दामध्यें ' तस्येदम् ' यानें अण् प्रत्यय झाला आहे.

४ 'तस्य विकारः' (४।३।१३४) यानें अण् प्रत्यय.

५. तस्येदम् यानें 'अण्'; श्वन्–अ असें असतां पर असल्यामुळें वृद्धि प्राप्त होते; तिचा 'द्वारादीनां च ' ( ७।३।४ ) यानें प्रतिषेध, नंतर ऐजागम केला असतां टिलोप झाल्यामुळें शौवः असें होतें. संकोच हा अर्थ नसेल तर शौवनः असें रूप होतें.

अव्ययानां चोपसंख्यानं कर्तव्यम्। किं प्रयोजनम्।

**सायंप्रातिकाद्यर्थम् ॥ ५ ॥**

सायंप्रातिकः पौनःपुनिकः ॥

शाश्वतिके प्रतिषेधो वक्तव्यः। न वक्तव्यः। निपातनादेतत्सिद्धम्। किं निपातनम्। येषां च विरोधः शाश्वतिकः [ २. ४. ९ ] इति। एवं तर्हि शाश्वते प्रतिषेधो वक्तव्यः। शाश्वतम् ॥

**[ अह्नष्टखोरेव ॥ ६ । ४ । १४५ ॥**

**ओर्गुणः ॥ ६ । ४ । १४६ ॥**

**ढे लोपोऽकद्र्वाः ॥ ६ । ४ । १४७ ॥ ]**

**यस्येति च ॥ ६ । ४ । १४८ ॥**

इवर्णान्तस्येति किमुदाहरणम्। हे दाक्षि दाक्ष्या दाक्षेयः। हे दाक्षीति। यदि लोपो न स्यात्परस्य ह्रस्वत्वे कृते सवर्णदीर्घत्वं प्रसज्येत। दाक्ष्येति। यदि लोपो न

---

( वा. ५ ) अव्ययांच्याही टिसंज्ञक भागाचा तद्धित प्रत्यय पुढें असताना लोप होतो असें वचन करावें.

काय प्रयोजन ?

सायंप्रातिकः[6], पौनःपुनिकः इत्यादि प्रयोग साधणें हें प्रयोजन होय.

शाश्वतिक या प्रयोगामध्यें टिलोप होत नाहीं असें वचन करावें. उदाहरणार्थ—शश्वद्भवः शाश्वतिकः[7].

हें वचन करावयास नको. कारण निपातनावरूनच शाश्वतिक येथें टिलोपाचा अभाव साधतो.

तें निपातन कोणतें ?

' येषां च विरोधः शाश्वतिकः ' ( २।४।९ ) हें तें निपातन होय.

असें आहे तर—

शाश्वत या शब्दामध्यें टिलोप होत नाहीं, असें वचन करावें. उदाहरणार्थ—शाश्वतम्[8].

( सू. १४८ ) ' ईकार पुढें असतांना इवर्णाचा लोप होतो ' याचें उदाहरण कोणतें ?

हे दाक्षि, दाक्ष्या, दाक्षेयः. हे दाक्षि येथें दाक्षि शब्दाहून ' इतो मनुष्यजातेः ' ( ४।१।६५ ) यानें ङीष्. त्या ' दाक्षि–ई ' या शब्दाहून संबुद्धि सु प्रत्यय केला असतां जर येथें इवर्णाचा लोप न होईल तर पुढील ईकाराला ' अम्बार्थनद्योः ' (७।३।१०७) यानें ऱ्हस्व केला असतां दोन्ही इकारांचा सवर्णदीर्घ प्रसक्त होईल. तसेंच दाक्ष्या येथें दाक्षि+ई या शब्दाहून तृतीया एक वचन

---

६. सायंप्रातः या शब्दाहून ठञ् प्रत्यय ( ४।३।११ ) झाला आहे.

७. शश्वत् शब्दाहून ठञ् प्रत्यय ( ४।३।११ ) झाला आहे.

८ याच निपातनावरून शाश्वतिकः येथें ' इसुसु० ' ( ७।३।५१ ) यानें सांगितलेला तकारान्तप्रयुक्त ' क ' आदेश होत नाहीं.

९. याच भाष्यवचनावरून शश्वत् शब्दाहून अण् प्रत्ययही होतो.

१. (सू. १४५) ट आणि ख प्रत्यय पुढें असतांनाच अहन् शब्दाच्या टिसंज्ञक भागाचा लोप होतो; या दोहोंहून अन्य प्रत्यय पुढें असतांना होत नाहीं.

१. (सू. १४६) उवर्णान्त असें जें भसंज्ञक अंग त्यांतील शेवटच्या उकाराला तद्धित प्रत्यय पुढें असतांना गुण होतो.

१. (सू १४७) कद्रूशब्दभिन्न असें जें उवर्णान्त भ–संज्ञक अंग त्यांतील शेवटच्या उकाराचा ढ प्रत्यय पुढें असतांना लोप होतो.

(सू. १४८. ) अवर्णान्त तसेंच इवर्णान्त असें जें भ–संज्ञक अंग त्यांतील शेवटच्या वर्णाचा ईकार किंवा तद्धित प्रत्यय पुढें असतांना लोप होतो.

स्यात्परस्य यणादेशे कृते पूर्वस्य श्रवणं प्रसज्येत। दाक्षेय इति। यदि लोपो न स्यात्परस्य लोपे कृते पूर्वस्य श्रवणं प्रसज्येत॥ नैतानि सन्ति प्रयोजनानि। सवर्णदीर्घत्वेनाप्येतानि सिद्धानि॥ इदं तर्हि। अतिसखेरागच्छति। अतिसखेः स्वम्। यदि लोपो न स्यादुपसर्जनह्रस्वत्वे कृते ऽसखीति प्रतिषेधः प्रसज्येत।

**यस्येत्यादौ श्यां प्रतिषेधः॥ १॥**

यस्येत्यादौ श्यां प्रतिषेधो वक्तव्यः। काण्डे कुड्ये। सौर्ये नाम हिमवतः शृङ्गे॥ स तर्हि प्रतिषेधो वक्तव्यः। न वक्तव्यः।

---

टा प्रत्यय केला असतां जर इवर्णाचा लोप नसेल तर पुढील ईकाराला यणादेश केला असतां पूर्व इकाराचें श्रवण होण्याचा प्रसंग येईल. तसेंच दाक्षेयः येथें दाक्षि+ई या शब्दाहून 'स्त्रीभ्यो ढक्' (४।१।१२०) यानें ढक् केला असतां जर इवर्णाचा लोप नसेल तर पुढील ईकाराचा प्रकृत सूत्रानें लोप केला असतां पूर्वीच्या इकाराचें श्रवण प्रसक्त होईल.

हीं प्रयोजनें बरोबर नाहींत. कारण दाक्षि–ई असें असतां प्रथमतः सवर्णदीर्घ केला म्हणजे हीं उदाहरणें साधत आहेत.

तर अतिसखेरागच्छति[2] तसेंच अतिसखेः स्वम् हें प्रयोजन होय. येथें जर इवर्णाचा लोप नसेल तर उपसर्जन-ह्रस्व केला असतां 'असखि' हा प्रतिषेध प्रसक्त होईल.

(वा. १) 'यस्येति॰' या सूत्रानें सांगितलेल्या लोपाचा शी आदेश पुढें असतांना प्रतिषेध होतो, असें वचन करावें. जसें–काण्डे[3] कुड्ये, सौर्ये[4] नाम हिमवतः शृङ्गे.

तर मग तें प्रतिषेधवचन करावयास पाहिजे.

---

२. सखीम् अतिक्रान्तः अशा अर्थी अति या शब्दाचा सखी शब्दाबरोबर प्रादिसमास (२।२।१८ वार्तिक) करून उपसर्जन-ह्रस्व (१।२।४८) केला म्हणजे अतिसखि असा शब्द तयार होतो. येथे सखि या शब्दाहून 'सख्यशिश्वीति॰' (४।१।६२) यानें ङीष् केल्यानंतर सखि शब्दांतील इकाराचा प्रकृत सूत्रानें लोप केला असतां सखि शब्दातील सख् एवढाच भाग शिल्लक राहतो. त्यामुळें पुढील ङीष् प्रत्ययाला ह्रस्वानें झालेला इकार हा सखि शब्दाचा अवयव नसल्यामुळें 'असखि' (१।४।७) हा निषेध येत नाहीं. म्हणून त्या अतिसखि शब्दाला 'घि'संज्ञा होऊन गुण (७।३।१११) होऊन अतिसखेः असें पंचमीच्या व षष्ठीच्या एकवचनाचें रूप होतें. जर प्रकृत सूत्रानें लोप न होतां सवर्णदीर्घ होईल तर तो ईकार व त्याचे स्थानीं झालेला ह्रस्व इकार हा सखि शब्दाचा अवयव असल्यामुळें 'असखि' हा घिसंज्ञेचा निषेध होऊं लागेल. आतां सखि शब्दाच्या इकाराचा प्रकृत सूत्रानें लोप केल्यानंतर जो सख् असा भाग उरतो त्याला पुढील ङीष् प्रत्ययाचे स्थानीं झालेला ह्रस्व इकार जोडला म्हणजे सखि अशी वर्णानुपूर्वी होते. पण तो खरा सखि शब्द नव्हे. तेव्हां 'असखि' हा निषेध तेथें मुळीच येऊ शकत नाहीं.

३. काण्ड शब्दाहून औ प्रत्यय, त्याला 'नपुंसकाच्च' (७।१।१९) यानें शी आदेश केला असतां काण्ड–ई या स्थितींत 'यचि भम्' (१।४।१८) यानें 'भ' संज्ञा असल्यामुळें प्रकृत सूत्रानें लोप प्राप्त होतो; त्याचा हा निषेध केला आहे.

४. सूर्येण एकदिक् या अर्थी 'तेनैकदिक्' (४।३।११२) यानें अण् प्रत्यय केला असतां भ संज्ञा असल्यामुळें प्रकृत सूत्रानें अकाराचा लोप होऊन सौर्य शब्द तयार होतो. त्याच्या पुढे 'औ' प्रत्ययाला शी आदेश केला असतां प्रकृत सूत्रानें यकाराचा लोप आणि 'सूर्यतिष्या॰' (६।४।१४९) या पुढील सूत्रानें यकाराचा लोप प्राप्त होत आहे. त्या दोन्ही लोपांचा हा निषेध केला आहे. पुढील सूत्रावरील वार्तिकें (५ आणि ६) मनांत न घेतां हें उदाहरण दाखविलें आहे.

इह श्यामित्यपि प्रकृतं नेत्यपि तत्राभिसंबन्धमात्रं कर्तव्यम् । यस्येत्यादौ लोपो भवति श्यां न ॥

**इयङुवङ्भ्यां लोपो विप्रतिषेधेन ॥ २ ॥**

इयङुवङ्भ्यां लोपो भवति विप्रतिषेधेन । इयङुवङोरवकाशः । श्रियौ श्रियः । भ्रुवौ भ्रुवः । लोपस्यावकाशः । दौलेयः कामण्डलेयः । इहोभयं प्राप्नोति । वात्सप्रेयः लैखाभ्रेयः । लोपो भवति विप्रतिषेधेन ॥

**गुणवृद्धी च ॥ ३ ॥**

गुणवृद्धी चेयङुवङ्भ्यां भवतो विप्रतिषेधेन । गुणवृद्ध्योरवकाशः । चेता गौः । इयङुवङोः स एव । इहोभयं प्राप्नोति । चयनम् चायकः । लवनम् लावकः । गुणवृद्धी भवतो विप्रतिषेधेन ॥

**न वेयङुवङादेशस्यान्यविषये वचनात् ॥ ४ ॥**

न वार्थो विप्रतिषेधेन । किं कारणम् । इयङुवङादेशस्यान्यविषये वचनात् । इयङुवङादेशोऽन्यविषय आरभ्यते । किंवि-

---

प्रतिषेधवचन करावयास नको. कारण येथें ‘ विभाषा ङिश्योः ’ ( ६।४।१३६ ) येथून श्याम् या पदाची अनुवृत्ति आणि ‘ न संयोगात्० ’ ( ६।४।१३७ ) येथून ‘ न ’ या पदाची अनुवृत्ति येत आहे; फक्त त्या दोघांचा संबंध करून वाक्यार्थ स्वतंत्र केला म्हणजे झालें. तो असा— ‘यस्येति च’ वगैरे सूत्रांचा विधिवाक्यार्थ झाल्यानंतर ‘शी आदेश पुढे असताना तो लोप होत नाहीं ’ असा निषेधवाक्यार्थ करावयाचा आहे.

( वा. २ ) विप्रतिषेध असल्यामुळें इयङ् व उवङ् ( ६।४।७७ ) याचा बाध करून लोप[५] होतो. इयङ् व उवङ् यांना श्रियौ, श्रियः, भ्रुवौ, भ्रुवः येथें अवकाश आहे; व लोपाला दौलेयः[६] व कामण्डलेयः येथें अवकाश आहे. आणि वात्सप्रेयः[७] व लैखाभ्रेयः येथें दोघांची प्राप्ति आली असतां विप्रतिषेध असल्यामुळें परत्वास्तव लोप होतो.

( वा. ३ ) गुण व वृद्धि हीं विप्रतिषेध असल्यामुळे इयङ् व उवङाचा बाध करून प्रथमतः होतात. जसें—गुण व वृद्धि यांना चेता, गौः येथे अवकाश आहे; व इयङ् आणि उवङ् यांना पूर्वोक्त श्रियौ, श्रियः, भ्रुवौ, भ्रुवः येथें अवकाश आहेच. आणि चयनम् व चायकः येथे उभयताची प्राप्ति आली असतां विप्रतिषेध असल्यामुळें परत्वास्तव गुण व वृद्धि होतात.

( वा. ४ ) हा विप्रतिषेध जमत नाहीं.

काय कारण ?

कारण असें कीं, इयङ् व उवङ् हे दुसरें कार्य प्राप्त झालें असतां मुद्दाम सांगितले आहेत.

कोणते कार्य दुसरें प्राप्त झालें आहे ?

यणादेशाची प्राप्ति असतां इयङ् व उवङ्

---

५ ‘ यस्येति च’ ‘ व ‘ढे लोपो० ’ (६।४।१४७) या सूत्रांनीं सांगितलेला लोप येथें समजावा.

६. दुलि शब्दाहून ‘ इतश्चा० ’ ( ४।१।१२२ ) यानें ढक् व ‘ यस्येति च ’ यानें लोप केला आहे. कमण्डलु शब्दाहून ‘ चतुष्पाद्भ्यो० ’ ( ४।१।१३२ ) याने ढञ् व ‘ ढे लोपो० ’ ( ६।४।१४७ ) यानें उकारलोप केला आहे.

७. वत्सान् प्रीणातीति वत्सप्रीः, तस्यापत्यं वात्सप्रेयः; ‘ चतुष्पाद्भ्यो० ’ यानें ढञ्, यस्येति च यानें लोप. लेखे इव भ्रुवौ यस्य लेखाभ्रूः; तस्यापत्यं लैखाभ्रेयः; ‘ शुभ्रादिभ्य ० ’ ( ४।१।१२३ ) यानें ढक् आणि ‘ ढे लोपो० ’ यानें उकारलोप झाला आहे.

षये। यणादेशविषये। स यथैव यणादेशं बाधत एवं गुणवृद्धी अपि बाधेत ॥

**तस्मात्तत्र गुणवृद्धिविषये प्रतिषेधः ॥ ५ ॥**

तस्मातत्र गुणवृद्धिविषये प्रतिषेधो वक्तव्यः ॥ न वक्तव्यः। मध्येऽपवादाः पूर्वान्विधीन्बाधन्त इत्येवमियङुवङादेशो यणादेशं बाधिष्यते गुणवृद्धी न बाधिष्यते ॥

**सूर्यतिष्यागस्त्यमत्स्यानां य उपधायाः ॥ ६ । ४ । १४९ ॥**[1]

**सूर्यादीनामणन्तेऽप्रसिद्धिरङ्गान्यत्वात् ॥ १ ॥**

सूर्यादीनामणन्तेऽप्रसिद्धिः। सौरी बलाका। किं कारणम्। अङ्गान्यत्वात्। अणन्तमेतदङ्गमन्यद्भवति। लोपे कृते नाङ्गान्यत्वम्। स्थानिवद्भावादङ्गान्यत्वं भवति ॥

**सिद्धं तु स्थानिवत्प्रतिषेधात् ॥ २ ॥**

सिद्धमेतत्। कथम्। स्थानिवत्प्रति-

---

यांचा आरंभ केला आहे. म्हणून जसा इयङ् व उवङ् हे यणादेशाचा बाध करतात तसा वृद्धि व गुण यांचाही अपवाद म्हणून बाध करतील.[8]

( वा. ५ ) तेव्हां गुणवृद्धींच्या विषयांत इयङ् व उवङ् यांचा प्रतिषेधच सांगितला पाहिजे.

प्रतिषेध सांगावयास नको. कारण, 'मध्यें असलेले अपवाद पूर्वविधींचा बाध करतात, उत्तरविधींचा बाध करीत नाहींत' या परिभाषेनें इयङ् व उवङ् हे यणादेशाचा बाध करतील; गुणवृद्धींचा बाध करणार नाहींत.

( सू. १४९ वा १ ) सूर्य, तिष्य, अगस्त्य आणि मत्स्य ह्या शब्दांहून अण् प्रत्यय करून पुढें ङीप् प्रत्यय केला असतां त्या ङीप् प्रत्ययामुळें त्या शब्दांतील यकाराचा लोप साधत नाहीं. उदाहरणार्थ—सौरी[2] बलाका.

काय कारण ?

कारण असें कीं अणन्त अङ्ग हें सूर्य, तिष्य वगैरे अंगाहून निराळें आहे.

पण 'यस्येति च' यानें अण् प्रत्ययाचा लोप केला असताना अङ्ग निराळें होत नाहीं ना ?

लोप झाला तरी 'अचः परस्मिन्०' ( १।१।५७ ) यानें स्थानिवद्भाव झाल्यामुळें अंग निराळें होणारच.

( वा. २ ) हें सिद्ध होत आहे.

तें कसें ?

असें कीं– 'न पदान्त०' ( १।१।५८ ) यानें य–लोप कर्तव्य असतांना स्थानिवद्भावाचा

---

८. अन्य शास्त्रांची प्राप्ति असतां तेथें मुद्दाम इयङ् व उवङ् सांगितले असल्यामुळें ते आपल्या विषयांत जें जें शास्त्र येईल त्याचा त्याचा बाध करतील; तेव्हां विप्रतिषेधाचा येथें उपयोग होणार नाहीं.

१ ( सू. १४९ ) सूर्य, तिष्य, अगस्त्य आणि मत्स्य या शब्दांचा अवयव असलेला आणि भ–संज्ञक अंगाच्या उपधेला असलेला असा जो यकार त्याचा ईकार किंवा तद्धित पुढें असतांना लोप होतो.

२. भसंज्ञक व अंगसंज्ञक असे जे सूर्य वगैरे शब्द असा अर्थ गृहीत धरून ही शंका केली आहे. सूर्य शब्दाहून 'तेनैकदिक्' ( ४।३।११२ ) यानें अण्, तदन्ताहून स्त्रीलिंगी ङीप् झाल्यावर तो ईकार पुढें असल्यामुळें प्रकृत सूत्रानें यकाराचा लोप येथें कर्तव्य आहे. परंतु ईकार पुढें असतां सूर्यशब्दरूप अंग नाहीं; तर अणन्त अंग आहे. म्हणून यकाराला लोप प्राप्त होत नाहीं. सूरी कुन्ती मानुषी येथें पुंयोगविवक्षा असतांना सूर्यशब्दाहून ङीप् प्रत्यय केला असतां सूर्य-शब्दरूपी अंग असल्यामुळें येथेंच यकारलोप होईल.

षेधात् । प्रतिषिध्यतेऽत्र स्थानिवद्भावो यलोपविधिं प्रति न स्थानिवद्भवतीति ॥ एवमपि न सिध्यति । किं कारणम् । शब्दान्यत्वात् । अन्यो हि सूर्यशब्दो ऽन्यः सौर्यशब्दः । नैष दोषः । एकदेशविकृतमनन्यवद्भवतीति भविष्यति ॥

**उपधाग्रहणानर्थक्यं च ॥ ३ ॥**

स्थानिवद्भावे चेदानीं प्रतिषिद्ध उपधाग्रहणमनर्थकम् । किं कारणम् । अन्त्य एव हि सूर्यादीनां यकारः । किं यातमेतद्भवति । सुष्ठु च यातं साधु च यातं यदि प्राग्भादसिद्धत्वम् । अथ हि सह तेनासिद्धत्वमसिद्धत्वाल्लोपस्य नान्त्यो यकारो भवति । यद्यपि सह तेनासिद्धत्वमेवमपि न दोषः । नैवं विज्ञायते सूर्यादीनामङ्गानां यकारलोप इति । कथं तर्हि । अङ्गस्य

---

प्रतिषेध केला आहे.

तरीही सौरी येथें यलोप साधत नाहीं.

काय कारण ?

शब्दान्यत्वात् म्हणजे सूर्य शब्द निराळा आणि सौर्य शब्द निराळा.

हा दोष नाहीं. कारण 'एकदेशाला विकार झाला तरी तें निराळें होत नाहीं' तेव्हां यलोप होईल.

( वा. ३ ) स्थानिवद्भाव प्रतिषिद्ध आहे तर आतां सूत्रांतील उपधा हा शब्द फुकट होत आहे. कारण तो जुळतच नाहीं.

काय कारण ?

कारण असें कीं–सूर्य वगैरे शब्दांमध्यें यकार हा शेवटीं येतो, उपधेला येत नाहीं.

मग तशानें साधत आहे का ?

साधत आहे तर; चांगलेंच साधत आहे. पण 'भस्य' या अधिकारापूर्वीच आभीयासिद्धत्व गृहीत धरलें तर साधत आहे. जर भस्य या अधिकारासहित म्हणजे भाधिकार संपेपर्यंत आभीयासिद्धत्व गृहीत धरलें तर ईकारनिमित्तक अकारलोपाला असिद्धत्व असल्यामुळें यकार हा सूर्य वगैरे शब्दांच्या शेवटीं आहे असें म्हणतां येणार नाहीं.

आतां जरी 'भस्य' या अधिकारासहित आभीयासिद्धत्व गृहीत धरलें तरीही दोष नाहीं. कारण, अङ्गसंज्ञक असे जे सूर्य वगैरे शब्द त्यांच्या यकाराचा लोप होतो असा सूत्रार्थ आम्ही समजत नाहीं; तर 'अङ्गाच्या यकाराचा लोप होतो, तो यकार सूर्य वगैरे शब्दांचा अवयव असेल तर' असा समजत आहों.

---

३. प्रकारान्तरानें वार्तिककार अङ्गान्यत्व दाखवीत आहेत.

४. तेव्हां सूर्य शब्दाला सांगितलेलें कार्य सौर्य शब्दाला होणार नाहीं; म्हणून यलोप प्राप्त होत नाहीं.

५. यकारान्त सूर्यादिशब्दरूपी अंगाचा लोप होतो असें सांगितलें असतां अलोऽन्त्य परिभाषेनें यकाराचाच लोप होईल तेव्हां उपधा-ग्रहण मुळींच करावयास नको.

६. तेव्हां भाधिकारांतील 'यस्येति च' या लोपाविषयीं असिद्धत्वप्रवृत्ति नसल्यामुळें सूर्यादि शब्दांच्या शेवटीं यकार आहे ही भावना कायम राहते; म्हणून यकारान्त सूर्यादिकांचा लोप सांगितल्यानेंच सौरी हें साधत आहे. म्हणून उपधाग्रहण नको.

७ 'यस्येति च' ह्यानें अण् प्रत्ययाचा जो लोप झाला आहे तो असिद्ध असल्यामुळे सूर्य वगैरे शब्दांच्या शेवटीं यकार नाहीं म्हणून त्याचा लोप होणार नाहीं. याकरितां उपधाग्रहण केलें पाहिजे असें समजूं नये.

८. 'ङी' या प्रत्ययामुळें अण्-प्रत्ययान्ताला अंगसंज्ञा आहे सूर्य शब्दाला नाहीं. तेव्हां अंगसंज्ञक जे सूर्य वगैरे शब्द असा अर्थ केला असतां यकाराचा लोप होणार नाहीं असा दोष येईल.

९. एकंदरींत उपधाग्रहणावांचून सर्वसिद्धि होते अशी शंकाकाराची समजूत आहे.

यलोपो भवति स चेत्सूर्यादीनां यकार इति ॥ एवमपि सूर्यचरी अत्र प्राप्नोति । तस्मादुपधाग्रहणं कर्तव्यम् ॥

**विषयपरिगणनं च ॥ ४ ॥**

विषयपरिगणनं च कर्तव्यम् ॥

**सूर्यमत्स्ययोर्ङ्याम् ॥ ५ ॥**

सूर्यमत्स्ययोर्ङ्यामिति वक्तव्यम् । सौरी मत्सी ॥

**सूर्यागस्त्ययोश्छे च ॥ ६ ॥**

सूर्यागस्त्ययोश्छे च ङ्यां चेति वक्तव्यम् । सौरी सौरीयः । आगस्ती आगस्तीयः ॥

**तिष्यपुष्ययोर्नक्षत्राणि ॥ ७ ॥**

तिष्यपुष्ययोर्नक्षत्राणि लोपो वक्तव्यः । तैषम् पौषम् ॥

**अन्तिकस्य तसि कादिलोप आद्युदात्तत्वं च ॥ ८ ॥**

अन्तिकस्य तसि कादिलोपो वक्तव्य आद्युदात्तत्वं च वक्तव्यम् । अन्तितो न दूरात् ॥

**तमे तादेश्च ॥ ९ ॥**

---

तरीही सूर्यचरी[१०] येथें यलोप प्रसक्त होत आहे. तेव्हां उपधाग्रहण अवश्य केलेंच पाहिजे.

(वा. ४) सूर्य वगैरे शब्दांपैकीं कोणत्या शब्दापुढें कोणतें निमित्त असतांना यकाराचा लोप होतो याविषयीं परिगणन करावें.

(वा. ५) सूर्य आणि मत्स्य या शब्दांच्या यकाराचा ङी प्रत्यय पुढें असतांना[११] लोप होतो असें वचन करावें. उदाहरणार्थ सौरी, मत्सी.

(वा. ६) सूर्य व अगस्त्य या शब्दांच्या यकाराचा छ आणि ङी प्रत्यय पुढें असतांना लोप होतो असें वचन करावें. उदाहरणार्थ— सौरी, सौरीयः,[१२] आगस्ती, आगस्तीयः.

(वा. ७) तिष्य आणि पुष्य या शब्दांच्या यकाराचा नक्षत्रसंबंधी अण् प्रत्यय पुढें असतांना लोप होतो असें वचन करावें. उदाहरणार्थ— तैषम्[१३], पौषम्.

(वा. ८) तस् प्रत्यय पुढें असतां अन्तिक शब्दाच्या ककारादि भागाचा लोप होतो आणि तस् प्रत्ययाचा आदि उदात्त होतो असें वचन करावें. उदाहरणार्थ— अन्तितो न[१४] दूरात्.

---

१०. सूर्यस्य स्त्री मानुषी सूरी. भूतपूर्वा सूरी सूर्यचरी. 'भूतपूर्वे चरट्' (५।३।५३) यानें चरट्, टित्वास्तव ङीप्. 'तसिला०' (६।३।३५) यानें पुंवद्भाव झाला आहे. उपधाग्रहण नसेल तर येथें अंगाचा अवयव आणि सूर्यशब्दसंबंधी यकार असल्यामुळें यलोप प्रसक्त होत आहे; म्हणून उपधाग्रहण करणें जरूर आहे.

११. सूर्य व मत्स्य या शब्दांच्या उपधा-यकाराचा लोप करणें झाल्यास ङी प्रत्ययच पुढें असतांना करावा असा नियम केल्यामुळें सौर्यश्वशुरः तसेंच मत्स्यस्येदं मात्स्यं मांसम् येथें यकाराचा लोप होत नाहीं.

१२. सूर्यो देवताऽस्य सौर्यः. 'साऽस्य देवता' (४।२।२४) यानें अण्. सौर्यस्यायं सौरीयः. शैषिकार्थी 'वृद्धाच्छः' (४।२।११४) यानें छ प्रत्यय, आणि य–लोप. अगस्त्यस्यापत्यम्, ऋष्यण्, तदन्ताहून ङीप् व 'वृद्धाच्छः' आगस्ती, आगस्तीयः.

१३. तिष्यग्रहण नियमार्थ, तसेंच पुष्यग्रहण विधानार्थ समजावें. कारण सूत्रामध्यें पुष्यशब्द नाहीं. 'त्या नक्षत्रानें युक्त दिवस' या अर्थी तिष्य व पुष्य या शब्दांहून अण् प्रत्यय (४।३।२) होऊन यकाराचा लोप झाला आहे. नक्षत्रवाचक शब्दाहून कोणत्याही अर्थी केलेला अण् प्रत्यय येथें घेतां येतो. म्हणून पुष्ये भवः पौषः येथेंही यलोप होतो.

१४. अन्तिक शब्दाहून 'अपादाने०' (५।४।४५) यानें तसि प्रत्यय; आणि क शब्दाचा लोप होऊन अन्तितः असें रूप होतें. अन्तिकात् असा त्याचा अर्थ आहे.

तमे तादेश्च कादेश्च लोपो वक्तव्यः । । त्वं नो अन्तमः । अन्तितमो अवरो- । ॥

तसीत्येष न वक्तव्यो
दृष्टो दाशतयेऽपि हि ।
घौ लोपोऽन्तिषदित्यत्र
अन्तिषत् ॥
तथाघौ येऽन्त्यथर्वसु ॥

अन्तिये च दूरके ॥

[ हलस्तद्धितस्य ॥ ६।४।१५० ॥

आपत्यस्य च तद्धितेऽनाति ॥ ६ । ४ । १५१ ॥

क्यच्व्योश्च ॥ ६ । ४ । १५२ ]

बिल्वकादिभ्यश्छस्य लुक् ॥ ६ ४ । १५३ ॥

छग्रहणं शक्यमकर्तुम् । इह कस्मान्न

---

( वा. ९ ) तम प्रत्यय पुढें असतांना ग्न्तिक शब्दांतील तकारादि भागाचा किंवा ककारादि भागाचा लोप होतो असें वचन करावें. उदाहरणार्थ अग्ने त्वं नो अन्तमः[१५]; अन्तितमो अवरोहति.

तसीत्येष न वक्तव्यो दृष्टो दाशतयेऽपि[१६] हि । घौ[१७] लोपोऽन्तिषदित्यत्र[१८] तथाऽघौ येऽन्त्यथर्वसु ॥ ( श्लो. वा.१ ) अन्तिकस्य तसि ( वा. ८ ) या वार्तिकामध्यें तसि हा शब्द घालूं नये; कारण ऋक्-संहितेमध्यें उत्तरपद पुढें असतांना 'अन्तिषत्' येथें कादिलोप दृष्टीस पडत आहे. त्याप्रमाणेंच अथर्ववेदामध्यें उत्तरपद पुढें नसतांना व य प्रत्यय पुढें असतांना अन्तियः[१९] येथें कादिलोप दृष्टीस पडत आहे.

( सू. १५३ ) येथें छस्य हा शब्द घातला नाहीं तरी चालेल.

---

१५. अन्तिक शब्दांतील तिक या तकारादि भागाचा लोप केला असतां अन्तमः आणि ककारादि भागाचा लोप केला असतां अन्तितमः अशीं रूपें होतात. अतिशयेन अन्तिकः असा अर्थ आहे. ' अतिशायने० ' ( ५।३।५५ ) यानें तमप् प्रत्यय झाला आहे.

१६. दश अवयवा अस्य दशतयः; 'संख्याया अवयवे० ' ( ५।२।५५ ) यानें तयप् व त्याच्या पुढें ' तत्र भवः ' ( ४।३।५३ ) यानें अण् प्रत्यय. दहा भाग असलेल्या ग्रंथांपैकी एक; ऋक्संहिता या ग्रंथाची मंडलें दहा आहेत. दाशतय शब्दाहून ङीप् ( ४।१।१५ ) प्रत्यय करून दाशतयी असें होतें. ऋक्संहितेला दाशतयी असेंही म्हणतात.

१७. 'घु' हें पूर्वाचार्यांनीं दिलेलें उत्तरपदाचें नांव होय.

१८. अन्तिके सीदतीति अन्तिषत्. ' सत्सूद्विष० ' ( ३।२।६१ ) यानें क्विप् आणि 'पूर्वपदात्' ( ८।३।१०६ ) यानें षत्व झालें आहे.

१९. अन्तिके भवः अन्तियः. ' भवे छन्दसि ' ( ४।४।११० ) यानें यत् प्रत्यय, तसाच कादिलोप झाला आहे.

१. ( सू. १५० ) अंगाच्या उपधेला असलेला आणि हलाहून पुढें असलेला तद्धितप्रत्ययसंबंधी जो यकार त्याचा ईकार पुढें असतांना लोप होतो.

१. ( सू. १५१ ) हलाहून पुढें असलेला जो अपत्यार्थक-प्रत्ययसंबंधी यकार त्याचा आकार आरंभीं नसलेला असा तद्धित प्रत्यय पुढें असतांना लोप होतो.

१. ( सू. १५२ ) हलाहून पुढें असलेला जो अपत्यार्थकप्रत्ययसंबंधी यकार त्याचा क्यच किंवा च्वि प्रत्यय पुढें असताना लोप होतो.

१ ( सू. १५३) नडादि गणांतील ( ४।२।९१ ) जे बिल्वकादि शब्द त्यांहून पुढील जो छ प्रत्यय त्याचा तद्धित प्रत्यय पुढें असतांना लुक् होतो.

भवति । बिल्वकेभ्यः । भस्येति वर्तते ॥ एवमपि बिल्वकाय अत्र प्राप्नोति । तद्धितस्येति वर्तते ॥ एवमपि बिल्वकस्य विकारोऽवयवो वा बैल्वकः अत्र प्राप्नोति । तद्धिते तद्धितस्येति वर्तते ॥ एवमपि बिल्वकीयायां भवो बैल्वकः बैल्वकस्य किंचिद्बैल्वकीयम् अत्र प्राप्नोति । न स बिल्वकात् । बिल्वकादिभ्यो यो विहित इत्युच्यते न चासौ

तर बिल्वकेभ्यः येथें कां बरें लुक् होत नाहीं?

भस्य हा अधिकार अनुवृत्त आहे म्हणून होत नाहीं.

तरीही बिल्वकाय येथें लुक् प्राप्त होत आहे.

हलस्तद्धितस्य ( ६।४।१५० ) येथून तद्धितस्य या पदाची अनुवृत्ति येत आहे.

तरीही बिल्वकस्य विकारोऽवयवो वा बैल्वकः[5] येथें लुक् प्राप्त होत आहे

तद्धिते आणि तद्धितस्य या दोन्ही पदांची अनुवृत्ति येत आहे.[6]

तरीही बिल्वकीयायां भवो बैल्वकः, बैल्वकस्य किंचित् बैल्वकीयम् येथें लुक् प्रसक्त होत आहे.

बिल्वकादिकांहून केलेला जो तद्धित प्रत्यय त्याचा लुक् होतो असें येथें म्हटलें आहे. आणि

---

२. बिल्वाः यस्यां सन्ति अशा अर्थी छ प्रत्यय आणि बिल्व शब्दाला कुक् आगम (४।२।९१) होऊन बिल्वकीया भूमिः असें होतें. पुढें तत्र भवः ( ४।३।५३ ) यानें 'बिल्वकीया' शब्दाहून अण् प्रत्यय झाल्यावर प्रकृत सूत्रानें छ प्रत्ययाचा लुक् होऊन बैल्वक असा शब्द सिद्ध होतो ह्या सूत्रामध्ये बिल्वकादिभ्यः असें जें म्हटलें आहे तेथें कुक् आगम झालेला बिल्वक हा शब्द घेतला आहे. परंतु बिल्व शब्दाहून क प्रत्यय करून तयार झालेला बिल्वक शब्द कां घेऊं नये अशी शंका येते. पण येथें छस्य असें म्हटलें आहे त्यामुळें ही शंका दूर होते. कारण, छस्य असें म्हटलें आहे त्यावरून छ प्रत्यय सांगणारें ' नडादीनां कुक् च ' हें सूत्र मनांत येतें तेव्हां त्याच सूत्रानें कुक् आगम सांगितला असल्यामुळे कुक् आगम झालेलाच बिल्वक हा शब्द झटदिशीं मनांत येतो बिल्वकेभ्यः येथें बिल्व शब्दाहून अज्ञानार्थी क प्रत्यय व तदन्ताहून भ्यम् प्रत्यय झाला आहे. छ ग्रहण नसेल तर येथ क प्रत्यय झालेलाही बिल्वक शब्द घेतां येईल आणि पुढील भ्यस् प्रत्ययाचा लुक् होऊं लागेल.

३ अर्थानुरोधानें विभक्तिविपरिणाम करून भसंज्ञक बिल्वकादिकाहून पुढें असलेल्या प्रत्ययाचा लुक् होतो असा सूत्रार्थ होतो व बिल्वकेभ्यः येथें भसंज्ञा नसल्यामुळें लुक् होत नाहीं.

४. भसंज्ञक अशा बिल्वकादि शब्दांहून पुढील तद्धित प्रत्ययाचा लुक् होतो असा सूत्रार्थ असल्यामुळें ' य ' ह्या चतुर्थी एकवचन प्रत्ययाचा लुक् होत नाही.

५. येथें बिल्वक शब्दाहून अञ् ( ४।३।१४० ) हा तद्धित प्रत्ययच झालेला आहे.

६. 'नस्तद्धिते' ( ६।४।१४४ ) येथून तद्धिते या पदाचीही अनुवृत्ति येथें येत आहे. तेव्हां ' भसंज्ञक बिल्वकादिकांहून पुढील तद्धित प्रत्ययाचा लुक् होतो तद्धित प्रत्यय पुढ असतांना ' असा सूत्राचा अर्थ होतो. येथे पुढे तद्धित प्रत्यय नसल्यामुळें अञ् प्रत्ययाचा लुक् होत नाहीं.

७. प्रकृत सूत्रानें छ प्रत्ययाचा लुक् होऊन साधलेला जो अण्-प्रत्ययान्त बैल्वक शब्द त्याहून तस्येदम् या अर्थी ' वृद्धाच्छः ' ( ४।२।११४ ) यानें छ प्रत्यय होऊन बैल्वकीयम् असें होतें येथें छ ग्रहण नसेल तर छ प्रत्यय पुढें असतांना अण् प्रत्ययाचा लुक् प्रसक्त होत आहे व लुक् झाला तर त्या प्रत्ययामुळें झालेली आदिवृद्धि ( ७।२।११७ ) होणार नाहीं.

८. उदाहरणामध्यें बिल्व शब्दाहून छ प्रत्यय केला आहे तो बिल्वक याहून केलेला नाहीं असें मात्र समजू नये. कारण ' नडादीनां कुक् च ' या सूत्रानें

बिल्वकशब्दाद्विहितः । किं तर्हि । बिल्वकीयशब्दात् ॥ एवं तर्हि सिद्धे सति यच्छग्रहणं करोति तज्ज्ञापयत्याचार्यो भवत्येषा परिभाषा संनियोगशिष्टानामन्यतराभाव उभयोरप्यभाव इति । तस्माच्छग्रहणं कर्तव्यं छस्यैव लुग्यथा स्यात्कुको मा भूदिति ॥

## [१]तुरिष्ठेमेयःसु ॥ ६ । ४ । १५४ ॥

तुः सर्वस्य लोपो वक्तव्योऽन्त्यस्य लोपो मा भूदिति । स तर्हि वक्तव्यः । न वक्तव्यः ।

**तुः सर्वलोपविज्ञानमन्त्यस्य वचनानर्थक्यात् ॥ १ ॥**

तुः सर्वलोपो विज्ञायते । कुतः । अन्त्यस्य वचनानर्थक्यात् । अन्त्यस्य लोपवचने प्रयोजनं नास्तीति कृत्वा सर्वस्य भविष्यति ॥

अथवा लुक्प्रकृतः सोऽनुवर्तिष्यते । अशक्यो लुगनुवर्तयितुम् । किं कारणम् । विजयिष्ठकरिष्ठयोर्गुणदर्शनात् । विजयिष्ठ-

---

येथें अण् प्रत्यय हा बिल्वक शब्दाहून केलेला नाहीं; तर बिल्वकीय शब्दाहून केलेला आहे.

तर मग अशा रीतीनें छस्य असें म्हटल्याशिवाय छ प्रत्ययाचाच लुक् साधत असतांना ज्या अर्थी छस्य हा शब्द येथें सूत्रकार घालीत आहेत त्या अर्थी 'जोडीनें सांगितलेल्या दोन कार्यांपैकीं एकाचा अभाव झाला असतांना तेथें दुसऱ्याचाही अभाव होतो' या अर्थाची 'संनियोगशिष्टानामन्यतराभावे उभयोरप्यभावः' ही परिभाषा ते सुचवीत[१] आहेत. तेव्हां छ प्रत्यय आणि कुक् आगम हे एकाच सूत्रानें जोडीनें सांगितले असल्यामुळें प्रकृत सूत्रानें छ प्रत्ययाची निवृत्ति झाल्याबरोबर कुक् आगमाचीही या परिभाषेनें निवृत्ति होईल ती न व्हावी याकरितां 'केवळ छ प्रत्ययाचा' अशा अर्थाचा छस्य हा शब्द घालणें जरूर आहे.

(सू. १५४) सबंध तृ शब्दाचा लोप होतो असें वचन करावें. कारण, तृ शब्दांतील अन्त्याचा लोप होणें इष्ट नाहीं.

तर मग सगळ्या तृ शब्दाचा लोप सांगावयास पाहिजे.

तसा लोप सांगण्याची जरूर नाहीं.

(वा. १) सगळ्या 'तृ' शब्दाचा लोप समजला जात आहे.

कशावरून ?

अशावरून कीं, तृ शब्दांतील अन्त्याचा लोप सांगण्यांत कांहीं अर्थच दिसत नाहीं[२]. म्हणून सगळ्या तृ शब्दाचा लोप होईल[३].

अथवा चालू असलेला जो लुक् तो येथें अनुवृत्त करण्यांत येईल.

पण येथें लुक् पदाची अनुवृत्ति करणें कठिण आहे.

काय कारण ?

'विजयिष्ठकरिष्ठयोर्गुणदर्शनात्' म्हणजे विज-

---

कुक् आगम अगोदर होऊन नंतर छ प्रत्यय होत आहे. अता क्रम घेण्याचें कारण असें कीं सूत्रामध्यें कुक् असें उच्चारून त्याचे पुढें छ प्रत्ययाची अनुवृत्ति दाखविणारा 'च' शब्द उच्चारला आहे.

९. जर संनियोगशिष्टपरिभाषा नसेल तर कुक् आगमाची निवृत्ति प्राप्तच होत नसल्यामुळें त्या निवृत्तीच्या अभावाकरितां केलेलें केवळ छ प्रत्ययाचा अशा अर्थानें छ ग्रहण विफल होईल.

१. (सू. १५४) इष्ठन् इमनिच् आणि ईयसुन् हे प्रत्यय पुढें असतांना तृ शब्दाचा लोप होतो.

२. कारण अन्त्याचा लोप 'टेः' या पुढील सूत्रानेंच होत आहे.

३. लुक् हा सबंध प्रत्ययाचाच होतो (१।१।६१), भागाचा करतांच येत नाहीं.

करिष्ठयोर्गुणो दृश्यते । विजयिष्ठः । आसुतिं करिष्ठः ॥

टेः ॥ ६ । ४ । १५५ ॥

## णाविष्ठवत्प्रातिपदिकस्य

णौ प्रातिपदिकस्येष्ठवद्भावो वक्तव्यः । किं प्रयोजनम् ।

## पुंवद्भावरभावटिलोपयणादिपरार्थम् ॥ १ ॥

पुंवद्भावार्थम् । एनीमाचष्ट एतयति । श्येतयति । रभावार्थम् । पृथुमाचष्टे प्रथयति । म्रदयति । टिलोपार्थम् । पटुमाचष्टे पटयति । यणादिपरार्थम् । स्थूलमाचष्टे स्थवयति । दवयति ॥ किं पुनरिदं परिगणनमाहोस्विदुदाहरणमात्रम् । उदाहरणमात्रमित्याह प्रादयोऽपि हीष्यन्ते । प्रियमाचष्टे प्रापयतीति ॥

---

यिष्ठ आणि करिष्ठ या ठिकाणीं गुण दृष्टीस पडत आहे म्हणून. उदाहरणार्थ— विजयिष्ठः, आसुतिं करिष्ठः.

( सू. १५५ ) 'णाविष्ठवत् प्रातिपदिकस्य' म्हणजे णि प्रत्यय पुढें असतांना प्रातिपदिकाला इष्ठन् प्रत्यय पुढें असतांना होणारीं कार्यें होतात असें वचन करावें.

काय प्रयोजन ?

( वा. १ ) पुंवद्भाव, रभाव, टिलोप आणि यणादिपर यांकरितां. पुंवद्भावाचें उदाहरण— एनीमाचष्टे एतयति[२], श्येतयति. रभावाचें उदाहरण— पृथुमाचष्टे प्रथयति[३], म्रदयति. टिलोपाचें उदाहरण— पटुमाचष्टे पटयति[४]. यणादिपराचें उदाहरण— दूरमाचष्टे दवयति[५].

काय हें परिगणन[६] समजावयाचें किंवा ही उदाहरणाची दिशा दाखविली आहे असें समजावयाचें ?

उदाहरणाची दिशाच दाखविली आहे असें म्हणतों; परिगणन नव्हे. कारण प्र, स्थ, वगैरे आदेशही होणें इष्ट आहे. उदाहरणार्थ— प्रियमा-

---

४. विजेतृ शब्दाहून 'तुश्छन्दसि' (५।३।५९) यानें इष्ठन्, तृशब्दाचा लोप व अयादेश होऊन विजयिष्ठ असें होतें. येथें तृशब्दाचा लुक् झाला तर 'न लुमता०' (१।१।६३) यानें प्रत्ययलक्षणाचा निषेध असल्यामुळें गुण होणार नाहीं. करिष्ठः येथें कर्तृ शब्दाहून इष्ठन् झाला आहे.

१. ( सू. १५५ ) इष्ठन्, इमनिच् आणि ईयसुन् प्रत्यय पुढें असतांना भसंज्ञकाच्या टिसंज्ञक भागाचा लोप होतो.

२. एत आणि श्येत शब्दांहून 'वर्णादनु०' (४।१।३९) यानें ङीप् व तकाराला नकारादेश होऊन एनी व श्येनी असे शब्द होतात. त्यांहून 'तत्करोति०' (३।१।२६ वा. ५) यानें णिच्. इष्ठन् पुढें असतांना पुंवद्भाव (६।३।३५ वा. ११) होतो तो इष्ठवत् या अतिदेशानें णि प्रत्यय पुढें असतांनाही होतो; म्हणून एतयति आणि श्येतयति अशीं रूपें सिद्ध होतात.

३. पृथु व मृदु या शब्दांहून पूर्वीप्रमाणें णिच्, टिलोप, 'र ऋतो०' (६।४।१६१) यानें इष्ठन् पुढें असतांना सांगितलेला रभाव हा या अतिदेशानें णि प्रत्यय पुढें असतांनाही होतो म्हणून प्रथयति व म्रदयति अशीं रूपें होतात.

४. पटु शब्दाहून पूर्ववत् णिच्, टेः या प्रकृत सूत्रानें इष्ठन् पुढें असतांना सांगितलेला टिलोप हा इष्ठवत् या अतिदेशानें णि प्रत्यय पुढें असतांनाही झाल्यामुळें पटयति असें रूप सिद्ध होतें.

५. दूर शब्दाहून पूर्ववत् णिच्, 'स्थूलदूर०' (६।४।१५६) यानें इष्ठन् पुढें असतांना सांगितलेला यणादिपराचा लोप आणि पूर्वाला गुण 'इष्ठवत्' या अतिदेशानें णिच् पुढें असतांनाही होऊन दवयति असें रूप सिद्ध होतें.

६. परिगणन म्हणजे एवढींच कार्यें इष्ठवत् या अतिदेशानें होतात असें सांगणें.

भारद्वाजीयाः पठन्ति । णाविष्ठवत्प्रातिपदिकस्य पुंवद्भावरभावटिलोपयणादिपरप्रादिविन्मतोर्लुक्कन्विध्यर्थमिति ॥

**[ स्थूलदूरयुवह्रस्वक्षिप्रक्षुद्राणां यणादिपरं पूर्वस्य च गुणः ॥ ६ । ४ । १५६ ॥**

**प्रियस्थिरस्फिरोरुबहुलगुरुवृद्धतृप्रदीर्घवृन्दारकाणां प्रस्थस्फवर्बंहिगर्वर्षित्रप्द्राघिवृन्दाः ॥ ६ । ४ । १५७ ॥**

**बहोर्लोपो भू च बहोः ॥ ६ । ४ । १५८ ॥ ]**

**इष्ठस्य यिट् च ॥ ६ । ४ । १५९ ॥**

किमयं यिशब्द आहोस्विद्यकारः । किं

---

चष्टे प्रापयति.

भरद्वाजानुयायी वैयाकरण पुढें दिल्याप्रमाणें वचन पठण करतात–णाविष्ठवत्प्रातिपदिकस्य पुंवद्भावरभावटिलोपयणादिपरप्रादिविन्मतोर्लुक्कन्-विध्यर्थम् , म्हणजे पुंवद्भाव, रभाव, टिलोप, यणादिपरलोप, प्र स्थ वगैरे आदेश, विन् व मतुप् यांचा लुक्, आणि कन् हे विधी होण्याकरितां णि प्रत्यय पुढें असतां प्रातिपदिकाला इष्ठवत् कार्यांचा अतिदेश सांगितला आहे.

(सू. १५९) काय येथें यिट् शब्दांतील टकार इत्संज्ञक समजून इकारान्त 'यि' असा आगम समजावयाचा अथवा इकारही उच्चारणार्थक मानून केवळ यकार आगम समजावयाचा ?

मग यांत काय बरें विशेष आहे ?

जर 'बहोर्लोपो०' (६।४।५८) येथून 'लोप' पदाची अनुवृत्ति करून बहु या शब्दाहून पुढें असलेल्या इष्ठन् प्रत्ययांतील इकाराच्या

---

७. प्रिय शब्दाहून पूर्वीप्रमाणें णिच्, 'प्रियस्थिर०' (६।४।१५७) यानें इष्ठन् पुढें असतांना सांगितलेलें प्र, स्थ वगैरे आदेश इष्ठवत् या अतिदेशानें णि प्रत्यय पुढें असतांनाही होतात म्हणून येथे प्र आदेश झाल्यानंतर 'प्रकृत्यैकाच्' (६।४।१६३) यानें प्रकृतिभाव झाल्यामुळे टिलोप होत नाही. नंतर वृद्धि (७।२।११५) व पुक् आगम (७।३।३६) होऊन प्रापयति असें रूप होतें.

८. परिगणन नव्हे याविषयीं संमति म्हणून हें वचन लिहिलें आहे. स्रग्विणमाचष्टे स्रजयति. स्रज् शब्दाहून 'अस्माया०' (५।२।१२१) यानें विन्, त्यानंतर स्रग्विन् याहून णिच्, 'विन्मतोः०' (५।३।६५) यानें इष्ठन् पुढें असतांना सांगितलेला लुक् या इष्ठवत् अतिदेशानें णि प्रत्यय पुढें असतांनाही होतो. तसेच श्रीमन्तं आचष्टे श्राययति येथे मतुब्लुक् समजावा. युवानमाचष्टे कनयति. युवन् शब्दाहून पूर्वीप्रमाणें णिच्. 'युवाल्पयोः'० (५।३।६४) यानें इष्ठन् पुढें असतांना सांगितलेला कन् आदेश इष्ठवत् या अतिदेशानें णि प्रत्यय पुढें असतांनाही झाल्यामुळें कनयति असें रूप होतें.

१. (सू. १५६) इष्ठन् इमनिच् व ईयसुन् हे प्रत्यय पुढें असतांना स्थूल, दूर, युवन्, ह्रस्व, क्षिप्र, आणि क्षुद्र, या शब्दांतील यणाला आरंभ करून पुढील भागाचा लोप होतो आणि पूर्वीच्या इकाला गुण होतो.

१. (सू. १५७) इष्ठन् इमनिच् आणि ईयसुन् प्रत्यय पुढें असतांना प्रिय, स्थिर, स्फिर, उरु, बहुल, गुरु, वृद्ध, तृप्र, दीर्घ आणि वृन्दारक यांचे स्थानीं क्रमाने प्र, स्थ, स्फ, वर्, बंहि, गर्, वर्षि, त्रप्, द्राघि, आणि वृन्द असे आदेश होतात.

१ (सू. १५८) बहु शब्दाहून पुढे असलेल्या इमनिच् व ईयसुन् प्रत्ययांतील आदि वर्णाचा लोप आणि बहुशब्दाचे स्थानी भू असा आदेश होतो.

१. (सू. १५९) बहु शब्दाहून पुढे असलेल्या इष्ठ प्रत्ययाचा लोप व यिट् आगम हे होतात, आणि बहुशब्दाचें स्थानी भू असा आदेश होतो.

चातः । यदि लोपोऽप्यनुवर्तते ततो यिशब्दः । अथ निवृत्तं ततो यकारः ।

## ज्यादादीयसः ॥ ६ । ४ । १६० ॥

किमर्थं ज्यात्परस्येयस आत्त्वमुच्यते न लोपः प्रकृतः सोऽनुवर्तेत । का रूपसिद्धिः ज्यायान् । अकृद्यकार इति दीर्घत्वं भविष्यति ॥ एवं तर्हि सिद्धे सति यज्ज्यात्परस्येयस आत्त्वं शास्ति तज्ज्ञापयत्याचार्यो भवत्येषा परिभाषाङ्गवृत्ते पुनर्वृत्तावविधिरिति । किमेतस्य ज्ञापने प्रयोजनम् । पिबेर्गुणप्रतिषेधश्चोदितः स न वक्तव्यो भवति ॥

अथ किमर्थं ज्यात्परस्येयसो दीर्घ उच्यते न अकार एवोच्येत । का रूपसिद्धिः ज्यायान् । आन्तर्यतो दीर्घस्य दीर्घो भविष्यति ॥ एवं तर्हि सिद्धे सति यद्दीर्घ-

---

लोपाचें विधान केलें तर इकारान्त यि शब्द आगम समजला जावा, आणि जर लोप या पदाची अनुवृत्ति आणिली नाहीं व हें सूत्र लोपाचें बाधक समजलें तर केवळ यकार आगम समजावा.

(सू. १६०) कशाकरितां बरें 'ज्य' या शब्दाचे पुढील ईयसुन् प्रत्ययाच्या ईकाराला आत्त्व सांगितलें आहे? तें सांगावयास नको. चालू असलेल्या 'लोप' या शब्दाच्या अनुवृत्तीनेंच काम भागत आहे.

लोपाची अनुवृत्ति केली असतां ज्यायान् हें रूप कसें साधतें?

कृत्प्रत्ययभिन्न यकारादि प्रत्यय पुढें असल्यामुळें 'अकृत्सार्व०' (७।४।२५) यानें दीर्घ साधेल.

तर मग अशा रीतीनें ज्यायान् हे रूप साधत असतांना ज्या अर्थी 'ज्य' शब्दाच्या पुढील ईयसुन् प्रत्ययाच्या ईकाराला आत्त्वाचें अनुशासन आचार्य हे करीत आहेत त्या अर्थी 'अङ्ग-कार्य केलें असतां पुनः अङ्ग-कार्य होत नाहीं' या अर्थाच्या 'अङ्गवृत्ते पुनर्वृत्तावविधिः' या परिभाषेचें अस्तित्व ते सुचवीत आहेत.

हें सुचविण्याचें काय प्रयोजन?

'पिब् आदेशाला गुण होत नाहीं (७।३।७८ वा. १) असा प्रतिषेध करावा' असा वार्तिककारांनीं सूत्रकारांस करावयास सांगितलेला प्रतिषेध करावा लागत नाहीं.

आतां, कशाकरिता बरें 'ज्य' शब्दाच्या पुढील ईयसुन् प्रत्ययाच्या ईकाराला दीर्घ आकार सांगितला आहे? तो सांगूं नये; तर अकारच सांगावा.

पण अकार सांगितला तर 'ज्यायान्' हें रूप कसें बरें साधेल?

ईयसुन् प्रत्ययांतील दीर्घ ईकाराला होणारा अकार 'स्थानेऽन्तरतमः' (१।१।५०) या परिभाषेनें दीर्घाला दीर्घच 'आ'कार झाल्यानें

---

१. (सू. १६०) ज्य शब्दाहून पुढें असलेल्या ईयसुन् प्रत्ययांतील आदि वर्णाला 'आ'कार आदेश होतो.

२. प्रशस्य किंवा वृद्ध शब्दाहून 'द्विवचन०' (५।३।५७) यानें ईयसुन् प्रत्यय केल्यानंतर 'ज्य च' किंवा 'वृद्धस्य च' (५।३।६१, ६२) यानें ज्य आदेश, 'प्रकृत्यैकाच्०' (६।४।१६३) यानें प्रकृतिभाव, प्रकृत सूत्रानें ईयस् प्रत्ययाच्या ईकाराला 'आ'कार व सवर्णदीर्घ होऊन ज्यायान् असें रूप होतें.

३. पा धातूहून लट्, तिप्, शप्, 'पाघ्रा०' (७।३।७८) यानें पिब आदेश, तो हलन्त आहे असें गृहीत धरून प्राप्त झालेल्या लघूपध गुणाच्या प्रतिषेधाकरितां 'पिबतेर्गुणप्रतिषेधो वक्तव्यः' असें वचन केलें आहे. अंगवृत्त परिभाषा आहे म्हणून अंग-कार्य पिबादेश केल्यानंतर पुनः अंगकार्य लघूपध गुण होणार नसल्यानें प्रतिषेधवचन करावयास नको.

ग्रहणं करोति तज्ज्ञापयत्याचार्यो भवत्येषा परिभाषा भाव्यमानेन सवर्णानां ग्रहणं नेति ॥

## र ऋतो हलादेर्लघोः ॥ ६ । ४ । १६१ ॥

कथमिदं विज्ञायते । हलादेरङ्गस्येति । आहोस्विद्धलादेर्ऋकारस्येति । युक्तं पुनरिदं विचारयितुम् । नन्वनेनासंदिग्धेनाङ्गविशेषणेन भवितव्यम् । कथं ह्यृकारस्य नाम हलादिः स्यादन्यस्यान्यः । अयमादिशब्दोऽस्त्येवावयववाची । तद्यथा । ऋगादिः अर्धर्चादिः श्लोकादिरिति । अस्ति सामीप्ये वर्तते । तद्यथा । दधिभोजनमर्थसिद्धेरादिः । दधिभोजनसमीपे । घृतभोजनमारोग्यस्यादिः । घृतभोजनसमीपे । यावता सामीप्येऽपि वर्तते जायते विचारणा हल्समीपस्यर्कारस्य स्यादथवा हलादेरङ्गस्येति ।

---

साधेल.

तर मग या रीतीनें 'ज्यायान्' हें रूप साधत असतांना ज्या अर्थी दीर्घ 'आ' काराचें ग्रहण आचार्य करीत आहेत त्या अर्थी 'विधीयमान हा आपल्या सवर्णाचा ग्राहक होत नाहीं' अशा अर्थाच्या 'भाव्यमानेन सवर्णानां ग्रहणं न' या परिभाषेचें अस्तित्व ते सुचवीत आहेत.

(सू. १६१) येथें हलादि जें अङ्ग अशा रीतीनें 'हलादि' हें अंगाचें विशेषण आहे किंवा हलादि जो ऋकार अशा रीतीनें ऋकाराचें विशेषण आहे?

पण हें विचारणें योग्य आहे काय? 'हलादेः' हें निःसंशय अंगाचेंच विशेषण झालें पाहिजे. कारण, हल् हा निराळा वर्ण निराळ्या वर्णाचा म्हणजे ऋकाराचा आद्यावयव कसा बरें होईल?

आदि हा शब्द अवयववाचक तर आहेच. उदाहरणार्थ—ऋगादिः, अर्धर्चादिः, श्लोकादिः. तसाच सामीप्य या अर्थींही आहे. उदाहरणार्थ—दधिभोजनमर्थसिद्धेरादिः. येथें 'दधिभोजनाचे समीप अर्थसिद्धि आहे' असा अर्थ प्रतीत होतो. तसेंच, 'घृतभोजनमारोग्यस्यादिः' याचा घृतभोजनाचे समीप आरोग्य आहे, असा अर्थ प्रतीत होतो. तेव्हां, ज्या अर्थी 'आदि' हा शब्द सामीप्य या अर्थींही आहे, त्या अर्थी हल्—समीप जो ऋकार या आशयानें 'हलादेः' हें ऋकाराचें विशेषण करावें अथवा अवयवार्थक आदि हा शब्द घेऊन हलादि जें अंग या आशयानें हलादेः हें अंगाचें विशेषण करावें असा विचार उत्पन्न होतो.

मग यांत काय बरें फरक होतो?

जर हलादि जें अंग असें हलादिग्रहण अंगाचें विशेषण केलें तर अप्रथीयान् व अम्रदीयान् येथें 'र' आदेश प्राप्त होऊं शकत नाहीं;

---

४. तेव्हां 'ज्याद ईयसः' असें केलें असतांना 'अ'कार हा विधीयमान असल्यामुळें त्याविषयीं सवर्णग्राहकशास्त्राची प्रवृत्ति होणार नाहीं, म्हणून आद्ग्रहण केलें आहे.

१ (सू. १६१) ज्याच्या पूर्वीं हल् आहे अशा लघु ऋकाराचें स्थानीं 'र' असा आदेश इष्ठन् इमनिच् आणि ईयसुन् हे पुढें असतांना होतो.

२. यदृच्छेनें प्राप्त झालेलें दधिभोजन शीघ्र व हटकून होणाऱ्या कार्यसिद्धीचें सूचक असल्यामुळें तें कार्यसिद्धीच्या समीप होत आहे.

३. येथें अपृथु व अमृदु या शब्दांहून ईयसुन् प्रत्यय केला आहे. तेव्हां ईयसुन् प्रत्ययामुळें अंगसंज्ञा झालेलें अपृथु हें हलादि नाहीं, म्हणून 'र' आदेश होणार नाहीं.

किं चातः ! यदि विज्ञायते हलादेरङ्गस्येति अप्रथीयान् अत्र न प्राप्नोति । अथ विज्ञायते हलादेर्ऋकारस्येति अनृचीयान् अत्रापि प्राप्नोति । उभयथा स्नृचीयानित्यत्र प्राप्नोति । यथेच्छसि तथास्तु ॥ अस्तु तावद्धलादेरङ्गस्येति । कथमप्रथीयान् । तद्धितान्तेन समासो भविष्यति । न प्रथीयानप्रथीयानिति । भवेत्सिद्धं यदा तद्धितान्तेन समासो यदा तु खलु समासात्तद्धितोत्पत्तिस्तदा न सिध्यति । नैव समासात्तद्धितोत्पत्त्या भवितव्यम् । किं कारणम् । बहुव्रीहिणोक्तत्वान्मत्वर्थस्य । भवेद्यदा बहुव्रीहिस्तदा न स्याद्यदा तु खलु तत्पुरुषस्तदा प्राप्नोति । न पृथुरपृथुः अयमप्यपृथुः अयमप्यपृथुः अयमनयोरप्रथीयानिति । न समासादजादिभ्यां भवितव्यम् । किं कारणम् । गुणवचनादित्युच्यते न च समासो गुणवचन इति । यदा तर्हि समासाद्विन्मतुपौ विन्मतुबन्तादजादी तदा प्राप्नुतः ।

---

आणि हलादि जो ऋकार असें ऋकाराचें विशेषण केलें तर अनृचीयान् यथही 'र' आदेश होऊं लागेल; व दोन्हीही तऱ्हांमध्यें स्नृचीयान् येथें र आदेश होऊं लागेल हा दोष येतोच.

तुझ्या इच्छेप्रमाणे कांहींही असो. हलादि हें अंगाचें कां विशेषण असे ना.

पण मग अप्रथीयान् हें कसें साधेल ?

पूर्वी प्रथीयान् असें तद्धितान्त तयार करून नंतर न प्रथीयान् अप्रथीयान् असा नञ्-तत्पुरुष समास केल्यानें साधेल.

जेव्हां तद्धितान्ताशीं नञ्-समास केला तेव्हां साधत आहे; पण जेव्हां अपृथु या समासाहून तद्धितोत्पत्ति विवक्षित असते तेव्हां साधत नाहीं ना ?

तेथें समासाहून तद्धितोत्पत्तीच होत नाहीं.[६]

काय कारण ?

कारण असें कीं–बहुव्रीहि समासानें मत्वर्थ उक्त होत आहे.

जर 'अपृथु' हा बहुव्रीहि केला तर त्याहून मत्वर्थीय तद्धित होणार नाहीं हें खरें, पण अपृथु हा तत्पुरुष केला तर त्याहून इयसुन् प्राप्त होत आहे. उदाहरणार्थ– न पृथुः अपृथुः, अयमपृथुः अयमप्यपृथुः अयमनयोरतिशयेनापृथुः अप्रथीयान् इति.

नञ्तत्पुरुष समास केला असतां त्याहून अजादि इष्ठन् व इयसुन् हे प्रत्यय न व्हावे.

काय कारण ?

गुणवाचकाहून अजादि इष्ठन् व ईयसुन् हे प्रत्यय होतात ( ५।३।३८ ) असें सांगितलें आहे; आणि अपृथु हा समास तर गुणवाचक नाहीं.

तर मग जेव्हां अपृथु या नञ्तत्पुरुष समासाहून विन् किंवा मतुप् करावा तेव्हां

---

४. येथें ऋकाराचें मागें नकार हा हल् असल्यामुळें र आदेश होऊं लागेल.

५. अपृथु हा समास गुणवाचक नसल्यामुळें त्याहून ईयसुन् हा तद्धित प्रत्यय होणार नाहींच ( ५।३।५८ ). विन्-प्रत्ययान्त आणि मतुप्-प्रत्ययान्त शब्द हे गुणवाचक नसले तरी 'विन्मतोर्लुक्' ( ५।३।६५ ) या सूत्राच्या जोरावर त्या शब्दांहून अजादि ईयसुन् प्रत्यय होत असतो हें मनांत धरून अपृथु या बहुव्रीहि किंवा तत्पुरुष समासाहून प्रथमतः मतुप् हा तद्धित प्रत्यय करून त्याच्या पुढे ईयसुन् प्रत्यय केला असतां मतुप् प्रत्ययाचा लुक् ( ५।३।६५ ) होऊन अप्रथीयान् असें जें रूप होतें तें साधत नाहीं.

६. अपृथु या बहुव्रीहि समासाहून मतुप् या तद्धित प्रत्ययाची उत्पत्ति होत नाहीं.

अविद्यमानाः पृथवो ऽपृथवः अपृथवोऽस्य सन्त्यपृथुमान् अयमप्यपृथुमान् अयमप्यपृथुमान् अयमनयोरप्रथीयानिति । नैष दोषः । अपृथव एव न सन्ति कुतो यस्यापृथव इति ॥ इह कस्मान्न भवति । मातयति भ्रातयति । लोपो ऽत्र बाधको भविष्यति । इदमिह संप्रधार्यम् । टिलोपः क्रियतां रभाव इति किमत्र कर्तव्यम् । परत्वाद्रभावः ॥ यदि पुनरवशिष्टस्य रभाव उच्येत । नैवं शक्यम् । इहापि प्रसज्येत । कृतमाचष्टे कृतयतीति ॥ एवं तर्हि परिगणनं कर्तव्यम् । पृथुमृदुकृशभृशदृढपरिवृढानामिति वक्तव्यम् ॥

[ विभाषर्जोश्छन्दसि[1] ॥ ६ । ४ । १६२ ]

प्रकृत्यैकाच्[1] ॥ ६ । ४ । १६३ ॥

प्रकृत्यैकाजिति किमिष्ठेमेयःस्वाहोस्विदविशेषेण । किं चातः । यद्यविशेषेण

---

त्याहून अजादि प्रत्यय प्राप्त होत आहेत. उदाहरणार्थ– अविद्यमानाः पृथवोऽपृथवः अपृथवोऽस्य सन्ति अपृथुमान् अयमपृथुमान् अयमप्यपृथुमान् अयमनयोरतिशयेनापृथुमान् अप्रथीयान्.

हा दोष येत नाहीं. कारण, मतुप् प्रत्ययाची प्रकृति या दृष्टीनें अपृथु हा शब्द मुळीं अस्तित्वांत येत नाहीं. मग ते अपृथु आहेत ज्याला अशा अर्थी अपृथुमान् हा शब्द कसा येणार ?

आतां मातरमाचष्टे मातयति येथें हा 'र' आदेश कां बरें होत नाहीं ?

येथे टिलोप र आदेशाचा बाध करील.

येथें असा विचार उत्पन्न होतो कीं– प्रथमतः टिलोप करावा कीं र आदेश करावा ?

मग यांत काय बरें करावें ?

टिलोपापेक्षां पर असल्यामुळें र आदेश करावा.

आता जर येथें टिलोपाचा अनुवाद करून अवशिष्ट भागांतील ऋकाराला र आदेश सांगितला तर मातयति हें साधेल.

पण अवशिष्ट भागांतील ऋकाराला र आदेशाचें विधान करणें शक्य नाहीं. कारण तसें केलें तर कृतमाचष्टे कृतयति येथेंही ऋकाराला र आदेश होऊं लागेल.

असें आहे तर मग परिगणनच[7] केलें पाहिजे.

पृथुमृदुभृशकृशदृढपरिवृढानामिति वक्तव्यम् म्हणजे पृथु, मृदु, भृश, कृश, दृढ आणि परिवृढ या सहा शब्दांच्या ऋकारालाच र आदेश होतो असें वचन करावें.

( सू. १६३ ) एकाच् शब्द प्रकृतीनें राहतो असें जें म्हटलें आहे तें इष्ठन्, इमनिच् व ईयसुन्[2] हे प्रत्यय पुढें असतांना घ्यावयाचें किंवा सामान्यतः तद्धित पुढें असतांना घ्यावयाचें ?

यांत काय फरक आहे ?

जर सामान्यतः तद्धित पुढें असतांना असें

---

७. हें परिगणन केलें म्हणजे सूत्रामध्यें हलादेः व लघोः हे शब्द घालावयाचें कारण नाहीं.

१. ( सू. १६२ ) वेदामध्यें ऋजु शब्दांतील ऋकाराचें स्थानीं इष्ठन् इमनिच् व ईयसुन् हे प्रत्यय पुढें असतांना विकल्पानें र आदेश होतो.

१. ( सू. १६३ ) इष्ठन् इमनिच् व ईयसुन् प्रत्यय पुढें असताना भसंज्ञक एकाच् शब्द प्रकृतीनें राहतो म्हणजे तेथें लोप होत नाहीं.

२. 'तुरिष्ठे०' ( ६।४।१५४ ) येथून इष्ठेमेयःसु याची अनुवृत्ति करावयाची किंवा 'नस्तद्धिते' ( ६।४।१४४ ) येथून तद्धिते याची अनुवृत्ति करावयाची ?

स्वी खी शौवम् अधुनेत्यत्रापि प्राप्नोति । स्विखिनावेव न स्तः । कथम् । उक्तमेतदेकाक्षरात्कृतो जातेः सप्तम्यां च न तौ स्मृतौ । स्ववान् खवानित्येव भवितव्यम् । शौवमिति परत्वादैजागमे कृते टिलोपेन भवितव्यम् । अधुनेति सप्रकृतिकस्य सप्रत्ययकस्य स्थाने निपातनं क्रियते ॥ इह तर्हि प्राप्नोति द्रव्यम् ।

यस्येत्यादौ प्रकृतिभावः । यस्येति यस्य लोपप्राप्तिस्तस्य प्रकृतिभावो न चैतानि यस्येत्यादौ ॥ एवमपि श्रिये हितः श्रीयः ज्ञा देवतास्य स्थालीपाकस्य ज्ञः स्थालीपाक इत्यत्र प्राप्नोति । तस्मादिष्ठेमेयःसु प्रकृतिभावः ॥

अथेष्ठेमेयःसु प्रकृतिभावे किमुदाहरणम् । प्रेयान् प्रेष्ठः । नैतदस्ति । प्रादी-

म्हटलें तर स्वी[3], खी, शौवम् व अधुना येथेंही प्रकृतिभाव प्राप्त होत आहे.

पण येथें अगोदर स्वी, खिन् असे शब्दच तयार होऊं शकत नाहींत.

कां बरें ?

एकाक्षर, कृदन्त व जातिवाचि शब्द यांहून तसेंच सप्तमीच्या अर्थींही इन् व ठन् हे प्रत्यय होत नाहींत ( ५।२।११५ वा. १ ) असें सांगितलें आहे; तेव्हां स्ववान् खवान् अशींच रूपें व्हावीं.

शौवम् येथें विकारार्थीं अञ् प्रत्यय करून परत्वास्तव ऐच् आगम केल्यानंतर अनेकाच् झाल्यामुळें टिलोप होईल.

अधुना येथेंही प्रकृतिप्रत्ययासहित समुदायाचे स्थानीं अधुना[4] हें निपातन केलें आहे.

तर मग द्रोर्विकारो द्रव्यम् येथें प्रकृतिभाव प्राप्त होतें[5] आहे.

" यस्येत्यादौ प्रकृतिभावः " म्हणजे यस्येति च (६।४।१४८ ) इत्यादि शास्त्रांनीं सांगितलेल्या लोपाचाच प्रकृतिभावानें बाध होतो. आणि ओर्गुणः (६।४।१४६ ) इत्यादि कार्यें तर 'यस्येति०' (६।४।१४८ ) या शास्त्राच्या पुढें नाहींत.

तरीही श्रियै हितः श्रीयः[6], तसेंच ज्ञा देवताऽस्य स्थालीपाकस्य ज्ञः स्थालीपाकः येथें प्रकृतिभाव होऊं लागेल हा दोष येणारच.

तेव्हां इष्ठन्, इमनिच् व ईयसुन् हे पुढें असतांना प्रकृतिभाव होतो असेंच समजलें पाहिजे.

आतां इष्ठन् वगैरे प्रत्यय पुढें असतांना प्रकृतिभाव झाल्याचें उदाहरण कोणतें ?

प्रेयान्, प्रेष्ठः[7].

३. स्वी आणि खी येथें स्व आणि ख या शब्दांहून मत्वर्थीं इन् प्रत्यय (४।२।११५) केला असतां प्रकृतिभाव प्राप्त होत असल्यामुळें अकाराचा लोप ( ६।४।१४८) होणार नाहीं. तसेच शौवम् येथें श्वन् शब्दाहून विकार व अवयव या अर्थी ' अवयवे च प्राण्यौषधि० ' ( ४।३।१३५ ) यानें अञ् केला असतां ' नस्तद्धिते ' ( ६।४।१४४ ) हा टिलोप होणार नाहीं व अधुना येथें इदम् शब्दाहून अधुना प्रत्यय ( ५।३।१७ ) केला असतां इश् आदेश ( ५।३।३ ) केल्यानंतर त्या इकाराचा लोप ( ६।४।१४८ ) होणार नाहीं.

४. इदम् शब्दाहून अधुना हा प्रत्यय आणि प्रकृतीला अश् आदेश असें निपातन केलें आहे. तेव्हां भसंज्ञा नसल्यामुळें लोपाची प्राप्तीच येत नाहीं.

५. द्रोर्विकारो द्रव्यम्. येथें द्रु शब्दाहून यत् प्रत्यय ( ४।३।१६१ ) झाल्यानंतर प्रकृतिभावामुळें ' ओर्गुणः ' ( ६।४।१४६ ) यानें गुण होणार नाहीं.

६. श्रीयः येथें प्रकृतिभावामुळें ईकाराचा लोप झाला नाहीं तर इयङ् होऊं लागेल. तसेंच ज्ञः येथें ज्ञा शब्दाच्या अकाराचा लोप झाला नाहीं तर सवर्णदीर्घ होऊं लागेल.

७. प्रिय शब्दाहून इष्ठन् व ईयसुन् प्रत्यय, ' प्रियस्थिर० ' ( ६।४।१५७ ) यानें प्र आदेश, तो

नामसिद्धत्वान्न भविष्यति ॥ इदं तर्हि । श्रेयान् श्रेष्ठः ।

**प्रकृत्यैकाजिष्ठेमेयःसु चेदेकाच उच्चारणसामर्थ्यादवचनात्प्रकृतिभावः ॥ १ ॥**

प्रकृत्यैकाजिष्ठेमेयःसु चेतन्न । किं कारणम् । एकाच उच्चारणसामर्थ्यादन्तरेणापि वचनं प्रकृतिभावो भविष्यति ॥

**विन्मतोस्तु लुगर्थम् ॥ २ ॥**

विन्मतोस्तु लुगर्थं प्रकृतिभावो वक्तव्यः । स्रग्वितरः स्रजीयान् । स्रग्वितमः स्रजिष्ठः । स्रुग्वत्तरः स्रुचीयान् । स्रुग्वत्तमः स्रुचिष्ठः ॥ ननु च विन्मतोर्लुक्टिलोपं बाधिष्यते ॥ कथमन्यस्योच्यमानमन्यस्य बाधकं स्यात् । असति खल्वपि संभवे बाधनं भवत्यस्ति च संभवो यदुभयं स्यात् । यथैव खल्वपि विन्मतोर्लुक्टिलोपं

हें उदाहरण नव्हे. कारण, प्र वगैरे आभीय असल्यामुळे असिद्ध आहेत. तेव्हां एकाच् नसल्यामुळें प्रकृतिभाव प्राप्तच होत नाहीं.

तर मग श्रेयान्, श्रेष्ठः हें उदाहरण समजावें.

( वा. १ ) इष्ठन्, इमनिच् व ईयसुन् हे प्रत्यय पुढें असतांना एकाचाला प्रकृतिभाव होतो असें म्हणणें असेल तर तें बरोबर दिसत नाहीं.

काय कारण ?

प्र श्र वगैरे आदेशांमध्यें अचाचें उच्चारण केल्याचे जोरावर टिलोप होणार नाहीं. अर्थात् वचन केल्यावांचूनच प्रकृतिभावाचें काम होत आहे.

( वा. २ ) विन् आणि मतुप् यांचा लुक् केला असतां टिलोप न होण्याकरितां प्रकृतिभाववचन करावयास पाहिजे. उदाहरणार्थ—स्रग्वितरः, स्रजीयान्; स्रग्वितमः, स्रजिष्ठः; स्रुग्वत्तरः, स्रुग्वत्तमः; स्रुचीयान्, स्रुचिष्ठः.

येथें प्रकृतिभावाची जरूर नाहीं. कारण, विन्मतोर्लुक् ह्या लुकानेंच टिलोपाचा बाध होईल.

पण विन् व मतुप् यांच्या लुकानें स्रज् वगैरे शब्दामध्यें प्राप्त झालेल्या टिलोपाचा बाध कसा बरें होईल ? कारण, जर उभयतांचा समावेश होण्याचा संभव नसेल तरच तेथें एकानें दुसऱ्याचा बाध होतो; आणि प्रकृत स्थलीं तर विन् व मतुप् याचा लुक् होतो आणि लुक् झाल्यानें तर मागील शब्दामध्यें टिलोप प्राप्त होतो अशा रीतीनें उभयतांचा समावेश होण्याचा संभव आहे.

शिवाय, अशा ठिकाणीं बाध होतो असें म्हटलें तर ज्याप्रमाणें विन्मतोर्लुक् हा टिलोपाचा

---

एकाच् असल्यामुळें प्रकृत सूत्रानें प्रकृतिभाव आणि आणि नंतर 'आद् गुणः' यानें गुण हीं कार्यें झालीं आहेत.

८. प्रशस्य शब्दाहून ईयसुन् व इष्ठन् प्रत्यय झाल्यानंतर ' प्रशस्यस्य श्रः ' ( ५।३।६० ) यानें श्र आदेश झाला आहे. हा श्र आदेश आभीय नसल्यामुळें असिद्ध नाहीं. म्हणून प्रकृतिभाव झाल्यामुळें लोप न होतां आद्गुण होतो.

९. प्रेष्ठः ज्येष्ठः श्रेष्ठः इत्यादि स्थलीं टिलोप होईल तर त्या आदेशाचे ठिकाणीं अकारोच्चारण केलें आहे तें व्यर्थ होईल. म्हणून टिलोप होणार नाहीं.

१०. स्रजीयान् येथें स्रज शब्दाहून ' अस्मायामेधा० ' ( ५।२।१२१ ) यानें विन्, तदन्ताहून ईयसुन्, नंतर ' विन्मतोर्लुक् ' ( ५।३।६५ ) यानें विन् प्रत्ययाचा लुक् केला असतां टिलोप प्राप्त होतो; त्याच्या प्रतिषेधाकरितां प्रकृत सूत्र पाहिजे. तसेंच स्रजिष्ठः येथेंही समजावें. स्रुचीयान् स्रुचिष्ठः येथें स्रुच् शब्दाहून मतुप्, तदन्ताहून ईयसुन् व इष्ठन्; विन्मतोर्लुक्, इत्यादि प्रक्रिया वरीलप्रमाणें समजावी.

बाधत एवं नस्तद्धिते [ १४४ ] इत्येतमपि बाधेत। यतरो नौ ब्रह्मीयान् । ब्रह्मवत्तर इति ॥ यत्तावदुच्यते कथमन्यस्योच्यमानमन्यस्य बाधकं स्यादितीदं तावदयं प्रष्टव्यः । यदि तर्हि विन्मतोर्लुङ्नोच्येत किमिह स्यादिति । टिलोप इत्याह । टिलोपश्चेन्नाप्राप्ते टिलोपे विन्मतोर्लुगारभ्यते स बाधको भविष्यति । यदप्युच्यतेऽसति खल्वपि संभवे बाधनं भवत्यस्ति च संभवो यदुभयं स्यादिति सत्यपि संभवे बाधनं भवति । तद्यथा । दधि ब्राह्मणेभ्यो दीयतां तक्रं कौण्डिन्यायेति सत्यपि संभवे दधिदानस्य तक्रदानं निवर्तकं भवति । एवमिहापि सत्यपि संभवे विन्मतोर्लुक्टिलोपं बाधिष्यते । यदप्युच्यते यथैव खल्वपि विन्मतोर्लुक्टिलोपं बाधत एवं नस्तद्धित इत्येतमपि बाधेतेति न बाधते । किं कारणम् । येन नाप्राप्ते तस्य बाधनम् । नाप्राप्ते टिलोपे

---

बाध करतो त्याप्रमाणें 'नस्तद्धिते' (६।४। १४४) याचाही बाध करील. उदाहरणार्थ– यतरो नौ ब्रह्मीयान्[११], ब्रह्मवत्तरः.

आता विन् व मतुप् यांच्या लुकानें त्यांच्या मागील स्रज् वगैरे शब्दांतील टिलोपाचा बाध कसा होइल असें जें कोणी आचार्य म्हणत आहेत त्यांना हें विचारणें जरूर आहे कीं–जर 'विन्मतोर्लुक्' हा लुक् आरंभिलाच नसता तर प्रकृत स्थलीं कोणतें बरें शास्त्र प्राप्त झालें असतें ?

टिलोपशास्त्र प्राप्त झालें असतें.

मग असेंच आहे तर टिलोप नाप्राप्त[१२] असतांना लुकाचा आरंभ केला असल्यामुळें तो टिलोपाचा बाध करील.

त्याप्रमाणेंच, 'उभयतांचा समावेश होण्याचा संभव नसेल तरच तेथें एकानें दुसऱ्याचा बाध होतो आणि प्रकृत स्थलीं तर उभयतांचा समावेश होण्याचा संभव आहे' असें जें म्हटलें आहे त्यावर उत्तर– उभयतांचा समावेश संभवत असतांनाही बाध होतो. उदाहरणार्थ–ब्राह्मणांना दहीं द्यावें आणि कौण्डिन्याला ताक द्यावें असें सांगितलें असतां दहीं देण्याच्या पूर्वी किंवा मागून ताक देणें संभवत असतानाही जसा तक्रदानानें दधिदानाचा बाध होतो तसा येथेंही दोघांचा संभव असला तरी लुक् टिलोपाचा बाध करील.

आणखीही 'जसा विन् व मतुप् यांचा लुक् टिलोपाचा बाध करतो तसा नस्तद्धिते (६।४। १४४) याचाही बाध करील' असें जे म्हटलें आहे त्यावर उत्तर–

विन् व मतुप् यांचा लुक् 'नस्तद्धिते' या टिलोपाचा बाध करणार नाहीं.

काय कारण ?

कारण असें कीं–जें शास्त्र नाप्राप्त म्हणजे

---

११. ब्रह्मीयान्. अतिशयेन ब्रह्मवान् अशा अर्थाची विवक्षा असतां ब्रह्मन् शब्दाहून मतुप्, तदन्ताहून ईयसुन्, मतुब्लुक्; व 'नस्तद्धिते' (६।४।१४४) यानें टिलोप अशीं कार्यें झालीं आहेत.

१२. विन् आणि मतुप् या प्रत्ययांच्या लुकाबरोबर प्राप्त होणारा टिलोप त्या प्रत्ययांतील टिसंज्ञक भागाचा होणारा आहे आणि लुक् झाल्यानंतर प्राप्त होणारा टिलोप स्रज् वगैरे शब्दांतील टिसंज्ञक भागाचा होणारा आहे असें जरी आहे तरी दोन्ही ठिकाणीं टिलोप सांगणारें शास्त्र 'टेः' हें एकच असल्यामुळें व त्या शास्त्राचा बाध 'विन्मतोर्लुक्' या शास्त्रानें केला असल्यामुळें लुकानंतर प्राप्त झालेलाही टिलोप होणार नाहीं. 'नस्तद्धिते' हें शास्त्र मात्र निराळें आहे. तेव्हां त्याचा लुकानें बाध होत नाहीं. म्हणून ब्रह्मीयान् येथें मतुप् प्रत्ययाचा लुक् झाल्यानंतर 'नस्तद्धिते' यानें लोप होतो.

विन्मतोर्लुगारभ्यते नस्तद्धित इत्येतस्मिन्पुनः प्राप्ते चाप्राप्ते च । अथवा पुरस्तादपवादा अनन्तरान्विधीन्बाधन्त इत्येवं विन्मतोर्लुक्टिलोपं बाधिष्यते नस्तद्धित इत्येतं न बाधिष्यते ॥ यदि तर्हि विन्मतोर्लुक्टिलोपं बाधते पयिष्ठ इति न सिध्यति पयसिष्ठ इति प्राप्नोति । यथालक्षणमप्रयुक्ते ॥

**प्रकृत्याके राजन्यमनुष्ययुवानः ॥३॥**

राजन्यमनुष्ययुवानोऽके प्रकृत्या भवन्तीति वक्तव्यम् । राजन्यकम् मानुष्यकम् यौवनिका ॥

**[ इनण्यनपत्ये ॥ ६ । ४ । १६४ ॥**[१]

**गाथिविदथिकेशिगणिपणिनश्च ॥ ६ । ४ । १६५ ॥**[१]

---

अवश्य प्राप्त आहे त्याचाच बाध होतो. टिलोप नाप्राप्त असतां 'विन्मतो:०' हा लुक् आरंभिला आहे आणि 'नस्तद्धिते' हा टिलोप मात्र कांहीं ठिकाणीं अप्राप्त असतो[१३].

अथवा, 'पूर्वपठित अपवाद हे जवळच्या विधीचाच बाध करतात, दूर असलेल्या विधींचा बाध करीत नाहींत' या न्यायानें विन् व मतुप् यांचा लुक् 'टेः' या टिलोपाचाच बाध करील आणि 'नस्तद्धिते' याचा बाध करणार नाहीं[१४].

आतां जर विन् व मतुप् यांचा लुक् टिलोपाचा बाध करीत आहे, तर पयिष्ठः हें साधत नाहीं. त्याचे ऐवजी पयसिष्ठः असें प्राप्त होतें[१५] आहे.

ज्या शब्दाचा प्रामाणिक प्रयोग कोठें असलेला आढळत नाहीं तो शब्द सूत्राला अनुसरून जसा बनेल तसाच तो बरोबर आहे असें समजलें पाहिजे[१६].

( वा. ३ ) राजन्य, मनुष्य आणि युवन् हे शब्द अक प्रत्यय पुढें असतांना प्रकृतीनें राहतात असें वचन करावें. उदाहरणार्थ– राजन्यकम्[१७], मानुष्यकम्, यौवनिका.

---

१३. विन् प्रत्ययाचा लुक् ज्या ठिकाणीं होतो त्या ठिकाणी 'नस्तद्धिते' याची प्राप्ति नाहीं. तेव्हां मतुप् प्रत्ययाच्या लुकानें 'नस्तद्धिते' याचा बाध होत नसल्यामुळें स्रग्वीयान् येथें मतुप् प्रत्ययाचा लुक् झाल्यानंतर 'नस्तद्धिते' यानें अन् याचा लोप होतो.

१४. विन्मतोर्लुक् ( ५।३।६५ ) हें अपवादशास्त्र पांचव्या अध्यायामध्यें आहे. आणि 'टेः' व 'नस्तद्धिते' ( ६।४।१४३।१४४ ) हीं दोन शास्त्रें सहाव्या अध्यायामध्यें अशाच क्रमानें घातलीं आहेत. तेव्हां विन्मतोर्लुक् याला 'टेः' हें शास्त्र नस्तद्धिते यापेक्षां थोडेंतरी जवळ आहे असें म्हणावयास हरकत नाहीं.

१५. अतिशयेन पयस्वी अशा अर्थाची विवक्षा असतांना पयस् शब्दाहून मत्वर्थी विन् प्रत्यय ( ५।२।१२१ ), तदन्ताहून इष्ठन्, विन् प्रत्ययाचा लुक्; लुक् केल्यानंतर टिलोप होऊन पयसिष्ठः असें रूप होतें. येथें विन् प्रत्ययाचा लुक् केल्यानंतर स्रजिष्ठः याप्रमाणें टिलोप होऊं शकत नाहीं.

१६. तेव्हां पयसिष्ठः असें रूप होईल हा दोष समजूं नये तर पयसिष्ठः असेंच होतें असें समजावें. त्याप्रमाणेंच रजस्विनमाचष्टे रजसयति, आयुष्मन्तमाचष्टे आयुषयति अशीं रूपें होतात.

१७. राजन्य आणि मनुष्य या शब्दांहून समूहार्थी 'गोत्रोक्षो०' ( ४।२।३९ ) यानें वुञ्; प्रकृतिभाव झाल्यामुळें 'आपत्यस्य च०' ( ६।४।१५१ ) यानें यलोप होत नाहीं. यौवनिका येथें युवन् शब्दाहून 'द्वंद्वमनोज्ञा०' ( ५।१।१३३ ) यानें वुञ् प्रत्यय झाला आहे; प्रकृतिभावामुळें 'नस्तद्धिते' यानें टिलोप झाला नाहीं.

१. ( सू. १६४ ) अपत्यार्थक नव्हे असा अण् प्रत्यय पुढें असतांना इन् शब्द प्रकृतीनें राहतो. उदाहरणार्थ सांकूटिनम्.

१. ( सू. १६५ ) गाथिन्, विदथिन्, केशिन्, गणिन् आणि पणिन् हे शब्द अण् प्रत्यय पुढें असतांना प्रकृतीनें राहतात. उदाहरणार्थ- गाथिनः अपत्यं गाथिनः.

[1]संयोगादिश्च ॥ ६ । ४ । १६६ ॥

[1]अन् ॥ ६ । ४ । १६७ ॥

[1]ये चाभावकर्मणोः ॥ ६ । ४ । १६८ ॥

[1]आत्माध्वानौ खे । ६।४।१६९ ॥ ]

[1]न मपूर्वोऽपत्येऽवर्मणः ॥ ६ । ४ । १७० ॥

मपूर्वात्प्रतिषेधे वा हितनाम्नः ॥ १ ॥

मपूर्वात्प्रतिषेधे वा हितनाम्न इति वक्तव्यम् । आरोहितो वै हैतनामः । आरोहितो वै हैतनामनः । समानो हैतनामः । समानो हैतनामन इति च ॥

[1]ब्राह्मोऽजातौ ॥ ६ । ४ । १७१ ॥

अथ किमिदं ब्राह्मस्याजातावनो लोपार्थं वचनमाहोस्विन्नियमार्थम् । कथं च लोपार्थं स्यात्कथं वा नियमार्थम् । यदि तावदपत्य

---

( सू. १७० वा. १ ) मकार पूर्वी असलेल्या अन् याला जो प्रकृतिभावाचा निषेध केला आहे तो हितनामन् या शब्दांतील अन् याला विकल्पानें होतो असें वचन करावें. उदाहरणार्थ—हितनाम्नोऽपत्यं हैतनामः, हैतनामनः; आरोहितो वै हैतनामः; आरोहितो वै हैतनामनः; समानो हैतनामः; समानो हैतनामनः.

( सू. १७१ ) काय, जाति अर्थ नसतांना 'ब्राह्मः' असें त्यांतील अन् याच्या लोपाकरितां येथें निपातन केलें आहे किंवा नियमार्थ केलें आहे ?

---

१. ( सू. १६६ ) संयोग आहे आदि ज्याहून असा इन् शब्द अण् प्रत्यय पुढें असतांना प्रकृतीनें राहतो. उदाहरणार्थ-शङ्खिनः अपत्यं शाङ्खिनः.

१. ( सू. १६७ ) अण् प्रत्यय पुढे असतांना अन् शब्द प्रकृतीनें राहतो. उदाहरणार्थ–सामनः.

१. ( सू. १६८ ) भाव किंवा कर्म या अर्थी नव्हे असा यकारादि तद्धित प्रत्यय पुढें असतांना अन् शब्द प्रकृतीनें राहतो. उदा०–सामसु साधुः सामन्यः.

१. ( सू. १६९ ) आत्मन् आणि अध्वन् हे शब्द ख प्रत्यय पुढें असतांना प्रकृतीनें राहतात. उदाहरणार्थ–आत्मने हितः आत्मनीनः.

१. ( सू. १७० ) वर्मन् शब्दांतील नव्हे असा मकारपूर्वक जो अन् तो अपत्यार्थक अण् प्रत्यय पुढें असतांना प्रकृतीनें राहत नाहीं. उदाहरणार्थ– चन्द्रसाम्नः अपत्यं चान्द्रसामः.

१. ( सू. १७१ ) येथें 'ब्राह्मः' आणि 'अजातौ' अशीं दोन सूत्रें करावयाचीं. त्यांपैकीं पहिल्या सूत्रानें अण् प्रत्यय पुढें असतांना टिलोपाकरितां ब्राह्मः असें निपातन केलें आहे; आणि दुसऱ्या सूत्रानें अपत्यार्थक अण् पुढें असून जाति अभिधेय असतांना ब्रह्मन् शब्दाचा टिलोप होत नाहीं असा निषेध केला आहे. ब्रह्मन् शब्दाहून अण् प्रत्यय केला असतां त्या शब्दापासून चार प्रकारचा अर्थ गम्यमान होतो. प्रकार १—ब्रह्मणोऽपत्यं ब्राह्मणः, येथें अपत्यार्थी अण् आहे आणि जाति गम्यमान आहे. प्रकार २—ब्रह्मणोऽपत्यं नारदः, येथें अपत्यार्थी अण् प्रत्यय आहे आणि जाति गम्यमान नाहीं. प्रकार ३—ब्रह्मण इयं ब्राह्मी ओषधिः; येथें अपत्य या अर्थी अण् नाहीं आणि जाति गम्यमान आहे. प्रकार ४ ब्रह्मा देवता अस्य ब्राह्मं हविः; येथें अपत्य या अर्थी अण् नाहीं आणि जाति गम्यमान नाही. या चार प्रकारांपैकीं पहिला प्रकार सोडून पुढील तिन्ही प्रकारांमध्यें टिलोप होत आहे. त्यांत फक्त दुसऱ्या प्रकारामध्यें 'न मपूर्वोऽपत्ये०' ( ६।४।७० ) या मागील सूत्रानें टिलोप सिद्ध आहे. तिसऱ्या आणि चौथ्या प्रकारांमध्यें टिलोप होण्याकरितां 'ब्राह्मः' या सूत्रानें निपातन केलें आहे. ब्राह्मः या पहिल्या सूत्रामध्यें अपत्ये याचा संबंध नाहीं. त्याच सूत्रानें पहिल्या प्रकारामध्येंही टिलोप होऊं लागेल म्हणून त्याच्या निषेधाकरितां 'अजातौ' हें दुसरें सूत्र केलें आहे. ह्या दुसऱ्या सूत्रामध्यें 'अपत्ये' याची अनुवृत्ति आहे. आणि अजातौ येथील नञाचा अन्वय क्रियेवर आहे, जातीकडे नाहीं. तरी सौत्रत्वास्तव टिलोप झाला आहे असें समजावें.

इति वर्तते ततो नियमार्थम् । अथ निवृत्तं ततो लोपार्थम् ॥ अत उत्तरं पठति ।

**ब्राह्मस्याजातौ लोपार्थं वचनम् ॥१॥**

ब्राह्मस्याजातौ लोपार्थं वचनं क्रियते । अपत्य इति निवृत्तम् ॥

**तत्राप्राप्तविधाने प्राप्तप्रतिषेधः ॥ २ ॥**

तत्राप्राप्तस्य टिलोपस्य विधाने प्राप्तस्य प्रतिषेधो वक्तव्यः । ब्राह्मणः ॥

**न वा पर्युदाससामर्थ्यात् ॥ ३ ॥**

न वा वक्तव्यः । किं कारणम् । पर्युदाससामर्थ्यात्पर्युदासोऽत्र भविष्यति ॥ अस्त्यन्यत्पर्युदासे प्रयोजनम् । किम् । या जातिरेव नापत्यम् । ब्राह्म्योषधिरिति ॥ न वा अत्रेष्यते । अनिष्टं च प्राप्नोतीष्टं च न सिध्यति ॥ एवं तह्यनुवर्ततेऽपत्य इति न त्वपत्य इत्यनेन निपातनमभिसंबध्यते । ब्राह्म इति निपात्यतेऽपत्येऽजाताविति । किं तर्हि । प्रतिषेधोऽभिसंबध्यते । ब्राह्म इति निपात्यते ऽपत्ये जातौ नेति ॥

**कार्मस्ताच्छील्ये ॥ ६।४।१७२ ॥**

---

अन् या भागाच्या लोपाकरितां हें निपातन केलें आहे असें कसें म्हणता येतें आणि नियमार्थ केलें आहे असें कसें म्हणतां येतें ?

जर 'अपत्ये' हें पद अनुवृत्तीनें येत असलें तर हें सूत्र नियमार्थ होतें; आणि अनुवृत्तीनें येत नसलें तर लोपविधीकरितां होतें.

यानंतर वार्तिककार म्हणतात—

(वा. १) जाति अर्थ नसतांना ब्राह्म शब्दाच्या सिद्धीसाठीं अन् याच्या लोपाचें विधानाकरितां हें सूत्र केलें आहे; 'अपत्ये' या पदाची निवृत्ति समजावी.

(वा. २) अप्राप्त टिलोपाचें विधान केलें असतांना त्यानें ब्राह्मणः येथें प्राप्त झालेल्या टिलोपाच्या प्रतिषेधाकरितां वचन केलें पाहिजे.

(वा. ३) तसें वचन करावयास नको

काय कारण ?

कारण असें कीं— ब्राह्मणः येथें अजातौ ह्या पर्युदासाच्या जोरावर टिलोप होणार नाहीं.

पण पर्युदासाचें दुसरेंच प्रयोजन आहे ना ?

तें कोणतें ?

जेथें जाति गम्यमान आहे आणि अपत्यार्थ नाहीं तें. उदाहरणार्थ— ब्राह्मी ओषधिः.

पण येथें तर ब्राह्मी असा टिलोप दिसत आहे. तेव्हां येथें टिलोपाचा पर्युदास होणें इष्ट नाहीं. जर येथें पर्युदास होईल तर उलट अनिष्टच रूप होईल; आणि इष्ट साधणार नाहीं.

तर मग आतां येथें 'अपत्ये' हें जें पद अनुवृत्तीनें येत आहे त्याचा 'अपत्य अर्थ असतांना आणि जाति गम्यमान नसतांना ब्राह्मः हें निपातन केलें आहे' असा निपातनाशीं संबंध करूं नये; तर, 'अजातौ' या प्रतिषेधाशींच त्याचा संबंध करावा. तो असा— ब्राह्म असें निपातन केलें आहे; पण अपत्यार्थ असून जाति गम्यमान असेल तर तें निपातन नाहीं.

---

२. कारण, 'न मपूर्वो०' या पूर्वसूत्राने टिलोप सिद्ध आहे.

३. ब्राह्मी ओषधिः व ब्राह्मं हविः येथें टिलोप होण्याकरितां.

१. (सू. १७२) ताच्छील्य म्हणजे तसा स्वभाव असणें हा अर्थ गम्यमान असतांना कार्म असें टिलोपाचें निपातन केलें जातें. उदाहरणार्थ–कार्मः. येथें कर्म शीलमस्य या अर्थीं कर्मन् शब्दाहून ण प्रत्यय (४।४।६२) झाला आहे. नेहमीं कर्म करीत बसणें अशा स्वभावाचा मनुष्य हा कार्म याचा अर्थ आहे. येथें अपत्य अर्थ नसल्यामुळें 'न मपूर्वो०' यानें टिलोप सिद्ध नाहीं.

**किमर्थमिदमुच्यते न नस्तद्धिते [१४४] इत्येव सिद्धम् । न सिध्यति । अनणीति प्रकृतिभाव: प्रसज्येत । अणीत्युच्यते णश्चायम् ॥ एवं तर्हि सिद्धे सति यन्निपातनं करोति तज्ज्ञापयत्याचार्यस्ताच्छीलिके णेऽण्कृतानि भवन्तीति । किमेतस्य ज्ञापने प्रयोजनम् । चौरी तापसीत्यणन्तादितीकार: सिद्धो भवति ॥**

**[ औक्षमनपत्ये ॥ ६।४।१७३ ॥ ]**

**दाण्डिनायनहास्तिनायनाथर्वणिकजैह्माशिनेयवासिनायनिभ्रौणहत्यधैवत्यसारवैक्ष्वाकमैत्रेयहिरण्मयानि ॥ ६ । ४ । १७४ ॥**

---

( सू. १७२ ) ताच्छील्य या अर्थाचा ण प्रत्यय पुढें असतां कार्म: येथें टिलोपाचें निपातन कशाकरितां केलें आहे ? कारण, 'नस्तद्धिते' यानेंच येथें टिलोप साधत आहे.

'नस्तद्धिते' यानें टिलोप साधत नाहीं. कारण, 'अन्' यानें प्रकृतिभाव प्रसक्त होत आहे.

पण अण् पुढें असताना त्यानें प्रकृतिभाव सांगितला आहे, आणि कार्म: येथें तर ण प्रत्यय केला आहे.

तर मग अशा रीतीनें येथें टिलोप सिद्ध होत असतां ज्या अर्थी आचार्य निपातन करीत आहेत, त्या अर्थी 'ताच्छीलिक ण प्रत्यय केला असतांनाही तेथें अण्–प्रयुक्त कार्यें होतात' असें ते सुचवीत आहेत.

हें सुचविल्याचें काय फल ?

चुरा शीलमस्याश्चौरी, तसेंच तप: शीलमस्यास्तापसी, येथें 'छत्रादिभ्यो ण:' (४।४।६२) यानें ण प्रत्यय केला असतां त्याच्या पुढें अण्–प्रत्ययान्ताहून सांगितलेला ङीप् प्रत्यय (४।१।१५) करतां येतो.

---

१. (सू. १७३) उक्षन् शब्दाहून अपत्य अर्थाशिवाय इतर अर्थी अण् प्रत्यय केला असतां तेथें 'औक्ष' असें टिलोपाचें निपातन केलें जातें. उदाहरणार्थ-उक्ष्ण: इदम् औक्षं पदम्.

१. (सू. १७४) दाण्डिनायन, हास्तिनायन, आथर्वणिक, जैह्माशिनेय, वासिनायनि, भ्रौणहत्य, धैवत्य, सारव, ऐक्ष्वाक, मैत्रेय आणि हिरण्मय हे शब्द निपातन केले जातात. दण्डिन: अपत्यं दाण्डिनायन:, हस्तिन: अपत्यं हास्तिनायन:, येथें दण्डिन् व हस्तिन् या शब्दाहून फक् प्रत्यय (४।१।९९) केला असतां प्रकृतिभावाचें निपातन केलें आहे. 'अथर्वन् यानें सांगितलेला ग्रंथ या अर्थाच्या अथर्वन् शब्दाहून अध्ययन करणारा या अर्थी ठक् प्रत्यय (४।२।६३) केला असतां प्रकृतिभावाचें निपातन केलें आहे. जिह्माशिन् शब्दाहून अपत्य या अर्थी ढक् प्रत्यय (४।१।१२३) केला असतां प्रकृतिभावाचे निपातन केलें आहे. वासिन् शब्दाहून अपत्य या अर्थी फिञ् प्रत्यय (४।१।१५७) केला असतां प्रकृतिभावाचें निपातन केलें आहे. भ्रूणहन् व धीवन् या शब्दांहून भाव या अर्थी ष्यञ् प्रत्यय (५।१।१२४) केला असतां नकाराला तकार आदेशाचें निपातन केलें आहे. सरयू शब्दाहून 'तत्र भव:' या अर्थी अण् प्रत्यय (४।३।५३) केला असतां त्या शब्दांतील अय या भागाचा लोप निपातनामुळें होतो; नंतर गुण (६।४।१४६) व अव् आदेश होऊन सारव असा शब्द होतो. इक्ष्वाकु शब्दाहून अपत्य या अर्थी अञ् प्रत्यय (४।१।१६८) केला असतां या निपातनानें उकाराचा लोप होऊन ऐक्ष्वाक शब्द आद्युदात्त (६।१।१९७) होतो; आणि इक्ष्वाकु शब्दाहून त्या देशामध्यें असणारा या अर्थी अण् प्रत्यय (४।२।११०) केला असतां या निपातनानें उकाराचा लोप होऊन ऐक्ष्वाक शब्द अन्तोदात्त (३।१।३) होतो. मित्रयु शब्दाहून अपत्य या अर्थी ढञ् प्रत्यय (४।१।१३६) केला असतां या निपातनानें यु शब्दाचा लोप होतो. हिरण्य शब्दा-

अत्र भ्रौणहत्ये किं निपात्यते । यकारादौ तद्धिते तत्वं निपात्यते ।

**भ्रौणहत्ये तत्वनिपातनानर्थक्यं सामान्येन कृतत्वात् ॥ १ ॥**

भ्रौणहत्ये तत्वनिपातनमनर्थकम् । किं कारणम् । सामान्येन कृतत्वात् । सामान्येनैवात्र तत्वं भविष्यति हनस्तोऽचिण्णलोः [ ७. ३. ३२ ] इति ॥

**ज्ञापकं तु तद्धिते तत्वप्रतिषेधस्य ॥ २ ॥**

एवं तर्हि ज्ञापयत्याचार्यो न तद्धिते तत्वं भवतीति । किमेतस्य ज्ञापने प्रयोजनम् । भ्रौणघ्नः वार्त्रघ्न इत्यत्र तत्वं न भवति ॥

**ऐक्ष्वाकस्य स्वरभेदान्निपातनं पृथक्त्वेन ॥ ३ ॥**

ऐक्ष्वाकस्य स्वरभेदान्निपातनं पृथक्त्वेन कर्तव्यम् । ऐक्ष्वाकः ऐक्ष्वाकः ॥

**एकश्रुत्या निर्देशात्सिद्धम् ॥ ४ ॥**

एकश्रुतिः स्वरसर्वनाम यथा नपुंसकं लिङ्गसर्वनाम ॥

---

( सू. १७४ ) येथे भ्रौणहत्य शब्दामध्यें कोणाचें निपातन केलें आहे ?

यकारादि तद्धित प्रत्यय पुढें असताना तकार आदेशाचें निपातन केलें आहे.

( वा. १ ) भ्रौणहत्य शब्दामध्यें तकार आदेशाचें निपातन केलें आहे तें व्यर्थ होत आहे.

काय कारण ?

कारण असें कीं—सामान्येन कृतत्वात् म्हणजे 'हनस्तो०' ( ७।३।३२ ) या सामान्य शास्त्रानेंच येथें तकार आदेश साधत आहे.

( वा. २. ) असें आहे तर तद्धित प्रत्यय पुढें असतांना तकार आदेश होत नाहीं असें आचार्य ज्ञापन करीत आहेत.

असें ज्ञापन केल्याचें काय फल ?

भ्रौणघ्नः व वार्त्रघ्नः येथें तकार आदेश होत नाहीं हें फल.

( वा. ३ ) ऐक्ष्वाक शब्दाचे ठिकाणीं स्वर भिन्न भिन्न असल्यामुळें आद्युदात्त व अन्तोदात्त असा दोन प्रकाराचा ऐक्ष्वाक शब्द होत आहे. त्या उभयताचें पार्थक्यानें निपातन करावें. उदाहरणार्थ —ऐक्ष्वाकः, ऐक्ष्वाकः.

( वा. ४ ) ऐक्ष्वाक शब्दाचें एकश्रुतीनें[३] उच्चारण केलें असल्यामुळें हें सिद्ध होत आहे. एकश्रुति हें उदात्त, अनुदात्त व स्वरित या सर्व स्वरांचें सामान्यरूप आहे. जसें नपुंसकलिंग हें सर्व लिंगाचें सामान्यरूप[४] आहे, तसेंच हें होय.

---

हून विकार या अर्थी मयट् प्रत्यय ( ४।३।१४३ ) केला असतां य शब्दाचा लोप निपातनामुळें होतो.

२. भ्रूणघ्नः अयं भ्रौणघ्नः. येथें भ्रूणहन् शब्दाहून 'तस्येदम्' ( ४।३।१२० ) यानें अण् प्रत्यय झाला आहे. वृत्रहा देवता अस्य वार्त्रघ्नः. येथें वृत्रहन् शब्दाहून 'साऽस्य देवता' ( ४।२।२४ ) यानें अण् प्रत्यय झाला आहे.

३. एका म्हणजे एक प्रकारची आहे श्रुति म्हणजे श्रवण ज्याचें तें एकश्रुति. ज्या ठिकाणीं उदात्त वगैरे स्वरांमुळें ऐकण्यांत भासणारा निराळेपणा मोघम उच्चारणामुळें भासत नाहीं अशा पद वाक्य वगैरेंना एकश्रुति म्हणतात. तेव्हां अर्थातच एकश्रुतीनें उच्चारलेल्या ऐक्ष्वाक शब्दामध्ये आद्युदात्त आणि अन्तोदात्त अशा दोन्ही प्रकारच्या ऐक्ष्वाक शब्दांचा संग्रह होत असल्यामुळें सूत्रामध्यें निरनिराळे दोन तऱ्हेचे ऐक्ष्वाक शब्द उच्चारावयास नकोत.

४. कारण 'सामान्ये नपुंसकम्' असें म्हटलें असल्यामुळें त्यामध्यें पुंलिंग आणि स्त्रीलिंग यांचा मोघम स्वरूपानें संग्रह होत आहे.

अथ मैत्रेये किं निपात्यते ।

**मैत्रेये ढञि यादिलोपनिपातनम् ॥५॥**

मैत्रेये ढञि यादिलोपो निपात्यते ॥ इदं मित्रयुशब्दस्य चतुर्ग्रहणं क्रियते । गृष्ट्यादिषु प्रत्ययविध्यर्थं पाठः क्रियते । द्वितीयेऽध्याये यस्कादिषु लुगर्थं ग्रहणं क्रियते । सप्तमेऽध्याय इयादेशार्थम् । इदं चतुर्थं यादिलोपार्थम् । द्विर्ग्रहणं शक्यमकर्तुम् । बिदादिषु प्रत्ययविध्यर्थं पाठः कर्तव्यः । तत्र नैवार्थो लुका नापि यादिलोपेन । इयादेशेनैव सिद्धम् ॥ नैवं शक्यम् । इह हि मैत्रेयकः संघ इति संघाङ्कलक्षणेष्वञ्यञिञामण् [ ४. ३. १२७ ] इत्यण्प्रसज्येत ॥

हिरण्मये किं निपात्यते ।

**हिरण्मये यलोपवचनम् ॥ ६ ॥**

हिरण्मये यलोपो निपात्यते । हिरण्मयं कलशं बिभर्षि ॥

अथ हिरण्यये किं निपात्यते ॥

---

आतां मैत्रेय येथें कशाचें निपातन केलें आहे ?

( वा. ५ ) मैत्रेय या शब्दामध्यें ढञ् प्रत्यय पुढें असताना मित्रयु शब्दातील यु शब्दाच्या लोपाचें निपातन केलें आहे.

या मित्रयु शब्दाचें चार ठिकाणीं ग्रहण केलें आहे; तें असें-(१) ' गृष्ट्यादिभ्यः ' ( ४।१।१३६ ) येथें गृष्ट्यादि गणामध्यें ढञ् प्रत्ययाचे विधानाकरिता मित्रयु शब्दाचा पाठ केला आहे; (२) द्वितीय अध्यायामध्यें ' यस्कादिभ्यः ' ( २।४।६३ ) येथें प्रत्ययाचा लुक् सांगण्याकरितां यस्कादि गणामध्यें मित्रयु शब्दाचा पाठ केला आहे; ( ३ ) सातव्या अध्यायामध्यें यकारादि भागाला इय् आदेश सांगण्याकरितां ' केकयमित्रयु० ' ( ७।३।२ ) या सूत्रामध्यें पाठ केला आहे; ( ४ ) आणि प्रकृत सूत्रामध्यें यकारादि भागाचा लोप सांगण्याकरितां चवथ्या वेळीं हें मित्रयु शब्दाचें ग्रहण केलें आहे. त्यांपैकीं दोन[5] ठिकाणीं मित्रयु शब्दाचें ग्रहण केलें नाहीं तरी चालेल. कारण गृष्ट्यादि गणामध्यें पाठ न करतां बिदादि गणामध्यें (४।१।१०४) मित्रयु शब्दाचा पाठ करावा म्हणजे त्याहून अञ् प्रत्यय होईल आणि त्याचा ' यञञोश्च ' ( २।४।६४ ) यानें लुकुही होईल. तेव्हां यस्कादि गणामध्यें पाठ करून ढञ् प्रत्यय करून त्याचा लुक् करण्यांत कांहीं अर्थ नाहीं. आणि ढञ् करून यु शब्दाचा प्रकृत सूत्रानें लुक् करण्यांतही अर्थ नाहीं. अञ् प्रत्यय करून इय् आदेशानेंच ( ७।३।२ ) मैत्रेयः हें रूप साधत आहे.

मित्रयु शब्दाचा बिदादि गणामध्यें पाठ करणें शक्य नाहीं. कारण मित्रयूनामयं मैत्रेयकः संघः येथें ' संघाङ्कलक्षणे० ' ( ४।३।१२७ ) यानें अण् प्रत्यय होऊ लागेल.

आतां हिरण्मय शब्दामध्यें कशाचें निपातन केलें आहे ?

( वा. ६ ) हिरण्यय येथें मयट् प्रत्यय पुढें असतांना य शब्दाच्या लोपाचें निपातन केलें आहे. उदाहरणार्थ– हिरण्मयं कलशं बिभर्षि.

बरें, आतां पुढील सूत्रात हिरण्यय शब्दामध्यें कशाचें बरें निपातन केलें आहे ?

---

५. यस्कादि गणामध्यें आणि प्रकृत सूत्रामध्यें अशा दोन ठिकाणीं नको. आतां गृष्ट्यादि गणामध्येंही मित्रयु शब्दाचा पाठ नको; तरी तो तेथून काढून बिदादि गणामध्यें घातला पाहिजे. तेव्हां सर्वथा तो कमी करतां येत नाहीं. म्हणून येथें दोन ठिकाणीं असें म्हटलें आहे.

६. मैत्रेय हा शब्द मित्रयु शब्दाहून ढञ् प्रत्यय झाल्यावर यु ह्या भागाचा लोप करून साधावयाचा तो आत मित्रयु शब्दाहून अञ् प्रत्यय करून यु ह्या भागाला इय् आदेश करून साधला आहे. अर्थामध्यें फरक कांहींही होत नाहीं; आणि दोन ठिकाणीं मित्रयु शब्दाचा पाठ करावयास नको हें लाघव आहे.

**हिरण्ययस्य च्छन्दसि मलोपवचनात्सिद्धम् ॥ ७ ॥**

हिरण्यये छन्दसि मलोपो निपात्यते। हिरण्ययी नो नयतु । हिरण्ययाः पन्थान आसन् । हिरण्ययमासनम् ॥

**[ ऋत्व्यवास्त्व्यवास्त्वमाध्वीहिरण्ययानि च्छन्दसि ॥ ६ । ४ । १७५ ॥ ]**

इति श्रीभगवत्पतञ्जलिविरचिते व्याकरणमहाभाष्ये षष्ठस्याध्यायस्य चतुर्थे पादे चतुर्थमाह्निकम् ॥ पादश्च समाप्तः ॥

॥ षष्ठोऽध्यायः समाप्तः ॥

---

वेदामध्यें हिरण्यय येथें मयट् प्रत्ययांतील म शब्दाच्या लोपाचें निपातन केलें असतां तें सिद्ध होतें. उदाहरणार्थ– 'हिरण्ययी नो नयतु; हिरण्ययाः पन्थान आसन्; हिरण्ययमासनम्.

याप्रमाणें श्रीभगवान् पतंजलींनीं रचिलेल्या व्याकरणमहाभाष्याच्या सहाव्या अध्यायाच्या चौथ्या पादांतील चौथें आह्निक समाप्त झालें; पादही समाप्त झाला व अध्यायही समाप्त झाला.

---

१. (सू. १७५) ऋत्व्य, वास्त्व्य, वास्त्व, माध्वी आणि हिरण्यय हे शब्द वेदामध्यें निपातन केले जातात. ऋतु आणि वास्तु या शब्दांहून 'तत्र भवः' या अर्थी यत् प्रत्यय केला असतां तेथें निपातनामुळें उकाराला यण् होतो. वस्तु शब्दाहून 'तत्र भवः' या अर्थी अण् प्रत्यय केला असतां निपातनामुळें उकाराला यण् होतो. मधु शब्दाहून अण् प्रत्यय करून पुढें ङीप् प्रत्यय केला असतां निपातनामुळें मधु शब्दांतील उकाराला यण् होतो. हिरण्य शब्दाहून विकार या अर्थी मयट् प्रत्यय केला असतां निपातनामुळें त्या मयट् प्रत्ययांतील म शब्दाचा लोप होतो.

अध्याय ६ पाद ४ समाप्त.